श्री.

# हिंदुस्थानचा अर्वाचीन इतिहास
## भाग दुसरा.

# मराठी रियासत.

( पूर्वार्ध. )

( सुधारून वाढविलेली नवीन आवृत्ति )

लेखक

गोविंद सखाराम सरदेसाई, बी. ए; बडोदें

प्रकाशक,

दामोदर सांवळाराम आणि मंडळी.

जनरलप्रिंटर्स, पब्लिशर्स, एजंटस् इ. इ. ठाकुरद्वार-मुंबई, नं. २

स. १९१५.

किंमत अडीच रुपये.

# प्रस्तावना.

१. आजपर्यंतचें काम.—मराठी वाचकांची जिज्ञासा भागविणारें हिंदुस्थानच्या इतिहासाचें एकही पुस्तक नाहीं असें पाहून, पंचवीस वर्षांपूर्वी या विषयांत मीं यथाशक्ति उद्योग सुरू केला. स. १८९९ त मुसलमानी रियासत, स. १९०२ त मराठी रियासत–पूर्वार्ध, आणि स. १९०७ त ब्रिटिश रियासत–पूर्वार्ध, असे भाग प्रसिद्ध झाले. या कालावधींत देश-स्थिति व लोकशिक्षण यांच्या संबंधानें पुष्कळच फरक पडला. लेखकांस नवीन अनुभव प्राप्त झाला. वाचकांच्या अपेक्षा वाढल्या. आपल्या इति-हासाचें साहित्य जमविण्याकडे अनेक शोधकांचें लक्ष लागलें. नवीन माहिती व ग्रंथ बाहेर आले. वर्तमानपत्रांतून व मासिक पुस्तकांतून अनेक प्रश्नांची चर्चा होऊं लागली. पूर्वींचे ग्रह, समजुती व सिद्धान्त बरेचसे बदलले. वाचन, प्रवास व अनुभव यांच्या योगानें माझ्याही विचारांत पुष्कळसें अंतर पडलें. परिस्थितीच्या संबंधानें लेखकांची व प्रकाशकांची जबाब-दारी वाढली. हे प्रकार इतक्या त्वरेनें घडले कीं, वीस वर्षांपूर्वी लिहिलेलीं पुस्तकें आज जवळ जवळ निरुपयोगी ठरलीं.

अशा स्थितींत द्वितीयावृत्ती काढण्याचा प्रसंग आला, तेव्हां पूर्वींचींच पुस्तकें जशींच्या तशीं छापणें शक्य नव्हतें. म्हणून मुसलमानी रियासत नवीन धर्तीवर पुनः सर्व दुरुस्त करून, आणि एकंदर उपलब्ध साधनांचा उपयोग करून स. १९१० त छापिली; आणि मराठी रियासतीचा उत्त-रार्ध लिहिण्याचा विचार मनांत आणून उद्योग करूं लागलों, तों मराठ्यांच्या इतिहासांतील प्रचंड अडचणींनीं मनाचा गोंधळ उडाला. नुसतें साहित्य एकत्र करणेंच अवघड झालें, मग विषयाच्या एकवाक्यतेची गोष्ट तर बोलावयासच नको. हें काम माझ्या हातून तडीस जाणें शक्य नाहीं, असें वाटून कित्येकदां उद्योग सोडूनही दिला. मराठी रियासतीचा पूर्वार्धच जर चुकलेला तर उत्तरार्ध तयार व्हावा कसा! कित्येक इतिहासज्ञ स्नेह्यांची मदत मिळविण्याच्या आशेनें गांठ घेतली; पण त्यामुळें अडचणी दूर होणें बाजूस राहून उलट या उद्योगाची दुर्घटता मात्र वाढली. काव्येतिहाससंग्रह, भारतवर्ष, इतिहाससंग्रह. ऐतिहासिक लेखसंग्रह, इतिहाससंशोधकमंडळाचे

ग्रंथ, सत्कार्योत्तेजक सभेची माला, मराठा घराण्यांच्या व कायस्थप्रभूंच्या कैफीयती व बखरी, पेशव्यांच्या रोजनिशा, रा० राजवाड्यांचे वीस प्रचंड साधनग्रंथ, शिवाय स्वतंत्र लेख, चरित्रें व संस्थानांचे इतिहास, सरस्वती-मंदिर, ग्रंथमाला, विविधज्ञानविस्तार, मॉडर्न रिव्ह्यु, टाइम्स् ऑफ् इंडिया, वगैरेंतील लेख व चर्चा, प्रो० सरकार, मनूची, फॉरेस्ट वगैरेंचे इंग्रजी ग्रंथ इत्यादि विस्तृत व बहुविध साहित्याचीं दोन एकशें पुस्तकें बाहेर आलेलीं असून, अद्यापि त्यांत झपाट्यानें भर पडतच आहे. या एकंदर साहित्याचें योग्य संकलन करून मराठ्यांचा इतिहास लिहिला पाहिजे. नवीन माहितीनें जरी अनेक वादग्रस्त प्रश्नांवर प्रकाश पडला आहे, तरी ती पुष्कळ अंशीं असंबद्ध, परस्परविरोधी व अव्यवस्थित अशी असल्यामुळें, त्यावरून इतिहास लिहिण्याचें कामही अतिशय बिकट झालें आहे. वाचकांची टोंचणी व प्रकाशकांचा लकडा पाठीवर असल्यामुळें हातीं घेतलेलें काम सोडून देण्याची सोय नव्हती, तेव्हां तें यथाशक्ति संपविण्याचा प्रयत्न चालू केला. अशा रीतीनें मराठी रियासत–पूर्वार्ध हेंच पुस्तक पुनरपि सर्व नवीन तयार केलें, तें हें वाचकांपुढें आज ठेवीत आहें. थोडें कां होईना, पण पुढें पाऊल पडलें याबद्दल आनंद वाटतो. मात्र मराठी रियासतीची मजल अद्यापि शाहूछत्रपतीच्या राज्यारोहणापलीकडे गेलेली नाहीं; ती पेशवाईच्या अखेरपर्यंत लवकरच पोंचविण्याची उत्कट इच्छा आहे. घडेल तेव्हां खरी.

२. **उत्तरार्धाची तयारी.**—पेशवाईचा भाग केव्हां बाहेर येतो म्हणून अनेक वाचक उत्कंठेनें वाट पाहत आहेत, त्यांची कांहीं काळ निराशा होणार, पण ती निराशा या पुस्तकानें बऱ्याच अंशीं कमी होईल. मराठ्यांची खरी कर्तबगारी व तिचें उदात्त स्वरूप या पहिल्या भागांतच विशेषतः दिसून येतें. शिवाय पेशवाईच्या मानानें या पहिल्या भागांतील बरेच प्रकार अप्रसिद्ध आहेत. त्या पुण्यपुरुष शिवछत्रपतीची बरीचशी नवीन माहिती बाहेर आल्यानें त्याच्या चरित्राचें पूर्वीचें स्वरूप बहुंशीं बदलून गेलें आहे. शहाजीचीं प्रचंड कारस्थानें, शिवाजीचें बालपण व परिस्थिति, मावळे देशमुखांचे स्वभाव व उद्योग, औरंगजेबाचे कावे, जयसिंगाची स्वारी व शिवाजीचें आग्र्यास प्रयाण, इत्यादि अनेक प्रकार आतां चांगले स्पष्ट झाले आहेत. औरंगजेबाचा पत्रव्यवहार उपलब्ध

झाल्यानें पुष्कळ नवीन गोष्टी बाहेर आल्या आहेत. कवि, मुत्सद्दी, योद्धे, प्रधान इत्यादि अनेक राष्ट्रीय पुरुषांचे वृत्तान्त लुप्त होते ते आतां प्रसिद्ध झाले आहेत. मराठ्यांच्या इतिहासांत असा एक विपर्यास दिसतो कीं, ज्या घराण्यांनीं व व्यक्तींनीं अप्रतिम राष्ट्रसेवा केली, अशा बहुतेकांचा आज मागमूसही राहिला नाहीं; आणि जे आज प्रसिद्ध आहेत, त्या सर्वांकडून म्हणण्यासारखें कार्य झालें आहे असेंही नाहीं. सबब पूर्वजांची लुप्त कामगिरी उजेडांत आणून तिचा योग्य गौरव करणें हें इतिहासाचें काम आहे. यासाठींच आरंभींच्या या अज्ञात भागाचें ऐतिहासिक महत्त्व अतोनात आहे. तथापि एकंदर कामाची रूपरेखा बरीचशी तयार झाली असल्यामुळें पेशवाईच्या भागास आतां फारसा विलंब लागण्याचें कारण नाहीं. त्यासंबंधानें वाचकांस फार दिवस तिष्ठत ठेवूं नये, अशी मलाही उत्कंठा आहेच. डोक्यावर घेतलेलें एक एक ओझें जितकें खालीं होईल, तितका माझाही भार हलकाच होणार. ही गोष्ट केवळ स्वतःच्या इच्छेची नसते. एकदां काम करूं लागल्यावर त्यास फांटे फुटत जातात, आणि उपस्थित बाबतींचें निराकरण झाल्याशिवाय एक एक प्रकरणाची तड लागत नाहीं. ब्रिटिश रियासतीचा उत्तरभागही असाच लोळत पडला आहे. स्वीकृत जबाबदारींतून लवकर मोकळें होण्याची शक्ति मला जगन्नियंत्यानें द्यावी, एवढीच प्रार्थना आहे.

३. या पुस्तकाचें स्वरूप.—सर्वांगसुंदर असा मराठ्यांचा इतिहास हळूहळू बनत जाणारा असून, त्या कामीं पुष्कळ विद्वानांचे परिश्रम खर्ची पडले पाहिजेत. या विषयासंबंधानें नुकती कोठें जागृति होऊं लागली आहे. हल्लीं बरेंच साहित्य बाहेर आलें असून, तें सामान्य वाचकांच्या सोयीचें नसल्यामुळें त्याचें थोडक्यांत एकीकरण करून लोकांचें लक्ष राष्ट्रेतिहासाकडे लावणें, एवढेंच काम तूर्त या पुस्तकानें होणार आहे. प्रत्येक मुद्यासंबंधानें निरनिराळ्या ठिकाणीं आलेली माहिती व अधिकारी गृहस्थांनीं केलेली चर्चा एकत्र करून ती आधारांसह या पुस्तकांत वाचकांपुढें आणिली आहे. अमुकच मत किंवा पक्ष आग्रहानें खरा खोटा न ठरवितां ज्यानें त्यानें आपल्या बुद्धीप्रमाणें मत बनवावें, असें धोरण ठेविलें आहे. त्यासाठीं अवश्य तितकें सर्व बाजूंचें सूचक विवेचन देण्यास कमी केलें नाहीं. असें करण्यांत कित्येक ठिकाणीं अनवश्यक पाल्हाळ अथवा पुनरावृत्ति, व क्वचित्

परस्परविरोधी विवरण झालें, असें वाटण्याचा संभव आहे. यासंबंधानें मुख्य गोष्ट ध्यानांत ठेवावयाची, ती अशी कीं, मराठ्यांचा इतिहास अद्यापि बनावाच्या व चर्चेच्या स्थितींत असल्यामुळें, सर्व मुद्यांचे व पुराव्यांचें एकीकरण करून पुष्कळशी गुंतागुंत सोडवावयाची असते. शिवाय आपल्या इतिहासाची घटना पाश्चात्य पद्धतीनें तपासली जात असल्यामुळें, मराठी वाचकांस सर्वस्वी अपरिचित असे अनेक मुद्दे व तत्त्वें स्पष्ट करून सांगण्यांत बरीच जागा अडते. सामान्य लोकसमजुतींत नानाप्रकारचे मिथ्या ग्रह व भ्रम प्रचलित आहेत, त्यांचें निरसन करण्यांत थोडा बहुत विस्तार अपरिहार्य होतो. पुस्तक सामान्य मराठी वाचकांकरितां आहे, हें लक्षांत ठेविलें पाहिजे.

मराठी रियासतीची प्रथमावृत्ति बोलून चालून तात्पुरती आहे, असें मीं त्याच वेळीं म्हटलें होतें. त्यानंतर जी ऐतिहासिक सामग्री बाहेर आली व चर्चा झाली, तेणेंकरून कित्येक प्रकार निश्चित झाले असून कित्येक बहुधा अनिश्चितच राहतील असें दिसतें. संतांनीं समाजाला बळ आणिलें कीं पंगुत्व आणिलें, अशा प्रकारचे वाद कधीं मिटणारे नाहींत. ते ज्याच्या त्याच्या दृष्टिभेदावर अवलंबून राहणार. असे वाद सोडून दिले तर मराठ्यांच्या इतिहासाचें सामान्य स्वरूप निश्चित करण्याइतकी सामग्री आतां बाहेर आली आहे असें मला वाटतें. पुष्कळ श्रम केले असतां एखाददुसरा महत्त्वाचा कागद अजून सांपडणें शक्य आहे, आणि नवीन माहिती बाहेर येईल तितकी हवीच आहे. परंतु तेवढ्यासाठीं इतिहास लिहिण्याचें काम खोळंबून धरणें आतां जरूर नाहीं. उपलब्ध माहितीपैकीं ग्राह्य कोणती व त्याज्य कोणती, आणि कोणत्याही बाबतीचे प्रधान मुद्दे व गौण मुद्दे कोणते, हें ठरविणें मात्र अवघड आहे. कुशल न्यायाधीशाप्रमाणें सर्व पुराव्याची योग्य छाननी करून मुद्याच्या गोष्टी तेवढ्याच निवडून काढणें हें बिकट काम कै. रानड्यांसारखा एखादाच अधिकारी पुरुष करूं शकेल.

केवळ राजकीय उलाढालींच्या वर्णनानें इतिहास परिपूर्ण होत नाहीं. राज्यव्यवस्था, धर्म, समाज, भाषा, ग्रंथसंग्रह, व्यापार, इत्यादि अनेक विषयांचा विचार इतिहासांत झाला पाहिजे. अशा सर्व बाबतींचें संपूर्ण विवेचन जरी आज करितां आलें नाहीं, तरी खिस्ती सन १००० ही या

उद्योगाची आरंभमर्यादा कल्पून, उपलब्ध माहितीच्या आधारें तसा प्रयत्न शक्य तितका केला आहे. उदाहरणार्थ, मराठे वंशांची उत्पत्ति, प्राचीन व अर्वाचीन घराणीं, मराठी भाषेचे उगम, लिपी व ग्रंथ, धर्म व पंथ, संतकवी व त्यांच्या कृती, संस्कृत वाङ्मय, अशा अनेक बाबतींची सामान्य वाचकांस जरूर असलेली ऐतिहासिक माहिती एकत्र दिली आहे. प्रत्येक प्रसंगाचा, स्थलाचा व व्यक्तीचा होईल तितका छडा लावून त्या निश्चित करण्यांत शक्य ती काळजी घेतली आहे. अनुक्रमणिकेवरून विषयव्यवस्था कळून येईल. सूची भरपूर व मुद्देसूद दिली असल्यानें तिजवरून पाहिजे तो विषय सहज हुडकून काढतां येईल. भोसले घराण्याच्या अनेक शाखांची विस्तृत वंशावळ व दुसऱ्या कांहीं वंशावळी शेवटीं दिल्या आहेत; त्यांशिवाय कित्येक ऐतिहासिक घराण्यांच्या वीस-पंचवीस त्रोटक वंशावळी समजुतीकरितां जेथच्या तेथें चालू पृष्ठांतच दिल्या आहेत. तसेंच अस्सल कागदांतले महत्त्वाचे उतारे ठिकठिकाणीं देऊन एकंदर विवेचन साधार व स्पष्ट केलें आहे.

मराठशाहींतील न्यायमनसुबा, शिक्के, नाणीं, टंकसाळी, इत्यादि कित्येक सामान्य विषय आणखी एका स्वतंत्र प्रकरणांत देण्याचा विचार होता. परंतु या सर्व विषयांचा संबंध पेशवाईतील राज्यकारभाराशींही येत असल्यामुळें, आणि आठशें पृष्ठांची पुस्तकमर्यादाही अगोदरच संपून गेल्यामुळें, असे सर्व विषय पुढल्या भागावर टाकणें भाग पडलें. कांहीं चित्रें वगैरेंच्या अंगभूत साधनांनीं पुस्तक परिपूर्ण करण्याविषयीं मनास सारखी तळमळ लागलेली असते, परंतु परिस्थितीकडे पाहून, पुस्तक बाहेर आलें हेंच पुष्कळ, असें समाधान मानून स्वस्थ बसणें भाग पडतें.

४. आभारप्रदर्शन.—पुस्तकास मुख्य आधार बखरी व ग्रँट् डफ् यांचाच आहे. त्यांतील तफावत नवीन माहितीनें ठिकठिकाणीं दुरुस्त केली आहे. त्यांशिवाय ज्या पुस्तकांचा आधार घेण्यांत आला, त्यांचा निर्देश जेथच्या तेथेंच केला आहे. एकंदर आधारग्रंथांची यादी आरंभींच जोडिली असून, तींत मराठ्यांच्या इतिहासाचें एकंदर साहित्य थोडक्यांत दाखविण्याचा प्रयत्न केला आहे, त्यावरून या बाबतींत पुष्कळांस अडचण पडते ती दूर होईल असें मला वाटतें. एवढें हें ऐतिहासिक सामग्रीचें बहुमोल

मांडवल अत्यंत परिश्रमपूर्वक ज्या गृहस्थांनीं बाहेर आणिलें, त्यांचे इतिहासावर केवढे उपकार आहेत याची कल्पना करितां येईल; परंतु त्याजवर वाटेल तसा ताव मारून मीं हें आपलें पुस्तक सजविलें, याजबद्दल त्यांचे उपकार कसे मानावे हें मला समजत नाहीं. पण मीं तरी हे उपकार कां घ्यावे ! मीं जो हा अपहार केला आहे, तो वाचकांचे हवालीं केला; म्हणजे मी मोकळा झालों. या ग्रंथकारांशिवाय अनेक लहान थोर विद्वान् सद्गृहस्थांना मी वेळीं अवेळीं त्रास देऊन माहिती विचारिली; आणि त्यांनीही कृपा करून प्रेमपूर्वक माझी जिज्ञासा तृप्त केली, त्या सर्वांचा व्यक्तिशः निर्देश करूं लागल्यास बरींचशीं पृष्ठें खर्चीं घालावीं लागतील. म्हणून समुदायतःच त्या सर्वांचे मनःपूर्वक आभार मानितों. आजपावेतों सर्व वाचकांनीं मजवर अत्यंत लोभ ठेविला आहे; कित्येकांनीं आदरपूर्वक सूचना केल्या आहेत; पुस्तक केव्हां बाहेर येतें, म्हणून पुष्कळ वाचक उत्कंठित झाले आहेत; आणि सर्वांनीं माझ्या पूर्वींच्या कृतींचें अभिनंदन करून हातीं घेतलेला उद्योग पुढें चालविण्यास प्रोत्साहन दिलें आहे. याबद्दल त्यांचेही उपकार स्मरावे तितके थोडेच होणार. माझ्या सारख्या अल्पमतीस अशा शाबासकीचें चीज किती वाटतें म्हणून सांगूं ! सर्व वाचकांस माझी एवढीच विनंती आहे कीं, या पुस्तकांतील दोष मला निर्भीडपणें कळवावे, म्हणजे पुढील उद्योगांत त्यांचा मला चांगला उपयोग होईल. अशा मोठ्या कामांत अनेक चुका होणें अपरिहार्य आहे. माझ्या दोन रियासतींचें गुजराथी भाषांतर छापलें असून तिसरीचें सुरू आहे असें नुकतेंच मला कळलें. ब्रिटिश रियासत हिंदींत झाली असून इतर भागांचें हिंदी भाषांतर चालू आहे, असेंही कळतें. माझ्या परिश्रमाचा लोकांस अशा रीतीनें उपयोग घडतो, हाच मी त्याचा मोबदला समजतों. कारण श्रीमंत गायकवाड सरकारच्या नोकरींत माझा योगक्षेम चाललाच आहे.

शेवटीं, पूर्वींच्या पुस्तकांत सांगितल्याप्रमाणें, विद्याप्रिय भूपति श्रीमंत महाराज सयाजीराव गायकवाड यांच्या संतोषकारक सेवेंत हा उद्योग करण्याचें सामर्थ्य मला प्राप्त झालें हें त्यांच्याच कृपाप्रसादाचें फळ होय, याबद्दल त्यांचे उपकार स्मरून हें पुस्तक वाचकांच्या हातीं देतों.

खानगी खातें, बडोदा.<br>ता. १९ माहे डिसेंबर स. १९१५. } गोविंद सखाराम सरदेसाई.

'संक्षेप' निदर्शन:—आधार दाखवितांना खालील संक्षेप केले आहेत.
खं. म्ह. रा. राजवाडेकृत ' म. इ. साधनें ' याचे खंड.
का. सं. म्ह. काव्येतिहास संग्रह.
भा.इ.सं.मं. म्ह. भारत इतिहास संशोधक मंडळाचे अहवाल, इतिवृत्तें व संमेलनवृत्तें.
इ. सं म्ह. इतिहाससंग्रह.

---

## आधारभूत पुस्तकांची यादी.

मराठी.

१ शिवछत्रपतीच्या बखरी वगैरे,—

१ सभासद, २ चिटणीस, ३ शिवदिग्विजय, ४ शिवप्रताप, ५ भूषणकाव्य, ६ चित्रगुप्त, ७ पुरुषोत्तम काव्य, ८ तंजावरचा शिलालेख.

२ काव्येतिहाससंग्रहापैकीं,—

१ संभाजी, २ राजाराम, ३ शाहू. ४ पत्रें यादी.

३ कायस्थ प्रभूंच्या इति. साधनें व प्रभुरत्नमाला, ऐ० जुने लेख-चिटणीस घराणें—सं. कुळकर्णी.

४ मराठा कुळांचे इतिहास,-भाग १—२—३, सं. दळवी.

५ दक्षिणेंतील सरदारांच्या कैफीयती, सं. पु. वि. मावजी.

६ रा. ब. पारसनीसकृत भारतवर्ष मासिक, वर्ष १—२, मुसलमानी अमदानींतील मराठे सरदार, मराठ्यांचें आरमार, बुंदेलखंड प्रकरण.

७ इतिहास-संग्रह—सं. पारसनीस,—

१ ऐ. किरकोळ प्रकरणें, २ प्राचीन मराठे सरादार, ३ तंजावरचें घराणें, ४ ऐ. गोष्टी भा. १-२-३; ५ ऐ. स्फुटलेख भाग १-२ ३; ६ ऐ. चरित्रें भा.१—२; ७ ऐ. टिपणें भा.१—५; ८ ऐ. चर्चा.

८ भारत—इतिहास—संशोधक मंडळ, पुणें,—

१ वार्षिक अहवाल व इतिवृत्तें श.१८३२-३६, २ संमेलनवृत्तें १-२.

९ सत्कार्योत्तेजक सभेची माला —

१ खं. ९ रामदासीपत्रव्यवहार, इतरखंड रामदासचरित्रें, दासबोध.

१० मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें,—सं. राजवाडे:—

खंड १ श. १७५०-६१ व प्रस्तावना,—पानिपतसंबंधीं.

खं. २ स. १७१३–६१ तीन पेशव्यांची शकावलि.

खं. ३ स. १७००–६१ विविधविषय,–प्रस्तावना ब्रह्मेंद्रस्वामी व कोंकणांतील राजकीय प्रकरणांवर.

खं. ४ स. १७७०–१८१७ विविध०, प्रस्तावना शिवाजीवर.

खं. ५ स. १७९५ खड्यांची लढाई.

खं. ६ स. १७००–११७६१ विविध,–प्रस्तावना इतिहास व समाजशास्त्रावर.

खं. ७ शेवटच्या दोन पेशव्यांसंबंधीं–काळ्यांचें दप्तर.

खं. ८ स. १६४८–१७५० शिवकालीन, प्रस्तावना मराठी–फारशी भाषा, भोसले घराणें इ०.

खं ९ तंजावरचा शिलालेख, शिवकालीन, सं. सांबमूर्तिराव.

खं. १० स. १७६१–१८१८ उत्तरपेशवाई–व प्रस्तावना.

खं. ११ स. १७५० च्या पुढचे कागदपत्र.

खं. १२ राघोबादादा संबंधीं, रायरीकरांचे दफ्तर.

खं. १३–१४ थोरले माधवराव पेशवे सं.भानु (प्रसिद्ध होणें आहेत).

खं. १५ शिवकालीन घराण्यांचे पत्रव्यवहार प्रस्तावना नाहीं.

खं. १६ ” ” ” मरळ देशमुख.

खं. १७ ” ” ” सिलीमकर देशमुख.

खं. १८ ” ” ” पुणें देशपांडे.

खं. २० ” ” ” अनेक घराणीं.

खं. २१ ” ” ” (प्रसिद्ध व्हावयाचा आहे).

खं. १९ उत्तरपेशवाई- हैदर व टिपु सुलतान.

टीपः—पैकीं खं. ८, ९, १५–१८,२० व खं. ४ प्रस्तावना हे भाग शिवछत्रपतीसंबंधीं.

११ संस्थानांचे स्वतंत्र इतिहास,

१ भोर ( भागवत ), २ सावंतवाडी ( पिंगुळकर ), ३ इचलकरंजी (खरे), ४ पंतअमात्य बावडा ( गोरे ), ५ जंजिरा (भोसले), ६ आंग्रे (आठवले), ७ कोल्हापुर (मोडक), ८ सातारकर छत्रपति व अष्टप्रधान ( भिडेकृत ).

१२ ऐ. पोवाडे,–ॲक्वर्थ व शालिग्राम.
१३ महाराष्ट्रीय संत–कवी–काव्य यांची सूची, सं. चांदोरेकर.
१४ निबंध आणि भाषणें-चिं. वि. वैद्य.
१५ मराठ्यांविषयीं चारउद्गार व व्याख्यानें. ( रा. रा. भागवत ).
१६ मासिकें व वर्तमानपत्रें,—
१ ग्रंथमाला, २ विविधज्ञानविस्तार, ३ सरस्वतीमंदिर, ४ प्रभात, ५ केसरी वगैरे.

---

पेशवाईच्या इतिहासावर खालील आणखी साहित्य आहे, तें वाचकांचे माहितीकरितां खालीं थोडक्यांत दाखवितों:—

१ इतिहाससंग्रहांतील प्रकरणें,—
१ गोमंतकाच्या इ. साधनें, २ दिल्लीयेथील मराठ्यांचीं राजकारणें, ३ महेश्वरदरबारचीं बातमीपत्रें भा. १–२; ४ होळकर दरबारांतील हिंगण्यांची वकिली, ५ जोधपुर येथील राजकारणें, ६ परराष्ट्रांच्या दरबारांतील मराठ्यांचे वकील, ७ पेशवे दफ्तरांतील सनदापत्रांतील माहिती.

२ ऐतिहासिक लेखसंग्रह,–सं. वासुदेवशास्त्री खरे.
भा. १ स. १७३९–६३, भा. २ स. १७६३, भा. ३ स. १७६४, भा. ४ स. १७७०–७४, भा. ५ स. १७७३–७६, भा. ६ स. १७७६–७८, भा. ७ स. १७७८–८४. भा. ८–९–१० प्रसिद्ध होऊन संग्रह पुरा होईल.

३ काव्येतिहाससंग्रहांतील बखरी व कैफीयती.
४ पेशव्यांच्या रोजनिशा पुणें दफ्तरपैकीं प्र. १–९.
५ हरिवंशाची बखर–खरे.
६ शाहूच्या कार्किर्दीतील वतनपत्रें व निवाडपत्रें–सं. मावजी.
७ स्वतंत्र चारित्रें व ग्रंथ,
ब्रह्मेंद्रस्वामी, नानाफडणीस, महादजी शिंदे, अहल्याबाई, बाजीराव, जिवबादादा, झांशीची राणी, हरिपंत फडके, बापू गोखले, परशुराम त्रिंबक, परशुराम भाऊ पटवर्धन, विंचूरकर, कवि मोरोपंत, दुर्दैवीरंगू, पानिपतची मोहीम, ऐतिहासिक गोष्टी भा. १, २, ३, इ. इ. इ.

## ENGLISH.

1. Early History of the Deccan, } Dr. Bhandarkar.
2. Shaivism & Vaishnavism. }
3. Epic India, C. V. Vaidya.
4 Solar and Lunar Races, Do.
5. Early History of India, Vincent Smith.
6. Ancient India, Krishnaswami Aiyangar.
7. History of Aurangzeb, vol 1 & 2, Sarkar.
8. English in Western India, Anderson.
9. Historical Fragments, Robert Orme.
10. Book of Bombay, Douglas.
11. Bombay City Gazeteer vol. II.
12. History of the Indian Navy, Lowe.
13 India on the Eve of British Conquest, Owen.
14. History of Mysore, Wilkes
15 Storia do Mogor, Manucci, vol. 1-4, Irvine
16. Mahomedan Histories, Elliot, vols. 1-8
17. Shivaji the Maratha, Rawlinson.
18. History of the Marathas, Grant Duff with notes by R. B. Gupte.
19. Rise of the Marathas } M. G. Ranade.
20. Miscellaneous writings }
21. Forest's selections, Maratha Series.
22. Pirates of Malabar, Bidulph
23. The Modern Review 1907-1915.
24. The Times of India,-notices of papers and lectures.
25. Bombay Gazetters, maps etc.,

( The Peshva period is not touched in this list. )

# अनुक्रमणिका.

## ५-शिवाजीचें पूर्वचरित्र.



## ६-राज्यस्थापनेची तयारी व परिस्थिति.



## ७-विजापुरकरांशीं युद्ध.

## वंशावळी.

# विलक्षण योगायोग.

तारीख १४ डिसेंबर सन १९१५ मंगळवार रोजीं या पुस्तकाचीं शेवटचीं पानें छापून हातांत आलीं, त्याच दिवशीं माझा बारा वर्षांचा प्रेमळ मुलगा श्रीवत्सलांछन लहानशा दुखण्यानें मृत्युमुखीं पडला. त्याची अप्रतिम बुद्धि व सद्गुण आठवून अंतःकरण भरून येतें. हें पुस्तक लिहिण्याच्या व छापण्याच्या कामीं अशा लहान वयांतही त्यानें मला रात्रंदिवस मदत केली. यास्तव या पुस्तकांत त्याचें स्मरण अक्षय्य राहावें, म्हणून आरंभींच या प्रसंगाचा उल्लेख केल्यावांचून माझ्यानें राहवत नाहीं.

गो० स० सरदेसाई.

श्री.

# हिंदुस्थानचा अर्वाचीन इतिहास
## भाग दुसरा.

# मराठी रियासत.

## प्रकरण पहिलें

### प्राक्कालीन राज्यें.

| | |
|---|---|
| १. उद्देश. | २. महाराष्ट्राचा उगम. |
| ३. शालिवाहनवंश व लोकस्थिति. | ४. स. २१८–५५० चे वंश. |
| ५. पूर्व चालुक्यवंश. | ६. सत्याश्रय पुलकेशी. |
| ७. पूर्व चालुक्य,–समालोचन. | ८. राष्ट्रकूटवंश व समालोचन. |
| ९. उत्तर चालुक्यवंश. | १०. विक्रमादित्य चालुक्य. |
| ११. कलचूरि व लिंगायतपंथ-उदय. | १२. उत्तरचालुक्य,–समालोचन. |
| १३. यादववंश, होयसल यादव. | १४. सिंघण, महादेव व रामदेव. |
| १५. हेमाद्रि ऊ० हेमाडपंत. | १६. कोल्हापूरचे शिलाहार. |

१७. समालोचन.

१. उद्देश.—हिंदुस्थानचा अर्वाचीन इतिहास सांगणें हा ह्या पुस्तकाचा संकल्प पहिल्या भागांत व्यक्त केला आहे. ह्या अर्वाचीन इतिहासाची मर्यादा ठोकळ मानानें खिस्ती सन एक हजारपासून धरिली आहे. ह्या मर्यादेस अनुलक्षून पहिल्या भागांत मुसलमानी राज्याचा इतिहास सांगितला. त्याच अनुरोधानें ह्या दुसऱ्या भागांत मराठी राज्याचा इतिहास सांगावयाचा आहे. आधुनिक मराठ्यांचा इतिहास शिवाजीपासून सुरू होतो. पण शिवाजीच्या राज्योद्योगाचीं पूर्वकारणें समजण्यासाठीं मराठ्यांची पूर्वपीठिका पहावी लागते. ह्या पूर्वपीठिकेंत मराठ्यांचा देश, त्यांचीं मूळचीं राज्यें, त्यांची भाषा व धर्म इत्यादि बाबतींचा थोडाबहुत अंतर्भाव होतो. ह्या पूर्वकालीन माहितींत मराठ्यांचें

स्वभावरहस्य दिसून येतें; आणि हल्लींच्या मराठी राष्ट्राचा विकास कसकसा होत गेला, हेंही त्यावरून समजतें. सबब ह्या बाबतींची थोडीशी ठिकठिकाणीं उपलब्ध असलेली सामान्य माहिती आरंभीं सांगणें जरूर आहे.

मराठ्यांची व त्यांच्या प्राचीन इतिहासाची माहिती अद्यापि संपूर्ण व संगतवार एकत्र केलेली आढळत नाहीं. ती अनेक ग्रंथांतून व निबंधांतून हुडकून काढावी लागते. विद्वद्वर्य डॉ० सर भांडारकर ह्यांनीं 'दक्षिणचा प्राचीन इतिहास' अत्यंत परिश्रमपूर्वक लिहिला आहे, तोच या माहितीचा मुख्य आधार होय. त्यांशिवाय दुसरेही कित्येक विद्वान् गृहस्थ प्राचीन ग्रंथ, शिलालेख, नाणीं, ताम्रपट इत्यादि साधनांनीं महाराष्ट्राची प्राक्कालीन माहिती प्रसिद्ध करीत आहेत. अर्थात् ह्या विषयाची चर्चा सुरू असून त्यास अद्यापि निश्चित स्वरूप आलेलें नाहीं, ही गोष्ट ह्या पूर्वपीठिकेसंबंधानें लक्षांत ठेविली पाहिजे.

२. महाराष्ट्राचा उगम.—'महाराष्ट्र' हा शब्द सरासरीनें इसवीसनाच्या आरंभापासून प्रचारांत आहे. हिंदुस्थानच्या ह्या दक्षिणेकडील भागास पुराणकारांनीं व ग्रीक लोकांनीं 'दक्षिणापथ' असें म्हटलें आहे. चिनी प्रवासी फाहियान पांचव्या शतकांत इकडे आला. त्यानें ह्या भागासंबंधानें 'दक्षिण' हा शब्द वापरिला आहे. दुसऱ्या कित्येकांनीं ह्या देशास 'दंडकारण्य' अशी संज्ञा दिलेली आढळते. 'दंडकारण्ये देशे, गोदावर्याः दक्षिणे तीरे, कृष्णावेण्ययोः उत्तरे तीरे' असे शब्द आपल्या नित्यनैमित्तिक कर्मांच्या संकल्पांत वापरण्यांत येतात. रामायण महाभारतांत 'महाराष्ट्र' हा शब्द आढळत नाहीं. विदर्भदेश, दण्डकदेश, वेणातीरदेश, करहाटक वगैरे कित्येक नांवांचा उल्लेख महाभारतांत आहे, ते प्रांत हल्लींच्या महाराष्ट्रापैकींच होत. महाराष्ट्राची व्याप्ति उत्तरेस विंध्याद्रीपासून दक्षिणेस कृष्णानदीपावेतों असून, तीच मराठी भाषेचीहि व्याप्ति आहे.

महाराष्ट्र शब्दाची व्युत्पत्ति रा. राजवाडे यांनीं दिली आहे, ती अशी:— 'राजाचें राज्य ज्या देशावर चालतें तें राष्ट्र ( उणादिसूत्र ६०८ ). अशा देशांत पिढ्यानुपिढ्या भक्तिपूर्वक राहणारा तो राष्ट्रीय. राष्ट्रांत कोणताही अधिकार जो बजावतो तो राष्ट्रिक. भृगुसंहितेंत हा शब्द येतो. अशोकाच्या शिलालेखांत रास्तिक, रास्टिक, असा शब्द येतो, तो राष्ट्रिक ह्या शब्दाचा अपभ्रंश आहे. दंडकारण्यांत आर्यांनीं वसती केल्यावर,

त्या देशांत ज्यांनीं अधिकार चालविला ते राष्ट्रिक. मोठा अधिकार ज्यांनीं चालविला ते महाराष्ट्रिक; जसें सामन्त, महासामन्त; किंवा महाभोजाप्रमाणें महाराष्ट्रिक, महाराष्ट्रिकांचा जो देश तो महाराष्ट्र.' (भा. इ. सं. मं. अ. १८३२).

देशाचें नांव बहुधा तेथील लोकांच्या नांवावरून प्रसिद्ध होतें. आर्यलोकांनीं वायव्येकडून हिंदुस्थानांत प्रवेश केला, तो त्यांनीं एकदम एका द्वारानें केला नाहीं. त्यांचे दोन भिन्न संघ दोन भिन्न कालीं आणि दोन भिन्न वाटांनीं ह्या देशांत आले. पहिला संघ पंजाबांतून पूर्वेकडे पसरून बराच काळ गेल्यावर दुसरा संघ त्याच्यांत येऊन घुसला. ही गोष्ट भाषाशास्त्र व शरीरमापन यांजवरून आतां सिद्ध होत आहे. ह्याच कारणास्तव सूर्यवंश व चंद्रवंश असे क्षत्रियांचे दोन मोठे वर्ग पुढें प्रसिद्धीस आले. ह्या देशास 'भारतवर्ष' हें जें पहिलें नांव पडलें तें चंद्रवंशी दुष्यन्तपुत्र भरतावरून पडलेलें नाहीं, तर चंद्रवंशी दुष्यन्ताच्या पूर्वीं पुष्कळ काळ, पहिल्या आर्यसंघांत एक सूर्यवंशी भरतराजा होऊन गेला, त्यावरून हें नांव पडलें. ह्या भरताचा उल्लेख ऋग्वेदांत सांपडतो, आणि महाभारतांतील व पुराणांतील अनेक उल्लेख त्यास पुष्टि देतात. (The Solar and Lunar Races of India by C. V. Vaidya, R. A. S. Journal). क्षत्रियांचें मूळ व त्यांचे वंश ह्यांचा इतिहास तपासतांना ह्या वरील गोष्टीचा आरंभीं उपयोग होतो. महाराष्ट्रांतील आरंभींच्या मराठे—क्षत्रियांची उत्पत्ति बहुधा वरील चंद्रवंशापासून झाली आहे. मागाहून चालुक्य वगैरे सूर्यवंशी घराण्यांची त्यांत भर पडली.

आर्यांचा विस्तार प्रथम विंध्यपर्वतापावेतों झपाट्यानें झाला. विंध्याद्रिपर्वत व त्याखालील निबिड अरण्य यांच्या योगानें बरेच दिवस त्यांजला दक्षिणेंत उतरण्यास अडचण झाली. अगस्तिऋषीनें प्रथम पूर्वबाजूनें विंध्याद्रि ओलांडून त्याच्या दक्षिणेस आपला आश्रम स्थापिला. अगस्तीनें आपली मुलगी विदर्भाच्या राजास दिली, अशी कथा आहे. आर्यांच्या पूर्वीं हिंदुस्थानांत द्राविड वगैरे कित्येक लोकांची वसती होती. त्यांपैकीं कित्येकांस आर्यांनीं जिंकिलें, आणि कित्येकांस पहाडी प्रदेशांत हांकून दिलें. अशा मूळच्या लोकांशीं कालान्तरानें आर्यांचा मिलाफ होऊन जी लोकसंख्या उत्पन्न झाली, तिचे वंशज हल्लींचे

मराठे होत. मराठीभाषेच्या प्रकृतीवरूनच हा प्रकार व्यक्त होतो. आर्यांची संस्कृत भाषा, संस्कृतापासून निघालेल्या प्राकृतभाषा व मूळच्या देशीभाषा ह्या सर्वांचें मिश्रण हल्लींच्या मराठी भाषेंत आढळतें. उत्तरेच्या बाजूस आर्यांचें वजन ज्यास्त असून, जसजसें दाक्षिणेस जावें, तसतसें तें वजन कमीकमी दिसूं लागतें. हिंदुस्थानाच्या थेट दाक्षिण टोंकाकडे आर्यसंस्कृतीचें व आर्यभाषांचें वजन बहुतेक नाहींच, म्हटलें तरी चालेल. दक्षिणेस मदुरेच्या बाजूस पांड्य, तंजावरचे बाजूस चोल व मलबारचे बाजूस केरल, ह्या नांवांचीं प्रबळ राज्यें फार दिवस नांदत होतीं, त्यामुळें आर्यांचा तेथें फारसा रिघाव झाला नाहीं. त्यांच्या भाषा पूर्वीपासून स्वतंत्र व अलिप्त होत्या, तशा त्या अद्यापि आहेत.

संकृतभाषेचें सर्वमान्य व्याकरण प्रथम पाणिनीनें रचिलें. पाणिनीचा काल इ. स. पू. ७०० च्या अगोदरचा आहे. पाणिनीनंतर वररुचि किंवा कात्यायन नांवाचा दुसरा व्याकरणकार झाला. त्यानें वार्तिकें रचून पाणिनीच्या ग्रंथांत भर घातली. वररुचीचा काल इ. स. पू. ३५० चा सुमार आहे. त्यानंतर दोनशें वर्षांनीं पतंजलि नांवाचा व्याकरणावरील महाभाष्यकार झाला. त्याचा काल इ. स. पू. १५० चा आहे. व्याकरणशास्त्रावरील हे त्रिमुनि महाविख्यात असून, त्यांचे काल वर लिहिल्याप्रमाणें बहुतेक निश्चित असल्यामुळें, प्राचीन इतिहासांतील अनेक बाबतींचा उलगडा करण्यास त्यांचा फारच उपयोग होतो. तसेंच गौतम बुद्ध (इ. स. पू. ५६७–४८७), व बौद्धांचा पुरस्कर्ता चक्रवर्ती राजा अशोक ( रा. इ. स. पू. २७२–२३२ ), ह्यांचाही ह्या कामीं उपयोग आहे. पाणिनीच्या ग्रंथांत विंध्याद्रीच्या दाक्षिणेकडील नांवांचा उल्लेख नाहीं, त्यावरून पाणिनीच्या काळीं आर्यांचा दाक्षिणेंत प्रवेश झाला नव्हता, हें उघड आहे. कात्यायनाच्या वार्तिकांत दाक्षिणेंतील माहिती आहे, ती पाणिनीनें दिलेली नाहीं. नासिक्य नांवाचें शहर कात्यायनानें सांगितलें आहे, तें बहुधा नाशिक असावें. पतंजलीला दक्षिण देशाची माहिती संपूर्ण होती, असें त्याच्या महाभाष्यावरून दिसतें. पाणिनीच्या पूर्वी महाभारत लिहिलें गेलें होतें, पण तें हल्लींच्या स्थितींत नसावें. त्यांत मागाहून बरीच वृद्धि झालली आहे. पाणिनि व कात्यायन यांच्या ग्रंथांत रामायणाचा उल्लेख नाहीं. त्यावरून रामायण ग्रंथ त्यांच्या नंतरचा असावा.

अशोकाचे शिलालेख आतां प्रसिद्ध झाले आहेत. त्यांत उल्लेख आहे कीं, त्यानें धर्मप्रसारार्थ आपले दूत, राष्ट्रिक, पैट्टिनिक, अपरान्तक, ह्या लोकांकडे पाठविले होते. राष्ट्रिक म्हणजे रट्ठे, महाराष्ट्रांतले लोक; पैट्टिनिक म्हणजे पैठण व अपरान्त म्हणजे उत्तर-कोंकण. रट्ठे हेच मराठ्यांचे पूर्वज. त्यांचीच एक शाखा पुढें राष्ट्रकूट ह्या नांवानें प्रसिद्धीस आली. अशोकाच्या तेराव्या आज्ञेत राष्ट्रिकांबरोबर भोजांचाही उल्लेख आहे. ह्या भोजांचा अंमल पुष्कळ दिवस विदर्भावर होता. कित्येक शिलालेखांत हे भोज आपल्याला महाभोज म्हणवितात. तसेंच राष्ट्रिक किंवा रट्ठे ह्यांजबद्दल महाराष्ट्रिक व महारट्ठे असे उल्लेख ठिकठिकाणीं आहेत. अर्थात् अशा उत्पत्तीनें 'महाराष्ट्र व मराठे' हे शब्द प्रचारांत आले. अशोकाच्या शिलालेखांत पांड्य, चोल, केरल आणि आंध्र यांचाही उल्लेख येतो. त्यावरून इ. स. पू. २५० च्या अगोदर उत्तर व दक्षिण हिंदुस्थान ह्यांजमध्यें पूर्ण दळणवळण चालू झालें होतें; आणि सर्व देश लोकांस माहीत झालेला होता.

महाराष्ट्रांतील पहिला मोठा देश विदर्भ होय. विदर्भदेशाची व्याप्ति हल्लींपेक्षां पूर्वी ज्यास्त असावी. अश्मक, पांडुराष्ट्र, गोपराष्ट्र, मल्लराष्ट्र इत्यादि नांवें महाभारतांत आढळतात, ते राष्ट्रिकांचे पूर्वज असावे. कृष्णा-गोदावरी यांच्या मधला बेदरकडील भाग कुंतल देश म्हणून प्रसिद्ध होता. तेथें पुढें चालुक्यांचें राज्य होतें. अपरान्त व कोंकण हीं नांवें महाभारतांत आहेत. अपरान्तांत शूर्पारक (हल्लींचें सोपारें) हें शहर फार जुनें आहे. सारांश, इ० स० पूर्वी चौथ्या शतकांत विदर्भ, अश्मक, पांडुराष्ट्र, गोपराष्ट्र, मल्लराष्ट्र, अपरान्त, कोंकण अशीं निरनिराळीं नांवें प्रचारांत होतीं. अशोककालीं राष्ट्रिक हें नांव पुढें आलें, आणि इसवी-सनाच्या सुरुवातीपूर्वी महाराष्ट्र ह्या एका नांवाखालीं सर्वांचा समावेश होऊं लागला.

'महाराष्ट्र' असें देशाचें नांव प्रथम वराहमिहिराच्या ग्रंथांत (इ. सनाचें पांचवें शतक) आढळतें, असें डॉ० ग्रीयरसनचें म्हणणें आहे. परंतु महाराष्ट्री हें एका प्राकृत भाषेचें नांव इसवी सनाच्या आरंभींच प्रसिद्ध होतें. तेव्हां देशाचेंही नांव त्या वेळीं प्रचारांत असलें पाहिजे. भाजें व कार्लें येथील लेणीं इसवी सनाच्या दुसऱ्या शतकांतील आहेत, त्यांजवरील

लेखांत कित्येक देणग्या वर्णिलेल्या आहेत. त्या देणारांस ' महारठी ' व स्त्री असल्यास ' महारठिनी ' हीं नांवें वापरलीं आहेत. रठी व महारठी हें नांव अनेक शिलालेखांत येतें. तथापि महाराष्ट्र देशाचा स्पष्ट निर्देश वराहमिहिरानेंच केला असून, त्यांत निरनिराळे तीन देश व नव्याण्णव हजार गांवें होतीं, असें त्यानें लिहिलें आहे.

महाराष्ट्रांत प्रथम वसाहत करणारे आर्यलोक भोज व यादव ह्या वंशांचे होते. भोजांनीं विदर्भांत वसती केली, आणि यादवांनीं कुंतल देशांत व इतर भागांत वसती केली. हरिवंशांत त्यांचा उल्लेख स्पष्ट आहे. 'यदूला नागकन्यांपासून चार पुत्र झाले, त्यांचीं नांवें मुचुकुंद, पद्मवर्ण, सारस, व हरित अशीं होतीं. त्या चौघांनीं विंध्याद्रीच्या दक्षिणेस चार राज्यें स्थापन केलीं. मुचुकुंदानें ऋक्षवान् पर्वताच्या आश्रयानें नर्मदा तीरावर माहिष्मती व पुरिका हीं दोन शहरें स्थापन केलीं. पद्मवर्णानें सह्याद्रीच्या पठारावर वेणानदीच्या कांठीं करवीर नांवाचें नगर बांधून तेथें आपलें राज्य स्थापिलें. त्यास पद्मावत असें म्हणतात. सारसानें त्याच्याही दक्षिणेस अरण्यांत क्रौंचपुर नांवाचें शहर स्थापिलें.त्या नगराभोंवतालचा प्रदेश तांबड्या मातीचा व सुपीक आहे, त्यास वनवासी असें म्हणतात. हरितानें आपलें राज्य समुद्रकिनाऱ्यावर स्थापन केलें, तेथील कोळी समुद्रांत बुड्या मारणारे कुशल असून ते समुद्रांतून मोतीं, शंख, प्रवाळ इत्यादि रत्नें काढितात. हरिताच्या देशास रत्नद्वीप असें म्हणतात ' ( श्रीकृष्णचरित्र - वैद्यकृत ). हीं चार यादवांचीं राज्यें दक्षिणेंत होतीं; आणि त्याचप्रमाणें द्वारका, काठेवाड, गुजराथ इत्यादि ठिकाणींही यादवांचीं राज्यें झालीं होतीं. अर्थात् हेच यादव हल्लींच्या पुष्कळशा मराठा कुळांचे पूर्वज असले पाहिजेत. वरचीं करवीर व वनवासी हीं नांवें पुष्कळ संस्कृत ग्रंथांत आढळतात. ' काठेवाड व महाराष्ट्र येथील लोक मिश्र आर्य असून, उत्तरेच्या बाजूस आर्यांचा भाग जास्त व द्राविडभाग कमी; आणि जसजसें दक्षिणेस जावें, तसतसा आर्यभाग कमी होऊन द्राविड भाग वाढत जातो, ही गोष्ट भाषा व शरीरमापन ह्यांवरून सिद्ध आहे. ( Epic India, Vaidya ) एकदरींत महाराष्ट्र देश, त्यांतील मराठे लोक, व त्यांची महाराष्ट्री भाषा ह्यांचा पत्ता पूर्णपणें इसवी सनाच्या आरंभापासून लागतो, हा सामान्य सिद्धान्त धरून चालण्यास हरकत नाहीं.

३. शालिवाहनवंश व लोकस्थिति.—इसवी सनापूर्वी महाराष्ट्रांत कोण राजे राज्य करीत होते, ह्याचा स्पष्ट थांग लागत नाहीं. अशोकाचा अंमल प्रत्यक्ष महाराष्ट्रावर होता असें दिसत नाहीं. उत्तरकोंकणांत सोपारें येथें त्याचे शिलालेख सांपडतात, त्यावरून त्या भागांत अशोकाचा अंमल असावा. अशोकानंतर सुमारें चारशें वर्षेपर्यंत महाराष्ट्रावर आन्ध्रवंशी राजे राज्य करीत होते.

आंध्रलोक हे हल्लींच्या तेलगु लोकांचे पूर्वज होत. त्यांचा मुलूख कृष्णा व गोदावरीच्या मधला समुद्रकिनारा होय. चन्द्रगुप्त मौर्याचे वेळेस हे मोठे शूर म्हणून नांवाजलेले होते. त्यांची राजधानी 'श्रीकाकुल' नांवाची कृष्णेच्या कांठीं होती. तेथील राजानें अशोकाचें सार्वभौमत्व पत्करिलें होतें. अशोकानंतर त्यांचा राजा सिन्धुक हा स्वतंत्र झाला. सिन्धुकाच्या पुढचा राजा कृष्ण ह्यानें नासिकपर्यंतचा प्रदेश जिंकून आन्ध्र राज्यांत सामील केला. अशा प्रकारें अशोकानंतर सुमारें दोनशें वर्षेपर्यंत आन्ध्र-राजांचा अंमल महाराष्ट्रावर होता. पुराणांत त्यांचे वर्णन आहे, परंतु त्यांचा संगतवार वृत्तान्त अद्यापि प्रसिद्ध झालेला नाहीं.

आंध्रांचीच एक शाखा शातवाहन नांवानें महाराष्ट्रांत प्रतिष्ठान ऊर्फ पैठण येथें उदयास आली. ते आपणास आन्ध्रभृत्य म्हणजे मूळच्या आन्ध्रांचे सेवक असें म्हणवीत. शिवाय शातकर्णी किंवा शातवाहन हेंही नांव त्यांच्या वंशास दिलेलें आढळतें. शातवाहन शब्दाचाच अपभ्रंश शालिवाहन असा झाला.

आरंभीं हे शालिवाहन राजे महाराष्ट्रांत राज्य करीत असले पाहिजेत. नाशकाजवळ लेणीं आहेत, त्यांत ह्या शालिवाहन राजांविषयीं कांहीं मजकूर आहे. नानाघाट येथील लेण्यांतही बराच मजकूर आहे. ह्या शिला-लेखांतून राजांचीं, त्यांच्या बायकांचीं, व मोठमोठ्या पुरुषांचीं वर्णनें दिलेलीं असून जमिनीच्या वगैरे देणग्या त्यांनीं दिल्या, त्या सतत चालू रहाव्या, असा मजकूर आहे. ठाण्याजवळील कान्हेरी येथील लेण्यांतही शिलालेख सांपडले आहेत. कोल्हापुरास एक बुद्धस्तूप होता, त्यांत कित्येक नाणीं सांपडलीं; व सोपारें येथेंही पुष्कळ नाणीं सांपडलीं. ह्या सर्वांवरून अशी माहिती मिळते, कीं शालिवाहन वंशाचे राजे महाराष्ट्रांत राज्य करीत होते. त्यांपैकीं कित्येक मोठे पराक्रमी होते. त्यांचीं कांहीं

नांवें पुढें दिलीं आहेत. ह्यांपैकीं बरींच नांवें वायु, विष्णु, मत्स्य, भागवत, वगैरे पुराणांतून आढळतात. मात्र दोहोंत कित्येक किरकोळ फरक आहेत. हीं नांवें आंध्रभृत्य राजांचीं होत असें पुराणांत लिहिलें आहे. तेव्हां पुराणांतले आंध्रभृत्य तेच शिलालेखांतले शालिवाहन होत. ह्या राजांचा महाराष्ट्रावर सुमारें ३०० वर्षेपर्यंत म्हणजे ख्रिस्तापूर्वी ७३ ते इ. स. २१८ पावेतों अंमल होता. इतक्या काळांत मोठमोठे पंचवीस तीस राजे झाले. त्यांनीं अनेक मोठीं धर्मकृत्यें केलीं. पुलुमायी, यज्ञश्री, चतुष्पर्ण, माधरीपुत्र, वगैरे नांवें शिलालेखांतून प्रसिद्ध आहेत.

ह्या तीनशें वर्षांच्या काळांत मध्यंतरीं सुमारें ५० वर्षें शालिवाहनांचा अंमल लुप्त झाला होता. तितक्या अवकाशांत शक नांवाचे यवन राजे येथें अंमल करीत होते. ह्याच शक राजांनीं आपली वर्षगणना चालू केली, ती पुढें तशीच चालू राहिली. शकांचा क्षत्रप नहपाण ह्याचा गौतमीपुत्र पुलुमायी ह्यानें पराभव करून फिरून शालिवाहनांचें राज्य कायम केलें. नहपाणाचा काळ सन ४६ असा सांपडतो, व त्यानंतर सहा सात वर्षांनीं शकांचा पाडाव झाला. त्यावरून महाराष्ट्रांत शकांचा अंमल इसवी सनाच्या आरंभीं सुमारें पन्नास वर्षें होता असें दिसतें.

शालिवाहन किंवा शातवाहन हें कुटुंबाचें नांव असून एकाच व्यक्तीचें नव्हतें. शालिवाहन हें शातवाहन ह्या संस्कृत शब्दाचें अपभ्रष्ट रूप आहे. शक नांवाची वर्षगणना शालिवाहनानें सुरू केली असा सामान्य समज आहे, तो बरोबर नाहीं. आरंभीं शकनृपकाल किंवा शककाल असेंच म्हणण्यांत येत असे. शक लोकांचा पराजय होऊन ते गेले; तरी त्यांची वर्षगणना मागें कायम राहिली. त्या गणनेला कोणा तरी मोठ्या राजाचें नांव जुळविणें अवश्य वाटल्यावरून शालिवाहन हें नांव त्यास लावण्यांत आलें. म्हणून 'शालिवाहन शक' असें जोडनांव [illegible]तांना त्यांत दोन राजवंशांचा समावेश होतो. शक राजे उज्जयिनीस राज्य करीत असले पाहिजेत. तेथून जयदामन व रुद्रदामन ह्या शक राजांनीं प्रतिष्ठानावर हल्ला केला असतां त्यांस पुलुमायी शालिवाहन ह्यानें हटवून परत लाविलें. शालिवाहनाच्या घोड्यांची गोष्ट प्रसिद्ध आहे, तोच हा शकांस हांकून लावणारा शालिवाहन असावा. ह्या पुलुमायी शालिवाहनाचा प्रधान गुणाढ्य ह्यानें पैशाची नामक प्राकृत भाषेमध्यें बृहत्कथासागर ग्रंथ लिहिला होता, अशी

आख्यायिका आहे. ह्याच शालिवाहन राजांपैकीं एकाच्या दरबारीं सर्ववर्मा नांवाच्या एका गृहस्थानें 'कातंत्र' नामक व्याकरण लिहिलें. शालिवाहनांच्या कारकिर्दींत सप्तशती नांवाचा महाराष्ट्री भाषेत ग्रंथ झाला, तो प्रसिद्ध आहे. तो हाल नांवाच्या शालिवाहन राजानें लिहिला. कदाचित् त्यानें स्वतः हा ग्रंथ लिहिला असेल किंवा दुसऱ्याकडून तो लिहविला असेल. ह्या गोष्टी-वरून इतकें खास दिसतें कीं, ह्या आंध्रभृत्य किंवा शालिवाहन राजांच्या वेळेस भाषाभिवृद्धि चांगली होऊन ग्रंथसंग्रह पुष्कळ वाढला. एकंदरींत शालिवाहनांचा काळ देशास भरभराटीचा गेला, ह्यांत संशय नाहीं.

शालिवाहनांच्या वेळेस महाराष्ट्रांत बौद्धधर्म जोरानें चालू होता. स्वतःस 'महाभोज' व 'महारठी' म्हणविणारे, राजे, मुत्सद्दी, व्यापारी, सोनार, सुतार, धान्य विकणारे, गांधी आणि इतर गृहस्थ हे बौद्धधर्मानुयायी लोकांकरितां अरण्यांत गुहा वगैरे तयार करवीत. शक, यवन, पल्लव, वगैरे जातींचे लोक आरंभीं इकडे स्वाऱ्या करीत आले, व ते पुढें ह्या धर्माचे अनु-यायी बनले. शक व यवन ह्यांनींही लेणीं कोरविलेलीं आहेत. शकांनीं तर ब्राह्मणधर्मही स्वीकारल्याचीं उदाहरणें आहेत. बौद्धांच्या देवळांत मध्य-भागीं चैत्य असत, त्यांत बुद्धाचा कांहीं अवशेष ठेविलेला आहे, अशा समजुतीनें लोक त्यांची पूजा करीत. भिक्षु किंवा भिक्षा मागणारे साधु ह्यांजकरितां लेण्यांतून लहानलहान खोल्या करीत. हे भिक्षु कोठें तरी फिरत असतां पावसाचे चार महिने अशा एखाद्या मठांत येऊन राहत. हे लोक श्रावण महिन्यांत नवीन वस्त्रें धारण करीत. तीं त्यांस मिळण्यासाठीं धार्मिक व श्रीमंत लोक पुष्कळ पैसे व्याजानें लावून ठेवीत; आणि त्याच्या व्याजांत हीं वस्त्रें त्या लोकांस मिळत. राजे व त्यांचे कारभारी लोकांस गांवें इनाम देत असत. अशाच देणग्यांचे लेख त्या लेण्यांतून लिहिलेले आहेत. पुष्कळ वेळां भिक्षुलोक समुद्रानें प्रवास करीत. असा प्रवास करीत असतां रस्त्यांत राहण्यासाठीं खाडीच्या वगैरे तोंडाशीं लेणीं असत. अशीं लेणीं कोंकणांत आहेत. बुद्धांप्रमाणेंच ब्राह्मणांसही देणग्या दिलेल्या आहेत. ब्राह्मणांस भोजनें घालणें, व त्यांचीं लग्नें करून देणें, हें हल्लीं-प्रमाणें त्या वेळेसही मोठें पुण्य समजलें जाई. उषवदात्त व गौतमीपुत्र

शातकर्णी ह्यांनीं ह्या कामांत पुष्कळ दानधर्म केलेले नासिकाजवळच्या लेण्यांत वर्णिलेले आहेत.

ह्या वेळीं व्यापारही पुष्कळ चालत असला पाहिजे. भडोच हें व्यापाराचें मोठें बंदर होतें. तेथें पश्चिम देशांतून पुष्कळ तऱ्हेचा माल ह्या देशांत येई, आणि भडोचहून तो पैठण वगैरे शहरीं रवाना होई. तसेंच इमारतीचे दगड, कापसाचीं वस्त्रें, मलमल वगैरे जिन्नस भडोच येथें येऊन तेथून जलमार्गानें बाहेर जात. पैठण हें व्यापाराचें व विद्येचें मोठें ठिकाण होतें. तसेंच शिलाहार नांवाचे राजे 'तगर' नगरींत राज्य करीत होते. हें तगर मोठें असून तें निजामशाहींतील हल्लींच्या धारूर शहराजवळ असावें. कोंकणांत वसईनजीक सोपारें हेंही व्यापाराचें मोठें ठिकाण होतें. कल्याण, सेमुल्ला किंवा हल्लींचें चौल, मंडगोरा किंवा हल्लींचें मांदाड, महाडाजवळचें पाल, मेलीजयगड वगैरे व्यापाराचीं बंदरें होतीं असें आढळतें. पैठण, तगर, गोवर्धन प्रांतांतील नासिक, कऱ्हाड, कोल्हापूर वगैरे व्यापाराचीं शहरें होतीं. व्यापारानें लोक मोठे सधन होत असत. कार्ल्याजवळचीं लेणीं एका व्यापाऱ्यानें खोदविलेलीं आहेत.

निरनिराळ्या धंद्यांच्या लोकांची गांवपंचायत भरत असे; आणि सर्व धंद्यांचे लोक मिळून आपआपल्या गांवाची व्यवस्था करीत. 'निगमसभा' नांवाची हल्लींच्या म्युनिसिपल कॉर्पोरेशनसारखी शहराची व्यवस्था पाहणारी एक सभा असे. व्याजाचा दर त्या वेळीं शेंकडा ५ ते ७॥ पर्यंत असे, ह्यावरून लोकांत स्वास्थ्य होतें असें दिसतें. रस्ते वगैरे चांगल्या स्थितींत असले पाहिजेत. कारण एका ठिकाणचे लोक दूर कोठें तरी जाऊन दानधर्म करीत. अशोकाच्या वेळेपासून शालिवाहनांच्या अखेरीपर्यंत लोकांची बोलण्याची भाषा मुख्यतः महाराष्ट्री असून, शिवाय पाली व दुसऱ्या प्राकृत भाषा ह्यांचाही उपयोग होत असे. शिलालेख वगैरे लिहिणें झाल्यास संस्कृत भाषा वापरीत. संस्कृत भाषेचा प्रचार शालिवाहनांनंतर उत्तरोत्तर वाढत चालला.

**४. स. २१८–५५० चे वंश.**—इ. स. पू. ७३ पासून इ. स. २१८ पावेतों शालिवाहन वंशानें महाराष्ट्रावर राज्य केलें. त्यानंतर तीनशें वर्षांचा स्पष्ट पत्ता लागत नाहीं. शालिवाहनांचेच कांहीं वंशज कऱ्हाडच्या बाजूस राज्य करीत होते. तसेंच अभीर वंशाचें गौळी राजांचें राज्य बरेच दिवस महाराष्ट्रावर होतें. दहा अभीर राजांचीं नांवें पुराणांत आहेत. शिवाय भोज, रट्ठे, राष्ट्रिक ह्या नांवाचे क्षत्रिय वंशही ठिकठिकाणीं प्रबळ होते. शालिवाहनांनीं आपल्या अमदानींत ह्या लोकांस ताब्यांत ठेविलें, पण शालिवाहनांचा अंमल मोडूं लागल्यावर ते हळू हळू स्वतंत्र होऊं लागले. उत्तर महाराष्ट्रांत रट्ठे यांनीं 'महारट्ठे' हें उपपद धारण केल्याचें दिसतें; आणि दक्षिणच्या बाजूस रट्टी किंवा रठ्ठ हेंच नांव बहुधा आढळतें. रठ्ठयांच्या कित्येक कुटुंबांनीं एक 'कूट' किंवा संघ करून आपणांस 'रठ्ठकूड' अशी संज्ञा घेतली. त्यांचेंच रूप पुढें राठोड असें झालें. त्याचें संस्कृत रूप 'राष्ट्रकूट' असें आहे. अभीर व राष्ट्रकूट ह्यांचा उदय बहुधा एकदमच म्हणजे तिसऱ्या शतकाचे अखेरीस झाला; आणि सुमारें २४५ वर्षें म्हणजे सहाव्या शतकाच्या आरंभापर्यंत त्यांचा अंमल महाराष्ट्रावर थोडाबहुत चालू होता. ह्याच वेळेस दक्षिणच्या बाजूस हल्लींच्या उत्तरकॅनरा जिल्ह्यांत कदंबांचें एक प्रबल राज्य होतें. त्यांच्या देशास वनवासी म्हणत. वनवासीलाच वैजयंती असें दुसरें नांव होतें. हें शहर हल्लींच्या हानगळ शहराच्या नैऋत्येस १६ मैलांवर होतें. सहाव्या शतकांत चालुक्यांनीं उत्तरेंतून येऊन महाराष्ट्र देश काबीज केला. चालुक्यांपासून महाराष्ट्राचा इतिहास व्यवस्थित सांपडतो.

हे चालुक्य मूळचे अयोध्येस राज्य करीत होते हारीत व मानव्य (मनूचा वंशज) या नांवाचे दोन योद्धे होते, त्यांजपासून चालुक्य वंशाची उत्पत्ति झाली. कार्तिकेय हा त्यांचा कुलदेव असून त्यांच्या निशाणावर वराहाचें चिन्ह असे. ते आपणास सूर्यवंशी म्हणवीत. ह्या चालुक्यांची एक शाखा दक्षिणेंत आली. त्या शाखेचा मुख्य जयसिंह म्हणून होता, त्यानें कृष्ण राष्ट्रकूटाचा पुत्र इंद्र म्हणून होता, त्याचा पराभव करून चालुक्यांची गादी दक्षिणेंत स्थापन केली, (इ. स. सुमारें ५५०); आणि आजूबाजूच्या राजांस जिंकून त्यानें आपलें राज्य वाढविलें.

चालुक्यांची खालील वंशावळ ध्यानांत ठेविली असतां पुढील मजकूर चांगला समजेल:—

५. पूर्व चालुक्यवंश ( स. ५५०–७५३ ).—

१ जयसिंह.
|
२ रणराग
|
३ पुलकेशी, १ ला, सत्याश्रय, श्रीपुलकेशी वल्लभ.
| ( स. ५५० )

४ कीर्तिवर्मा १ ला ( स. ५६७–५९१ ) | रणपराक्रम — ५ मंगलीश ( स. ५९१–६१० )

४ कीर्तिवर्मा याचे पुत्र: ६ पुलकेशी, २ रा, ( स. ६१०–६४२ ) सत्याश्रय, श्रीपृथ्वीवल्लभ. — विष्णुवर्धन ( पूर्वेकडील चालुक्यांचा संस्थापक ) — जयसिंह

६ पुलकेशी याचे पुत्र: चंद्रादित्य — ७ विक्रमादित्य १ ला, ( ६५५–६८० ) — आदित्यवर्मा — जयसिंहवर्मा.

७ विक्रमादित्य १ ला, ( ६५५–६८० )
|
८ विनयादित्य ( ६८०–६९७ )
|
९ विजयादित्य ( ६९७–७३३ ).
|
१० विक्रमादित्य, २ रा, ( ७३३–७४७ ).
|
११ कीर्तिवर्मा, २ रा, ( ७४७–७५३ ).

जयसिंहाचा मुलगा रणराग हाही मोठा शूर योद्धा होता. रणरागाचा पुत्र पुलकेशी ह्यानें वातापीपुर म्ह० हल्लींचें बादामी येथें आपली राजधानी केली. त्यानें एक मोठा अश्वमेधयज्ञ करून ‘ सत्याश्रय श्रीपुलकेशी

वल्लभ महाराज ' असा किताब धारण केला. त्यांतील सत्याश्रय आणि वल्लभ ह्या संज्ञा त्याच्या वंशजांनीं पुढें चालविल्या. पुलकेशी हाच चालुक्यवंशाचा पहिला मोठा राजा होय. पुलकेशीचा मुलगा कीर्तिवर्मा (स० ५६७–५९१) बापासारखाच पराक्रमी होता. त्यानें नळ, मौर्य व कदंब ह्या वंशांतील राजांस जिंकिलें. पैकीं मौर्य हे कोंकणांत फार दिवसांपासून नांदत होते. ते अशोकाचेच वंशज इकडे येऊन राहिलेले असावे. कदंब हे कानड्यांतील वनवासी येथें राज्य करणारे होते, हें मागें सांगितलेंच आहे.

मंगलीश (स. ५९१–६१० ).—कीर्तिवर्म्यांस तीन मुलगे होते. ते सर्व त्याच्या मरणसमयीं अल्पवयी असल्यामुळें, त्याचा भाऊ मंगलीश हा राज्य करूं लागला. जबलपूर नजीक त्रिपुर ऊर्फ तेवूर येथें कलचूरि नांवाचे राजे राज्य करीत होते, त्यांस मंगलीश ह्यानें जिंकिलें. जबलपुरानजीकच्या ह्या देशास चेदिदेश हें नांव होतें. मंगलीशानें पूर्व व पश्चिम किनाऱ्यापावेतों सर्व प्रदेश काबीज केला. वेंगुर्ल्याजवळ रेडी म्हणून गांव आहे, त्यास पूर्वी रेवतीद्वीप म्हणत, तें मंगलीशानें जिंकिलें. बादामी येथें विष्णूचें मंदिर दगडांत कोरलेलें आहे, तें ह्या राजानें स्थापिलें; आणि त्याच्या पूजानैवेद्याकरितां गांव नेमून दिले. त्याचा पुतण्या पुलकेशी हा मोठा पराक्रमी होऊं लागला. त्यास राज्य मिळूं नये, व आपल्या मुलास तें मिळावें, अशी खटपट करीत असतां मंगलीश मारला गेला.

६. पुलकेशी ( स. ६११–६४२ ).—पुढें दुसरा पुलकेशी गादीवर बसला. ' सत्याश्रय—श्रीपृथ्वीवल्लभ—महाराज ' असा त्यानें किताब धारण केला. त्यानें कदंबांस जिंकून त्यांचें वनवासी शहर काबीज केलें. कोंकणच्या मौर्यांसही त्यानें जिंकिलें. पश्चिमसमुद्रावर पुरी नांवाचें मोठें शहर होतें, तें शंभर गलबतांनीं समुद्रांतून हल्ला करून पुलकेशीनें जिंकिलें. लाट, मालव व गुर्जर ह्या देशांच्या राजांस जिंकून पुलकेशीनें आपल्या सत्तेखालीं आणिलें. ह्या वेळीं उत्तर हिंदुस्थानांत कनोज येथें बाणकवीचा आश्रयदाता हर्षवर्धन शिलादित्य ( स. ६०६–६४८ ) हा पराक्रमी राजा राज्य करीत होता. त्यानें दक्षिणेवर स्वारी केली असतां पुलकेशीनें त्याचा पराभव केला; आणि ह्या विजयाबद्दल ' परमेश्वर ' हें नामाभिधान धारण केलें, तें पुढील राजांनीं तसेंच चालू ठेविलें. नर्मदा नदीवर उत्तर सरहद्दीच्या बंदोबस्ताकरितां त्यानें मोठी फौज ठेवून दिली.

कलिंग व कोसल ह्या देशांचे राजेही त्यास शरण आले. त्याचप्रमाणें चोल, पाण्ड्य व केरल येथील राजांनीं त्याची दोस्ती संपादिली.

पुलकेशीचा धाकटा भाऊ विष्णुवर्धन ह्याची नेमणूक कांहीं दिवस सातारा पंढरपूरकडील प्रदेशावर झाली होती. त्यानें भीमानदीच्या कांठीं एक गांव इनाम दिल्याचा ताम्रपट सांपडला आहे. परंतु पुढें पुलकेशीनें कृष्णागोदावरींच्या मधला आन्ध्रदेश जिंकून तेथें आपला भाऊ विष्णुवर्धन याची स्थापना केली ( स. ६०९ ). त्याची राजधानी पिष्टपुर म्हणजे हल्लींचें पीठापुर हें ईस्टकोस्ट रेल्वेवर गोदावरीच्या उत्तरेस आहे. विष्णुवर्धनाचें राज्य स.६१५त स्वतंत्र झालें, तें अव्याहत स.१०७० पर्यंत टिकलें. ह्या राज्यास पूर्वेकडील चालुक्य वंश असें म्हणतात. स.१०७०त चोलराजानें तें राज्य जिंकिलें. (Vincent Smith p. 425).

पुलकेशीची कीर्ति हिंदुस्थानाबाहेरही पसरली होती. त्यानें आपले वकील इराणचा राजा दुसरा खुस्रू ह्याजकडे स. ६२५–६ त पाठविले होते. त्याच्या परत भेटीदाखल खुस्रूचे वकील पुलकेशीचे दरबारीं आले, त्यांचा पुलकेशीनें मोठा सन्मान केला. त्या वेळच्या दरबाराचा देखावा अजिंठ्याचे लेण्यांत नंबर १ चे गुहेंतील उत्कृष्ट चित्रांत दाखविलेला आहे. हें चित्र ऐतिहासिक दृष्टीनें अत्यंत महत्त्वाचें आहे. त्यावरून चित्रकलेची तर कल्पना होतेच; पण शिवाय अनेक ऐतिहासिक गोष्टींचा निर्णय करण्यास त्याचा फार उपयोग होतो.

सर्व महाराष्ट्रदेश पूर्णपणें पुलकेशीच्या ताब्यांत असून, त्या देशावर त्यानें पुष्कळ दिवस शांततेनें राज्य केलें. हाच त्या वंशांतला पराक्रमी राजा होय. चिनी प्रवासी हुएन्त्संग ( स. ६२९–६४५ ) हिंदुस्थानांत आला असतां त्यानें महाराष्ट्रांत येऊन पुलकेशीची भेट घेतली ( स. ६४१ ). त्या वेळीं पुलकेशी नासिक येथें राहत होता. पुलकेशी हा उदार व प्रजापालनदक्ष असून त्याजवर प्रजा अति प्रेम करितात, असें हुएन्त्संग लिहितो. तो म्हणतो, ‘ पुलकेशीचे राज्याचा परीघ १२०० मैल होता. महाराष्ट्राची जमीन सुपीक असून तींत धान्य पुष्कळ पिकतें. हवा उष्ण आहे. लोकांच्या रीतीभाती साध्या आहेत. तेथले लोक उंच व मानी असून स्वभावानें हट्टी आहेत. त्यांजवर कांहीं उपकार केला असतां तो ते चांगला स्मरतात. पण त्यांच्या विरुद्ध वागलें असतां त्यांच्या रागांतून

सुटणें मुष्किलीचें आहे. दुसऱ्यास अडचणींत पाहून स्वतःची पर्वा न करितां ते त्यास साह्य करितात. शत्रूला आगाऊ सूचना देऊन मग ते त्याशीं सामना करितात. लढाईत ते पाठलाग करितात; पण त्यांच्या स्वाधीन झालेल्यांची कत्तल करीत नाहींत. त्यांच्या सरदाराचा लढाईत पाडाव झाला असतां त्यास बायकोचे कपडे नेसवून ते त्याचा अपमान करितात. युद्धास जातांना ते दारू पितात. मग त्यांजपुढें उभें राहण्याची कोणाची छाती होत नाहीं त्यांच्या झुंडीच्या झुंडी जाऊन शत्रूवर पडतात. असे लोक जवळ असल्यामुळें त्यांच्या राजास कशाचीही काळजी वाटत नाहीं.'

पुलकेशी कधीं मृत्यु पावला तें समजत नाहीं. स. ६०९ पासून कांची येथील पल्लव राजांबरोबर त्याचें युद्ध थोडें बहुत सुरू होतें. स. ६४२ त त्या युद्धांत पुलकेशीला अपयश आलें. पल्लव राजा नरसिंहवर्मा ह्यानें वातापी शहर काबीज करून लुटलें आणि बहुधा पुलकेशीलाही पकडून ठार मारिलें. पुढें तेरा वर्षें चालुक्यांची सत्ता अगदींच खालावली, आणि त्यांचा दक्षिणेकडील बहुतेक प्रांत पल्लवांनीं काबीज केला.

पुलकेशीचा दुसरा भाऊ जयसिंह नासिक प्रांताचा कारभार पाहत असे. त्या प्रांतास गोपराष्ट्र अशी संज्ञा होती. पुलकेशीचा वडील मुलगा चन्द्रादित्य सावंतवाडीच्या बाजूस कारभार पाहत असे. त्याची राणी विजयभट्टारिका हिनें दिलेलीं दानपत्रें सावंतवाडीच्या बाजूस उपलब्ध झालीं आहेत. पुलकेशीचा दुसरा मुलगा कृष्णा-तुंगभद्रांच्या संगमावरील प्रदेशांत अंमल करीत होता. चिपळूण-नजीक सेन्द्रक नांवाच्या घराण्याशीं पुलकेशीचा आप्तसंबंध होता. हे सेन्द्रक म्हणजेच हल्लींचे सिंदे असावे.

**पुलकेशीनंतरचे राजे.**—पुलकेशीनंतर त्याचा दुसरा मुलगा प्रिय-तनय विक्रमादित्य स. ६५५ त बादामी येथें राज्य करूं लागला. त्यापूर्वी वडील मुलगा चंद्रादित्य सावंतवाडीच्या बाजूस 'स्वराज्य' करीत होता. विक्रमादित्यानें मोठा पराक्रम करून कांची येथील पल्लव राजास जिंकिलें. त्यानें स ६८० पावेतों राज्य केलें. त्याचा धाकटा भाऊ जयसिंहवर्मा धराश्रय ह्यानें लाटदेशांत म्हणजे दक्षिण गुजराथेंत नवसरी येथें चालुक्यांचें एक राज्य स्थापन केलें. जयसिंहाचा मुलगा श्याश्रय हाच तेथें बहुधा

कारभार पाहत असे. हें राज्य पुढें चांगलें मरभराटीस आलें. विक्रमादित्याची कारकीर्द स. ६८० त समाप्त झाली.

विक्रमादित्याचा मुलगा विनयादित्य ह्यानें स.६८० पासून ६९६ पर्यंत राज्य केलें. आजूबाजूचे पुष्कळ राजे त्याचे ताबेदार झाले; आणि हिंदुस्थानच्या थेट दक्षिणटोंकापर्यंत त्याची सत्ता चालत होती.

विनयादित्याचा मुलगा विजयादित्य स. ६०७त राज्य करूं लागला. त्यानें स. ७३३ पर्यंत राज्य केलें. स. ६९९ त त्यानें वातापीपुरांत ब्रह्मा, विष्णु आणि महेश्वर ह्यांच्या मूर्ती स्थापन केल्या. ह्याच्या वेळेस मुसलमान लोक सिंध प्रांतावर स्वाऱ्या करूं लागले.

विजयादित्याचा मुलगा विक्रमादित्य दुसरा ह्यानें स. ७३३ पासून ७४७ पर्यंत राज्य केलें. त्यानें कांचीच्या पल्लव राजाचा पुरा मोड करून पुष्कळ लूट आणिली. कांची येथें विक्रमादित्यानें पुष्कळ दानधर्म केला, आणि तेथलि मंदिरांची व्यवस्था पूर्ववत् करून दिली.

विक्रमादित्याचा मुलगा कीर्तिवर्मा दुसरा हा राज्य करीत असतां राष्ट्रकूटांनीं चालुक्यवंशाचा पाडाव केला, (स. ७५३). ह्याप्रमाणें बादामीच्या मुख्य वंशाचा पाडाव झाला, तरी महाराष्ट्रांत अनेक ठिकाणीं चालुक्यांचीं दुसरीं पुष्कळ घराणीं नांदत होतीं. त्यांतीलच एक घराणें पुढें सुमारें दोनशें वर्षांनीं पुनः प्रबळ झालें. स. ७५३ नंतर चालुक्यांच्या देणग्या उपलब्ध नाहींत. अशा दानाच्या ताम्रपटावरूनच बहुश! ह्या राजांचे काल ठरविलेले आहेत.

७. पूर्वचालुक्य–समालोचन.—चालुक्यांच्या वेळेस महाराष्ट्रांत जैनधर्माचा प्रभाव विशेष होता. तथापि पुराणिक व वैदिक धर्माचा प्रचार ठिकठिकाणीं होताच. जैन कवि रविकीर्ति ह्यास पुलकेशी (दुसरा )चा आश्रय होता. जैन पंडित विजय ह्यानें वादांत सर्व पंडितांस हरविल्यामुळें त्यास विक्रमादित्य (दुसरा) ह्यानें इनाम करून दिलें. तथापि जैनधर्माचा प्रसार दक्षिणच्या बाजूसच विशेषत: होता. हिंदु देवतांचीं मंदिरें इतर ठिकाणीं होत होतीं. वेदशास्त्रज्ञ ब्राह्मणांस इनामें व देणग्या मिळत असत. डोंगरांतून दगडी मंदिरें खोदून पूर्वीं तेथें बुद्धांचे विहार करीत, तोच प्रकार आतां हिंदूंनीं स्वीकारिला; आणि अशा रीतीनें हिंदु देवता स्थापन करण्याचा

प्रघात चालुक्यांचे अव्वलीस सुरू झाला. बादामी येथें एक उत्कृष्ट मंदिर आहे. बुद्धधर्मास जरी प्रत्यक्ष राजाश्रय नव्हता, तरी त्याची प्रगति राज्यांत बरीच होती. मात्र त्या धर्माची उतरती कळा होती. दक्षिणेकडील भागांत जैन धर्माचा प्रचार विशेष होता. चालुक्य राजे सर्व धर्मांवर प्रेम सारखें ठेवीत. चालुक्यांचे वेळेस पारशी लोकांचा हिंदुस्थानांत प्रथम प्रवेश झाला. इराणांतील खुरासान प्रांतांतून पुष्कळ पारशी घराणीं हिंदुस्थानांत पश्चिम किनाऱ्यावर संजन येथें स. ७३५ त येऊन राहिलीं. चालुक्यांचे पूर्व व उत्तर असे दोन प्रबळ वंश महाराष्ट्रांत झाले; इतकेंच नव्हे, तर त्यांचे अनेक वंश ठिकठिकाणीं थोडे बहुत प्रबळ झाले. अर्थात् हल्लींच्या मराठे लोकांत ह्या सूर्यवंशी चालुक्यांपासून विस्तार पावलेलीं असंख्य घराणीं असलीं पाहिजेत. हल्लींचे साळुंके हे चालुक्यांचे वंशज असावेत.

८. राष्ट्रकूटवंश, (स. ७५३-९७३).—राष्ट्रकूट हा शब्द राष्ट्रिक ऊर्फ रट्ठ ह्यांचा कूट म्हणजे संघ ह्या अर्थानें उत्पन्न झाला. चालुक्यांच्या पूर्वीं राष्ट्रकूटांचा अंमल महाराष्ट्रांतील कित्येक प्रांतांवर होता.

राष्टकूटवंशाची हकीकत अद्यापि चांगली उपलब्ध नाहीं. गोविंद हा या वंशांतला पहिला पराक्रमी राजा झाला. त्याचा पुत्र कर्क ह्याचा ओढा वैदिक धर्माकडे विशेष होता. त्याच्या वेळेस ब्राह्मणांनीं यज्ञ वगैरे पुष्कळ केले. कर्काचा मुलगा इन्द्रराज यानें चालुक्य घराण्यांतील मुलीशीं लग्न केलें. अशा रीतीनें सूर्य व चंद्रवंशांचा मिलाफ होऊं लागला. त्यांचा मुलगा दन्तिदुर्ग हा मोठा लढवय्या होता. त्यानें कर्नाटकांतील राजांचा पराभव केला; आणि चालुक्यांचा शेवटचा राजा कीर्तिवर्मा ह्यास जिंकिलें. दन्तिदुर्ग हाच सर्व महाराष्ट्रावर राज्य करणारा पहिला राष्ट्रकूट राजा होय.

दन्तिदुर्गाचे पश्चात् त्याचा चुलता कृष्णराज गादीवर बसला. त्यानें 'शुभतुंग' ही पदवी धारण करून चालुक्यांचे सत्तेचा पूर्ण निःपात केला. एलोरा येथील कैलास नांवाचें अप्रतिम मंदिर ह्यानेंच दगडांत कोरविलें. एवढें सुंदर व प्रचंड काम पृथ्वीवर दुसरें कोठेंच झालेलें नाहीं. कृष्णाचा मुलगा ध्रुव हा विशेष पराक्रमी निघाला. त्यानें दक्षिणेकडील व उत्तरेकडील राजांस जिंकिलें. त्याचा मुलगा गोविंद (तिसरा) हा राष्ट्रकूटवंशांत सर्वांत पराक्रमी राजा झाला, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

राष्ट्रकूट वंशांतील राजांचीं नांवें येणेंप्रमाणें:—

१ दन्तिवर्मा ( सुमारें स. ७४८ ); त्याचा पुत्र ( २ ) इन्द्र, १ ला; इन्द्राचा पुत्र ( ३ ) गोविंद १ ला; गोविंदाचा पुत्र ( ४ ) कर्क, १ ला.



गोविंदानें उत्तरेंत व दक्षिणेंत अनेक स्वाऱ्या करून शत्रूंचा पाडाव केला. माळव्यापासून कांचीपुरपर्यंत सर्व प्रदेश त्याच्या ताब्यांत होता. त्याचा भाऊ इंद्र ह्यानें लाटदेशांत एका स्वतंत्र शाखेची स्थापना केली. लाटदेश म्हणजे दक्षिण गुजराथ मही व तापी ह्यांच्या मधला प्रदेश होय. गोविंदाचा पुत्र शर्व ऊर्फ अमोघवर्ष ह्यानें पूर्वींची नासिक राजधानी सोडून, मान्यखेट येथें नेली. मान्यखेट म्हणजे निजामशाहींतलें हल्लींचें मालखेड वाडीजंक्शनजवळ आहे. कान्हेरी येथील लेण्यांत अमोघवर्षाचें नांव आहे, तेव्हां तीं लेणीं त्याच्याच वेळेस झालीं असावीं. अमोघवर्षाची भक्ति जैनधर्माच्या दिगंबर पंथावर होती. जिनसेन नांवाचा त्याचा जैन गुरु होता; जिनसेनानें 'आदिपुराण' नांवाचा जैन ग्रंथ लिहिला आहे. जिनसेनाचा शिष्य गुणभद्र ह्यानें ह्या पुराणाचा उत्तरभाग लिहिला, त्यास 'उत्तरपुराण' असें म्हणतात. ह्या पुराणांत अमोघवर्षाचा उल्लेख आहे. अमोघवर्षाची कारकीर्द फार लांब म्हणजे बासष्ट वर्षें झाली. त्याचा मुलगा कृष्ण ऊर्फ अकालवर्ष हा राज्य करीत असतां धारवाड व सौंदत्ती येथील जैनमंदिरें बांधलीं गेलीं. चेदी देशचा हैहयवंशी राजा कोकल ह्याची मुलगी ह्या कृष्ण राजास दिलेली होती. कृष्णाच्या कार्किर्दींत वर सांगितलेलें जैन-पुराण गुणभद्रानें स. ८९८ त संपूर्ण केलें. स. ९११ हें कृष्णाच्या कार्किर्दीचें वर्ष दिलेलें आहे.

ह्यापुढील कित्येक पुरुषांची विशेष माहिती उपलब्ध नाहीं. देशांत युद्धप्रसंग चालू होतेच. जैन व हिंदु ह्यांच्या भांडणामुळें ह्या युद्धांस प्रखर स्वरूप प्राप्त होई. चौथा गोविंद हा मोठा उदार राजा होता. त्यानें अनेक ठिकाणीं शंकराचीं मंदिरें बांधिलीं. शेवटचा पुरुष कक्कल राज्य करीत असतां, तैलप चालुक्यानें राष्ट्रकूटांचें राज्य बुडविलें (स. ९७३). एवंच राष्ट्रकूटांचें राज्य स. ७४८ पासून स. ९७३ पर्यंत सुमारें सव्वा-दोनशें वर्षें चाललें.

**राष्ट्रकूट, समालोचन.**—राष्ट्रकूटराजे फार प्रबळ व भाग्यशाली होते. एलोरा येथील दगडांत कोरलेलीं अप्रतिम लेणीं ह्यांच्या वेळेस तयार झालीं, ह्या एकाच गोष्टीनें त्यांचें वैभव केवढें होतें हें कळून येईल. पूर्वी बौद्ध भिक्षूंकरितां दगडांत लेणीं कोरीत, तो प्रकार बंद पडून हिंदु देवतांचीं मंदिरें राष्ट्रकूटांच्या वेळेपासून भरभराटींत येऊं लागलीं. शंकर व विष्णु

ह्या देवांचें महत्त्व तेव्हांपासून सुरू झालें, तें उत्तरोत्तर वृद्धि पावून त्यांचे पुढें अनेक पंथ बनले. नवव्या शतकाचे आरंभीं शंकराचार्यांनें सनातनधर्माची स्थापना नवीन पायावर केली (स. ७८८–८२०), त्यामुळें व जैन पंडितांच्या उद्योगानें बुद्धधर्म अगदींच खालावत चालला. तथापि तो सर्वस्वी नाहींसा झाला नव्हता. ठिकठिकाणीं त्याचे उपासक होते. चालुक्यांचे वेळेस जैनांचें महत्त्व सुरू झालें, तें राष्ट्रकूटांचे वेळेस तसेंच वाढत गेलें. कित्येक मांडलिक राजे व वैश्य गृहस्थ जैनधर्माचे कट्टे उपासक होते; हा जैनांचा दिगंबर पंथ होता. राष्ट्रकूटांच्या आश्रयाखालीं अनेक संस्कृत ग्रंथ लिहिले गेले, आणि संस्कृत विद्येची भरभराट होती. मात्र ह्या वेळची संस्कृत भाषा कृत्रिम व कविकल्पनांनीं विचित्र आणि बोजड अशी आहे. ‘कविरहस्य’ नांवाचा हलायुधाचा एक ग्रंथ ह्या वेळचा असून, त्यांत कोणा तरी एका कृष्ण नांवाच्या राजाचें वर्णन आहे. नेमादित्याचा मुलगा त्रिविक्रमभट्ट हा इन्द्राच्या (तिसरा) पदरीं असून, त्यानें नलचंपू हें काव्य लिहिलेलें आहे.

९. **उत्तर चालुक्यवंश, (स. ९७३–११८९).**—पूर्व चालुक्यांचा शेवटचा राजा कीर्तिवर्मा (दुसरा) ह्याचें राज्य नष्ट झालें, तरी त्यांचे वंशज अल्पस्वल्प सत्ता बाळगून होते. राष्ट्रकूटांची सत्ता प्रबल झाली असतां, ह्या चालुक्यांचे सात राजे झाले; परंतु ज्या तैलपानें राष्ट्रकूटांस मार दिला, तो ह्या मुख्य चालुक्यवंशाचाच होता कीं काय, तें कळत नाहीं. चालुक्यांचे अनेक लहान मोठे वंश होते, त्यांपैकीं एखाद्या वंशांतला तैलप असेल. तैलपानें चोल व चेदी येथील राजांस जिंकिलें; आणि अन्हिलपट्टण येथील चालुक्यांचा पराभव केला. त्यानें माळव्यावर स्वारी करून, धारचा राजा मुंज ह्यास पकडून आणून ठार मारिलें. शेवटच्या राष्ट्रकूट राजाची मुलगी जाकव्वा ही तैलपाची बायको होती. तैलपानंतर दोन तीन राजे विशेष पराक्रमी झाले नाहींत, तरी माळव्यांतील राजांशीं त्यांचे युद्धप्रसंग चालूच होते. सोमेश्वर पहिला हा राजा पराक्रमी झाला. त्यानें ‘आहवमल्ल’ व ‘त्रैलोक्यमल्ल’ ह्या पदव्या धारण केल्या; कनोज व कांची येथील राजांचे पराभव केले; आणि गोव्यापर्यंत कोंकणप्रांत जिंकिला. त्यानें कल्याण शहराची स्थापना करून, तेथें आपली राजधानी केली. हें कल्याण शहर निजामशाहींत सोलापूर व बेदर ह्यांच्या दरम्यान, बेदरच्या

पश्चिमेस सुमारें चाळीस मैल आहे. तैलपापासून पुढें ज्या चालुक्यवंशाची भरभराट झाली, त्याचा तपशील येणेंप्रमाणें:—

उत्तर चालुक्यवंश.—(गझनी महंमुदाचे समकालीन).




सोमेश्वराचा मुलगा विक्रमादित्य, हा फार पराक्रमी होता. बाप गादीवर असतां त्यानें पुष्कळ देशांवर स्वाऱ्या केल्या. पूर्वेकडे गौडबंगालवर सुद्धां त्यानें स्वारी केली. सिंहलद्वीपचा राजा त्यास शरण आला. मुलगा असे पराक्रम करीत असतां, आहवमल्ल ताप येऊन आजारी पडला; आणि

आपण जगत नाहीं असें पाहून, शंकराचें स्मरण करीत तुंगभद्रेंत त्यानें जलसमाधि घेतली, ( स. १०६९ ). मरणापूर्वी त्यानें पुष्कळ दानधर्म केला. तो विद्येचा भोक्ता असे; आणि त्यानें असंख्य यज्ञयाग करविले. आहवमल्लाचे वर्णनपर अनेक संस्कृत ग्रंथ, कथा व नाटकें आहेत. आहवमल्लाचे राज्यास कुंतलदेश म्हणत.

१०. विक्रमादित्य ( १०७६–११२६ ).—आहवमल्लाचा वडील मुलगा सोमेश्वर, जुलमी व दुर्बल होता. त्याचें व त्याचा पराक्रमी भाऊ विक्रमादित्य यांचें पटलें नाहीं. गोपाकपट्टण (हल्लींचें गोवा) येथें कदंबवंशी जयकेशी राजा राज्य करीत होता, त्याचें व विक्रमादित्याचें सख्य होतें. विक्रमादित्यानें आपली मुलगी मल्लाळमहादेवी जयकेशीच्या नातवास देऊन कदंबांशीं शरीरसंबंध जोडिला. त्याच स्वारींत विक्रमादित्यानें कांचीच्या चोल राजाची मुलगी आपली राणी केली; आणि वडील भाऊ सोमेश्वर ह्यास पदच्युत करून आपण गादीवर बसला. पुढें पन्नास वर्षेंपावेतों त्यानें फार शहाणपणानें व शांततेनें राज्य करून प्रजेस सुखी केलें. ' त्रिभुवनमल्ल ' ' कलिविक्रम ' ' परमादिराय ' ह्या पदव्या त्यानें धारण केल्या. त्यानें शककालगणना बंद करून स्वत:ची नवी चालू केली, ती फार काळ टिकली नाहीं. कऱ्हाड येथें शिलाहार राजे राज्य करीत होते, त्या राजाची मुलगी चंद्रलेखा इच्याशीं विक्रमादित्यानें लग्न केलें. त्यास अशा पुष्कळ राण्या होत्या, आणि त्यांच्या खर्चास गांव नेमून दिलेले होते. युद्धप्रसंग मात्र त्यास पुष्कळदां इच्छेविरुद्ध करावे लागले. त्यानें कल्याणी येथें विष्णूचें एक मोठें देवालय बांधून, विक्रमपुर नांवाचें शहर वसविलें. त्याची रयत फार सुखी होती. काश्मीरचा विद्वान् पंडित बिल्हण हा आश्रय मागण्यासाठीं देशोदेशीं हिंडत ह्या विक्रमादित्याकडे आला; त्यास राजानें आपल्या पदरीं मोठ्या सन्मानानें ठेविलें. आणि विद्यापति ही पदवी त्यास दिली. ' विक्रमांकदेव चरित ' नांवाचें बिल्हणाचें प्रसिद्ध काव्य ह्या राजाविषयींच आहे. धर्मशास्त्रावर मिताक्षरा म्हणून जो प्रसिद्ध ग्रंथ आहे, त्याचा कर्ता विज्ञानेश्वर ह्या विक्रमादित्याच्या पदरीं होता. मिताक्षरेच्या शेवटीं राजाची स्तुति आहे, ती केवळ औपचारिक नसून सार्थ आहे, असें डॉ. भांडारकर म्हणतात. विक्रमादित्य हा उत्तरचालुक्य वंशांतला सर्वांत मोठा राजा होय.

विक्रमादित्याचा मुलगा सोमेश्वर (तिसरा) ह्यानें थोडेच दिवस पण चांगलें राज्य केलें. हा विद्येचा भोक्ता होता. त्यानें स्वतः मानसोल्लास अथवा 'अभिलषितार्थचिंतामणि' नांवाचा एक उत्तम संस्कृत ग्रंथ लिहिला असून, त्यांत राजांच्या उपयोगी अशी अनेक विषयांची व शास्त्रांची चांगली चर्चा आहे. आपल्या योग्यतेवरून त्यानें 'सर्वज्ञभूप' अशी पदवी धारण केली. त्याच्या पश्चात् झालेले राजे दुर्बल होते; आणि चालुक्यांची सत्ता खालावत चालली. कलचूरी वंशांतील विज्जल नांवाचा दण्डनायक होता, त्यानें आपल्या धन्याची सत्ता दळकाविली; तेव्हां राजा तैलप कल्याण शहर सोडून धारवाडनजीक आण्णिगेरी येथें जाऊन राज्य करूं लागला. तें शहरही विज्जलानें काबीज केलें; तेव्हां तैलप बनवासी येथें जाऊन राहिला, तथापि विज्जलाची व्यवस्था लागली नाहीं. लिंगायत-पंथ सुरू होऊन त्याच्या योगानें बरीच अस्वस्थता झाली; आणि विज्जलही लवकरच मारला गेला. तेव्हां तैलपाचा मुलगा सोमेश्वर यानें पूर्वींचें बरेंच राज्य परत मिळविलें. त्या कामीं त्यास ब्रह्म नांवाच्या त्याच्या एका सर-दारानें पुष्कळ मदत केली; आणि कलचूरींचा पाडाव केला, परंतु सोमे-श्वराचें हें वैभव फार दिवस टिकलें नाहीं. दक्षिणेकडील व उत्तरेकडील दोन यादव घराण्यांनीं त्याचा नाश केला. सारांश, स. ११८९ नंतर चालुक्यांचा थांग लागत नाहीं. चालुक्यांचे वेळेस गझवी महंमूद व घोरी महंमद हिंदुस्थानांत शिरून मुसलमानी सत्ता स्थापित होते, त्याची दाद ह्या दक्षिणच्या राजांस नव्हती. चालुक्यांचीं कित्येक घराणीं पुढें ठिकाठिकाणीं नांदत होतीं. कोंकणांत संगमेश्वर व राजापूर तालुक्यांत चालुक्यांचे नांवाच्या देणग्या सांपडतात. चाळके ह्या नावाचीं कोंक-णांत कांहीं घराणीं अद्यापि नांदत आहेत, तीं चालुक्यांचींच होत.

**११. कलचूरि व लिंगायत पंथाचा उदय.**—जबलपूरच्या आस-पासच्या प्रदेशास चेदीदेश अशी संज्ञा होती; आणि त्रिपुर ऊर्फ तेवूर येथें हैहय नांवाचें क्षत्रिय घराणें राज्य करीत होतें, हें मागें सांगितलेंच आहे. त्यांचाच एक वंश कल्याण येथें चालुक्यांचे पदरीं येऊन राहिला होता; आणि त्यांचा व चालुक्यांचा आप्तसंबंध होता. चेदीप्रांतांत कलंजर नांवाचा किल्ला आहे, तेथेंही ह्या घराण्याचें आदिस्थान होतें. कलचूरीचा उदय न होण्यास लिंगायत पंथाचें कारण झालें तें असें. कानडी भाषेंत

'बसवपुराण' म्हणून एक ग्रंथ आहे, त्यांत बसवाचा वृत्तान्त आहे. ह्या बसवानें लिंगायत पंथ स्थापन केला. विज्जलरायचरित्र म्हणून एका जैन गृहस्थानें लिहिलेला ग्रंथ आहे, त्यांत लिंगायत पंथाची उलट बाजू दाखविलेली आहे. जैनांचे विरुद्ध हा लिंगायत पंथ निर्माण झाला. ह्या पंथास 'वीरशैव' असेंही म्हणतात.

कलादगी जिल्ह्यांत बागेवाडी येथें मादिराज नांवाचा ब्राह्मण राहत होता, त्याचा मुलगा बसव. विजलाचा मुख्य प्रधान बलदेव हा बसवाचा मामा असून, त्याची मुलगी बसवाला दिलेली होती. बलदेव मरण पावल्यामुळें विजलानें बसव ह्यास आपला मुख्य प्रधान नेमिलें. बसवाची एक बहीण पद्मावती राजा विज्जल ह्याला दिलेली होती. दुसरी बहीण नागलाम्बिका हिचा मुलगा चेन्नबसव म्हणून होता, त्यास हाताशीं घेऊन, शंकराचें लिंग व नन्दी ह्यांच्या पूजेस प्राधान्य देऊन, एक नवीन पंथ बसवानें सुरू केला. त्यास वैश्य वगैरे वर्गांतून पुष्कळ भक्त मिळाले. ह्या पंथाच्या गुरूंस जंगम अशी संज्ञा होती. सरकारी पैशाचा उपयोग करून बसवानें ह्या जंगमांची चंगळ केली, तेव्हां ते चैनी बनले. मंचण्णा म्हणून विजलाचा एक प्रधान होता, त्यानें ह्या गोष्टी विजलाचे कानावर घातल्या, तेव्हां बसवासंबंधानें विजलाचें मन विटलें, आणि तो त्यास पकडण्याची खटपट करूं लागला. कित्येक वीरशैव साधूंचे त्यानें हालहाल केले. त्याबरोबर धर्मयुद्धाची लाट उसळली. बसव पळून गेला. तो हातास लागेना, तेव्हां स्वतः विज्जल फौज घेऊन त्याजवर चालून गेला. त्या कामांत विज्जलाचा पराभव होऊन बसवाचे अनुयायी पुष्कळ वाढले, आणि कल्याणास परत येऊन बसवानें तेथचा राज्यकारभार आपल्या हातीं घेतला. पुढें लवकरच बसवानें विज्जलास मारून टाकिलें; त्या वेळीं सर्व कल्याण शहारांत बंड होऊन, प्रेतांच्या राशी पडल्या; आणि शहर ओस झालें. बसवानें जाऊन मलप्रभा नदींत समाधि घेतली. चन्नबसवानें पुढें लिंगायत पंथाची वृद्धि केली. हल्लीं कानडा प्रदेशांत लिंगायतांचा भरणा विशेष आहे. ते वेदांचें प्रामाण्य किंवा पुनर्जन्म मानीत नाहींत. ब्राह्मणांचा ते तिरस्कार करितात. विधवांस पुनर्विवाहाची मोकळीक आहे. ( Vincent Smith ).

विज्जलाच्या मुलानें कांहीं दिवस धडपड केली. पण स. ११८२ च्या सुमारास सोमेश्वर ( चवथा ) यानें पूर्वीच्या राज्याचा बराच भाग जिंकून घेऊन, कलचूरींचा निःपात केला. मात्र सोमेश्वरास पुढें लवकरच यादवांनीं जिंकिलें. अशा प्रकारें पुढें नवें मन्वंतर सुरू झालें; आणि स. ११९० त उत्तरचालुक्यांचें राज्य संपलें.

१२ उत्तरचालुक्य, समालोचन.—उत्तर चालुक्यांचें राज्य बाराव्या शतकांत गेलें. त्यांच्या अमदानींत जुने प्रघात व जुनी व्यवस्था सर्वथैव बदलून नवीन मनूस प्रारंभ झाला. बौद्धधर्माचे अवशेष सर्व नाहींसे झाले. जैनधर्मासही उतरती कळा लागली; आणि लिंगायत पंथ जोरांत आला. त्याचा विस्तार वैश्यवर्गांतच बहुधा आहे, कारण हे वैश्यच पूर्वी जैन–धर्माचे पुरस्कर्ते होते. इकडे हिंदूंच्या पुराणांची नवीन घटना पूर्ण होऊन, हिंदुधर्माचा फैलाव विशेष झाला. पुष्कळ ब्राह्मण पंडित निर्माण झाले. हिंदुधर्मशास्त्रावर पूर्वी व्यवस्थित ग्रंथ नव्हते. अनेक स्मृति व अनेक पुराणें इत्यादिकांतील विरोधामुळें, योग्य आधार देऊन कोणत्याही बाबतीचा निर्णय करण्यास अडचण पडे. ही अडचण दूर करण्यासाठीं अनेक विद्वान् पंडितांनीं सर्व शास्त्राधार एकत्र करून, आणि कालभेद व स्थलभेद ध्यानांत घेऊन स्मृतिवचनांची एकवाक्यता करणारे नवीन पद्धतीचे ग्रंथ लिहिले, त्यांस निबंधग्रंथ म्हणतात. धारानगरीचा भोजराजा, मिताक्षराकार विज्ञानेश्वर, उत्तर कोंकणचा शिलाहारवंशी राजा अपरार्क ह्यांनीं संस्कृत भाषेंत धर्मशास्त्रावर निबंध लिहिले आहेत. भोज व अपरार्क ह्यांच्या ग्रंथावरून असें अनुमान करतां येतें कीं, त्या वेळचे क्षत्रिय सुद्धां चांगलें संस्कृत जाणत; आणि त्या भाषेंत ग्रंथरचना करीत. संस्कृत विद्या ब्राह्मणेतरांस येत नव्हती हा प्रवाद खरा दिसत नाहीं. विज्ञानेश्वरानें व इतरांनीं जें एकी करण्याचें काम धर्मशास्त्रासंबंधानें केलें तेंच पुढें हेमाद्रीनें व सायनाचार्यानें इतर धार्मिक विषयांसंबंधानें केलें, म्हणजे अव्यव[illegible]स्थित बाबतींचे नियम बांधून दिले. हाच मार्ग पुढें चालवून भ[illegible]तील व दुसऱ्या पंडितांनीं काशी येथें पुष्कळ ग्रंथरचना केली, त्याचें [illegible] पुढें यथावकाश येईल.

१३. यादववंश.—महाराष्ट्रांत या यादववंशाचें माहात्म्य [illegible] आहे. यादवांचेच वंशज जाधव होत. हे यादव मूळचे मथुरेचे [illegible]

असून, त्यांचीं कित्येक घराणीं प्राचीन काळीं केव्हां तरी गुजराथेंत व महाराष्ट्रांत आलीं. हेमाद्रीच्या व्रतखंडांत ह्या घराण्याची हकीकत दिलेली आहे.

यादवांचे दोन वंश प्रसिद्ध आहेत. एक नासिकजवळ चन्द्रादित्यपुर ऊर्फ चांदवड येथें राज्य करीत होता, आणि दुसरा देवगिरि ऊर्फ दौलताबाद येथें झाला. पहिल्या वंशाची राजधानी श्रीनगर सेउणदेशांत होती. सुबाहु नांवाचा एक पराक्रमी यादव राजा उत्तर हिंदुस्थानांत झाला, त्याचा मुलगा दृढप्रहार ह्यानें प्रथम महाराष्ट्रांत प्रवेश करून आपलें राज्य स्थापिलें. दृढप्रहाराचा मुलगा सेउणचंद्र ह्यानें सेउणपुर शहर स्थापून, देशाचेंही नांव सेउणदेश असें ठेविलें. हें खानदेशाचें मुसलमान येण्याच्या पूर्वीचें नांव होय. देवगिरि शहर सेउणदेशाच्या उत्तर सरहद्दीवर होतें.

ह्या राजांची वंशावळ खालीं लिहिल्याप्रमाणें.—



सेउणचंद्राच्या पश्चात् त्याचा पुत्र धाडियप्पा व नातू भिल्लम हे अनुक्रमें गादीवर आले. पुढें श्रीराज, वड्डिग, धाडियस, भिल्लम वगैरे राजे यादव कुळांत निपजले. हा भिल्लम पराक्रमी असून, राष्ट्रकूट, चालुक्य, ठाण्याचे शिलाहार ह्या तत्कालीन राजवंशापासून त्याची उत्पत्ति झाली होती. भिल्लमानंतर वेसुगी, अर्जुन व भिल्लम (तिसरा) हे राजे झाले. भिल्लमानें चालुक्यवंशीय जयसिंहाच्या मुलीशीं लग्न लाविलें. पुढें सेउणचंद्र (दुसरा) हा पराक्रमी राजा झाला. त्यानें चालुक्य राजा विक्रमादित्य यास पुष्कळ मदत केली. पुढें परम्मदेव, सिंहराज ऊर्फ सिंघण, मल्लुगी, अमरगांगेय, गोविंदराज व भिल्लम (पांचवा) हे राजे या यादववंशांत निर्माण झाले. या भिल्लमानें चालुक्यांचें राज्य जिंकिलें त्यापूर्वी हे यादव चालुक्यांचे मांडलिक होते.

याप्रमाणें दृढप्रहरापासून पांचव्या भिल्लमापर्यंत बावीस राजांचीं नांवें दिलेलीं आहेत. सरासरीनें प्रत्येक कार्किर्दीस अठरा वर्षांचा अवधि गणिला असतां यादवांच्या ह्या पहिल्या वंशानें स. ७९५ पासून ११९१ पर्यंत ३९६ वर्षें राज्य केलें असें म्हणणें फारसें चुकणार नाहीं.

होयसल यादव (स. ११११—१३२७).—यादवांची एक शाखा द्वारसमुद्र येथें राज्य करीत होती. हें प्राचीन शहर हल्लींच्या म्हैसूर राज्यांत हलेबीड येथें होतें. त्या ठिकाणीं एक उत्कृष्ट मंदिर प्राचीन शिल्पकलेची साक्ष देत आहे. यादवांच्या ह्या शाखेस होयसल यादव असें नांव पडलें. त्यांचा पहिला राजा बित्तिदेव ऊर्फ बित्तिग ह्यानें द्वारसमुद्र शहर स्थापून तेथें स. ११११ पासून ११४१ पावेतों राज्य केलें. आरंभीं राजाचा आश्रय जैन धर्मास होता, आणि त्याचा प्रधान गंगराज ह्यानें पुष्कळ जैनमंदिरें बांधिलीं. परंतु रामानुजानें (१०१६-११३७) भक्तिमार्ग सुरू केला, त्याचा प्रभाव बित्तिदेवावर पडून तो वैष्णवधर्माचा उपासक बनला. त्यानंतर विष्णूचीं उत्कृष्ट मंदिरें त्यानें द्वारसमुद्र व इतरत्र बांधिलीं. त्यानें स्वतः आपलें नांवही विष्णुवर्धन असें धारण केलें. विष्णुवर्धनानें व त्याच्या अनुयायानीं होयसल यादवांची सत्ता पुष्कळच वाढविली. त्यांचा नातू वीरबल्लाळ हा फार पराक्रमी होता. त्यानें उत्तरेस देवगिरी पावेतों आपल्या राज्याचा विस्तार वाढविला. चालुक्यवंशी सोमेश्वर (चवथा) ह्याचा सेनापति ब्रह्मा म्हणून होता, त्यास काबीज

सोमेश्वराचें बहुतेक राज्य त्यानें जिंकिलें. पुढें सेउणदेशच्या यादववंशां-तील भिल्लम यानें वीरबल्लाळ यादव व सोमेश्वर चालुक्य ह्या दोघांचाही पाडाव करून आपल्या वंशाचें नवीन राज्य देवगिरि येथें स्थापन केलें, (स. ११८७). देवगिरि शहर भिल्लमानेंच वसवून तेथें आपली राजधानी केली. ह्याच भिल्लमाचा यादव वंश महाराष्ट्रांत पुढें प्रतापशाली झाला.

होयसल यादवांचा अंमल कृष्णेच्या दक्षिणेस बरेंच दिवस होता. पुढें मुसलमानांनीं तें राज्य स.१३२७त बुडविलें. (मुसलमानी रियासत पृ.१३६.)

यादवांची पुढील वंशावळ प्रथमच देणें इष्ट आहे.

मल्लुगी ( मालोजी ? )
|
१ भिल्लम ११८७–११९१
|
२ जैत्रपाल ऊ० जैतुगी ( ११९१–१२१० )
|
३ सिंघण सिंदराज ऊर्फ ( १२१०–१२४७ )
|
जैत्रपाल
|
- ४ कृष्ण ऊर्फ कन्हार किंवा कन्धार १२४७–१२६०
  - ६ रामचंद्र ऊर्फ रामदेव १२७१–१३०९
    - ७ शंकरदेव ( १३०९–१३१२ ) हरपाळदेव मेहुणा स. १३१८
    - भीमदेव ( बिंब ? ) (माहीम येथें राज्यकरी स. १३००)
- ५ महादेव ( १२६०–१२७१ )
  - आमण

१ मालोजी हें अलीकडील नांव मल्लुगीचा अपभ्रंश असावा. त्याचा मुलगा भिल्लम हा पहिला पराक्रमी यादव राजा झाला. 'प्रतापचक्रवर्ती' 'महाराजा-धिराज' इत्यादि विशेषणें त्यानें आपल्या नांवास जोडिलेलीं आढळतात.

भिल्लमाचा मुलगा जैत्रपाळ हा बापासारखाच पराक्रमी होता. 'समस्त-भुवनाश्रय' वगैरे भपकेदार नांवें त्यानें धारण केलीं. शंकर नांवाचा त्याचा सेनापति व दंडनायक होता. ज्योतिषी भास्कराचार्यांचा मुलगा लक्ष्मीधर हा जैत्रपाळाच्या पदरीं मुख्य पंडित होता. त्याचे संस्कृत ग्रंथ आहेत. जैत्रपाळास वेदाचें व तर्कशास्त्राचें चांगलें ज्ञान असून, तो मीमांसाही पढला होता.

आद्य मराठी कवि मुकुंदराज ह्याचा उदय जैत्रपाळाचे पदरीं झाला असला पाहिजे. विवेकसिन्धूच्या शेवटीं मुकुंदराजानें खालील मजकूर लिहिला आहे. 'नृसिंहाचा बल्लाळ, त्याचाकुमार जैत्रपाळ, तेणें करविला हा खेळ, ग्रंथरचनेचा.'

१४. सिंघण यादव (१२१०-१२४७).— जैत्रपाळाचा मुलगा सिंह-राज ऊ॰ सिंघण याचे कार्किर्दींत यादवांची सत्ता अतोनात वाढली. त्यानें कुंतल देश काबीज करून माळवा, गुजराथ, चेदी देशांतील छत्तिसगड, इत्यादि ठिकाणच्या राजांस जिंकिलें. पद्मनाल ऊर्फ पन्हाळा येथें शिलाहार वंशीं भोजराजा राज्य करीत होता. त्याचें राज्य सिंघणानें आपल्या राज्यास जोडिलें. कोल्हापूरच्या ताम्रलेखांत शिलाहारांचें नांव यापुढें येत नाहीं व यादवांचें येतें, यावरून शिलाहार वंशाची समाप्ति याच वेळेस झाली असावी हें उघड आहे.

सिंघणानें गुजराथेवर अनेक स्वाऱ्या केल्या. ह्या स्वाऱ्यांत खोलेश्वर नांवाचा मुद्गल गोत्री ब्राह्मण सिंघणाचा सेनापति होता. गुजराथेंत ह्या वेळेस वाघेल वंशाचा अंमल होता. हे वाघेल चालुक्य किंवा सोळंखी राजांचेच नातलग होते. खोलेश्वरानें ह्या वाघेल राजांचा अनेक वेळां पाडाव केला. कीर्तिकौमुदीचा कर्ता सोमेश्वर यानें अनहिलपट्टणचे राजे वाघेल चालुक्य व यादव ह्या राजांच्या युद्धांचें वर्णन दिलें आहे. गुज-राथचा वाघेल राजा लवणप्रसाद व त्याचा मुलगा वीरधवल यांनीं सिंघ-णाशीं तह करून त्यास परत लाविलें. दुसऱ्या स्वारींत खोलेश्वराचा मुलगा राम हा सेनापति होता. तो वीरधवलाचा मुलगा वीसलदेव याज-बरोबर लढत असतां मारला गेला. बिचण म्हणून सिंघणाचा दुसरा एक शूर सेनापति होता. त्यानें दक्षिण, कोंकण, व दाक्षिण महाराष्ट्र, हे दे[श] जिंकिले. त्या देशाचा कारभार तोच पाहत असे. हा बिचणही खोले[श्व]राचाच मुलगा होता. (विविधज्ञान वि. जुलई व ऑगस्ट १८९

त्याच जागीं सिंघणाविषयीं आणखी अशी हकीकत सांपडते, कीं तो राजा सातार्‍याचे आसपास मोठ्या सैन्यानिशीं पुष्कळ दिवस येऊन राहिला होता. सातारा जिल्ह्यांतील खटाव तालुक्यांत मायणी गांवीं दोन ओढ्यांच्या संगमावर संगमेश्वर म्हणून शंकराचें देवालय आहे, तें ह्यानें बांधिलें. ह्यानेंच भूषणगड किल्ला बांधून माण तालुक्यांतील सिंघणापूर गांव वसविलें. सिंघणापूरचा महादेव हें अनेक मराठा कुलांचें आवडतें देवस्थान आहे. या ठिकाणीं त्याची छावणी पुष्कळ दिवस होती, असा अदमास आहे. कोल्हापूरच्या भोजराजाशीं लढत असतां ही छावणी सिंघणानें वसविली. दक्षिण प्रांतावर यादवांची भक्ति विशेष होती. सिंघणदेव मोठा धार्मिक असून त्याला देवळें बांधण्याचा नाद फार होता.

एकंदरींत सिंघण हा त्या काळीं फार पराक्रमी राजा झाला. 'पृथ्वीवल्लभ,' 'विष्णुवंशोद्भव' इत्यादि विशेषणें त्यानें धारण केलीं होतीं. सिंघणाच्या ध्वजावर सुवर्णगरुडाचें चिन्ह असे. सिंघण व त्याचे पूर्वी झालेले दोन राजे यांच्या मुख्य कारभार्‍यास 'श्रीकरणाधिप' अशी संज्ञा होती. हा कारभार सोधल नांवाच्या गृहस्थाकडे होता; पुढें कांहीं दिवसांनीं तो हेमाद्रीस प्राप्त झाला. सोधलाचा मुलगा शार्ङ्गधर यानें 'संगीतरत्नाकर' नांवाचा ग्रंथ सिंघणाचे कार्किर्दीत लिहिला. भास्कराचार्यांचा नातू लक्ष्मीधराचा मुलगा चांगदेव हा ह्या दरबारीं मोठा ज्योतिषी होता. भास्कराचार्यांचा भाऊ श्रीपति म्हणून होता; त्याचा मुलगा गणपति. ह्या गणपतीचा मुलगा अनंतदेव हाही मोठा ज्योतिषी होता. भास्कराचार्यांचें सर्व घराणें ज्योतिषांत निपुण होतें; आणि त्यास यादव राजांचा उत्कृष्ट आश्रय होता. खानदेशांत चाळीसगांव तालुक्यांत पाटणा येथें चांगदेवानें भास्कराचार्यांचा 'सिद्धांतशिरोमणि' शिकविण्याकरितां मोठी पाठशाळा घातली; आणि अनंतदेवानें तेथेंच शेजारीं भवानीचें देऊळ बांधिलें (स. १२२२). सिंघणाचा पराक्रमी व विद्वान् मुलगा जैत्रपाळ बापाचे अगोदरच मरण पावला होता.

कृष्णदेव (स. १२४७–१२६०).—हाही मोठा पराक्रमी झाला; ...ने गुजराथेवर स्वार्‍या केल्या. जनार्दन याचा मुलगा लक्ष्मीदेव या ...चा त्याचा मुख्य हुशार सल्लागार होता. कृष्णानें पुष्कळ यज्ञ केले;

कित्येक कोंकणस्थ व देशस्थ ब्राह्मणांस ह्याचे वेळेस गांवें इनाम मिळालीं. त्यांत पटवर्धन, घैसास, पाठक इत्यादि नांवें आढळतात. जह्लण म्हणून लक्ष्मीदेवाचे पश्चात् कृष्णाचा मुख्य मंत्री होता. तोही विद्वान् व हुशार असून, 'सूक्तिमुक्तावलि' नामक त्यानें लिहिलेला सुभाषित ग्रंथ उपलब्ध आहे. वेदान्तसूत्रांवरचा टीकाकार अमलानंद हा कृष्णाच्या दरबारीं होता. एकंदरींत त्या वेळेस संस्कृत विद्येची भरभराट होती.

महादेव ( सन १२६० १२७१ ).—महादेव हा कृष्णाचा धाकटा भाऊ. ह्यानें तैलंगण, गुजराथ, कोंकण ह्या देशांवर स्वाऱ्या केल्या. सोमेश्वर म्हणून कोंकणचा शिलाहारवंशी राजा ठाणें येथें राज्य करीत होता, त्यास ठार मारून कोंकणप्रांत महादेवानें यादवांचे राज्यास जोडिला. ही लढाई समुद्रावरही चालली, आणि सर्व गलबतांसह सोमेश्वर बुडून मरण पावला. सोमेश्वराचे पुढें शिलाहार वंशाचे ताम्रपट ठाण्याकडे उपलब्ध नाहींत. कोंकण प्रांतावर पुढें यादवांनीं आपले दंडनायक नेमिले. महादेवाच्या वेळीं यादवांचे राज्यास 'सेउणदेश' असें नांव होतें. कारण देवगिरिनगर सेउणदेशांत दण्डकारण्याचे सीमेवर होतें, असें महादेवाचे वेळचें वर्णन आहे. आसपासच्या सर्व राजांस महादेवाचा वचक विशेष असल्यामुळें त्यास 'चक्रवर्ती' अशी संज्ञा होती. काश्यप गोत्री केशव नांवाच्या ब्राह्मणाकरवीं आप्तोर्याम यज्ञ महादेवानें केला होता. हेमाद्रि हा महादेवाचा 'श्रीकरणाधिप' होता. प्रथम हा उत्तर कोंकणांतील साष्टी प्रांताचा दंडनायक होता.

रामदेव ऊर्फ रामचंद्र ( स. १२७१–१३०९ ).—रामदेव हा कृष्णाचा मुलगा. रामदेवाची कीर्ति मोठी आहे. भार्गवगोत्री कृष्ण नांवाच्या ब्राह्मणाकडे कोंकणचा कारभार होता. ह्या कृष्णब्राह्मणाचा आजा पद्मनाथ सिंघणाचे वेळेस त्याच प्रांताचें काम करीत होता. अच्युतनायक नांवाचा दुसरा एक ब्राह्मण अशाच प्रकारच्या मोठ्या हुद्यावर होता. स. १२७१ त रामचंद्रदेवानें सत्तावन ब्राह्मणांस तीन गांव इनाम दिले. त्या इनामाच्या शर्ती अशा होत्या कीं, त्या ब्राह्मणांनीं व त्यांच्या वंशजांनीं त्याच गांवांत राहिलें पाहिजे; त्यांनीं आपलीं इनामें गहाण टाकतां नये; त्या गांवांत वेश्यांस राहूं देऊं नये; जुवा खेळूं नये; हत्यारें वापरूं नयेत; व सर्वांनीं आपला वेळ सत्कर्म करण्यांत घालवावा. यावरून रामदेवाची सन्मार्गप्रवृत्ति दिसून येते.

महाराष्ट्रांतील शेवटचा वैभवशाली राजा रामदेवच होय. त्याच्या कार्किर्दीच्या अखेरीस मुसलमानांनीं दक्षिणेंत प्रवेश करून वैभवशिखरास पोंचलेलें यादवांचें राज्य धुळीस मिळविलें. ती हकीकत मुसलमानांचे भागांत आली आहे. ( मुसलमानी रियासत पृ. १२०, १२१ ). सन १२९३ च्या डिसेंबरांत अल्लाउद्दीन कऱ्हामाणिकपुराहून निघाला. जानेवारींत त्यानें देवगिरीस वेढा दिला. हा वेढा २५ दिवस चालला; आणि ता. ५ फेब्रुवारी १२९४ शनिवारीं रामदेवाचें राज्य गेलें आणि तो दिल्लीचा अंकित झाला. (भा. इ. सं. मं. अहवाल.) अलाउद्दीन अपार संपत्ति घेऊन दिल्लीस परत गेला. सन १३०७ त त्याचाच सरदार मलीक-काफूर यानें पुनः देवगिरीवर स्वारी करून रामदेवास पकडून दिल्लीस नेलें. तेथून तो सहा महिन्यांनीं सुटून आला, तेव्हांपासून मुसलमानांस द्यावयाची खंडणी तो नियमितपणें पाठवीत असे. रामदेवराव सन १३०९ या वर्षीं मरण पावला.

...न प्रचारात आला.

यादवांच्या अमदानींत आधुनिक ... यादवांच्या वेळेपासून अर्वाचीन काळास कोणत्याही दृष्टीनें पाहिलें भाषा, जुने प्रकार, जुने धर्मपंथ, सर्व जाऊन त्यांच्या सुरुवात होते ...नत्व उत्पन्न झालें. याच दृष्टीनें स० १००० हा अर्वाचीन काळाचा आरंभ म्हणून या इतिहासांत धरण्यांत आला आहे. ज्ञानदेव, आणि त्याचे दोघे बंधु व एक बहीण हीं चार विद्वद्रत्नें रामदेवाच्या वेळेस निर्माण झालीं. तसेंच हेमाद्रि, बोपदेव, चांगदेव, मुकुंदराज, शार्ङ्गधर, हे विद्वान् पुरुषही यादवांचे अमदानींत झाले. ज्ञानदेवानें आपल्या ग्रंथांत रामदेवाचें वर्णन मोठ्या गौरवानें व रस-भरित वाणीनें केलें आहे. ‘ तेथ यदुवंशविलास, जो सकळकळा-निवास, न्यायातें पोषी क्षितीश, श्रीरामचंद्र ’. हा उल्लेख ज्ञानेश्वरींत स० १२९० चा आहे. ह्यावरून रामदेव हा शांत, दयाळु व धर्मशील राजा होता. शौर्यादि गुण त्याच्या ठिकाणीं फारसे नसावे. तसेंच परिस्थिति ओळखून राज्याचा बंदोबस्त ठेवण्याविषयीं त्यानें दक्षता ठेविली नाहीं. उत्तरहिंदुस्थानांतील मुसलमानांच्या कृत्यांची त्यास फारशी वार्ता नव्हती. अल्लाउद्दिनचा सर्व घाट आरंभापासून कपटपूर्ण होता, तरी एकाएकीं संकट आलें असतां, त्याचें निराकरण एवढ्या मोठ्या राज्यांतून होऊं

नये, आणि मुसलमानांपासून आपलें राज्य यादवांस पुन: परत घेतां येऊं नये, ह्यावरून राज्याच्या बंदोबस्ताकडे रामदेवाचें लक्ष असावें तस नव्हतें असें दिसतें.

रामदेवाचा मुलगा शंकरदेव यानें दिल्लीस खंडणी पाठविण्याचें बंद केल्यावरून मलीक काफूरनें स. १३११ त पुनरपि दक्षिणेंत स्वारी करून, शंकरदेवास ठार मारिलें; आणि यादवांचें राज्य खालसा केलें (स.१३१२). अला-उद्दीनच्या मृत्यूनंतर दिल्लीस बंडाळी सुरू झाली. ती संधि साधून रामदेवाचा जांवई हरपालदेव यानें देवगिरींतून मुसलमान अंमलदार घालवून दिले; आणि यादवांचें राज्य पुनः स्थापण्याचा विचार चालविला. त्यावरून मुबारीक खिलजीनें स्वत: दक्षिणेंत येऊन, हरपालास पकडून जिवंत सोलून ठार मारिलें. त्या वेळेपासून दक्षिणेंतील महाराष्ट्रीयांचें स्वातंत्र्य नष्ट होऊन, ते सर्वस्वी मुसलमानांचे अंकित झाले.

मलिक काफूरच्या स्वारीसंबंधानें खालील पत्र सरस्वतीमंदिरांत छापलें होतें. हें पत्र शके १२३४ चैत्र शु० १३ (एप्रिल स.१३१२) चें आहे.

' कृष्णाजी विश्वनाथ पाठक केंदूरकर यांस गोपाळ भट्ट दामोदर भट्ट जोशी यांचें पत्र कीं, दिल्लीपति अला-उद्दीन यांचे हस्तक मलिक काफूर यांचा मुक्काम सेनेसह गोदातीरीं आहे. त्यांनीं धर्माचा अत्यंत छळ चाल-विला आहे. आळंदीसही त्यांचे सैनिक उपसर्ग देतीलसें वाटतें. त्यांनीं श्रीच्या समाधीस उपद्रव देऊं नये, म्हणून ग्रामस्थ लोकांनीं सहस्र मुद्रिका सुवर्ण देऊन संधि करण्याचा बहुत प्रयत्न केला, परंतु निर्गम होत नाहीं. इतक्यांत गोपाळभट्ट जोशी यांचे ज्येष्ठ बंधु शंकरभट आळंदीस आले. त्यांनीं चतुराईनें यवनी मुल्लाचा वेष धरून यवन सैनिकांची समजूत केली. अशा रीतीनें संकटाचा परिहार झाला.' (पत्राची भाषा अर्वाचीन दिसते !)

१५. हेमाद्रि.—हेमाद्रि नांवाचा प्रसिद्ध विद्वान् गृहस्थ महादेव व रामदेव यांचा मुख्य प्रधान म्हणजे ' श्रीकरणाधिप ' होता. तो वत्सगोत्री यजुर्वेदी ब्राह्मण कामदेवाचा मुलगा. त्याच्या आजाचें नांव वासुदेव, आणि पणज्याचें वामन. त्याजकडे करणाधिपत्य म्हणजे सर्व कामांची मुखत्यारी होती. त्यानें धर्मशास्त्रावर अनेक ग्रंथ लिहिले आहेत. त्यांत कित्येक ठिकाणीं या यादववंशाची हकीकत दिली आहे. ती उत्कृष्ट पद्यांत रचिली असून, तिजवरून हेमाद्रीचें कवित्व व यादवांचें वैभव निदर्शनास येतें.

हेमाद्रि हा ब्राह्मणांचा पुरस्कर्ता असून, अनेक विद्वानांस त्याचा आश्रय असे. तो रणांगणांत शूर, राजनीतिनिपुण परंतु इतरत्र धार्मिक व देवपरायण असा होता. राज्यांत त्याचें महत्त्व विशेष होतें. त्याचा मोठा ग्रंथ 'चतुर्वर्ग-चिंतामणि' म्हणून आहे. त्या ग्रंथाचे व्रतखंड, दानखंड, तीर्थखंड व मोक्ष-खंड असे चार भाग आहेत. परिशेषखंड म्हणून आणखी एक पांचवें प्रकरण त्यास जोडलेलें आहे. हा एवढा ग्रंथ त्यानें स्वतःच लिहिला असेल असें नाहीं. त्या कामीं अनेक पंडितांची मदत त्यानें घेतली असली पाहिजे. बोपदेव नांवाचा दुसरा एक विद्वान् पुरुष त्याचा जोडीदार होता. त्यानें लिहिलेले 'मुक्ताफल' व 'हरिलीला' हे ग्रंथ प्रसिद्ध आहेत. बोपदेव हा केशवनामक वैद्याचा मुलगा व धनेशाचा शिष्य. केशव व धनेश हे ब्राह्मण वऱ्हाडांत वर्धेच्या कांठीं सार्थ नामक गांवीं राहत असत. 'मुग्धबोध' नांवाचें प्राकृत भाषांचें संस्कृतांत लिहिलेलें व्याक-रण याच बोपदेवानें लिहिलेलें आहे. शिवाय बोपदेवाचे कित्येक वैद्यक ग्रंथही प्रसिद्ध आहेत. हेमाद्रीनें राजप्रशस्ति म्हणून एक प्रकरण लिहिलें आहे, तो यादववंशाचा एक इतिहासच होय. हेमाद्रीचे ग्रंथ कलकत्त्यास छापले आहेत. त्याच्या ग्रंथांच्या राष्ट्रीय उपयोगाचा विचार पुढें येईल.

महाराष्ट्रांत हेमाद्रि हा हेमाडपंत या नांवानें प्रसिद्ध आहे. त्यानें मोडी लिपीची सुरवात केली, तीच अद्यापि चालत आहे. हेमाडपंती घरें बांध-ण्याची तऱ्हाही प्रसिद्ध असून पंढरपूरचें देऊळ तिचा एक मासला आहे. हेमाद्रीनें पुष्कळ ठिकाणीं देवळें, तलाव वगैरे बांधून लोकांच्या सोयी केल्या.

हेमाद्रि विद्वान, बुद्धिमान व कर्तृत्ववान पुरुष होता. हरएक बाबतींत सुधारणा व व्यवस्थित पद्धति निर्माण करण्याविषयीं त्याचा विशेष कटाक्ष होता. रा. राजवाड्यांनीं कित्येक जुनीं हेमाडपंती मेस्तकें प्रसिद्ध केलीं आहेत. जमाखर्चाच्या व हिशेबाच्या पद्धति, राज्यकारभाराच्या अनेक शाखांची व्यवस्था, व्यवहारांतील शिरस्ते इत्यादि प्रकरणें ह्या मेस्तकांतून हेमाद्रीनें ठरवून दिलीं आहेत. हेमाडपंती घरबांधणी व जलद लिहिण्याची मोडी लिपी ह्या गोष्टी अशाच व्यवस्थेच्या दर्शक होत. अर्थात् त्या वेळच्या मानानें हेमाद्रीची व्यवहारनिपुणता व व्यवस्थेची आवड हे गुण विशेष आदरणीय दिसतात. अनेक व्यवहारांची, समाजाची व राज्याची व्यवस्था सुरळीत चालण्यास काय उपाय केले पाहिजेत, यांत त्याचें मन नेहमीं

निमग्न असे. स्वत: विद्वान असल्यामुळें विद्वानांचा उपयोग कसा करून घ्यावा, हें त्यास कळत होतें; आणि भरपूर राजाश्रय, आणि सुदैवानें अर्ध्या अधिक शतकभर हातांत राहिलेली सत्ता, यांचा उपयोग करून, चिरस्मरणीय अशीं कित्येक मोठीं कामें त्यास करतां आलीं.

मात्र राज्याच्या बंदोबस्ताची तजवीज त्यास करितां आली नाहीं. तो लढवय्या नव्हता, आणि एखाद्या अप्रतिम सेनानायकाचें त्यास साह्य नव्हतें. नाहीं तर रामदेवाचें राज्यवैभव शिखरास चढलें आहे असा सर्वत्र समज असतां, तें मुसलमानांच्या स्वारीपुढें क्षणार्धात मोडून पडलें नसतें. राज्याच्या बंदोबस्ताचा विचार हेमाद्रीस सुचला नाहीं, हें त्याच्या इतर कीर्तीस हीनत्व आणणारें आहे. हेमाद्रीचा मृत्युकाळ उपलब्ध नाहीं. अलाउद्दीनच्या स्वारीच्या प्रसंगीं तो हयात असावा, असें दिसत नाहीं.

१६. कोल्हापूरचे शिलाहार (स. ९४९–१२०५).—शिलाहारांचीं तीन घराणीं होतीं. ते आपली उत्पत्ति विद्याधर गंधर्वापासून मानीत. एक वंश तगर येथें राज्य करीत होता. हें तगर शहर पूर्वी फार विख्यात होतें. निजामशाहींतील धारूर तेंच तगर असें कित्येक मानितात. शिलाहार हे राष्ट्रकूटांचे मांडलिक होते. वरील तीन वंश उत्तर कोंकणांत पुरी येथें, दक्षिण कोंकणांत खारेपाटणनजीक, व कोल्हापूर येथें, असे राज्य करीत. ह्या सर्वांपैकीं कोल्हापूरचा वंश विशेष भरभराटींत होता; आणि त्याचा अंमल कऱ्हाड, मिरज व कोल्हापूर एवढ्या टापूवर आणि पुढें पुढें दक्षिण कोंकणावरही होता. कोल्हापुरचें आरंभींचें नांव करवीर व पुढें 'कोल्लापुर' असें होतें. जतिग, गण्डरादित्य, विजयार्क, भोज वगैरे कित्येक त्या वंशांत मोठमोठे राजे झाले. यादववंशी राजा सिंघण यानें शिलाहारांचें कोल्हापूरचें राज्य जिंकून आपल्या राज्यास जोडिलें. पद्मनालदुर्ग–पन्नालदुर्ग-म्ह० पन्हाळा हें शिलाहारांचें राहण्याचें मजबूत ठिकाण होतें. खिलिगल म्ह० खेळणा ऊ० विशाळगड हा किल्ला भोजशिलाहारानें स. १२००त बांधिला. 'श्रीमहालक्ष्मीलब्धवरप्रसाद' ही पदवी शिलाहार राजे आपल्या नांवास जोडीत असत. यावरून ते कोल्हापूरच्या महालक्ष्मीस भजणारे होते. ते पौराणिक आणि वैदिकधर्म पाळीत असत; तरी जैन लोकांसही त्यांचा आश्रय पुष्कळ होता. दोनही धर्मांविषयीं

त्यांच्या मनांत इतका समभाव होता कीं, गण्डरादित्यानें तीन देवळें बांधलीं, आणि त्यांत शंकर, बुद्ध व अर्हत् ( जैन ) यांच्या मूर्ति ठेविल्या. सिंघणानें शिलाहारांचें राज्य जिंकून यादवांचे अंमलाखालीं आणिलें. शिलाहार हेच हल्लीचे शेलार. ह्यांचीं घराणीं दक्षिणेंत अनेक आहेत. शेलारवाडी गांव मूळचें शिलाहारांचें असावें, असें त्यांच्या नांवावरून दिसतें. कऱ्हाडे ब्राह्मणांचें नांव शिलाहारांच्या देणग्यांत आढळतें. कशेळी गांव कऱ्हाडे भागवतांस शिलाहारांनीं अग्रहार म्हणून दिला होता.

स. १२६० त महादेव यादवानें उत्तरकोंकण प्रांत शिलाहारांपासून जिंकून देवगिरीचे राज्यास जोडिला. तेव्हांपासून अच्युतनायक व कृष्ण ह्या नांवाचे दोन अधिकारी ह्या प्रांतावर यादवांचे अंमलदार म्ह० दंडनायक होते. स. १२९४ त अलाउद्दीनकडून देवगिरीचा पाडाव झाल्यावर रामदेवाचा दुसरा मुलगा भीमदेव ( बिंबदेव ? ) आपले राजगुरूंचीं आणि सूर्यवंशीं व सोमवंशी पाठारे प्रभूंचीं कित्येक कुटुंबें बरोबर घेऊन माहीम येथें येऊन राहिला. हल्लीं मुंबईतील अत्यंत जुनीं कुटुं० पाठारे प्रभूंचीं व त्यांचे गुरु यजुर्वेदी ब्राह्मणांचीं आहेत, त्यांचें मूळ ह.. वरील हकीकतींत सांपडतें. बिंबराजा स० १३०० च्या सुमारास साष्टीबेटावर राज्य करीत होता. (Bombay City Gazetteer, Vol II.)

१७. समालोचन.—महाराष्ट्रांत आर्यांची वसती झाल्या वेळेपासून स० १३०० पावेतों ह्या देशावर कोणकोणतीं राज्यें झालीं आणि त्यांची सामान्य स्थिति कशी होती, ह्याचें येथवर वर्णन झालें. पहिला राजवंश शातवाहन किंवा शालिवाहन हा उदयास आला. त्या वंशानें इ. स. पूर्वी ७३ पासून सन २१८ पर्यंत सुमारें तीनशें वर्षें पैठण येथें राहून महाराष्ट्रावर राज्य केलें. पुराणांतले आंध्रभृत्य राजे हेच असावेत, असा तर्क आहे. मध्यंतरीं शक नांवाच्या लोकांचा अंमल सुमारें पन्नास वर्षेंपर्यंत महाराष्ट्रावर होता. शातवाहनांनंतर सुमारें तीनशें वर्षेंपावेतों अभीर व राष्ट्रकूट ह्या दोन वंशांचा थोडाबहुत अंमल महाराष्ट्रावर होता. तसेंच ह्या काळांत भोज, रठे किंवा राष्ट्रिक, व महारठ्ठे वगैरे क्षत्रिय वंश देशभर पसरले होते. राष्ट्रकूट, रठकूड व राठोड हेही त्याच प्रकारचे होत. शालिवाहनांनीं त्यांस चांगलें दाबांत ठेविल्यामुळें ते पुढें आले नाहींत; परंतु शालिवाहनांची सत्ता गेल्यावर त्यांनीं ठिकठिकाणीं राज्यें स्थापन केलीं.

सारांश, तिसऱ्या शतकापासून सहाव्या शतकाचे मध्यापर्यंत ह्या राष्ट्रकूट लोकांचीं राज्यें महाराष्ट्रांत होतीं. सहाव्या शतकाचे आरंभापासून इ. स. ७५३ पर्यंत सुमारें दीडशें वर्षे वातापीपुर ऊर्फ बादामी येथें चालुक्य-वंशी राजे राज्य करीत होते. सन ७५३ पासून ९७३ पर्यंत राष्ट्रकूटांचा अंमल महाराष्ट्रावर होता. त्यांचें राजधानी शहर मान्यखेट ऊर्फ निजाम शाहींतील मालखेड हें होतें. तदनंतर चालुक्यांचा दुसरा वंश राज्यारूढ झाला. ह्या वंशाचा पहिल्या चालुक्य वंशाशीं कांहीं संबंध होता, असें दिसत नाहीं. ह्या वंशानें सन ९७३ पासून ११८९ पर्यंत राज्य केलें. निजामशाहींतील कल्याण शहर त्याची राजधानी होती. पुढें यादवांची सत्ता प्रबळ झाली. सन ११८७ पासून १३१८ पर्यंत महाराष्ट्रानें राज्य यादववंशाकडे होतें. यादववंशाची समाप्ति झाल्यावर मुसलमानांची सत्ता स्थापन झाली. सन १३१८ पासून १३४७ पर्यंत दिल्लीच्या सुलतानांचा प्रत्यक्ष अंमल ह्या देशावर होता. सन १३४७ त बहामनी राज्याची स्थापना झाली. ह्या राज्याची व त्याच्या शाखांची संपूर्ण माहिती पूर्वी मुसलमानांच्या भागांत आली आहे. बहामनी राज्याच्या शाखांचा अंमल सुरू असतां आमच्या मराठशाहीची प्राणप्रतिष्ठा झाली. एवंच, सरासरीनें महाराष्ट्राच्या प्राचीन इतिहासांतलि खालील राजवंश ध्यानांत धरण्यासारखे आहेत.

इ. स. पू. ७०० पर्यंत आर्यांचा महाराष्ट्रांत प्रवेश नव्हता.

इ. स. पू. ७००—इ. स. पू. ३५० आर्यांचा प्रवेश.

इ. स. पू. ३५०—इ. स. पू. ७३ आर्यांच्या महाराष्ट्रांत वसाहती.

इ. स. पू. ७३—इ. स. २१८ शालिवाहन किंवा आंध्रभृत्य.

इ. स. २१८—इ. स. ५५० अभीर, राष्ट्रकूट वगैरे.

इ. स. ५५०—इ. स. ७५३ पूर्व चालुक्य.

इ. स. ७५३—इ. स. ९७३ राष्ट्रकूट.

इ. स. ९७३—इ. स. ११८९ उत्तर चालुक्य.

इ. स. ११८९—इ. स. १३१८ यादववंश.

इ. स. १३१८—इ. स. १३४७ दिल्लीच्या सुलतानांचा अंमल.

इ. स. १३४७—इ. स. १५२६ बहामनी राज्य.

इ. स. १५२६—इ. स. १६५० बहामनी राज्याच्या शाखा.

सोळाशें वर्षांचा हा कालावधि फारच मोठा आहे. केवळ राजवंशांच्या नामावळीपुरता येथवर त्याचा विचार झाला. परंतु सामाजिक व इतर बाबतींचा विहंगमदृष्टीनें विचार केल्याशिवाय मराठी राज्यस्थापनेचीं कारणें चांगलीं समजणार नाहींत. स. १२५० पासून १६५० पावेतों देशाच्या स्थितीचें सामान्य चित्र तत्कालीन कवींच्या व संतांच्या लेखांत दिसून येतें. तेव्हां प्रथम संतकवींच्या कृतींचा अल्प वृत्तान्त देऊन, नंतर तत्कालीन स्थितीचें पर्यालोचन करण्याचा उद्देश आहे.

---

## प्रकरण दुसरें.

### महाराष्ट्रीय संतकवींची कामगिरी.

१. संतकवींचे वृत्तान्त.
   (क) स. १२००-१३००.
   (ख) स. १३००-१४००.
   (ग) स. १४००-१५००.
   (घ) स. १५००-१६००.
   (ङ) स. १६००-१७००.
   (च) स. १७००-१८००.

२. महानुभाव पंथ.

३. मराठी व हिंदुस्थानी संतांचे अन्योन्य संबंध.

४. भागवत धर्माचीं स्थित्यंतरें.

५. संत व संस्कृत ग्रंथकार यांचा विरोध.

६. संतांच्या कामगिरीचा अंदाज.

१. संतकवींचे वृत्तान्त.—देवगिरीच्या यादवांचा पाडाव झाल्यावर मुसलमानी अंमल स्थापन झाला, त्याची हकीकत मुसलमानी रियासतींत आली आहे. पुढें महाराष्ट्रांत शिवाजीनें मराठ्यांचें राज्य स्थापन केलें, त्याचीं कारणें समजण्यास चौदाव्यापासून सतराव्या शतकापर्यंतचा काल फार महत्त्वाचा आहे. ह्या कालांतील देशस्थितीची जितकी माहिती मिळेल, तितकी पुढील इतिहासाची स्पष्टता होणार आहे. देशांतील प्रचलित प्रश्नांची व घडामोडींची चर्चा तत्कालीन वाङ्मयांत दिसून येते. कवी हे राष्ट्राचे नायक होत; आणि कवींच्या वाणी म्हणजे राष्ट्रीय भाषा होय. अर्थात् वरील तीनशें वर्षांचें वाङ्मय तपासून पाहिलें असतां बरीच माहिती मिळते. संतांच्या राष्ट्रीय कामगिरीसंबंधानें आजपावेतों पुष्कळ ऊहापोह झाला आहे आणि पुढेंही होईल. त्यांत अनेक महत्त्वाचे प्रश्न येतात आणि मतभेदही पुष्कळ आहे. ह्या चर्चेचा संकलित गोषवाराः

एकत्र दिल्यानें त्या काळच्या इतिहासाची संगति बरीचशी जुळते. आज-पर्यंत प्रसिद्ध झालेली माहिती व अधिकारी विद्वानांचे अभिप्राय येथें संगतवार दिले आहेत, त्यावरून वाचकांनीं आपापल्या अनुभवाप्रमाणें मतभेदांच्या प्रश्नांचा निर्णय करावा. ही चर्चा समजण्यासाठीं प्रथम मुख्य मुख्य संतांचा व कवींचा अल्प वृत्तान्त देणें जरूर आहे. त्यांचीं संपूर्ण चरित्रें येथें द्यावयाचीं नाहींत. त्यांचे काल, ग्रंथांचीं नांवें व इतिहासो-पयोगी जरूर तो तपशील मात्र दिला आहे.*

श्रीपति.— इसवी सनाच्या अकराव्या शतकांत, सन १०४० च्या सुमारास, श्रीपति नांवाच्या गृहस्थानें ज्योतिर्गणितावर मराठींत लिहिलेला एक ग्रंथ उपलब्ध झाला आहे. हा श्रीपति नेवासें येथें झाला. या वेळचे वैद्यकावरचे वगैरे कित्येक ग्रंथ हल्लीं सांपडत आहेत.

(क) इ. स. १२००–१३००

पुंडलीक.—हा मोठा भगवद्भक्त होता. त्यानें स. १२२८ त पंढरपूरच्या विठोबाची स्थापना केली. महाराष्ट्रांतील भक्तिमार्गाचा हा आद्यभक्त होय. यानें ग्रंथ लिहिलेले नाहींत.

मुकुंदराज (स. १२००–१३००). जैत्रपाळ (११९१–१२१०) यादवांचे वेळेस मुकुंदराज झाला. पयोष्णी ऊर्फ वैनगंगा नदीच्या तीरीं जोगाईचें अंबें येथील राहणारा. परमामृत व विवेकसिन्धु हे त्याचे दोन मोठे ग्रंथ व कांहीं किरकोळ प्रकरणें उपलब्ध आहेत. वाणी शुद्ध, प्रौढ व रसाळ आहे. 'उन्नगल्यें सासऱ्यां अतां मज माहेरासि न्याहो,' हें प्रसिद्ध प्रेमळ पद मुकुंदराजाचें होय. हाच मराठींतला पहिला भक्त कवि. त्यानें लिहिलेले ग्रंथ जसेच्या तसेच हल्लीं उपलब्ध आहेत कीं नाहींत, हा संशय आहे. नाहीं तर तत्कालीन मराठी भाषेचें स्वरूप चांगलें कळून आलें असतें. पुष्कळ जुन्या ग्रंथांची भाषा लेखकांनीं नकल करितांना अर्वाचीन केली आहे हें जुन्या कवींच्या संबंधानें ध्यानांत ठेविलें पाहिजे.

---

* भा. इ. सं. मं. चे सर्व अहवाल, रा. चांदोरकर यांनीं प्रसिद्ध केलेली संतकवींची सूची, व ग्रंथमाला, सरस्वतीमंदिर वगैरे मासिकांतून व इतरत्र व्याख्यानांतून वगैरे प्रसिद्ध झालेली माहिती जमेस धरून पुढील वृत्तें लिहिलीं आहेत.

चांगदेव.—ह्या नांवाचे पुरुष अनेक झाले. चांगावटेश्वर हा ज्ञानदेवाचा समकालीन मुक्ताबाईचा शिष्य. मृत्यु स. १२९९. याच्या हरिपाठाचे अभंग वगैरे कित्येक कविता आहेत.

| | |
|---|---|
| निवृत्तिनाथ ( १२६९–१२९८ ) | हीं सर्व भावंडे आळंदी येथील विठ्ठलपंत नांवाच्या ब्राह्मणाचीं मुलें. आईचें नांव रखमाबाई ह्यांचा जन्म आपेगांव येथें झाला. |
| ज्ञानदेव ( १२७१–१२९६ ) | |
| सोपानदेव ( १२७३–१२९७ ) | |
| मुक्ताबाई ( १२७७–१२९७ ) | |

विठ्ठलपंत संसार सोडून संन्यास घेऊन काशीस जाऊन राहिला. पुढे एका सत्पुरुषाच्या उपदेशानें पुन: घरीं येऊन संसार करूं लागल्यावर त्यास हीं मुलें झालीं. तेव्हां संन्याशाचीं हीं मुलें ग्रामवासी ब्राह्मण जातींत घेईनात. मुलांच्या मुंजी न होतां ते तसेच वाढूं लागल्यामुळें रखमाबाईस दु:ख होऊं लागलें. इकडे विठ्ठलपंत मुलांची काळजी सोडून पुनरपि काशीस जाऊन राहिला. हीं मुलें सर्वच अलौकिक बुद्धिमान, सदाचरणी, व ईश्वरभक्तिपरायण होतीं. अध्यात्मविद्येंत त्यांची गति अकुंठित होती. निवृत्तिनाथानेंच प्रथम आपल्या भावंडांस अध्यात्मविद्या शिकविली. ज्ञानदेव आपल्या ह्या वडील बंधूस गुरुत्वभावानें नमन करितो निवृत्तिनाथानें कांहीं ग्रंथरचना केली असावी. त्याची समाधि त्र्यंबकेश्वरीं असून, तेथें पौष वा। ११ स यात्रा भरत असते. शिंद्यांच्या घराण्यांतील बायजाबाईनें निवृत्तिनाथाच्या समाधीचा जीर्णोद्धार केला.

हीं सर्व भावंडें पैठणास आलीं, आणि तेथून पुढें आळंदी येथें येऊन राहिलीं. आळंदी येथें असतांना मुक्ताबाईनें वटेश चांगदेवास उपदेश केला, आणि एदलाबादेनजीक जलसमाधि घेतली. सोपानदेवाची समाधि सासवडास आहे. सोपानदेव व मुक्ताबाई यांची अभंग, पदें वगैरे कविता आहे.

सर्व भावंडांत ज्ञानेश्वर हा विशेष बुद्धिमान होता. पैठण येथें त्यानें आपल्या बुद्धिमत्तेची व साधुत्वाची साक्ष सर्वांस पटवून दिली. नेवाशास असतां भावार्थदीपिका नांवाची भगवद्गीतेवरील टीका त्यानें लिहिली. तिलाच ज्ञानेश्वरी असें म्हणतात. अमृतानुभव, योगवासिष्ठ वगैरे आणखी त्याचे पुष्कळ चांगले ग्रंथ आहेत. वेदान्तावर संस्कृत भाषेंत अनेक मोठमोठे ग्रंथ होते, त्यांचें सार त्यानें आपल्या उत्कृष्ट वाणीनें मराठींत आणून त्यांत स्वत:च्या ज्ञानाची व अनुभवाची भर घातली. ज्ञानेश्वराचे ग्रंथ

पुष्कळ दिवस अप्रसिद्ध होते. पुढें तीनशें वर्षांनीं एकनाथानें ते दुरुस्त करून प्रसिद्धीस आणिले. अर्थात् ज्ञानेश्वराच्या मूळच्या ग्रंथांत, व एकनाथाच्या प्रतींत भाषेचें स्वरूप भिन्न आहे. अलीकडे ज्ञानेश्वरीची मूळ प्रत उपलब्ध झाली असून, तिच्यावरून ज्ञानेश्वराच्या वेळीं मराठी भाषेचें स्वरूप कसें होतें, हें चांगलें कळून येतें. मराठी भाषेंतला आद्य ग्रंथ ज्ञानेश्वरीच होय. त्याची भाषा प्रौढ, रसाळ, व कमावलेली आहे. त्यावरून असें दिसतें कीं, ज्ञानेश्वरापूर्वी शेंकडों वर्षें ही भाषा उपयोगांत होती, आणि तिच्यांत ग्रंथही झाले असले पाहिजेत. ज्ञानेश्वराचें चरित्र व त्याचे ग्रंथ यांचें काळजीपूर्वक अध्ययन केलें असतां तत्कालीन भाषा, व समाज यांचें ज्ञान होतें. ग्रंथांची भाषा जुनी असून, हल्लींच्या वाचकांस बरीच दुर्बोध आहे. मात्र ज्ञानेश्वरीचें अर्वाचीकरण झालेलें आहे. भा. इ. सं. मंडळाच्या व मंडळांतील सभासदांच्या संग्रहास ज्या पन्नास पाऊणशें ज्ञानेश्वरीच्या प्रती आहेत, त्यांची कालानुक्रमवार मांडणी केली म्हणजे ज्ञानेश्वरीच्या भाषेंतलि रूपांचें होत चाललेलें अर्वाचीकरण दृष्टोत्पत्तीस येतें. रा. राजवाडे यांनीं संपादलेली प्रत सर्वांत जुनी आहे. कारण तींतील रूपें चंगदेवाच्या शिलालेखांतील ( शक ११२८ ) किंवा पंढरपूर येथील शिलालेखांतील ( शक ११८९ ) रूपांसारखी येथून तेथून आहेत. तदनंतरच्या प्रतींत रूपांत आस्ते आस्ते फेरफार झाला असलेला दिसतो. प्रायः नकलकार स्वकालीन रूपें आपण केलेल्या प्रतींत ज्ञानतः किंवा अज्ञानतः नमूद करतो.

इतक्या अल्प वयांत या भावंडांनीं वेदान्तविषयांत अप्रतिम नैपुण्य संपादन केलें. ह्यावरून हीं अवतारी माणसें होतीं असें समजतात. ज्ञानदेवाची समाधि आळंदीस असून, तेथें कार्तिक वद्य एकादशीस यात्रा भरते.

तेराव्या शतकांतील आणखी कवि किंवा ग्रंथ प्रसिद्ध नाहींत. ह्या शतकांत ग्रंथकर्तृत्व व साधुत्व हे दोनही गुण समसमान दृष्टीस पडतात.

( ख ) स. १३००-१४००.

चौदाव्या शतकांत कवित्वापेक्षां साधुत्व विशेष दृग्गोचर होतें. नामदेव, त्याचा बाप दामाशेटी व आई गोणाई, तसेंच सांवतामाळी ( १२९५ जुलई ), गोरा कुंभार ( स. १३०० ), विसोबा खेचर ( १३०९ ), कूर्मदास ( १३१० ), नरहरि सोनार (१३१४ ), बंका महार (१३१९),

चोखामेळा (१३४०), रोहिदास चांभार ही सर्व विठोबाची भक्त मंडळी, चौदाव्या शतकांतील आहे. ह्यांचे काल निश्चित झालेले नाहींत. नामदेवाचा काल स. १२७० असा सांपडतो; म्हणजे तो ज्ञानदेवाचा समकालीन होता. परंतु त्याच्या अभंगाच्या भाषेवरून पाहिलें असतां तो ज्ञानदेवानंतर सुमारें शंभर वर्षांनीं झाला असावा, असें दिसतें. (Dr. Bhandarkar's Saivism and Vaishnavism ).

**नामदेव शिंपी.**—हा संत मंडळांतील विख्यात भक्त पंढरपुरास राहत असे. आठ वर्षांपासूनच तो ईश्वरभक्तींत निमग्न झाला. तो अन्नाहार सोडून केवळ दूध प्राशन करी. त्यानें केलेल्या चमत्कारांच्या अनेक गोष्टी ग्रंथांतरीं वर्णिल्या आहेत. अभंग वृत्त नामदेवानें प्रचारांत आणिलें. शतकोटी अभंग करण्याचा त्याचा संकल्प होता असें म्हणतात. त्याचे आईबाप; त्याची बायको राजाई; नारायण, महादेव, गोविंदा आणि विठोबा असे त्याचे चार मुलगे; नाऊबाई त्याची बहीण; व निंबाई त्याची मुलगी; आणि लाडाई, गोडाई, येसाई व साकराई अशा त्याच्या चौघी सुना; आणि त्याची कुणबीण जनी, ( गंगाखेड येथील दमा नांवाच्या भगवद्भक्ताची कन्या ), ही सर्व मंडळी शतकोटी अभंगांच्या रचनेंत गुंतलेली होती. हे सर्व अभंग उपलब्ध नाहींत; व वरील संकल्पांत अतिशयोक्तीचाही भाग असेल. तथापि हें सर्व घराणें भगवद्भक्तिपरायण व लोकांस सन्मार्ग दाखवून देण्यांत व्यापृत होतें. ज्ञानदेव अगर नामदेव यांच्याप्रमाणें सर्वच कुटुंब ईश्वरसेवेस वाहिलेलें असणें ही गोष्ट ऐतिहासिक दृष्ट्या विशेष स्मरणीय आहे. नामदेवाच्या संकल्पांत चार लक्ष अभंग कमी झाले, ते तुकारामानें पूर्ण केले अशी आख्यायिका आहे. नामदेव कीर्तन करीत असे. त्याचे अभंग साधे व प्रेमळ आहेत; वाणी रसाळ आणि चित्ताकर्षक आहे. ज्ञानाची व स्वार्थत्यागाची थोरवी, मूर्तिपूजेचा निषेध इत्यादि विषयांवर नामदेवाचीं वचनें अत्यंत मार्मिक व रसाळ आहेत. उदाहरणार्थ,—

नाचूं कीर्तनाचे रंगीं । ज्ञानदीप लावूं जगीं ॥ परेहुनी परतें घर ।
तेथें राहूं निरंतर ॥ सर्वांचें जें अधिष्ठान । तेंचि माझें रूप पूर्ण ॥
पाषाणदेवाची करिती जे भक्ति । सर्वस्वा मूकति मूढपणें ॥
प्रस्तराचा देव बोलतो भक्तातें । सांगते ऐकते मूर्ख दोघे ॥

देशांचें माहात्म्य जें का वर्णिताती। आणि म्हणविती तेणें भक्त ॥
परंतु ते जन पामर जाणावे। त्यांचे नायकावे बोल कांहीं ॥
द्वादशीचे ठायीं झाला उपदेश। देवावीण ओस स्थळ नाहीं ॥
तो देव नामया हृदयीं दाविला। खेचरानें केला उपकारू हा ॥

नामदेवाची समाधि पंढरपुरास देवाच्या महाद्वाराजवळ असून तेथील पायरी नामदेवाची म्हणून प्रसिद्ध आहे.

**गोरा कुंभार.**—हा भगवद्भक्तींत पुरा निष्णात असून सर्व संतमंडळांत पोक्त असल्यामुळें यास गोरोबा काका किंवा नुसतें काका म्हणत. हा जसा भगवद्भक्त तसाच स्पष्टवक्ताही होता. हा बालेघाटांवर तेरढोक म्हणून गांव आहे, तेथील राहणारा. हा रात्रंदिवस विठोबाचें भजन करण्यांत निमग्न असे. त्यानें केलेले अभंग संत लोक म्हणत असतात. नामदेवाच्या डोक्यावर मडकीं घडण्याचें थापटणें मारून गोऱ्या कुंभारानें त्यास गुरूस शरण जाण्यास लाविलें, अशी कथा आहे. उद्धव चिद्घन यानें याचें ओंवीबद्ध चरित्र मराठींत लिहिलें आहे. त्याचें देहावसान पन्नास वर्षांचा असतां पंढरपूर मुक्कामीं झालें.

**चोखा मेळा.**—हा पंढरपूरचा वतनदार महार परम भगवद्भक्त होता. नामदेवाच्या पायरीच्या डाव्या बाजूस ह्याच्या समाधीचा दगड आहे.

**रोहिदास चांभार.**—हा कबिराचा समकालीन ( पंधरावें शतक ), कृष्णभक्त व महापरोपकारी होता.

**नरहरि सोनार.**—हा प्रथम लिंगाईत शिवभक्त असून पुढें विठोबाचा भक्त बनला.

**कूर्मदास.**—हा पैठण येथें राहणारा ब्राह्मण, जन्मतः पंगु व थोटा होता. त्याची समाधि लउळ येथें आहे.

सन १३००–१६०० च्या दरम्यान विठ्ठलभक्तीची विलक्षण लाट महाराष्ट्रांत उसळली होती. केवळ जातिहीनतेमुळें अनेक सत्पुरुषांचा छळ होऊन त्यांनीं भक्तीच्या जोरावर आपल्या छलकांस हरविलें, आणि ईश्वरास सर्व जाति सारख्या प्रिय आहेत, ही गोष्ट सिद्ध केली. ह्या भक्तमंडळीचीं अभंग, पदें वगैरे कविता प्रेमळ आहे.

(ग) स. १४००–१५००.

पंधराव्या शतकांत कवित्व व साधुत्व दोन्ही जोरांत होतीं. चवदाव्या शतकाप्रमाणेंच ह्या वेळेसही अनेक भगवद्भक्त प्रसिद्धीस आले. त्यांपैकीं पुष्कळांनीं आपला प्रभाव मुसलमान राजांवरही बसविला. ह्या शतकांत दत्ताचा नवीन अवतार सुरू होऊन, त्याचे पुरस्कर्ते कित्येक विद्वान् पुरुष निपजले. श्रीपाद श्रीवल्लभ (१४३०) व त्याचा शिष्य नृसिंह सरस्वती (मृ. १४९८.) ह्यांनीं दत्तोपासना सुरू केली. दत्तावतार भागवतांत सांगितलेला आहे. वरील दोन स्वामींनीं त्याचें नवीन स्वरूप औदुंबर येथें सुरू केलें. बहामनी राजांच्या दुष्कृत्यांना ह्या दत्तोपासकांनीं बराच अवरोध केला, आणि त्यांजवर आपली छाप बसविली.

ह्या काळांतील कविता अलीकडे थोडी उपलब्ध होऊं लागली आहे. चोंभा नांवाचा एक कवि ह्या काळीं झाला. कित्येकांच्या मतें चोंभा १४ व्या शतकांत म्हणजे ज्ञानेश्वरानंतर थोड्याच अवधीनें झाला. हा जातीचा ब्राह्मण असून, ह्यानें उषाहरण नांवाचा एक ओंवीबद्ध ग्रंथ लिहिला आहे. भागवत व हरिवंश वाचून त्यानें उषाहरण लिहिलें. हा ग्रंथ अद्यापि समग्र सांपडलेला नाहीं. ज्ञानदेवानंतर दोनशें वर्षेपर्यंत पूर्वीं एकही मराठी कवि उपलब्ध नव्हता. ह्या काळांतील बरीच कविता शोध केला असतां सांपडेल अशी आशा आतां वाटूं लागली आहे.

दामाजीपंत (स. १४७५). हा ह्या शतकांतील मोठा भगवद्भक्त होय. दुर्गादेवीच्या दुष्काळांत त्यानें सरकारी धान्याचीं कोठारें लुटविलीं; तेव्हां राजाकडून त्यास शिक्षा होत असतां पंढरपुरच्या विठोबानें विठूमहाराचें रूप घेऊन धान्याची किंमत सरकारांत भरून दिली, ही दामाजीची हृदयद्रावक कथा सुप्रसिद्ध आहे. दुर्गादेवीचा हा दुष्काळ सन १४६८पासून १४७५ पर्यंत पडला होता, असें रा. राजवाडे यांनीं एका अस्सल पत्रावरून सिद्ध केलें आहे. (सरस्वतीमंदिर). ह्यावरून दामाजीचा काळ ठरवितां येतो. कांहीं पदें वगैरे दामाजीची कविता आहे.

बहिरंभट्ट उर्फ बहिरा जातवेद (स. १४००) नांवाचा एक संत कवि ह्याच शतकांतला आहे. याची स्त्री कांहीं दुरुक्ति बोलल्यावरून रागानें तो मशिदींत जाऊन मुसलमान झाला. मुसलमानांनीं त्यास त्रास दिल्यामुळें तो नागपंथी सिद्धनागेश ह्यास शरण गेला; तेव्हां सिद्धनागे-

शनें त्यास अध्यात्मविद्या शिकविली. पुढें भागवताच्या दशमस्कंदाव[र] त्यानें ओवीबद्ध टीका लिहिली. हा ग्रंथ फार मोठा आहे.

( ब ) स. १५००-१६००.

हें सोळावें व पुढील सतरावें शतक म्हणजे मराठी भाषेचा अत्यंत भरभराटीचा काळ होय. ह्या काळांत अनेक उत्कृष्ट ग्रंथकार निपजले. त्यांत पूर्वींच्या मानानें साधुत्व विशेष कमी नव्हतें, परंतु कवित्वाचा विस्तार व जोर हे पुष्कळच वाढले. भानुदास, जनार्दन स्वामी, एकनाथ, मृत्युंजय ब्रह्मणि, सरस्वतीगंगाधर, महालिंगदास, मुधेश्वचांगा, त्रिंबकस्वामी, दासोपंत, विष्णुदासनामा, वगैरे कित्येक मोठे नामांकित जुने कवि ह्या सोळाव्या शतकांतले आहेत. ह्या सर्वांत एकनाथ हाच प्रमुख असल्यामुळे त्याचें वृत्त प्रथम देतों.

एकनाथ ( १५२८–१५९९ ).—एकनाथाचा पणजा भानुदास हा मोठा साधु स. १५१४ चे सुमारास झाला होता. त्यानें विजयनगरच्या राजापासून पांडुरंगाची मूर्ति परत आणिली. भानुदासाचा मुलगा चक्रपाणि, व नातू सूर्याजीपंत. सूर्याजीपंताचा मुलगा एकनाथ. त्याच्या आईचे नांव रुक्मिणी. हा ऋग्वेदी ब्राह्मण पैठणचा राहणारा. आईबाप लहानपणींच वारल्यानें एकनाथाचें संगोपन आजा चक्रपाणि यानें केलें. एकनाथ हा सदाचारसंपन्न, नैष्ठिक, क्षमाशील, भाक्तिमान आणि विरक्त असा होता. त्याची बुद्धि फार तीव्र होती. वेदाध्ययन झाल्यावर पुराणें वगैरे ऐकून त्याला व्युत्पत्तिज्ञान चांगलें झालें. देवगिरि येथील जनार्दनपंत नामक एका शंकरमतानुयायी गृहस्थास एकनाथानें आपला गुरु केलें. ह्या गुरुकृपेचें फल म्हणून त्यास श्रीदत्ताचा प्रसाद झाला. पुढें त्यानें ब्रह्मविद्येचें अध्ययन केलें, आणि सर्व हिंदुस्थानभर तीर्थयात्रेनिमित्त प्रवास केला. त्यानें केलेल्या चमत्कारांच्या अनेक गोष्टी वर्णिलेल्या आहेत, त्यावरून त्या वेळीं त्याची मान्यता विशेष होती असें दिसून येतें. तो कीर्तन करीत असे. त्याचे अनेक ग्रंथ प्रसिद्ध आहेत. त्यांत भागवतावरील टीका, रुक्मिणीस्वयंवर, रामगीता, आनंदलहरी, हस्तामलकावर टीका, भावार्थरामायण, एकनाथीभागवत, स्वात्मबोध हे मुख्य आहेत. शिवाय कांहीं अभंग, पदें वगैरे आहेत. भाषा साधी व चित्ताकर्षक असून तींत अप्रसिद्ध शब्द नाहींत. ज्ञानदेवाची कविता

प्रथम एकनाथानेंच प्रसिद्ध केली. मराठी भाषेचें त्या वेळचें नमुनेदार स्वरूप एकनाथाच्या ग्रंथांत पाहवयास मिळतें. भाविक लोक त्याच्या ग्रंथांचें पारायण करितात. रुक्मिणीस्वयंवर हा त्याचा ग्रंथ अत्यंत ओजस्वी असून त्या काळीं विशेष स्फूर्तिदायक झाला.

एकनाथाच्या स्त्रीचें नांव गिरिजाबाई असें असून तिजपासून हरिपंडित म्हणून एक मुलगा व लीलाबाई नांवाची एक मुलगी अशीं दोन मुलें त्यास झालीं. ह्या लीलाबाईचा मुलगा सुप्रसिद्ध मुक्तेश्वर कवि होय.

**जनार्दनस्वामी** ( स. १५०४–१५५८ ).—एकनाथाचा गुरु हा मुसलमानी राज्यांत देवगिरिचा किल्लेदार व मुत्सद्दी पुरुष होता. श्रीदत्तस्तुति वगैरे ह्याचे कित्येक ग्रंथ आहेत.

**मृत्युंजय**.—ब्रह्माणि नांवाचा एक विद्वान पुरुष सातार प्रांताकडचा राहणारा मोठा कवि व साधु होता. बदेरच्या दरबारांत त्याची चहा विशेष होती. महंमूदशहा बहामनी ( १४८२–१५१८ ) ह्यास मृत्युंजयानें विवेक सिंधूची पोथी दिली. अद्वैतप्रकाश, गुरुलीला, अनुभवामृत, प्रकाशदीप, स्वरूपसिद्धि वगैरे त्याचे अनेक ग्रंथ उपलब्ध आहेत.

**सरस्वती गंगाधर**.—प्रसिद्ध गुरुचरित्राचा कर्ता, सोळाव्या शतकाच्या उत्तरार्धांत झाला. ह्याचा गुरु नृसिंह सरस्वती हा दत्तोपासक असून त्याचा गुरुचरित्र हा रसाळ ग्रंथ महाराष्ट्रांत घरोघर वाचला जातो.

**मुधेश चांगा**.—हा साधु पुरुष सोळाव्या शतकाच्या आरंभींच झाला. बहामनी सुलतान पराक्रमी महंमदशहा ( २ रा, १४६३–१४८१ ) ह्यानें पंढरपुरच्या विठोबाचें देवालय पाडिलें होतें, तें ह्या चांगदेवानें शहाकडून पुनः बांधविलें. शके १४१७ ज्येष्ठ शु० ७ स चांगदेवानें पुणतांब्यास समाधि घेतली.

**महालिंगदास** ( स. १५६५ ).—हा एक निराळ्याच प्रकारचा ग्रंथकार असून त्याची माहिती अलीकडे थोडी उपलब्ध झाली आहे. हा खानदेशांत चाळीसगांव तालुक्यांत वाडें येथें राहत असे. त्यास संस्कृत चांगलें येत होतें. त्याचा सिंहासनबत्तिशी हा ग्रंथ प्रसिद्ध असून त्यांत राजनीति प्रतिपादन केली आहे, असें स्वतः ग्रंथकार म्हणतो. म्लेंछसेवा करण्याबद्दल त्यानें ब्राह्मणांचा निषेध केला आहे, तसेंच वर्णाश्रमधर्म

पाळावा ह्याबद्दल त्याचा कटाक्ष असून स्वदेश व स्वधर्म ह्यांजविषयीं त्याचे उल्लेख मोठे मार्मिक व अभिमानपूर्ण आहेत. सिंहासनबत्तिशीचा शक १४८७ त्यानें दिला आहे.

त्रिंबकस्वामी.—ह्यानें 'बालबोध' नांवाचा ग्रंथ लिहिला आहे. त्यांत त्यानें मराठी भाषेबद्दल विलक्षण अभिमान व्यक्त केला आहे.

दासोपंत.—( १५७८–१६१५ ). ह्या दत्तसंप्रदायी कवीचा ग्रंथसंग्रह प्रचंड असून अलीकडे त्याची माहिती बाहेर येत आहे. वास्तविक हा सतराव्या शतकांतीलच म्हटला पाहिजे. त्याचे वडील बहामनी राज्यांत नोकर होते. सेवेंत अंतर पडल्यावरून मुलास ओलीस ठेवून ते बेदरहून परत आले. दासोपंत कैदेंत असतां त्यास तेथील लोकांनीं मुसलमान करण्याचें ठरविलें. श्रीगुरुदत्ताचा धांवा केल्यावर दत्तानें त्याची सुटका केली. दासोपंताची समाधि व मठ जोगाईचे अंब्यास आहेत. सवालाख गीतार्णव व सवालाख पदार्णव एवढा ह्याचा ग्रंथसमूह मराठींत आहे; आणि तितकाच संग्रह संस्कृतांतही आहे.

ज्ञानेश्वरीनंतर एकनाथाचे काळापर्यंत भाषेंत कसकसा फरक होत गेला हें समजण्यास चोंभा, महालिंगदास वगैरे वरील कित्येक कवींचा उपयोग चांगला होईल.

( ङ ) स. १६००–१७००.

सतराव्या शतकांतील कवि महाराष्ट्र भाषेंतील केवळ मुकुटमणि होत. ह्या वेळीं साधुत्व कायम होतेंच, पण कवित्वास मात्र पूर्ण भर आला होता. मुक्तेश्वर, तुकाराम, रामदास व रामदासी कवि, वामन पंडित, रघुनाथ पंडित वगैरे कित्येक प्रमुख नांवें ह्या शतकांतलीं असून तीं बहुतेक महाराष्ट्राच्या परिचयाचीं आहेत. कित्येक अपरिचित नांवेंही अलीकडे उपलब्ध होत आहेत. उदाहरणार्थ,—

मुद्गलकवि ( समाधि स. १५९८ ).—ह्याचें नांव कृष्णदास मुद्गल. अनंतसुत मुद्गल तो कदाचित् हाच असेल. रामायण, रुक्मिणीस्वयंवर वगैरे ह्याचे कित्येक ग्रंथ सरस आहेत. रामायणापैकीं युद्धकांडच बहुधा प्रसिद्ध असून, तें शिवाजीच्या प्रत्येक किल्ल्यावर वाचलें जात असे असें म्हणतात. तत्कालीन समाजशिक्षणांत अशा विषयांस प्राधान्य होतें.

**विष्णुदासनामा** (स. १५९५ चा सुमार).—महीपतीनें मुक्तेश्वराबरोबर ह्याचा उल्लेख केला आहे. मुक्तेश्वरानें भारताचीं चार पर्वें केलीं; आणि बाकीचीं ह्या विष्णुदासानें लिहिलीं. दोघांनीं मिळून भारत संपूर्ण केलें; शिवाय आणखी पुष्कळ प्रकरणें ह्याच्या नांवावर मोडलीं जातात.

**नामापाठक केंदुरकर.**—म्हणून दुसरा एक कवि बहुधा ह्याच वेळेचा असावा. चंद्रहासकथा, भरतभेट वगैरे त्याचे कित्येक ग्रंथ सरस आहेत.

**जनजसवंत** (हयात १६०८).—हा बागलाणांत मुल्हेरचा राहणारा. याचा बाप जनार्दन, गुरु तुलशीदास तापीतीरीं स. १६१७ च्या सुमारास ह्यानें समाधि घेतली. पदें दोहरे वगैरे याची हिंदी कविता लोकांच्या परिचयाची आहे.

**रंगनाथस्वामी मोगरेकर** (स. १६०८).—नाशकाजवळ गोदातीरीं. भगवद्गीतेवरील टीका, चिदानंदलहरी, योगवासिष्ठसार हे याचे ग्रंथ आहेत.

**निरंजन पंढरपुरकर** (१६३७–१७२७).—कऱ्हाड येथील नृसिं व कृष्णाबाई यांचे चिरंजीव. हा गाणपत्य होता. ह्याचा गणेशगीता नांवाचा ओवीबद्ध ग्रंथ आहे.

**तुकाराम** (स. १५६८–१६४९).—हा पुण्यापासून नऊ कोसांवर देहू म्हणून गांव आहे तेथें जन्मला. ह्याचें मूळचें आडनांव मोरे असून, आंबळे किंवा आंबीले असेंही नांव चालत असे (भा. इ. मं. अ. १८३५ ले. ८९) बहुधा हा मराठा क्षत्रिय असून व्यापारधंदा करीत असल्यामुळें, त्यास वाणी असें म्हणूं लागले. बापाचें नांव बोल्होबा आणि आईचें नांव कनकाई. हीं दोघे व तुकारामाचे पूर्वज मोठे भगवद्भक्त होते. बोल्होबास सावजी, तुकाराम आणि कान्होबा असे तीन मुलगे झाले. सावजी विरक्त असल्यामुळें बोल्होबानें प्रपंचाचा भार तुकारामावर टाकला. तेव्हां त्याचें वय १३ वर्षांचें होतें. तो सत्रा वर्षांचा असतां आईबाप मरण पावले. वडील भावाची बायको मरून तो तीर्थयात्रेस निघून गेला. त्याचा स्वतःचा संतु नांवाचा मुलगा मरण पावला. इतक्या संधीस देशांत महर्गता होऊन गुरेंढोरें मेलीं व तुकारामाच्या निर्वाहास साधन राहिलें नाहीं. त्याची थोरली बायको दमेकरी असून, तो एकवीस वर्षांचा असतां ती दुर्भिक्षतेमें मरण पावली. शेवटीं दुसरी बायको जिजा-

बाई व धाकटा भाऊ व त्या भावाची बायको, इतकीच मंडळी कुटुंबांत राहिली. अशीं अनेक दुःखें कोसळल्यामुळें तुकारामाला विलक्षण उपरति उत्पन्न झाली आणि सर्वसंगपरित्याग करून तो ईश्वरभक्तींत निमग्न झाला. नामदेवाचे अभंग, कबिराचीं पदें, ज्ञानेश्वरी, एकनाथी भागवत, इत्यादि ग्रंथांचा पाठ त्यानें चालविला. लोकांकडे येणें होतें, त्याचे रोखे त्याजपाशीं होते, ते सर्व त्यानें इंद्रायणी नदींत बुडविले. पुढें तो कीर्तन करूं लागला. कीर्तन करीत असतां आपल्या प्रेमळवाणीनें तो श्रोत्यांचीं अंतःकरणें सद्गदित करून सोडीत असे. तो नियमानें पंढरीची वारी करी. त्याची बायको स्वभावानें कठोर होती. तिचा त्रास चुकविण्यासाठीं देहूपासून दोन कोशांवर भांबनाथाचा डोंगर आहे, तेथें तो जाऊन बसत असे. पुढें त्यास कविता करण्याची स्फूर्ति होऊन त्यानें पुष्कळ अभंग केले. तुकारामाचें वैराग्य मोठें कडकडीत होतें. तो अत्यंत निस्पृह, कोणाचीही भीड न धरणारा, व स्पष्टवक्ता असा होता. तो वेद व ब्राह्मण यांस श्रेष्ठ मानीत असे. एकंदरींत इतका विरक्त व स्वोदाहरणानें सर्व जगास कित्ता घालून देणारा पुरुष कलियुगांत आजपर्यंत क्वचित् निर्माण झाला असेल, हें निर्विवाद आहे. तशांत तो ब्राह्मणादिकांप्रमाणें विद्या शिकलेला नव्हता; परंतु निश्चयाचे जोरावर त्यानें सर्व संत मंडळांत अग्रेसरत्व मिळविलें. सतत व्यासंगानें तो बहुश्रुत होऊन संस्कृत सुद्धां चांगलें समजूं लागला होता. सर्व संतांच्या ग्रंथांची त्यास चांगली ओळख होती. बायकोनें त्याचा छळ केलेला पाहून प्रसिद्ध ग्रीक साधु सॉक्रेटीस याची आठवण होते; आणि त्या दोघांचें बऱ्याच गोष्टींत साम्य आहे. त्याचा अत्यंत छळ झाला असतां त्यानें आपली शांत वृत्ति व भगवद्भक्ति कायम राखिली. तुकारामाच्या चरित्रांतही अनेक अद्भुत चमत्कार वर्णिले आहेत. परंतु तो स्वतः आपल्या अंगीं अद्भुत शक्ति कांहीं एक नाहीं, इतर सामान्य व्यक्तींप्रमाणेंच आपण आहों, असें मोठ्या आवेशानें प्रतिपादन करी. तुकारामाच्या प्रसादिक वाणीनें नामदेवाचे अभंग मागें पडले. पुष्कळ ब्राह्मणही त्याच्या भजनीं लागले. पण त्यांस त्यानें उपदेश म्हणून केला नाहीं. शिवाजीराजानें तुकारामाची भेट घेतली आणि त्यास पुष्कळ द्रव्य देऊं केलें. पण तुकाराम एका पैशासही शिवला नाहीं. त्यानें शिवाजीस रामदासाकडे जाण्यास सांगितलें. शिवाजी लांबीच्या

पल्ल्यावरून मुद्दाम तुकारामाचें कीर्तन ऐकण्यास येत असे. त्याला उपदेश-पर भेट म्हणून तुकारानें कांहीं अभंग पाठविले ते प्रसिद्ध आहेत. तुकारामास काशी, भागीरथी, व गंगा अशा तीन मुली; आणि महादेव, विठोबा व नारायण असे तीन मुलगे होते. पैकीं नारायण गर्भांत असतां तुकाराम वारला. हा नारायण पुढें उत्कृष्ट कीर्तन करूं लागला. या नारायणबुवाचें कीर्तन व भक्ति पाहून, त्यास शिवाजीनें चार गांव इनाम करून दिले. त्याची समाधि देहू येथें असून तेथें फाल्गुन वद्य प्रतिपदे-पासून षष्ठीपर्यंत यात्रा जमून मोठा उत्सव होतो. तुकारामाच्या प्रसिद्ध अभंगवाणीचा प्रसाद या देशांत आबालवृद्धांस माहीत आहे. किंबहुना महाराष्ट्रांतील सामान्य जनसमूहावर व विशेषतः खालच्या वर्गांतील अशि-क्षित लोकांवर तुकारामाच्या उपदेशाचा ठसा जितक्या जोराचा उमटला आहे, तितका दुसऱ्या कोणत्याही साधूचा उमटलेला नाहीं. अद्यापि लाखों लोक तुकारामाच्या अभंगांचें भजन सदैव प्रेमानें करितात. ' ज्ञान-देव तुकाराम ' ' ज्ञानोबा तुकाराम, ' ही भजनी लोकांची आरोळी महा-राष्ट्रांत घरोघरीं व मंदिरांतून अद्यापि जोरानें ऐकूं येते. दिवसा काबाडकष्ट केल्यावर रात्रीं ही भजनी आरोळी सर्व लोकांस शांतिसुख देत आहे.

रामदास ( सन १६०८–१६८२. चैत्र शु॥ ९ शके १५३०—माघ वा॥ ९ शके १६०३ ).—गोदातीरीं जांबगांव येथें सूर्याजीपंत ठोसर म्हणून देशस्थ आश्वलायन ब्राह्मण कुळकर्णी राहत होता. त्याचा हा कनिष्ठ पुत्र. वडील पुत्राचें नांव गंगाधरपंत. त्याच्या आईचें नांव राणू-बाई. सूर्याच्या प्रसादानें पुत्र झाला म्हणून त्याचें नांव प्रथम नारायण असें ठेविलें. पुढें तो रामाची उपासना करूं लागल्यावरून त्यास रामदास-स्वामी हें नांव पडलें. त्यानें स्त्रीपरिग्रह केलाच नाहीं. लहानपणापासून वैराग्यशील असून तो रामभक्ति करीत असे. त्याजवर रामाचा अनुग्रह होता म्हणून त्यास मारुतीचा अवतार असें समजत. ह्यानें नाशकाजवळ टाक-ळीस तपश्चर्या केली, आणि पुष्कळ वर्षेपर्यंत सर्व हिंदुस्थानभर फिरून तीर्थयात्रा केली. पुढें कृष्णातीरीं येऊन ग्रंथलेखन व उपदेश करूं लागला. डोंगरावरील घळींत बसून तो तपश्चर्या व ग्रंथलेखन करी. त्याचीं अनेक चरित्रें लिहिलेलीं आहेत. त्यांतील अद्भुत चमत्कार वर्जिले, तरी रामदा-साच्या उपदेशानें महाराष्ट्रावर कांहीं काळ पावेतों बराच परिणाम घडला

यांत संशय नाहीं. रामदासानें रामदासी पंथ स्थापन करून त्याचे मठ सर्व दक्षिण हिंदुस्थानांत ठिकठिकाणीं स्थापिले. असे मठ एक हजारांवर होते. उद्धव, कल्याण, जयराम, बयाबाई शहापूरकर, आकाबाई, वेणूबाई वगैरे अनेक मंडळी रामदासाच्या शिष्यमालिकेंत होते. रामदासानें श्लोक, अभंग, पदें वगैरे पद्यरचनेंत अनेक ग्रंथ केले ते सुप्रसिद्ध आहेत. दासबोध, रामायण, मनाचे श्लोक, सगुणनिर्गुणध्यान, पंचीकरण, मानसपूजा व आणखी पुष्कळ ग्रंथ त्यानें रचिलेले आहेत. त्यांत दासबोध हाच ग्रंथ मुख्य असून त्याचें पठण महाराष्ट्रांत बहुधा सर्वत्र चालू आहे. हा पुरुष पराकाष्ठेचा निःस्पृह व स्पष्टवक्ता होता. वीस वर्षांचें वय असतां त्यास तपःसंपन्नता, वैराग्य व ज्ञान प्राप्त झालें. तुकाराम व रामदास हे समकालीन असून त्या दोघांत प्रेमभाव होता. चाफळ येथें रामदासाचा मुख्य मठ असून परळीच्या किल्ल्यावर तो राही, त्या किल्ल्यास 'सज्जनगड' असें ह्मणतात. रामदासाची समाधि याच किल्ल्यावर आहे. रामदासाच्या उपदेशाची व विचारांची दिशा इतर संतांहून भिन्न होती. सर्व समाजास एकीच्या बंधनांनीं एक करून त्याजकडून राष्ट्रकार्य करवावें असा उद्योग त्यानें महाराष्ट्रांत केला. सर्व कृत्य रामाच्या नांवानें करावें, राम सर्वांचें कल्याण करील, रामनामांत विलक्षण शक्ति आहे, आणि अशा निश्चयानें जे उद्योग करतील, ते वाटेल तें काम तडीस नेण्यास समर्थ होतील. अशाच भावनेनें 'समर्थ' हें सार्थ नांव रामदासानें स्वीकारिलें. रामदास विद्वान, वैराग्यशील व सत्पुरुष होता. तो देशकालज्ञ असून प्रवासानें व अनुभवानें देशाची अंतःस्थिति प्रत्येक बाबतींत त्यास उत्कृष्ट कळली होती. कडकडीत तपश्चर्येच्या योगानें आणि निःस्पृहतेच्या जोरावर सर्व समाजावर त्यानें आपली छाप उत्कृष्ट बसविली होती. छत्रपतीपासून तों रंकापर्यंत सर्व इसम त्याच्या भजनीं असत.

मराठ्यांच्या राज्यस्थापनेशीं रामदासाच्या उपदेशाचा संबंध असल्यामुळें त्या भागाचें व रामदासाच्या उद्योगाचें निरूपण पुढें स्वतंत्र करावयाचें आहे.

आकाबाई ही कऱ्हाडकर रुद्राजीपंत देशपांडे यांची कन्या व रामदास स्वामींची शिष्या. हिचा नवरा लहानपणींच मरण पावला. बापाच्या अनुमतानें तिनें समर्थांचा उपदेश घेतला. ही मोठी एकनिष्ठ गुरुभक्त

होती. परळी किल्ल्यावरील रामदासस्वामींची समाधि व देऊळ हिनें बांधिलें. ही समर्थांच्या मागून चाळीस वर्षांनीं वारली.

**वेणूबाई** ( सन १६२५–१६७८ ).—ही रामदासस्वामींची दुसरी एक शिष्या. ही मिरज येथील देशपांड्याची कन्या. लग्नाच्याच दिवशीं नवरा मरून तिला वैधव्य प्राप्त झालें. पुढें समर्थांचा उपदेश घेऊन ती अध्यात्मविद्येंत परिपूर्ण झाली. हिनें आपलें आयुष्य रामभजनांत घालविलें. 'निवृत्तिराम' नांवाचा ग्रंथ हिनें मराठींत केला व अनेक पदेंही केलीं.

**विठ्ठलकवि बीडकर** ( स.१६०८–१६८१ ).—हा बीड शहरानजीक गौरीपूरचा राहणारा ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मण. ज्योतिर्विदग्रणी भास्कराचार्य व हा कवि एक ग्रामस्थ होते. बीडशहर मोगलाईत अहंमदनगरच्या पूर्वेस ४० कोस आहे. हा कवि संस्कृत काव्य करण्यांत निपुण असून, संस्कृतांतील छंदःशास्त्र व चित्रकाव्य हीं यास चांगलीं अवगत असल्यामुळें, त्यांचा कित्ता त्यानें महाराष्ट्रभाषेंत उत्कृष्ट उठविला आहे. सीतास्वयंवर, रुक्मिणी-स्वयंवर, रसमंजरी, बिल्हणचरित्र, पांचालीस्तव, गजगौरीव्रत, रंभाशुक-संवाद, द्रौपदीवस्त्रहरण, भगवद्गीता वगैरे काव्यें व पदें, भूपाळ्या, कूट-संग्रह वगैरे ह्याची पुष्कळ कविता आहे. विठ्ठल नांवाचे आणखीही दोन–तीन कवि आहेत.

**उद्धवगोसावी** (१६२४–१७१३).—टाकळीचा, रामदासाचा पहिला शिष्य, सदाशिवपंत नामक देशस्थ ब्राह्मणाचा मुलगा. आईचें नांव उमा-बाई. समर्थांच्या प्रसादानें हा मुलगा झाला म्हणून आईबापांनीं त्यास समर्थसेवेस दिलें.

**रंगनाथस्वामी** (१६१२–१६८४ ).—पंढरपुरापासून पंधरा कोसांवर नाझरें म्हणून गांव आहे तेथील गोपाळपंत नामक ब्राह्मणाचा हा मुलगा. त्याच्या आईचें नांव बयाबाई. त्याच्या वडील भावाचें नांव यादव उर्फ ब्रह्मानंदस्वामी. रामविजय वगैरे ग्रंथांचा कर्ता श्रीधरकवि हा या ब्रह्मा-नंदस्वामीचा मुलगा व रंगनाथस्वामीचा पुतण्या. रंगनाथ हा सुस्वरूप असून शिपाईबाण्यानें राही. डोकीस शें दीडशें रुपयांचा मंदील, कानांत दोन अडीचशें रुपयांची भिकबाळी, पायांत मोठ्या किंमतीची तुमान, अंगांत भरजरी अंगरखा, हातांत भाला, पाठीशीं ढाल व तीरकमान, बसण्यास पांचसहाशेंचा घोडा, डाव्या पायांत शंभर सवाशें भार चांदीचा

तोंडा व बरोबर धांवणारे वीस पंचवीस लंगोटबंद ब्रह्मचारी, असा याचा थाट होता. पण हा पोषाख उतरला कीं, त्याचें कडकडीत ब्रह्मचर्य कायम असे. हा मूळपासून ब्रह्मचारीच राहिला. रंगनाथस्वामीचे वेदान्तावर ग्रंथ आहेत. त्याचीं पदें मोठीं सुरस व ठेकेदार आहेत. याची समाधि निगडीस आहे.

जयरामस्वामी (मृ. १६७२ ?).—रामदासी वडगांवकर.

केशवस्वामी (१६८२?), व आनंदमूर्ति ब्रह्मनाळकर (मृ. १६९६) हे वरील पांच संतकवि रामदासीपंथापैकीं प्रसिद्धीस आले.

मुक्तेश्वर (स.१६०९–१६५३, भा.इ.सं.मं. संमेलन १९१५).—हा एकनाथाच्या मुलीचा मुलगा; बापाचें नांव विश्वंभर, पैठणचा राहणारा. कवि या दृष्टीनें मराठी भाषेंत याची योग्यता फार मोठी आहे. यानें महाभारताचीं पहिलीं चार व सौप्तिकपर्व अशीं पांच पर्वें व आणखी पुष्कळ कविता मराठी भाषेंत ओवीछंदांत लिहिली. तीं केवळ भाषांतररूपाचीं नसल्यामुळें, उपमा, उत्प्रेक्षा इत्यादि अलंकारांनीं व शृंगार, वीर, करुण, वगैरे रसांनीं परिपूर्ण अशीं आहेत. थोड्या शब्दांत, एका लहान वाक्यांत किंवा वाक्यांशांत, एखादी प्रचंड किंवा उदात्त कल्पना अथवा चित्र मुक्तेश्वर वाचकांचे मनांत उत्कृष्ट उभें करितो. बाकीचीं पर्वें विष्णुदासनामा ह्यानें संपविलीं. रामायणांतले कांहीं भाग व दुसरी पुष्कळ कविता मुक्तेश्वराची आहे.

शिवरामस्वामी (ज. १६५४).—कल्याणी येथील मठांत शिवरामस्वामीचे सुमारें शंभर ग्रंथ व्यवस्थित ठेवलेले आहेत. तेथून जवळच आपचंद व येकेहाळी ह्या दोन मठांत आणखी पुष्कळ नवीन ग्रंथ शिवरामस्वामीचे आहेत. गुरुभक्ति हें त्याच्या कवितेचें प्रमेय आहे. त्याची कविता श्लोक, ओंव्या वगैरे नानाप्रकारची आहे. ह्याचा 'गीताचंद्रिका' ग्रंथ प्रसिद्ध असून, तो स. १६८१ त पुरा झालेला आहे.

नागेश भिंगारकर (१६८० चा सुमार).—ह्याचे 'चंद्रावळीवर्णन' 'सीतास्वयंवर' वगैरे कित्येक ग्रंथ सरस आहेत.

देवदास–देवीदास (१६५८–१६९८).—चैतन्यसंप्रदायी; व्यंकटेशस्तोत्र, संतमालिकास्तोत्र इत्यादि याचीं कवनें लोकपठनांत आहेत.

बोधलेबावा, संतोबा पवार.—हे मराठे संत तुकारामाचे समकालीन असावेत. त्यांचीं पदें, अभंग वगैरे आहेत.

शेखमहंमद.—हा श्रीगोंदें येथील मुसलमान साधु कबिराचा अवतार समजतात. सोळाव्या वर्षी उपरति होऊन रामभजनीं लागला. ह्याचे अनुयायी हिंदूंप्रमाणे वागतात; पण मुसलमानांशीं शरीरसंबंध ठेवितात. योगसंग्राम वगैरे ह्याचे कित्येक ग्रंथ वेदान्तविषयक आहेत. योगसंग्राम स. १६९४ त लिहिला गेला.

वामन पंडित ( १६३६–९६ ).—सातारा जिल्ह्यांत कोरेगांव येथील राहणारा ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मण. गांवच्या जोशीपणाचा धंदा याजकडे वडिलार्जित होता. याच्या बायकोचें नांव गिरिबाई, बापाचें नांव नरहरिपंडित, व आईचें लक्ष्मीबाई. हा विद्वान पंडित आरंभीं मध्वमतानुसारी असून दिवसा मशाल लावून वाद करीत देशोदेशीं हिंडत असे. काशीस जाऊन तेथील पंडितांस यानें वादांत जिंकिलें. पुढें आपल्या विद्येचा असला गर्व सोडण्याविषयीं त्यास कांहीं अद्दल घडल्यावरून त्यानें आपलें लक्ष ईश्वरभक्तीकडे लाविलें, आणि संस्कृत भाषेचा व्यासंग सोडून महाराष्ट्र भाषेंत तो कविता करूं लागला. वेदपठनाचा अभ्यास ब्राह्मणेतरांस नाहीं ह्या मतास दूर सारून, पाहिजे त्यानें वेदमंत्र म्हणावे असें त्यानें आपलें सत्य मत प्रगट केलें. तुकाराम व रामदास यांची त्यानें भेट घेतली. रामदासानें त्यास आश्वासन देऊन सांगितलें कीं, ' तुजवर भगवंताचा अनुग्रह होणार आहे. ' त्यावरून त्यानें निर्मत्सर मनानें मध्व, रामानुज, वल्लभ आणि शंकराचार्य यांचे सिद्धांत एकाग्र मनानें घोळून पाहिले; तेव्हां त्याच्या अंतःकरणांत अद्वैत मताविषयीं पूज्यबुद्धि उत्पन्न झाली. वामनाचे अनेक ग्रंथ सुप्रसिद्ध आहेत. भगवद्गीतेवर 'भावार्थदीपिका' नांवाची टीका, ब्रह्मस्तुतीवर टीका, कृष्णलीलांचीं निरनिराळीं वर्णनें, भारत रामायणांतील अनेक भाग व दुसरे पुष्कळ ग्रंथ वामन कवीचे प्रसिद्ध आहेत. यमकें साधण्यांत हा कुशल असल्यामुळें त्यास यमक्या वामन म्हणतात. ' सुश्लोक वामनाचा ' असा सामान्य अभिप्राय आहे.

अवचित सुतकाशी ( स. १६६२ ).—ह्याचें आडनांव सोळांखी. द्रौपदीस्वयंवर म्हणून ह्याचा ग्रंथ आहे, त्यांत कवीनें स्वकुलेतिहास देऊन उत्कट स्वदेशाभिमान व स्वधर्मप्रेम व्यक्त केलें आहे.

(च) स० १७००-१८००.

सतराव्या शतकांत साधुत्वाचें मान उत्तरोतर कमी होऊन कवित्वास भर येत चालला; आणि स्वराज्यस्थापना झाल्यावर कवित्वाच्या निरनिराळ्या अंगांचा विकास होत जाऊनें उत्तर पेशवाईत त्याचें स्वरूप रंगेल व विलासी होत गेलें. अशा रीतीनें काव्यांतील भारदस्तपणाचा लोप होऊन शब्दावडंबर सुरू झालें आणि ठेकेदार लावण्या, कटिबंध, पर्दे पोवाडे ह्यांना एकप्रकारचा ऊत आला. अशा स्थितींत मराठशाहीचा अंत झाला. विषयसंगतेकरितां ह्या काळांतले कांहीं कवि येथें दाखल केले आहेत.

अनंतकवि (सन अदमासें १६५८-१७२३).—हा कवि रामदासस्वामीचा शिष्य अनंत गोसावी सातारा जिल्ह्यांतील मेथवड गांवचा तोच असावा. सतराव्या शतकाच्या उत्तरार्धांत हा हयात होता, असें मानण्यास आधार सांपडतो. हा रामोपासक असून रामायण, महाभारत वगैरेंतून अनेक कथानकांवर या कवीनें रचिलेली कविता सुरस आहे. तथापि याची कविता पुष्कळ अनुपलब्ध आहे असें प्रसिद्ध झालेल्या आख्यानांवरून दिसतें. मराठी कविवर्गांत याची योग्यता पहिल्या प्रतीची नसली तरी बरीच मोठी आहे. याची कविता मोहक, सरळ व सुबोध असल्यामुळें लहान मुलांस शिकविण्यास फारच लायक आहे. वीररसस्फूर्तिजनक वर्णन याच्या कवितेंत पुष्कळ आहे. बऱ्याच वृत्तांत कविता केली असून त्याचा हिंदी व संस्कृत या भाषांशीं परिचय चांगला होता.

आनंदतनय (शिवाजीचा समकालीन).—हा जातीचा ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मण कर्नाटकांत अरणी म्हणून गांव आहे तेथील राहणारा. याचें नांव गोपाळराव असें असून याच्या बापाचें नांव आनंदराव. शहाजी भोसले याचा हा गुरु व शिवोपासक होता असें कळतें. त्यावरून सतराव्या शतकाचे उत्तरार्धांत हा झाला असावा. अरणीच्या लढाईत यानें शिपाईपणा गाजविला होता. त्याच्या गुरुचें नांव मुरारपरब्रह्म. तदुत्तर कवींनीं त्यास कवि म्हणून मोठा मान दिलेला आढळतो. रघुनाथ पंडिताचा हा व्याही होता असें म्हणतात. भागवत, रामायण, पुराणें वगैरे ग्रंथांतून त्यानें अनेक आख्यानांवर मराठींत सुरस कविता केली आहे. त्याची सर्व कविता उपलब्ध नाहीं. परंतु जी आहे ती बरीच प्रौढ, सुरस, सुबोध व डौलदार आहे. तींत आरबी व फारशी शब्द बरेच दृग्गोचर

होतात. महाराष्ट्रभाषेंत अक्षरगण वृत्तांची योजना प्रथम यानेंच सुरू केली. मराठी भाषेवर त्याचा हा मोठा उपकार होय.

**रघुनाथ पंडित** ( *सतराव्या शतकाचें उत्तरार्ध* ).—*आनंदतनयाचा* हा व्याही, यावरून शिवाजीचा समकालीन असावा असा तर्क होतो. हा चांगला संस्कृतज्ञ होता. ‘ नलदमयंतीस्वयंवराख्यान ’ एवढेंच याचें काव्य उपलब्ध असून, तें अनेक रसांनीं परिपूर्ण आहे. शिवाजीचा राजव्यवहार-कोश करणारा रघुनाथपंडित हा नव्हे.

**मुकुंद–दीनदत्तपदांकित** ( मृ. १७०८ ).—ह्या कवीची पुष्कळ कविता उपलब्ध झाली आहे. हा बागलाणांत होता. यवनांच्या सेवेंत सद्गुरूपदेश होऊन तो वेदान्ती बनला. याचें रामायण सुंदरकांड प्रसिद्ध आहे.

**गोसावीनंदन** ( स. १६५८–१७३८ ), व **सुभानराव**. हे आणखी अरणीचे कवी आहेत.

**श्रीधर** ( सन १६७८–१७२८ ).—हा रंगनाथ स्वामीचा पुतण्या रामविजय, हरिविजय, पांडवप्रताप, जैमिनीअश्वमेघ, वेदान्तसूर्य, शिवलीलामृत इत्यादि ओवीबद्ध ग्रंथ यानें लिहिले. याची वाणी रसाळ व अलंकृत आहे. याचे ग्रंथ महाराष्ट्रांत आस्थेनें वाचितात. पंढरपुरास ह्याची समाधि आहे. त्याचे भाऊबंद मूळ गांव नाझरें (पंढरपुराहून वीस मैलांवर) येथें आहेत. यांचें आडनांव घोडके असें होतें. ह्यानें प्रथम वयांत संसार करून मुलेंबाळें झाल्यावर उत्तर वयांत संन्यासदीक्षा घेतली.

**अमृतराय** ( सन १६९८–१७५३ ).—हा जातीचा ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मण नामांकित कवि होऊन गेला. औरंगबादेस विसाजी मोरो म्हणून मोगलांचा अधिकारी होता, त्याच्या पदरीं हा असे. हा वैराग्यशील असून कीर्तन करीत असे. बाळाजी बाजीराव पेशव्याचे वेळीं शनिवारचे वाड्यांत याचें कीर्तन झालें होतें. कटाव, दोहरे, पदें वगैरे याची कविता फार चांगली असून कटाव तर फारच वाखाणले जातात. यानें अनेक आख्यानांवर कविता केली आहे. हा शीघ्रकवि होता. याची वाणी फार मनोरंजक असून, कवनांत यमकांचा भरणा अतिशय आहे. यानें हिंदुस्थानी भाषेंतही कविता रचिली आहे. हरिदास मंडळीस याच्या कवितेचा उपयोग फार होतो.

मध्वमुनीश्वर ( सन १६८९–१७३४ ).—हाही ब्राह्मण कवि अमृतरायाच्या वेळीं नासिक येथें राहत होता. पांडुरंगाचा साक्षात्कार होऊन त्यानें पदें, अभंग या रूपानें ईश्वराचे गुणानुवाद वर्णिले. तो पुढें औरंगाबादेस जाऊन राहिला. तो फार प्रेमभावानें हरिकीर्तन करीत असे, व कीर्तनांत स्वकपोलकल्पित प्रासादिक कविता करून गात असे. यामुळें त्याची कीर्ति चहूंकडे पसरली. पश्चिम किनाऱ्यावर कान्होजी आंगरे म्हणून जो मराठा सरदार होता, त्याचेपाशीं पुष्कळ पंडित असत. मध्वनाथानें कान्होजीच्या वाड्यांत कीर्तन करून संस्कृताचा अभिमान बाळगणाऱ्या पंडितांचा गर्व परिहार केला. धनेश्वरचरित्र वगैरे कित्येक याचे ग्रंथ आहेत. शिवाय पदें वगैरे पुष्कळ आहेत.

ज्योतिपंत महाभागवत (स० १७८८).—बुध गांवचा, व तुकाविप्र ( १७४०-१७९० ) रहिमतपूरचा, हे दोघेही तपस्वी व विद्वान साधु असून त्यांचे वेदान्तावर ग्रंथ आहेत. कोंडू ऊर्फ कुंडलीश ( १७९१ ) हाही असाच वेदान्ती कवि उपलब्ध झाला आहे. प्रभुनंदनाचा श्रीखंड्याचरित्र हा सरस ग्रंथ स. १७४१ त रचिलेला सांपडला आहे.

कृष्णदयार्णव (स. १६७४-१७४०).—'भागवतावर हरिवरदा टीका.'

शुभानंदस्वामी ( स. १७६६ ).—ह्याचें 'उद्योगपर्व' चांगलें आहे.

मोरोपंत ( १७२९–१७९४ ).—रत्नागिरि जिल्ह्यांत राजापुरांतील सौंदळ गांवीं पराडकर नांवाचे कऱ्हाडे ब्राह्मण राहत होते, ते या कवीचे पूर्वज. त्यांपैकीं एक गृहस्थ कोंकणांतून पन्हाळगडावर जाऊन राहिला. मोरोपंताचा बाप रामाजीपंत हा कोल्हापूर दरबारीं नोकर होता. मोरोपंताचा जन्म पन्हाळगडीं झाला. आईचें नांव लक्ष्मीबाई, त्याच्या वडील बंधूचें नांव रामोपंत व कनिष्ठ बंधूचें आबाजीपंत. रामाजीपंत कांहीं आगाळिकीवरून कोल्हापूर सोडून बारामतीस आबाजी नाईक जोशी, बाळाजी विश्वनाथ पेशवे याचा जांवई जहागीरदार होता, त्याजकडे जाऊन पागेचे कामावर राहिला. मोरोपंतही पुढें बारामतीस जाऊन आबाजी नाईक याजवळ पुराण सांगण्याकरितां म्हणून पांचशें रुपयांचें वर्षासन घेऊन राहूं लागला. गणेशपाध्ये गोळवलकर हा मोरोपंताचा गुरु होय. धर्मसिंधूचा कर्ता काशीनाथोपाध्याय याची मुलगी सुंदराबाई मोरोपंताचा

मुलगा रामकृष्णपंत यास दिली होती. संस्कृत विद्येचा उत्तम अभ्यास करून पुराण सांगतांना रामायणभारतादि ग्रंथांचीं पारायणें त्याला करावीं लागलीं. तेव्हां त्यास मराठी भाषेंत कविता करण्याची हातोटी चांगली साधली. आर्यावृत्त त्यानें प्रचारांत आणिलें; व याच वृत्तांत त्याची बरीच कविता आहे. प्रतिरात्रीं धुळीची पाटी, संस्कृत पोथी, व समई इतकी तयारी चाकर करून ठेवीत असे. पुढें नित्य कृत्य आटोपल्यावर सर्व पाटीवर ग्रंथ लिहून नंतर निजावयास जावें असा पंताचा परिपाठ होता. दुसरे दिवशीं सकाळीं पाटीवरील ग्रंथाची प्रत शाईनें करून ठेवण्याचें काम लक्ष्मणभट वांईकर याजकडे होतें. मंत्रभागवत, बृहद्दशम, महाभारत, अष्टोत्तरशत रामायणें, हरिवंश, ब्रह्मोत्तरखंड, भगवद्गीता, सप्तशती, केकावली व दुसरीं अनेक आख्यानें असे पंताचे प्राकृत ग्रंथ असून, शिवाय कित्येक संस्कृत ग्रंथही आहेत. त्याचा एकंदर ग्रंथ तीन लक्ष आहे. महाराष्ट्रकविमुकुटमणि हें पद मोरोपंतास मिळालें आहे.

सन १७४८ पासून १७९४ पर्यंतचा म्हणजे पेशवाईच्या भरभराटीचा काळ मोरोपंतानें पाहिला. नानासाहेब व माधवराव पेशवे, गोपिकाबाई, अहिल्याबाई वगैरे थोर व्यक्तींची व पंताची चांगली ओळख होती. पंत आपली कविता घेऊन काशीस गेला, तेथील पंडितांस ती फारच मान्य झाली. मराठी भाषेस प्रतिष्ठा प्राप्त होण्यास पंताचे परिश्रम पुष्कळ अंशीं कारण झाले. मोरोपंताच्या आर्या रामजोशी सोलापूरकर यानें प्रसिद्धीस आणिल्या. मोरोपंत कवि होता, तसाच परम नैष्ठिक भगवद्भक्तही होता. त्याचें देहावसान पंढरपुरीं झालें, तेथील त्याच्या वंशजाकडून त्याच्या समग्र ग्रंथांची उत्कृष्ट आवृत्ति छापली जात आहे.

महीपति ( सन १७१५–१७९० ).—अहमदनगर जिल्ह्यांत राहुरी तालुक्यामध्यें ताहराबाद म्हणून गांव आहे तेथील राहणारा. हा ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मण, दादोपंत व गंगाबाई यांचा मुलगा. असें सांगतात कीं, यास पांडुरंगाचा साक्षात्कार होऊन कविता करण्याची स्फूर्ति झाली, व भक्तिविजय, संतलीलामृत, भक्तलीलामृत, कथासारामृत, पांडुरंगस्तोत्र, शनिमाहात्म्य, कृष्णलीलामृत, पंढरीमाहात्म्य इत्यादि लहानमोठे ओवीबद्ध ग्रंथ त्यानें लिहिले. आपणाला संस्कृत येत नाहीं, अमरकोश पाहिलाही नाहीं, असें महीपति स्वतःच सांगतो. महीपतीच्या ग्रंथांत क्षेत्रांचीं वर्णनें व

त्यांचा इतिहास पुष्कळ सांपडतो. 'रामा' नांवाच्या त्याच्या शिष्यानें त्याची तसबीर काढिली होती, ती 'बालबोध' मासिकांत प्रसिद्ध झाली आहे.

रामजोशी ( १७६२–१८१२ ).—हा सोलापूरचा राहणारा यजुर्वेदी देशस्थ ब्राह्मण. यानें वैराग्यपर अनेक उत्कृष्ट लावण्या केल्या आहेत. छंदःशास्त्रावर 'छंदोमंजरी' नांवाचा याचा एक ग्रंथ आहे. मोरोपंताच्या आर्या यानेंच विशेषतः प्रसिद्धीस आणिल्या. हा कथा करून आपलें उपजीवन करी. याची कविता सुरस व सुबोध आहे.

अनंतफंदी ( स. १७४४–१८१९ ).—हा संगमनेर येथील राहणारा देशस्थ ब्राह्मण, भवानीबावा व राऊबाई यांचा मुलगा. हा तमाशे करीत हिंडे, व स्वतः केलेल्या लावण्या तमाशांत म्हणे. अहिल्याबाई होळकरीण संगमनेरास आली असतां, ब्राह्मणानें तमाशा करणें योग्य नाहीं, असें तिनें सांगितल्यावरून तमाशांचा नाद सोडून तो कीर्तन करूं लागला. त्याचे फटके विशेष प्रसिद्ध असून, शिवाय कटाव, लावण्या व क्वचित् श्लोक, आर्या आणि ओंव्या इत्यादि कविता त्यानें रचिलेली आहे. ह्याचे वंशज बडोद्यास आहेत.

देवनाथ ( १७५४–१८२१ ).—अलीकडे देवनाथ महाराज हा प्रसिद्ध साधु होऊन गेला. वऱ्हाडांत शिर्जी अंजनगांव हें इतिहासप्रसिद्ध स्थळ आहे. त्यांतील शिर्जी गांवीं देवनाथ झाला. आरंभीं तो तालीमबाज होता. पुढें कांहीं कारणावरून वैराग्य उत्पन्न होऊन तो मारुतीची भक्ति करूं लागला. पुढें त्यास कवित्वाची स्फूर्ति झाली; आणि कविता करीत सर्व हिंदुस्थानभर त्यानें प्रवास केला. ग्वाल्हेर येथें कीर्तन करीत असतां मंडपास आग लागून देवनाथ जळून मेला. देवनाथाच्या कवितेंत बहुतेक पदें व कटिबंध आहेत.त्याच्या कवितेवरून त्यास 'साधुकवि' ही पदवी ज्यास्त शोभते.

शिवाजीचा भूषणभाट, पोवाडे रचणारे शाहीर वगैरे अन्य प्रकारचे कवी पुष्कळ झाले. ह्या मंडळीचा उल्लेख यथास्थलीं पुढें येईल.

संतमंडळाची नांवनिशी देतांना उद्दिष्ट कालाच्या पलीकडे जावें लागलें. वास्तविक मराठशाहीच्या उत्पत्तीस संतमंडळीचा उद्योग किती कारण झाला, हें ह्या संतचरित्रांवरून ठरवावयाचें आहे. परंतु सर्व संतकवींचें विवेचन एकाच ठिकाणीं व्हावें ह्यासाठीं अगदीं एकोणिसाव्या शतकापर्यंत

झालेल्या सर्व प्रमुख साधूंची हकीकत वर दिली. संत व कवी ह्या मंडळींचा इतिहास हा मराठ्यांच्या एकंदर इतिहासाचा एक महत्त्वाचा भाग आहे.

संत व कवी यांचे पृथक् वर्ग बांधणें कठीण आहे. बहुतेक मंडळी कवी असून संत, व संत असून कवी अशी होती. त्यांचीं चरित्रें अद्भुत चमत्कारांनीं भरलेलीं आहेत. ते चमत्कार खरे मानणें किंवा खोटे मानणें ही ज्याच्या त्याच्या विचाराची व अनुभवाची गोष्ट आहे. संत व कवी यांचा अभेद असल्यामुळें महाराष्ट्र कवितेचें एकंदर स्वरूप वैराग्यशील व परमार्थसाधक असें आहे. वरील त्रोटक हकीकती केवळ पुढील ऐतिहासिक चर्चेसाठीं दिल्या आहेत. हल्लीं वरीच माहिती बाहेर आली आहे व पुष्कळ यावयाची आहे. तिच्या साह्यानें महाराष्ट्र कवितेचा स्वतंत्र विचार करणें, तिच्या गुणदोषाचें विवेचन करून तिची प्रत ठरविणें, हें काम स्वतंत्रपणें केलें पाहिजे.

**२. मानभाव अ० महानुभावपंथ.**—मराठी भाषेंतील अत्यंत जुने ग्रंथ मानभाव पंथाचे आहेत. महाराष्ट्रांत धर्मसंबंधीं चळवळ प्रथम सुरू केली ती मानभावांनीं होय. त्यांच्या प्रयत्नावरूनच मुकुंदराज, ज्ञानदेव वगैरेंना स्फूर्ति प्राप्त झाली. मानभावांच्या ग्रंथांवरून आरंभीं मराठी भाषा कशी होती ह्याचा अंदाज करितां येतो. ‘ महान ’ म्हणजे मोठा व ‘ अनुभव ’ अथवा ‘ अनुभाव ’ आहे ज्यांचा, ते महानुभाव. देवगिरि येथील यादव वंशी राजे कृष्ण ( स. १२४७–१२६० ) आणि महादेव ( स. १२६०–१२७१ ) राज्य करीत असतां प्रशान्तचक्रधर नांवाच्या विद्वान गृहस्थानें हा पंथ काढिला. पुढें नागदेवभट्ट ह्या विद्वान् आचार्यानें चक्रधराचे मतांचा फैलाव केला. लीलाचरित व चक्रधरचरित हे त्यांचे दोन मुख्य ग्रंथ आहेत. रामदेवरावाची राणी कवैशा ही नागदेवभट्टास मोठा सन्मान देत असे. हा पंथ हिंदुधर्मास सोडून नव्हता. उपनिषदें आणि भगवद्गीता या ग्रंथांस मानभाव पूज्य मानतात. एकाच श्रीकृष्णाला ते भजतात. ते जातिभेद मानीत नाहींत; मांसान्न व मादक पदार्थ ते निषिद्ध समजतात; भिक्षा मागून ईश्वरभक्तींत काळ घालविणें हें त्यांचें मुख्य ध्येय आहे. हिंदूंच्या इतर देवतांस ते मान देत नाहींत. अस्पृश्य जातींशिवाय इतर सर्व हिंदु लोक ह्या पंथाची दीक्षा घेऊं शकतात. शूद्रालाही महंत होतां येतें. त्यांचे मुख्य तीन पंथ आहेत. काळे कपडे

वापरण्याचा त्यांचा रिवाज आहे. चंदनाच्या किंवा तुळशीच्या माळा ते धारण करतात. मानभावांचे बहुतेक ग्रंथ मराठी भाषेंत असून ते कमींत कमी तीन चारशें तरी असावे. ते देवनागरी लिपींतच लिहिलेले आहेत, परंतु सामान्य लोकांस कळूं नयेत म्हणून अक्षरांची उलटापालट करून त्यांच्या अनेक सांकेतिक खुणा ठरलेल्या आहेत. ते संकेत समजल्याशिवाय ग्रंथ समजत नाहींत. आजपावेतों त्यांचे ग्रंथ बाहेर न पडण्याचें कारण हेंच आहे. हरींद्रमुनि, केशराज, भास्कर वगैरे कित्येक मानभाव कवि नामांकित आहेत. भगवद्गीतेवर मानभावांच्या कमींत कमी सतरा टीका आहेत. पैकीं कैवल्यदीपिका नामक टीका संस्कृतांत आहे. त्यांचे कांहीं ग्रंथ ज्ञानेश्वराच्याही पूर्वींचे असून ते प्रसिद्ध होतील तर त्यावरून जुन्या मराठी भाषेचें स्वरूप पुष्कळ समजून येईल. धर्माच्या बाबतींत अकराव्या शतकांत दाक्षिणेंत केवढी विचारक्रान्ति झाली होती हें मानभावांच्या ग्रंथांवरून कळून येईल. धर्माची अवनति झालेली आहे ही गोष्ट त्या वेळीं सर्वमान्य होऊन ती स्थिति सुधारण्याचे प्रयत्न प्रथम मानभावांनीं सुरू केले; आणि तेच पुढें ज्ञानेश्वरादिकांनीं उचलिले. डॉ. भांडारकर यांचें नवीन पुस्तक 'शैव, व वैष्णव पंथ' आणि मानभावांचे ग्रंथ यांजवरून दोन गोष्टी निर्विवाद सिद्ध होतात कीं, अकराव्या शतकांत व त्यापूर्वीं मराठी भाषा चांगली प्रगल्भ दशेस आलेली होती, आणि लोकांत धर्मसंबंधानें विचारक्रान्ति चालू होती.

खानदेश, वऱ्हाड वगैरे ठिकाणीं हल्लीं महानुभावांचा बराच समूह असून तिकडे त्यांची नवीन चळवळ सुरू आहे. त्यांच्या परिषदेची मुख्य कचेरी सिरजगांव बंड, एलिचपूर वऱ्हाड येथें आहे. (Mr. Keshav Appa Padbye, Paper-R. A. S, B'bay).

**३. मराठी व हिंदुस्थानी संतांचे अन्योन्य संबंध.**—संत व कवी हे जबरदस्त उद्योगी व श्रमसहिष्णु होते. बहुतेकांनीं हिंदुस्थानांतील सर्व यात्रा केलेल्या होत्या. किंबहुना अशा यात्रा करणें हेंच महत्पुण्य व जीवितसाफल्य समजलें जात असल्यामुळें, कसल्याही अडचणी आल्या तरी त्यांची पर्वा न करितां ते यात्रा करीत. ह्या यात्रा म्हणजे अगदीं हिमालयाच्या टोंकापासून पूर्वपश्चिम दिशांस धरून थेट दक्षिणेपावेतों होत असत. या यात्रेच्या प्रवासांत त्यांस अनेक साधु भेटत, अनेक गोष्टी कळत, अनेक देशाचार

च रिवाज दृष्टीस पडत. निरनिराळ्या ठिकाणची देशस्थिति त्यांस समजून येई. त्यांनीं पूर्वीच्या कवींचे ग्रंथ बहुधा वाचलेले असत, आणि बहुतेकांस संस्कृत भाषाही अवगत असे. प्रवासानें बहुश्रुतपणा प्राप्त होतो हें सर्वांस ठाऊक आहेच; परंतु हल्लींच्या आगगाडीच्या घाईच्या प्रवासानें हा हेतु चांगलासा सफल होत नाहीं. त्या वेळीं यात्रेच्या निमित्तानें सर्व प्रकारच्या लोकांत मिसळण्याची व हरएक प्रकारची माहिती मिळविण्याची अपूर्व संधि ह्या संतमंडळीस प्राप्त होई. निरनिराळ्या ठिकाणच्या कवींचे व साधूंचे उपदेश, कीर्तनें, भजनें, निरूपणें ह्या मंडळीस ऐकावयास सांपडत; आणि अन्य भाषा शिकून तींतले उत्तमोत्तम मासले व विचार ते हस्तगत करून स्वदेशीं व स्वभाषेंत आणीत. किंबहुना, त्या वेळीं दळणवळणाचीं व बातमी पसरण्याचीं साधनें विशेष नसल्यामुळें हे यात्रेकरू म्हणजे सर्व ठिकाणच्या बातमीचीं व सर्व प्रकारच्या अनुभवांचीं भांडारेंच असून तीं ते आपल्या मधुरवाणीनें देशोदेशीं पसरवीत. कोणी सत्पुरुष अगर कांहीं अपूर्व प्रकार त्यांच्या दृष्टीस पडल्यास ते त्या स्थळींच पुष्कळ काळ राहून आपली जिज्ञासा तृप्त करून घेत. सारांश, एकोणिसाव्या शतकापासून येथें पाश्चात्य मनु सुरू होईपावेतों, लोकांचे खरे शिक्षक व खरे उपदेशक हे साधु व कवी होते आणि याच कारणास्तव लोकांवर त्यांची छाप मोठी होती. लोकही त्या वेळीं भाविक असल्यामुळें साधुसंतांच्या उपदेशास ते अतिशय मान देत. रामदास, मौनीस्वामी पाटगांवकर इत्यादि पुरुषांनीं शिवाजीचे हेतु आपल्या अधिकारी वाणीनें लोकांस समजावून दिले. मुसलमानी अमलांतील ठिकठिकाणची दुर्दशा प्रवासांत त्यांच्या प्रत्यक्ष अनुभवास आली. पद्मिनीचे, देवलदेवीचे वगैरे प्रकार हिंदुस्थानांत सर्वतोमुखीं होते. शंकरदेव, हरपाळदेव यांचा परिणाम सर्वांस माहीत होता. मलिक काफूरनें किती तरी देवालयें व समाधि नाहींशा केल्या. असे प्रकार संतमंडळींना प्रवासांत प्रत्यक्ष दिसत, त्यांची ते चर्चा करीत; आणि ह्या अनुभवाचा ठसा त्यांच्या ग्रंथांत उमटत असे. शिवाजीचें राज्य होतांच, त्यास संतांनीं पाठबळ दिलें; आणि लोकांत त्याजबद्दल आदर व उत्साह उत्पन्न केला.

भगवद्भक्तीसंबंधानेंच पाहतां, उत्तर हिंदुस्थानांतील साधूंचा दक्षिणेंतील संतमंडळीवर बराच परिणाम घडला असला पाहिजे. महाराष्ट्र भाषे-

वर व मराठी कवितेवर असा परिणाम पुष्कळच झालेला आहे; आणि अनेक महाराष्ट्र कवींनीं आपल्या कृती हिंदी वगैरे भाषांत लिहिल्या आहेत. वर सांगितल्याप्रमाणें प्रवासानें आपल्या कवींचा बहुश्रुतपणा व विद्वत्ता वाढून त्यांच्या वाणींत अनेक उपमा, अनेक कोट्या व भाषा-वैचित्र्य निर्माण झालें. महाराष्ट्र भाषेला ह्या योगानें पुष्कळच फायदा झाला; आणि ती जोरदार, विपुल व विस्तृत बनली. परंतु उपदेश व कृति ह्यांचा व्यवहारांत मेळ घालण्याची आवश्यकता आपणांस कधींच वाटली नाहीं, म्हणून संतांच्या शिकवणीचा व अनुभवाचा प्रत्यक्ष व्यवहारावर विशेष परिणाम घडला नाहीं. वास्तव आपल्या साधूंचीं चरित्रें ल्यूथर, ब्रूनो, पीटर धि हर्मिट इत्यादि पाश्चात्य साधूंशीं मिळवून पाहिलीं असतां फार फिकीं व पंगु दिसतात. शिवाय पाश्चात्य साधूंचीं चरित्रें जशीं चिकित्सक बुद्धीनें व व्यवहारोपयोगी दृष्टीनें लिहिलेलीं आहेत; तशीं आपल्या साधूंचीं चरित्रें लिहिलेलीं नाहींत. तशा चिकित्सक बुद्धीचा उदय अजून आपल्याकडे व्हावयाचा आहे.

संतांची चरित्रें समग्रतेनें लिहिण्याची प्रवृत्ति पूर्वी महाराष्ट्रांत नव्हती. ज्ञानेश्वरासारख्या कित्येक थोर व्यक्तींचीं चरित्रें त्यांच्या भक्त मंडळीकडून ज्या त्या वेळींच गाईलीं जात. परंतु सर्व संतांचीं चरित्रें एकत्र करून लिहिण्याचा उपक्रम प्रथमतः नाभाजीनें मथुरेस केला. नाभाजी ऊर्फ नारायणदास हा नागर ब्राह्मण असून आंधळा होता. त्यानें 'भक्तमाला' हा ग्रंथ लिहिला. त्याचा शिष्य प्रियादास यानें भक्तिरसबोधिनी नांवाची नाभाजीच्या ग्रंथावर टिका लिहिली. ही टीकाच हल्लीं भक्तमाला म्हणून समजली जाते. संतांचीं चरित्रें लिहिण्याचा हा उपक्रम नाभाजीच्या अनुकरणानें महाराष्ट्रांत आला. उद्धवचिद्घन व दासोदिगंबर यांनीं अशीं चरित्रें लिहिण्याचा इकडे प्रघात घातला. दासोदिगंबरचा ' संतविजय ' ग्रंथ सांपडला आहे. त्यांत त्यानें नाभाजीचा उल्लेख गौरवानें केला आहे. जयरामस्वामी हा अशाच प्रकारचा चरित्रकार झाला; पण ह्या सर्व मंडळींत सर्वांत चांगला उद्योग करणारा महीपति होय. त्यानें सर्व ठिकाणीं हिंडून आणि अत्यंत श्रम व प्रयास करून प्रत्येक साधु पुरुषाची माहिती एकत्र मिळविली, आणि ही माहिती आपल्या रसाळ ग्रंथांत त्यानें प्रसिद्ध केली. त्या वेळच्या मानानें महीपतीचा हा प्रयत्न फार स्तुत्य आहे.

ग्रंथ भाविक बुद्धीनें लिहिले असल्यामुळें त्यांत अलीकडच्या काळास शोभणारा चर्चात्मक भाग नाहीं. परंतु महाराष्ट्रांतील प्रत्येक संत पुरुषाची माहिती महीपतीनें एकत्र केली, हा आपल्या राष्ट्रास मोठा फायदा झाला आहे. महीपतीनंतर भीमस्वामी, राजाराम प्रासादी वगैरे कांहीं गृहस्थांनी संत चरित्रें वर्णिलीं आहेत.

महाराष्ट्रांतील व उत्तर हिंदुस्थानांतील संतांचीं नांवें व काळ तपासून कोणावर काय परिणाम झाले याचा अंदाज ठरविण्याचा थोडाबहुत प्रयत्न रा. राजवाडे ह्यांनीं सरस्वतीमंदिरांत केला आहे. ह्या प्रश्नाचा सर्व बाजूंनीं विचार होण्याइतकी माहिती अद्यापि बाहेर आलेली नाहीं. हा नाभाजी गुरुगोविंदसिंगाच्या वेळेस म्हणजे स. १६७७ च्या सुमारास हयात होता. नाभाजीच्या नंतर महीपति झाला नाभाजीनें पौराणिक कालच्या व त्या पूर्वीच्याही साधुपुरुषांचीं नांवें दिलीं आहेत; तसें महीपतीनें केलें नाहीं. तत्राप नाभाजीच्या ग्रंथांतून अनेक म्हणजे सुमारें ११६ संतांचीं नांवें महीपतीनें घेतलीं आहेत. हे ११६ संत बहुधा मथुरावृंदावनकडील आहेत. नाभाजी अद्वैतमार्गी होता, तेव्हां माध्वसंप्रदायी द्वैती संतांचीं नांवें त्यानें दिलीं नाहींत. रामानुज, विष्णुस्वामी, मध्वाचार्य व निंबादित्य ह्यांच्या हस्तें उत्तरहिंदुस्थानांत भक्तिमार्गाची प्रस्थापना झाल्यावर सुमारें शंभर वर्षांनीं त्या मार्गाचा प्रवेश महाराष्ट्रांत झाला. बाराव्या शतकाच्या पूर्वीच्या एकाही महाराष्ट्रीय संताचें नांव महीपतीनें अगर दुसऱ्या कोणीं दिलेलें नाहीं. अर्थात् भक्तिमार्गाचा प्रसार बाराव्या शतकापूर्वी महाराष्ट्रांत नव्हता; आणि आरंभीं तरी तो प्रसार उत्तरेकडूनच महाराष्ट्रांत झाला असला पाहिजे. उत्तरहिंदुस्थानांत जाऊन तीर्थयात्रा करण्याचा प्रघात पूर्वीपासून असल्यामुळें, महाराष्ट्रांतील गृहस्थांना यात्रेच्या निमित्तानें उत्तरेकडील भक्तमंडळींची ओळख झाली आणि त्या योगें, यादवांचें राज्य पाडाव झाल्यावर, महाराष्ट्रांत तेराव्या शतकाच्या अखेरीस भक्तमंडळी चमकूं लागली. स्वराज्य असतांना निवृत्तिपर धर्माचें माहात्म्य वाढत नसतें; स्वराज्य नसतांना निवृत्तीला भर येतो, हेंही कित्येकांनीं काढिलेलें विधान मनन करण्यासारखें आहे. नाहीं तर बाराव्या शतकापूर्वी निवृत्तीचें महाराष्ट्रांत नांव नाहीं; तेराव्या शतकापासून तों सोळाव्या शतकापर्यंत निवृत्तिपर भक्तिमार्गाला उत्तरोत्तर भर येत गेला;

आणि शिवाजीची राज्यस्थापना झाल्यावर निवृत्तीचें खंडन होऊन पुन: प्रवृत्तीचा जोर होत गेला. ह्या विचारसरणीच्या अनुरोधानें संतांनीं राष्ट्रास पंगुत्व आणिलें, असें रा. राजवाडे वगैरे कित्येक विचारवंतांचें प्रतिपादन आहे.

४. भागवत धर्माचीं स्थित्यंतरें.—संतमंडळींच्या उद्योगाचें रहस्य समजण्यास महाराष्ट्रांतील धर्माचीं स्थित्यंतरें कशकशीं होत गेलीं, हें ऐतिहासिक दृष्ट्या पाहवें लागतें. मूळ वैदिक धर्म आकुंचित होऊन समाजांतील सर्व वर्गांस त्याचा उपयोग होईनासा झाला, तेव्हां बुद्ध व जैन धर्म स्थापन झाले; आणि वेदकालीन धर्म मागें पडला. महाराष्ट्रांत बुद्ध धर्माची व जैन धर्माची चलती कशी होती हें पहिल्या प्रकरणांतील निरनिराळ्या राजवंशांच्या कारकीर्दींत ठिकठिकाणीं दाखविलेंच आहे. शंकराचार्य प्रभृतींनीं वैदिक धर्माचा उद्धार करून समाजास नवीन धर्मव्यवस्था लावून दिली. ही व्यवस्था केवळ जाणत्या लोकांस ग्राह्य अशी व तत्त्वज्ञानस्वरूपाची होती. समाजांतील सर्व वर्गांच्या नेहमींच्या व्यवहारास जो धर्ममार्ग पाहिजे तो त्यांत नव्हता. अशा मार्गाची जरूर समाजास लागल्याबरोबर प्रथम जैन धर्म दहाव्या व अकराव्या शतकांत वृद्धि पावला. त्याबरोबरच लिंगायत पंथ स्थापन होऊन, त्याची सरशी कांहीं दिवस झाली. मानभावपंथही अशाच प्रकारें निघाला.

पांचव्या शतकांत चंद्रगुप्त, कुमारगुप्त, स्कंदगुप्त वगैरे जे पराक्रमी राजे उज्जनीस झाले ते भागवत धर्माचे पुरस्कर्ते होते. ते आपणांस 'परम भागवत' म्हणवीत. नवव्या शतकाचे आरंभीं शंकराचार्यांनें वेदान्तमार्गाचें प्रतिपादन करून निरनिराळ्या पंथांत धर्मैक्य स्थापण्याचा प्रयत्न व अद्वैत मताचा प्रसार केला. तथापि धर्मपंथ वाढतच गेले. शंकराचार्यांनंतर रामानुज ( १०१६-११३७ ), विष्णुस्वामी ( ११०० ), निंबार्क ( मृ. ११६२ ), आणि मध्व ( ११९७-१२७६ ) हे भागवत धर्माचे पुरस्कर्ते झाले. त्यांच्या संप्रदायांस 'आनन्द,' 'प्रकाश,' 'चैतन्य' व 'स्वरूप' अशा संज्ञा प्राप्त झाल्या. ह्या संज्ञा नांवापुढें धारण करणारे पुष्कळ महाराष्ट्र संत पुढें प्रसिद्धीस आले. मध्वाचार्यांच्या वेळेपासून महाराष्ट्र संतांची मालिका सुरू होते.

सर्व पंथांचा पाया भगवद्गीता वगैरे कोणत्या तरी प्राचीन ग्रंथावर रचलेला असून, त्याचा अर्थ व उपयोग मात्र निरनिराळ्या पंथांचे उपदेशक

आपआपल्या विचारसरणीस अनुसरून करून घेत होते. भागवत धर्माचे पुरस्कर्ते निरनिराळ्या ठिकाणीं निरनिराळे झाले. त्यांच्या उद्योगाचें विवेचन डॉ. भांडारकर यांच्या Vaishnavism and Saivism या बहुमोल पुस्तकांत पाहवयास सांपडतें. त्या पुस्तकांत दिलेले कित्येक संतांचे काळ पाहिले असतां भागवत धर्म कसा पसरत गेला हें कळून येतें. महाराष्ट्र संतांचा उद्योगही ह्यांच्याशीं समरूप आहे. वरच्यांशिवाय खालील प्रसिद्ध पुरुषही भक्तिमार्गाचेच पुरस्कर्ते होते:— नामदेव १२७०,

कबीर १३९८–१५१८, रामानंद १२९९–१४११,
चैतन्य १४८५–१५३३, वल्लभाचार्य १४७९,
तुकाराम १५६८–१६४९, तुलसीदास १५३२–१६२३.

संतांच्या उपदेशाचा मुख्य विषय भगवद्भक्ति होय. त्यांचें चारित्र्य समग्रतेनें पाहिलें म्हणजे आपल्या धर्माचा इतिहास बनतो. भगद्भक्तीचे निरनिराळे मार्ग उत्पन्न झाले आणि त्या त्या मार्गाचे प्रवर्तक अधिकारी पुरुष होऊन त्यांनीं अवतारकृत्यें केलीं. त्यांचे अवशिष्ट पंथ व उद्योग अद्यापि आपल्या समाजांत रूढ झालेले दिसतात.

ह्या पुरुषांनीं भक्तिमार्गाचा प्रसार केला. ज्ञानदेव, नामदेव, एकनाथ, व तुकाराम हे मुख्य, व त्यांचे अनेक अनुयायी, यांनीं महाराष्ट्रांत भक्तीचें संवर्धन करून समाजांतील सर्व वर्गांची धर्मतृष्णा भागविली. संतांच्या या भक्तिमार्गानें सनातन धर्माची बरीच पीछेहाट झाली, आणि तीनशें वर्षांच्या मुसल्मानी अमदानींत सनातन धर्माला पुष्कळच जाच सोसावा लागला. भक्तिमार्गाच्या पुरस्कर्त्यांनाही मुसलमानांचा जाच झाला नाहीं असें नाहीं. परंतु सर्व जनसमूह त्या मार्गाचा असल्यामुळें मुसलमानांचें त्याजपुढें कांहीं चाललें नाहीं. उलट पक्षीं दामाजी वगैरे अनेक भक्त मंडळींनीं आपल्या भक्तीचा प्रभाव मुसलमानांस दाखवून, त्यांना आपल्या भजनीं लाविलें; आणि इतिहासपुराणें व दुसरे धर्मग्रंथ मराठी भाषेंत आणून, संस्कृतांतील ज्ञानभांडार सर्व लोकांस सुलभ करून दिलें.

महाराष्ट्रांत भक्तिमार्गाची स्थापना म्हणजे पंढरीच्या विठोबाची स्थापना होय. स. १२२८ त पुंडलिकानें मथुरेहून विठोबाची मूर्ति आणून तिची स्थापना साध्या विटेवर पंढरपुरास केली, असें सांगतात. पुंडलीक हाच पहिला नामांकित भगवद्भक्त होय. ह्यानें सर्व देशभर हिंडून पुष्कळ यात्रा

केल्या. यात्रेंत त्याला भक्तिमार्गाची थोरवी कळून आली. यादव राजांनीं ह्या नवीन पंथाला आश्रय दिल्यामुळें त्याचा प्रसार लवकर झाला. यादवांच्या राज्यांतील अनेक स्त्रीपुरुष प्रजाजनांनीं विठोबाच्या मंदिरास देणग्या दिलेल्या आहेत.

विठोबा, पांडुरंग, पंढरी व पंढरपूर हीं नांवें कधीं व कशीं प्रचारांत आलीं, ह्याविषयीं वाद चालत आसून तत्संबंधीं डॉ. भांडारकर ह्यांचें प्रतिपादन सर्वथैव युक्त दिसतें. ( Vaisnavism and Saivism pp. 87 ). कानडी भाषेंत विष्णु शब्दाचा अपभ्रंश ' विठ्ठू ' असा होतो. ' विठ्ठू ' शब्दास ' बा ' हा प्रेम किंवा सन्मान व्यंजक प्रत्यय लागून विठ्ठूबा अथवा विठोबा असा शब्द बनला. यादववंशी कृष्णराजाच्या वेळचा एक ताम्रपट आहे, त्यांत ' भीमरथीच्या ' कांठीं असलेल्या पौंडरीक क्षेत्राला स. १२४९ त एक गांव इनाम दिल्याचा उल्लेख आहे. पंढरपुरचें दुसरें नांव पंढरी असें आहे. पंढरपुर येथील एका शिलालेखांत पांडुरंगपुर असें त्याचें आणखी एक नांव दिलेलें आहे. पांडुरंग म्हणजे शिव किंवा रुद्र. पंढरपुरास विठोबाचें दर्शन घेण्यापूर्वीं शंकराचें दर्शन घ्यावें लागतें. पुंडरीकाच्या नांवावरून पौंडरीक क्षेत्र म्हणजे अपभ्रंशानें, पंढरी व पंढरपुर हीं नांवें प्रचारांत आलीं. सारांश, पांडुरंग, विठोबा व पंढरपुर ह्यांच्या मुळाशीं शंकर, विष्णु व पुंडलीक ह्यांचा संबंध आहे. शैव आणि वैष्णव ह्या दोन पंथांचा तीव्र मतभेद दक्षिणेकडे असून, त्यांचा ऐक्यभाव करण्याचा उद्देश विठोबाच्या स्थापनेंत आरंभीं असावा. मात्र तसा परिणाम घडून आला नाहीं.

महाराष्ट्र संत जरी सर्वच भक्तिमार्गपरायण आहेत, तरी त्यांतल्या त्यांत विचार करूं लागल्यास, कांहीं निव्वळ निवृत्तिपर, कांहीं प्रवृत्तिपर व कांहीं नुसते कवि असे स्पष्ट दिसतात. कविता सर्वांनींच केली आहे. परंतु त्या कवितेंत नुसता कवित्वाचा हेतु आहे, कीं अन्य कांहीं हेतु आहे हें तपासून पाहवें. पुंडलीक, ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ व तुकाराम हे निवृत्तिपर संतांपैकीं प्रमुख होत. प्रवृत्तिपर साधु एकच झाला, तो रामदास होय. रामाला देव म्हणून भजण्याची किंवा रामाचीं मंदिरें बांधण्याची सुरुवात कधीं झाली असेल ती असो. पांचव्या शतकांतील अमरसिंह रामाचें नांव देत नाहीं. रामभक्तीचा विशेष फैलाव उत्तरेंत बहुधा

तुलसीदासानें व महाराष्ट्रांत रामदासानें केला. रामदास हें नांवच सहेतुक दिसतें. रामदासानें रामदासी मठ स्थापन केले; पण रामदासाचा मूळ हेतु त्या मठांत कायम राहिला नाही. रामदासाचा अस्त झाल्याबरोबर त्याचे रामदासी मठ इतर मंदिरांप्रमाणें रूढ झाले आणि त्यांचा प्रधान हेतु मार्गे पडला. संसारांत राहून राष्ट्रकाज करावें, धर्माचा हेतु संसार सुखी करण्याचाच होय, हा रामदासाच्या प्रवृत्तीचा मुख्य अर्थ. तो हेतु पहिल्या वर्गातील साधूंत दिसून येत नाहीं, आणि म्हणूनच राष्ट्रोद्धाराच्या संबंधानें त्या साधूंच्या उद्योगानें पंगुत्व उत्पन्न झालें असें म्हणण्यास हरकत नाहीं. तिसरा वर्ग निव्वळ कवींचा. मोरोपंत वगैरे भाषेच्या सौंदर्याकडे विशेष लक्ष पोंचविणारे कवी ह्या कोटींतले आहेत. युरोपांतल्याप्रमाणें साधुत्वापासून पृथक असें निव्वळ कवित्व महाराष्ट्रांत, किंबहुना हिंदुस्थानांत निपजलेंच नाहीं. परमेश्वरगुणवर्णनापलीकडे अन्य वर्ण्य विषय आमच्या कवींपुढें कधींही नव्हता. तथापि महाराष्ट्रांत निदान जे हजार पांचशें कवी व संत निर्माण झाले, ज्यांचीं नावें व कृती हल्लीं बाहेर येत आहेत, त्यांपैकीं बहुतेक निव्वळ कवी आहेत, आणि मनांतील विचार सुंदर भाषेंत खुलवून लोकांचें मन आकर्षून घेण्याकडे त्यांचा कल विशेष दिसतो. नामदेवतुकारामांचें लक्ष कवित्वाकडे बिलकुल नाहीं. म्हणूनच त्यांची वाणी साधी व ओजस्वी असून मनाला चटका लावते. ज्ञानेश्वराच्या ठिकाणीं उत्कृष्ट साधुत्व व उत्कृष्ट कवित्व ह्यांचा हृदयंगम मिलाफ झालेला आहे. मुक्तेश्वर, वामन वगैरे अनेकांच्या वाणींत कवित्वच निर्भरानें बाहेर येतें. साधुत्वाला त्या वेळीं विशेष मान होता; सबब पुष्कळांना कवित्वाच्या योगानें साधुत्व संपादन करतां येत असे.

निवृत्तिपर साधूंची दुसरी एक खूण अशी आहे कीं, 'प्रकाश,' 'आनंद,' 'चैतन्य' किंवा 'स्वरूप' यांपैकीं कोणता तरी एक संप्रदाय त्यांचा असून त्यांना गुरुपरंपरा आहे, आणि ती त्यांनीं आपल्या ग्रंथांत वर्णिली आहे. रामदासाला अशी गुरुपरंपरा नाहीं. साक्षात् रामापासून आपण अनुग्रह घेतला, असें रामदासाचें म्हणणें आहे. तत्कालीन प्रचलित मार्ग टाकून नवीन पंथ रामदासानें काढला, ह्यांतच त्याच्या प्रवृत्तीचें बीज आहे. रामदासाचे बाराशें प्रमुख शिष्य महाराष्ट्रभर पसरले होते आणि सुमारें हजार बाराशें मठ स्थापन झाले होते, असें दिसून येतें.

कवी व संत असे ग्रंथकारांचे दोन वर्ग पडतात. ज्ञानदेव, नामदेव, एकनाथ, तुकाराम हे संत वर्गांत प्रमुख आहेत. त्यांत सर्व जातींचे संत व स्त्रियाही आहेत. सर्वच संत मंडळी विशेष विद्वान् होती असें नाहीं. त्यांचें निर्मळ वर्तन व कळकळीचा उपदेश यांचा लोकांच्या मनावर भक्तीच्या संबंधानें चांगलाच परिणाम झाला. अद्यापि त्यांचीं नावें महाराष्ट्रांत गाजत आहेत, आणि सर्वत्र त्यांच्या नांवांचा जयघोष होत आहे. भगवद्गीतेचा विषय स्वभाषेंत समजून देणारा तेराव्या शतकांतील ज्ञानदेव, आणि इंग्लंडांत बायबलाचें इंग्रजींत भाषांतर करणारा चवदाव्या शतकांतील वुइक्लिफ् यांच्या कृतींत बरेंच साम्य आहे. 'धर्मसुधारणेचा प्रभाततारा' हें नांव वुइक्लिफ् यास दिलेलें आहे, तें ज्ञानदेवासही देतां येईल.

ज्ञानदेवानंतर दोनशें वर्षांनीं एकनाथ झाला. मध्यंतरीं मुसलमानी अम्मल होऊन धर्माची दैना किती झाली, हें एकनाथ व तत्कालीन संतांस चांगलेंच कळलें. मराठी भाषेंत ग्रंथवृद्धि होतच होती. त्यांत दत्तात्रियाच्या अवतारानें भर पडून गुरुचरित्र ग्रंथ तयार झाला; पण ऐतिहासिक किंवा कवित्वाच्या दृष्टीनें तो ग्रंथ बराच हलका आहे.

'नाभाजीच्या संतमालिकेंत सन ११०० पासून १७०० पर्यंतचीं सुमारें तीनशें संतांचीं नांवें दिलेलीं आहेत, तींत फक्त ज्ञानेश्वर व नामदेव हीं दोनच महाराष्ट्रीय संतांचीं नांवें आहेत. महीपतीच्या ग्रंथांतही सुमारें तीनशें नांवें असून त्यांत उत्तरहिंदुस्थानांतील सवाशें आहेत; आणि साठ पांसस्ट रामदासी आहेत, बाकीचे निव्वळ महाराष्ट्रीय संत १२०० पासून १७०० च्या दर्म्यानचे आहेत. वर जे साठ रामदासी सांगितले ते सर्व शिवाजीच्या अंतकाळीं हयात होते. शिवाय, त्या वेळेस 'सर्व महाराष्ट्रभर रामदासाचीं मतें पाळणारे व कृती करणारे सुमारें बाराशें रामदासी काम करीत होते. इतके लोक एकाच मताचा प्रसार व एकाच मताची सिद्धि करणारे पाहिले म्हणजे समर्थांनीं महाराष्ट्राच्या राजकीय पुनरुज्जीवनार्थ केवढें मोठें यंत्र निर्मिलें होतें त्याचा अंदाज होतो.' 'रामभक्तीचा भक्तिपंथ रामदासांनीं कां काढिला, निव्वळ राजकीय पंथ कां काढिला नाहीं याचें कारण महाराष्ट्राची तत्कालीन जनमनोरचना होय. स. १३३० पासून १६४० पर्यंत महाराष्ट्रांत भक्तिमार्गाचा व निवृत्तीचा अत्यंत प्रसार होऊन लोकांना ज्या भक्तियंत्रांची व सन्यासयंत्रांची संवय झाली होती, तींच यंत्रें

समर्थांनीं अंगीकारिलीं. पांचशें वर्षें जी भाक्ति निवृत्तिपर होती ती समर्थांनीं आपल्या हयातींत प्रवृत्तिपर केली. ह्या प्रवृत्तिपर भक्तीचें फळ तत्कालीन राजकीय स्वातंत्र्य होय.' (रा. राजवाडे). रामदासानंतर त्यानें स्थापिलेला पंथ पूर्वींच्या संप्रदायाप्रमाणेंच निर्जीव बनला तो अद्यापि तसाच आहे. शिवाजीनें स्वतंत्र राज्यस्थापना केली, तेव्हांच रामदासी संप्रदाय वाढला. रामदासी संप्रदायामुळें स्वराज्यस्थापना कशी झाली, हें रा. राजवाड्यांनीं स्पष्ट केलें नाहीं. त्याचें विवेचन पुढें येईल.

**५. संत व संस्कृतपंडित यांचा विरोध.**—संत मंडळींतील कित्येक विद्वान् पुरुष संस्कृतांतील ज्ञानभांडार सर्व लोकांच्या उपयोगासाठीं मराठी भाषेंत आणीत असतांच, इकडे संस्कृतज्ञ कर्मठ उपाध्यायवर्ग, जपजाप्य, व्रतें, अनुष्ठानें, प्रायश्चित्तें, दानें इत्यादि प्रकार वाढविण्याचा जबरदस्त उद्योग करीत होता. ह्या वर्गाचा पहिला पुरस्कर्ता हेमाद्रि होय. हेमाद्रीनें हे सर्व धार्मिक प्रकार पुराणांतून व लोकाचारांतून एकत्र जमवून 'चतुर्वर्गचिंतामणि' हा ग्रंथ तयार केला. त्याचप्रमाणें अनेक निबंधकार, व धर्मशास्त्रकार झाले. त्यांनीं नवीन संस्कृत ग्रंथ लिहून पूर्वींचे निर्जीव होत चाललेले यज्ञयागादि धर्माचरणाचे प्रकार पुन: ताजे केले.

हिंदुस्थानांत भागवत धर्माचा प्रसार देशी भाषांच्या द्वारें होत असतांच संस्कृत ग्रंथरचनाही अव्याहत वाढत होती. जीमूतवाहन (१२ व्या शतकाचा आरंभ), लक्ष्मीधर (बारावें शतक प्रथमार्ध-भास्कराचार्यांचा मुलगा), हलायुध (१२ व्या शतकाची अखेर), शूलपाणि उपाध्याय (पंधरावें शतक प्रारंभ), रघुनंदनभट्टाचार्य (पंधरावें शतक प्रथमार्ध), इत्यादि पंडितांनीं धर्म, न्याय, आचार, व्यवहार वगैरे विषयांवर अनेक नवीन ग्रंथ लिहिलेले निरनिराळ्या प्रांतांत मान्य झाले आहेत. (मनमोहनचक्रवर्ती, R. A. S. Bengal). चालुक्यांच्या व यादवांच्या वेळेस अनेक संस्कृत ग्रंथकार व पंडित झाले त्यांचीं नांवें मागें ठिकठिकाणीं आलींच आहेत. शिवाय अनेक दक्षिणी पंडितांचें वास्तव्य काशीस होतें. नारायण भट्ट, कमलाकर भट्ट, अनंतदेव इत्यादि अनेक पंडितांचे ग्रंथ वरील प्रकाराची साक्ष देतात. तेराव्या शतकापासून १८ व्या शतकापर्यंत संत व कवी वगैरे मराठी ग्रंथकार सुमारें १००० एक हजार झाले असावे, आणि त्याच काळांत संस्कृत ग्रंथकारही तितकेच झाले, असा अंदाज भा. इ.

संशोधकांनीं केलेला आहे. ह्यावरून असें निष्पन्न होतें कीं, एका बाजूनें संत-मंडळी कर्मठपणा नाहींसा करण्याचा प्रयत्न करीत होती, तर दुसऱ्या बाजूनें उपाध्याय वर्गाचे पंडित, प्रत्येक धार्मिक व्रत किंवा कर्म, व त्याची फल-प्राप्ति मोठ्या गौरवानें प्रतिपादित होते. दोन पक्षांचे हे दोन उद्योगप्रवाह आपल्या धर्मांत एकसारखे अनादि कालापासून आतांपर्यंत अव्याहत चालू आहेत. या दोन प्रवाहांची एकवाक्यता कधींच झाली नाहीं. पैठणास विद्वत्ता व पंढरपुरास साधुत्व गाजत होतें. पैठण, नेवासें हा भाग कर्मठ-पंडितांचा, तर आळंदी, पंढरपूर हा भाग संतांचें आदिस्थान. एकानें संस्कृत ग्रंथ देशी भाषेंत आणावे, तर दुसऱ्यानें आपलीं धर्मकृत्यें संस्कृत-भाषेंत गोंवून तीं चिरंतन करण्याचा प्रयत्न करावा. 'संस्कृत भाषा जगासि कळेना, म्हणुनी नारायणा दया आली,' असे कळवळ्याचे उद्गार नामदेव काढितो, तर हेमाद्रि स्वभाषेंतले आचार 'चतुर्वर्गचिंतामणीच्या' किल्ल्यांत कोंडून ठेवितो. गौतमबुद्धानें, व ज्ञानदेवानें संस्कृतांतलें ज्ञान मुद्दाम पाली व मराठी भाषेंत आणिलें, तर हेमाद्रि, नारायणभट्ट ह्यांनीं देशी भाषेंत असलेलें ज्ञान मुद्दाम संस्कृत भाषेंत अडकवून ठेविलें. या दोघांच्या उद्योगाची मर्यादा कधींच ठरलेली नव्हती. म्हणून, समजून वा न समजून, नीति व आचार, भगवद्भक्ति, व धर्मकृत्यें, ह्यांची आपल्या राष्ट्रांत ताटातूट झाली. संतमंडळींचा उपदेश प्रत्यक्ष व्यवहारांत पाळला पाहिजे, अशी बुद्धि राहिली नाहीं. देवळांत जाऊन कथापुराणें ऐकावीं, आणि घरीं आल्यावर स्नानसंध्या टिळेमाळांचा धर्माचार करावा, असा हा प्रकार हजारों वर्षें चालला आहे. या झगड्यांत आपले आचारादि ग्रंथ मराठी भाषेंत पूर्वीं कोणी केले नाहींत. अद्यापि सर्व संस्कार व विधि संस्कृतांतच होत असल्यामुळें जनसमूहास ते समजत नाहींत, आणि मराठींत केले असतां, ते यथाशास्त्र झाले असें कोणास वाटत नाहीं. ह्या विरोधाचा परिणाम काय झाला त्याचा विचार पुढील प्रकरणांत करावयाचा आहे.

अनेक साधुसंतांचा छळ झाला, त्यांत धर्म व व्यवहार यांचा हा विरोध स्पष्ट दिसून येतो. हा छळ कर्मठांनीं केलेला आहे. विचारवंतास निष्कारण छळ खपत नाहीं. अशा छळाबद्दल त्याच्या मनांत तिरस्कार उत्पन्न होणें हेंच सुधारणेचें बीज आहे. केवळ संन्याशाची प्रजा एवढ्याच-

मुळें ज्ञानेश्वराच्या बुद्धिमान कुटुंबाचा समाजाकडून छळ झाला, त्याबरोबर आपल्या धर्मस्थितीबद्दल त्यांच्या मनांत लख्ख प्रकाश पडला, त्यांस कर्मठपणाचा वीट आला. खरी ईश्वरभक्ति त्यांच्या मनांत बाणली. ढोंगी समाजाची त्यांस कींव उत्पन्न झाली. समाजाला सन्मार्ग दाखविण्याची जबरदस्त प्रेरणा त्यांच्या ठिकाणीं उद्‌भवली. केवळ आपला स्वतःचा उद्धार होऊन भागणार नाहीं, अखिल जनतेचा उद्धार केला पाहिजे; हेंच आपलें कर्तव्य, हेंच आपलें जिवितसाफल्य, अशा स्फूर्तीनें अज्ञ जनांस उद्धरण्यासाठीं, त्यांना समजेल अशा भाषेंत, ज्ञानदेवानें आपलें व्याख्यान प्रगट केलें. ह्याच उच्च भावनेच्या जोरावर नामदेवतुकारामांनी परमार्थ साधिला. ह्याच भावनेनें महार, चांभार वगैरे सर्व जातींचे संत परमेश्वराचे भक्त झाले, आणि सर्व जातींस वंद्य झाले. उपदेशाप्रमाणें चालणें हें त्यांच्या जीवितार्चे रहस्य होतें. धर्माचरण, व व्यवहार हे त्यांना सर्वथैव अभिन्न होते. युरोपांतही लूथर, लॅटिमर, रिड्ले, ब्रूनो ह्यांनीं केवळ सत्याकरितां अतोनात छळ सहन केला. विचारास खरें वाटलें तेंच त्यांनी प्रतिपादिलें. समाजाची पर्वा केली नाहीं. कॉन्‌शन्सकरितां त्यांनीं आपले प्राणही खर्चिले.

खरें पाहूं गेलें तर संतांनीं कोणताही सद्‌विचार सांगण्याचें बाकी ठेवलें नाहीं. असें असतां समाज कां सुधारला नाहीं ? सूक्ष्म विचारांतीं असें दिसून येतें कीं धर्म, नीति, सज्जनता, वगैरे विषय केवळ बोलण्याचे आहेत; ते प्रत्येकानें नेहमीं आपल्या आचरणांत पाळलेच पाहिजेत, म्हणजे तशी प्रत्यक्ष कृति केलीच पाहिजे, अशी अंतःकरणाची भावना आपल्याकडे कधींच उत्पन्न झाली नाहीं. आपला देव देवळांत, धर्माचार स्नानसंध्येंत, सदाचार कथापुराणांत, अशी आपली स्थिति आहे. म्हणूनच यथेच्छ धर्माचरण करीत असूनही, व्यवहारांत पाहिजे तें निंद्य कृत्य करितांना मन आपणास टोंचीत नाहीं. ज्यास इंग्रजींत कॉन्शन्स म्हणतात, ती चीजच आपल्याकडे उत्पन्न झाली नाहीं. ह्या कॉन्शन्सकरितां, ह्या मनाकरितां युरोपांत रणकंदनें झालीं, प्राणाहुती पडल्या. पण आपल्याकडे धर्म आणि व्यवहार यांची सदैव फारखत आहे. ही फारखत संतांच्यानें नाहींशी करवली नाहीं. समाजानें धर्माचाराला व्यवहारांत थारा दिला नाहीं. संताकडून राष्ट्रकार्य घडलें नाहीं.

६. **संतांच्या कामगिरीचा अंदाज.**—धर्मानें राष्ट्राचें संवर्धन होतें, आणि तो धर्म नेहमीं सुस्थितींत राहवा एतदर्थ पृथ्वीवर आजपावेतों अनेक

सुजाण पुरुषांनीं नानाप्रकारचे उद्योग केले आहेत. संतांचे कैवारी सांगतात, कीं इसवी सनाच्या चौदा, पंधरा व सोळा ह्या शतकांत पृथ्वीवर कित्येक ठिकाणीं धर्मजागृतीची एक प्रकारची विलक्षण चळवळ उठून गेली होती. ह्या चळवळीचें स्वरूप कित्येक देशांत अत्यंत स्मरणीय झालें आहे; आणि कित्येकांचा भावी इतिहास ह्या चळवळीच्या योगानें बदलून गेला आहे. धर्मसंबंधीं कलहांमुळें युरोपखंडांत तुंबळ रणकंदन माजलें होतें. त्याच वेळेस हिंदुस्थानांत व विशेषत: आपल्या ह्या महाराष्ट्रांत धर्मसुधारणेविषयीं विलक्षण प्रेरणा लोकांच्या मनांत उत्पन्न झाली होती. मात्र आपल्या देशांत त्यामुळें रक्तपात झाला नाहीं. हिंदुस्थानांत म्हणजे महाराष्ट्राच्या बाहेर मोगल बादशाहीच्या वेळेस धर्माच्या बाबतींत कोणते प्रकार घडत होते, हें पहिल्या भागांत विस्तारपूर्वक सांगितलें आहे (प्रकरण २३—१ व प्र० २७–५ ). युरोपांत इंग्लंड, जर्मनी, फ्रान्स व स्पेन वगैरे देशांचे प्रबळ राजे धर्माच्या बाबतींत पुढाकार घेऊन वर्तत होते, त्याचप्रमाणें हिंदुस्थानांत अकबरासारखे पुरुषही या कामीं उदासीन बसले नव्हते. महाराष्ट्रांत यादवांचा पाडाव होऊन मुसलमानी अमल सुरू झाल्यामुळें लोकांचे फार हाल होऊं लागले; त्या जाचांतून आपली सुटका करण्याकडे महाराष्ट्रीयांचें मन वेधलें असतां, त्या कामीं साह्य करणारे असे अनेक साधुसंत त्या वेळेस निपजले. धर्मसुधारणेवांचून राष्ट्रोन्नति व्हावयाची नाहीं. धर्म हें राष्ट्रोन्नतीचें एक मुख्य अंग होय, अशी त्या वेळीं सर्वांची भावना होती. धर्मास अवनति प्राप्त होऊन जपजाप्य, व्रतें, अनुष्ठानें इत्यादि प्रकार अतोनात वाढले. मूर्तिपूजेच्या नांवाखालीं अनाचार वाढला. पारमार्थिक सुखप्राप्तीच्या हांवेमुळें लोक इहलोकचीं कर्तव्यें विसरून गेले. जातिबंधनें अनावर होऊन, विचार, उच्चार, व आचार या संसारावश्यक त्रयीचा मेळ राहिला नाहीं. ही अनिष्ट स्थिति मोडून टाकण्यास महाराष्ट्रसंतमंडळानें केलेले प्रयत्न ऐतिहासिक दृष्ट्या महत्त्वाचे आहेत. ह्याच कारणास्तव शिवाजीसारख्या पुरुषास स्वराष्ट्रोन्नति करण्याचें सामर्थ्य प्राप्त होण्यास हेच प्रयत्न विशेषत: कारण झाले, असें पुष्कळांचें मत आहे.

वर जीं संत कवींचीं नांवें दिलीं आहेत, त्यांत सर्व वर्णांचे, व सर्व धंद्यांचे लोक आहेत. पुरुषांप्रमाणें बायकांनींही ह्या सन्मार्गदर्शनानें स्वदेश-

सेवा करण्याच्या कामांत चांगला पुढाकार घेतलेला दिसतो. वरील नांवांत सुमारें दोन–तृतीयांश अगर त्याहून थोडीं कमी इतकीं ब्राह्मणांचीं नांवें असून एक तृतीयांशाहून थोडे ज्यास्त ब्राह्मणेतर आहेत. बायकांमध्यें ब्राह्मणेतर बायकाच कदाचित् ज्यास्त आहेत. तथापि ह्यावरून म्हणजे कांहीं सामान्य सिद्धांत बांधतां येत नाहीं. कारण तसें करण्यास सर्व संत मंडळींचीं नांवें सांपडलीं पाहिजेत. सर्व विद्या, सर्व तत्त्वज्ञान, सर्व व्यावहारिक शास्त्रें पूर्वीं संस्कृत भाषेंत लिहिलीं जात. संस्कृत भाषा सामान्य जनसमूहास समजत नसे. अर्थात् वैद्यक, गणित, ज्योतिष असल्या लोकोपयोगी विषयांचें ज्ञान सुद्धां संस्कृत भाषेंत अडकून राहिलें होतें. मग तत्त्वज्ञानाचे, वेदान्ताचे, काव्यविनोदाचे सर्वच ग्रंथ संस्कृत भाषेंत होते हें सांगावास नकोच. हें सर्व ज्ञानभांडार नेहमींच्या बोलण्याच्या भाषेंत सर्व लोकांस समजेल अशा मनोवेधक रीतीनें संतांनीं आणून ठेविलें. ही समाजाची अत्यंत मोठी कामगिरी त्यांनीं केली आहे. या दृष्टीनें पाहतां, तुकाराम, एकनाथ, मुक्तेश्वर, श्रीधर इत्यादिकांचा जो उपयोग सामान्य जनसमूहास झाला, तो मोरोपंतासारख्या विद्वान कवीचाही झाला नाहीं. जाडेंभरडें अन्नवस्त्र मिळाल्यानें गरीबांची गुजरण होते, उंची पक्वान्नें व उंची अलंकार यांचा खप ऐषआरामी धनवान् लोकांस मात्र होतो, तद्वतच मोरोपंताच्या अलंकृत वाणीचा फायदा सामान्य अज्ञ जनवर्गास झाला नाहीं. यावरून ऐषआरामाचे पदार्थ निरुपयोगी आहेत असें नाहीं. देशाच्या भरभराटीस त्यांचाही उपयोग अत्यंत आहे. त्याचप्रमाणें भाषेच्या प्रौढतेस मोरोपंताची करामत अत्यंत उपयोगाची झाली, तथापि लोकशिक्षणाचें बहुतेक काम श्रीधरमहीपतीसारख्यांच्या साध्याभोळ्या वाणीनेंच तडीस गेलें. संतमंडळांत नांवाजलेले सर्वच पुरुष स्वतः विद्वान् होते असें नाहीं. आमच्यांतील व्यंगें काढून लोकांस सदुपदेश करण्याकडे स्वभावतःच त्यांची प्रवृत्ति झाल्यामुळें, अव्युत्पन्न असतांही त्यांच्या रसाळ वाणीचा उपदेश लोकांच्या मनावर फारच उत्तम ठसला. बोलल्याप्रमाणें कृति करून दाखविण्याचें अपूर्व सामर्थ्य त्यांजमध्यें असल्यामुळें लोकांचा त्यांजवर विश्वास बसला. व्रतसंतर्पणांत निमग्न झालेल्या उपाध्यायवर्गाचा पगडा जनसमूहावर होता, तो काढून टाकून ह्या संतमंडळींनीं लोकांस स्वतंत्रतेनें विचार करण्यास शिकविलें. स्वतंत्र विचाराचे विद्वान् पुरुष एकदां मनाची

खात्री झाल्यावर आपला उद्देश सोडीत नाहींत. ते समाजास इष्ट दिशेकडे घेऊन जातात. त्यास सन्मार्गास लावितात.

संतमंडळीनें धर्मसुधारणेच्या काय गोष्टी केल्या, ह्याजबद्दल पुष्कळ मतभेद आहे. पाश्चात्य देशांतील धर्मजागृतीचा इतिहास ज्यांनी वाचिला असेल, त्यांस दोन भिन्न ठिकाणीं चाललेल्या ह्या धर्मसुधारणेंत किती साम्य होतें हें कळून येईल. संस्कृतांतील ग्रंथांचें सार संतांनीं महाराष्ट्रांत आणिलें, हा त्यांचा अत्यंत स्मरणीय उद्योग होय. मात्र एवढें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, ब्राह्मणेतरांस वाचण्यास हरकत नाहीं, अशा ग्रंथांचींच मराठींत रूपांतरें झालीं. नित्यनैमित्तिक कर्मांचीं, संस्कारांचीं, स्मृतींचीं वगैरे भाषांतरें मराठींत कोणीं केलीं नाहींत.

धर्मशिक्षण व धर्मसंरक्षण हीं कामें आचार्य म्हणविणाऱ्या ब्राह्मण मंडळींच्या हातांत होतीं. हे ब्राह्मण बहुशः यज्ञयागादि कृत्यांत गढून गेलेले असत; आणि तशा कृत्यांनींच त्यांचें इतर जातींवर महत्त्व होतें. ब्राह्मण जन्मतःच वरिष्ठ मानले गेल्यामुळें, त्यांनीं शिकविलेल्या कर्ममार्गांवांचून इतर मार्गांनीं ईश्वरप्राप्तीचें साधन लोकांस ठाऊक नव्हतें. ही स्थिति मोडून टाकण्याविषयीं संत मंडळींनीं जबरदस्त प्रयत्न केला. पाहिजे त्यानें आपल्या इच्छेनुरूप भक्तिपूर्वक व मनोभावानें ईश्वरोपासना केली असतां त्यास देव पावतो, अमुकच मार्गानें ईश्वराराधना करण्याचें कारण नाहीं, केवळ अमुक कुळांत जन्मल्यानें कोणासही श्रेष्ठत्व प्राप्त होत नाहीं, ईश्वरास सर्व प्राणी सारखेच प्रिय आहेत, इत्यादि उदात्त विचार या साधूंनीं लोकांस शिकविले, आणि स्वोदाहरणानें ते त्यांच्या मनावर ठसविले. त्याचप्रमाणें योगसाधन, संन्यासधारण, मठवास इत्यादि ईश्वरप्राप्तीचे प्रचलित मार्ग गर्हणीय असून, संसारांत राहून ईश्वरप्राप्तीचें साधन अशक्य नाहीं, ही गोष्ट संतलोकांनीं लोकांच्या निदर्शनास आणून दिली.

परमेश्वरस्वरूपाविषयीं उदात्त व योग्य कल्पना संतांनीं लोकांस शिकविली. ख्रिस्ती लोकांची आपल्या देवाविषयीं कल्पना व आर्य लोकांची कल्पना ह्यांत महदंतर आहे. प्रमादांचा दंडक व मनुष्यांस शिक्षा करणारा न्यायाधीश, असें परमेश्वराचें स्वरूप इतर धर्मांत मानलें जात असतां, आपल्या इकडे ईश्वर म्हणजे मायबाप, भाऊबंद, सोयरा, न्याय व दंड करितांना सुद्धां आईबापांप्रमाणें प्रीति ठेवणारा असें त्याचें स्वरूप समजलें

जातें. ईश्वर दयाळु आहे, प्रेमाळु आहे, तो भक्तांच्या संकटनिवारणार्थ धांवून येतो, भक्तांबरोबर जेवतो, बोलतो, अशा प्रकारची कल्पना संतमंडळीच्या उपदेशांत व त्यांच्या आयुष्यक्रमांतील अनुभवांत पदोपदीं व्यक्त होते. परमात्म्याच्या अहर्निश सानिध्याच्या अनुभूतीनें यथेष्ट प्राप्त झालेलें ईश्वरप्रेम संतमंडळाच्या वचनांत पदोपदीं व्यक्त होतें.

ईश्वरप्राप्तीचे अनेक मार्ग प्रचारांत होते व हल्लीं आहेत. कोणी योगाभ्यास करितात, कोणी यज्ञयागादि कर्में करून ईश्वरप्राप्तीची अपेक्षा करितात. कोणी जपजाप्य व नियम आचरितात, कोणी ज्ञानमार्गानें जातात, आणि कोणी ईश्वरावर अत्यंत प्रेम ठेवून त्याची भक्ति करितात. शेवटचा भक्तिमार्ग हा सर्वांस सुलभपणें साधणारा आहे, त्यापासून ईश्वरप्राप्तीचा अनुभव जितका लवकर व निखालस होतो, तितका दुसऱ्या मार्गानें होणें शक्य नाहीं, शिवाय तो मार्ग पतकरणाराच्या अंगीं एक प्रकारचें विलक्षण ऐक्य उत्पन्न होऊन ते लोक कोणतेंही काम जुटीनें करण्याविषयीं तत्पर असतात. भर पावसांत शेतींचें काम टाकून पंढरीच्या यात्रेस लोकांच्या झुंडी अद्यापिही कशा जात आहेत, हें मनांत आणिलें, म्हणजे वरच्या विधानाची सत्यता कळेल. भक्ति व ज्ञान यांचे योगानें मन पवित्र झाल्यावर परोपकार घडण्यास उशीर लागत नाहीं. या भक्तीच्या जोरावर महाराष्ट्रसाधूंनीं आपल्या लोकांस सन्मार्गास लाविलें. संसारांतील त्रास व चिंता यांस चुकविण्याकरितां एकांतवास सेवन केल्यापासून राष्ट्रास दुर्बलता येते; ती घालविण्याकरितां संसारांत राहून परमार्थसाधनाचा मार्ग संतमंडळींनीं लोकांस दाखविला.

एकनाथकालीन मंडळीनें मुसलमानी अमदानींतील जाच पूर्णपणें अनुभविला होता. ‘ देवा आम्हांस ह्या जाचांतून सोडीव ’ अशी त्यांची भावना होती. म्हणून त्यांची भाषाही तितकीच कळवळ्याची आहे. पूर्वीचा ज्ञानदेवाच्या वेळचा मराठी भाषेचा अगदींच साधाभोळा असा वेष पालटून एकनाथाच्या वेळेस ती थोडीशी नीटनेटकी, व सर्वस्वी सोज्वल नाहीं, तरी संभावित वेषाची अशी दिसूं लागली. एकनाथाच्या अंगीं कित्येक बाबतींत ज्ञानेश्वरी वळण लागलेलें होतें. पण ग्रंथवृद्धि करून लोकांस सदुपदेश करणारा पहिला मोठा साधु हाच झाला. हा कांहीं अंशीं पाश्चात्य धर्मसुधारक लूथर याचा समकालीन होता; आणि

तुकारामाचे वेळेस तर युरोपांत खिस्ती धर्मसुधारणा कायम झाली होती. स्वधर्माची अवनति झाल्यामुळें लोकांस नीतिपंथास लावण्याची कळकळ एकनाथी शाखेचे विचारांत विशेष जोराची अशी दिसून येते. परंतु लूथरप्रमाणें उपदेश व आचार ह्या दोहोंची सांगड घालून जनसमूहास नवीन धर्मवळण लावण्याचा एकनाथी संतांचा प्रयत्न सिद्धीस गेला नाहीं. अर्थात् जुन्या मतास झुगारून नवीन पंथ स्थापन करणाऱ्या लूथरप्रमाणें एकनाथी शाखेचा उद्योग फलद्रूप झाला नाहीं; आणि धर्माचरणास नवीन वळण लागलें नाहीं.

सतराव्या व अठराव्या शतकांत कवित्वाचा प्रभाव विशेष दिसतो. मोरोपंत, अमृतराय, अनंतकवि, श्रीधर, महीपति, रामजोशी व अली-कडचे दुसरे अनेक कवी ह्या शाखेंत येतात. ह्या शाखेनें मराठ्यांच्या सत्तेचा प्रभाव पूर्णपणें पाहिला. फार काय, ह्यांस परकीय सत्तेच्या जाचाची कल्पनाही नव्हती असें दिसतें. अर्थात् त्यांचें साधुत्व मागें पडलें अगर मुळींच जिरून गेलें, व त्याचें जोडीदार दुसरें अंग जें कवित्व त्याची मात्र विशेष वृद्धि झाली. मराठी भाषेचें आज आपणास दिसणारें जोर-दार स्वरूप या वेळेस उत्पन्न झालें. ती भाषा सुस्वरूप, ऐटबाज, राज-दरबारांत शोभणारी व सर्वांचें मन आपल्याकडे ओढून घेणारी अशी बनली. विशेषत: भाषा सुसंस्कृत करण्याचेच प्रयत्न ह्या वेळीं झाले. साधुत्व नाहींसें झाल्यामुळें धर्माचा विचार मागें पडला. स्वराज्याखालीं ऐषआराम भोगण्यास मिळूं लागल्यामुळें धर्मसुधारणेचा विचार मनांत राहिला नाहीं. पांघरण्यास कांबळी अगर पोटास दोन घांस मिळण्याची पंचाईत, अशी जी मागें स्थिति होती, ती जाऊन, स्वराज्याखालीं लोकांस ददात न उरल्यामुळें त्यांचें लक्ष ऐषआरामाकडे वळलें. मग साध्याभोळ्या अभंगांस कोण विचारतो! नवीन पद्यरचना, नवीन गोडगोड आख्यानें, नवीन तऱ्हेचीं संगीतयुक्त व साजदार कीर्तनें व तमाशे अशांची रेलचेल झाली. सुंदर व ठेकेदार पदें, कर्णमधुर कटाव, लावण्या, फटके इत्यादि एकावर एक ताण करणारे नवीन नवीन कवन-प्रकार काढून, लोकांचीं मनें आकर्षून घेण्याचे प्रयत्न सुरू झाले. राम-दासाच्या वेळेस, स्वराज्य, स्वदेश, स्वधर्म, हे विषय लोकांपुढें होते, ते पुढें बंद पडले. कारण या विषयांची आतां जरूरच नाहींशी झाली.

तुकारामाच्या वेळचें परमेश्वराचें साधें भोळें स्वरूप नाहींसें होऊन, तोही आतां ऐषआरामाच्या वेषानें श्रीमंती थाटास शोभणारे असे क्रीडेचे नवीन नवीन प्रकार करूं लागला. सारांश, क्रिया झाल्याबरोबर प्रतिक्रिया व्हावी लागते, या शास्त्रीय नियमास अनुसरून, धर्माच्या बाबतींत, स्वराज्यसंरक्षणांत व इतर हरएक विषयांत, आतां प्रतिक्रिया सुरू झाली. जातिभेद, मूर्तिपूजा, यज्ञयागादि कर्ममार्गावलंबन इत्यादि विषयांचा पूर्वींच्या साधूंनीं निषेध केला असतांही, तेच विषय पुनः लोकांस आवडूं लागले. धर्मसुधारणेचें चक्र मूळ पदावर आलें.

---

# प्रकरण तिसरें.

## महाराष्ट्रांतील पूर्वकालीन घडामोडी.

१. प्राचीन राजवंशांची राजनीति. २. मराठा घराण्यांची उत्पत्ति.
३. मराठी भाषेची उत्पत्ति. ४. मोडी लिपीची उत्पत्ति.
५. मुसलमानी राज्याचा मराठी भाषेवर परिणाम. ६. संस्कृत व संतांच्या वाङ्मयाचा विरोधी परिणाम.
७. महाराष्ट्र धर्म. ८. रामदासाची योग्यता.
९. शिवाजीच्या राज्यस्थापनेंत रामदासाचा भाग.

**१. प्राचीन राजवंशांची राजनीति.**—शातवाहनांपासून यादवांपर्यंत जे राजवंश महाराष्ट्रांत झाले, त्यांचा कल उत्तरोत्तर मराठमय होण्याकडे दिसून येतो. म्हणजे त्या सर्वांचें पूर्ण विकसित स्वरूप आधुनिक मराठ्यांचे ठिकाणीं उतरलेलें दिसतें. हें स्वरूप उत्तरोत्तर वृद्धिंगत होत जाऊन यादवांच्या वेळेस तें पूर्ण विकास पावलें; आणि तेंच पुनः शिवाजीच्या वेळेपासून प्रादुर्भूत झालें. मध्यंतरीं तीनशें वर्षांच्या मुसलमानी अंमलानें तें स्वरूप दबून होतें, विशेष विकृत झालें नाहीं. कौटुंबिक कलह, उत्कर्षाची व स्वतंत्रतेची हाव, दुसऱ्यांस न जुमानतां स्वतःच कोठें तरी दूर जाऊन नशीब काढण्याची प्रवृत्ति, अनिवार अडचणींत अंगचा पीळ न गमावणें, इत्यादि बाबतींत मराठ्यांचें स्वभाववैचित्र्य

जसें या वेळेस किंवा पेशवाईत दिसून येतें, तसेंच तें पूर्वीच्या चालुक्यांत, राष्ट्रकूटांत किंवा यादवांत, अथवा मावळच्या देशमुखांत दिसून येतें. पूर्वीच्यांचे स्वभावदोष व स्वभावगुण दोनही उत्तरकालीन मराठ्यांत उतरलेले दिसतात. अशा सूक्ष्म दृष्टीनें पहिल्या प्रकरणांतील हकीकती वाचून पाहिल्या, म्हणजे ह्या गोष्टी स्पष्ट कळूं लागतात.

विद्या, कला, भाषा, ग्रंथसंग्रह, धर्म, व्यापार, इत्यादि बाबतींत महाराष्ट्र समाजाची हजार वर्षें उत्तरोत्तर उत्क्रान्ति होत गेली. ह्या उत्क्रान्तीचें रम्य स्वरूप यादवांचे वेळेस दृष्टीस पडतें. राजव्यवहारशास्त्राचे बाबतींत मात्र ही उत्क्रान्ति दिसून येत नाहीं. युरोपियन इतिहास व आपला इतिहास ह्यांजमध्यें हा मोठा फरक दिसून येतो. परकीय हल्ल्यांपासून राज्याचा बचाव करण्यास काय उपाय करावे, आणि समाजाचें सुख व शान्ति कशी साधावी, ह्यांचा विचार प्राचीन ग्रीक व रोमन राष्ट्रांनीं, व आधुनिक युरोपियन राष्ट्रांनीं करून एक प्रकारची राष्ट्रसंघपद्धति निर्माण केली. युरोपांत निरनिराळ्या लहान मोठ्या राष्ट्रांच्या बचावासाठीं त्यांचा समतोलपणा राखण्याचें तत्त्व ( Balance of power ) हळूहळू अंमलांत आलें, आणि राष्ट्रांचे अन्योन्य व्यवहार नियमन करणारा कायदा (International law ) तयार झाला. ह्या उपायांचा जरी नेहमींच उपयोग झाला असें नाहीं, तरी त्या योगें राजव्यवहारशास्त्राची उत्क्रान्ति होत असून सर्व युरोपियन समाजास त्याचा मोठा फायदा मिळत आहे. ह्या बाबतींत हिंदुस्थान व युरोप ह्यांची स्थिति आरंभीं सारखी होती. युरोपप्रमाणेंच हिंदुस्थानांत अनेक लहान मोठीं राज्यें असून, त्यांचे सदैव झगडे चालू असत. एखादा पराक्रमी राजा पुढें आला, म्हणजे तो इतरांवर आपला दाब बसवी, आणि कांहीं काळपावेतों शांतता व लोकव्यवहार सुरळीत चालत; परंतु असा कर्तृत्ववान् पुरुष नाहींसा झाल्याबरोबर पुनः सर्व प्रकार पूर्वस्थितीवर येत. पुलकेशी, हर्ष, भोज, विक्रमादित्य, सिंघण यादव इत्यादि राजे महापराक्रमी झाले. विद्याकलांची भरभराट त्यांच्या वेळेस झाली. परंतु भिन्नभिन्न राज्यांच्या परस्पर व्यवहारांस नियमित वळण लावून देण्याची कल्पनाच कोणाचे मनांत आलेली दिसत नाहीं. ज्या हेमाद्रीनें 'चतुर्वर्गचिंतामणि' हा धर्मसंबंधीं ग्रंथ लिहिला, त्यास राजनीतीसंबंधानें तसाच प्रयत्न करणें अशक्य नव्हतें. राजे आणि त्यांचे सल्लागार

ह्यांनीं असा प्रयत्न केला असता, तर परचक्राचे वेळीं त्याचा कांहीं तरी उपयोग झाला असता. उत्तर मराठशाहीच्या वेळेसही हाच प्रकार दिसून येतो.

चार वर्णांचीं कर्मे वांटलीं गेलीं, हें राजनीतिशास्त्राचा इकडे उद्भव न होण्याचें एक कारण आहे. क्षत्रियांना वाटे, लढणें व प्रजापालन करणें हेंच आपलें कर्तव्य. ज्यानें लढून पराक्रम केला नाहीं, त्याला आपलें जिणें व्यर्थ वाटे. असा समज सार्वत्रिक असल्यामुळे, पुष्कळ राजे, कारण नसतां, केवळ विजयलालसेनें,युद्धप्रसंग सुरू करीत.'अमोघवर्ष,' जगत्तुंग,'निरुपम,' 'प्रतापचक्रवर्ती,' इत्यादि प्रचंड नांवें त्यांनीं धारण केलीं. ह्यावरून वरील विधान खरें ठरतें. मोठें नांव मिळवायचें म्हणजे अश्वमेधयज्ञ करून. सारांश, पूर्व कालीं जे जे पराक्रमी म्हणून राजे होऊन गेले, त्यांनीं कितीही लोकोपयोगी कृत्यें केलीं असलीं, तरी दुसऱ्या राजांस आपले मांडलिक बनविण्यांत त्यांना मोठें भूषण वाटे. अर्थात् राजव्यवहारशास्त्र निर्माण करून, आपली कर्तव्यमर्यादा आपण होऊन संकुचित करणें कोणासही आवडणारें नव्हतें. ह्याचा परिणाम काय झाला कीं, आपआपसांत संघशक्ति उत्प झाली नाहीं, आणि सिकंदर, महंमदघोरी, किंवा अलाउद्दीन यांचे पु० आमचे राजे पराक्रमी असूनही हार गेले. हा प्रकारही पुढील मराठशाहींत दिसून येतो.

*स.७११ त महंमद कासीमनें सिंधप्रांत जिंकिला,* तेव्हां कनोज व भिनमाळ येथील गुर्जर रजपूत राजांनीं ऐक्य करून, मुसलमानांस सिंधप्रांतांतून हाकून देण्याचा शेंपन्नास वर्षे सारखा प्रयत्न चालविला. पण ह्या प्रयत्नास दक्षिणच्या राष्ट्रकुटांनीं साह्य केलें नाहीं, इतकेंच नव्हे, तर त्यांनीं आरब-मुसलमानांशीं दोस्तीचे संबंध ठेविले (Vincent Smith p. 430). आरब व्यापारी व प्रवासी सारखे शेंपन्नास वर्षे राष्ट्रकूटांकडे येत होते, त्यांनीं त्या राज्यांचीं वर्णनें लिहून ठेविलेलीं आहेत, त्यांवरून राष्ट्रकूटांचें राज्य अत्यंत भरभराटींत होतें असें दिसतें. आरबलोक ह्या राजांस 'वल्लभ' ह्या नांवावरून 'बल्हारा' असें म्हणत.

संघशक्तीचा मुद्दा सोडून दिला म्हणजे, व्यक्तिशः बहुतेक सर्व राजांस लोकप्रियतेची व कीर्तीची हौस असून,शास्त्रानें सांगितलेलीं राजांचीं कर्तव्यें तडीस नेण्यास ते सदैव तत्पर असत. लोककल्याणासाठीं आपलें जिणें आहे, आपला पराक्रम व आपलें द्रव्य लोककल्याणार्थच खर्च केलें पाहिजे

अशी त्यांची भावना होती. ते सर्व मोठे उदार व धार्मिक होते. 'सत्याश्रय,' 'पृथ्वीवल्लभ,' 'प्रभूतवर्ष,' 'समस्तभुवनाश्रय,' इत्यादि त्यांनीं स्वीकारिलेलीं विशेषणें त्यांच्या कर्तव्यपरायणतेचीं निदर्शक आहेत. ब्राह्मणांस व देवस्थानांस दिलेल्या असंख्य देणग्यांचे ताम्रलेख उपलब्ध आहेतच. शिवाय मंदिरें, लेणीं, किल्ले, तलाव इत्यादि त्यांचीं अनेक उपयुक्त कामें अद्यापि जिवंत आहेत. बिल्हणाचें 'विक्रमांकदेवचरित्र,' विज्ञानेश्वराची 'मिताक्षरा,' ज्ञानदेवाची 'ज्ञानेश्वरी' इत्यादिकांवरून विद्येस त्या राजांचा मोठा आश्रय होता असें दिसतें. अनेक राजांस संस्कृतभाषा उत्कृष्ट येत होती. ब्राह्मण बहुधा यज्ञयागांत व ग्रंथलेखनांत निमग्न असत. उत्तरोत्तर ते राजकामांत, युद्धांत व इतर धंद्यांत पडूं लागले. गांव-पंचायतीची व्यवस्था सर्वत्र चालू होती, आणि परचक्र आलें अगर देशांत युद्धप्रसंग झाले, तरी ह्या गांवपंचायतींमुळें समाजाचे व्यवहार सुरळीत चालत. पुढील मराठशाहीच्या स्थितीशीं हे प्रकार ताडून पाहतां येतील.

२. मराठा घराण्यांची उत्पत्ति.—पहिल्या प्रकरणांत प्राक्कालीन राजवंशांची हकीकत दिली आहे, तिजवरून हल्लींच्या मराठे घराण्यांची उत्पत्ति कशी झाली हें अनुमानितां येईल. उत्तरेंतून आर्यलोकांचीं निर-निराळीं घराणीं निरनिराळ्या वेळीं महाराष्ट्रांत आलीं. त्यांनीं निरनिराळ्या भागांत वसाहती केल्या, त्यांस नवीन नांवें दिलीं, आणि तेथें आपले आचारविचार चालू केले. नंतर त्यांनीं ठिकठिकाणीं अनेक लहान मोठीं राज्यें स्थापन केलीं. कित्येक राज्यें फार भरभराटींत आलीं; कित्येक महामंडलेश्वराच्या म्हणजे मांडलिक स्थितींत राहिलीं. कित्येकांस राज्यपद-प्राप्ति झालीच नाहीं; ते केवळ मोठ्या राजांच्या पदरीं थोडीबहुत वतनें संपादून राहिले. ह्या सर्व घराण्यांचे एकमेकांशीं व उत्तरेंतील घराण्यांशीं शरीरसंबंध होत असत. पाडाव झालेल्या घराण्यांतील राजकन्यांचे विवाह पुष्कळदां जेत्यांच्या घराण्यांशीं होत. चालुक्य, राष्ट्रकूट, भोज, रट्ठे, राष्ट्रिक, मौर्य, कदंब, सेन्द्रक, शिलाहार, यादव, होयसल वगैरे कित्येक वंशांचा इतिहास प्रत्यक्ष मिळतो. हे सर्व केव्हां तरी कारणपरत्वें दक्षिणेंत आले, व ह्यांच्या शाखा ठिकठिकाणीं पसरल्या आणि त्यांजपासून हल्लींचे मराठ्यांचे वंश बनले असें दिसतें. (पहा पिंपरी येथील राष्ट्रकूटांचा ताम्रपट–प्रभात, शके १८२८). ह्यांशिवाय आणखी

किती तरी वंश इकडे आले असतील, पण हल्लींच्या विस्तृत जनसंघांत त्या सर्व घराण्यांच्या मिश्रणाचें पृथक्करण करून प्रत्येकाचें मूळ ठरविणें हें काम बिकट आहे. आर्यलोक हिंदुस्थानांत आले, तेव्हांच येथील मूळच्या द्राविड वगैरे लोकांशीं त्यांचें मिश्रण होऊं लागलें. दक्षिणेंत आल्यावरही हें मिश्रण वाढत गेलें. महाराष्ट्रांतला पहिलाच राजवंश आन्ध्रांचा होता. त्यांसच 'शालिवाहन' नांव मिळालें. कालांतरानें त्यांचाही इतर घराण्यांशीं संबंध जडला. मात्र सर्वत्र मूळच्या आर्यांचें प्रमाण कायम किंवा किती अंशानें होतें, हें भाषा, आचार, शरीररचना इत्यादि गोष्टींवरून निश्चित होतें. आर्यांची चातुर्वर्ण्यव्यवस्था, ते कोठेंही गेले तरी, कायम राहिली. कोठेंही नवीन वसाहत झाली, कीं तेथें ही चातुर्वर्ण्यव्यवस्था चालू होत असे. चन्द्रवंशी व सूर्यवंशी घराण्यांचा भेद वेदकाळापासून चालू आहेच. हल्लींचीं आडनांवें अमुक एका कारणानें उत्पन्न झालीं असें नाहीं. केव्हां पराक्रमी व्यक्तीवरून, केव्हां पूर्वींच्या नांवाचा अपभ्रंश होऊन, केव्हां धंद्यावरून, केव्हां अलौकिक कृत्यांवरून, केव्हां गांवावरून इत्यादि अनेक प्रकारांनीं हल्लींचीं क्षत्रिय मराठ्यांचीं व इतर जातींचीं सुद्धां, आडनांवें प्रचारांत आलीं आहेत. जुने रिवाज कायम राखण्याकडे आमची पूर्वापार जबरदस्त प्रवृत्ति असल्यामुळें, आणि विवाहादि संबंधांत आपले रिवाज आम्ही सोडीत नसल्यामुळें, जाति व वंश सामान्यतः प्रचलित प्रघातांवरून ओळखूं येतात. शिवाजीनें राज्य स्थापन केलें त्या वेळीं कोंकणांत व घांटमाथ्यावरील प्रदेशांत अनेक क्षत्रिय घराणीं ठिकठिकाणीं नांदत होतीं. हीं घराणीं क्षत्रियांचीं होतीं. शेतकरी पेशांत पडल्यामुळें त्यांना हीनजाति समजणें सर्वथैव चूक होय. हिंदुस्थानांतील राजवंश, जाती, भाषा व धर्म हे प्रकार उलगडण्यास S Krishna Swami Aiyangar's 'Ancient India,' हें पुस्तक फार उपयोगी आहे.

भोसल्यांचा वंश उदेपूरच्या घराण्यापैकीं नव्हे, असें प्रतिपादन करण्यांत येतें. त्यास साधार कारणें मात्र कोणी देत नाहीं. मौर्य, भोज, चालुक्य, यादव इत्यादि अनेक वंश उत्तरेंतून दक्षिणेंत आले. तशींच दक्षिणेंतील अनेक घराणीं कारणपरत्वें उत्तरेंत कायमचीं जाऊन राहिलीं आहेत, असेंही आपण पाहतों. फलटणचे निंबाळकर हे धारचे परमार होत. हा प्रघात जर अव्याहत शेंकडों नव्हे हजारों वर्षें चालू आहे, तर उदेपूरच्या कुटुं-

बाची शाखा इकडे आली नाहीं कशावरून ? एकट्या चालुक्यांचे किंवा यादवांचे किती तरी वंश ठिकठिकाणीं पसरले. भोसले आपली उत्पत्ति उदेपूरच्या घराण्याशीं जोडतात. निंबाळकरांनीं व यादवांनीं त्यांच्याशीं शरीरसंबंध केले. वंशसंकरासंबंधानें आम्ही कडक नियम पाळीत असतां भोसल्यांच्या कुळासंबंधानें तीनशें वर्षे जर सारखी सर्वांची व विशेषत: त्या घराण्याची एकवाक्यता आहे आणि सर्व बखरकार व कागदपत्र तीच ग्वाही देतात, तर ह्या प्रकार, भरपूर पुराव्याशिवाय, खोटा मानतां येणार नाही. सारांश, हल्लींच्या मराठ्यांचे उगम समजण्यास वरील विवेचन व पहिल्या प्रकरणांतील राज्यांच्या हकीकती उपयोगी पडतील. उत्तरेंतील रजपूत कुलांची उत्पत्ति दक्षिणेंतल्या सारखीच मिश्र आहे.

'परकीय जातींचा आपल्यांत मिलाफ करून घेण्याची विलक्षण शक्ति प्राचीन आर्यांचे अंगीं होती. ज्या ज्या ठिकाणीं ते गेले, तेथील मूळच्या लोकांस त्यांनीं आपल्यांत सामील करून घेतलें; आणि त्यांना आपली संस्कृति व चातुर्वर्ण्यादि आपले प्रचार लागू केले. शक, यूची, हूण वगैरे अनेक जातींचे लोक परराष्ट्रांतून हिंदुस्थानांत आले, त्या सर्वांचा मिलाफ कालांतरानें येथील समाजांत बेमालूम झाला. शक वगैरे अनेक परकीयांनीं परदेशांतून येऊन येथें राज्यें स्थापिलीं. त्यांचा अंतर्भाव अल्पावकाशांत येथील आपल्या समाजांत होऊं लागला. पांचव्या व सहाव्या शतकांत रानटी लोकांच्या अनेक टोळ्या हिंदुस्थानांत घुसल्या, त्यांचा मिलाफ रजपुतांत झाला. 'परिहार' नांवाचा जो एक प्रसिद्ध रजपूत वर्ग आहे, तो प्रथम अशा रीतीनें बाहेरून आलेला आहे. परिहारांपैकीं ज्यांनीं राज्यें स्थापिलीं ते रजपूत बनले, आणि त्यांतील बाकीचे लोक 'गुजर' ह्या नांवानें प्रसिद्धीस येऊन त्यांजवरून गुजराथ प्रांत उत्पन्न झाला. गोंड, भार, खर्वार वगैरे कित्येक मूळच्या जाती होत्या, त्यांना पुढें आर्यसंस्कृति प्राप्त होऊन, राज्यप्राप्ति झाल्यावर ते चंडेल, राठोड, गहर्वार ह्या नांवाचे रजपूत बनले. पुढें आपल्या वंशाची थोरवी दाखविण्याकरितां त्यांनीं आपली वंशावळ चंद्रसूर्यापर्यंत नेऊन पोंचविली.' (Vincent Smith p 322.)

असाच प्रकार दक्षिणेंतही झाला. मात्र दक्षिणेंत बाहेरचे लोक फारसे न येतां, उत्तरेंतलेच लोक दक्षिणेंत आले आणि त्यांतच दक्षिणेंतील मूळच्या

लोकांचा मिलाफ झाला. अर्थात् रजपूत तेवढे अस्सल क्षत्रिय व इतर कमी योग्यतेचे असें ठरविण्यास इतिहासाचा आधार बिलकुल नाहीं. उलटपक्षीं ही प्रवृत्ति आर्योंच्या मूळ स्वभावास विरुद्ध आहे. जातिसंघ वाढविण्याकडे मूळच्या आर्यांची प्रवृत्ति असती, तर हिंदु राष्ट्र व हिंदु धर्म हीं इतके दिवस हयातच राहिलीं नसतीं.

३. मराठीभाषेची उत्पत्ति.—मराठी भाषा कशी व केव्हां उत्पन्न झाली ह्याचा विचार करितांना फार प्राचीनकाळापर्यंत जावें लागतें. इ. स. पू. ८०० नंतर व ५००च्या पूर्वीं आपल्या पूर्वजांनीं महाराष्ट्रांत वसती केली. त्या वेळेसच गौतमबुद्धाचा अवतार झाला. गौतमबुद्धाच्या वेळेस संस्कृत भाषा बोलण्यांत नव्हती; म्हणूनच सर्व लोकांस समजणाऱ्या पाली भाषेंत त्यानें आपला उपदेश केला. लोकांच्या बोलण्यांतील देशी भाषा इतक्या प्रौढतेस पोंचल्या याचें मुख्य कारण बुद्धधर्म होय, असें विद्वानांचें म्हणणें आहे. पाली भाषा बुद्धाच्या नंतर सुमारें एक हजार वर्षें मगध देशाच्या बाजूस सुरू होती, आणि त्या वेळीं इतर भागांत प्राकृत भाषा चालू होत्या. पाली भाषेचा उत्तम मासला अशोकाच्या वेळेस म्ह. इ. स. पू. २५० सुमारास पाहवयास मिळतो. अशोकानें निश्चित केलेलें बुद्धांचें धर्मपुस्तक ह्या वेळचें आहे. मिलिंदप्रश्न म्हणून दुसरा एक पाली भाषेंतला चांगला ग्रंथ आहे, तो इ. स. पू. दीडशें वर्षांचा असावा. संस्कृतावरून देशभेदानें थोडथोड्या फरकानें प्राकृत भाषा उत्पन्न झाल्या. हा फरक कालपरत्वें झालेला नाहीं; तर कमी संस्कृतीच्या लोकांना उच्च संस्कृतीची भाषा उचलणें जरूर पडतें, तेव्हां जो फेरबदल होतो, तो प्राकृतांत दृष्टीस पडतो. प्राकृत म्हणजे सामान्य लोकांची भाषा. प्राकृत भाषांच्या संख्येविषयीं वैय्याकरणांत मतभेद आहे. तथापि महाराष्ट्री, शौरसेनी, मागधी व पैशाची ह्या चार मुख्य प्राकृत भाषा समजल्या जातात; आणि त्यांचीं व्याकरणेंही झालेलीं आहेत. भाषेचें अत्युत्तम व्याकरण झालें म्हणजे ती भाषा पूर्णावस्थेस पोंचली, असें म्हणण्यास हरकत नाहीं. अशा व्याकरणांच्या योगानें लेखकांच्या स्वैर इच्छेस आळा पडतो, आणि ती भाषा बहुशः वृद्धि पावत नाहीं. असाच प्रकार प्राकृत भाषांचा झाला. वररुचीनें प्राकृत भाषांचें व्याकरण लिहिलें, त्यास ‘ प्राकृतप्रकाश ’ असें म्हणतात. हा वररुचि इ. स. पू. पहिल्या शतकांत

झाला. वार्तिककार वररुचि तो हा नव्हे. वरील चार भाषांपैकीं महाराष्ट्री हीच अधिक सुधारलेली व विस्तृत होती. तिचा प्रचार महाराष्ट्रांत व महाराष्ट्राबाहेर गुजराथ व माळवा ह्या प्रांतांतही होता. शौरसेनी मथुरेच्या बाजूस, व पैशाची सिंध, पंजाब, काश्मीर ह्या प्रदेशांत चालू होती. मागधीचा विस्तार पूर्वेकडे होता. या प्राकृत भाषांपासून हल्लींच्या भाषा निघाल्या. महाराष्ट्रीची कन्या मराठी; शौर्यसेनीची व्रजभाषा व हिंदी; मागधीची बंगाली; आणि पैशाचीपासून काश्मिरी, मुलतानी, व सिंधी ह्या भाषा उत्पन्न झाल्या.

महाराष्ट्री भाषा इ. स. ६०० पावेतों महाराष्ट्रांत प्रत्यक्ष वापरण्यांत येत असे. ही फार ऊर्जित दशेला आलेली होती. महाराष्ट्रांतील लोक पहिल्यापासून हुशार व विद्यासंपन्न असल्यामुळें महाराष्ट्रीचा उत्कर्ष विशेष झाला. लोकांचा स्वभाव नेहमीं भाषेंत उतरत असतो, हें तत्त्व ध्यानांत ठेविलें म्हणजे मराठी भाषा व मराठे लोक, यांचा परस्परावलंब ध्यानांत येईल. महाराष्ट्री भाषेंत पुष्कळ ग्रंथरचना झालेली असून, साहित्यकारांनीं तिची महती वर्णिलेली आहे. इ. स. च्या पहिल्या शतकांत शालिवाहन वंशांतील हाल राजानें ‘ सप्तशती ’ नांवाचा शृंगारपर सुभाषितांचा ग्रंथ आर्यावृत्तांत लिहिला. तो मोठा सरस असून, हल्लीं छापलेलाही आहे. ह्या ग्रंथाविषयीं अनेक प्राचीन विद्वानांनीं आदरोद्गार काढिले आहेत. ‘ सेतुबंध ’ नांवाचें एक मंजुळ काव्य महाराष्ट्री भाषेंत कालिदासानें लिहिलेलें आहे. शालिवाहनांचे पदरीं गुणाढ्य नांवाचा प्रधान होता, त्यानें पैशाची भाषेंत बृहत्कथा नांवाचा एक प्रचंड ग्रंथ लिहिला होता. तो अस्सल उपलब्ध नाहीं, परंतु त्याचीं संस्कृत, तामीळ वगैरे रूपान्तरें सांपडतात. संस्कृत नाटकांत कोणती प्राकृत भाषा कोणत्या पात्राला द्यावी याचे नियम ठरलेले आहेत. प्राकृत भाषांत प्रांतिक शब्द येऊन अपभ्रंश उत्पन्न झाले. अशा अपभ्रंशांचा उल्लेख दंडीनंतरच्या ग्रंथांत सांपडतो. त्यावरून इ. स. ६ व्या शतकापासून प्राकृताचे अपभ्रंश होऊन हल्लींच्या भाषा उत्पन्न होऊं लागल्या

रा. राजवाडे म्हणतात, ‘ गद्यांत लिहिलेले जुने मराठी ग्रंथ खालील विषयांवर आहेत:-वैद्यक, वेदान्त, भारतादि इतिहास, गणित व फलज्योतिष, धर्मशास्त्र, बखरी व कागदपत्रें, ताम्रपट व शिलालेख, यात्रा-

प्रवास. गद्य व पद्य लेखांपैकीं अत्यंत प्राचीन लेख गद्य आहेत. असे लेख सन पांचशेंपासून सांपडतात. ' नेवासें येथें शके ९६१ त श्रीपतीनें ज्योतिर्गणितावर लिहिलेला एक ग्रंथ उपलब्ध झाला आहे. तो गद्यमय असून, त्याची भाषा अगदीं प्राचीन दिसते. भा. इ. सं. मं. अ. १८३४–३५ ). शके ९५१ तला एक मराठी शिलालेख राइस् यांच्या ( Epigraphica Carnatica ) पुस्तकांत छापलेला आहे. म्हणजे सन १००० च्या पुढचे मराठी गद्य लेख सांपडतात; आणि पद्य लेख सन ११०० पासून सांपडतात. ज्ञानेश्वराच्या गुरुपरंपरेंत गोरखनाथाचें नांव असून त्याची एक ' शकुनवंती ' ज्ञानेश्वराच्या पूर्वीं सुमारें शंभर वर्षांची प्रसिद्ध आहे. त्यापूर्वींचे मानभावांचे कांहीं जुने ग्रंथ गुप्त लिपींत लिहिलेले आहेत. सन ६००–९०० पावेतों मराठी भाषा तयार होत होती. या कालांतले लेख अर्धवट मराठी व अपभ्रष्ट संस्कृत आहेत. हल्लीं हे लेख शोधून काढण्याचा उद्योग चालू आहे. जुनी मराठी भाषा समजण्यास प्राकृत भाषांची माहिती पाहिजे. श्वेतांबरी जैनांची भाषा महाराष्ट्री असल्याकारणानें, तिचा अभ्यास त्या पंडितांनीं कायम ठेविला. हेमचंद्रानें प्राकृत भाषांचें व्याकरण लिहिलें आहे. हा विद्वान् जैन पंडित गुजराथचा राजा सिद्धराज जयसिंह ( स. १०९४–११४३ ) याच्या पदरीं होता. ' हेमचंद्राच्या प्राकृत व्याकरणाची मोठीच योग्यता आहे. हेमचंद्रानें संस्कृत भाषेचाही कोश केला, त्याबरोबर प्राकृत भाषेंत जे देशी शब्द येतात, त्यांचा त्यानें ' देशी नाममाळा ' कोश प्राकृत भाषेंत आर्याछंदांत केलेला आहे. हेमचंद्राचे दोन्ही ग्रंथ प्राकृत भाषा शिकण्यास फार उपयोगी पडतात. मराठीस संस्कृताचा पाठिंबा नेहमींच होता व आहे. त्यामुळें आर्यांची सर्व संस्कृति मराठींत उतरली आहे. वररुचि व हेमचंद्र यांच्या दरम्यान प्राकृत भाषांचे कोण ग्रंथकार झाले, हें समजत नाहीं. उच्चारांचा दुबळेपणा टाकून, रूपांचा नवीन भरणा करून, व संस्कृत शब्दांचें योग्य साह्य घेऊन मराठी भाषा महाराष्ट्रांत बनली. आपल्या विद्वत्तेस व बुद्धिमत्तेस अनुरूप अशी आपली भाषा महाराष्ट्रीय लोकांनीं बनविली. प्राकृत भाषांना बौद्ध व जैन धर्मांचा आश्रय होता तोंपर्यंत त्या भाषा टिकल्या. पण हळू हळू त्या धर्मांचें प्राबल्य कमी होऊन लोकांस पूर्वींच्या वैदिक धर्माचा अभिमान वाटूं लागला, त्याबरोबर संस्कृ-

ताबद्दलही अभिमान वाढला. ह्या संस्कृताच्या अभिमानानें महाराष्ट्री मागें पडली, आणि मराठी भाषा जोरानें पुढें आली. तेराव्या शतकांतील ज्ञानेश्वराच्या अप्रतिम ग्रंथानें महाराष्ट्रीचा लौकिक एकदम वाढला. भाषेला कवींच्या आश्रयाची अतिशय जरुरी असते. ज्ञानेश्वरीचें महत्त्व मराठी भाषा जिवंत आहे तोंपर्यंत जागृत राहील. मराठीचें जोरदार स्वरूप ज्ञानेश्वरींत दिसून येतें. ज्ञानेश्वरानंतर तीनशें वर्षें महाराष्ट्रांत स्वराज्य नष्ट झालें, त्या अवधींत सरकार दरबारांत जरी मराठीचा बडेजाव झाला नाहीं, तरी तिचें स्वरूप फारसें बदललें नाहीं, आणि तिची नैसर्गिक वाढ थांबली नाहीं. अनेक साधुसंतांचा तिला आश्रय होता. महालिंगदास, एकनाथ, सरस्वती गंगाधर, विष्णुदास नामा, तुकाराम इत्यादि ग्रंथकारांनीं मुसलमानी राज्यांत तिचें मोठ्या प्रेमानें संगोपन केलें. सतराव्या शतकांत स्वराज्य स्थापन होतांच भाषेचाही उत्कर्ष झाला; आणि मुक्तेश्वर, वामन व पुढें श्रीधर, मोरोपंतादि अनेक कवी ह्यांनीं मराठी भाषेस उत्कृष्ट भाग्यास चढविलें. छत्रपतींच्या घराण्यांत किंवा पेशव्यांच्या घराण्यांत विद्याव्यासंगी पुरुष कोणी झाला नाहीं, आणि लढाईच्या धामधुमीमुळें भाषेकडे लक्ष देण्यास त्यांस फुरसतही मिळाली नाहीं. शिवाजी मात्र त्यांस अपवाद आहे' (चिं. वि. वैद्य,–निबंध आणि भाषणें). सामान्यतः मराठी भाषेची वृद्धि मराठी राज्याच्या व मराठे लोकांच्या प्रपंचाशीं समानरूप आहे, असें दिसून येतें.

रा. राजवाडे म्हणतात ( खंड ६, व प्र. सं. वृत्त ) बाराशें वर्षांमागें एकहजार वर्षें महाराष्ट्रांत संस्कृत व महाराष्ट्री अशा दोन भाषा प्रचलित होत्या व ह्या दोन्ही भाषांत सारस्वत निर्माण होत असे, म्हणजे विचार-प्रदर्शन व विकारप्रदर्शन होत असे. शकपूर्व ८०० वर्षांपासून शकोत्तर ४०० पर्यंत संस्कृतांत व महाराष्ट्रींत मिळून सारस्वत उत्पन्न झालें. व पुढें महाराष्ट्री मरून आस्ते आस्ते अपभ्रंशद्वारा मराठी उत्पन्न झाली. संस्कृत व मराठी अशी जोडी महाराष्ट्रांत नांदूं लागली, तत्रापि संस्कृत ही तशीच कायम राहिली. संस्कृत ही ह्या देशांतील स्थिर, कायम, चिरंजीव व अमर भाषा आहे, आणि प्राकृत ही चंचल, बदलणारी, विकारी, अल्पायुषी व मर्त्य अशी भाषा आहे. पूर्वी महाराष्ट्रीरूपानें जी प्राकृत जन्मली तींत काव्यनाटकादि क्षुल्लक ग्रंथरचना सडकून होऊन, तिचा

संसार बाराशें वर्षांपूर्वी संपला. अलीकडे बाराशें वर्षें मराठीचा संसार चालू आहे. तोही महाराष्ट्रीच्या प्रमाणेंच कालांतरानें योग्य समयीं समस्त होईल.'

ज्ञानेश्वराच्या वेळेस मराठी भाषा बाल्यावस्थेंत नसून प्रौढ होती. ह्यासंबंधानें रा. राजवाड्यांचा अभिप्राय योग्य दिसतो तो असा.

'मराठी भाषा पांच सातशें वर्षें कमावली गेल्यावर तींत ज्ञानेश्वरीसारखा प्रगल्भ ग्रंथ निर्माण झाला. हा ग्रंथ राष्ट्राच्या बाल्यावस्थेंतील किंवा रानटी स्थितींतील नाहीं. ऊर्जित स्थितींतील आहे. ज्ञानेश्वराच्या काळींच हेमाद्रि, बोपदेव वगैरे पंडित महाराष्ट्रांत विद्यमान होते. त्यापूर्वी शेंदोनशें वर्षें महागणिती भास्कराचार्य (१०३६–११०६) महाराष्ट्रांत झाला. त्याच्या संबंधानें मराठी शिलालेख खानदेशांत पाटण येथें त्याच्या नातवानें उभारलेला अद्याप आहे. असलीं विद्वद्रत्नें ज्या राष्ट्रांत होतात त्याला रानटी किंवा बाल्यावस्थ गणतां येणार नाहीं. उलट त्याची प्रौढावस्थाच होती. फरक इतकाच कीं, स्त्रीशूद्रादिकांस संस्कृत भाषा समजत नसल्यामुळें ज्ञानेश्वरानें मुद्दाम त्यांजकरतां मराठींत ग्रंथ लिहिला. ज्ञानेश्वराच्या अगोदर निवृत्ति, मुकुंदराज, सहदेव भाडळी, अभिलषितार्थचिंतामणींतील ( ११२६–११३८ ) पद्यकार यांनीं मराठींत ग्रंथरचना केलेली आहे. व त्या ग्रंथरचनेनें कमावलेल्या मराठींत ज्ञानेश्वर लिहितो. चांगल्या अभिजात व उमद्या मराठींत ज्ञानेश्वर वक्तृत्व करितो. तेव्हां ज्ञानेश्वरकालीन मराठी भाषा बाल्यावस्थेंत खचित नव्हती.'

**४. मोडी लिपीची उत्पत्ति.**—मुसलमानांच्या आगमनापर्यंत महाराष्ट्रांत कागद माहीत नव्हता. त्यापूर्वीचे सर्व लेख शिला, ताम्रपट ह्यांजवर किंवा भूर्जपत्र, ताडपत्र किंवा वस्त्रपट यांजवर लिहीत असत. शिला व ताम्रपटांवर अक्षरें कोरावीं लागत. दानपत्रें वगैरे अशीं कोरून लिहीत. पोथ्या, कवनें किंवा अन्य लेख ताडपत्रांवर वगैरे लिहीत. ताडपत्रावरही लोखंडी लेखणीनेंच लिहावें लागे. चर्मावर व कापडावर लिहिण्याचा उल्लेख ज्ञानेश्वरींत (स. १२९०) आहे. ताडपत्रादिकांवर लिहिलेलें पुसतां येत नाहीं. तें पुसावयास हरताळाचा लेप लावीत. ज्ञानेश्वरींत कागद हा शब्द कोठेंही आलेला नाहीं. त्याऐवजीं लाकडी पाट हा शब्द आला आहे. कागद करण्याची कला मुसलमानांना ठाऊक होती. हेमाद्रीच्या पूर्वींच शेंपन्नास वर्षें उत्तरहिंदुस्थानांत मुसलमानांचें राज्य स्थापन

झालें होतें. सिंघणयादवानें ( १२१० ते १२४७ ) माळवा वगैरे प्रांत जिंकले, तेव्हां त्यास मुसलमानांची ओळख झाली आणि त्या वेळींच मुसलमानांचा कागद महाराष्ट्रांत माहीत झाला असावा. मुकुंदराजाचा विवेकसिंधु हा मूळ ग्रंथ कागदावर लिहिलेला जोगाईच्या अंब्यास उपलब्ध आहे. त्यावरून मुकुंदराज व ज्ञानेश्वर यांच्या वेळीं कागदाचा उपयोग अंशत: तरी लोक करूं लागले होते, असें अनुमान होतें.

लिहिण्यानें राज्याचे व खासगी व्यवहार किती सुलभ व व्यवस्थित होतात, हें हेमाद्रीला तेव्हांच कळलें. लिहिण्याचें मुख्य साधन कागद, तोही नुकताच माहीत झाला होता. तेव्हां जलद व चालचलाऊ लिहिण्याची लिपि शोधून काढण्याकडे त्याचें मन लागलें असावें. चतुर्वर्गचिंतामणीसारखा संस्कृत ग्रंथ बालबोधींत लिहिण्यास किती श्रम पडले असतील, तें त्याच्या डोळ्यांपुढें होतें. तेव्हां फारशींतील 'शिकस्ता' पद्धतीप्रमाणें बालबोध अक्षरें, एकास एक जोडून, मध्यें टांक उचलल्याशिवाय लिहिण्याची सोय त्यानें काढली असावी. ऱ्हस्व, दीर्घ, अनुस्वार वगैरेंची नेहमींच्या व्यवहारास फारशी जरूर नाहीं. अशा रीतीनें बालबोध अक्षरें जोडून जलद लिहिण्याची पद्धत त्यानें सुरू केली, ती पुढें हळू हळू अंमलांत आली. त्यासाठीं बालबोध अक्षरांत जरूर ते फेरफार त्यानें केले. या लिपीचा उपयोग व फैलाव पुढें महाराष्ट्रांत हळू हळू पुष्कळ वाढला हें मशहूर आहेच.

मोडीच्या उत्पत्तीविषयीं रा. राजवाड्यांचें विवेचन सरस आहे. परंतु बालबोध अक्षरें 'मोडून' म्हणजे एकास एक लागून लिहिण्याच्या प्रकारावरून त्या लिपीस 'मोडी' ही संज्ञा प्राप्त झाली, ही व्युत्पत्ति मात्र पटण्याजोगी नाहीं; आणि त्या लिपीच्या सिद्धतेला अशा व्युत्पत्तीची जरूरही नाहीं. व्युत्पत्तिदृष्ट्याच पाहिलें, तर रा. चांदोरकर यांनीं 'मौर्यी' या शब्दावरून मोडी हा शब्द निघाला असल्याचें केलेलें प्रतिपादन संभवनीय दिसतें. ( भा. इ. सं. मं. प्रथम संमेलनवृत्त,-लेखांक ५ ). परंतु मोडीची उत्पत्ति त्यांनीं अशोकापर्यंत नेऊन पोंचविली आहे, ती मात्र निव्वळ काल्पनिक दिसते. अशोकाच्या मौर्यीवरून मोडी लिपि निघाली, बालबोध अक्षरांवरून निघाली नाहीं, हे म्हणणें विचारसरणीसही पटण्याजोगें नाहीं. बहुतेक मोडी अक्षरें बालबोधचींच रूपें आहेत. मात्र मौर्यी लिपि जशी जलद लिहिण्यास उपयोगाची आहे, तशीच हेमाडपंताची आहे, अशा अर्थावरून

मोडी हा शब्द हेमाडपंतानें अगर लोकांनीं या नवीन लिपीस पुढें लाविला असेल. अशोकाइतकी ही लिपि जुनी असती, तर हजारबाराशें वर्षांतील त्या लिपींतले लेख पाहिजेत, ते मिळत नाहींत. शिवाय कागदाशिवाय ताडपत्रावर वगैरे लिहिण्यास मोडी लिपी बिलकूल सोयीची नाहीं. अर्थात् मोडीचा प्रघात फारशी लिपि व फारशी कागद ह्यांच्या आगमनानें पडला हें रा. राजवाड्यांचें म्हणणें योग्य दिसतें.

मोडीचे लेख सन १४१६ च्या अगोदरचे म्हणजे हेमाडपंतानंतरच्या शंभर वर्षांतले अद्यापि सांपडले नाहींत. आरंभीं असे लेख थोडेच असा-वयाचे, आणि नवीन लिपीचा लोकांत फैलाव होण्यास अवधीही बराच लागला असेल. १४१६ च्या पुढील कागदपत्रांतील मोडी अक्षरें बालबो-धीशीं ताडून पाहवीं, म्हणजे बालबोधीवरून मोडी अक्षर कसें सिद्ध होतें हें स्पष्ट कळतें. बालबोध अक्षरें हात न थांबवितां लिहिलीं, म्हणजे मोडी अक्षरें सिद्ध होतात. राजश्री राजवाड्यांच्या २० व्या खंडांत स.१४२८ चा एक कागद आरंभींच छापला आहे. तसेंच त्यांनीं सरस्वतीमंदिरांत स. १४७५ चा दुर्गादेवीच्या दुष्काळासंबंधीं लेख अस्सल छापला आहे, त्यांतील अक्षर पाहण्यालायक आहे. दिसतें तितकें तें सुवाच्य मात्र नाहीं. तसेंच त्यांच्या पंधराव्या खंडांत जुन्या मोडीचे कांहीं अस्सल नमुने फोटो-ग्राफीनें छापलेले दिले आहेत. त्यांवरून सन १६५० च्या सुमारास मोडीचें वळण कसें होतें तें दिसून येतें. शिवाजीच्या पूर्वी शंभर वर्षांचा म्हणजे सन १५४१ मधील एक कागद ह्या खंडांत आहे, त्यांतील भाषेवरूनही त्याच्या जुनेपणाची खात्री होते.

५. **मुसलमानी राज्याचा मराठीवर परिणाम.**—ज्ञानेश्वराची भाषा शुद्ध व निर्मळ मराठी आहे. तिच्यांत फारशी शब्द मुळींच नाहींत. त्याच्यापुढें जेथें जेथें मुसलमानी राज्य स्थापन झालें, तेथें फारशी शब्दांचा विशेषतः दरबारी स्वरूपाच्या शब्दांचा भरणा भाषेंत होऊं लागला. जेथें मुसलमानांचा अंमल भासला नव्हता, अशा कोनाकोपऱ्यांतल्या कोंकण वगैरे प्रांतांत मुसलमानी शब्दांचा भरणा लवकर झाला नाहीं. कोंकणांत सावंतांच्या राज्यांतील स. १३९७ सालचें एक पत्र पाहतां त्यांत शुद्ध मराठी भाषा आली आहे. सन १४१६, १४७१, १४९५ इत्यादि सालांतील कागद तपासून पाहिले, तर त्यांत फारशी शब्द बरेच

दिसून येतात. सरस्वती मंदिरांत रा. राजवाड्यांनीं स. १४७५ ता. १६ जानेवारीचा एक मोडी लेख अस्सल प्रतिमेसह प्रसिद्ध केला आहे. त्यांतील १३९ शब्दांपैकीं ४३ म्हणजे शेंकडा ३१ शब्द शुद्ध मराठी व बाकीचे मुसलमानी आहेत. म्हणजे आरंभींच्या शेंदीडशें वर्षांत मुसलमानी भाषेचा जोर पुष्कळ वाढत गेला. सामान्य लोकांच्या बोलण्यांत व लिहिण्यांतही फारशी शब्द नकळत येऊं लागले. फारशींतील प्रयोग व ठेवणही मराठींत शिरली. सन १५४१ व सन १५५८ ह्या सालांतील दोन कागद तपासून पाहतां त्यांत जवळ जवळ निम्मे शब्द फारशी आहेत. एकनाथाचा एक लेख ( सुमारें सन १५९० तील ) रा. राजवाड्यांनी दिला आहे, त्यांत तीन चतुर्थांशावर शब्द फारशी आहेत. त्यानंतर सन १६२८, सन १६५८, १६७८, व १७२८ या चार वर्षांतील कागद तपासून रा. राजवाड्यांनीं फारशी शब्दांचें प्रमाण खालील प्रमाणें दिलें आहे:—

| सन | एकंदर शब्द | फारशी | मराठी | शेंकडा मर |
|---|---|---|---|---|
| १६२८ | २३६ | २०२ | ३४ | १४·४ |
| १६५८ | ९१ | ३० | ६१ | ३४ |
| १६७८ | १३५ | ५१ | ८४ | ६२·२ |
| १७२८ | १२७ | ८ | ११९ | ९३·७ |

पृथक्करण केलेल्या ह्या लेखांवरून अगदींच ढोबळ अनुमान बांधतां येईल. भाषेंत परकी भाषेंतले कमीजास्त शब्द वापरणें हें लिहिणाराच्या मगदुरावर व पूर्व संस्कारांवर अवलंबून राहणार. त्यावरून काढलेलें अनुमान बरेंच कोतें असणार. ह्यावरून मुसलमानी अंमलांत परकी भाषेचा पगडा मराठीवर किती बसला आणि शिवाजीनें स्वभाषेचा अभिमान धरल्याबरोबर तो पगडा कसकसा कमी होत गेला, हें दिसून येतें. उदाहरणासाठीं घेतलेले कागद दरबारी स्वरूपाचे असल्यामुळें त्यांत फारशीचा भरणा जास्त आहे. तत्कालीन मराठी कवींच्या लेखांत फारशी शब्दांचा भरणा पुष्कळ कमी होता. तथापि ३०० वर्षांच्या मुसलमान अमदानींत नुसते परकी शब्दच भाषेंत आले नाहींत, तर मराठी भाषेचें स्वरूप पुष्कळ अंशीं फारशी धरतींचें झालें. शिवाजीनें राज्यव्यवहारकोश वगैरे साधनांनीं भाषेस संस्कृत वळण लावलें; आणि मायने वगैरे केवळ फारशींतून संस्कृतांत रूपांतर करून घेतले. (उ० महशुर-अल्-हजरत=मान्य-ला-

राजा=राजमान्य). शिवाजीनें सुरू केलेला प्रघात उत्तरोत्तर वाढत जाऊन पेशव्यांच्या वेळेस तर प्रत्यक्ष मुसलमानांशीं झालेल्या पत्रव्यवहाराखेरीज इतरत्र फारशी शब्द फारसे उपयोगांत नव्हते. एवंच सन १३१८ पासून १६५६ पर्यंत सुमारें ३३८ वर्षें फारशीचा पगडा मराठीवर होता. भाषेच्या ह्या कमीजास्त परिणामावरून मुसलमानी राज्याचा महाराष्ट्रावर कमीजास्त जोर किती होता, ह्याचेंही ठोकळ अनुमान करतां येतें.

मराठ्यांची संस्कृति उच्चतर असल्यामुळें त्यांना मुसलमानांपासून शिकण्याजोगें कांहीं दिसलें नाहीं. दरबारी कामांत मात्र त्यांच्या फारशी भाषेचा उपयोग सुरू झाला. पहिल्या पांचपन्नास वर्षांत मुसलमानांची खासगी किंवा सरकारी नोकरी करण्यास हिंदु लोक मिळत नसत. मुलखांत बंदोबस्त ठेवणें व कर गोळा करणें हीं दोन मुख्य कामें मुसलमानांना करावयाचीं होतीं. स्वजातीय संख्या वाढविण्याकरतां हिंदु लोकांस बाटवून मुसलमान करण्याचाही उद्योग त्यांनीं शक्य तितका चालविला. खालच्या दर्जाचे बरेच लोक मुसलमान झाले. नोकरांची कमतरता पडूं लागली, तेव्हां वेठीची पद्धत मुसलमानांनीं अंमलांत आणली; आणि सार्वजनिक काम पाहिजे तेव्हां हव्या त्या माणसाकडून ते करून घेऊं लागले. अशा रीतीनें ब्राह्मण, मराठे वगैरे संभावित जातींचा मुसलमानांच्या नोकरींत हळूहळू प्रवेश झाला व फारशी भाषा मराठींत घुसूं लागली.

शिवाय चालुक्यांच्या कमाविसदारांजवळ दुभाष्याचें काम हिंदुस्थानांतील कायस्थ लोक करीत. सन १४१६ तील फारशी–मराठी कागदांवर कायस्थ दुभाष्यांचीं नांवें आहेत. यांच्या मार्फत फारशी भाषेचा लोकांत हळूहळू फैलाव होत चालला.

शेंदीडशें वर्षांत बाटून मुसलमान झालेल्या लोकांची संख्या बरीच वाढली. शहरांत, खेड्यांत, जंगलांत, डोंगरांच्या शिखरांवर वगैरे ठिकाणीं मसूजीद, दर्गा किंवा पीर स्थापन झाला. मुसलमान अधिकारी, फकीर, बाटलेले लोक व हिंदु नोकर यांच्या तोंडून निघालेले फारशी शब्द लहान मोठ्या सर्व लोकांच्या कानांवरून हरहंमेश जाऊं लागले. तेणेंकरून व्यवहारांत परभाषेचें माहात्म्य वाढत गेलें. तरी शेतकरी, कुणबी वगैरे खालच्या लोकांस हा परकी भाषेचा संपर्क फारसा पोंचला नाहीं. कवित्व, धर्म व शास्त्र या विद्वत्तेच्या बाबतींतही फारशीचा शिरकाव झाला नाहीं.

फारशीच्या सान्निध्यानें बरेचसे नवीन प्रयोग मराठींत आले. कित्येक उद्गारवाचक शब्द, अव्ययें, क्रियाविशेषणें व सर्वनामें मराठींत येऊन अर्थांचे व उद्गारांचे अनेक बारीक बारीक भेद सफाईनें व्यक्त करण्याची मराठींत सोय झाली. हल्लींचे कित्येक मराठी प्रत्ययही फारशीवरून आलेले आहेत. उच्चारांची व बोलण्याची ढबही फारशीच्या संसर्गानें मराठींत नवीन शिरली. भाववाचक नामें, विशेषणें व नात्यांचीं, धंद्यांचीं वगैरे पुष्कळशीं विशेषनामें फारशींतून मराठींत आलीं.*

शिवाजीच्या कर्तबगारीनें व रामदासाच्या संस्कृत वाणीनें फारशीच्या पगड्याची ही वाढ उत्तरोत्तर कमी होऊं लागली. तसेंच मराठीचे विशिष्ट संस्कारही पुष्कळसे फारशींत शिरले. मराठीची देवनागरी लिपी परिपूर्ण असल्यामुळें फारशी भाषा मराठींत व मोडींत सुद्धां सफाईनें लिहितां येऊं लागली. येणेंकरून दरबारांतही मराठी भाषा हळू हळू फारशीस मागें टाकूं लागली. कारकुनी काम सर्व ब्राह्मणकायस्थांच्याच हातांत होतें. यांच्या फरड्या कारकुनीमुळें त्यांच्या मायभाषेचा बराच टिकाव लागला. पुष्कळ अंशीं परकीय अंमलदारांना ह्या कारकुनांवर अवलंबून राहवें लागे. महाराष्ट्रांतील अफाट लोकसंख्येंत राज्यकर्त्यांचें प्रमाण अत्यंत अल्प असल्यामुळें, उत्तरोत्तर दक्षिणेंतील मुसलमान बादशाहा व त्यांचे अधिकारी फारशी बोलावयाचें सोडून दक्षिणी उर्दू बोलूं लागले. पहिल्या तीनशें वर्षांतील मराठी ग्रंथकारांनीं तर मराठीचें संरक्षण अतोनात केलें. धर्माच्या बाबतींत जित व जेते यांत मूळचा अत्यंत भेद होताच, तो ह्या साधु ग्रंथकारांनीं आपल्या ग्रंथांत स्पष्ट करून, स्वभाषा व स्वराष्ट्र कायम ठेवण्यास मदत केली. भारत, रामायण व धर्म यांजवरील मराठी ग्रंथ लोक महाराष्ट्रांत गांवोगांव वाचीत, आणि त्यांची भाषा व्यवहारांतील फारशी मिश्रणाला आवरून धरी. तुकारामाच्या कवनांत मुसलमानी शब्द थोडेच आहेत. तसेंच जेजुरी, पंढरपुर, तुळजापुर वगैरे अनेक ठिकाणचे गोंधळी भुत्ये, पुराणिक, हरिदास वगैरे लोकांची भाषा शुद्ध मराठी असून, तिच्या योगानें फारशीचा प्रवेश पुष्कळ अवघड झाला. बायकांचीं गाणीं,

---

* टीपः— ह्या बाबतीचें तपशीलवार विवेचन रा० राजवाड्यांनीं आठव्या खंडांत केलें आहे, तें पाहण्यालायक आहे.

पुरुषांची भजनें, पदें, अभंग वगैरे प्रकारचें लोकांचें व्यावहारिक व धार्मिक वाङ्मय बरेंच शुद्ध व अस्सल मराठी होतें.

फारशीच्या संसर्गानें मराठीला फायदा झाला कीं तोटा झाला ह्याचा अंदाज करितांना, रा. राजवाडे म्हणतात, ' धर्म, शास्त्रें, कायदे, कविता, साहित्य वगैरे बाबतींत फारशीचा शिरकाव म्हणण्यासारखा झाला नाहीं. व्यवहारांत मात्र फारशी शब्दांचा भरणा फार झाला. आणि त्याचा ठसा मराठीवर इतका बेमालूम बसला आहे कीं, मराठी भाषेच्या हयातीपावेतों तींतील हे फारशी शब्दप्रयोग व प्रत्यय, ह्यांवरून मुसलमानांचें राज्य महाराष्ट्रावर कांहीं शतकें होतें, हें कळून येईल. ह्या तीनशें वर्षांत मराठीला म्हणण्यासारखा फायदा झाला नाहीं. बखरी लिहिण्याची पद्धत स. १६५६ नंतर प्रचारांत आली. स. १९०० पर्यंत मुसलमानांचें राज्य महाराष्ट्रांत राहतें तर, मराठी येथून तेथून सर्व फारशी पेहरावच करती, ह्यांत संशय नाहीं.' एकंदरींत परकी भाषेच्या संसर्गापासून स्वभाषेचें नुकसान होतें, असा रा. राजवाड्यांनीं सिद्धांत काढून, तदनुसार इंग्रजी भाषेपुढें मराठीचा टिकाव लागणें कठीण आहे, असा त्यांनीं निष्कर्ष काढिला आहे.

वाद चालविण्याचें हें स्थल नाहीं. राष्ट्राच्या इतिहासांत भाषेच्या इतिहासाचेंही दिग्दर्शन अवश्य पाहिजे एवढ्याच मुद्यास अनुलक्षून प्रस्तुतचें विवेचन आहे. भाषा हें राष्ट्राच्या व्यवहाराचें एक साधन आहे, राष्ट्राच्या व्यवहाराचें तें एक चित्रच आहे. रा. राजवाड्यांसही ही गोष्ट कबूल आहे. ते म्हणतात, ' भाषेचा संकोच म्हणजे आपल्या हालचालींचा संकोच. आपल्या राष्ट्रीय हालचाली संकुचित झाल्या, तसा भाषेचा संकोच झाला. हालचाली वाढल्या, तशी भाषेची वृद्धि झाली. मनुष्याची कर्तबगारी नमूद करण्याचें साधन भाषा होय. ' असें आहे तर फारशीनें किंवा इंग्रजीनें मराठीचें नुकसान केलें, ह्या म्हणण्यांत अर्थ नाहीं. उलट मुसलमानांच्या संसर्गानें आपल्या व्यवहाराचें क्षेत्र वाढून, तदनुसार फारशीच्या संसर्गानें मराठी भाषेचेंही क्षेत्र वाढलें. तिच्यांत पुष्कळ नवीन भर पडली, नवीन शब्दप्रयोग व अर्थोद्गाराचे प्रकार तीस प्राप्त झाले. मराठ्यांचा स्वभाव कांहीं अंशीं ओबडधोबड व राकट, तसेंच भाषेचेंही स्वरूप आरंभीं राकट, साधें व गरिबीचें होतें. तिला फारशीच्या बादशाही पेहरावाची ओळख होतांच, तिचें

स्वरूप ज्यास्त भारदस्त, मृदु, संपन्न, व उज्ज्वल असें झालें. इंग्रजीसारख्या अत्यंत विभिन्न भाषेचा तिला आतां संसर्ग घडल्यानें ही मराठी भाषा उत्तरोत्तर जास्त वैभवशाली होऊन, पृथ्वीवरील चांगल्या भाषांत तिची गणना होऊं लागेल असा भरंवसा वाटतो. कोनाकोपऱ्यांत पडून राहिल्यानें, व्यक्तीप्रमाणें, भाषाही चमकत नाहीं. 'गेल्या शतकांत ग्वाल्हेरपासून तंजावरपर्यंत मराठी भाषा चालत होती. नानाफडणिसांचीं हैदर व टिपू यांस पत्रें मराठींत जात, व महादजी शिंद्याचा रजपूत राजांशीं व्यवहार मराठींत होई. ग्वाल्हेरपासून तंजावरपर्यंत खासगी व सार्वजनिक दप्तरें मोडींत व मराठींत लिहिलीं जात. आतां मराठीची ही व्याप्ति जाऊन तिची जागा इंग्रजीनें घेतली आहे.' मराठी भाषेच्या व्याप्तीचा अंदाज करितांना राज्याच्या व्याप्तीचाही अंदाज करावा लागतो. परंतु कमी झालेला विस्तार वाढलेल्या खोलीनें भरून येईल ह्यांत संशय नाहीं.

६. **संस्कृत व संतांच्या वाङ्मयाचा विरोधी परिणाम.**—महाराष्ट्रांत विचारप्रदर्शन संस्कृत व मराठी ह्या दोनही भाषांत एकसमयाच्छेदेंकरून होत होतें. नवीन धर्म निघाल्याबरोबर जुन्या धर्माचे अभिमान्यांस मोठी धास्ती पडून, ते जोरानें पुराणधर्माचा कैवार घेऊं लागत. तसाच प्रकार भाषेचाही झालेला आहे. प्राकृतांत किंवा मराठींत ग्रंथरचना होऊं लागली असें दिसतांच, पुराणमतवादी पंडितांस धास्ती पडून ते पुनः संकृत ग्रंथ लिहून जुने विचार कायम राखीत. सर्वप्रकारचें ज्ञान सर्व वर्गांस सारखें प्राप्त व्हावें, सर्व लहान थोर, स्त्रीशूद्रांनीं संतपदवीस चढावें, असा संतांचा हव्यास होता, तर त्याच्या उलट समजांतील पूर्वीपासून चालत आलेले उच्चनीच भेद व आचार कायम राहवे, असा उद्योग पंडितवर्गाचा होता. समाजांतील ह्या दोन विरुद्ध प्रवाहांचा उल्लेख मागें पृ० ७१ वर आलो आहे. महाराष्ट्रांतील भाषेसंबंधानें रा. राजवाडे म्हणतात:—

'महाराष्ट्रांत गेलीं एक हजार वर्षें स्वभाषा म्हणजे केवळ मराठी भाषा नव्हे, तर स्वभाषा म्हणजे मराठी व संस्कृत अशा दोन भाषा. गेलीं एकहजार वर्षें महाराष्ट्रांत मराठी भाषेच्या द्वारेंही विचारप्रदर्शन होत आहे; व संस्कृत भाषेच्या द्वारेंही विचारप्रदर्शन होत आहे. वेदान्त, तर्क, न्याय, व्याकरण, ज्योतिष, धर्म, नाटक, काव्य, पुराण, वैद्यक या विषयांवर

गेल्या एक हजार वर्षांत महाराष्ट्रांत विचारप्रदर्शन मोठें नामांकित झालें आहे. अपरार्क, हेमाद्रि, बोपदेव, आपदेव, नारायणभट्ट, नागोजीभट्ट, गागाभट्ट, भास्कराचार्य, सूर्यज्योतिषी, गणेशदैवज्ञ, पायगुडे, पाध्ये, शेष, लौगाक्षिभास्कर, त्रिंबक वैद्य वगैरे बड्या बड्या धेंडांनीं संस्कृतद्वारा थोर विचारांचें प्रदर्शन केलेलें आहे. हें विचारप्रदर्शन लहानसहान झालेलें नाहीं. त्याच्या तोडीचें प्रदर्शन पश्चिमेकडील किंवा पूर्वेकडील देशांत तत्कालीं क्वचितच झालेलें आढळेल. ( ! ! ) संस्कृत भाषेच्या द्वारा जसें विचारप्रदर्शन झालें, तसेंच मराठीभाषेच्या द्वाराही गेल्या हजार वर्षांत नांवाजण्यासारखें विचारप्रदर्शन झालेलें आहे. वेदान्त, ज्योतिष, इतिहास, धर्म, वैद्यक, काव्य इत्यादि विषयांचें उद्घाटन मराठींत छायारूपानें सडकून झालेलें असून, कित्येक मराठी ग्रंथांच्या तोडीचे ग्रंथ तत्कालीन संस्कृत सारस्वतांतही नाहींत. बाकी इतकें मात्र खरें कीं, बहुतेक मराठी ग्रंथ संस्कृत ग्रंथांच्या विस्तृत किंवा संक्षिप्त छाया आहेत. तात्पर्य, मुख्य विचारप्रदर्शन संस्कृतांतून झालें आहे; व त्याचें प्रतिबिंब मराठींतून पडलेलें आहे. विद्वान् ब्राह्मण संस्कृतांत इतर विद्वानांकरितां विचारप्रदर्शन करीत व स्त्रीशूद्रांकरितां त्याचेंच प्रतिबिंब मराठींत वठवीत. थोर व गंभीर म्हणून जेवढा विचार तेवढा सर्व संस्कृतांतून बाहेर पडे. त्यापैकीं स्त्री, बाल व शूद्र यांच्या योग्यतेचा जो विषय तो प्रतिबिंबरूपानें मराठींत उतरे.

'युरोपियन प्राकृत व प्रचलित भाषांच्या विषयींचे सिद्धांत मराठी भाषेस लावण्यांत बिलकुल स्वारस्य नाहीं. युरोपांतील आधुनिक प्राकृत भाषा तत्तद्देशस्थ सर्व लोक सरसहा वापरतात व त्या भाषांत शास्त्रीय व अशास्त्रीय विषयांवरील विचारांचें व विकारांचें प्रदर्शन करितात, तसा प्रकार महाराष्ट्रांतील आधुनिक प्राकृत भाषा जी मराठी तिचा गेल्या हजार वर्षांत नाहीं. शांत, गंभीर, शास्त्रीय, व उच्च दर्जाचें जेवढें सारस्वत तें सर्व या देशांत संस्कृतभाषेच्या द्वारें आविष्कृत झालेलें आहे; व ह्या सारस्वतापैकीं बालशूद्रादि अविद्वान् लोकांना योग्य तेवढा भाग मराठीच्या द्वारा छायारूपानें बाहेर पडलेला आहे.

'महाराष्ट्रांतील लोकांचा सामान्य व्यवहारांत जसा मराठीचा आश्रय करण्याचा स्वभाव दृष्टीस पडतो, तसाच शास्त्रीय व सामान्येतर व्यवहारांत संस्कृताचा आश्रय करण्याचा स्वभाव गोचर होतो. अलीकडे पन्नास

पाऊणशें वर्षें, मातुभाषा म्हणजे मराठी भाषा, हीच कायती आपली स्वभाषा व हिचाच तेवढा अभिमान बाळगणें श्रेयस्कर, अशी एकतर्फी *कित्येक अर्धवट विचार करणाऱ्या व युरोपियन विचारांची व सिद्धांतांची अनाठायीं री ओढणाऱ्या लोकांनीं करून घेतली आहे.* परंतु तींत काडी-चेंही तथ्य दिसत नाहीं. वस्तुस्थिति ह्या एकतर्फी व अर्धवट कल्पनेच्या-हून अगदीं निराळी असलेली स्पष्ट दिसते. संस्कृत ही महाराष्ट्रांत मेलेली भाषा नाहीं, जिवंत आहे. वैय्याकरण, ज्योतिषी, वेदांती, पौराणिक, वैद्य ह्या विद्वान लोकांची अद्यापहि संस्कृत हीच ग्रंथभाषा आहे; आणि स्त्रीशूद्र-बालादींची विचारप्रदर्शन व विकारप्रदर्शन करण्याची मराठी ही प्राकृत भाषा आहे. तात्पर्य, गेल्या एक हजार वर्षांत महाराष्ट्रांत दोन भाषा प्रचा-रांत आहेत, संस्कृत व मराठी; आणि ह्या दोनही भाषा स्वभाषा व मातृभाषा आहेत.

'मूळ संस्कृत भाषा देशांत कायम आहे. गेल्या एक हजार वर्षांत सस्कृत व मराठी अशा दोन भाषा महाराष्ट्रांत नांदत आहेत; आणि या दोन्ही भाषांत मिळून जें विचारप्रदर्शन झालें, तें महाराष्ट्रांतील सबंद सारस्वत होय. एकट्या संस्कृताकडेच लक्ष देऊन महाराष्ट्रांतील विचारप्र-दर्शनाचा ऊर्फ सारस्वताचा अहवाल जितका चुकीचा होईल, तितकें एकट्या मराठीकडे किंवा महाराष्ट्रीकडे पाहून सारस्वताची परीक्षा करणें चुकीचें व भ्रामक होईल. दोन्ही भाषांतील सारस्वताचा परामर्ष जेव्हां घ्यावा तेव्हां महाराष्ट्रांतील संपूर्ण सारस्वताचा विस्तार कळतो; आणि मग विचारी व अभिमानी मनाला संतोष होतो व समाधान वाटतें. ह्या दोन्ही स्वभाषांत झालेल्या सारस्वताचा इतिहास मोठा उमदा, उत्तेजक व अभि-मानजनक असा आहे. पृथ्वी गोल आहे व तिच्यांत गुरुत्वाकर्षणशक्ति आहे, हें संस्कृतांत सांगणारा पाटणचा भास्कर हा स्वभाषा जी संस्कृत तींत सखोल विचारप्रदर्शन करतांना दिसतो, व अभिलषितार्थचिंतामणी-तील गोड पदें मराठी भाषेंत गाणारा अनामक कविही दुसरी स्वभाषा जी मराठी तिचा आश्रय कारितांना आढळतो. चाळीसगांवनजीक पाटण येथें भास्कराचार्यांच्या नातवानें (चंगदेवानें) आपल्या आजाच्या कीर्तीचा स्तंभ शिलालेखरूपानें उभारिला आहे, त्यांत त्यानें ह्या आपल्या दोन्ही स्वभाषांचा जो उपयोग केला आहे तो तर स्वभाषाद्वयत्वाच्या सिद्धान्ताचा

नामी निदर्शक आहे. ह्या शिलालेखांत प्रथम संस्कृत स्वभाषेचा उपयोग केलेला आहे, आणि शेवटीं मराठी स्वभाषेचा आश्रय केला आहे. देवगिरीच्या हेमाद्रपंतानें चतुर्वर्गचिंतामणि नामक प्रचंड ग्रंथ संस्कृतांत लिहिला, व आयव्ययाची पद्धति मराठींत प्रविष्ट केली. दामोपंतानीं लक्षावधि पदें मराठींत गाइलीं; व उपनिषद्भाष्यें संस्कृतांत लिहिलीं. रामदासांनीं तर तीन भाषांचा आश्रय केला; दासबोध मराठींत लिहिला; किता महाराष्ट्रींत वळविला; व भक्तिमार्गाचा एक ग्रंथ संस्कृतांत सांगितला. मोरोपंतांनीं अशीच मराठींत व संस्कृतांत ग्रंथरचना केली. ही दुभाषी पद्धति वामनपंडितांनींही स्वीकारिली आहे. हे सर्व दाखले शंभर वर्षांपूर्वींचेच झाले. अलीकडील काळांतही हा प्रघात चालू असलेला दिसतो.

'गेल्या हजारबाराशें वर्षांत अद्वैत वेदान्त, षड्दर्शनें, व्याकरणशास्त्र, ज्योतिषशास्त्र, धर्मशास्त्र, रसविद्या, वैद्यक, गणित, वस्तुशास्त्र, भक्तिमार्ग, इतिहास, काव्यें, नाटकें वगैरे विषयांवर मोठी नामांकित विचारसंपत्ति आपण कमावलेली आहे. अशी कीं, तिजकडे पाहून सर्व जगास कौतुक वाटावें व असलेल्या संपत्तींत विपुल भर टाकून मनुष्यजातीच्या ऐहिक व पारमार्थिक सुखाची परमावधि गांठण्याला आपणाला निरंतर प्रोत्साहन यावें.'

संस्कृत विद्येंत ब्राह्मणांचीं शेंकडों घराणीं पिढीजाद विद्वान असून आपल्या विषयांत पारंगत होतीं. भास्कराचार्यांचें ज्योतिषी घराणें अनेक पिढ्यांपर्यंत नामांकित होतें. त्याचा पूर्वज त्रिविक्रमभट्ट नलचंपूकार स. ९१२ च्या सुमारास झाला. स्वत: भास्कराचार्यांची हयात स. १०३६ पासून ११०६ पर्यंतची आहे. भास्कराचार्यांचा मुलगा व नातू यादवांच्या पदरीं ज्योतिषी होते. नातू चंगदेव यानें कोरलेला शिलालेख प्रसिद्ध आहेच. त्रिविक्रमभट्टापासून चंगदेवापर्यंत नऊ पुरुष झाले. ते सर्व विद्वान होते. गागाभट्ट ज्या घराण्यांत झाला, त्या घराण्यांत सन १४५० पासून हल्लींच्या कान्तानाथभट्टांपर्यंत बारा पुरुष झाले. ते सर्व विद्वान असून एकंदर घराण्यांतील वीस पंचवीस पुरुषांचे तरी धर्मशास्त्रावर लिहिलेले ग्रंथ उपलब्ध असून, त्यांपैकीं बरेच सर्वमान्य आहेत. कवित्वाच्या संबंधानें एकनाथाचें, दासोपंताचें व श्रीधराचें घराणें अशाच तोडीचें आहे. ज्ञानदेव, नामदेव, तुकाराम हीं सर्वच घराणीं ईश्वरभक्तीस वाहिलेलीं होतीं. एकेका

विषयांत दहा दहा पिढ्यांपर्यंत, किंवा कदाचित् ज्यास्तही, एकेक विद्या व कसब सारखें नांदत राहिलें, हा प्रकार हिंदुस्थानाशिवाय पृथ्वीवर इतरत्र कोठें आढळून येत नाहीं. पाश्चात्य समाजरचनेंत ही गोष्ट संभवनीय दिसत नाहीं. हल्लीं आपल्याकडे पाश्चात्य संस्कृति फैलावत असल्यामुळें वरच्यासारखें आनुवंशिक नैपुण्य इतःपर कदाचित् दिसणारही नाहीं. अमुक पद्धत चांगली किंवा अमुक पद्धत वाईट हें ठरविण्याचा मुद्दा येथें नाहीं. मात्र आनुवंशिक पद्धतींत विद्याकलांचें संवर्धन पूर्वींच्या काळीं चांगलें झालें असें दिसून येतें. अजिंठा व वेरूळच्या लेण्यांतील कसब, उत्कृष्ट वस्त्रांची व इतर कारागिरी हे प्रकार आनुवंशिक पद्धतीचीच साक्ष देतात. मात्र आनुवंशिक पद्धतीनें विद्याकलांची दिवसेंदिवस सुधारणा व नवीन भर पडणें बंद होतें, आणि समाजही त्यामुळें प्रागतिक बनत नाहीं. असो.

हेमाद्रीसंबंधानें रा. राजवाडे म्हणतात. 'यादवांचे राज्यांत लोक सुखवस्तू व ऐदी बनले होते. हेमाद्रीचा चतुर्वर्गचिंतामणि हा ग्रंथ तपासून पाहिला असतां वर्षाच्या ३६५ दिवसांत एकंदर दोन हजार व्रतें व जपजाप्य विधि सांगितले आहेत. म्हणजे दरदिवसास दहा पांच कृत्यें ठरलेलीं होतीं. कोणत्या देवाचीं कोणतीं व्रतें करावीं, त्या व्रताला कोणतीं पक्वान्नें करावीं, किती ब्राह्मणांचें भोजन घालावें, इत्यादि बाबतींचा निर्णय शास्त्रांतील उतारे देऊन हेमाद्रीनें मोठ्या गंभीरपणें केला आहे. अर्थात् लौकिकांत जे प्रचार होते, त्यांचाच संग्रह करून हेमाद्रीनें आपला ग्रंथ बनविला. त्यानें केवळ एकीकरण केलें. इकडे भक्तीचा, जात्यैक्याचा, निष्कामकर्माचा उपदेश साधुसंत करीत होते, तर समाजांत पक्वान्नांचा व ब्राह्मणभोजनांचा सपाटा चालू होता. अर्थात् लोकांत दैन्य नव्हतें; आणि मर्दुमकीचे व यातायातीचे लष्करी वगैरे उद्योग करण्यास त्यांस फुरसत नव्हती. असे व्रतैकदृष्टि व सुखपरायण लोक ऐदी बनले असतां, त्यांस साहसी, निग्रही व काटक मुसलमानांनीं तेव्हांच जिंकिलें. संस्कृतीच्या मानानें पाहिलें तर एतद्देशीय लोक मुसलमानांच्या मानानें श्रेष्ठ व स्वच्छ होते. तर्कशास्त्र, ज्योतिष, वेदान्त, विद्या, कला, धंदे वगैरे बाबतींत मराठ्यांची मुसलमानांवर कडी होती. मराठे शूर नव्हते असें ही नाहीं. ह्याच मरठ्यांकडून स. १२४० च्या सुमारास सिंघण यादवानें माळव्यापासून रामेश्वरपर्यंतचा प्रदेश जिंकिला होता. शिवाजीसारखाच सिंघणही पूर्वी झाला, परंतु सर्व लोकांत

ऐक्य उत्पन्न करून विशिष्ट राज्यपद्धति त्यानें निर्माण केली नाहीं. सिंघणानंतर पन्नास वर्षांतच देवगिरीचा पाडाव झाला. त्या पन्नास वर्षांत 'सिंघणादि वीरांच्या विजयानें लोक धनवन्त होऊन व्रतें, उद्यापनें करण्याच्या मिषानें सुखैकपरायण व विलासमग्न झाले. हा प्रकार हेमाद्रीच्या चतुर्वर्गचिंतामणीवरून स्पष्ट होतो.' ( खंड ८, प्रस्तावना. )

संस्कृत पंडितांची कृति दुसऱ्याही दृष्टीनें पाहिली पाहिजे. पंडितवर्गाची संस्कृत भाषा व जनसमूहाची देशी भाषा ह्यांचा झगडा गौतमबुद्धाच्या वेळेपासूनचा आहे. एका वर्गाचा प्रयत्न पुराण परंपरा कायम ठेवण्याकडे, व जातिबंधनें सुटूं न देतां धर्मकृत्यांचा अधिकार आपल्या हातांत ठेवण्याकडे होता; तर दुसऱ्या वर्गाचा प्रयत्न सर्व जनसमूहास सज्ञान करण्याचा, जातिनिर्बंध नाहींसे करून सर्वांस एका नियमाखालीं आणण्याचा होता. दडपून टाकलेल्या हीन वर्गाची उन्नति करण्याचा हा प्रयत्न विसाव्या शतकांतला नसून अनादि आहे. सर्वांस सुगम अशा विठोबाची व तद्द्वारा भक्तिमार्गाची स्थापना ह्याच उद्देशानें झाली. ज्ञानदेव, नामदेव, एकनाथ, तुकाराम इत्यादि थोर पुरुषांचें कर्तव्यसर्वस्व ह्या झगड्यांतच दिसून येतें. हेमाद्रि, माधवाचार्य, सायणाचार्य, नारायणभट्ट इत्यादिकांचे ग्रंथ विरुद्ध प्रयत्नाची साक्ष देतात. एकनाथ पहिल्या कोटींतला, तर त्याचा मुलगा बापाच्या अगदीं उलट, कर्मठ पंडित होता. ह्या दोन वर्गांची तोंडमिळवणी कदाचित् रामदासानें केली असावी. अशा ह्या दोन ग्रंथप्रवाहांच्या तीव्र विरोधांत हिंदु राष्ट्र आजपावेतों जगलें आहे. कोणताही एक पक्ष पूर्णपणें यशस्वी झाला असता तर आर्यांच्या अमूल्य संस्कृतीला सर्व जग आज मुकलें असतें. वेद, उपनिषदें, स्मृती इत्यादि ग्रंथभांडार व संस्कृत भाषा जिवंत ठेवण्याचें काम एका पक्षानें केलें आहे, तर बौद्धांचें, जैनांचें, संतांचें तितकेंच बहुमोल ज्ञानभांडार दुसऱ्यापक्षानें सर्व जनतेंत फैलावलें आहे. सबब रा. राजवाड्यांनीं उच्च व थोर विचार, आणि सामान्यजनोपयोगी विचार असा जो संस्कृत व मराठी ग्रंथांतला भेद दाखविला आहे, तो बरोबर नाहीं. ज्ञानेश्वर व तुकाराम ह्यांच्या वाणींत उतरले नाहींत असे आणखी थोर विचार कोणते राहिले! वेदान्तांतले उत्तमोत्तम सिद्धान्त, अत्यंत हीन मानलेल्या लोकांत सुद्धां, जणूं काय, उपजतच माहीत आहेत, इतर धर्मांप्रमाणें हे सिद्धान्त स्वतंत्र शिकवावे

लागत नाहींत, हा जो हिंदुआर्य संस्कृतीचा विशिष्ट गुण आहे, त्याचें कारण वरील झगडा होय. हा झगडा कायम असणें राष्ट्र जिवंत असल्याचें निदर्शक होय. जेथें तीव्र मतभेद नाहीं, तेथें प्रगति नाहीं व सुधारणाही नाहीं. दोन अथवा अधिक पक्षबलांच्या दरम्यान घडून येणारा परिणाम हाच राष्ट्रास इष्ट मर्यादेंत ठेवीत असतो, आणि अशाच व्यापक दृष्टीनें ह्या घडामोडींचें अवलोकन करावें, तेव्हांच इतिहासाचें रहस्य कळूं लागतें.

७. महाराष्ट्रधर्म.—संतकवींच्या शिकवणीचा शिवाजीच्या राज्यस्थापनेस कितीसा उपयोग झाला, हा मोठा वादग्रस्त प्रश्न असून त्याचा पुष्कळ ऊहापोह पूर्वीं झाला आहे, व पुढेंही होईल. कित्येक पुराणप्रिय मंडळीस ह्या दोन शब्दांनीं प्रेमाचा पाझर फुटतो; अर्थात् असा पाझर फुटून विचारशक्ति गुंग झाल्यावर त्यांजकडून झालेलें विवेचन किती किंमतीचें होईल तें सांगतां येत नाहीं. शिवाजीच्या राज्यस्थापनेस जीं अनेक कारणें झालीं, त्यांत संत कवींच्या शिकवणीस कै० रानड्यांनीं बरेंच महत्त्व दिलें आहे. त्याजवर रा. राजवाडे म्हणतात. 'रानडे म्हणतात तसली सुधारणा संतांच्या ग्रंथांत कोठें दिसत नाहीं. ह्या साधूंना देव, धर्म, देवळें, जाति व स्वभाषा हीं बिलकुल सोडावयाचीं नव्हतीं. रानड्यांचें हें संतांवरील विवेचन अगदीं निराधार व शोधकपणास अयोग्य असें झालेलें आहे. महाराष्ट्रधर्माचा खरा अर्थही त्यांच्या ध्यानांत आला नाहीं. संतांच्या स्वप्नींही नव्हते ते विचार त्यांच्यावर लादले गेले आहेत. जात मोडून टाकावी, दगडाचे देव फेकून द्यावे, महारांशीं ब्राह्मणांनीं अन्नव्यवहार करावा, वगैरे अपसिद्धान्तांचे आरोप ह्या साधूंवर रानड्यांनीं केले आहेत.'

संतांच्या कामगिरीविषयीं विचार करितांना, त्यांचे दोन वर्ग दृष्टीसमोर येतात. एक निव्वळ भक्तिमार्गी व दुसरा ऐतिहासिक. पहिल्यांचें लक्ष राष्ट्राकडे किंवा ऐहिक सुखाकडे नव्हतें. विठोबाची भक्ति त्यांच्यांत बाणली होती; पण ते केवळ भजनांत निमग्न असल्यामुळें, राष्ट्राच्या संबंधानें त्यांचा उद्योग पंगु होता, असेंच म्हणावें लागतें. परंतु दुसऱ्या वर्गांतले संत राष्ट्रास जिवंत ठेवितात. जुन्या गोष्टी, प्राचीन योद्ध्यांचे पराक्रम व आख्यायिका वगैरे लोकांस फार प्रिय असतात. अशा सर्व गोष्टींचें भांडार म्हणजे रामायण व महाभारत हे ग्रंथ होत. ह्या ग्रंथांतील नानाविध

आख्यानें घेऊन, त्यांजवर लढाईच्यीं, राजनीतीचीं, थोर पुरुषांच्या पराक्रमाचीं वगैरे रसभरित कवनें करून, राष्ट्राभिमान जागृत ठेवणें हें काम दुसऱ्या वर्गाचें; ह्याचा उपयोग राष्ट्रास नेहमींच आहे. पहिल्या वर्गाचा राष्ट्राच्या प्रगतीस उपयोग मुळींच नाहीं असें म्हटलें तरी चालेल. रा. राजवाडे, पहिल्यास 'सहिष्णु' व दुसऱ्यास 'जयिष्णु' असें म्हणतात, तें बरोबर आहे. 'दामाजीपंताच्या वेळचा स्तब्ध विटोबा ही सहिष्णुधर्माची मूर्ति व रामदासाचा उड्डाण करणारा मारुती ही जयिष्णुधर्माची मूर्ति.' राष्ट्राची भिस्त राष्ट्रीय ग्रंथांवर असते. रामायण, महाभारत, दासबोध ह्या ग्रंथांची राष्ट्रशिक्षणाला अत्यंत जरूर आहे. सर्व काळीं व सर्व स्थितींत हे ग्रंथ राष्ट्राला त्याचें कर्तव्य शिकवून जागृत ठेवितात; भाग्यकाळीं त्यास उन्मत्त होऊं देत नाहींत, किंवा विपत्काळीं त्याचें धैर्य खचूं देत नाहींत. अशा ग्रंथांचें अध्ययन राष्ट्राला नेहमींच सन्मार्गाला लावितें. सारांश, महाभारत व रामायण ह्यांजवर किंवा त्यांतील विषयांवर ज्यांनीं आपलें कवित्व खर्चिलें, त्यांच्या शिकवणीचा उपयोग राष्ट्रास झाला. युद्धाच्या नुसत्या वर्णनानें सुद्धां राष्ट्रांतील वीर्यतेज थोडेंबहुत चमकत राहतें. मुक्तेश्वर वगैरेंनीं अशा वर्णनांची कमाल केलेली असून, त्यांच्या कवनांत हा उद्देश दिसतो. महाराष्ट्रांत जी राज्यस्थापना झाली, तिचें बीज ह्या ऐतिहासिक कवींनीं पेरिलें असें म्हणण्यास चिंता नाहीं. असें कळतें कीं, शिवाजीच्या प्रत्येक किल्ल्यावर मुद्गल कवीचें रामायण असे. ह्या कवीनें मुसलमान व मराठे यांचीं कित्येक चित्रें काढिलीं आहेत तींही पाहण्यालायक आहेत. प्रत्येक किल्ल्यावर रात्रीं भोजन झाल्यावर हें रामायण वाचीत; तसेंच फौजेंतही तें मुद्दाम वाचवीत. रामदासानें रामायणापैकीं फक्त युद्धकांडच लिहिलें; एकनाथानें फक्त रुक्मिणीस्वयंवर लिहिलें. मुक्तेश्वर व चोंभा हे ह्या वर्गांतील होत. रामदासाच्या ग्रंथांत नेहमीं 'धर्मराज्य' हे शब्द येतात. राज्य कोणाचें, शिवाजीचें नव्हे तर धर्माचें; अशी उच्च भावना कित्येक कवींची होती.

'संतांनीं राजकीय बाबतींत मुळींच लक्ष दिलें नाहीं व त्यांच्यांमुळें महाराष्ट्रांत राजकीय गुणांचें पुनरुज्जीवन झालें नाहीं. उत्तरहिंदुस्थानांत संतही पुष्कळ झाले, आणि तिकडे धर्मसंबंधीं जुलूमही अतोनात झाला, हें काशी, अयोध्या येथील मंदिरांच्या स्थितीवरून उघड होतें. असें असतां

स्वराज्याची निर्मिति उत्तरेंत झाली नाहीं.' (चिं. वि. वैद्य-इंदुप्रकाश.) महालिंगदास नांवाचा एक कवि सोळाव्या शतकाच्या अखेरीस म्हणजे शिवाजीच्या जन्मापूर्वी होऊन गेला. त्याचा विक्रमबत्तिशी नांवाचा एक ग्रंथ आहे. त्यांत म्लेंछसेवानिषेध, ब्राह्मणधर्म, स्वदेशप्रीति इत्यादि विषय मोठ्या कळकळीनें सांगितले आहेत. हा राजनीतीचा प्रासादिक ग्रंथ त्या वेळीं निर्माण झाला, ह्यावरून महाराष्ट्रांतील विचारवंतांच्या कल्पना स्वराज्योन्मुख होऊं लागल्या होत्या, असें म्हणावें लागतें.' (रा. पंडित, वि. ज्ञा. वि. जून १९१३).

संतांच्या उद्योगाचा राष्ट्रास उपयोग झाला, असें ज्यांचें प्रतिपादन आहे, ते म्हणतात कीं, राष्ट्रोन्नतीचें एक मुख्य अंग संतांनीं तयार केलें. त्यांच्या उद्योगानें जातिद्वेष कमी झाला. स्त्रीशूद्रांसही ब्राह्मणांच्या बरोबरीनें ज्ञान मिळण्याची सवड झाली. संसारांत स्त्रियांचें महत्त्व वाढून कौटुंबिक वर्तन पवित्र होत चाललें. राष्ट्र परोपकारशील, सहनशील, एक जुटीनें काम करण्यास तयार, असें बनत चाललें. जपजाप्य, यज्ञयाग, योगाभ्यास इत्यादि कृत्यांकडे लोकांच्या काळाचा व शक्तीचा व्यय होत असे, तो बंद झाला. विचार व आचार यांच्यांतील विरोध नाहींसा होत चालला. संसारांत राहून स्वपरहित साधणें हाच उत्तम धर्म, हाच पुरुषार्थ, हेंच सर्व जन्माचें सार्थक, असें मानण्याकडे लोकांची प्रवृत्ति झाल्यामुळें, त्यांच्या अंगी स्वाभिमानाचें वारें वास करूं लागलें. ते आपल्या कंबरा बांधून स्वत्व रक्षण करण्यास उद्युक्त झाले. ब्राह्मण शूद्राचे खांद्यास खांदा लावून उद्योग करूं लागले. आपल्या योग्यतेची चहा ब्राह्मण करितो, हें कळतांच शूद्रही ब्राह्मणास मनापासून साह्य करूं लागला. निर्वाहापुरतें अन्नाच्छादन असलें म्हणजे पुष्कळ, अशी समजूत होऊन दारिद्र्यांत सुद्धां आनंदी व संतुष्ट राहणें ही गोष्ट संतांनीं स्वोदाहरणानें लोकांस दाखवून दिली. ते आपल्या घरीं धान्य किंवा द्रव्य यांचा संग्रह करीत नसत. कदाचित् त्यांची दया येऊन कोणा धनिकानें त्यांस कितीहि द्रव्य दिलें तरी ते तें लगेच गोरगरिबांना वांटून देत; आणि स्वतः कफल्लक राहत. कित्येक वेळां धनवान् लोक त्यांस न कळत कांहीं द्रव्य त्यांजकडे पोंचतें करीत; परंतु हें ते ताबडतोब लुटवीत. यामुळें सर्वांची त्यांजवर भक्ति बसे. स्वामिभक्ति, व साधुसेवा यांची थोरवी तुकारामानें पदोपदीं गाइली आहे. संतांनीं भागवतधर्म प्रचारांत आणिला.

कीर्तनें, पुराणें वगैरे मार्गांनीं त्यांनीं मराठी भाषेच्या द्वारें लोकांस सज्ञान केलें. वैय्याकरणी, नैय्यायिक वगैरे पंडितांनीं विद्येचें व पांडित्याचें गूढ माजविलें होतें, त्याचा यामुळें प्रतिकार झाला. युरोपांतही त्या वेळेस स्कोलॅस्टिक विद्येचें पंडितांनीं प्रचंड अवडंबर माजविलें होतें, तें जसें पंधराव्या शतकांत उघडकीस आलें, त्याचप्रमाणें थोडा बहुत प्रकार इकडेही घडला. सारांश, बायकापुरुष एकसारखे, सर्व जाति एकमताच्या, सर्व लोक एक दिलानें काम करण्यास तत्पर, अशी तयारी झाल्यावर स्वराज्यस्थापना सुलभ झाली. अशी तयारी असल्यामुळेंच शिवाजीच्या अंगीं राज्य स्थापण्याची शक्ति आली. एकच मनुष्य एखादें काम करण्यास हुशार असला, तरी त्याचे संविभागी होण्यास इतर मंडळी तयार नसतील तर, आणि इतर सर्व साधनांची तयारी झाली नसेल तर, त्या एकट्या पुरुषाचे हातून कोणतेंही महत्कृत्य व्हावयाचें नाहीं. उलटपक्षीं, सर्व सिद्धता असल्यावर तिचा योग्य उपयोग करण्यास शक्तिमान असा पुरुष निपजण्यास विलंब लागत नाहीं. महाराष्ट्रीयांच्या उदयाचे वेळेस शिवाजी जन्मासच आला नसता तर तत्समान दुसरा कोणी पुरुष तें काम तडीस नेण्यास पुढें आला असता, असें कित्येकांचें म्हणणें आहे. यामुळें शिवाजीच्या अंगीं लोकोत्तर गुण नव्हते असें नाहीं, पण इतर गोष्टींच्या साह्यामुळें त्या गुणांचें चीज झालें. लोकोत्तर गुण अंगीं असल्याशिवाय राष्ट्राचा पुढाकार स्वीकारण्याची पात्रता अंगीं यावयाची नाहीं, हें उघड आहे.

रामदास स्वामीनें ' मराठा तेवढा मेळवावा, महाराष्ट्र-धर्म वाढवावा, ' असा उपदेश केल्याचें प्रसिद्ध आहे. या उपदेशावरून रामदासाची योग्यता कळणार आहे. रामदासाच्या उपदेशांतील महाराष्ट्रधर्म म्हणजे प्राक्कालीन साधुसंतांनीं दाखविलेला प्रकार तर खराच; परंतु त्याहून कांहीं ज्यास्त अर्थाचा समावेश त्यांत होत होता. नाहीं तर ' महाराष्ट्र ' हा शब्द योजण्याचें प्रयोजन नव्हतें. त्या शब्दांत पुष्कळ अर्थ भरलेला आहे. महाराष्ट्र देशाची रचना, त्यांतील लोकांच्या अंगचें पाणी, व प्रयत्न केला असतां बाहेर येणारें त्यांचें सामर्थ्य, इत्यादि गोष्टींचा रामदासाच्या मनांतील अर्थ त्या शब्दांत व्यक्त होतो. पूर्वीच्या साधूंच्या उपदेशाची दिशा केवळ वैराग्याची होती. स्वदेशाचे व स्वराष्ट्राचे संबंधानें लोकांचें कर्तव्य म्हणून कांहीं आहे, व तें त्यांस समजावून दिलें पाहिजे, ह्या

गोष्टी त्या साधूंच्या विचारांत नव्हत्या. विशुद्धांत:करणानें परमेश्वरभक्ति करावी, यापलीकडे त्यांचे विचार गेले नाहींत. रामदास विद्वान, बहुश्रुत, व देशकालज्ञ होता. त्यानें अर्धें आयुष्य जगाचा अनुभव घेण्यांत व लोकनिरीक्षण करण्यांत घालविलें होतें. लोकांनीं ऐक्य करून स्वराज्य स्थापन करावें; स्वराज्यस्थापनेवांचून स्वधर्मोन्नति व्हावयाची नाहीं, धर्म व राष्ट्र यांचा निकट संबंध आहे, असा त्याच्या उपदेशाचा अर्थ होता. रामदास हा स्वदेशाभिमानी, दूरदर्शी, धूर्त, समाजाची व राष्ट्राची उन्नति करून इष्टकार्य तडीस नेण्याच्या विचारांत निमग्न होता असें दासबोधावरून दिसून येतें. नाहीं तर व्यवहारांतील हजारों विषयांवर नियम करून ठेवणें त्यास कां अवश्य वाटलें? रामदास एके ठिकाणीं फारसा राहत नसे. सर्व काळ गांवोगांव फिरून लोकस्थिति काय आहे ती समजून घेऊन, तदनुसार उपदेश करण्याचा त्याचा उद्योग होता. आपण होऊन लोकांस सुधारण्यास जाण्याची अवश्यकता तुकारामास वाटली नाहीं. स्वत: वैराग्यशील राहवयाचें असा तुकारामाचा बाणा असल्यामुळें लोक त्याला भजत, म्हणून तो कंटाळून जाई. समाजाची त्यास जरूर नव्हती. आपलें वजन समाजावर पडावें अशी त्यास इच्छा नव्हती. पण रामदास त्याचे उलट होता. आपणाकडे लोकांनीं यावें, आपण होऊन ते न येतील तर अनेक उपायांनीं ते आपणाकडे येतील असें करावें, नंतर त्यांचें कर्तव्य त्यांस समजून द्यावें, आणि तेणेंकरून इष्ट हेतु तडीस न्यावा असे त्याचे प्रयत्न होते. या अर्थानें तो राष्ट्रहितैषी व समाजसुख साधण्याची तळमळ लागलेला असा दिसतो. समाजाची त्यास अत्यंत जरूर दिसली. समाज सोडून राहण्यांत पुरुषार्थ नाहीं, समाजास त्याचें कर्तव्य समजून दिलें पाहिजे हे विचार रामदासाच्या मनांत घोळत असत. रामदास आपल्या प्रवासांत स्वराज्याच्या इमारतीचें साहित्य जमवीत होता. कोठें काय आहे हें त्यानें समजून घेतलें होतें. महाराष्ट्रांतील राजकीय चळवळीचीं मुख्य मुख्य ठिकाणें, मुख्य मुख्य घराणीं, व त्यांचें बलाबल यांविषयीं पोक्त विचार ठरवून त्यांजबद्दलची माहिती तो शिवाजीस देत असावा. तो जसा वेशानें तसा पेशानें खरा साधु होता.

८. रामदासाची योग्यता.—रामदासाचा जन्म स. १६०८ त झाला, आणि स. १६८१ त त्याचें देहावसान झालें. म्हणजे पाऊणशें वर्षेंपर्यंत

महाराष्ट्रभाग्योदयाचा संपूर्ण पूर्वरंग त्यानें पाहिला. ह्या भाग्योदयाशीं त्याचें तादात्म्य झालेलें त्याच्या दासबोधांत स्पष्टपणें दिसतें. त्याचा वडील बंधु रामीरामदास, ज्यास श्रेष्ठ अशी संज्ञा होती, त्याच्या व रामदासाच्या ग्रंथांत आपणास तत्कालीन देशस्थिति आणि समाजाचे उद्योग दृष्टीस पडतात. देशाची दैना पाहून रामीरामदास पदोपदीं विलाप करितो. रामदास केवळ विलाप करीत न बसतां अत्यंत कळकळीनें व सावधपणानें उपाय चिंतन सांगतो. रामदासाचे विचार रामीरामदासाच्या विचारांची पुढची पायरी होत. मराठी राज्याचा उदय होण्यास जे उद्योग कारण झाले, त्या कांहींचें विवेचन ह्या दोघांच्या ग्रंथांत मिळून संपूर्ण सांपडतें. अलीकडे प्रसिद्ध झालेल्या कागदपत्रांवरूनही बरीचशी अटकळ करितां येते.

सत्कार्योत्तेजक सभेनें प्रसिद्ध केलेल्या ग्रंथांत रामदासाच्या उद्योगाचें संपूर्ण चित्र पाहवयास मिळतें. सभेचे ते ग्रंथ केवळ भाविक दृष्टीनें लिहिलेले आहेत. ऐतिहासिक किंवा चिकित्सक दृष्टि त्यांत दिसत नाहीं. परंतु चिकित्सक भावना मनांत ठेवून ते ग्रंथ वाचणें आपणांस अशक्य नाहीं. रामदासानें केलेले चमत्कार, किंवा त्याच्या भक्तांनीं माजविलेले अवडंबर, ह्यांजविषयीं मतभेद असूं शकेल. परंतु रामदासी ग्रंथ व कागदपत्र यांजवरून रामदासाच्या एकंदर उद्योगाची कल्पना करितां येते.

रामदास विद्वान होता; त्यास संस्कृत, मराठी व दुसऱ्या कित्येक भाषा येत होत्या; पूर्वीचे संस्कृत आणि मराठी ग्रंथ त्यास अवगत होते; तत्कालीन विद्याशास्त्रांचें त्यानें अवलोकन केलें होतें; ह्या गोष्टी स्पष्ट आहेत. रामदास देशकालज्ञ व व्यवहारज्ञ होता, मनुष्यस्वभावाची त्यास चांगली पारख होती, त्याची अवलोकनशक्ति जबर होती; आणि लोकांत मिसळण्याची व त्यांचें हृद्गत समजून घेण्याची त्यास आवड असल्यामुळें, लोकांचीं तंटेभांडणें, त्यांचे गुणदोष, त्यांचीं व्यसनें, त्यांचे नाद वगैरे प्रकार त्यास कळून चुकले होते. कैक वर्षे प्रवास करून उत्तर टोंकापासून तो दक्षिणेपावेतों यात्रेचीं ठिकाणें स्वतः पायीं फिरून, त्यानें पाहिलीं होतीं. त्यावरून एकंदर देशस्थितीची त्यास चांगली माहिती झाली. अनेक साधुसंतांशीं व अनेक लहानथोर पुरुषांशीं त्याचा समागम, संभाषण, व विचारविनिमय झाला. स्वतः तो अत्यंत निरिच्छ व सदाचारसंपन्न ब्रह्मचारी होता, यामुळें पाहिजे

त्या पुरुषावर आपली छाप बसविण्याइतका त्यास अधिकार होता. 'बोले तैसा चाले,' व 'आधीं करावें; मग बोलावें,' असा त्याचा बाणा असल्यामुळें, कोणासही चार गोष्टी सांगण्यास तो समर्थ होता. सर्व धर्मांचें, सर्व पंथांचें, सर्व आचारांचें रहस्य त्यास कळलें होतें. त्याचे कोणी शत्रु नव्हते, त्याची निंदा कधीं कोणीं आज पावेतों केलेली नाहीं. तुकारामासारख्यांनीं सुद्धां त्यास वंदिलेलें आहे. बहुतेक साधुसंत प्रथम गृहस्थाश्रमी असून, अनेक संकटें किंवा त्रास झाल्यामुळें गुरूपदेश घेऊन मग साधु बनले, तसाही प्रकार रामदासाचा नव्हता. सर्व गोष्टी अनुकूळ असतां, जन्मापासूनच तो खरा साधु होता, आणि समाजास ऐहिक व पारमार्थिक कर्तव्य शिकविण्यास विद्वत्तेनें, अनुभवानें, ब्रह्मवर्चसानें महाराष्ट्रांतील एकंदर संतमंडळींत त्याच्या इतका 'समर्थ' दुसरा कोणी झाला नाहीं. म्हणून त्या एकट्यासच 'समर्थ' असें सार्थ अभिधान मिळालें. हें रामदासाचें वर्णन अतिशयोक्त किंवा नाकबुल करतां येण्यासारखें नाहीं.

सर्व प्रचालित पंथ किंवा गुरुपरंपरा सोडून रामदासानें रामोपासना सुरू केली, स्वत: गुरु न करितां श्रीरामचंद्रासच गुरुस्थानीं योजिलें, हेंही त्याचें धोरण सहेतुक आहे. रामाची भक्ति करणें, रामाच्या नांवानें प्रत्येक उद्योग करणें, सर्व यशापयश रामाला अर्पण करणें, सर्व सुखदुःखाचा भार रामावर टाकणें, हें रामभक्तीचें रहस्य रामदास सांगतो. तो शिवाजीला म्हणतो, 'शिवबा, तुला वारंवार जय मिळतो हा प्रभाव रामाचा, तुझा नव्हे. रामावर श्रद्धा ठेवून तूं काम करितोस, म्हणून तो तुला पावतो. ह्यांत तुला स्वसामर्थ्याचा गर्व वाहण्याचें कारण नाहीं.' हे शब्द बखरकारांचे आहेत. म्हणजे बखरकारांनीं 'राम' ह्याचा अर्थ ह्याप्रमाणें केला आहे. पूर्वींच्या साधुसंतांनीं भक्तीचें माहात्म्य वाढविलें. भक्तीच्या अतिरेकांत लोक संसार पराङ्मुख झाले, इह लोकचीं कर्तव्यें विसरले. तेणेंकरून राष्ट्र शक्तिहीन झालें. ही समाजाची हीनता दूर करण्याचें काम रामदासानें केलें. संसारांत राहून नित्य व्यवहार नेटानें चालविणें, आपलें कर्तव्य योग्य रीतीनें बजावणें, हेंच धर्माचें खरें पर्यवसान होय; समाज सोडून वैराग्य धारण केल्यानें समाज आपणास मुकतो व आपण समाजास मुकतों; तेणेंकरून समाज कर्तव्यविमुख होऊन नाश पावतो. अशा प्रकारें साधुसंतांच्या उपदेशाचा ओघ पूर्वीं वैराग्याकडे

चालला होता, तो रामदासानें फिरवून, राष्ट्रहिताकडे, समाजसुखवृद्धीकडे लाविला. धर्माचा तात्कालिक व पारमार्थिक उपयोग हाच असून, हीच गोष्ट पूर्वीचे संत व रामदास ह्यांजमधील फरक दाखविते. संसार क्षणभंगुर आहे, केव्हां तरी मरण येणारच, तें मरण बिच्छान्यावर पडून येण्यापेक्षां स्वदेशसेवेंत आल्यानें जीवितसाफल्य होतें, हें रामदासानें शिकविलें. रामाची सेवा ती हीच, आणि रामाच्या नांवानें कर्म करणें तें हेंच. असें केल्यानें सिद्धि यावयाचीच, आणि सिद्धि न आली तरी रामप्रीत्यर्थ जिवाचा व सर्वस्वाचा त्याग करणें, हें महत्पुण्य होय, असा उपदेश करून रामदास लोकांस नेहमीं जागृत ठेवीत असे. कष्टाशिवाय कांहीं साध्य होत नसतें. प्रत्येकानें स्वतःच्या जिवाची परवा न करितां कष्ट करावे, उद्योगांतीं सर्व कांहीं मिळतें, असा दासबोधांत उपदेश करून, रामदासानें लोकांचें आलस्य झाडून टाकिलें. ह्याच्याही पेक्षां दुसरी मोठी गोष्ट रामदासानें केली, ती अशी कीं, त्यानें लोकांस स्वार्थत्याग शिकविला; मी व माझें ही त्यांची संकुचित दृष्टि काढून टाकिली; लोकांच्या अहंकारावर हल्ला करून त्याचा नाश केला. त्या वेळेच्या पंडितंमन्य विद्वानांचे डोळ्यांतही रामदासानें चांगलें अंजन घातलें.

संसारत्याग करून वैराग्य अगर अरण्यवास स्वीकारल्यानें फार तर तेवढ्या इसमास मुक्ति मिळेल; परंतु त्या मार्गानें मागें राहिलेल्यांची वाट काय? सर्व सामान्य जन तुकाराम होणें दुरापास्त आहे. सर्व संसार नाहींसा करणें अशक्य आहे. या गोष्टी जमेस धरून सर्वांच्या कल्याणाचा मार्ग तोच खरा धर्म. संसारांत राहून फलापेक्षा न करितां कर्तव्य बजावणें हाच सर्वांच्या सोयीचा धर्म आहे. रामदासाचा राम तो हाच. मुक्ति नको, तर पुनर्जन्म पाहिजे, मात्र तो जन्म मिळवून त्याचें सार्थक करावें, ही नवीन दिशा रामदासानें तत्कालीन धर्मसमजुतींस लावून दिली. त्यामुळें रामदासाचें वैराग्य, त्याचें साधुत्व, किंवा त्याची परमार्थपरायणता यांस कमीपणा न येतां, उलट तीं ज्यास्तच जाज्वल्य दिसतात. देशस्थिति समजून घेऊन आपणास खरी जरूर कशाची आहे ती भरून काढणें, ह्यापेक्षां महत्कार्य दुसरें कोणतें? रामदास साधुवृत्ति धारण न करितां मुत्सद्दी म्हणून राहिला असता, तर इतक्या गोष्टी त्यास करितां आल्या नसत्या. पृथ्वीवर मोठमोठे धर्मवेत्ते होऊन गेले, त्यांनीं अशाच रीतीनें समाजावर उपकार करून

ठेविले आहेत. कर्तव्य करण्यांत प्राण द्यावयाचे, हें उदात्त तत्त्व मुसलमान अगर खिस्ती धर्मानुयायांनीं मानिलें नसतें, तर त्यांच्या धर्माची बढती झाली नसती. सारांश, देशहिताकडे लक्ष दिल्यानेंच रामदासाची योग्यता वाढली आहे. रामदासानें आपल्या मागें आपलें काम सतत चालू राहण्याची सोय करून ठेविली. रामदासी पंथ काढून शेंकडों मठ स्थापून, वर सांगितल्याप्रमाणें लोकांस उपदेश करून त्यांचा आळस झाडून टाकण्याची योजना त्यानें केली. या कामीं स्त्रियांचाही त्यानें उपयोग करून घेतला. रामदासाच्या शिष्यवर्गांत अनेक सुसंस्कृत स्त्रिया होत्या, हें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे.

अकराव्या व बाराव्या शतकांत पीटर नांवाचा एक साधु खिस्ती राष्ट्रांस मुसलमानांविरुद्ध लढण्याविषयीं उद्युक्त करीत होता. त्यावरून खिस्ती मुसलमानांत पुढें अनेक युद्धें झालीं. त्या पीटर साधूचें व रामदासाचें बरेंच साम्य आहे. पीटरनें खिस्ती राष्ट्रांस लढण्यास लाविलें, म्हणून त्याचें साधुत्व कमी झालें नाहीं; त्याजबद्दल सर्व खिस्ती राष्ट्रांची अत्यंत पूज्यबुद्धि कायम आहे. त्याच प्रकारचे रामदासाचे प्रयत्न असून अखिल राष्ट्रानें गर्व वाहवा, असा तो अद्वितीय पुरुष त्या कालीं निपजला.

रामदासाची ही योग्यता लहान नाहीं. परंतु ह्या पलीलडे रामदासाच्या उद्योगास आणखी एक जोडीदार पाहिजे होता. रामदासाच्या पुढें एक पायरी जाऊन संसारसुखाची वृद्धि करण्याचे अन्य मार्ग युरोपांतल्याप्रमाणें इकडे कोणीं दाखविले नाहींत, ही मोठ्या दुःखाची गोष्ट होय. सत्यरक्षणाकरितां प्राण खर्ची घालणारे व दृढनिश्चयाचे अनेक साधु इंग्लंडांत धर्मसुधारणेच्या वेळेस उदयास आले, त्याप्रमाणें इकडेही त्याच वेळेस त्यांच्या तोडीचे धर्मोपदेशक कमी उत्पन्न झाले असें नाहीं. संसार सोडून मोक्ष मिळविण्याची खटपट करणें ही मूळस्थिति होती. ती सुधारून संसारांत राहून मोक्ष मिळविण्याचा प्रयत्न करणें, येथपर्यंत पाश्चात्यांची व आमची मजल बरोबर होती. परंतु याच्यापुढें संसार सुधारून ऐहिक सुखवृद्धीकडे लक्ष देऊन, स्वदेशास उन्नत्ति आणण्याची जी त्याच्या पुढची पायरी, ती पाश्चात्यांनीं गांठिली, आम्हांस ती मिळाली नाहीं; अगर कदाचित् आमच्याकडे उदरनिर्वाहाची पंचाईत नसल्यामुळें, आम्हांस तिची जरूर वाटली नाहीं. सर टॉमस मूर, सर फ्रॅन्सिस

ड्रेक, सर वॉल्टर रॅले, लॉर्ड बेकन इत्यादि थोर पुरुषांनीं इंग्लंडांत त्या देशाच्या भावी उन्नतीची दिशा दाखविली, आणि राष्ट्राचें शिक्षण कोणत्या प्रकारचें असावें हें शिकविलें, त्यामुळें धर्मसुधारणेप्रमाणेंच समाज व शास्त्राध्ययन यांत सुधारणा होऊन, ऐहिक सुखप्राप्तीचीं अनंत साधनें तिकडे उत्पन्न झालीं. परंतु आम्ही इकडे सर्वांआधीं तत्परतेनें स्वकृत्य करण्यास लागलों असतां, पुनरपि निद्राग्रस्त होऊन पडलों आहों.

९. **शिवाजीच्या राज्यस्थापनेंत रामदासाचा भाग.**—शिवाजीच्या राज्यस्थापनेंत रामदासाचें अंग किती होतें हा प्रश्न महत्त्वाचा असून, त्यासंबंधानें अद्यापपर्यंत पुष्कळ चर्चा झाली आहे. परंतु निर्विकार मनानें प्रश्नाचा विचार होऊन निकाल झालेला नाहीं. विषयसंगतीसाठीं त्याचें विवेचन येथेंच केलेलें बरें. ह्यासंबंधानें प्रथम खालील सन निरनिराळ्या ठिकाणांहून घेतलेले ध्यानांत ठेविले पाहिजेत.

१६०८ रामदासाचा जन्म.

१६२१ लग्न होत असतां पळून जाणें, टाकळीस तपश्चर्या सुरू.

१६३२ तीर्थयात्रा व प्रवास १२ वर्षें.

१६४४ कृष्णातीरीं आगमन.

१६४०–४५ शिवाजीचा पहिला राज्योपक्रम.

१६४९ चाफळच्या मठाची स्थापना. रामजन्मोत्सव सुरू.

१६४९ एप्रिल १२ रोजीं शिवाजी राजाची चाफळास स्वामीशीं भेट (?) व तेव्हांपासून पुढें वेळोवेळीं उपदेश सुरू, असें एक पक्षाचें प्रतिपादन.

१६५० फेब्रुवारी १२, तुकारामाचा मृत्यु.

१६५२ जांब, १६५५ मिरज १६६१ भागानगर ह्या मठांची स्थापना.

१६५४–६४ दासबोधाचा रचनाकाल. ग्रंथसमाप्ति स. १६८१.

१६७५ चाफळच्या उत्सवास दरसाल १२१ खंडी धान्य देण्याचा हुकूम.

१६७८ च्या विजयादशमीस मठास गांव नेमून दिल्याची शिवाजीची सनद.

१६८२ फेब्रुवारींत रामदासाचा मृत्यु.

आजपर्यंत प्रसिद्ध झालेल्या माहितीच्या आधारानें हे सन ठरविले आहेत. वरील सनांत शिवाजीच्या भेटीचा काल १६४९ दिलेला आहे,

त्यास आधार नाहीं. रामदासापासून गुरूपदेश घेऊन तदनुसार शिवाजीनें आपला राज्यस्थापनेचा उद्योग सिद्धीस नेला असें असतें, तर चाफळच्या उत्सवास व मठास शिवाजीनें उत्पन्नें करून दिलीं, तीं इतकीं उशीरां कां दिलीं, अगोदर कां करून दिलीं नाहींत ? शिवाय सन १६-२ त ( चैत्र वा। १ शके १५९४ ) दिवाकर गोसावी यास केशव गोसावी याचें पत्र गेलें त्यांत ' शिवाजी व समर्थ ह्यांची ही पहिलीच भेट, ' असा उल्लेख आहे त्याची वाट काय ! शिवाजीला रामदास पूज्य होता यांत संशय नाहीं. परंतु शिवाजीनें ' जिजाबाई व कुलोपाध्ये प्रभाकरभट यांच्या विद्यमानें, महाबळेश्वरकर गोपाळभट बिन श्रीधरभट थोर अनुष्ठाते सूर्योपासनीं, पद्महस्तीं यांजकडून मंत्रोपदेश संपादिला, आणि याबद्दल संकल्पपूर्वक वर्षासनदानपत्र करून दिलें' त्याची अस्सल सनद मार्च सन १६५३ ची सांपडली आहे, ( भा. इ. स. मं. श. १८३४ लें. ७९ ). यावरून रामदासापासून शिवाजीनें मंत्रोपदेश घेतला नसावा, आणि त्या दोघांची भेट स. १६५९ च्या पूर्वी किंवा पुढेंही पुष्कळ दिवस झालेली नसावी.

स. १६४९ त भेट झाली व १६५० त चैत्र शु० १ रोजीं उत्सवाचीं कामें शिवाजीनें आपल्या अष्टप्रधानांस वांटून दिलीं, असें इ. स. जुन्या ऐ. गोष्टी भाग २ अंक ५ येथें प्रतिपादन आहे.

शिवाजीचा राज्योपक्रम सन १६४१ च्या सुमारास पुरा झाला होता, आणि त्या उपक्रमांत आरंभीं रामदासाचें अंग बिलकुल नव्हतें हें पुढें येणार आहे. शिवाजीला राज्य स्थापन करण्याची स्फूर्ति रामदासापासून झालेली नाहीं. शिवाजीनें जोरानें चालविलेला उद्योग रामदासास चाफळास आल्यावर हळूहळू कळूं लागला. देशाची अवनति कशानें दूर होईल ही विवंचना रामदासास अगोदरच अहर्निश लागलेली होती; शिवाजीचा उपक्रम पाहून रामदासाच्या मनांत नवीन प्रकाश पडला आणि शिवाजीचा नवीन उद्योग व कर्तबगारी पाहून त्यास नवीन दिशा दिसूं लागली, ती राजकारणाची होय. प्रथम रामदासाच्या मनांत राजकीय उन्नतीचा विषय नव्हता. स. १६५९ त दासबोध अर्धा अधिक झाला त्यांत हा विषय नाहीं. त्या ठिकाणीं दासबोधाची समाप्ति सुद्धां केलेली होती. मोरे, अफझलखान वगैरे प्रकरणें उलगडून शिवाजीचें वैभव पुढें वाढलें, तेव्हां रामदासास राजकीय बाबतींचा उलगडा पडला. तो चाणाक्ष होता, म्हणून वस्तुस्थिति

समजून तिला मदत करण्यास त्यानें विलंब केला नाहीं. नवीन प्रसिद्ध झालेल्या समर्थकालीन पत्रव्यवहारावरून हाच प्रकार उघड होतो. शिवाजीचा उद्योग पाहून रामदासास वाटूं लागलें कीं, शिवाजीचा उद्योग जितका यशस्वी होईल तितका करणें, हें प्रत्येक महाराष्ट्रीयाचें ह्या वेळेस कर्तव्य आहे. शिवाजीचे शत्रु नाहींसे व्हावे, त्यास सर्व लोकांनीं मनोभावें मदत करावी, कोणताही स्वार्थत्याग करण्यास लोकांनीं माघार घेऊं नये, अशा बुद्धीनें रामदास शिवाजीच्या उद्योगाची महती लोकांस समजावून देऊं लागला. शिवाजी धर्मराज्य स्थापन करीत आहे, हें राज्य शिवाजीचें नव्हे, धर्माचें आहे, शिवाजी गोब्राह्मणप्रतिपालक आहे, इत्यादि प्रकारचा विश्वास रामदासानें आपल्या मठांच्या द्वारें महाराष्ट्रांत उत्पन्न केला; आणि जे कोणी इसम ह्या कामास लायक दिसले, त्यांस त्यानें शिवाजीकडे पाठविलें. शिवाजीचे अष्टप्रधान व सरदार वगैरे मंडळी रामदासास चाहत होतीच. त्यांस रामदासानें ज्यास्त प्रोत्साहन दिलें व हुरूप आणिला. रामदासाला प्रवासांत जो अनुभव आला होता, त्याचा त्यानें असा उपयोग करून शिवाजीच्या उद्योगास पाठबळ दिलें. त्यानें एका बाजूनें भक्तिमार्गाचा व दुसऱ्या बाजूनें सनातन कर्मठ मार्गाचा युक्तीनें मिलाफ करून दोहोंचें पर्यवसान राज्यवृद्धींत व्हावें अशी खटपट केली.

अर्थात् दासबोधांतील राष्ट्रीय विचारांची स्फूर्ति रामदासास शिवाजीच्या उद्योगानें झाली. शिवाजीला दासबोधापासून स्वराज्याची स्फूर्ति झाली असें म्हणणें म्हणजे कार्यकारणांचा विपर्यास करणें होय. 'आम्ही तुमच्या राज्यांत येऊन राहिलों असतां राजकारणांमुळें आमचा परामर्ष घेण्यास तुम्हांस इतके दिवस फावलें नाहीं,' असें रामदास शिवाजीस लिहितो. अर्थात् शिवाजीचें राजकारण अगोदरच होत होतें. दासबोध वाचूनचही हा प्रकार स्पष्ट होतो. दरएक प्रसंगीं, 'तुम्हीं चांगलें काम केलें; असेंच करीत रहा; धर्मसंरक्षणाकरितांच तुमचा अवतार आहे,' अशा रीतीनें शिवाजीचा गौरव दासबोधांत केलेला आहे. प्रत्येक कारस्थान शिवाजीनें आरंभिलें आणि तें तडीस नेलें ह्याबद्दल त्यास शाबासकी दिलेली आहे. म्हणजे राज्यकारस्थानांतील प्रत्येक गोष्टीचा उपक्रम मूळ शिवाजीचा आहे, हें दासबोधावरूनच दिसून येतें. दासबोध हा ग्रंथ रामदासानें शिवाजीला उपदेश म्हणून लिहिला असा सार्वत्रिक समज आहे त्यांत कांहीं

वावगें नाहीं. शिवाजीला तरी अशा वजनदार सत्पुरुषांची जरूर होतीच. शिवाजीच्या जवळचे सर्व लोक रामदासाची महती गात होते, त्यामुळें शिवाजीला आपल्या उद्योगांत रामदासाच्या लोकसंग्रहाचा हा एक अप्रत्यक्ष फायदा होत होता. दासबोध एकदम रचिलेला नाहीं. शिवाजीच्या उपक्रमावरून त्यास सुरुवात झाली, आणि पुढें वीस पंचवीस वर्षें तो ग्रंथ बनत होता. जसजसे शिवाजीचे उद्योग यशस्वी होत गेले आणि राज्याची इमारत उठत चालली, तसतसे निरनिराळे प्रसंग व निरनिराळे अनुभव दासबोधांत गोंवले गेले. म्हणूनच दासबोधांत संसारांतील सर्व कांहीं विषय येऊन गेले आहेत. 'प्रपंच करून परमार्थ साधावा,' ह्या महावाक्याची उपपत्ति दरएक प्रसंगाच्या निमित्तानें रामदासानें लावून दिली आहे. दासबोध हें नांव सुद्धां त्या ग्रंथास अगदीं शेवटीं शेवटीं मिळालें असेल. शिवाजीच्या भाग्यकाळीं रामदासाएवढा अधिकारी सत्पुरुष त्या वेळीं महाराष्ट्रांत दुसरा कोणी नव्हता. त्याची सर्व जनतेवर छाप होती, आणि सर्व महाराष्ट्र त्यास गुरुस्थान देऊन पूज्य मानीत होता. गुरुकृपेशिवाय मनुष्याचे हातून कोणतेंच काम यशस्वी होत नाहीं, अशी भावना राजांची व इतरांची आज जर एवढी आहे, तर त्या वेळीं ती अतिशयच जोराची असली पाहिजे. शिवाजीला राज्याभिषेक होऊन, त्याच्या उद्योगाची सांगता झाली, आणि फार वर्षें गांजलेल्या महाराष्ट्राच्या संपूर्ण आशा फलद्रूप झाल्या, तेव्हां हें सर्व यश रामदासाच्या कृपेनें शिवाजीला मिळालें, दासांच्या बोधाचा हा परिणाम होय, असा लौकिक समज झाला; आणि हाच समज संभाजी व राजाराम ह्यांच्या आपत्तिकाळीं लोकांचा धीर कांहीं अंशीं कायम राखीत होता. ह्या भावनेनेंच बखरकारांनीं आपल्या बखरी लिहिल्या, आणि जो प्रकार शिवाजीच्या उत्तर काळीं किंवा त्यापुढें लोकांच्या दृष्टीसमोर होता, तो त्यांनीं शिवाजीच्या पहिल्या उपक्रमास लाविला. ह्यांत वास्तविक गैर असें कांहींच नाहीं. रामदास मनापासून शिवाजीच्या उद्योगास लौकिकांत पुष्टि देत होता; आणि अशा उत्तेजनाची कोणत्याही महत्कृत्यास संसारांत नेहेमींच जरूर आहे. त्यामुळें रामदासाची किंवा त्याच्या उद्योगाची योग्यता कमी होत नाहीं. राज्यस्थापनेचें काम पूर्वापार क्षत्रियांचें आहे, आणि तें प्रथम क्षत्रियानेंच, सर्व जोखीम खतःचे अंगावर घेऊन, सुरू

केलें आणि स्वत:चेच शहाणपणानें तें तडीस नेलें. ह्या कामीं ब्राह्मणांची सल्ला व शिकवणी शिवाजीनें प्रेमानें स्वीकारिली, आणि तिचा होईल तितका उपयोगही केला. परंतु आरंभिलेल्या उद्योगाची सर्व जबाबदारी शिवाजीवर होती, रामदासाचें त्यांत अंग नाहीं.

शिवाजीला जेव्हां रामदासाचा उद्योग कळून आला, तेव्हां त्यानें त्याजबद्दल आदर दाखवून त्याचा आपल्या कार्याकडे उपयोग करून घेतला. शूर घराणीं, लढवय्ये लोक व शेतकरी वगैरे रयत ह्यांजवर शिवाजीनें अगोदरच छाप बसविली होती. परंतु रामदासी पंथाच्या फैलावानें वरच्या वर्गांतील शिक्षित जनसमूह शिवाजीकडे वळला. रामदासाची व शिवाजीची भेट झाल्यानंतर शिवाजीला रामदासाचा उद्योग समजला, आणि शक्य तितका त्याचा त्यानें उपयोग करून घेतला. त्या वेळीं धर्मश्रद्धा विशेष प्रबळ होती, तेव्हां रामदासाचें पवित्र आचरण व त्याचा लौकिक ओळखून शिवाजीनें त्याचा आदर केला. त्यानें रामदासाचे चरणीं राज्य अर्पण केलें आणि कागदोपत्रीं आपणास त्याचे चरणरज म्हणवून घे... हा प्रकार केवळ औपचारिक होय. तेवढ्यावरून स्वराज्याची कल्पना रामदासानें उत्पन्न केली, अथवा शिवाजी म्हणजे केवळ रामदासाच्या हातांतील खेळणें होतें, असें म्हणण्यांत कार्यकारणभावाचा विपर्यास आहे.

रा. राजवाडे म्हणतात, 'महीपतीनें संतांची यादी दिली आहे, त्यांपैकीं ६५ नांवें रामदासी संतांचीं आहेत; आणि हे रामदासी संत सन १६६० पासून १७०० च्या दरम्यानचे आहेत. शिवाजीच्या मरणसमयीं सर्व महाराष्ट्रभर रामदासाचीं मतें पाळणारे व कृति करणारे सुमारें १२०० रामदासी काम करीत होते. एकाच मताचा प्रसार व एकाच कृतीची सिद्धि करणारे इतके इसम पाहिले म्हणजे रामदासानें महाराष्ट्राच्या राजकीय पुनरुज्जीवनांत केवढा उद्योग केला तें दिसून येतें.' रामदासी मठांची व्याप्ति शिवाजीच्या राज्यव्याप्तीशीं समरूप आहे. तंजावराकडेही रामदासी मठ पुष्कळ होते.

'तंजावर प्रांतीं रामदासी पंथाचा बराच प्रसार झाला आणि त्या पंथाचें रामदासी वाङ्मयही तिकडे शेंदोनशें वर्षेंपावेतों मराठी भाषेंत बरेंच उत्पन्न झालें. काव्य, आचार, धर्म, कोश, व्याकरण, नाटकें, पोवाडे, बखरी वगैरे अनेक विषयांवर तंजावराकडे ग्रंथ निर्माण झाले.

तंजावरच्या कित्येक राजांनींही नाटकें लिहिलेलीं तंजावरच्या सरस्वती-मंदिरांत आहेत. आनंदतनय व रघुनाथ पंडित हे रामदाससंप्रदायी कवी तंजावरच्या राज्यांत उत्पन्न झाले. कित्येक काव्यें संस्कृतांतही झालेलीं आहेत. तंजावरचा समग्र इतिहास शंभर दीडशें पानांचा बृहदीश्वराच्या दगडी देवळावर मराठींत कोरलेला उपलब्ध आहे. एवढा मोठा शिलालेख जगांत बहुधा दुसरे कोठें नसेल. रा. सांबमूर्तिराव ह्यांनीं तो छापून काढिला आहे.' ( रा. राजवाडे–सरस्वतीमंदिर मा. )

रामदासानें सात आठशें मठ स्थापिले, पण त्यांत बहात्तर मुख्य होते. ह्या मठांत जमणाऱ्या लोकांच्या मनावर रामदासी उपदेशाची छाप असून त्यांचीं व त्यांच्या अनुषंगानें सामान्य जनतेचीं मनें शिवाजीस अनुकूळ झालीं. शिवाजीच्या उद्योगाचें रहस्य त्यांस कळूं लागलें, आणि तितक्या मानानें शिवाजीचे राज्यव्यवस्थेचे प्रयत्न सुकर व सुफल झाले. ह्या पलीकडे ह्या मठांचा उपयोग झालेला दिसत नाहीं. रामदासी पंथाचा जोर संभाजी व राजाराम ह्यांच्या वेळेस असून, त्याचा थोडाबहुत उपयोग त्या संकटमय कार्किर्दीत झाला असावा.

रामदासी मठ राज्याचें कोणतें काम करीत होते तें समजत नाहीं. मठांत रामाचें व हनुमानाचें देऊळ असून जवळ तालीमखानाही असावा. त्यावरून राष्ट्राची शारीरिक व मानसिक शक्ति वाढविण्याचा मठांचा हेतु असावा. दासबोध जसजसा तयार होई, तसतसा ह्या मठांतून त्याचा फैलाव होत असे. निरनिराळे संघ तयार करावे, मंडळ्या कराव्या, संघशक्ति वाढवावी, असें दासबोधांत रामदास मधून मधून सांगतो. ही शिकवणी थोडीबहुत ह्या मठांच्या द्वारा लोकांत फैलावत असेल. आरंभीं ह्या मठांतील निरूपणें ऐकण्यास बरेच लोक जमत. कित्येक मराठे शिवाजीचे शिष्यमंडळींत आहेत. परंतु एकंदरींत मठांचें वजन ब्राह्मणेतरांवर फारसें पडलें नाहीं. राज्याची इमारत उठविण्यांत ब्राह्मणेतरांचीच संख्या मोठी असली पाहिजे. इतक्या उपरही रामदासी मठांची अशा प्रकारची जी काय कामगिरी झाली असेल ती केवळ रामदासाच्या हयातींतच झाली. तो तेजस्वी सत्पुरुष नाहींसा होतांच, त्याच्या पश्चात् तसा थोर पुरुष पुढें कोणी निपजला नाहीं, आणि मठांतून उत्पन्नाचे वगैरे तंटे लागून ते निर्जीव बनले. कारण मठ हयात असूनही पुढें राष्ट्रावनति थांबली नाहीं.

उलटपक्षीं, शिवाजी व रामदास ह्यांचा अर्थाअर्थी संबंध नव्हता असें प्रतिपादन करणें हेंही रास्त नाहीं. मराठ्यांचें भगवें निशाण, व रामराम करण्याची चाल यांनीं रामदासाचें नांव महाराष्ट्रांत अजरामर झालें आहे. आपल्या सर्व इतिहासाचा मुख्य आधार जुने ग्रंथ व कागदपत्र होत. दासबोध ग्रंथ कसा व काय कारणानें निर्माण झाला, आणि शिवदिग्विजयादि एकूण एक बखरकार रामदासाच्या उपदेशाची एवढी महती कां गातात, ह्याची उपपत्ति लाविली पाहिजे. हे आधार जर आपण झुगारून देऊं लागलों, तर मग इतिहास तो कोठें राहिला! ही उपपत्ति एकाच तऱ्हेनें लागते. रामदासानें लोकांचीं मनें शिवाजीच्या उद्योगाकडे वळविलीं, आणि शिवाजीनेंही त्या सत्पुरुषाचे हे उपकार जाणले.

---

## प्रकरण चवथें.

---

## स्वराज्यस्थापनेची सिद्धता.

१. मुसलमानी अमलाखालीं महाराष्ट्राची स्थिति.
२. नवीन मनूचा प्रारंभ.
३. पूर्व तयारीचें स्वरूप.
४. प्रमुख सरदार घराणीं:—
(१) शिर्के. (२) घाटगे. (३) घोरपडे. (४) मोहिते. (५) महाडिक. (६) मोरे. (७) वाडीचे सावंत. (८) फलटणचे निंबाळकर. (९) सिंदखेडचे जाधव.
५. भोसले,– पूर्वपीठिका.
६. मराठ्यांच्या उदयाची सिद्धता.

१. मुसलमानी अमलाखालीं महाराष्ट्राची स्थिति.—एक राष्ट्र दुसऱ्या राष्ट्राकडून जिंकलें जातें, त्या वेळेस जिंकणाऱ्या राष्ट्राच्या उच्चतर सुधारणेचा पगडा जित राष्ट्राच्या हीन सुधारणेवर बसल्याशिवाय राहत नाहीं असा सामान्य नियम आहे. ग्रीक व रोमन ह्या सुधारलेल्या राष्ट्रांनीं शेजारच्या हीनावस्थ राष्ट्रांस जिंकून त्यांजला स्वतःच्या संसर्गानें सुशिक्षित केलें. परंतु सुधारणेच्या बाबतींत मुसलमान लोक हिंदूंच्या पुढें नव्हते; इतकेंच नाहीं, तर पुष्कळ अंशीं मागेंच होते. पुर्वापार चालत आलेल्या

हिंदूंच्या संस्था मुसलमानांच्यानें नाहींशा करवल्या नाहींत. हिंदूंच्या मदतीशिवाय मुसलमानांचें हिंदुस्थानांत क्षणभरही चालणारें नव्हतें. विद्या, कला व संसाराच्या अनेक गोष्टी यांजमध्यें हिंदूंचेंच वजन मुसलमानांवर पुष्कळ अंशीं पडलें. 'ब्राह्मणी राज्याच्या पहिल्या अमदानींत महाराष्ट्रांत मुसलमानांची संख्या एक लाखापेक्षां जास्त नसावी. देशांत शांतता राखण्याकरितां आणिलेलें सैन्य बहुतेक मुसलमानांचेंच होतें. तसेंच काजी, मुन्सफ, कमावीसदार, दिवाण वगैरे दरबारी, मुलकी व दिवाणी हुद्देदार मुसलमानच होते. शिवाय तबीबी, सराफी, मुजावरी वगैरे कांहीं निरनिराळ्या धंद्यांचे लोकही मुसलमान होते. अशी ही मुसलमानांची संख्या राज्य चालविण्यास, शांतता राखण्यास व आपल्या लहान मोठ्या गरजा भागविण्यास एक लाखापेक्षां फारशी ज्यास्त असेल असे वाटत नाहीं.' (रा. राजवाडे). कोणत्याही राजसत्तेचें बलाबल पाहतांना तिच्या सांपत्तिक स्थितीचा विचार करावा लागतो. राज्याचे खर्च बहुधा संरक्षक व संवर्धक अशा दोन स्वरूपाचे असतात. फौज, पोलीस, न्यायखातें, दुष्काळनिवारण, इत्यादि बाबती संरक्षक स्वरूपाच्या असून, विद्या, दानधर्म वगैरे कांहीं बाबती संवर्धक आहेत. बहामनी राज्यांत त्या दोनही बाबतींची बरीच हेळसांड झाली. त्या पार पाडण्याची शक्ति राज्यास कधींच आली नाहीं, असें म्हटलें तरी चालेल. परचक्र ही बहुतेक नेहमींची बाब झाली होती. चोर व दरवडेखोरांमुळें जीव व मालमत्ता सदैव धोक्यांत असत. दुष्काळांनीं तर बहुतेक देश उजाड झाला होता.

दक्षिणेंत आलेल्या मुसलमानांत अस्सल मुसलमानी बाणा फारच थोडा होता. महाराष्ट्रांतील मुसलमानांची संख्या फार तर एक लाख असे. त्यांत अनेक प्रकारचे व अनेक जातींचे लोक होते. देशांत राहून पोट भरावें, यापलीकडे दुसरा त्यांचा उद्देश नव्हता. केवळ पोट भरण्याच्या व स्वसंरक्षणाच्या हेतूनें त्यांची एकी झाली होती. पैसा मिळविण्याच्या हेतूनें धर्माच्या नांवाखालीं ते एक झालेले होते. रयतेचें किंवा राष्ट्राचें संवर्धन करावें, हा हेतु त्यांच्या मनांत नव्हता. लोकांपासून वसुलाचा पैसा जमविणें एवढें एक काम मात्र ते बिनचूक करीत. पण राज्यकर्त्यांचें वर सांगितलेलें संपूर्ण कर्तव्य त्यांना कधींच करतां आलें नाहीं. असे हे मुसलमान राज्यकर्ते जिंकलेल्या लोकांहून हर एक बाबतींत हीन अस-

त्यामुळें लोकांची स्थिति सुधारण्याचें काम त्यांच्या हातून होणें शक्य नव्हतें. पूर्वी गांवगन्ना वसूल गोळा करून तो पुढें सरकारांत भरण्यासाठीं हिंदु मोकाशी नेमलेले असत. त्यांजकडून वसूल वेळेवर येईनासा झाला, तेव्हां मुसलमान राज्यकर्त्यांनीं पूर्वींचे मोकाशी काढून नवे मुसलमान मोकाशी नेमिले; त्यामुळें लोकांचीं मनें फार क्षुब्ध झालीं. राज्यकर्त्यांचीं संरक्षक व संवर्धक कर्तव्यें बंद पडून देशांत वारंवार दुष्काळ पडूं लागले. असा एक मोठा दुष्काळ स. १४६८—७५ पावेतों पडला. दामाजीपंताची कथा ह्या दुष्काळांतील आहे. अनेक कवींच्या व इतर लेखांत ह्या दुष्काळाचें वर्णन आढळतें. ह्यास ‘ दुर्गाडी ’चा दुष्काळ असें नांव त्या वेळच्या कागदांत दिलेलें आढळतें. ह्या दुष्काळांत असंख्य लोक प्राणांस मुकले. सर्व देश उजाड झाला. सरकारचा वसूल थकला; आणि सरकारचीं कामें बंद पडलीं. पैठण, पुणतांबें येथें मोठीं प्राचीन संस्कृत विद्यापीठें होतीं, त्यांचा आश्रय बंद पडला. चरितार्थ चालेनासा झाल्यामुळें अनेक पंडित घराण्यांनीं देशत्याग केला. आपले सर्व ग्रंथ बरोबर घेऊन ते काशीस जाऊन राहिले. प्रसिद्ध गागाभट्टाचें घराणें याच वेळेस काशीस गेलें असावें. काशीस ह्या दक्षिणी पंडितांनीं पुढें मोठा लौकिक मिळविला. त्यांची हकीकत पंडित हरप्रसादशास्त्री ह्यांनीं बंगाल ए. सो. च्या तर्फे प्रसिद्ध केली आहे. पुणतांबें, पैठण येथील संस्कृत विद्येचा लौकिक पुरातन होता. हीं स्थानें कर्मठ ब्राह्मणांचीं म्हणून नांवाजलेलीं होतीं. ज्ञानेश्वर, एकनाथ वगैरेंचे छळ पैठणच्याच ब्राह्मणांकडून झाले. सामान्यतः कोणत्याही धार्मिक बाबतीस पैठणच्या ब्रह्मवृंदांची संमति मिळविणें त्या वेळीं अत्यंत महत्त्वाचें होतें. ह्याच कारणास्तव शिवाजीच्या अभिषेकप्रसंगीं गागाभट्टाचें महत्त्व एवढें वाटलें.

पुरातनचीं वतनें बंद पडलीं, त्यांत देवस्थानांचीं उत्पन्नें खालसा झाल्यामुळें देशांतील एकूण एक जुनीं देवस्थानें लयास गेलीं. नेवासें येथें महालसा देवीचें प्रचंड देवस्थान होतें त्याचें वर्णन ज्ञानेश्वरानें केलें आहे. तें देवस्थान बंद पडलें. नाशकास पूर्वीं अनेक हेमाडपंती देवळें होतीं; त्यांतलें हल्लीं एक सुद्धां शिल्लक नाहीं. एकंदर महाराष्ट्रांत तीनशें वर्षांहून जुनें असें एकही देवस्थान नाहीं, हें मोठें आश्चर्य आहे. शिवाजी जेव्हां उदयास आला, तेव्हां जुन्या देवस्थानांस उत्पन्न बांधून देण्याचें त्यास

प्रयोजनच पडलें नाहीं. येणेंप्रमाणें अन्न आणि द्रव्य नाहींसें होतांच उच्च व मध्यम वर्ग नामशेष झाले.

राहतां राहिला वैश्यवर्ग. वैश्य, श्रेष्ठी, महाजन व वाणी हा व्यापार करणारा वर्ग मालाची नेआण करण्यांत नेहेमीं धनसंपन्न असतो. दुष्काळांत शेतकरी लोक नाहींसे झाल्यामुळें, ह्या वैश्यवर्गावरच सर्वांची धाड पडूं लागली; त्यामुळें शेंदोनशें वर्षांत तेही नाहींसे झाले.

परंतु वैश्यवर्गाशिवाय समाजाचें चालणार कसें? देशांतली म्हणजे व्यक्तीव्यक्तींमधली व गांवगांवांमधली देवघेव तर चालली पाहिजेच. मूळचा वैश्यवर्ग नाहींसा झाला; तेव्हां बाहेरचे गुजराथी वाणी व मारवाडी वाणी देशांत आले; आणि त्यांनीं लोकांच्या देवघेवींचा धंदा उचलला. आपणास महाराष्ट्रांत आज सर्वत्र मारवाडी व बऱ्याच ठिकाणीं गुजराथी वाणी धंदा करीत असलेले दिसतात; त्यांचा मूळ प्रवेश अशा रीतीनें महाराष्ट्रांत झालेला आहे. लिंगायत वाणीही त्याच कारणानें देशांत शिरले. सारांश, सर्व महाराष्ट्रांत तीनशें साडेतीनशें वर्षांपूर्वीचीं घराणीं आज फारशीं उपलब्ध नाहींत. सर्व नवी सृष्टि उत्पन्न झालेली दिसते. ज्या लोकांकडून पैसे मिळून राज्यकारभार चालावयाचा ते वैश्य, व जमीनदार वगैरे वर्गांचें राज्यकर्त्यांनीं रक्षण केलें पाहिजे होतें. तें न केल्यानें राज्यकारभार व सरकारचीं कामें बंद पडलीं; आणि देशाची दुर्दशा झाली. कोंकणांत वगैरे अगदीं अवघड व कोनाकोंपऱ्याच्या जागीं मात्र कांहीं कांहीं जुनीं घराणीं अवशिष्ट आहेत. तेथें पांचसहाशें वर्षांवरचीं घराणीं क्वचित् आढळतात. विशेष सुपीक व भरभराटीचे म्हणून जेवढे प्रदेश होते, ते सगळे उजाड झाले. अहंमदनगर जिल्ह्यांतील गोदातीरचा 'नेवासें' वगैरेकडचा प्रदेश अत्यंत सुपीक आहे. ह्याच प्रदेशांत ज्ञानेश्वरासारखे थोर पुरुष निर्माण झाले. त्याचप्रमाणें देवगिरि औरंगाबादकडील प्रदेशही सुपीक आहे, म्हणूनच तेथें यादवांच्या वगैरे राजधान्या होऊन मोठमोठीं राज्यें नांदत होतीं. सारांश, स. १३१८ त यादवांचें राज्य बुडालें, तेव्हांपासून स. १४७५ त दुर्गादेवीचा दुष्काळ पडला तेथपावेतों, वरील प्रकार घडलेला दिसून येतो.

यादवांच्या राज्यांत सह्याद्रीच्या लगत्यानें खालीं कोंकणांत, घांटमाथ्यावर व वर देशांत अनेक इनामदार, जमीनदार, जहागीरदार वगैरे सरदारी बाण्याचे लोक फार दिवसांपासून नांदत होते. राष्ट्रीय स्वातंत्र्याचें पोषण

त्यांजकडूनच होत होतें. सन. १३१८ त यादवांचें राज्य बुडाल्यावर पुढील शेंपन्नास वर्षांत ही सरदार मंडळी (landed aristocracy) हळू हळू नाहींशी झाली. ह्या सरदारांचें वजन जनसमूहावर होतें आणि असे सरदार सुस्थितींत असणें हें राज्याचें एक मोठें बलच होय. हे सरदार बंडें करून स्वतंत्र होण्याचा प्रयत्न करीत, म्हणून त्यांस जिंकून त्यांचा राज्यकर्त्यांनीं नाश केला. अशा रीतीनें देशांतील अभिमानी सरदार मंडळी नाहींशी झाली. विद्वान ब्राह्मण मंडळी देशोधडीस लागली. फक्त भिल्ल, खोंड वगैरे जंगली लोक व गुलामगिरीपेशाचे खालच्या वर्गांतले कांहीं लोक एवढे मात्र राहिले. शिवाय देशमुख, देशपांडे, पाटील व कुळकर्णी हे लोक राहिले. राज्याचा वसूल गोळा करण्यास ह्या लोकांची जरूर होती.

देशांतील लोकसंख्या व त्यांचे वर्ग कसकसे बदलत गेले, त्यांत जुना नवा प्रकार काय झाला, ह्याचा ऐतिहासिक रीतीने शोध करणें अतिशय उपयोगी आहे. आपल्या प्रत्येक समाजाचा, वर्गाचा व कुटुंबाचा अशा रीतीनें तपास केला असतां फारच उपयुक्त माहिती बाहेर येईल. राज्यकर्त्यांनीं अजाणपणीं देशांतील संपत्ति उत्पन्न करणारे वर्ग नाहींसे केले, वसूल होण्याची पंचाईत पडून राज्यकारभार चालेनासा झाला, तेव्हां ओसाड झालेले गांव पुन: वसविण्याचा उद्योग त्यांना करावा लागला. त्या कामांत पूर्वींचीं पिढीजाद वतनें जाऊन नवीन वाटेल तीं कामें वाटेल त्या लोकांस मिळालीं. ब्राह्मण व कायस्थ ह्यांस लेखणीचें कारकुनी काम मिळून गांवचे हिशेब त्यांच्याकडे आले. पाटिलक्या सर्व नवीन झाल्या. हल्लीं दक्षिणेंतल्या सर्व पाटिलक्या 'दुर्गादेवी' नंतरच्या आहेत, त्यांत महार, न्हावी वगैरे अनेक जातींचे पाटील आहेत. ही नवीन व्यवस्था दुर्गादेवीच्या दुष्काळानंतर पन्नास वर्षेंपावेतों झाली. त्यानंतर चाळीस वर्षांच्या आंतच म्ह० (१५६५) त हिंदुमुसलमानांचा तालिकोट येथें भयंकर झगडा होऊन, हिंदूंची एकूणएक व्यवस्था लयास गेली आणि सर्व पूर्वपरंपरा नष्ट झाली. एकंदरींत परचक्र, राज्यक्रान्त्या, दुष्काळ, अंदाधुंदी वगैरे एकसारख्या आपत्ति देशावर येऊन देशाची कशी अवस्था झाली असेल, ह्याची एखाद दुसऱ्या उल्लेखावरून थोडीबहुत कल्पनाच केली पाहिजे.

**२. नवीन मनूचा प्रारंभ.**—मुसलमानी अमदानींतलि ह्या आपत्तींचा कळस सन १५६५ तील तालिकोटाच्या लढाईंत झाला. मुसलमानांशीं

टक्कर देणारें विजयनगरचें एक तरी हिंदु राज्य होतें, त्याचा तालिकोटावर अंत झाल्यानें महाराष्ट्रांतील लोकांना कोठेंच आधार राहिला नाहीं. तालिकोटच्या पूर्वीचा शेंदीडशें वर्षांचा हा इतिहास तत्कालीन कागदपत्रांच्या साह्यानें बाहेर आणणें अवश्य आहे. ह्या कालांत प्रजेचा क्षय होत गेला. लोकांस आशेचें चिन्ह कोठेंच राहिलें नाही. परचक्र, दुष्काळ, महामारीसारख्या सांथी इत्यादिकांनीं लोक गांजून गेले. साधुसंतांच्या ग्रंथांत ह्या स्थितीचें वर्णन कोठें कोठें दिलेलें सांपडतें. तेव्हांचे साधुही अगदीं हीन व हताश झालेले दिसतात; आणि मोठ्या कळवळ्यानें ईश्वराची करुणा भाकितात, ह्यापलीकडे त्यांच्या विचारांचा रोख गेला नाहीं. तालिकोटच्या लढाईपासूनच मालोजी भोसल्याचे कर्तृत्वास सुरुवात होते.

ही देशाची अवनति पाहून शहाण्या व विचारी मनुष्यांचे डोळे उघडले. आपल्या तरणोपायाचे विचार लोकांस सुचूं लागले. तालिकोटनंतरचे सरदारघराण्यांचे कागदपत्र व कवींचे लेख पाहिले म्हणजे लोकांना आपल्या हीन स्थितीची उमज कसकशी पडत चालली, हें दिसून येतें. उलट पक्षीं मुसलमान राज्यकर्त्यांनाही आपल्या परिस्थितीची ओळख होऊं लागली. हिंदूंच्या मानानें मुसलमानांची संस्कृति कमीच होती. त्यांचीं वैवाहिक बंधनें शिथिल होतीं. हिंदूंना कडक जातिनिर्बंध आवडत. कित्येक मुसलमान उघडपणें हिंदूंच्या बायकांना पकडून आणून, त्यांजबरोबर वैवाहिक संबंध ठेवीत. अशा रीतीनें बरीच मुसलमानांची संख्या उत्पन्न झाली होती. हिंदूंना रक्ताची ही भेसळ खपत नसे. ते अशा चालींस आसुरी समजत. हे मुसलमान पुष्कळसे नांवाचेच होते. ते हिंदूंचेच आचार पाळीत. कित्येक गाणपत्य होते. कित्येक एकादशा करीत. अज्ञानी लोकांवर आपला पगडा बसविण्यास ते समर्थ झाले. परंतु हिंदूंच्या मदतीशिवाय त्यांचें चालेना. तेव्हां राज्यर्त्यांनीं घरंदाज मराठे लोकांस मनसबदाऱ्या दिल्या. अशा रीतीनें सर्वत्र नवीन घराण्यांची स्थापना मुसलमानी अंमदानींत झाली. मालोजी भोसल्यास 'आपण पादशाही मनसबदार आहों,' याजबद्दल भूषण वाटे. ह्या घराण्यांस हाताशीं धरून मुसलमान आपलें राज्य राखीत होते. मात्र शहाजीसारखे अनेक सरदार कारणपरत्वें त्यांस डोईजड होत. सारांश, हल्लींचे देशमुख, देशपांडे वगैरे लोक मुसलमानी अमदानींत निर्माण झालेले आहेत, हें त्यांच्या सनदाकागदांवरून दिसून

येतें. त्यांचा ओढा मुसलमानांकडे होता आणि मुसलमानी राज्याचे ताबेदार म्हणवून घेण्यांत त्यांस भूषण वाटत असे. मोरे व इतर मावळे देशमुख अशा प्रकारचे होते. म्हणूनच आरंभीं ते शिवाजीच्या शत्रुवर्गांत मोडत. ह्या स्वकीयांस आपल्या बाजूस आणण्याचें काम शिवाजीनें प्रथम केलें. 'स. १४५० च्या सुमारास खानदेशच्या बारींत निकम, ठाण्यास बिंबदेव राणे (यादव?) याचे वंशज, कोळवणांत कोळी, रामनगरास राणे, सोनगड व रायरी प्रांतात तेथील राजे, शिरकाणांत शिरके, खेळण्यास शंकरदेव, वाडीस सावंत, बेळगांवास कर्णराज, मोरगिरीस मोऱ्ये, असे लहान लहान मराठे संस्थानिक स्वतंत्रपणें राज्य करीत होते. स. १४५० नंतर हीं राज्यें नष्ट होऊन बहामनी राज्याचीं अंकित झालीं.' ( रा. खं. ८ प्रस्तावना ).

दक्षिणेंत जरी मुसलमानशाही स्थापन झाली, तरी हिंदूंचें स्वत्व नाहींसें झालें नाहीं. राज्याच्या चिरस्थायिकतेबद्दल विचार करितांना जेत्यांकडून जितांचें स्वत्व कोठपर्यंत नाहींसें झालें आहे, याचा विचार करावा लागतो. बहामनी राज्यांत वर सांगितल्याप्रमाणें जे नवीन मनसबदार व देशमुख निर्माण झाले त्यांनीं तरी आजूबाजूंस पुंडावे करून थोडेंबहुत स्वातंत्र्य मिळविण्याची खटपट चालविली. हे शूर मराठे सरदार ठिकठिकाणीं फौज मिळवून राहूं लागले, तेव्हां त्या सर्वांस नाहींसें करण्यास लागणारी फौज, मुसलमानांच्या मनांत असलें तरी, बाहेरून आणतां येण्याजोगी नव्हती. त्या सरदारांस खुष ठेवण्यांत अथवा अन्य तऱ्हेनें त्यांस आपलेसे करून घेण्यांतच मुसलमानांचा तरणोपाय होता. महाराष्ट्रावर मुसलमानांचा ताबा पूर्णपणें न बसण्यास मुख्यत: ह्या प्रांताची सृष्टिरचना, लोकांचा पूर्वापर चालत आलेला स्वभाव, ग्रामसंस्थेसारखे चालू असलेले उपयुक्त प्रघात, इत्यादि अनेक गोष्टी कारण झाल्या. ग्रामसंस्था हें लोकांचें स्वातंत्र्य रक्षण करणारें मजबूद बंधन कायम असून, त्याचा विशेष प्रभाव महाराष्ट्रांतच दिसून आला. प्रत्येक गांव आपापल्या हद्दींत एक लहानसें प्रजासत्ताक राज्यच समजलें जात असे. सरकारदेणें दिल्यावर गांवच्या अंतर्व्यवस्थेंत सरकारास पडण्याची जरूर नव्हती. मुसलमानांनीं कितीही प्रयत्न केले, तरी त्यांचें वजन लोकांवर पडलें नाहीं. वसूल गोळा करण्यास व गांवचीं दुसरीं हरएक कामें पाहण्यास येथील लोकांची जरूर त्यांस अत्यंत लागे. म्हणून ह्या परकीय राज्यकर्त्यांचें वजन महाराष्ट्रावर पडलें नाहीं.

उत्तरहिंदुस्थानांत अफगाणिस्थान व इराण वगैरे देशांतून अस्सल मुसलमानांची भरती नेहमीं होत असे, तशी महाराष्ट्रांत झाली नाहीं. महाराष्ट्रांतील मुसलमानांची बरीच संख्या हिंदूंच्या मिश्रणानें उत्पन्न झाली असून अनेक प्रसिद्धीस आलेले मुसलमान सरदार मूळचे हिंदु असून धर्मान्तर करून मुसलमान झाले होते. अशा लोकांच्या मनांत हिंदूंविषयीं प्रखर वैरभाव वागत नव्हता. ब्राह्मणी राज्याचा संस्थापक हुसेन यानें तें राज्य स्थापन करतांना, दाखविलेली हिंदूंविषयीं आदरबुद्धि 'ब्राह्मणी' या शब्दांतच व्यक्त होते. आपलें राज्य चिरस्थायी व्हावें म्हणून हिंदु लोकांस मोठमोठीं कामें व देणग्या देऊन खुष ठेवणें त्यांस भाग पडलें. उत्तरेंत फारशी व उर्दू या भाषांचा उपयोग सर्व सरकारी कामांत होत असे, त्याप्रमाणें दक्षिणेंत त्या भाषा कधींही सुरू न होतां, उलट मराठी भाषाच दरबारची भाषा म्हणून वापरिली जाई. शेजारीं विजयनगरचें प्रबल हिंदु राज्य हयात होतें तोंपर्यंत त्याचा मुसलमानांवर विशेष दाब होता; यामुळें मुसलमानांच्या अंगचें प्रखर तेज येथें प्रगट झालें नाहीं. विजयनगरच्या हिंदु राजाचे पदरीं पुष्कळ मुसलमान फौज होती, आणि मराठे शिलेदार व बारगीर मुसलमानांच्या पदरीं होते. मुसलमान सुलतान हिंदु स्त्रियांशीं लग्न लावीत, म्हणून साहजिकच त्यांचा व त्यांच्या संततीचा ओढा बऱ्याच अंशीं हिंदूंकडे असे. विजापूरचा पहिला सुलतान यूसुफ आदिलशाहा याची बायको मुकुंदराव नामक ब्राह्मणाची बहीण असून ती बुबुजीखानम् ह्या नांवानें प्रसिद्ध आहे. तिचेच मुलगे पुढें विजापुरच्या गादीवर बसले. निजामशाहीचा संस्थापक अहंमद निजामशहा हा वऱ्हाडांत पत्री म्हणून गांव आहे तेथील तिमाप्पा बहिरव नामक कुळकरण्याचा मुलगा, (भाग पहिला, पृ. २४५). बहिरव याचा अपभ्रंश बहिरी असा होऊन तें निजामशाही सुलतानांचें टोपण नांव झालें. इमादशाहीचा संस्थापकही असाच धर्मान्तर केलेला हिंदु होता. (भाग १, पृष्ठ २४४). बेदरचा अमीर बेरीद याची बायको साबाजी नामक एका मराठे सरदाराची मुलगी होती. एकंदरीनें दाक्षिणेंत मुसलमानी अंमल चालू असतां हिंदूंचें स्वत्व नाहींसें झालें नव्हतें. (पहा—मुसलमानी रियासत प्र. १६-९, व प्र. १९-२, ६.)

हें स्वत्व कायम ठेवण्यास अनेक मराठे सरदार व ब्राह्मण मुत्सद्दी कारण झाले. पूर्वी मलिकउत्तुजारनें कोंकण प्रांत जिंकिला, ( भा. १ पृ. २३० ), त्याचे मदतीस दादो नरसो काळे नांवाचा एक हुशार ब्राह्मण होता. त्यानें कोंकणांतील बंडावे मोडून, वसुलाची व्यवस्था ठरवून दिली. कंबरसेन नांवाचा एक ब्राह्मण मुत्सद्दी बुऱ्हाण निजामशहाचा ( १५०८–१५५३ ) मुख्य प्रधान होता. घरंदाज मराठ्यांस आपल्या फौजेंत ठेवून त्यांस योग्यतेस चढविण्याची पद्धत कंबरसेननें सुरू केली. हे लोक डोंगरी प्रदेशांत राहून मुसलमान अंमलदारांस जुमानीत नसत. पूर्वी अशा मराठे सरदारांवर भरंवसा टाकण्यांत येत नव्हता. ते आपल्या मुलखांत रिकामे राहिल्यामुळें, बंडाळी मात्र करीत. सबब कंबरसेनानें अशा सरदारांस फौजेंत मोठमोठ्या हुद्याच्या जागा दिल्या; आणि त्यांचा राज्याचे कामीं उपयोग करून घेतला. अचलकर्ण ऊर्फ अचलोजी जाधव यास निजामशाहींत पांचहजारांची मनसब ह्या वेळेस मिळाली. अचलोजीचा नातू लखुजी जाधव होय. कंबरसेनाच्या वेळेस **संभाजी चिटणीस** नामक दुसऱ्या एका गृहस्थास प्रतापराव असा किताब मिळून त्याची परराज्यांतील वकिलातीच्या कामावर नेमणूक झाली.

**मुरार जगदेव** नांवाचा ब्राह्मण सरदार आदिलशाहींत स. १६२८ पासून सुमारें पंचवीस वर्षें मुख्य प्रधानकीच्या कामावर होता. हा राहणारा धोमचा. त्यानें आदिलशाहाकडून विजापुरास सुवर्णतुला करविली, ( सरस्वती मंदिर ). शहाजीचा विजापुरीं शिरकाव होण्यास मुख्य कारण हा मुरारपंत होय. मराठे सरदारांच्या जोरावर ह्यानें अनेक राजकीय कामें तडीस नेलीं. त्याच्या वेळेस मराठे व मुसलमान सरदारांत चांगली जूट वसत होती. मुरारपंताचें ज्यास्त वर्णन पुढें शहाजीच्या चरित्रांत येणार आहे. कांहीं बिकट प्रसंगीं शहाजीनें त्यास मदत केल्यामुळें त्यानेंही शहाजीचा स्नेह अव्याहत कायम राखिला. मुरारपंतानें निजामशहास मदत करून शहाजहान बादशहाचें फार दिवस इकडे कांहीं चालूं दिलें नाहीं. महंमद आदिलशहानें स. १६३५ त मुरारपंताचा वध करविला ( मु. रियासत पृ. २७१ व २७४ ), हें खरें दिसत नाहीं.

त्याचप्रमाणें गोवळकोंड्याचे कुत्बशाहींत **मुरारराव, जगदेवराव, रायराव, कदमराव, मदनपंत,** इत्यादि सरदारांनीं मोठी कर्तबगारी दाख-

विली. मुरारराव हा इब्राहीम कुत्बूशहाच्या कारकिर्दीचे ( स. १५५०–१५८० ) अखेरीस मुख्य प्रधान होता. त्याच कारकिर्दीचे आरंभीं जगदेवराव नाईक व रायराव हे गृहस्थ प्रमुख असून, जगदेवरानें तर कुत्ब्शहास राज्यपद मिळण्याचे कामीं मदत केली असल्यामुळें त्याजवर शहाची मर्जी विशेष होती. या दोघां गृहस्थांनीं त्या राज्यांत मराठे लोकांस मोठ्या योग्यतेस चढविलें, तेणेंकरून कुत्ब्शाहीचे दरबारांत व लष्करांत मराठ्यांचा भरणा पुष्कळच झाला. यामुळें मुसलमानांस वैषम्य वाटून त्यांनीं वरील दोन सरदारांबद्दल शहाचें मन कलुषित केलें. शहानें रायरावाचा वध केला, व जगदेवराव पळून जाऊन मुलखांत उपद्रव करूं लागला. जगदेवरावाच्या अद्वितीय पराक्रमामुळें कुत्ब्शाही, निजामशाही व आदिलशाही ह्या तीनही राज्यांस आपल्या जीविताची मोठी धास्ती पडली. विजयनगरच्या रामराजाच्या मदतीनें मुसलमानांचा पाडाव करण्याची त्यानें विलक्षण खटपट केली. या युद्धांत त्याचा भाऊ व्यंकटराव पडला. अखेर जगदेवरावास कांहीं प्रदेश तोडून देऊन त्याची समजूत करणें मुसलमानांस जरूर पडलें. वाटेल त्यास राज्यपदावरून काढण्याची व राज्यपदावर स्थापण्याची त्याची धमक असल्यामुळें त्या काळांत ह्या सरदाराचें नांव चिरस्मरणीय झालें आहे. सारांश, शिवाजीच्या जन्मापूर्वीं पन्नास पाऊणशें वर्षें मराठे लोक स्वातंत्र्य मिळविण्याच्या खटपटीस लागले होते. ( मु. रियासत पृ. २८४–२८५ पहा. ) कद्मराव नांवाचा एक पराक्रमी जहागीरदार आदिलशाहींत बंकापूर येथें राहत असे, तो डोईजड झाल्यामुळें महंमद आदिलशहानें त्याजवर फौज पाठवून सन १६२८ त त्यास ठार मारिलें. मदनपंत ऊर्फ मादण्णा व एकनाथपंत ऊर्फ आकण्णा हे दोघे बंधू अबू हसन कुत्ब्शहा ( १६५७–१६८७ ) चे पदरीं राहून राज्याचा मुख्य कारभार हाकीत होते. त्यांची हकीकत पुढें शिवाजीचे प्रकरणीं येईल.

३. पूर्वतयारीचें स्वरूप.— इतिहासकार ग्रँट डफ् म्हणतो. ‘ महाराष्ट्रांतील लोकांच्या अंगीं परकीयांनीं दाबून ठेवण्यास दुर्घट असा विलक्षण अभिमान फार दिवस धुमसत होता. मोगल बादशहा व दक्षिणेंतील मुसलमान सुलतान ह्यांजमध्यें झगडे चालू असतां तो अभिमान थोडथोडा प्रदीप्त होऊं लागला; आणि पुढें सह्याद्रिपर्वतावरील वाळलेल्या गवतांत

पडलेल्या निखाऱ्याप्रमाणें त्या अभिमानानें असा विलक्षण पेट घेतला, कीं त्याचा भडका पाहून दूरदूरच्या लोकांसही अचंबा वाटला. '

शिवाजीच्या राज्यस्थापनेसंबंधानें दोन विरुद्ध मतें प्रचलित आहेत. सह्याद्रीवरील वाळलेल्या जंगलांत आकस्मिक कारणानें ठिणगी पडून त्याचा भडका उडतो त्याप्रमाणें शिवाजीनें सहजगत्या स्वराज्याचें काम सुरू केलें. दुसरें मत असें आहे, कीं पूर्वीपासून मराठ्यांचा स्वाभिमान हळूहळू वृद्धि पावत होता. मुसलमानी राज्यांत त्याजवर दडपण पडलें, तरी तो नाहींसा झाला नव्हता. अनुकूल संधि मिळतांच तो पुन: प्रगट झाला. पहिल्या मतावरून असें निष्पन्न होतें, कीं मराठ्यांच्या अंगीं राष्ट्रीय भावना नव्हती. शिवाजी केवळ स्वयंस्फूर्तीनें पुंडाई करून हैदरअली वगैरेप्रमाणें थोडे दिवस प्रसिद्धीस आला; परंतु त्यास राष्ट्राचा पाठिंबा नसल्यामुळें त्याचा उपक्रम फार दिवस टिकला नाहीं, आणि हिंदुस्थानच्या इतिहासांत त्यामुळें फारसा फरकही पडला नाहीं. अर्थात् इतिहासांत मराठ्यांच्या भागास स्वतंत्र स्थळ देण्याची जरूर नाहीं, आणि मोगलांच्या साम्राज्यानंतर इंग्रजांचेंच साम्राज्य सुरू झालें, असा ह्या मताचा इत्यर्थ निष्पन्न होतो.

हें मत खोडून काढून इतिहासांत मराठशाहीचें महत्त्व कै. रानडे यांनीं प्रथम स्थापन केलें. मराठ्यांच्या अंगीं राष्ट्रीय पाणी मूळपासून होतें. मुसलमानांच्या अमलांत झालेली दुर्दशा त्यांस सहन झाली नाहीं. संतांनीं वगैरे उद्योग करून पूर्व तयारी केली, आणि मुसलमानी राज्यास पडती कळा लागतांच मराठ्यांचीं अनेक घराणीं स्वराज्याचे कामीं उद्योग करूं लागलीं. दीडशें वर्षेपर्यंत मराठ्यांनीं हिंदुस्थानांत पराक्रम गाजवून देशाचा इतिहास सर्वस्वी बदलून टाकिला; आणि उच्च संस्कृतीच्या पाश्चात्य राष्ट्रांशीं मराठ्यांचा संबंध आला नसता तर कदाचित् हिंदुस्थानांत त्यांचीच सत्ता कायम राहती. अशा प्रकारचें प्रतिपादन अनेक विचारवंतांनीं केलेलें आहे. शास्त्र या दृष्टीनें इतिहासाचें अध्ययन करूं लागलें म्हणजे वर सांगितलेला दुसरा प्रकारच विचारास पटतो, आणि मराठ्यांच्या इतिहासाची उपपत्ति कळूं लागते.

ह्या राज्यस्थापनेच्या कामीं कोणीं किती तयारी केली हें ठरविणें कठीण आहे. या प्रश्नाचा विचार करण्यास लागणारी माहिती येथवर

दिली आहे. सामान्यत: इतकें म्हणतां येईल, कीं, स्वत:ची पर्वा न करितां केवळ दुसऱ्याच्या हितासाठीं झटण्याची स्फूर्ति संतांच्या उपदेशानें लोकांच्या मनांत उत्पन्न झाली. ह्या स्फूर्तीमध्यें थोडीबहुत राष्ट्रीय भावना रामदासानें उत्पन्न केली. मात्र रामदासाचे व शिवाजीचे उद्योग अगदीं स्वतंत्रपणें चालले होते. शिवाजी हा अकल्पित रीतीनें एकदम पुढें आलेला बंडखोर नव्हता. कित्येक पिढ्यांपर्यंत त्याच्या घराण्याची पूर्व तयारी चालू होती आणि महाराष्ट्रांतील वजनदार लोकांचीं मनें ह्या कार्यास उद्युक्त झालीं, हीच आर्थिक व महत्त्वाची तयारी होय. देशांत मुसलमानी अंमलाखालीं कांहीं वजनदार घराणीं थोडीबहुत मांडलिक सत्ता बाळगून फौजबंद होतीं. युरोपांतील फ्यूडल् लॉर्डांप्रमाणें ह्या सरदारांस प्रसंगविशेषीं आपल्या फौजा घेऊन राज्याचे नोकरीस यावें लागे. ह्या सरदारघराण्यांखेरीज महाराष्ट्रांत मराठे देशमुखांचीं अनेक घराणीं ठिकठिकाणीं होतीं. सरदार घराण्यांत व ह्या देशमुखांत विशेष फरक कांहींच नाहीं. सरदारी प्राप्त होण्यापूर्वी बहुतेक देशमुखीच करीत होते. देशांत वसाहत व लागवड करवून सरकारचा वसूल गोळा करून देणें हें देशमुखांचें मुख्य काम होतें. त्यांच्या मदतीस हिशेबाचें वगैरे काम करण्यास देशपांडे, बहुधा प्रभुजातीचे, असत. प्रत्येक गांवास जसा पाटील व कुळकर्णी तसेच हे देशमुख व देशपांडे ठरीव टापूंकरितां असत. लहानमोठ्या टापूंप्रमाणें देशमुख व सरदेशमुख अशा त्यांस पदव्या होत्या. सरकारी अंमलदार देशमुखांपासून वसूल जमा करीत. फलटणचे निंबाळकर, मलवडीकर घाटगे, म्हसवडकर माने, जतचे डफळे, वाडीचे सांवत, सिंदखेडचे जाधव, व शिवाजीचे पूर्वज भोसले हे सर्व आरंभीं देशमुखी करीत होते. देशमुख हेच देशांतले त्या वेळचे वतनदार होत.

मावळांतील देशमुखांचा पूर्व इतिहास बराच मनोरंजक असून तत्कालीन स्थितीचा निदर्शक आहे; आणि शिवाजीच्या प्रत्यक्ष कामाशीं त्यांचाच संबंध निकट आहे. सबब मावळांतील देशमुख घराण्यांची कांहीं हकीकत पुढें शिवाजीचेच प्रकरणीं देण्यांत येईल. तूर्त राज्यस्थापनेच्या तयारीसंबंधानें मालोजी व शहाजी ह्यांच्या उद्योगांत महाराष्ट्रांतील मोठमोठ्या सरदार घराण्यांचाच भाग विशेष होता. सबब अशा कित्येक प्रमुख घराण्यांची पूर्वस्थिति आरंभींच सांगणें जरूर आहे.

४. प्रमुख्य सरदार घराणीं. (१) शिर्के.—शिर्क्यांचें राहणें फार दिवसांपासून कोंकणांत होतें. कोंकण प्रांत जिंकण्याविषयीं ब्राह्मणी सुलतानांनीं पुष्कळ प्रयत्न केले होते. सन १४०८ पासून पुढें पुष्कळ वर्षें-पावेतों कृष्णा व गोदावरी यांचे दरम्यानचा मुलूख दुष्काळानें ओसाड पडला असतां तेथील मराठे सरदारांनीं बंडें करून डोंगरी किल्ले मुसलमानांचे हातीं होते, ते आपल्या स्वाधीन करून घेतले; आणि रयतेपासून कर-भार घेण्याचा क्रम चालविला. या कारणास्तव सुलतान अहंमदशहा वली बहामनी याचे कारकिर्दींत सन १४२९ सालीं सरदार मलिक उत्तुजार हा दादो नरसो काळे या नांवाच्या हुशार ब्राह्मणास समागमें घेऊन खटाव प्रांतांतील बंडें मोडून तेथलि मुलखाची वसाहत करण्याकरितां आला. दादो नरसोनें वसाहत करून वसुलाची व्यवस्था चांगली करून दिली (१४२७–१४३९). मलीक–उत्तुजार हा शिर्के यांचें वाटेस गेला नाहीं. पुढें अलाउद्दीनशहाचे कारकिर्दींत मलिकउत्तुजार कोंकण प्रांत जिंकण्याचे इराद्यानें मोठी फौज घेऊन आला (स. १४५३). त्यानें चाकण किल्ल्यावर आपलें मुख्य वसतिस्थान केलें. शिर्क्यांचें राज्य मलिकनें काबीज करून त्यांजवर मुसलमानी धर्म स्वीकारण्याविषयीं बळ-जबरी चालविली. शिर्क्यांचे शेजारीं संगमेश्वरच्या दक्षिण बाजूस खेळणा प्रांतावर शंकरराय नांवाचा राजा राज्य करीत होता. 'दोघांनीं मिळून प्रथमतः शंकररायास जिंकून मुसलमान करावें; पश्चात् मीहि तो धर्म स्वीकारीन.' असा बहाणा करून तुजार यास खेळणा प्रांतांत शिरण्याची शिर्क्यानें मसलत दिली. खेळणा प्रांतांत राजापूर व संगमेश्वर यांजमधील कोल्हापूरच्या पश्चिमेकडील घांटमाथ्याचा समावेश होतो. हा प्रांत अति भयंकर व अवघड होता. शंकरराय व शिर्के यांनीं अंतस्थ कारस्थान करून तुजारच्या फौजेचा विध्वंस करून त्यास ठार मारिलें. तथापि शिर्क्यांचें राज्य मुसलमानांनीं जिंकलेंच (मु. रियासत पृ. २३०). पुनः स. १४७३ सालीं ब्राह्मणी राज्यांतील पराक्रमी पुरुष महंमद गवान यानें पहाडी पायदळाच्या मदतीनें कोल्हापूरच्या रस्त्यानें येऊन खेळणा व समुद्रापर्यंत सर्व कोंकण प्रांत जिंकिला, आणि शंकररायाचें राज्य मोडिलें. शंकररायाचा मुलूख काबीज केल्यावर मुसलमानांनीं त्या प्रांताचे बंदोबस्ता-करितां पन्हाळा येथें आपला सुभा नेमिला. दाभोळच्या दक्षिणेस शंकर-

रायाचा मुलूख होता, त्यांस खेळणा प्रांत म्हणत. हें विशाळगड किल्ल्याचें पूर्वीचें नांव आहे. शंकररायाचें उपनांव दिलें असतें, तर त्याचे वंशज हल्लीं कोठें आहेत तें समजलें असतें. हा शंकरराय शिर्क्यांपेक्षांही बलाढ्य असून समुद्रापर्यंत कोंकणपट्टी त्याचे ताब्यांत होती. तीनशें लढाऊ जहाजांचें आरमारही त्याजवळ होतें. इराण, आरबस्तान वगैरे देशांतून मुसलमान व्यापारी कोंकणचे बंदरांत येऊन व्यापार करीत, त्यांचा शंकररायानें चांगलाच बंदोबस्त केला होता. सारांश, मुसलमानांस हार न जातां स्वातंत्र्य कायम राखण्याची मराठे सरदारांची इच्छा एव्हांपासून हळू हळू प्रगट होत होती. तसेंच समोर लढण्याची अंगांत ताकद नसल्यास हिकमती काव्यानें शत्रूचा पाडाव करण्याची हातोटी त्या वेळेपासूनच त्यांच्या ठायीं होती, हें शिर्के व शंकरराय यांच्या वरील हकीकतीवरून व्यक्त होतें.

सचिवांचे ताब्यांतील मुसेखोऱ्यांत शिरकवली गांवीं जंगलांत शिरकाई देवीचें स्थान आहे, तेथें या घराण्याचा मूळ पुरुष जाऊन राहिला, तेव्हांपासून त्याचे घराण्यास शिर्के हें उपनांव पडलें. सह्याद्रीचे माथ्यावर बहिरवगड म्हणून किल्ला आहे, तेथें ह्या घराण्याचें वास्तव्य फार दिवस होतें. त्यांचा एक पुरुष वाघोजी यास निजामशहानें रायरी प्रांताची सरदेशमुखी दिली. पुढें ते जावळी प्रांतांत येऊन राहिले. जावळी प्रांत मोरे यांनीं आपल्या कबज्यांत आणिला, त्याचे पूर्वी तो शिर्क्यांकडे होता. जावळी प्रांतांत महाबळेश्वर आहे. इंग्रजांचे ताब्यांत येईपर्यंत हा प्रांत बहुतेक स्वतंत्र म्हणजे मराठे लोकांच्याच ताब्यांत होता. हा प्रांत कोंकणघांटमाथा म्हणून प्रसिद्ध होता. जावळीचे शिर्के विजापुरवाल्यांस मुळींच जुमानीनात; तेव्हां त्यांचा बंदोबस्त करण्याचें काम सुलतानानें कर्नाटकांतील आपला भरंवशाचा सरदार मोरे यास सांगितलें. तें त्यानें उत्तम प्रकारें बजावून शिर्क्यांस पदच्युत केलें (१५७८), आणि शिर्क्यांचे साथीदार गुजर, मोहिते, महाडिक यांचाही बंदोबस्त केला. पुढें घांटमाथ्याचे खालीं तळकोंकणांत शृंगारपुर नांवाचें गांव आहे, तेथें सुर्वे म्हणून सरदार स्वतंत्रेनें राहत असत, त्यांजपाशीं हे शिर्के जाऊन राहिले.

शृंगारपुरीं शिर्क्यांचें वास्तव्य बरेच दिवस होतें. जावळीचें राज्य घेतल्यावर शिवाजीनें शृंगारपुरचें राज्यही काबीज केलें. तेव्हां तेथचे अंमलदार सुर्वे होते ते पलायन करून देशांतरास गेले. 'त्यांचे कारभारी

शिर्के होते त्यांशीं शिवाजीनें स्नेह संपादून कृपाळू होऊन गांव व महाल इनाम करून त्यांची कन्या ( येसूबाई ) आपले मुलास केली.' ही हकीकत पुढें येईल. शिवाजीची दुसरी बायको सोयराबाई ही शिर्क्यांचे घराण्यांतील होती. शिवाजीची मुलगी राजकुंवरबाई गणोजीराजे शिर्के यास दिलेली होती ( इ. संग्रह ). एकंदरींत शिर्क्यांचें घराणें फार जुनें व उच्च प्रतीचें आहे.

( २ ) घाटगे.—मराठे सरदारांमध्यें घाटग्यांचें कुटुंबही प्रमुख आहे. हे मूळचे खटाव देशचे राहणारे व मलवडीचे देशमुख. ब्राह्मणी राज्यांत त्यांस माण प्रांताची देशमुखी व सरदेशमुखी मिळाली. कामराजे घाटगे हा त्यांचा मूळ पुरुष. त्याला ब्राह्मणी राज्यांत मनसब होती. इब्राहिम आदिलशहानें स. १६२६ त नागोजीराव घाटगे यास सरदेशमुख व झुंजारराव हे किताब दिले. विजापुरचे राज्यांतून त्यांस जहागिरीही पुष्कळ होत्या. 'सर्जेराव,' 'प्रतापराव' इत्यादि अनेक किताब घाटग्यांचे कुटुंबांस मिळाले आहेत.

( ३ ) घोरपडे.—मराठ्यांचें दुसरें मोठें कुटुंब घोरपड्यांचें होय. त्यांचें मूळचें उपनांव भोसले. बहामनी राज्यांत त्यांनीं कोंकणांतील एक किल्ला घोरपडीच्या साह्यानें वर चढून सर केला, तेव्हांपासून त्यांस हें नांव प्राप्त झालें. विजापुरचे राज्यांत त्यांस देशमुखी होती. कापशीकर ( वारणेच्या कांठीं ), सोंडूरकर, मुधोळकर, दतवाड व गुत्तीकर अशीं घोरपड्यांचीं अनेक घराणीं इतिहासांत प्रसिद्ध आहेत. घोरपड्यांचें घराणें पुष्कळ जुनें असून त्यांस 'हिंदुराव' हा किताब बहामनी राज्यांतून व 'अमीर-उल्-उमराव' हा किताब कापशीकरांस आदिलशाहींतून मिळाला होता. कोल्हापुर प्रांताची देशमुखी व सरदेशमुखी आदिलशाहींतून कापशीकर घोरपड्यांस मिळाली असावी, ( इचलकरंजीचा इतिहास ). कापशीकर म्हालाजी घोरपडे आदिलशहास सोडून शिवाजीस मिळाला. म्हालोजीचे मुलगे संताजी, बहीरजी व मालोजी हे पुढें मराठशाहींत उदयास आले. म्हालोजी स. १६८९ त संभाजीस संभाळीत असतां लढाईत मोगलांकडून मारला गेला. मुधोळकर बाजी घोरपडे ह्यानें मात्र विजापुरचा पक्ष धरून शिवाजीशीं विरोध केला, ती हकीकत पुढें येईल.

( ४ ) मोहिते.—मराठ्यांचीं दुसरीं लहान लहान घराणीं पुष्कळ आहेत. मोहिते, गुजर, माने, डफळे, वगैरे घराण्यांनीं अनेक पराक्रम

केलेले आहेत. शिवाजीच्या फौजेवर हंबीरराव मोहिते हा सेनापति होता. शहाजीची दुसरी बायको तुकाबाई ही मोहित्यांची कन्या. तिचा मुलगा व्यंकोजी तंजावराकडे राहिल्यामुळें त्या प्रांतीं मोहित्यांचें वर्चस्व पुष्कळ वाढलें. घाटग्यांचे शेजारीं म्हसवड येथें माने म्हणून सरदार प्रसिद्ध होते. विजापुरचे दरबारीं ते नामांकित शिलेदार होते. डफळे हे मूळचे चव्हाण. डफळापुरची पाटिलकी त्यांजकडे असल्यामुळें त्यांस डफळे हें उपनांव मिळालें. विजापुरचे दरबारांतून त्यांस मनसब होती. जत येथें हल्लीं त्यांचें घराणें प्रसिद्ध आहे.

(५) **महाडिक.**—इतर मराठे घराण्यांप्रमाणेंच महाडिक ह्यांचें घराणें जुनें असून तें कोकणांत महाड येथें राहूं लागल्यावर त्यांस महाडिक असें म्हणूं लागले. त्यांचा एक पुरुष कृष्णाजीराजे इ. स. १६१४ त मरण पावला. त्याजकडे दाभोळची मोकदमी होती. पुढें त्यांच्या वंशजांस जावळीच्या मोऱ्यांनीं जिंकिलें. परंतु शिवाजीनें स्वतंत्र उद्योग सुरू केल्यावर ते शिवाजीस सामील झाले; आणि त्यांचा व शिवाजीचा लोभ जडला. कृष्णाजीचा बंधु कान्हाजी स. १६५० त मृत्यु पावला. त्याचा मुलगा परसोजी हा कर्नाटकांत शहाजीस साह्य करीत असतां मरण पावला. परसोजीचा मुलगा हरजीराजे ह्याजवर शहाजीची मर्जी विशेष होती. शिवाजीनें स. १६६८ च्या सुमारास आपली मुलगी हरजी राजे ह्यास दिली. हा कर्नाटकांत रघुनाथ नारायण हणमंते याजवळ राहून तिकडील प्रांताचा बंदोबस्त करी. हा, व गणोजी शिर्के व महादाजी निंबाळकर हे शिवाजीचे तीनही जांवई राज्याचे चांगले उपयोगी पडले. त्यांनीं संभाजीस मदत केली. हरजीराजे कर्नाटकांत जिंजीच्या सुभेदारीवर पुष्कळ वर्षें होता. जिंजीच्या वेढ्यांत हरजीराजे मृत्यु पावला (स. १६९४).

(६) **मोरे.***—मोरे व धुळप हे एकच होत. हे मूळचे हिंदुस्थानांत चतुर्द्वीपचे राहणारे. मोऱ्यांचें घराणें फार प्राचीन आहे. अशोकमौर्यांचेच हें

* इ. संग्रह—य. रा. गुप्ते, बी. ए., ची मोरे यांची बखर; भाग २ महाबळेश्वरची जुनी माहिती; भा. इ. सं. मं. अहवाल १८३४–१४; मराठाकुळांचा इ. भाग ३; म. इ. साधनें खं. ८ उपप्रस्तावना पृ. १०९; का. इ.सं. बखरी इत्यादिकांत मोरे यांची हकीकत आहे. परंतु निश्चयात्मक असें कांहीं मिळत नाहीं.

बाजीराव मोरे
|
परसोजी | जयाजी
|
१ हणमंतराव पु. { खेमाजी, चायाजी }
२ बागराव—पु. प्रतापजी
३ सूर्याजीराव—पु. दादाजी
४ कमळराव
५ चंद्रराव—पु. बाळाजी.

वंशज असावे. चालुक्यवंशी पुलकेशीनें स.५५० च्या सुमारास मौर्यांस जिंकल्याचा उल्लेख आहे ( पृ.१३ ). पुढें मोरे नांवाचा एक सरदार कर्नाटकांत नाईक म्हणून प्रसिद्ध होता. यूसुफ् आदिलशहानें ( स. १४८९–१५१० ) त्यास १२००० पायदळाची सरदारी देऊन निरा व वारणा यांमधील प्रदेश जिंकण्यास पाठविलें. हा प्रदेश शिर्के, गुजर, मोहिते, महाडिक वगैरे मराठे सरदारांच्या ताब्यांत होता. ते सरदार आदिलशहाचा हुकूम मानीत नसत. शिर्के व मुसलमान यांचें युद्ध तर पुरातनपासून सुरू होतें. मोरे यानें वरील प्रदेश काबीज केला. ह्या कामगिरीबद्दल आदिलशहानें मोरे यांस 'चंद्रराव' हा किताब देऊन, जावळीचा राजा केलें. त्या बाजूचा मावळांतील अवघड प्रदेश मोऱ्यांनीं जिंकून आपल्या ताब्यांत आणिला. ह्या मोऱ्यांचे घराण्यानें पुढें अनेक वेळां विजापुरकरांस चांगलीच मदत केल्यामुळें त्याजवर आदिलशहाची विशेष भिस्त असे. त्यानेंच त्यांस धुळप असा बहुमानाचा किताब दिला. यशवंतराव मोरे यानें इस्मईल आदिलशहाच्या वतीनें परिंड्याच्या लढाईंत बुऱ्हाणनिजामशहाचा पराजय करून, त्याचें हिरवें निशाण काबीज केलें, ( स. १५२८–२९ ). तेंच आदिलशहानें मोरे यांजला बक्षिस दिलें. पुढें मोरे यांच्या वंशानें सात पिढ्यांपर्यंत म्हणजे सन १६५५ पर्यंत जावळीस राज्य केलें; आणि त्या प्रांतांतील रुक्ष व जंगली मुलूख त्यांनीं सुसंपन्न केला. हणमंतराव, सूर्यराव व चंद्रराव यांस शिवाजीनें जिंकिलें. या जावळीच्या मोऱ्यांपैकीं एक कुटुंब विजयदुर्गास जाऊन राहिलें. याच कुळांतील आनंदराव धुळप या पुरुषाची पुढें बाळाजी बाजीराव पेशव्यानें 'सुभा आरमार' स्वतंत्र करून त्याजवर नेमणूक केली, ( स. १७५४–१७९४ ). अगदींच बेकैद असलेला प्रदेश मोऱ्यांनीं सुधारला; आणि ते आदिलशहाशीं नम्र भावानें वागत, म्हणून त्यांजला खंडणी वगैरे फारशी द्यावी लागत नसे. सुलतानही त्यांजपासून खंडणीचा जास्त पैसा घेण्याविषयीं आतुर नसत.

( ७ ) वाडीचे सावंत.—दक्षिण कोंकणांत वेंगुर्ल्यांच्या पूर्वेस सावंतवाडी नांवाचें लहानसें संस्थान असून तेथील राजे भोसले आडनांवाचे आहेत. सातारकर भोसल्यांप्रमाणेंच तेही आपली उत्पत्ति उदेपूरच्या शिसोदे घराण्यापासून गणतात. त्यांचा मूळपुरुष मांग सावंत हा पंधराव्या शतकाचे सुमारास दक्षिणेंत येऊन ह्या वाडीप्रांतांत होडवडें म्हणून एक गांव आहे तेथें राहिला. त्या वेळीं हा प्रदेश विजयनगरच्या ताब्यांत होता. विजयनगरचा पाडाव झाल्यावर हा प्रांत विजापुरच्या आदिलशहाकडे गेला. आदिलशाहींतून कुडाळ परगण्याच्या देशमुखीचें म्हणजे जमिनीचा वसूल गोळा करून सरकारांत भरण्याचें काम एका प्रभु घराण्याकडे देण्यांत आलें. त्या कारणानें हें प्रभु देशमुखांचें घराणें त्या भागांत फार दिवस नामांकित होऊन त्यांच्या व सावंतांच्या पुष्कळ झटापटी झाल्या. दळवी आडनांवाचा एक प्रबल मराठा सरदार देशमुखांचे पदरीं राहून सेनापतीचें काम करीत असे. हे दळवी व सावंत कांहीं दिवस एक होऊन देशमुखांचा पाडाव करूं लागले. स. १६२७ च्या सुमारास खेमसावंत नांवाचा पुरुष पराक्रमी होऊन त्यानें विजापुरच्या सुलतानाकडून कांहीं प्रांताची देशमुखी संपादन केली. पुढें त्यांच्या वंशजांनीं कुडाळ येथील प्रभुदेशमुखांचा समूळ नाश करून सर्व प्रांताची देशमुखी विजापुर दरबारांतून आपणाकडे घेतली. देशमुखीच्या कामावरून 'देसाई,' 'सरदेसाई' वगैरे नांवें अनेक घराण्यांस पूर्वी प्राप्त झालीं, त्याच धोरणानें ह्या सावंतांनींही 'सरदेसाई' हें उपनांव धारण केलें, तें अद्यापि चालतें. संदर्भाकरितां पुढील त्रोटक हकीकत येथेंच देणें इष्ट आहे.

शिवाजीच्या वेळेस लखम सावंत पराक्रमी होता. त्यानें प्रथम विजापुरची मदत घेऊन शिवाजीशीं विरोध केला, पण त्याजपुढें आपला निभाव लागत नाहीं असें पाहून, त्यानें आपला कारभारी पीतांबर शेणवी यास शिवाजीकडे पाठविलें आणि त्याजबरोबर तह केला, (एप्रिल स. १६५९). ह्या तहानें त्या प्रांतांतील किल्ले, ठाणीं शिवाजीनें काबीज केलीं होतीं तीं त्यानें लखमसावंत ह्याचे स्वाधीन केलीं; आणि सावंतानें तीन हजार फौज बाळगून शिवाजीस मदत करावी असा ठराव झाला. हा तह फार दिवस टिकला नाहीं. शिवाजीनें रांगणा ऊर्फ प्रसिद्धगड हा किल्ला काबीज केला, तेव्हां लखमसावंतानें आदिलशहाची मदत घेऊन शिवाजीशीं युद्ध चाल-

विलें. हें युद्ध थोडया बहुत तीव्रतेनें शिवाजी व संभाजी ह्या दोघांच्याही कारकीर्दीत चालू होतें. विजापुरचा पाडाव झाल्यावर सावंतांनीं औरंगजेबाचा आश्रय केला, परंतु प्रसंग पडेल त्याप्रमाणें वागून ते बहुधा सर्वांसच दूर ठेवून स्वतः स्वतंत्र कारभार करीत असत. स. १६९७ त त्यांनीं कुडाळकर प्रभूंच्या सत्तेचा संपूर्ण शेवट केला.

ह्या वेळीं दुसरा खेम सावंत हा घराण्यांत प्रमुख होता. त्यानें चराठें येथें वास्तव्य केलें. ह्याच गांवास पुढें सुंदरवाडी हें नांव देण्यांत आलें. त्यानें सेनापति, दरकदार, आश्रित वगैरे लोकांस वतनें देऊन त्यांची राजधानींत वसती करविली. पुढें साताऱ्च्या शाहूमहाराजांचें स्वामित्व ह्या सावंतांनीं कबूल केलें. [ पिंगुळकरकृत सावंतवाडी संस्थानचा इतिहास ].

( ८ ) **फलटणचे निंबाळकर.**—महाराष्ट्रांतील राजघराण्यांत फलटणच्या निंबाळकरांचें घराणें फार जुनें असून सुमारें सहासातशें वर्षें राज्योपभोग घेत आहे. नवव्या शतकाचे आरंभीं धार येथें परमारवंशी रजपूत राजांनीं राज्य स्थापन केलें. त्या वंशांत मुंज, भोज वगैरे पराक्रमी परमार राजे झाले. दिल्लीच्या सुलतानांनीं ह्या राजांवर पुनः पुनः हल्ले केले. त्या धामधुमींत निंबराज परमार नांवाचा एक पुरुष दक्षिणेंत फलटणनजीक शंभुमहादेवाच्या रानांत स. १२४४ च्या सुमारास येऊन राहिला. शंभुमहादेवाचें स्थान सिंघण यादवानें वसविलें, म्हणून त्यास शिखरशिंगणापुर असें म्हणत. निंबराज ज्या गांवीं राहिला, त्यास निंबळक आणि त्यावरून त्याच्या वंशास निंबाळकर असें नांव पडलें. निंबराजाच्या वंशजांनीं पुढें फलटण हें गांव स्थापिलें आणि तेथें ते वतन संपादून राहूं लागले. महंमद तुघ्लखाचे वेळेस ह्यांस ' नाईक ' हा किताब व फलटणची देशमुखी मिळाली. पुढें आदिलशाहींत निंबाळकरांचें महत्त्व विशेष वाढलें. निंबराजापासून चौदावा पुरुष वणंगपाळ ऊर्फ जगपाळराव म्हणून झाला, त्याचे पूर्वींची माहिती उपलब्ध नाहीं.

महाराष्ट्रांत निरनिराळ्या भागांत निरनिराळीं घराणीं उदयास आलीं. जाधव व भोसले निजामशाहींत प्रसिद्धीस आले; जतचे डफळे, मलवडीकर घाडगे, मुधोळचे घोरपडे, जावळीचे मोरे व हे निंबाळकर वगैरे घराणीं आदिलशाहींत वाढलीं. त्यांत त्या वेळीं निंबाळकर विशेष प्रमुख होते. जगपाळराव नाईक हा शूर व फौजबंद होता. स. १५६९ च्या सुमारास

वीस वर्षांचा असतां तो फलटणचा कारभार पाहूं लागला. हिंगणी बेरडीचे भोसले दरसाल चैत्रांत शंभुमहादेवाचे यात्रेस नियमानें जात असत. रस्त्यांत त्यांचा मुक्काम फलटणास निंबाळकरांकडे होई. एकदां बाबजी भोसले व त्याचे दोघे मुलगे मालोजी व विठोजी ह्यांनीं रोजगाराच्या निमित्तानें जगपाळरावाची भेट घेतली. जगपाळराव व मालोजी समवयीच होते. भोसले बंधूंची इभ्रत, ज्वानी व हिंमत पाहून त्या उभयतांस जगपाळरावानें आपल्या पदरीं बारशें होनांची असामी दिली. त्यापूर्वी मालोजी हा देवगिरीस जाधवांचे पदरीं लहानशी नोकरी करून होता. निंबाळकरांनीं त्यास हात दिल्यानें उभयतांचा ऋणानुबंध वाढला. जगपाळराव आजूबाजूस आपला प्रदेश वाढवीत होता, त्या कामीं त्यास मालोजी व विठोजीचा चांगला उपयोग झाला. असें सांगतात कीं, स. १५९०-९२ च्या सुमारास, जगपाळरावाची फौज कोल्हापुरकडील कांहीं प्रांत जिंकीत असतां, त्याजवर आदिलशहाची फौज चालून आली. पुढें लढाई झाली तींत भोसले बंधूंनीं जिवाची परवा न ठेवितां उत्तम शौर्य प्रगट करून जगपाळरावाची बाजू संभाळिली. ह्यामुळें त्या उभयतांचा स्नेह वृद्धिंगत होऊन भोसल्यांचा लौकिक विजापुरदरबारांत पसरला. हा लौकिक निजामशाही दरबारांत गेल्यावर, त्यांचीं तेथील वतनें जप्त होतीं तीं मोकळीं करून त्यांस परत दिलीं आणि राजे हा किताब दिला. तेव्हां हे भोसले बंधु परत निजामशाहींत दाखल झाले. ह्याप्रमाणें भोसल्यांचा भाग्योदय झालेला पाहून जगपाळरावानें आपली उपवर बहीण मालोजीस दिली. हीच शहाजीची आई दीपाबाई होय. भोसल्यांचे कुळ उच्च आहे, आणि निंबाळकर जसे परमार घराण्यांतून दक्षिणेंत आले, तसेच भोसले हे केव्हां तरी उदेपुरच्या घराण्यांतून इकडे आलेले असावे, अशी निंबाळकरांची खात्री होती, असें ह्या घराण्यांतील लग्नसंबंधावरून मानण्यास हरकत नाहीं. तसेंच मालोजी जाधवरावाचे देवडीवर असतां हें लग्न झालें नसून, पुढें त्यास मनसबदारी मिळाल्यावर झालें असावें. शहाजीचा जन्म स. १५९४ चा आहे, आणि कोल्हापुरच्या मोहिमेचा वरील सन १५९२ हा खरा असेल तर, त्यानंतर दीपाबाईचें लग्न होणें, व लग्नाचे वेळीं मालोजीचें वय सुमारें ४० वर्षें असणें ह्या गोष्टी संभवनीय दिसत नाहींत. मात्र निंबाळकरांशीं शरीरसंबंध झाल्यामुळें

भोसल्यांचा लौकिक वाढला, आणि निंबाळकरांसारख्या वजनदार सरदाराचें त्यांस साह्य मिळाल्यानें शहाजीशिवाजीचे पुढील उद्योग विशेष सुकर झाले. जगपाळरावाचें पाठबळ होतें म्हणूनच जिजाबाईचें लग्न शहाजीशीं झालें. पुढें शहाजीनें निजामशाहीच्या तर्फेनें शहाजहानशीं युद्ध केलें, त्यांत जगपाळरावानें शहाजीस चांगली मदत केली. ह्या लढण्यांतच जगपाळराव स. १६२९त अहंमदनगरजवळ मरण पावला. ( इ. सं.—फलटणची कैफियत ). ह्या घराण्यांत हाच मोठा लौकिकवान झाला.

पश्चात् त्याचा प्रौढ मुलगा मुधोजीराव ( दुसरा ) फलटणचा अधिकारी झाला. त्याला दोन बायका असून वडील बायकोला साबाजीराव व जगदेवराव, आणि धाकटीला बजाजीराव व सईबाई अशीं मुलें होतीं. ह्या सावत्र मुलांत तंटे लागून ते विकोपास गेले. साबाजी व जगदेव हे दोघे घर सोडून मातुश्रीसह विजापुरास गेले. तेथें दरबारांत खटपट केल्यावर त्यांस दहिगांव व भाळवणी हे दोन गांव स्वतंत्र तोडून मिळाले, (१६३४). अशा रीतीनें निंबाळकरांच्या तीन स्वतंत्र शाखा झाल्या. ह्या गृहकलहामुळें जहागिरीचें नुकसान झालें. मुधोजीराव आजूबाजूस पुंडावे करूं लागला म्हणून त्यावर आदिलशहाची फौज चालून आली; त्याचा पराभव होऊन, आदिलशहानें त्यास बंडखोर ठरवून सातारच्या किल्यावर कैदेंत ठेविलें ( १६३१ ). तेथें तो सात वर्षें होता. त्या मुदतींत फलटणची जहागीर जप्त होती. मुधोजीनें आपली धाकटी बायको व तिचीं मुलें बजाजी व सईबाई यांस, त्यांचे जिवास अपाय होईल ह्या भीतीनें, आपल्याजवळ साताऱ्यास बोलवून घेतलें. पुढें शहाजी विजापुरच्या नोकरींत राहिल्यावर त्यानें आपलें वजन खर्च करून मुधोजीची स. १६३८ त कैदेंतून सुटका करविली. ह्या उपकारामुळें त्या दोघांचा प्रेमभाव वाढला, आणि मुधोजीनें आपली मुलगी शहाजीचा मुलगा शिवाजी यास दिली. हें लग्न १६३९ च्या सुमारास विजापुरास झालें असावें.

शिवाजीनें पुढें जो स्वतंत्र होण्याचा उपक्रम चालविला त्यास मुधोजीचें साह्य होतें. ही गोष्ट विजापुरदरबारास खपत नव्हती. शिवाय मुधोजीच्या मनांत असें होतें कीं, आपल्या पश्चात् फलटणचा कारभार बजाजीस मिळावा. ह्या गोष्टीस त्याचे वडील मुलगे कबूल नव्हते. परंतु त्याजबद्दल मुधोजीनें दरबारची संमति मिळविली, तेव्हां मुधोजीचें व त्याच्या दोन

वडील मुलांचें वांकडें आलें. ते विजापुरची मदत घेऊन मुधोजीवर चालून आले. शिरवळ नजीक भोळी येथें लढाई होऊन मुधोजी एका वडाच्या झाडाखालीं पुत्राच्या हातून मारला गेला, त्यास बापमारीचा वड असें म्हणतात (स. १६४४). ह्या लढाईंत बजाजी नाइकास कैद करून विजापुरास नेलें. तेथें बापाचे अपराधाबद्दल त्यास जिवें मारण्याची आज्ञा झाली. ' तेव्हां माने, घाटगे, घोरपडे आदिकरून सरदारांनीं विनंति करून, मारण्याचा हुकूम रहित करविला; आणि मुसलमानधर्म स्वीकारून, आदिलशहाच्या मुलीशीं लग्न होऊन, कांहीं काळ विजापुरीं राहिल्यावर फर्मान घेऊन फलटणास आले' (स. १६५१). फलटणास अद्यापि बजाजीची घुमटाची समाधि आहे. त्यास पुढें जिजाबाईनें शंभुमहादेवाचे देवळांत प्रायश्चित्त देऊन परत जातींत घेतलें आणि त्याचा मुलगा महादाजी ह्यास शिवाजीची मुलगी सखूबाई दिली. हा मजकूर पुढें यथावकाश येईल. फलटणकरांचे हे तंटे व बजाजीचें धर्मान्तर ह्यांचा परिणाम शिवाजीच्या मनावर विशेष झाला असेल हें सांगणें नकोच. (फलटणचें दप्तर व इतिहाससंग्रह). निंबाळकरांची वंशावळ परिशिष्टांत दिली आहे.

(९). सिंधखेडचे जाधव.—देवगिरीच्या रामदेव यादवाचे हे वंशज




होत. गोविंददेवानें हसनगंगू बहामनीला दक्षिणेंत राज्य स्थापण्यास मदत केली. पुढें बागलाण वगैरे प्रांतांत तो थोडाबहुत प्रदेश हस्तगत करून होता. त्याचा मुलगा ठाकूरजी खानदेशांत सिंदखेडच्या बाजूस देशमुखी वतन संपादून राहूं लागला. तीन पिढ्यांपर्यंत आपलें राज्य पुनः मिळेल अशी त्यांस आशा होती; परंतु पुढें बहामनी राज्यांत त्यांचा टिकाव न लागून, आणि घराण्याची दुर्दशा व वाताहत होऊन, ते देशमुख बनले. भूखणदेवानें खानदेशांत बराच प्रांत मिळवून दरबारांत आपलें

वजन वाढविलें. अचलोजीच्या वेळेस बहामनी राज्य मोडून सिंदखेडकडील भाग निजामशाहींत आला. निजामशहाचा दिवाण कंबरसेन ह्यानें मराठे सरदारांस लष्करांत मनसबी देण्याची सुरुवात केली. त्यांत अचलकर्णास त्यानें पांच हजार स्वारांची मनसब दिली. त्याचा मुलगा विठ्ठलदेव तालीकोटच्या लढाईंत मुसलमानांचे तर्फेनें लढत होता. पुढें लुखजी जाधवाच्या वेळेस निजामशाही जिंकण्यासाठीं अकबर बादशहा चालून आला. लुखजीनें चांदबिबीला चांगली मदत केली. त्यास दहा हजारांची मनसब होती. लुखजीची बायको म्हाळसाबाई म्हणून होती. त्यांची मुलगी जिजाबाई होय. येथून पुढें ह्या घराण्याचा संबंध भोसल्यांशीं जडला; आणि त्या दोघांचें वांकडें आलें वगैरे प्रकार पुढें येतील. लुखजीचा मुलगा अचलोजी, अचलोजीचा सुजनसिंग ऊर्फ संताजी, संताजीचा शंभुसिंग आणि शंभुसिंगाचा मुलगा पुढें प्रसिद्धीस आलेला धनाजी जाधव होय, ( मराठा कुळांचा इ० भा १ ला. ). खानदेश गॅझेटियरमध्यें ह्या जाधव घराण्याचा इतिहास दिलेला आहे. ह्या हकीकतीवरून दक्षिणेंत जाधव घराण्याचें महत्त्व केवढें होतें, हें कळून येईल.

५. भोसल्यांची पूर्वपीठिका.—भोसल्यांचें घराणें दक्षिणेंतील मराठ्यांत पुष्कळ प्राचीन आहे. त्यांच्या उत्पत्तीविषयीं निरनिराळ्या ग्रंथांत, भारतवर्ष, ग्रंथमाला वगैरे मासिक पुस्तकांत, व रा. राजवाडे वगैरेंनीं पुष्कळ विवेचन केलेलें आहे. परंतु निश्चयात्मक माहिती अद्यापि बाहेर आलेली नाहीं. भोसल्यांची उत्पत्ति चितोडच्या रजपूत क्षत्रिय वंशापासून झालेली आहे. निंबाळकरांनीं व जाधवांनीं भोसल्यांशीं सोयरिकी केल्या, ह्यावरून भोसल्यांचे उच्च कुलाविषयीं व क्षत्रियत्वाविषयीं त्यांस संशय नव्हता हें उघड आहे. पुष्कळ मराठ्यांचीं घराणीं आरंभीं उत्तरेंतून आलीं, तसेंच भोसल्यांचेंही घराणें इकडे आलें असावें. असें सांगतात कीं, राणा लक्ष्मणसिंहाचा नातू सुजनसिंह चितोड सोडून सोंधवाड्यास आला. तेथें त्यांचें चार पिढ्या वास्तव्य झालें. त्यांचा एक वंशज देवराजजी म्हणून कोणी एक पुरुष स. १४१५ च्या सुमारास नर्मदा ओलांडून प्रथम दक्षिणेंत आला. भोसाजी नांवाच्या पुरुषावरून त्या वंशांस भोसले असें नांव मिळालें. शिवाजीचे आज्याचा आजा संभाजी म्हणून होता, त्याच्यापासून पुढील वंशाची विश्वसनीय माहिती मिळते.

'भोसाजीच्या भाऊबंदांपैकीं खलकर्ण व मलकर्ण ह्या दोन बंधूंनीं दाक्षिणेंत येऊन निजामशाहींत चाकरी धरिली. त्यांस प्रत्येकीं दीड हजार स्वारांची मनसब मिळाली, आणि त्याजबद्दल चाकणचौऱ्यांशीं पुरंदर परगणा व सुपें महाल तैनात मिळाले. ह्याच दोघांस पुढें खेळोजी व मालोजी अशीं नांवें मिळालीं. मालोजी मरण पावला तेव्हां त्यास बाबाजी भोसले नांवाचा पुत्र लहान होता, सबब अव्यवस्था न होण्याकरितां सरंजाम सरकारांत जमेस ठेवण्यांत आला. त्यामुळें बाबाजीस घेऊन त्याची मातुश्री दौलताबादेहून वेरूळ घुमेश्वर येथें येऊन राहिली. बाबाजी मोठा झाल्यावर त्यानें भिमेच्या कांठीं कांहीं गांवाच्या पाटिलक्या खरेदी घेतल्या.'(अष्टप्रधानांचा इ.)

दक्षिणेंत आल्यावर हे भोसले कृष्णा व भीमा यांचे कांठीं हिंगणी, बेरडी, देऊळगांव वगैरे कित्येक गावच्या पाटिलक्या खरेदी करून राहूं लागले. 'दाक्षिणेंत दिवसेंदिवस यवनांचें प्राबल्य; याजमुळें श्रीसिंधणापूर महादेव हाच एकलिंग कुलस्वामी, व श्रीतुळजापुरभवानी ही चितोडदेवी असें जाणून परम भक्ति करून तो वंश परम धर्मशील, शूर, प्रतापी, असा होत गेला. एकलिंग कुलस्वामी व चितोडदेवी हीं या वंशाचीं रजपुतान्यांतील आराध्यदैवतें होतीं. वंशवृद्धि होत गेली तसतशीं त्यांनीं निरनिराळ्या ठिकाणीं वतनें संपादिलीं. हल्लीं मनरथ, निरगुडी, कळस, वावी, मुंगीपैठण, नानजव, जिंती, खानवट, बनसेंद्र इत्यादि ठिकाणीं या भोसल्यांचे वंशज आहेत. हें घराणें निजामशाहींत उदयास आलें. चितोडच्या घराण्यांतील इतर पुरुष शेवटपर्यंत यवनांशीं बाण्यानें वागले, तसाच शिवाजीही दक्षिणेंत क्षत्रियकुलावतंस झाला.*

संभाजीचा मुलगा बाबजी भोसले हा सन १५३३ त जन्मला. बाबजीचे मुलगे मालोजी आणि विठोजी. त्यांचे जन्म १५५० व १५५३ त झाले. या दोघां भावांनीं लुखजी जाधवराव याचे पदरीं बारगीर म्हणून नोकरी पत्करिली (सन १५७७), आणि तेथें त्यांनीं आपल्या यजमानाची मर्जी चांगल्या प्रकारें संपादन केली. जाधवरावाचे पदरीं नोकरी

* हिंगणी, बेरडी, देऊळगांव, खानवट, जिंती हे गांव दौंडनजीक–ता. पाटस; कळस ता. इंदापूर–जि. पुणें; वावी ता. सिन्नर, जि. नाशिक; मुंगीपैठण पैठणजवळ जि. नगर; बनसेंद्र वेरूळचे उत्तरेस; नानजव जि. नगर.

असल्यामुळें दौलताबादेनजीक आपलें पाटिलकीचें गांव वेरूळ येथें मालोजी राहूं लागला.

मालोजी हा शरीरानें फार धिप्पाड होता. त्याचे स्वारीस घोडें टिकत नसे, म्हणून जाधवरावानें त्यास देवडीची चाकरी दिली होती. परंतु तेवढ्यानें संतुष्ट न होऊन तो फलटणास निंबाळकरांकडे गेला. तेथें त्यानें लौकिक मिळविल्यावर जगपाळराव निंबाळकरानें आपली बहीण दीपाबाई मालोजीस दिली. मालोजीची हुशारी पाहून जाधवरावानें सन १५७७त त्यास मूर्तुजा निजामशहा यास भेटवून व त्याजबद्दल मोठी शिफारस करून त्यास त्यानें सरकारी सैन्यांत शिलेदारी देवविली. यापुढें मालोजी भोसले आपली पागा वाढवून सरकारच्या मोठमोठ्या कामगिऱ्या बजावूं लागला. विठोजीस आठ पुत्र झाले, परंतु मालोजीस मूल होत नव्हतें. याकरितां दीपाबाईनें बहुत नवस, देवधर्म, अनुष्ठानें वगैरे केलीं. त्यांत नगरचा पीर शहाशरीफ यास नवस केल्यावर पुत्र झाला ( सन १५९४ ); त्याचें नांव त्या पीराचे नांवावरून शहाजी असें ठेविलें. सन १५९७ त दुसरा पुत्र झाला, त्याचें नांव शरीफजी असें ठेविलें.

मराठ्यांचा विशिष्ट करारी स्वभाव भोसल्यांचे ठिकाणीं चांगला दिसून येतो. त्यांजशीं जो सलोख्यानें वागे, त्याला ते ममतेनें वागवीत; पण त्यांच्याशीं कोणी तेढ्यानें वागूं लागला, तर ते त्याचा हेका चालूं देत नसत. उदेपुराहून जो पुरुष दक्षिणेंत आला, त्यास कारण हा त्याचा स्वभावच होय असें सांगतात. शहाजीचे लग्नाचा प्रकार, पुढें शहाजीनें केलेलीं अनेक कृत्यें, व शिवाजीचा चारित्रक्रम पाहिला असतां त्या घराण्याचा हा धाडसी व दृढनिश्चयी स्वभाव चांगला व्यक्त होतो. निजामशाहींत मालोजीची दिवसेंदिवस बडेजाव होत असतां स. १५९९ सालीं शिमग्याच्या सणांत रंगपंचमीनिमित्त तो शहाजीस बरोबर घेऊन जाधवरावाचे घरीं पानसुपारीस गेला. तेथें एक क्षुल्लक गोष्ट घडून तिजमुळें ह्या घराण्याच्या पुढील इतिहासास निराळें स्वरूप प्राप्त झालें. शहाजी सुरूप व चपळ होता. त्यास जाधवरावानें लडिवाळपणें आपले जवळ बसविलें. जाधवरावास जिजाबाई म्हणून एक मुलगी होती. ती स. १५९५ त जन्मली असून त्या वेळीं तीन वर्षांची होती. दरबारांत ती बापाजवळ येऊन बसली असतां, मूलस्वभावेंकरून तीं दोघें एकमेकांवर रंगगुलाल

टाकून खेळूं लागलीं. तें पाहून जाधवराव विनोदानें म्हणाला, ' मुली, तुला हा नवरा आवडतो काय ? हा जोडा मोठा सुंदर दिसतो ' ! ते विनोदाचे शब्द जमेस धरून मालोजी सर्वांसमक्ष उठून बोलला, ' ऐका हो जाधवराव काय बोलले तें. आजपासून जाधवराव आमचे व्याही झाले.' *विनोदाचें पर्यवसान असें होईल असें जाधवरावास वाटलें नव्हतें. त्याची स्त्री म्हाळसाबाई हिला तर मालोजीच्या उद्धटपणाचा फार राग आला. मालोजी आपल्या तोडीचा सरदार नव्हे; तो पैशानें व मानानें आपल्या बरोबरीचा नाहीं. सबब त्याच्याशीं शरीरसंबंध करणें अनुचित; इत्यादि प्रकारें जाधवरावास त्याची बायको टाकून बोलली. जाधवरावानेंही आपण ही सोयरीक करण्यास तयार नाहीं असा जबाब मालोजीस दिला. त्या जबाबानें मालोजीला फार दुःख झालें. आपलें कुळ कमी नसतां केवळ पैसा नसल्यामुळें आपल्यास लोक मानीत नाहींत असा विचार मनांत येऊन, जाधवरावाचीच मुलगी शहाजीस करावयाची, या खटपटीस तो लागला. या योगानें जाधवाशीं त्याचें वांकडें पडलें. मालोजी हा तुळजापुरच्या भवानीचा एकनिष्ठ भक्त असे. वेरूळ येथें मालोजी शेतांत गेला असतां, त्यास देवीनें दर्शन देऊन वर दिला कीं, ' तुझे मनोरथ सिद्ध होतील; व तुझे वंशीं श्रीसांचाचा अवतार शककर्ता निर्माण होईल. यास प्रमाण जवळच्या वारुळांत द्रव्य आहे तें घे, तेणें तुझें कार्य होईल.' दृष्टांताप्रमाणें मालोजीस द्रव्याचा ठेवा सांपडला. श्रीगोंदें या गांवीं शेषाप्पा नाईक पुंडे म्हणून कोणी साखीचा सावकार होता, त्याजकडे मालोजीनें आपलें द्रव्य नेऊन ठेविलें. पुढें नानाप्रकारचे दानधर्म करून मालोजीनें लौकिक संपादिला. घरीं घोडीं खरेदी करून पागा वाढविली. श्रीशिखरमहादेव येथें यात्रा भरत असून तेथें उदक नव्हतें; म्हणून मोठा तलाव बांधिला. वेरूळ येथील कृष्णेश्वराच्या देवळाचा उद्धार केला. अशीं अनेक कृत्यें करून मालोजीनें जाधवरावाकडे मुलीची पुनः मागणी केली; परंतु जाधवराव आपला आग्रह सोडीना. तेव्हां दरबाराकडून जाधवरावावर शह आणण्याचा विचार करून, जगदेवराव निंबाळकराचे मार्फत मालोजीनें निजामशाही दरबाराकडे फिर्याद केली. शहाजी या वेळेस अल्पवयस्क परंतु होतकरू होता. तेव्हां मराठ्यांचा उपयोग राज्यास फार आहे व मालोजी कर्तृत्ववान आहे असें पाहून, दर-

बाराने मालोजीस पंचहजारी मनसब व 'राजे' असा किताब देऊन शिवनेरे व चाकण हे दोन किल्ले आणि पुणें व सुपें हें दोन परगणे जहागीर दिले; आणि जाधवरावाकडून जिजाबाई शहाजीस देवविली. याप्रमाणें ह्या दोघांचें लग्न एप्रिल स. १६०४ या वर्षी मोठ्या थाटानें झालें. लग्नाचे समारंभास निजामशहा स्वत: आला होता. पुढें शहाजी मोठा होऊन राज्याच्या उलाढाली करूं लागला; आणि मालोजीराजे स. १६१९ त मरण पावला.

अनेक मराठे सरदारांना 'राजे' ही पदवी केव्हां तरी मिळालेली होती. रा. राजवाड्यांच्या १५ व्या खंडांत, भोसल्यांचे पुष्कळ कागद छापलेले आहेत. बाबाजीराजे स. १५९७ त, मालोजी स. १६०७ त, संभाजी स.१६२१ त उपाध्यायांस इनामें वगैरे करून देतांना आढळतात. अशीं इनामें मलिकंबरानें रुजू ठेविलीं आहेत. हे उपाध्ये आरवीमुद्गल प्रांत पुणें येथील राहणारे असून, भोसल्यांचे कुलगुरु होते. भोसल्यांचे हेच उपाध्ये पुढें राजोपाध्ये झाले. शहाजीनें स. १६३१ त रामेश्वरभट्टास इनाम करून दिलेलें आहे. ह्या उपाध्यांकडून भोसले कर्जवाम काढीत असत.

भोसले घराण्याचा संबंध आदिलशाहींतील निंबाळकरांशीं झालाच होता. पुढें निजामशाहींतील जाधवांशीं त्यांचा संबंध झाल्यानें दोनही राज्यांत आपला हात शिरकवण्यास संधि मिळणार होती, म्हणूनच जिजाबाई आपल्या घरीं पडावी अशा हट्टास मालोजी पेटला. रंगपंचमीच्या दरबारांत दोघां मुलांनीं रंग उडविणें ही एक मालोजीस सबब झाली. वस्तुत: निजामशाही व आदिलशाही ह्या दोनही राज्यांत आपलें वजन वाढविण्याचा मालोजीचा इरादा मूळपासून स्पष्ट दृष्टीस पडतो. मालोजीच्या वरची पायरी शहाजी व शहाजीच्या वरची पायरी शिवाजी असा हा उपक्रम वाढत गेला. सारांश, मालोजीच्या वेळेपासून महाराष्ट्रांत स्वराज्याचें वातावरण हळूहळू तयार होऊं लागलें.

मालोजी कर्तृत्ववान् होता. त्यानें आदिलशाहींत व निजामशाहींत कोणकोणत्या उलाढाली केल्या, फलटणकरांशीं संबंध कसा जोडिला, इत्यादि प्रकार क्रमवार उघडकीस येतील तर त्यांपासून भोसल्यांच्या इतिहासांत चांगली भर पडेल. आरंभीं तो पाटील होता, नंतर जाधवरावाच्या पदरीं शिलेदार झाला; तेथून फलटणच्या निंबाळकरांशीं घरोबा जोडून

आणि अनेक खटपटी व साहसें करून त्यानें आपली प्रतिष्ठा वाढविली. इकडे निजामशाहीवर संकट आलें. अकबर बादशहा तें राज्य काबिज करण्याकरितां चालून आला. खानदेश व वऱ्हाड हे दोन प्रांत त्यानें जिंकिले; आणि अहंमदनगर जिंकून बहादूर निजामशहास आग्र्यास नेऊन कैदेंत ठेविलें, (१५९९). पुढें चांदबिबी लढत असतां मारली गेली; आणि मलिकंबरनें खडकी येथें राजधानी करून निजामशाहीचा उद्धार चालविला. ह्या संधींतच मालोजीचाही पुंडावा चालू होता. तेव्हां त्यास आपल्या पक्षास मिळविण्याच्या उद्देशानें निजामशाहीच्या मुत्सद्यांनीं पंचहजारी मनसब व जहागीर म्हणून कांहीं किल्ले व ठाणीं नेमून दिलीं. हीं ठाणीं, पुणें, नगर, नाशिक व खानदेश इतक्या ठिकाणीं पसरलीं होतीं. परंतु हे बहुतेक प्रांत अगोदरच मोगलांचे कबजांत असल्यामुळें मालोजीला ही जहागीर सभाळण्यास अतिशय प्रयास पडले. कदाचित् मोगलांवर शह बसविण्याच्या उद्देशानेंच ही जहागीर मलिकंबरनें त्यास दिली असावी. अर्थात् तीन राज्यांशीं व्यवहार ठेवून आपला बचाव करण्याचा प्रसंग मालोजीस आला, आणि अनेक युक्त्या करून त्यानें आपल्या जहागिरीचें संरक्षण केलें. या खटपटींत भोसल्याच्या राज्यलक्ष्मीचा उदय झाला. मालोजीच्या उद्योगांत शहाजी मदतीस होता; आणि त्याच्या योगानें युद्धकारस्थानांत त्यास लहानपणापासून अप्रतिम शिक्षण मिळालें, हें उघड आहे.

६ **मराठ्यांच्या उदयाची सिद्धता.**—येथवर जी हकीकत सांगितली, तीवरून मराठेलोकांचें वजन राजदरबारीं उत्तरोत्तर कसें वृद्धिंगत होत होतें, हें ध्यानीं येईल. शहाजीचा आयुःक्रम म्हणजे पुढील उद्योगाचा खरा आरंभ होय. ह्या सर्व सरदारांस व देशमुखांस एका कर्तव्ययोजनेंत आणण्याचें काम प्रथम शहाजीनें व पुढें शिवाजीनें केलें. बहामनी राज्याच्या अंमलाखालीं कामें काजें करून त्यांजला युद्धकलेचा व राज्यकारभाराचा थोडथोडा अनुभव येत चालला होता. एका बहामनी राज्याचीं पांच व पुढें तीन राज्यें झाल्यावर त्यांची ही हांव दिवसेंदिवस वृद्धिंगत होऊं लागली. तीन राज्यांच्या झटापटींत स्वतःचें महत्त्व स्थापणें त्यांस सोपें झालें. इतकेंच नव्हे, तर त्यांच्या मदतीशिवाय त्या राज्यांचें चालूंच नये, अशी स्थिति प्राप्त झाली. मोगल बादशहांनीं दक्षिणेंतील

हीं मुसलमानी राज्यें बुडविण्याची खटपट चालविली, ती मराठ्यांच्या चांगलीच पथ्यावर पडली. परभारें मुसलमानसत्तेचा नाश होत आहे, हें पाहून त्यांच्या स्वराज्याच्या कल्पनेस अंकुर फुटूं लागले. अकबर, सलीम, व शाहाजहान ह्यांनीं अतोनात श्रम करून, दक्षिण देश व विशेषतः अहंमदनगरचें राज्य काबीज करण्यांत स्वशक्तीचा मात्र नाश करून घेतला. दक्षिण देश अवघड, तेथील डोंगरी प्रदेशांत उत्तरेकडील मिजाशी फौजेचा रिघाव होणें दुर्घट, यदाकदाचित् तो देश जिंकिला, तरी तो ताब्यांत ठेवण्यास विलक्षण प्रयास पडणार, इत्यादि प्रकार समजून घेऊन मोगल बादशहा दक्षिण देश जिंकण्याच्या भानगडींत पडले नसते, तर तें कदाचित् त्यांच्या फायद्याचें झालें असतें. झाला प्रकार तो मराठ्यांच्या पुष्कळ फायद्याचा झाला. तीन बादशहांनीं सतत प्रयत्न करून जो देश जिंकिला, त्याजवरील आपला ताबा कायम करण्याइतकी मोगलांस फुरसत मिळाली नाहीं. असलेली राज्यपद्धति मोडून टाकण्याची खटपट करितांना नवीन व्यवस्था उत्पन्न करण्याचें काम त्यांच्या हातून झालें नाहीं. औरंगजेबासारखा धूर्त पुरुष दक्षिणच्या कारभारावर असतांही, त्याच्या हातून मराठ्यांस दाबांत ठेवण्याचें काम झालें नाहीं. राजधानी शहर जवळ असल्यामुळें व रजपुतान्याचा बहुतेक प्रदेश सपाट असून लढाईच्या मार्गास योग्य असल्यामुळें रजपुतांवर मोगलांनीं आपला शह बराच बसविला. परंतु दक्षिणेंत तसा शह बसविणें शक्य नव्हतें. उलटपक्षीं, हा देश काबीज करितांना मोगलांनीं केलेले युद्धप्रसंग मराठ्यांस एक प्रकारच्या लढाऊ व राजकीय शिक्षणादाखल उपयोगी पडले. राज्याच्या घडामोडी कशा होतात, डोंगरी प्रदेशांत युद्ध चालविण्यास काय काय तयारी लागते, मोगलांच्या चुका काय झाल्या, आपला देश आपल्याच ताब्यांत ठेवण्यास कोणत्या गोष्टींची जरूर आहे, इत्यादि उपयुक्त माहिती मराठ्यांस अनायासें कळून आली.

हिंदुस्थानांत मुसलमानी सत्तेचा जोर सर्वत्र चालू असतां, महाराष्ट्रांतच स्वतंत्र राज्य स्थापन कां झालें, आणि रजपूत वगैरे इतर लोकांत तसा प्रयत्न कां झाला नाहीं, ही गोष्ट विचार करण्यासारखी आहे. ह्यासाठीं महाराष्ट्राप्रमाणें हिंदुस्थानांतील इतर भागांची पूर्वकालीन ऐतिहासिक

माहिती पाहिजे तितकी बाहेर आलेली नाहीं. परंतु एक दोन विशेष कारणें स्पष्ट दिसतात. महाराष्ट्राची सृष्ट स्थिति इतर प्रांतांहून फारच भिन्न आहे. पूर्वीच्या काळीं डोंगराळ प्रदेशांत बंदोबस्त चांगला राखणें शक्य नव्हतें. रस्ते वगैरे नव्हते. अवघड किल्ल्यांच्या आश्रयानें लोकांस पुंडावे करण्यास चांगलें फावे. डोंगरी मुलखांतील लोकही ज्यास्त काटक असतात. उत्तर हिंदुस्थानचा प्रदेश सपाट व सुगम होता. मोगलांची राजधानी जवळ असल्यामुळें, रजपुतांस यत्किंचित् डोकें वर काढण्याची सोय नव्हती. पृथ्वीवरील इतरत्र, स्कॉटलंड, स्वित्झर्लंड, अफगाणिस्तान वगैरे ठिकाणची स्थिति तुलनेसाठीं विचारांत घेण्यासारखी आहे.

राष्ट्रांस अवनति प्राप्त झाली असतां ती दूर करून सुदशा आणण्यास कोणकोणत्या साधनांची अवश्यकता लागते, हें वरील विवेचनापासून थोडेंबहुत व्यक्त होईल. इतिहास म्हणजे एकवार झालेल्या चुका सुधारण्याचा मार्ग; इतिहास म्हणजे गतकालीन अनुभवावरून पुढील वर्तनक्रम ठरविण्याचें साधन; या अर्थानें इतिहास म्हणजे राष्ट्रोन्नतीचा पाया. दोन भिन्न काळांतील वस्तुस्थिति सर्व बाबतींत सारखी आहे, असें कधींच घडावयाचें नाहीं. तथापि दोन स्थितींतील फरक व त्याचीं कारणें यांजवरून निघणारा अनुभव महत्त्वाचा आहे. आजमितीस अनेक विद्वानांचें लक्ष ह्या इतिहासाच्या पूर्ततेकडे लागण्याचा हेतु हाच. लक्षपूर्वक अवलोकन करणारास या इतिहासाध्ययनापासून चांगलें ज्ञान झालें पाहिजे.

येणेंप्रमाणें राज्यस्थापनेचें साहित्य तयार झालें. मुसलमानांमधील कलह व त्यांच्या राज्यांतील अव्यवस्था, हिंदु सरदारांचा त्यांनीं अपमान केल्यामुळें महाराष्ट्र मंडळांत उत्पन्न झालेला आवेश, आणि संत मंडळींनीं धर्मसुधारणेच्या बळावर लोकांच्या अंगीं उत्पन्न केलेला स्वाभिमान इत्यादि कारणांनीं ह्या देशांत नवीन जोम उत्पन्न होऊन, स्वराज्यस्थापना सुकर झाली. या कामीं पुढाकार घेण्यास योग्य पुरुष पाहिजे होता. महाराष्ट्रांतील कित्येक प्रमुख घराण्यांच्या हकीगती वर दिल्या आहेत, त्यांवरून भोसल्यांच्या अंगीं कित्येक गुण अतिरेकानें वसत असल्यामुळें त्याच घराण्याकडे महाराष्ट्रीयांचें धुरीणत्व आलें. इतर घराण्यांहून भोसल्यांचा इतिहास थोडा निराळा आहे. मराठी राज्यसंस्थापकाचा चरित्रक्रम कोणत्या प्रकारचा होता, आणि राज्यस्थापनेचें सामर्थ्य त्यास कशा रीतीनें प्राप्त झालें, हें पुढील प्रकरणीं सांगावयाचें आहे.



---

# प्रकरण पांचवें.

## शिवाजीचें पूर्वचरित्र.

१. शहाजीचीं प्रचंड कारस्थानें. २. निजामशाहीची वांटणी: शहाजीचा डाव.
३. बालपण व मातुःश्रीचा सहवास. ४. शिक्षण व तत्कालीन साक्षरता.
५. मावळ प्रांत व शिवाजीचा उपक्रम. ६. दादाजी नरस प्रभु, स्वराज्याची शपथ.
७. कान्होजी, बाजी सर्जेराव देशमुख. ८. बाजी पासलकर.
९. दादाजी कोंडदेव,—चरित्र व कामगिरी. १०. स्वराज्याची कल्पना कोणाची ? ११. पहिल्या उपक्रमाची सिद्धि.

**१. शहाजीचीं प्रचंड कारस्थानें.**—प्रो. सरकार ह्यांचें 'औरंगजेबाचें चरित्र,' ह्या पुस्तकांतील माहितीनें शहाजीचा उद्योग बराच स्प होतो. सर्व हिंदुस्थान आपल्या ताब्यांत आणण्याची अकबर बादशहाची मोठी हांव होती. पण ती सिद्धीस न जाता तो स. १६०५ त मरण पावला. त्याचा मुलगा जहांगीर विलासी व बराच दुर्बल होता. बापाचें काम शेवटास नेण्यासाठीं त्यानें वरचेवर फौजा रवाना केल्या. परंतु खानखानान वगैरे त्याचे सेनाधिकारी निजमशाहींतील कारभारी लोकांकडून पैसे घेऊन आपल्या कामांत कुचराई करीत. त्यामुळें मलिकंबरचा प्रयत्न यशस्वी होऊन, त्यानें सर्व निजामशाही पूर्ववत् चालविली; इतकेंच नव्हे तर दक्षिणेंतील सर्व मुसलमानी राज्यांचा एकोपा करून त्यानें मोंगलांशीं युद्ध चालविलें, आणि त्यांचा पाडाव करून बादशहाच्या सुभेदारास वेढा घालून बऱ्हाणपुरांत कोंडिलें, ( स. १६२० ). ह्या बातमीनें जहांगीर खडबडून जागा झाला, आणि लगेच त्यानें आपला मुलगा शहाजहान यास दक्षिणदेश जिंकण्यासाठीं रवाना केलें. परंतु शहाजहानच्या हातून हें काम तडीस जाण्यापूर्वीच जहांगीरचे दरबारीं बंडावे सुरू झाले, त्या कारस्थानांत शहाजहानचें लक्ष वेधलें ( मु. रि. पृ. ५८६ ), आणि मलिकंबर व शहाजी ह्यांस दक्षिणेंत मोकळा हात सांपडला. ह्या संधीचा उपयोग शहाजीनें कसा केला, हें आतां सांगावयाचें.

बाप मरण पावला तेव्हां शहाजीचें वय पंचवीस वर्षांचें होतें. मलिकंबर त्याची कर्तबगारी ओळखून होता, म्हणून मनसबदारीचीं वस्त्रें

शहाजीस लगेच मिळाली. मलिकंबरानें मोगलांचा पराभव केला म्हणून वर सांगितलें, त्यांत शहाजी प्रमुख होता. निजामशाहीच्या मनसबदारांस फितवून आपल्याकडे आणण्याचे प्रयत्न मोगल करीतच होते. जाधवरावाचें व भोसल्यांचें रहस्य फारसें कधींच नव्हतें. जिजाबाईचें लग्न सुद्धां एक प्रकारचा जुलमाचा रामराम होता. लग्नानंतरच्या पंधरा वर्षांत मालोजीची व शहाजीची उत्तरोत्तर भरभराट होऊन, निजामशाहींत त्याचें वजन वाढलें; जाधवरावाच्या अंगीं ती मुत्सद्देगिरी नसल्यामुळें त्याचें वजन अर्थात् कमी झालें. ह्याचा परिणाम असा झाला कीं, मोगलांकडील राजकारण येतांच जाधवराव त्यांस जाऊन मिळाला. लगेच त्यास व त्याचे आप्तांस मोगलांकडून मोठमोठ्या मनसबी मिळाल्या, ( स. १६२१ ). येणेंकरून शहाजीचें व जाधवरावाचें चांगलेंच वांकडें आलें आणि दरबारांत दुफळी झाली. मलिकंबर व शहाजी यांचेंही बिनसलें असावें असें दिसतें. मूर्तुजा निजामशहाची आई कर्तृत्ववान् होती, आणि तिचा विश्वास शहाजीवर विशेष होता. त्यास साबाजी अनंत ह्याची आणखी मदत होती. साबाजी अनंतच्या मदतीनें मूर्तुजा व त्याची आई यांस आपल्या तंत्रांत घेऊन शहाजीनें निजामशाहीचा कारभार आटोपिला. राजधानीवर मोगल चालून आले, तेव्हां त्यांजपुढें निभाव लागत नाहीं असें पाहून, शहाजी, निजामशहा व त्याची आई यांस घेऊन, कल्याणनजीक माहुलीच्या किल्ल्यांत गेला. हा किल्ला कासारा घाटांत शहापूर स्टेशनाजवळ आहे. पूर्वी बापाच्या विरुद्ध बंड करून शहाजहान दक्षिणेंत आला, तेव्हां त्यानें आपली बायका मुलें व संपत्ति गोपाळदास नामक एका विश्वासू रजपुताच्या स्वाधीन करून ह्या माहुली किल्यावर ठेविली होती. शहाजहान बादशहा झाल्यावर त्यानें गोपाळदासाचा मुलगा मनोहरदास ह्यास माहुलीचा किल्लेदार नेमिलें. ( R. A. S Journal, March 1915. ) ह्या किल्ल्यांत सर्व सामान भरून शहाजी तेथून राज्याचा कारभार करूं लागला. जाधवराव मोगलांच्या तर्फेनें शहाजीशीं लढतच होता. निजामशहास ताब्यांत घेण्यासाठीं जाधवरावानें माहुली किल्ल्यास वेढा घातला. हा वेढा सहा महिने चालला. शहाजीनें मोगलांची रसद वगैरे मारून त्यांस पुष्कळ हैराण केलें. अशा स्थितींत मूर्तुजाचे आईनें विरुद्ध पक्षाशीं मिलाफ केल्यामुळें शहाजीस ह्या भानगडींचा वीट आला.

तेव्हां आपला भाऊ शरीफजी यास मूर्तुजाजवळ ठेवून कांहीं विश्वासू लोकांसह शहाजी माहुली सोडून स. १६२७ त विजापुराकडे वळला. बरोबर त्याची बायको जिजाबाईही होती. तिला कांहीं महिने गेलेले असून घोड्यावरून नवऱ्याबरोबर पळवेना. तेव्हां शहाजीनें तिला जुन्नरास श्रीनिवासराव म्हणून एक निजामशाहीचा अंमलदार स्वतंत्र कारभार करूं लागला होता, त्याजकडे ठेवून दिलें; आणि आपण तसाच पळत फलटणच्या बाजूस गेला. फलटणास निंबाळकरांची मदत शहाजीस मिळणार असें दिसून आल्यावरून जाधवरावानें त्याचा पाठलाग सोडून दिला. जिजाबाई शिवनेरी किल्ल्यावर राहिली. हा किल्ला व जुन्नरप्रांत शहाजीच्या जहागिरीपैकींच होता. तेथें जिजाबाई पुढें पांच सहा वर्षे राहिली.

इकडे ह्या भानगडी चालू असतां मलिकंबर सन १६२६त मरण पावला, आणि त्याचा मुलगा फत्तेखान ह्याचें वजन कारभारांत सुरू झालें. फत्तेखान मोगलांस सामील आहे असें वाटल्यावरून शहानें त्यास कैदेंत टाकिलें. कैदेंतून सुटून फत्तेखानानें मूर्तुजा निजामशहाचे गळयास फांस लावून ठार मारिलें, आणि हुसेन नांवाचा त्याचा मुलगा गादीवर बसवून आपण सर्व कारभार पाहूं लागला, ( १६२६ ).

शहाजीनें निंबाळकर वगैरे मंडळीच्या साह्यानें आदिलशाहींत अगोदरपासूनच चांगलें संधान जमवून ठेविलें होतें. तेथील कारभारी मुरार जगदेव व सेनापति रणदुल्लाखान यांची इच्छा शहाजीस मदत देऊन निजामशाही तारण्याची होती. निदान शहाजीच्या मदतीनें निजामशाहीचा साधेल तितका प्रदेश काबीज करावा असा आदिलशहाचा विचार होता.

स. १६२३ त ( शके १५४५ ) शहाजीस पहिला मुलगा दौलताबाद येथें झाला. त्याचें नांव संभाजी. जाधवराव व शहाजी यांचें वैमनस्य असल्यामुळें प्रथमपासूनच जिजाबाईवर शहाजीची विशेष प्रीति नव्हती. तशांत जाधवराव मोगलांस मिळाल्यामुळें दरबारांत दुफळी होऊन शहाजी चाकण प्रांतीं आपल्या जहागिरीवर राहत असे. फलटणकडे पळून जात असतां जिजाबाई गरोदर होती तीस पळतां येईना. सबब तिला रस्त्यांत टाकून शहाजी पुढें गेला. तेव्हां जिजाबाई बापास सांपडली. पण ती प्रसूतीकरितां माहेरीं गेली नाहीं. जाधवरावानें तीस शिवनेरीच्या किल्ल्या-

वर पोंचविलें. तेथें स. १६२७ च्या वैशाखमासीं ती प्रसूत होऊन मुलगा झाला, तोच मराठी राज्यसंस्थापक छत्रपति शिवाजी होय.

स. १६२७ हें साल महत्त्वाचें आहे. शिवाजी जन्मला, दिल्लीस जहांगीर बादशहा मरण पावला आणि त्याचा पराक्रमी पुत्र शहाजहान तख्तनशीन झाला. थोडेच दिवसांपूर्वी विजारपुचा इब्राहिम आदिलशहा मरण पावला होता, आणि निजामशाहीचा आधारस्तंभ मलिकंबरही त्याच सुमारास मरण पावल्यामुळें तें राज्य बुडविण्याचे शहाजहानचे मनोरथ चालले होते. दौलताबादेस नवीन शहा गादीवर येऊन लखुजी जाधवराव त्यास शरण गेला. परंतु हा बलिष्ठ सरदार पूर्वी धन्याच्या विरुद्ध मोगलांस मिळाला होता, ही गोष्ट प्रसिद्ध होती. त्यानें युक्तीनें जाधवरावास दौलताबादचे किल्ल्यांत आणून त्यास व त्याचा मुलगा अचलोजी यांस विश्वासघातानें ठार मारिलें, ( १६२९ ). ह्या कृत्यानें मराठे सरदारांचीं मनें हुसेन निजामशहाविरुद्ध बिथरून गेलीं. इकडे शहाजीचें मात्र चांगलें फावलें. तो भराभर सांपडेल तितका डोंगरी मुलूख हस्तगत करून आपली बळकटी करूं लागला.

सन १६२८ त खानजहान लोदी शहाजहानविरुद्ध बंड करून दक्षिणेंत आला. ( मु. रि. पृ. ६२८ ). निजामशाहींतील मोठमोठ्या सरदारांचें व लोदीचें मूळपासून सख्य होतें. तेव्हां लोदीचा बंदोबस्त करून निजामशाही जिंकणें हीं दोन कामें एकाच तडाख्यानें सिद्धीस नेण्याकरितां स्वतः शहाजहान दक्षिणेंत आला. खानजहान लोदी यास शहाजीचा चांगला आश्रय होता. त्याच संधीस लखुजी जाधवराव यास निजामशहानें ठार मारिल्यामुळें त्याची बायको आपली फौज घेऊन सिंदखेडास गेली, आणि तेथून आपला दीर जगदेवराव जाधव यासह शहाजहान बादशहास जाऊन भेटली. बादशहानें लखुजी जाधवाची पांच हजारांची मनसब जगदेवरावाकडे चालू केली. तेव्हांपासून जाधवांनीं मोगलांच्या नोकरींत अंतर केलें नाहीं.

लोदीच्या पक्षाकडील एकएक मराठा सरदार फोडण्याचा शहाजहानचा क्रम चालू होता. जाधवाचें उदाहरण पाहून व खानजहान लोदीचा पक्ष पडता पाहून शहाजी बादशहास शरण गेला, आणि आपलें दोन हजारांचें पथक बरोबर घेऊन तो शहाजहानास भेटला, ( सन १६२९ ).

बादशहानें त्यास सहा हजारांची मनसब दिली, व निजामशाहींतील जहा-गीर त्याजकडे कायम केली. याच वेळेस अहंमदनगरही शहाजीस मिळालें असावें. कारण शिवाजीनें पुढें त्यावर आपला हक्क सांगितला होता. विठोजीचा मुलगा खेळोजी व दुसरे कित्येक मराठे सरदार यांसही शहाजहाननें या प्रसंगीं नेमणुका करून दिल्या. ह्याप्रमाणें मुख्य मुख्य सरदार लोदीच्या कटांतून फोडिल्यावर शहाजहाननें लोदीचा बंदोबस्त करून निजामशाहीकडे दृष्टि फिरविली. मलिकंबराचा पुत्र फत्तेखान हा वजीर होता. त्याला वश करून घेण्याकरितां मोगलांनीं त्यास कांहीं जहागीर दिली; तींत पूर्वीं शहाजीस दिलेले पुणें व सुपें हे प्रांत त्यांनीं फत्तेखानास दिले. याबद्दल वैषम्य वाटून विजापुरचा दिवाण मुरारपंत याचे मार्फत आदिलशहापासून मोठी फौज घेऊन शहाजी पुनरपि मोग-लांशीं लढण्यास आला. फत्तेखानासही त्यानें आपल्या पक्षाकडे वळविलें. इकडे स. १६३० त दक्षिणेंत भयंकर दुष्काळ पडला. लोकांनीं निवडुंगें खाऊन प्राण रक्षण केले. ( Gribble's History of the Deccan ). तेव्हां निजामशाही जिंकण्याचें काम महाबतखानावर सोंपवून शहाजहान राजधानीस परत गेला. महाबतखानानें शहाजी वगैरे निजामशाहीच्या तर्फेनें झगडणाऱ्या लोकांचा पराभव करून दौलताबादचा किल्ला काबीज केला, ( १३ जून स. १६३३ ), निजामशहा व फत्तेखान यांस कैद करून ग्वाल्हेरच्या किल्ल्यांत पाठविलें, आणि निजामशाहीचा सर्व प्रांत मोगल सत्तेखालीं आणिला. ह्या कामीं जगदेवराव जाधव मोगलांच्या तर्फेनें शहाजीबरोबर लढत होता. यानंतर मोगलांनीं विजापुरकरांशीं युद्ध चालविलें, पण त्यांत त्यांस यश आलें नाहीं. परिंड्याच्या लढाईत मोगलांचा पराभव होऊन ते बऱ्हाणपुरास परत गेले. ही संधि साधून शहाजीनें निजामशाहीचा पुनः उद्धार करण्याची जबरदस्त खटपट केली. ह्या वेळीं या पुरुषानें जें आचरण केलें, जीं धोरणें बांधिलीं, व जी शिताफी दाखविली, तीच त्याचा अल्पवयी मुलगा शिवाजी यास किंत्ता होऊन त्यापासून मराठशाहीची संस्थापना करण्याची त्यास शक्ति आली. ह्या प्रसंगीं जें कर्तृत्व शहाजीनें प्रगट केलें, त्यावरून 'मनांत आणील त्यास राज्यपदावर बसविणारा' ( किंगमेकर ) अशी त्याची कीर्ति पस-रली. आजपर्यंतचा चरित्रक्रम पाहिला असतां, जो पक्ष त्यानें उचलिला,

त्याची कामगिरी त्यानें मोठ्या उत्साहानें बजाविली होती. निजामशाही-खालीं मोडत असलेला पश्चिमेकडील सर्व प्रदेश काबीज करून डोंगरी किल्ल्यांच्या आश्रयानें मोगलांशीं टक्कर देण्याची त्यानें कडेकोट तयारी केली, व निजामशाहीच्या तख्तावर पुर्वीच्या वंशांतील एका मुलास बसवून अनेक मुत्सद्यांच्या मदतीनें त्यानें निजामशाहीचा अंमल पुर्ववत् चालू केला. ह्या कामीं आदिलशहाचा दिवाण मुरारपंत व सेनापति रण-दुल्लाखान यांची शहाजीस मदत होती.

लखुजीचा भाऊ जगदेवराव आपल्या जहागिरीवर होता. त्या वेळीं तो मोगलांचा अंकित असल्यामुळें शहाजीशीं त्याचा बेबनाव होता. जाधवांच्या ह्या कटकटीमुळें शहाजीला गृहसौख्य नव्हतें. शिवाय त्याला विजापुरीं संधान ठेवावयाचें असल्यामुळें विजापुरचे सरदार त्यास अनुकूळ ठेवावयाचे होते. सुपें येथें बाजी मोहिते पोगरवाडीकर हा विजापुरचा एकनिष्ठ सरदार होता. त्याची बहीण तुकाबाई इच्याशीं शहाजीनें १६३०त दुसरें लग्न केलें, तें जिजाबाईस अर्थात् आवडलें नाहीं. ती आपल्या मुलास घेऊन माहेरीं आईजवळ राहत असतां, ( १६३४(?)) शहाजीचा अपमान करण्याकरितां मोगलांनीं तिला व तिचे मुलास पकडिलें होतें. परंतु ' शहाजीचें व तिचें पटत नाहीं, शहाजीनें दुसरी बायको केली आहे, म्हणून जिजाबाईस कैद केल्यानें शहाजीस उलटें बरें वाटून जाधवांचाच अपमान केलासें होईल, ' अशी समजूत घालून जगदेवरावानें जिजाबाईची मोगलांच्या हातून सुटका केली. असा मजकूर बखरींत आहे.

शहाजहानची पाठ वळल्याबरोबर शहाजीनें आपलीं कारस्थानें जोरानें चालू केलीं. महंमद आदिलशाहा निजामशाही बुडविण्याच्या कामास अनुकूल होता. निजामशाहीचा मुलूख आपणास मिळेल ही एक आशा आणि मोगल बादशाहा आपणास बुडविणार ही त्याची खात्री असल्यामुळें, दक्षिणेंतील राज्य होईल तितकें प्रबळ करून, मोगलांस नर्मदेवर अडवून धरावें, असाही सर्व दक्षिणी मुत्सद्यांचा यत्न होता. अशा हेतूनें निजाम-शाहीच्या नोकरांस आदिलशहानें अंतस्थ रीतीनें हाताशीं धरिलें; आणि त्यांजकडून मोगलांशीं युद्ध चालविलें. मुरारजगदेव व कदमराव हे दोन आदिलशहाचे सरदार शहाजीस अनुकूळ होते. कारण आज निजामशाही बुडविल्यावर उद्यां मोगलांची फौज विजापुरवर चालून येईल, अशी त्यांस

भीति होती. म्हणून महाबतखानानें निजामशाही बुडवून त्यांतील कांहींच भाग आदिलशहास दिला नाहीं तेव्हां, ही मंडळी शहाजीच्या उद्योगास पाठबळ देऊं लागली. शहाजीनें एक नवीन राजपुत्र निजामशाहीवर स्थापून मोगलांशीं युद्ध चालविलें; आणि आदिलशहानें त्यास मदत पाठविली. मुरार जगदेव फौजेसह येऊन शहाजीस मिळाला. हे दोघे दौलताबादेवर चालून येत असतां, कोरेगांव नजीक तुळापुरीं ता २१ सेप्टेंबर स. १६३३ रोजीं सूर्यग्रहण* पडलें, त्याचा उल्लेख बखरींत आहे. ह्या खटपटींत शहाजीस बरेंच यश आलें. औरंगाबादपासून दक्षिणचे बहुतेक प्रांत त्यानें जिंकून निजामशाही पुनः उभी केली. श्रीनिवासराव वगैरे जे कित्येक इसम स्वतंत्रपणें पुंडाई करीत होते, त्यांस त्यानें जिंकिलें. श्रीनिवासरावाला पकडण्याच्या वेळीं जिजाबाईला अपाय होऊं नये, म्हणून तिला व शिवाजीला शहाजीनें शिवनेरीहून काढून गांडापुर-पुणतांब्यानजीक-वैजापुर येथें थोडे दिवस नेऊन ठेविलें होतें, ( स. १६३४). ह्याप्रमाणें शहाजीनें मोगलांशीं युद्ध चालविलें. समोरासमोर लढाई न करिता डोंगराळ प्रदेशाच्या आश्रयानें शहाजीच्या चपळ घोडेस्वारांनीं आज सुमारें दहावर्षें मोगलांच्या फौजेस अगदीं हैराण करून सोडिलें, ह्या गोष्टीनें शहाजहान अगदीं चिडून गेला. त्यास असें आढळून आलें कीं, विजापुर व गोवळकोंडा ह्यांजकडून शहाजीस मदत होत आहे. तेव्हां प्रथम ह्या दोन राज्यांचा बंदोबस्त झाल्याशिवाय शहाजीचें बंड मोडणें शक्य नाहीं. ह्यास्तव प्रथम त्यानें दक्षिणच्या सर्व प्रांताचा एक सुभा खानदेश म्हणून होता, तो तोडून दौलताबाद व नगर हे भाग निराळे पाडिले, ( स. १६३४ ).

---

* **तुळापुर**—सन १६३३ त मुरारजगदेव व शहाजी यांनीं मोगलांवर दौलताबादेकडे स्वारी केली. त्या स्वारींत कोरेगांव नजीक तुळापुरीं सोमवार तारीख २३ सेप्टेंबर रोजीं सूर्यग्रहण पडलें. त्या वेळीं मुरारजगदेवानें तो गांव सोळा ब्राह्मणांस अग्रहार दिला. पूर्वीं गांवाचें नांव नागरगांव असें असून त्यासच ह्या सूर्यग्रहणप्रसंगीं तुळापुर ही संज्ञा मिळाली. हत्तीची तुळा केल्यावरून औरंगजेबानें त्यास तुळापुर हें नांव दिलें, ही गोष्ट खरी नाहीं. हा प्रकार शहाजीचाच असला पाहिजे. येथेंच छत्रपति संभाजी याचा वध झाला, त्याची समाधि जीर्ण स्थितींत आहे. ( भा. इ. सं. म. वृ. १८३४-६९. )

स. १६३५ त मोगल फौजेनें शहाजीचा पाठलाग केला, पण तो हातीं आला नाहीं, तेव्हां बादशहा स्वतः तावडतोबीनें दौलताबादेस आला ( फेब्रुवारी २२, स. १६३६ ). खान डौरान, खानजमान, शाएस्तेखान वगैरे नामांकित सरदारांच्या हाताखालीं त्यानें आपल्या फौजेचे चार मोठे भाग केले; आणि जरूर पडल्यास विजापुर गोवलकोंड्यावर चालून जाण्याची तयारी केली. अशी कडेकोट तयारी केल्यावर नासिक जुन्नरकडील शहाजीचे किल्ले काबीज करण्यासाठीं त्यानें शाएस्तेखानास रवाना केलें. ही तयारी पाहून अब्दुल्ला कुत्बशहा एकदम बावरून शरण आला, आणि दरसाल खंडणी देण्याचें कबूल करून त्यानें मोगलांची ताबेदारी पत्करिली, ( एप्रिल, स. १६३६ ). आदिलशहानें असा भित्रपणा दाखविला नाहीं. तो लढण्यास सिद्ध झाला. तेव्हां बादशहानें तीन बाजूंनीं विजापुरवर एकदम फौज रवाना केली. ह्या फौजेनें भयंकर प्रळय उडवून दिला. आदिलशहानें निकराचा सामना केला. शहापुरचा तलाव फोडून विजापुरच्या सभोंवारचा प्रदेश त्यानें जलमय करून सोडिला. मोगल फौजा निरुपाय होऊन परत आल्या.

इकडे शहाजी अगदींच उघडा पडला. त्याचे कित्येक मजबूद किल्ले मोगलांनीं काबीज केले; तेव्हां बादशहास शरण जाऊन आपणास नोकरींत घेण्याविषयीं त्यानें विनंती केली. पूर्वीं एकवार मनसब दिली असतां शहाजीनें आपलें इमान पाळिलें नाहीं, म्हणून 'आमचे राज्यांत तुम्हांस ठेवितां येत नाहीं. आदिलशाहींत तुम्ही राहाल तर आमची हरकत नाहीं,' असा जबाब शहाजीस मिळाला. त्याप्रमाणें मुरारजगदेव व रणदुल्लाखान ह्यांचे शिफारसीवरून शहाजीस विजापुरचे दरबारीं जहागीर मिळाली. ह्या वाटाघाटी होऊन शहाजहान व महंमद आदिलशहा यांचा निजामशाही वांटून घेण्याचा तह ठरला. अशा रीतीनें निकरावर न येतां, शहाजहाननें हें प्रकरण संपविलें. ह्या तहाचीं कलमें येणेंप्रमाणें:—

२. निजामशाहीची वांटणी व शहाजीचा डाव.—( १ ) आदिलशहानें शहाजहानचें वर्चस्व व इतःपर त्याचे हुकूम पाळण्याचें कबूल करावें. ( २ ) निजामशाहीचें राज्य संपलें असें कबूल करावें. त्याचे प्रांत उभयतांनीं वांटून घ्यावे, आणि मोगली मुलखास व अधिकाऱ्यांस आदिलशहानें कोणताही उपसर्ग देऊं नये. ( ३ ) सोलापुर

वांगी, परिंडा, भालकी, चिद्गुपा आणि पुणें चाकण सुद्धां निजामशाहीचा कोंकणचा भाग, म्हणजे एकंदर ८० लाख उत्पन्नाचे पन्नास परगणे, आदिशहानें घ्यावे. बाकीचा निजामशाहीचा प्रदेश मोगल बादशाहींत सामील व्हावा. आदिलशहानें बादशहास नजराणा म्हणून २० लाख रुपये द्यावें. ( ४ ) कुत्बूशहाच्या मुलुखास आदिलशहानें त्रास देऊं नये. ( ५ ) कोणीही एकमेकांच्या नोकरांस फितवूं नये, किंवा आश्रय देऊं नये. ( ६ ) शहाजी भोसले, जुन्नर, त्रिंबक व दुसरे कांहीं किल्ले बळकावून बसला आहे, ते तो सोडून मोगलांचे स्वाधीन करीपर्यंत त्यास आदिलशहानें आश्रय देऊं नये. ता. ६ मे सन १६३६ रोजीं शहाजहाननें समारंभानें हीं तहाचीं कलमें सोन्याच्या पत्र्यावर कोरून आदिलशहाकडे पाठवून दिलीं. ( Prof. Sarkar's Aurangzeb ).

गोवळकोंड्याच्या सुलतानाकडूनही शरण आल्याचीं पत्रें व चाळीस लाख रुपये शहाजहानकडे आले. त्यानें दरसाल चार लाख होन खंडणी देण्याची कबूल केली; पण त्यापैकीं अर्धी बादशहानें त्यांस माफ केली.

अकबराच्या वेळेपासून आज चाळीस वर्षें चाललेला झगडा एकदांचा कायमचा मिटला. मोगल बादशाहीची सरहद्द स्पष्टपणें ठरली गेली, आणि सर्व तक्रारी नाहींशा झाल्या. आतां दक्षिणेंत शांतताभंग होण्याचें कारण काय तें एक शहाजी उरला. निजामशाहीचा एक राजपुत्र घेऊन तो हिंडतच होता. उदगीर व औसा हे दोन किल्ले दुसऱ्या कांहीं बंडखोरांकडून अजून काबीज व्हावयाचे होते. आदिलशहानें बादशहास विनंति केली कीं, ' आपण आतां परत जावें येथें मोठ्या फौजा घेऊन राहिल्यानें लोकांचे शेतीधंदे चालत नाहींत. शहाजीच्या हातांत पांच किल्ले आहेत, ते आम्हीच लवकर काबीज करून तुमचे हवालीं करितों. ' ही विनंति मान्य करून ता. ११ जुलै १६३६ रोजीं शहाजहान दौलताबाद सोडून मांडवगडाकडे गेला. नंतर तिसऱ्याच दिवशीं त्यानें औरंजेबाची नेमणूक दक्षिणच्या सुभेदारीवर केली. त्यावरून इकडील कारभाराचें जोखीम बादशहास किती वाटत होतें हें कळून येतें.

मोगलांच्या प्रदेशांत त्या वेळीं हे प्रांत होते. खानदेश, राजधानी बऱ्हाणपुर, अशीरगड; वऱ्हाड, लष्करी ठाणें एलिचपुर, गावीलगड; तेलंगण; दौलताबाद अहंमदनगर हा दक्षिणचा मुख्य व महत्त्वाचा जिल्हा, राजधानी खडकी—

ज्याला ह्याच वेळीं औरंगाबाद असें नांव मिळालें, लष्करचें ठाणें किल्ला दौलताबाद. ह्या सुभ्याची पश्चिम हद्द विसापुर जुन्नर वरून सह्याद्रीस भिडली होती, दक्षिण हद्द घोडनदी. ह्या चार जिल्ह्यांत ६४ किल्ले असून, वसूल चार कोट रुपये होता. एवढ्यांत औरंगजेबानें सर्व खर्च मागवावा, अशी बादशहाची आज्ञा होती. वरच्यांपैकीं अद्यापि ५३ किल्ले जिंकावयाचे होते; आणि सर्व मनसबदारांनीं आपापल्या फौजा घेऊन औरंगजेबास मिळावें, असे बादशहानें हुकूम पाठविले होते. बेदर जवळचे उदगीर व औसा हे किल्ले काबीज करण्याकरितां शहाजहाननें खानडौरान व शहाजीचे किल्ले घेण्याकरितां खानजमान ह्यांची नेमणूक केली होती. पहिले दोन किल्ले तीन महिन्यांत काबीज झाले.

खानजमानलाही शहाजीवर जय मिळाला. १६३६ च्या तहाअन्वय विजापुर दरबारनें रणदुल्लाखानास खानजमानचे मदतीस पाठविलें. जूनचे अखेरीस ही फौज जुन्नरवर आली. शिवनेरीस वेढा घालून, स्वत: खानजमान पुण्यांतील शहाजीच्या वाड्यावर चालून आला. पावसामुळें त्याला घोडनदीवर एक महिना उतार मिळाला नाहीं. तेथून तो लोहगांवास पोंचला. इकडे शहाजी पुणें सोडून कोंडाणा तोरणा किल्ल्यांकडे पळून गेला. पर्जन्यामुळें मोगलांच्या हातून शहाजीचा पाठलाग झाला नाहीं. तो कुंभार्लीघाटानें कोंकणांत उतरला, पण दंडाराजपुरीस त्यास आश्रय मिळाला नाहीं. मोगल त्याचे पाठीवर कोंकणांत उतरले. तेव्हां परत कुंभार्लीघाटानें वर चढून तो कल्याण नजीक माहुलीच्या किल्ल्यांत गेला. त्याचे मागोमाग खानही आला. तेव्हां शहाजी माहुली सोडून मनरंजनवर गेला. तेथें मोगल फौज चिखलांतून दौडत आली. मराठे आपलें जड सामान टाकून पळूं लागले. मोगलांची व त्यांची थोडीशी हातघाई झाली. तरी शहाजी निसटून गेला. मोगलांचे घोडे थकून पाय उचलीतना. निजामशहाची छत्री, नौबत, पालखी वगैरे सामान व घोडे उंट वगैरे जनावरें मोगलांनीं पकडलीं. शहाजी पळून पुन: माहुलीवर गेला; व किल्ला लढविण्याच्या उद्योगास लागला. खानजमान चिखलांतून व जंगलांतून तसाच चेपीत आला, आणि किल्ल्याचे दरवाजे पकडून बसला. तेव्हां शहाजीनें तहाचें बोलणें लाविलें. त्यानें नामधारी निजामशहा व शिवनेर वगैरे सहा किल्ले खानाचे स्वाधीन केले; आणि आपण विजापुरच्या नोकरींत राहाण्याचें

ठरवून घेतलें. स. १६३६ च्या ऑक्टोबर पर्यंत हा प्रकार घडून खानजमान दौलताबादेस आला. दुसरा सरदार खानडौरान आणखी विजय संपादून आग्र्यास गेला. एक वर्षाच्या त्या स्वारींत दोन कोट रुपये नक्त व एक कोटी वसुलाचा प्रदेश इतकी प्राप्ति बादशहास झाली. शहाजहाननें इराणच्या शहाकडे वकील पाठवून हे आपले विजय मोठ्या फुशारकीनें जाहीर केले (स. १६३७). इकडे बागलाण प्रांत साल्हेरमुल्हेरच्या राठोड राजाच्या ताब्यांत स्वतंत्र होता. तो औरंगजेबानें जिंकिला, तेणें करून दाक्षिणेंतून गुजराथेंत उतरण्याचा मार्ग मोकळा झाला. ता. १६ जुलै स. १६३६ पासून मे २८, १६४४ पावेतों औरंगजेब दाक्षिणेच्या कारभारावर होता. त्या आठ वर्षांत तो फक्त चारदां हिंदुस्थानांत जाऊन बापास भेटला.

शहाजीचा चुलतभाऊ खेळोजी हाही शहाजीसारखाच वागत होता. त्यास निजामशाहींतून मनसब होती. सन १६२९ त तो आपले दोन भाऊ मालोजी व परसोजी ह्यांस घेऊन शहाजहानास मिळाला. तेथें त्यास पांचहजाराची मनसब मिळाली. स. १६३१ त निजामशाहीची राजधानी दौलताबाद मोगल काबीज करूं लागले, तेव्हां खेळोजी मोगलांस सोडून आदिलशाहाच्या नोकरींत राहिला. तेथून मोगल फौजेशीं लढतांना खेळोजीची बायको गोदावरीवर स्नानास जात असतां मोगलांनीं पकडली; तिला चारलाख दंड भरून खेळोजीनें सोडवून आणिली. विजापुरशीं शहाजहानचा तह झाल्यावर आदिलशहानें खेळोजीस नोकरींतून काढून दिलें. तेव्हां तो मूळ पाटिलकीच्या गांवीं वेरुळास येऊन तेथून मोगलांच्या प्रदेशांत लुटालूट करूं लागला. औरंगजेबानें त्याची राहण्याची गुप्त जागा शोधून काढिली; आणि ऑक्टोबर १६३९ त त्यास युक्तीनें पकडून ठार मारिलें.

सारांश, स. १६३७त शहाजीचा पहिला आयुःक्रमसंपला मलिकंबरच्या मृत्यूपासून पुढें दहा वर्षे निजामशाहीच्या तर्फेनें जीं साहसें व कारस्थानें त्यानें केलीं, तींच पुढें त्याच्या मुलास कशीं मार्गदर्शी झालीं हें वरील तपशीलवार हकीकतीवरून कळून येईल. या अवधींत त्यानें तीन राज्यांशीं कारस्थानें व सामने केले, आणि दहा वर्षे पर्यंत एकासही दाद न देतां, तीव्र वेगानें सारखा पळत राहून, बहुतेक स्वतंत्रतेनेंच सर्व कारभार केला.

स्वतःशहाजहान बादशहा तडकाफडकीनें त्याच्या छातीवरच येऊन बसला, तेव्हां त्याचा नाइलाज होऊन, त्यास आपला क्रम बदलावा लागला. नाहीं तर शिवाजीचा पुढील उद्योग शहाजीनेंच कदाचित् सिद्धीस नेला असता. शहाजहाननें सुद्धां त्याचें वजन व करामत ओळखून त्यास ज्यास्त त्रास न देतां, आदिलशाहींत राहूं देऊन प्रकरण मिटाविलें. दहा वर्षांच्या ह्या खटाटोपांत दक्षिणच्या सर्व मुत्सद्यांस त्याची करामत ठाऊक झाली. तसेंच तो भली मोठी फौज बाळगून होता. द्रव्यसंचयही त्यानें चांगला केलेला होता. तो मुत्सद्दी, धोरणी व लिहितां वाचतां येणारा होता. त्याला व्यसन वगैरे कांहीं नव्हतें. अर्थात् शिवाजीच्या राज्यस्थापनेचा आरंभ शहाजी-कडूनच वास्तविक झाला हें वरील हकीकतीवरून उघड दिसतें.

निजामशाहींतून पुणें व सुपें या प्रांतांची जहागीर शहाजीकडे चालू होती, तीच आदिलशहानें त्याजकडे कायम केली; व नवीन मिळालेल्या प्रांताची व्यवस्था लावण्याकरितां मुरार जगदेव याच्या मदतीस त्यानें शहाजीस दिलें. त्या प्रांताची शहाजी यास चांगली माहिती असल्या-कारणानें त्यानें हें काम उत्कृष्ट रीतीनें बजाविलें. त्याबद्दल मुरारपंतानें शहाजवळ त्याची तारीफ करून कर्नाटक प्रांतांत रणदुल्लाखान याचे हाता-खालीं शहाजीस दुय्यम नेमाविलें. रणदुल्लाखानानें ही स्वारी स. १६३८–३९त श्रीरंगपट्टणवर केली, तींत कावेरीच्या उत्तरेकडील सर्व प्रदेश त्यानें जिंकिला ( कृष्णस्वामी ऐयंगार–प्राचीन हिंदु० पृ. २९३ ). ही मोहीम शहाजीनें उत्तम रीतीनें फत्ते केल्यावरून सुलतानानें त्यास कर्नाटकांत कोल्हार, बंगलूर, उसकोटा, बालापुर, व शिरें असे पांच प्रांत जहागीर देऊन, शिवाय कऱ्हाड प्रांतांतील बावीस गांवची देशमुखी व इंदापुर बारा-मती व मावळांतील कांहीं भाग यांची जहागीर दिली. विजापुरीं रणदुल्लाखान व मुरारपंत यांजबरोबर शहाजीचें नेहमीं सख्य असे. पुढें शिवाजी पुंडाई करूं लागला, तेव्हां शहाजीस कैद केलें असतां, त्याजला शहानें ठार मारिलें नाहीं किंवा हाल केले नाहींत, याचें कारण ह्या दोन सरदाराची मध्यस्थी होय, असें लिहिलेलें आहे. एकंदरींत विजापुरच्या दरबारीं शहा-जीची छाप उत्तम प्रकारची बसली असून त्याचे साह्यकर्ते पुष्कळ होते. तथापि शहाजीचा उत्कर्ष सहन न होणारे घोरपडे वगैरे कित्येक मराठे सरदार विजापुरीं होते. हुषारी व पराक्रम हे त्याचे गुण निजामशाहींत

जसे जाधवांच्या द्वेषास कारण झाले, तसेच ते विजापुरासही कांहीं मंडळींस खपले नाहींत. सैन्यबल व द्रव्यबल असल्यामुळें तो यशस्वीच झाला.

स. १६३८ नंतर दोन तीन वर्षांनीं रणदुल्लाखान दरबारीं परत आल्यावर शहाजी हाच कर्नाटकांत विजापुरचा मुख्य अंमलदार होता. आरंभीं तो बंगलोर येथें राहत असे; कांहीं दिवसांनीं कोलार येथें तो राहूं लागला. दक्षिणी ब्राह्मण मद्रास इलाख्यांत प्रथमत: याच वेळेस शहाजीनें नेले. नवीन जिंकलेल्या मुलखांत शहाजीला महाराष्ट्रांतल्याप्रमाणें वसुलाची वगैरे पद्धत स्थापन करावयाची होती; तसेंच जिकडे तिकडे अंदाधुंदी माजली होती ती मोडून, पूर्वी चालत आलेले गैर प्रकार बंद करावयाचे होते. या कामासाठीं हुशार व स्वत:च्या भरंवशाचे कांहीं ब्राह्मण वगैरे लोक शहाजीनें तिकडे नेले. देशमुख, देशपांडे, कुळकर्णी, शिरस्तेदार वगैरे नांवें कर्नाटक प्रांतांत सुरू झालीं, तीं या वेळेस होत. कर्नाटकांत स्वतंत्र राज्यस्थापना करावी असें त्याचे मनांत होतें. ह्या कारणास्तव तिकडील हिंदु लोकांस त्यानें फार ममतेनें वागविलें. धनसंचय तर तो करीतच होता. तो करतांना रयतेस तो दुखवीत नसे. वसुलाची ठरीव रक्कम विजापुरास पाठवून बाकीच्या वसुलानें प्रसंगीं उपयोगी पडणारा धनसंचय तो करूं लागला. पुण्याच्या जहागिरीवर त्याची विशेष भक्ति होती. स्वत: कर्नाटकांत गेल्यावर पुण्याच्या जहागिरीची व्यवस्था त्यानें दादाजी कोंडदेव याजकडे सोंपविली.

**३. बालपण व मातु:श्रीचा सहवास.**—शालिवाहन शक १५४९, प्रभव संवत्सर, वैशाख शुद्ध पंचमी, रोहिणी नक्षत्र, ( ता. १० एप्रिल, इसवी स. १६२७ ) रोजीं पुण्याच्या उत्तरेस सुमारें पन्नास मैलांवर जुन्नरचा किल्ला शिवनेरी येथें मराठी राज्याचा संस्थापक छत्रपति शिवाजी भोसले याचा जन्म झाला. त्या वेळीं शहाजी शिवनेरीस नव्हता. जाधवरावाची फौज पाठीस लागल्यामुळें शहाजी बायकोसह पळत असतां जिजाबाईच्यानें घोड्यावरून पळवेना असें पाहून, शहाजीनें शिवनेरी पर्यंत रवानगी करून दिली. बरोबर नारो त्रिंबक हणमंते, गोमाजी नाईक पाणसंबळ वगैरे मंडळी जिजाबाईच्या माहेरकडून तिच्या तैनातीस होती. गोमाजी नाईक हा जिजाबाईच्या लग्नापासूनच बापानें तिच्या तैनातीस आपला मनुष्य म्हणून दिलेला होता. गर्भांत पडलेले संस्कार पुढें कृतींत

उतरतात, हा सामान्य सिद्धान्त शिवाजीच्या उदाहरणावरून ठरवितां येण्यासारखा आहे. जिजाबाईचा स्वभाव मानी व निग्रही होता. नवऱ्याची तिजवर अप्रीति असूनही ती माहेरच्या मंडळींवर अवलंबून राहिली नाहीं. आपणास मुलगा व्हावा म्हणून तिनें किल्ल्यांतील शिवाई देवीस नवस केला होता, आणि देवीच्याच नांवावरून तिनें मुलानें नांव ठेविलें. तिचा पहिला मुलगा संभाजी बापाबरोबर होता; आणि हल्लीं तिला नवऱ्यानें टाकिल्यामुळें तिची स्थिति निराधार होती. मुलगा झाल्यामुळें जिजाबाईच्या मानी स्वभावास पुष्टि येऊन, तिनें त्याचें संगोपन मोठ्या काळजीने केलें. १६३० त शहाजीनें मोहित्यांची कन्या तुकाबाई इज-बरोबर दुसरें लग्न केलें. ह्या स्त्रीपासून स. १६३१ त शहाजीस मुलगा झाला तो व्यंकोजी होय. संभाजी व व्यंकोजी हे शहाजीचे लाडके असून त्याजवळच असत. पुणें सोडल्यावर जिजाबाईची व शहाजीची गांठ क्वचित् कधीं कारणपरत्वें पडत असे.

लहानपणापासून शिवाजीस आईचा लळा विशेष होता. राजदरबारच्या दिखाऊ डामडौलाचा शिवाजीस वारा लागलेला नसून त्याचा लहानपणचा काळ खेडेगांवच्या जंगलांत व उन्हातान्हांत गेला. यावरून शिवाजीचा जन्म व पराक्रमी मोगल बादशहा अकबर याचा जन्म, यांत एक प्रकारचें विलक्षण साम्य आहे. दोघांचाही जन्म, पिता देशोधडीस लागला असतां, वनवासांत अनुक्रमें शिवनेरी व उमरकोट किल्ल्यांवर झाला. दोघांसही बाळ-पणीं पितृदर्शन नव्हतें. लहानपणीं संकटें प्राप्त होणें हें भावी उदयाचें एक सबळ कारण आहे असें मानिलें, तर तें या दोन महान् पुरुषांचे ठिकाणीं सारखेंच दिसून येतें. शिवाजीच्या जन्मस्थानीं चांगले ग्रह पडले होते असें म्हणतात.

शिवाजीचें बालपण कसें गेलें हें सामान्यपणें ठरवितां येतें. स. १६२७ पासून ३२–३३ पावेतों शिवाजी शिवनेर जुन्नर येथेंच होता. त्या वेळीं शहाजी निजामशाहीच्या भानगडींत, युद्धांत व कारस्थानांत गुंतलेला होता. स. १६३३-३४ त जिजाबाई मुलासह थोडे दिवस दौलताबादेस जगदेव-राव जाधवाकडे गेली असावी. त्या वेळीं मोगलांनीं तिला व शिवाजीला पकडल्याचा उल्लेख आहे. स. १६३४ त तिला शहाजीनें वैजापुरास थोडे दिवस ठेविलें होतें त्या वेळचाही तो प्रकार असूं शकेल. स १६३५ त

ती नवऱ्याबरोबर माहुली किल्ल्यावर मोगलांच्या वेढ्यांत असली पाहिजे. मोगलांशीं तह होऊन माहुली किल्ला शहाजानें मोगलांस दिल्यावर तो स. १६३६ च्या अखेरीस मुलांमाणसांसह पुण्यास राहण्यास आला. या ठिकाणीं व शिवापुरास, राजगड वगैरे तयार होईपर्यंत, शिवाजीचा तळमुक्काम होता. शिक्षण वगैरे जें काय झालें तें येथें पुण्यास झालें स. १६४० त व पुन: ४२–४३त शिवाजी विजापुरास कांहीं दिवस होता; आणि एकदां कर्नाटकांत बंगलूरकडेही गेला होता.

शिवाजीचें लहानपणचें शिक्षण दोघांच्या हातून तडीस गेलें. एक त्याची आई जिजाबाई, व दुसरा त्याचें संगोपन करण्यासाठीं बापानें नेमिलेला कारभारी दादाजी कोंडदेव. पूर्वीं नारोपंत हणमंते जिजाबाईजवळ होता. परंतु शहाजीस कर्नाटकांत कामगिरी मिळाल्यावर त्यानें नारोपंतास आपल्याबरोबर तिकडे नेलें; आणि दादाजी कोंडदेव म्हणून लहानपणापासून त्याचे नोकरींत एक विश्वासु कारकुन होता, त्यास त्यानें पुण्याच्या जहागिरीवर ठेवून, जिजाबाई व शिवाजी यांस त्याचे स्वाधीन केलें.

जिजाबाईचें पूर्वचरित्र कोणत्या प्रकारचें होतें, हें मागें सांगितलेंच आहे. सांप्रत नवऱ्यानें व बापानें त्याग केल्यामुळें तिच्या नैसर्गिक मानी स्वभावांत निश्चय, धैर्य, साहस इत्यादि गुणांची भर पडली होती. दुसऱ्याच्या तोंडाकडे पाहून दिवस कंठणें त्या मानधन बाईस अत्यंत अयोग्य वाटलें आणि स्वतंत्रतेनें राहतां यावें, म्हणून आपल्या सत्तेच्या जागेंत म्हणजे पुण्याच्या जहागिरींत राहण्याचें तिनें पत्करिलें. अशा स्थितींत तिचा सर्व आधार व प्राणविसावा कायतो शिवाजी होता. तिचा सर्व जीव त्याच्यावर असे. त्याच्याच जिवावर ती आपलें सर्व दैन्य व अपमान भरून काढणार होती. शिवाजीलाही आईवांचून दुसरें कोणी प्रेमाळु नव्हतें. त्याचे सगळे लाड पुरविणारी, त्याचें केवळ दैवत व सर्वस्व, कायती आईच होती. एखादी गोष्ट करण्याची मनांत येऊन तीस आईनें अनुमोदन दिलें, कीं त्यास कृतकृत्य वाटे. आईही तसेंच कांहीं असल्याशिवाय त्याच्या इच्छेआड सहसा येत नसे. राजकीय उलाढाली जिजाबाईनें पाहिल्या होत्या. बापाचीं व नवऱ्याचीं धोरणें तीस माहीत होतीं. त्यांवरून शिवाजीचा लहानपणापासून हूड स्वभाव पाहून, त्याला चांगलें वळण दिलें असतां तो आपलें व सर्व कुळाचें नांव काढील असें तीस

वाटलें. तिनें मागील पूर्वजांच्या शौर्याच्या, वैभवाच्या, कारस्थानांच्या व दंग्याधोप्यांच्या गोष्टी सांगून शिवाजीच्या कोंवळ्या मनांत मोठीं हिंमतीचीं कृत्यें करण्याचा हुरूप आणिला. 'शत्रूंचें पारिपत्य करून कुळाचा उद्धार करणारा शककर्ता आपले कुळांत निपजणार आहे, म्हणून देवीचे दृष्टांत झाले आहेत, परंतु ते केव्हां खरे होतील कोण जाणे!' असे दुःखोद्गार तिनें शिवाजीपाशीं वारंवार काढावे. त्यास कथापुराणें ऐकण्याचा मोठा नाद होता. चिंचवड, देहू, आळंदी इत्यादि ठिकाणीं तो देवदर्शनास वारंवार जात असे. आसपास कोठें कथा असली कीं, तेथें तो धांवत जावयाचाच. लहानपणीं शिवाजीस महाभारत ऐकण्याचा नाद फार होता. पुराणकीर्तनाचाही त्यास विशेष नाद होता. आईच्या सहवासांत त्यास हा नाद लागला असावा. त्या वेळीं रामायण महाभारतांतील अनेक रसाळ प्रसंग लहान मुलांकडून ऐकविण्याचा प्रघात सार्वत्रिक होता. जिजाबाई व दादाजी कोंडदेव ह्यांच्या व्यवस्थेंत ह्या गोष्टीस विशेष प्राधान्य मिळालें. कथापुराणाचें वर्तमान कळल्यास शिवाजी दूर अंतरावरून त्या प्रसंगास मुद्दाम येत असे. किंबहुना, तत्कालीन शिक्षणांत रामायणभारतांसच मुख्य स्थल होतें. संसारांतल्या व व्यवहारांतल्या हरएक प्रसंगीं उपयोगी पडणाऱ्या उत्तमोत्तम कथा व नीतिबोध हे ह्या दोन राष्ट्रीय महाग्रंथांत सर्वत्र भरलेले आहेत. त्यांपासून व्यावहारिक शहाणपण व जोरदार स्फूर्ति ही प्राप्त होतात. महाभारतांतील आवेशयुक्त युद्धवर्णनें ऐकून शिवाजीस स्वराज्यस्थापनेची स्फूर्ति झाली असली पाहिजे. शिवाजीच्या एकंदर चरित्रक्रमावरून त्याच्या मनावर वरील दोन ग्रंथांच्या परिशीलनानें केवढा परिणाम झाला असला पाहिजे ह्याचें अनुमान होतें (चिं. वि. वैद्य). सारांश शिवाजीस आईपासून उत्तम शिक्षण प्राप्त झालें, तसेंच राजकीय व्यवहारांची व तत्कालीन स्थितीचीही तिनें त्यास माहिती करून दिली. स्वतः ती बाई जबरदस्त महत्त्वाकांक्षी असून, स्त्रियांस व पुरुषांस भूषणावह असें शौर्यही तिजमध्यें वसत होतें. तिच्या विपन्नावस्थेंत तीस कोणाचा आधार नसल्यामुळें तिला स्वावलंबन करणें जरूर पडलें. पुराणांतील मर्दुमकीच्या गोष्टी ऐकून आपणास ईश्वरानें कांहीं एक विशिष्ट कामगिरी तडीस नेण्यास नेमिलें आहे, असा शिवाजीचा ग्रह होत चालला. जिजाबाईला लिहितां वाचतां येत असून तिनें

अनेक कारभार स्वतःच्या जबाबदारीवर उरकले होते. कागदपत्रांतून तिचे नांवाचा व कामाचा मधून मधून उल्लेख येतो. जुने कागद थोडेच सांपडत असल्यामुळें असे उल्लेखही थोडेच आहेत, पण ते महत्त्वाचे आहेत. शिवाजीच्या बालपणीं व शहाजी कर्नाटकांत गेल्यावर, सर्व कारभाराची जबाबदारी तिच्यावर होती. दादाजी कोंडदेवाची व तिची नेहमीं एकवाक्यता असे. शिवाजीचें राज्य चालू झाल्यावरही राज्याच्या मसलतींत व महत्वाच्या घडामोडींत तिचें अंग असे. जिजाबाई म्हणजे शिवाजीच्या राज्यांतला एक मोठा आधार होता. तिनें स्वतः अनेक तंट्यांचे आपल्या समोर निवाडे करून निकाल दिलेले कित्येक छापले आहेत; व लोकांना सनदा उत्पन्नें वगैरे करून दिलेलीं आहेत. ( उदाहरणार्थ, खंड १७–२२, खंड १८–११, खं. ८–२० ). समाजसुधारणेच्या कामींही जिजाबाई प्रमुख होती. फलटणचा बजाजी निंबाळकर मुसलमान झाला होता, त्यास स्वधर्मांत परत घेऊन तिनें आपला व्याही केलें. शहाजी मरण पावल्यावर केवळ शिवाजीचे विनवणीवरून तिनें सती जाण्याचें रहित केलें. हरएक प्रसंगीं शिवाजी आईचा आशीर्वाद घेऊन कार्योपक्रम करूं लागे; आणि तीही परमेश्वरावर भरंवसा ठेवून, मोठमोठीं साहसाचीं कृत्यें करण्याची त्यास भर देत असे. काम तडीस गेल्यावर आईच्या शाबासकीनें जें प्रोत्साहन व कृतार्थता त्यास वाटे, तीं दुसऱ्या कशानें वाटत नसे. एकंदरींत शिवाजीच्या साऱ्या आयुःक्रमांत त्याची आई जिजाबाई ही कठीण प्रसंगीं त्याची मार्गदर्शक, संकटीं त्याची संरक्षक, व विजयोत्साहाच्या प्रसंगीं त्यास प्रसन्न वर देणारी एक अधिदेवताच होती, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

आईच्या शिक्षणाची थोरवी मोठी मानिली आहे. जे पुरुष नांवलौकिकास चढतात, ते मातृदेवतेचे निःसीम भक्त असून, त्यांच्या हातून महत्कृत्यें घडण्यास तिचेंच प्रोत्साहन कारण होतें. बाबर व अकबर बादशहा, शिवाजी महाराज व माधवराव पेशवे, नेपोलियन व अलेक्झांडर इत्यादि अनेक उदाहरणें वरील विधानाच्या सत्यतेची साक्ष देतात. त्यांतून आईनें जितकीं संकटें ज्यास्त पाहिलीं असतील, तितकें तिनें दिलेलें प्रोत्साहन ज्यास्त किंमतीचें असावयाचें. त्याचप्रमाणें लहानपणीं संकटें भोगावीं लागल्यानें मोठेपणीं थोरवी प्राप्त होते, असाही अनुभव दिसून येतो.

पृथ्वीच्या पाठीवर जीं अनेक नामांकित नररत्नें निपजलीं आहेत, त्यांचा लहानपणचा इतिहास बहुधा असा आहे. बाबर व अकबर बादशाहांचींच उदाहरणें येथें लागू पडतील. संकटांत पडल्यानें मनुष्यास जगाचा अनुभव चांगला व लवकर येतो, म्हणून शिवाजी व त्याची आई यांस त्यांच्या पूर्वविपत्तींचें कितीही दुःख झालें असलें, तरी त्यांच्या हातून पुढें मोठमोठीं कृत्यें घडण्यास तीच विपन्नावस्था कारण झाली. स्वराज्यस्थापनेचें साहित्य तयार असून पुढाकार घेणारा लायक इसम पाहिजे होता. ती लायकी अंगीं येण्यास लहानपणची शिवाजीची स्थिति कारण झाली; आणि राज्यस्थापनेचें काम त्याच्या हातून सिद्धीस गेलें.

**४. शिवाजीचें शिक्षण व तत्कालीन साक्षरता.** —अलीकडे ऐतिहासिक कागदपत्र उपलब्ध झाले आहेत, त्यांवरून शिवाजीला लिहितां वाचतां चांगलें येत होतें, ह्याबद्दल संशय राहत नाहीं. दोन अडीचशें वर्षांपूर्वीं मराठे लोकांस लिहितां वाचतां येत असे. मराठे म्हणजे शूद्र नव्हत. ज्यांस राजकीय उलाढाली कराव्या लागत, अनेक मोठमोठे व्यवहार उलगडावे लागत, त्या क्षत्रिय वंशांचें लिहितां वाचतां आल्याशिवाय भागतच नसे. हल्लींच्या स्थितीवरून पाठीमागचें अनुमान करणें चुकीचें होईल. मराठा जातीचे अनेक कवि झालेले आहेत. अवचितसुत काशी ह्यानें 'द्रौपदीस्वयंवर' रचिलें; त्यास लिहितां वाचतां येत होतें. तुकाराम चांगलाच लिहिणारा होता. त्याच्याच वेळचे कान्होबा, संताजी जगनाडा, नावजी माळी, शिवजी कासार ह्यांनीं स्वहस्तानें लिहिलेले तुकारामाचे अभंग आज त्यांच्या वंशजांजवळ आहेत. कित्येक मानभावपंथी मराठे कवी व नामांकित ग्रंथकर्ते होते. सिद्धान्तबोधाचा कर्ता शहामुनि मराठा होता. प्रत्यक्ष शिवाजीच्या घराण्यासंबंधानें पाहतां, बाबाजी, मालोजी, विठोजी, शहाजी, जिजाबाई, राजाराम, शाहू, दुसरा शिवाजी, तंजावरचा शाहू व प्रतापसिंह ह्या सर्वांचीं हस्ताक्षरें उपलब्ध आहेत. प्रत्यक्ष शिवाजीचें हस्ताक्षर 'बहुत काय लिहिणें, सुज्ञ असा,' अशा मजकुराचें अनेक पत्रांच्या शेवटीं सांपडलेलें आहे. तंजावरचे शाहू व प्रतापसिंह तर संस्कृतही चांगलें जाणत होते.

दादाजी कोंडदेवानें शिवाजीला लिहिण्यावाचण्याला शिकविलें असे बहुतेक बखरकारांचे उल्लेख आहेत. गायन, वादन, पुराणवाचन, संस्कृत,

धर्मशास्त्र, राजनीति हे विषय शिवाजीला शिकविलेले होते, त्यांचीं विस्तृत वर्णनें बखरींतून आहेत. शिवाजीच्या वेळच्या पुष्कळ मराठे सरदारांना लिहितां वाचतां येत होतें. आंगरे, भोसले, गायकवाड, शिंदे, वगैरे घराण्यांतील बहुतेक पुरुषांना लिहितां वाचतां येत होतें. ह्या सरदारांना किंवा शिवाजीला लिहितां वाचतां येत होतें, ह्याचा अर्थ ते लिहिण्याचें काम सर्व स्वतः करीत असें नाहीं. पदरीं कारकून असत व चांगलें सजवून लिहिणें हें काम कारकुनांचें असे. परंतु कारकुनांवर दाब ठेवून, व्यवहार तडीस नेण्यास लिहिणें वाचणें स्वतःस यावेंच लागे. हल्लींच्या शिक्षणांत दहा पांच पानें निबंध बिनचूक लिहितां येईल त्याचीच परीक्षा पास होते, असा सरसकट सर्वांस एक नियम त्या वेळीं नव्हता. पूर्वीं त्यांस राज्यांच्या मोठमोठ्या उलाढाली करावयाच्या, नेहमीं फिरतें राहून फौज किल्ले, युद्धें, महसूल वगैरे बाबतींची व्यवस्था टेवावयाची, अशी स्थिति असल्यामुळें गरजेपुरतें लिहिणें हे लोक शिकत. नुसती लेखनकलाच वाढविणें त्यांस शक्य नव्हतें. पदरीं कारकून ठेवून, त्यांजला तोंडानें ते मजकूर सांगत, तो ते कारकून लिहून आणीत. मजकूर वाचून शेवटीं समाप्तीचा मजकूर यजमानानें स्वहस्तानें लिहावयाचा असा प्रघात असे. त्यांतही मानपानाचे प्रकार होते. कित्येकांस कारकुनांनीं व प्रधानांनीं पत्रें परभारें लिहावयाचीं, कित्येकांस समाप्तीचा मजकूर तेवढा स्वतः लिहिलेला असावयाचा, कित्येकांस सर्वच पत्र स्वतः लिहावयाचें असा शिरस्ता असे. हल्लीं सुद्धां राजेरजवाड्यांचे प्रघात अशाच मासल्याचे आहेत. पांचसहाशें वर्षांपूर्वीं 'स्वहस्तोऽयं भोजदेवस्य' इत्यादि प्रकारें पत्र पुरें करीत. छत्रपति भोसले 'बहुत काय लिहिणें, सुज्ञ असा.' असें स्वहस्तानें लेखाच्या शेवटीं लिहीत. हीं पत्रें बहुधा स्वामींनीं स्वमुखानें सांगितलेलीं असत. 'निदेश समक्ष' अशीं अक्षरें कित्येक पत्रांच्या शेवटीं असतात, तीं पत्रें स्वामींनीं सांगितल्याप्रमाणें लिहिलीं, त्यांजवर स्वामींनीं स्वतः 'बहुत काय लिहिणें' लिहिलेलें नाहीं, असा अर्थ होता.

पुरुषांस लिहितां वाचतां येत असे इतकेंच नव्हे तर तत्कालीन पुष्कळ स्त्रियांसही लिहितां येत होतें. शिवाजीची आई जिजाबाई, करवीरक संभाजीची बायको जिजाबाई (मृ. १७७२), राजारामाची बायके

ताराबाई, अहल्याबाई होळकर, तसेंच बाळाजी विश्वनाथाची बायको व मुलगी अनूबाई (घोरपडे), गोपिकाबाई, आनंदीबाई ह्या सर्व लिहिणाऱ्या होत्या. ह्यावरून त्या वेळच्या साक्षरत्वाची कल्पना होईल. ह्या शिक्षणाच्या संबंधांत तत्कालीन स्थिति ध्यानांत घेतली पाहिजे. प्रत्यक्ष अनुभव हा त्या वेळीं शिक्षणाचें मुख्य अंग होतें. पुस्तकी विद्येस महत्त्व नव्हतें. पुस्तकी विद्येस हल्लीं फाजील महत्त्व आल्यानें, खरी कर्तबगारी लोपत चालली आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

शिवाजी, शहाजी, अकबर इत्यादि पुरुषांचें मुख्य शिक्षण जगाच्या प्रत्यक्ष अनुभवानें परिपूर्ण झालें होतें नाना व्यक्ति, नाना प्रसंग, नाना अडचणी इत्यादिकांच्या प्रत्यक्ष अनुभवानें त्यांच्या अंगीं चातुर्य व सामर्थ्य उत्पन्न झालें होतें. मोठमोठे ग्रंथ व इतिहास ते दुसऱ्यांच्या तोंडून ऐकत. जवळ मोठमोठे विद्वान व निष्णात पुरुष सदैव हजर असत. अर्थात् त्या पुरुषांचें शिक्षण हल्लींच्यापेक्षां फारच उच्च दर्जाचें व उपयुक्त होतें, ह्यांत संशय नाहीं. कलमबहादूर म्हणवून घेण्याची हांव शिवाजीनें कधीं धारण केली नाहीं. शिवाजीला संस्कृत सुद्धां समजत असावें, असें अनुमान निघतें. कथापुराणें ऐकून पूर्वी बायकासुद्धां संस्कृत समजत, हें प्रसिद्धच आहे. संस्कृत व मराठी भाषेचा अभिमान शिवाजीला एवढा वाटे, कीं 'प्रतिपच्चंद्ररेखेव' ही मुद्रा त्यानें तेरा वर्षांचा असतां धारण केली; आणि दरबारची भाषा व प्रघात संस्कृतमय करण्याचे त्यानें केवढे प्रयत्न केले हें पाहिलें म्हणजे, शिवाजी चांगला सुशिक्षित व बहुश्रुत होता, ह्याजबद्दल संशय राहत नाहीं, मग त्यास नुसतें लिहितां वाचतां येत होतें कीं नाहीं ह्याबद्दल शंकाच नको. आईबापांस लिहितां वाचतां येत होतें, त्यावरून शिवाजीस ह्या गोष्टी लहानपणीं शिकविल्या नसतील हें संभवतच नाहीं. कदाचित् त्यास त्याजबद्दल विशेष शोक नसेल, किंवा राज्याच्या दगदगींत लिहिण्या वाचण्याचा नाद त्यास लागला नसेल. सबंद स्वतः लिहिलेला कागद शिवाजीच्या हातचा सांपडणें कठीण, आणि त्यांत विशेष मातब्बरीही नाहीं. सर्व मोगल बादशहा स्वतः चांगले शिकलेले व विद्वान होते त्यांत एकच अपवाद होता, तो कोण ? आश्चर्य वाटेल,—अकबर ! ( मु. रियासत, पृ. ७५०, व ४७० ) सारांश, शिवाजी निरक्षर होता हें विधान बरोबर नाहीं.

५. मावळ प्रांत व शिवाजीचा उपक्रमः— शिवाजीच्या अंगीं बापाचे व आईचे गुण व धोरणें पूर्णपणें उतरलीं होतीं. भीति कशी ती त्याला मुळींच ठाऊक नव्हती. अत्यंत अवघड डोंगराळ मुलखांत फिरून त्याच्या अंगीं विलक्षण साहस उत्पन्न झालें होतें. पुण्यास राहून मावळ प्रांताचा बंदोबस्त त्यास ठेवावयाचा होता. बहामनी राज्याचा हा मावळत्या दिशेचा म्हणजे पश्चिमेकडील प्रांत असल्यामुळें त्यास मावळ हें नांव पडलें असावें. मावळांत सह्याद्रीच्या लगत्यानें अनेक खोरीं आहेत. पुण्याखालीं बारा मावळें व जुन्नराखालीं बारा मावळें होतीं. रोहिडखोरें वेलवंड, मुसे, मुठे, जोर, कानद, शिवथर, मुरुम, पौड, गुंजण, भोर, पवन अशीं हीं पुण्याखालचीं मावळें असून, जुन्नरचीं मावळें शिवनेर, भीमनेर, घोडनेर, पारनेर, जामनेर, वगैरे आणखी बरींच होतीं. त्यांच्या नांवांत कमीजास्त फरक आहेत. प्रत्येक खोऱ्याच्या मध्यभागीं नदी वाहत असून त्या नदीवरून, स्वित्झर्लंडांतील व्हॅलीप्रमाणें, कित्येक खोऱ्यांस नांवें पडलीं होतीं. अशा ह्या खोऱ्यांतून निरनिराळ्या क्षत्रिय मराठ्यांचीं घराणीं पुष्कळ वर्षांपासून नांदत होतीं. या घराण्यांकडे त्या त्या खोऱ्यांची देशमुखी असल्यामुळें त्यांस देशमुख असें म्हणत. बहामनी राज्यांत ज्यांस जशी सवड सांपडली, तशीं त्यांनीं ह्या भागांत देशमुखी वतनें संपादन करून मावळ प्रांत वसविला. मावळांतील या देशमुखांस मावळे असें म्हणतात. मावळे म्हणजे शेतकरी, शूद्र, अडाणी, अशिक्षित लोक, असा जो समज आहे, तो चुकीचा होय. त्यांच्या बाण्यावरूनच ते क्षत्रिय होते हें निर्विवाद ठरतें. हे लोक घरंदाज, इभ्रतदार, वतनदार, बरेचसे शिकलेले, व्यवहारचतुर व चांगले द्रव्यवान असे होते. कथापुराणांचा व संतांच्या कवितेचा त्यांस परिचय होता. ते आपआपल्या टापूपुरते बहुतेक स्वतंत्र कारभार करीत. त्यांच्या मदतीस बहुधा प्रभु देशपांडे व ब्राह्मण कुळकर्णी असत. डोंगरी प्रदेशाच्या आश्रयानें हे देशमुख वरिष्ठ सरकारास पुष्कळदां डोईजड होत. त्यांचीं अनेक घराणीं प्रसिद्ध होतीं. जेधे, बांदल, खोपडे, मरळ, पासलकर, सिलीमकर ह्या आडनांवाचीं घराणीं रोहिडखोरें, कानदखोरें, मुसेखोरें, मुरुमखोरें इत्यादि ठिकाणीं वतनें संपादून राहत होतीं. त्यांचा बाणा उत्तरेंतील रजपुतांसारखा अस्सल क्षत्रिय होता. ते कधीं कोणास हार जात नसत. केवळ मानाखातर भांडून, जिवाची

परवा न करतां, ते झगडत असत. त्यांचें वीर्यतेज मोठें प्रखर होतें. वतनाच्या वगैरे संबंधानें एकाच घराण्यांत किंवा भिन्न भिन्न घराण्यांत एकसारख्या कलागती चालून खून, मारामाऱ्या, जाळपोळ हे प्रकार अगदीं हंमेशचे झाले होते. हे कलह पिढ्यानुपिढ्या चालत. मुख्य सरकाराकडून किंवा गोतांच्या पंचायतींकडून केव्हां केव्हां ह्या तंट्यांचे निकाल होत. परंतु ते निकाल बहुधा पाळले जात नसत. लग्नसमारंभ, गोंधळ, वगैरे गडबडीच्या प्रसंगीं शत्रुपक्षाकडून एकदम धाड येऊन पडत असे. म्हणून ते प्रसंग सुरक्षित पार पडले, म्हणजे मोठेंच भाग्य समजत असत. बायापुरुषांचे व मुलांचे खून होणें, त्यांतून कोणी पळून जाणें, कोणी देशोधडीस लागणें, कोणी फिरून सावरासावर करून शत्रूचा सूड घेणें अशा प्रकारची त्या देशमुखांची स्थिति शिवाजीच्या पूर्वीं निदान शंभर वर्षें तरी चालत होती. नेहमींच असे प्रसंग येऊं लागल्यामुळें संकटांतून सुटून जाण्याचे अनेक उपाय बायकामुलांस सुद्धां तेव्हांच सुचत. रानांत उपाशीं लपून बसणें, उन्हांतून किंवा थंडीवाऱ्यांतून रात्रीं अपरात्रीं दूरच्या मजला मारणें, विरुद्ध पक्षाचे कट फोडून आपले कट जमविणें, त्याबद्दल आपल्या कटांतील लोकांस उत्पन्नें लिहून देणें, हुलकावण्या दाखवून वेळ मारून नेणें, केव्हां समोर लढाई करणें, असे हे प्रकार शेंदोनशें वर्षें सर्वांच्या अंगवळणीं पडलेले असून शिवाजीच्या तर ते रोज डोळ्यापुढें घडत होते. कित्येक प्रसंगीं शिवाजीनेंही अशाच कांहीं युक्त्यांचा उपयोग केलेला आपण पाहतों, तेव्हां शिवाजीच्या पूर्वींची ही स्थिति आपणास माहीत नसल्यामुळें, शिवाजी म्हणजे कपटांत पूर्ण निष्णात अशी आपली भलतीच समजूत होऊन जाते. खरा प्रकार असा आहे कीं, ह्या कपटप्रचुर पद्धतीचा शेवट शिवाजीनें करून त्या प्रदेशांत सुव्यवस्थित कायद्याची राज्यपद्धति निर्माण केली. शिवकालीन कागदपत्रांत हे प्रकार स्पष्ट दिसतात.

स्कॉट्लंडांतील डोंगरी प्रदेशाची हकीकत ज्यांनीं वाचली असेल त्यांस ह्या दोन हकीकतींत पुष्कळ साम्य दिसून येईल. इतकेंच नव्हे तर सर वॉल्टर स्कॉटसारखा ग्रंथकार असेल तर, वरील कागदपत्रांच्या आधारें त्यास अनेक मनोरंजक कादंबऱ्या रचतां येतील. अफगाणिस्तान, स्वित्झर्लंड यांच्या पूर्वस्थितीचीही येथें आठवण झाल्याशिवाय राहत नाहीं. शिवाजीच्या आरंभींच्या उद्योगासंबंधानें आजपावेतों कांहीं एक माहिती बाहेर

आलेली नव्हती. मोरे, अफझलखान, शाएस्तेखान, दिल्लीस बादशहाची भेट इत्यादिकांचे लोकांस अद्भुत वाटणारे प्रकार बखरकारांनीं मोठ्या गौरवानें वर्णून शिवचरित्राची पूर्तता केली. ऐतिहासिक भावना त्यांत नव्हती. उलट अद्भुत प्रकार चित्ताकर्षक करण्याच्या उद्योगांत खरे प्रकार ज्यास्तच लोपून गेले. ग्रँट् डफ् वगैरे इंग्रज ग्रंथकारांनीं बखरींचेंच अनुकरण कांहीं अंशीं करून शिवाय स्वतःच्या विकारांची त्यांत भर घातली. हा प्रकार तत्कालीन कागदपत्र बाहेर आल्यानें, बराच बदलून जातो, आणि खऱ्या इतिहासाची संगति थोडीबहुत लागते. शिवकालीन कागदपत्रांचे पांच भाग आतांपर्यंत बाहेर आले आहेत, खंड १५, १६, १७, १८ व २०. ह्यांपैकीं मधले तीन इतिहाससंग्रहांत व कडेचे दोन स्वतंत्र छापले आहेत. तसेंच ८ व्या खंडांतही उपयुक्त कागद आहेत. हे अस्सल कागद वाचून त्या वेळच्या स्थितीचा जो एकंदर परिणाम मनावर होतो तोच महत्त्वाचा व उपयुक्त समजला पाहिजे. कारण हल्लीं जशीं व्यवस्थित लाविलेल्या सरकारी दप्तरांतील कागदांची निवड होऊन पुस्तकें बाहेर पडतात, तसे हे कागद एकंदर संग्रहांतून निवडून काढिलेले नाहींत; जसे जेथें सांपडले, तसे जमा करून हे छापलेले आहेत. त्यांतून जितकें मागें जावें तितके हे कागद कमी सांपडतात. ही मुद्याची गोष्ट अभ्यासेच्छूंनीं ध्यानांत ठेविली पाहिजे.

ह्या कागदपत्रांत मावळखोऱ्यांतील अनेक देशमुखांच्या हकीकती आहेत. शिवाजीला कोणी कशी मदत केली, त्याला काय खटपटी कराव्या लागल्या, त्यानें लोकांचीं मनें कशी वळविलीं, ह्या गोष्टींचे थांग अनेक निरनिराळ्या उल्लेखांवरून थोडेबहुत लागतात. एखाद्या लहानशा कागदावरून बराच प्रकाश पडतो, आणि अनेक विसकळीत उल्लेखांची एकवाक्यता व जुळवाजुळव केली म्हणजे त्यापासून बऱ्याच गोष्टींचा उलगडा होतो. बहुतेक कागद निवाड्यांचे महजर असून त्यांत दादाजी कोंडदेवानें केलेले निवाडे पुष्कळ आहेत. त्यांवरून व दुसऱ्या उल्लेखां-वरून दादाजी कोंडदेवाच्या कामगिरीचाही अंदाज होतो.

शिवाजीच्या हालचालींचें पहिलें साल स. १६३८ होय. त्यापूर्वीं एक वर्ष निजामशाही पडली, आणि शहाजी कर्नाटकांत गेला. कर्नाटकांत जाण्यापूर्वीं त्यानें आदिलशाहीच्या तर्फेनें नवीन मुलखाची दिवाणी व मुलकी

व्यवस्था ठरवून दिली ( Bhonslays of Satara by Frere–इ. संग्रह ). हें काम त्यानें पुण्यास आपल्या जहागिरीवर राहून स. १६३७ त केलें. ह्या सालींच दादाजी वगैरेंच्या सल्ल्यानें पुढें जहागिरींत काय कामें करायचीं, कोणतीं धोरणें व काय व्यवस्था ठेवायची, हें शहाजीनें ठरवून दिलें. ह्या वेळीं शिवाजी लहान होता. परंतु तें ठरविण्यांत व विवेचन करण्यांत तो हजर असेच. लहानपणचे हे संस्कार म्हणजे पुढील उद्योगाचेंच शिक्षण होय. स. १६३९ त शहाजी रणदुल्लाखानाबरोबर श्रीरंगपट्टणकडे होता, त्यापूर्वीं पुढील बेत ठरला असला पाहिजे. कारण ‘ प्रतिपचंद्ररेखेव वर्धिष्णुर्विश्ववंदिता । शाहसूनोः शिवस्यैषा मुद्रा भद्राय राजते ’॥ हें शिवाजीच्या मुद्रेंतील प्रसिद्ध वाक्य स. १६३९ च्या ऑक्टोबरांतील एका कागदावर आहे ( खं. १५–४३१ ). आज ही मुद्रा प्रतिपदेच्या चंद्ररेखेप्रमाणें अल्प असली तरी ती उत्तरोत्तर वृद्धि पावून सर्व लोकांना वंद्य होणार आहे. ही शहाजीपासून शिवाजीला प्राप्त झाली असून, केवळ लोककल्याणाकरितां ती धारण केलेली असल्यामुळेंच ती शोभते. असा ह्या वाक्याचा अर्थ खोंचदार असून मुद्रा हें राज्यचिन्ह असल्यामुळें तें, पुष्कळ मागचा पुढचा विचार करून, अनेक शहाण्या माणसांच्या अनुमतीनें, जबाबदारी ओळखून, धारण केलेलें होतें. शिवाजीच्या अखेरपर्यंत सर्व कागदपत्रांवर हेंच त्याचें वाक्य झळकतें. स. १६३९च्या अगोदर वर्ष सहा महिने तरी ही मुद्रा धारण केलेली असावी. अर्थात् ही सर्व योजना शहाजीच्या विचारानें होत होती; आणि जिजाबाई व दादाजी कोंडदेव ह्यांनीं शिवाजीच्या हातून ती तडीस न्यावयाची होती. शिवाजीच्या हुशारीविषयीं त्यांस खात्री वाटत असून, त्याच्या हातून हें काम तडीस जाईल, ह्या विषयीं त्या वेळीं संशय वाटत नव्हता. अर्थात् मालोजीनें ज्या धिटाईनें आपलें वजन दरबारांत स्थापन केलें, जी धिटाई शहाजीनें वीस वर्षे प्रत्यक्ष आचरून दाखविली, तीच धिटाई शिवाजीनेंही पुढें चालवून, आरंभिलेलें कार्य सिद्धीस न्यावयाचें होतें. ह्या कार्याचा आरंभ पुण्यांत स. १६३७–३८त झाला.

पुणें शहर शहाजीच्या जहागिरींत असल्यामुळें, तेथेंच राहण्याचा त्याचा मनोदय फार दिवसांचा असेल. शहाजीनें दुसरें लग्न केल्यावर केव्हां तरी पुण्यास वाडा बांधण्याची जरूर त्याला वाटूं लागली. शिवाजीचें किंवा

आलेली नव्हती. मोरे, अफझलखान, शाएस्तेखान, दिल्लीस बादशहाची भेट इत्यादिकांचे लोकांस अद्भुत वाटणारे प्रकार बखरकारांनीं मोठ्या गौरवानें वर्णून शिवचरित्राची पूर्तता केली. ऐतिहासिक भावना त्यांत नव्हती. उलट अद्भुत प्रकार चित्ताकर्षक करण्याच्या उद्योगांत खरे प्रकार ज्यास्तच लोपून गेले. ग्रँट् डफ् वगैरे इंग्रज ग्रंथकारांनीं बखरींचेंच अनुकरण कांहीं अंशीं करून शिवाय स्वतःच्या विकारांची त्यांत भर घातली. हा प्रकार तत्कालीन कागदपत्र बाहेर आल्यानें, बराच बदलून जातो, आणि खऱ्या इतिहासाची संगति थोडीबहुत लागते. शिवकालीन कागदपत्रांचे पांच भाग आतांपर्यंत बाहेर आले आहेत, खंड १५, १६, १७, १८ व २०. ह्यांपैकीं मधले तीन इतिहाससंग्रहांत व कडेचे दोन स्वतंत्र छापले आहेत. तसेंच ८ व्या खंडांतही उपयुक्त कागद आहेत. हे अस्सल कागद वाचून त्या वेळच्या स्थितीचा जो एकंदर परिणाम मनावर होतो तोच महत्त्वाचा व उपयुक्त समजला पाहिजे. कारण हल्लीं जशीं व्यवस्थित लाविलेल्या सरकारी दप्तरांतील कागदांची निवड होऊन पुस्तकें बाहेर पडतात, तसे हे कागद एकंदर संग्रहांतून निवडून काढिलेले नाहींत; जसे जेथें सांपडले, तसे जमा करून हे छापलेले आहेत. त्यांतून जितकें मागें जावें तितके हे कागद कमी सांपडतात. ही मुद्याची गोष्ट अभ्यासेच्छूंनीं ध्यानांत ठेविली पाहिजे.

ह्या कागदपत्रांत मावळखोऱ्यांतील अनेक देशमुखांच्या हकीकती आहेत. शिवाजीला कोणी कशी मदत केली, त्याला काय खटपटी कराव्या लागल्या, त्यानें लोकांचीं मनें कशी वळविलीं, ह्या गोष्टींचे थांग अनेक निरनिराळ्या उल्लेखांवरून थोडेबहुत लागतात. एखाद्या लहानशा कागदावरून बराच प्रकाश पडतो, आणि अनेक विसकळीत उल्लेखांची एकवाक्यता व जुळवाजुळव केली म्हणजे त्यापासून बऱ्याच गोष्टींचा उलगडा होतो. बहुतेक कागद निवाड्यांचे महजर असून त्यांत दादाजी कोंडदेवानें केलेले निवाडे पुष्कळ आहेत. त्यांवरून व दुसऱ्या उल्लेखांवरून दादाजी कोंडदेवाच्या कामगिरीचाही अंदाज होतो.

शिवाजीच्या हालचालीचें पहिलें साल स. १६३८ होय. त्यापूर्वीं एक वर्ष निजामशाही पडली, आणि शहाजी कर्नाटकांत गेला. कर्नाटकांत जाण्यापूर्वीं त्यानें आदिलशाहीच्या तर्फेनें नवीन मुलखाची दिवाणी व मुलकी

व्यवस्था ठरवून दिली ( Bhonslays of Satara by Frere–इ. संग्रह ). हें काम त्यानें पुण्यास आपल्या जहागिरीवर राहून स. १६३७ त केलें. ह्या सालींच दादाजी वगैरेंच्या सल्ल्यानें पुढें जहागिरींत काय कामें करायचीं, कोणतीं धोरणें व काय व्यवस्था ठेवायची, हें शहाजीनें ठरवून दिलें. ह्या वेळीं शिवाजी लहान होता. परंतु तें ठरविण्यांत व विवेचन करण्यांत तो हजर असेच. लहानपणचे हे संस्कार म्हणजे पुढील उद्योगाचेंच शिक्षण होय. स. १६३९ त शहाजी रणदुल्लाखानाबरोबर श्रीरंगपट्टणकडे होता, त्यापूर्वी पुढील बेत ठरला असला पाहिजे. कारण 'प्रतिपच्चंद्ररेखेव वर्धिष्णुर्विश्ववंदिता । शाहसूनोः शिवस्यैषा मुद्रा भद्राय राजते'॥ हें शिवाजीच्या मुद्रेंतील प्रसिद्ध वाक्य स. १६३९ च्या ऑक्टोबरांतील एका कागदावर आहे ( खं. १५–४३१ ). आज ही मुद्रा प्रतिपदेच्या चंद्ररेखेप्रमाणें अल्प असली तरी ती उत्तरोत्तर वृद्धि पावून सर्व लोकांना वंद्य होणार आहे. ही शहाजीपासून शिवाजीला प्राप्त झाली असून, केवळ लोककल्याणाकरितां ती धारण केलेली असल्यामुळेंच ती शोभते. असा ह्या वाक्याचा अर्थ खोंचदार असून मुद्रा हें राज्यचिन्ह असल्यामुळें तें, पुष्कळ मागचा पुढचा विचार करून, अनेक शहाण्या माणसांच्या अनुमतीनें, जबाबदारी ओळखून, धारण केलेलें होतें. शिवाजीच्या अखेरपर्यंत सर्व कागदपत्रांवर हेंच त्याचें वाक्य झळकतें. स. १६३९च्या अगोदर वर्ष सहा महिने तरी ही मुद्रा धारण केलेली असावी. अर्थात् ही सर्व योजना शहाजीच्या विचारानें होत होती; आणि जिजाबाई व दादाजी कोंडदेव ह्यांनीं शिवाजीच्या हातून ती तडीस न्यावयाची होती. शिवाजीच्या हुशारीविषयीं त्यांस खात्री वाटत असून, त्याच्या हातून हें काम तडीस जाईल, ह्या विषयीं त्या वेळीं संशय वाटत नव्हता. अर्थात् मालोजीनें ज्या धिटाईनें आपलें वजन दरबारांत स्थापन केलें, जी धिटाई शहाजीनें वीस वर्षें प्रत्यक्ष आचरून दाखविली, तीच धिटाई शिवाजीनेंही पुढें चालवून, आरंभिलेलें कार्य सिद्धीस न्यावयाचें होतें. ह्या कार्याचा आरंभ पुण्यांत स. १६३७–३८त झाला.

पुणें शहर शहाजीच्या जहागिरींत असल्यामुळें, तेथेंच राहण्याचा त्याचा मनोदय फार दिवसांचा असेल. शहाजीनें दुसरें लग्न केल्यावर केव्हां तरी पुण्यास वाडा बांधण्याची जरूर त्याला वाटूं लागली. शिवाजीचें किंवा

जिजाबाईचें स. १६३६ च्या अगोदर पुण्यास कधींच येणें झालें नसेल. त्या सालीं निजामशाहीची भानगड संपल्यावर दादाजी कोंडदेवाकडून शहाजीनें पुण्यास वाडा बांधविला. मागच्या भानगडी लक्षांत घेतां, शहाजीनें दुसरें लग्न केल्यानंतर, दोनही बायकांस एकत्र घेऊन राहण्यानें सुख लागेल असें शहाजीस वाटलें नसावें. जिजाबाईचा मानी स्वभाव, आणि शिवाजीस स्वतंत्र उद्योगाची सवड देणें, ह्या हेतूनेंही शहाजीनें इत-उत्तर निराळाच पंथ काढण्याचा विचार केला असावा. अशा हेतूनें पुण्यास सर्व व्यवस्था, कुटुंबाची व जहागिरीची, दादाजीच्या विद्यमानें लावून, शहाजीनें विजापुर-कर्नाटकाकडे एकदां प्रयाण केलें, तें पुनः ह्या बाजूस लक्ष घातलें नाहीं.

६. दादाजी नरस प्रभु व स्वराज्याची शपथ.— दादाजी नरस प्रभु देशपांडे हा तरुण व धाडसी पुरुष आरंभींच शिवाजीनें आपल्या कामांत सामील करून घेतला. ' दादाजी नरस प्रभु यांनीं कै. थोरले राजश्री स्वामीपाशीं फार शर्थीची चाकरी, हरवक्त हुजूर राहून, घारेकऱ्यांत मर्दुमकी, मोठे धाडसें, जिवाची परवा न धरितां केली. ' ( खं. १५–२८६ ). स. १६४५च्या एप्रिलांत विजापुरच्या अधिकाऱ्यानें रोहिडखोऱ्याचे व वेलवंडखोऱ्याचे देशपांडे कुलकर्णी दादाजी नरस प्रभु यांस खालील पत्र लिहिलें (खं. १५ ले. २६७). ' शिवाजीराजे यानें शहाशीं बेमानगी करून तुझे खोऱ्यांत रोहिरेश्वरचे डोंगराचे आसऱ्यानें पुंडाव्यानें मावळे वगैरे लोक जमाव केला; आणि तेथून जाऊन

रोहिडखोरेकर गुप्ते देशपांडे यांची वंशावळ [ खं. १५–३०८ ]. भिकप्रभु, हरप्रभु, बालप्रभु, भानप्रभु, जाऊप्रभु, व सावप्रभु हे सर्व अनुक्रमें एकापुढें एक.



पेशजी किल्ल्यावरील ठाणें उठवून आपण रोहिडेकिल्ल्यांत शिरला. हल्लीं राजगड किल्ला नांव करून बळकावला. तोही वेलवंड खोऱ्यालगत. त्यास लोकांचा वगैरे जमाव. तूं सामील असून फिसाद करून राजे मजकूरनिल्हेस रसद देतोस. ठाणें शिरवळींच्या अमिनासीं रुजू राहत नाहींस. जमाव बितरजुमा करीत नाहींस व दोनही पेट्यांचा वसूलही सरकारांत देत नाहींस. ठाणेगे व नाईकवाड्यांस मगरुरीचे जबाब देतोस. हें जाहीर झालें. त्यास ही गोष्ट तुझे जमेदारीचे इजतीस नामाकूल आहे. तरी ठाणे मजकुरीं अमिनासीं रुजू राहणें; आणि तनखा जमा करोन देणें. हें न जाल्यास तुजला विजापुरीं नेऊन गरदन मारितील; व जमेदारी हक्क कानू चालणार नाहीं, हें मनीं समजणें; आणि याउपरः दिवाणांत रुजू राहणें ' (पत्र सहज समजण्यासाठीं जूज फेरफार केले आहेत.)

ह्या वेळीं ( स. १६४५त ) शिवाजीचा उपक्रम बराच नांवारूपास आला असून त्यानें राजगडकिल्लाही बांधिला होता, असें ह्या पत्रावरून होतें.

पुढें याच बाबतींत खालील पत्र शिवाजीनें दादाजी नरसप्रभु यास लिहिलें, ( मे स. १६४५ ). 'तुम्हांस मेहेरबान वजिराचा विजापुराहून हुकूम आला' तो ठाणें शिरवळींहून अमिनानीं तुम्हाकडे पाठविला. त्यावरून तुमचे बाप नरसीबावा हवालदील झाले, वगैरे कित्येक मजकूर लिहिले. त्यास शहाशीं बेमानागिरी तुम्ही व आम्ही करीत नाहीं. श्रीरोहिरेश्वर तुमचे खोऱ्यांतील आदिकुलदेव, डोंगरमाथा पठारावर सह्याद्रीलगत तुमचा स्वयंभू आहे. त्यांनीं आम्हांस यश दिलें; व पुढें तो सर्व मनोरथ हिंदवी स्वराज्य करून पुरविणार आहे. त्यास बावांस हवाल होऊं देऊं नये. धीर दिलासा सांगावा; आणि तुम्ही तो कागद घेऊन तावडतोब हुजुर येणें. राजश्री दादाजीपंतांचे विद्यमानें बावांचें व तुमचें व आमचें श्रीपाशीं इमान झालें, तें कायम वज्रप्राय आहे. त्यांत अंतर आम्ही व आमचे वंशज लेकरांचे लेकरीं वतन वगैरे चालविण्याविशीं कमतर करणार नाहीं. हें राज्य व्हावें हें श्रीचे मनांत फार आहे. ह्याप्रमाणें बावांचे मनाची खात्री करून तुम्ही येणें. ' ( खं. १५–२६८ ).

हल्लींच्या सचिवांच्या हद्दींत वेलवंडखोरें व रोहिडखोरें हीं दोन खोरीं असून त्यांतील देशपांडे व कुळकर्णी नरसप्रभु म्हणून होता. नरसप्रभूनें दादाजीप्रभूस दत्तक घेतलें, ( खं. १५–३११ ). दादाजी व नरसप्रभु

दोघेही शिवाजीला अनुकूळ होते; आणि रोहिडेश्वरासमक्ष दादाजी, नरसप्रभु व शिवाजी ह्यांच्या शपथा दादाजी कोंडदेवाच्या विद्यमानें झाल्या होत्या. हिंदवी स्वराज्याविषयीं शिवाजी व दादाजी कोंडदेवाचा चांगलाच निश्चय आरंभापासून झाला असून, त्याला अर्थात् जिजाबाईचें अनुमोदनच नव्हे तर प्रोत्साहनही असलें पाहिजे. कारण आईचा शब्द प्रमाण मानणाराच शिवाजी होता. देवाचें आपणास साह्य आहे, स्वराज्य स्थापणें ही देवाची आपणास आज्ञाच आहे, अशी शिवाजीची भावना ह्या पत्रावरून व्यक्त होते. दादाजी कोंडदेवाचें मन स्वराज्य स्थापनेच्या विरुद्ध होतें, हें म्हणणें अर्थात् खरें नाहीं. दादाजीवरच शिवाजीची भिस्त असून तोच आरंभीं ह्या उद्योगांत सूत्रचालक व प्रोत्साहक होता.

त्यानंतर लगेच एका महिन्यानें दादाजी नरसप्रभु यास रोहिडा किल्ल्यावरून खालील हुकूम विजापुरकरांचा आला, ( खं. १५–२६९ ).

‘ खुदावंत शहागाजी हुकमत पन्हा यांचे हुकमानें मेहेरबान वजिराचा हुकूम तुमचे नांवचा आला. त्यांत मजकूर शिवाजीराजे यांसी पुंडाव्यास तुम्ही मिळते होऊन रोहिडेश्वरचे पाहाडीं तुमचे खोरींत हजार बाराशें जमाव तुम्हीं केला. येविशीं राजे मशारनिल्हे यांनीं तुम्हास पत्र पाठविलें, त्यांत इमान भाक झाल्याचा फिसाती मतलब लिहिलेला आहे. ही खबर बांदल देशमुख ’ खोपडे व जेधे देशमुख यांनीं ठाणे शिरवलीस जाहीर केली, हें कळून फरारी झालास. दोनही खोऱ्यांतील मुलूख हैराण झाला. हल्लीं हुजूरचे मेहेरबानगीवरून हा जाहीरनामा फर्माविला असे. तरी तुम्हीं रयत, पटवारी, बाजे वतनदार यांजला कच्चेबच्चेनशीं आपापले मकानीं दोनही पेठ्यांत येऊन हजर होणें; आणि दोनही खोऱ्यांची शेतीची आबादानी करून सरकारी वसूल देणें. तुमची जमिदारी हक्कानु इनामती इसाफतीसीं हक्क बिनतक्रार घेणें. दरबाब हरएक मतलब तकसीर केली ती तुम्हास मुबाहक यांचे हुकमावरून जाली असे. दरबाब हरगीज दिवाणांतून इजा होणार नाहीं. ’

यावरून शिवाजीचा मावळांतील उपक्रम विजापुरच्या अधिकाऱ्यांस माहीत होता; चहाडखोर लोकांकडून गुप्त गोष्टी त्यांस कळत होत्या; आणि शिवाजीशीं हातघाईचा प्रसंग न आणितां, व लोकांसही विशेष जरब न दाखवितां, ही बंडाळी जागच्या जागीं मिटविण्याचे प्रयत्न विजापुरांतून

होत होते, असें दिसतें. एका अर्थानें मावळ प्रांताचा योग्य बंदोबस्त शिवाजी करीत होता ही गोष्ट दरबारास इष्ट होती, आणि लढाईवर प्रकरण आणल्यास पूर्वींच्या शहाजीच्या उपद्व्यापाची आठवण ताजी असल्यामुळें, शांत धोरण ठेवणाऱ्या महंमद आदिलशहानें शिवाजीचें प्रकरण विकोपास नेलें नाहीं, असें दिसतें. महंमद आदिलशहा वारल्यावर अली आदिलशहा लहान असतां अफझलखानादि प्रमुख सल्लागारांनीं पुढें त्याजवर शस्त्र धरिलें.

**७. कान्होजी व बाजी सर्जेराव देशमुख.**—रोहिडखोऱ्याचा कान्होजी जेधे देशमुख हा शहाजीपाशीं असून, शहाजी विजापुराकडे गेला, तेव्हां त्यानें कान्होजीस शिवाजीजवळ पुण्यास ठेवून दिलें. हा बाजीपासलकराचा जांवई. हे दोघे प्रथम शिवाजीनें आपल्या उद्योगांत वश करून घेतले. कान्होजीच्या पूर्वजांची थोडीशी हकीकत दिली असतां, मावळांतील देशमुखांपैकीं त्या वेळचा एक नमुना दृष्टीस पडेल.

रोहिडखोऱ्याचे जेधे देशमुख खेळोजी व बाजी असे दोघे बंधु विजापुरच्या ताब्यांत होते. विजापुराहून आपल्या वतनांचीं फर्मानें घेऊन घरीं येत असतां खोपडे नांवाचे दुसरे देशमुख त्याच वतनावर हक्क सांगत होते. जेध्यांची येण्याची बातमी ठेवून त्यांजवर एका खिंडीत खोपड्यांनीं हल्ला केला, आणि खेळोजीस ठार मारलें. बाजी पळून गेला, आणि त्यानें खोपड्यांचा सूड उगविण्याकरितां मुलें माणसें समुद्रकाठीं सुरक्षित ठेऊन बारा इसम मदतीस घेतले. त्यांस ह्या मदतीबद्दल आपल्या वतनांतला कांहीं भाग लिहून दिला, आणि सर्वांनीं मिळून खोपड्यांचें लग्न चाललें होतें त्यांवर हल्ला केला. लग्न उडवून दिलें. साठ मनुष्य कापून काढले. त्यावरून रोहिडा

जेधे देशमुख, रोहिडखोरें, [ खं. १५ व १७ १ ] खेळोजी



किल्ल्यावरील काजीकडे फिर्याद जाऊन त्यानें खोपड्यांस व जेध्यांस वतन विभागून दिलें. पुढें कांहीं दिवसांनीं जेध्यांनीं आणखी खटपट करून आपलें वतन वाढविलें. खेळोजीचा नातू कान्होजी हा पराक्रमी निघाला. तो आदिलशहास वसूल देईना. त्यास सात मुलगे होते. आदिलशहानें सर्वांत धाकटा नाईकजी यास आपल्याकडे वळवून त्याच्या नांवानें देशमुखीचें वतन करून दिलें. त्यावरून दोन वडील बंधूंनीं कट करून नाईकजीस ठार मारिलें. तेव्हा नाईकजीच्या लोकांनीं त्या दोन बंधूंचा खून केला. पुढें नाईकजीची बायको अनसावा गरोदर होती, तिच्या नांवानें दरबारांतून देशमुखी झाली, आणि शिक्काही तिचा चालूं लागला. पुढें अनसावाला मुलगा झाला. त्यांस मारण्याकरितां कान्होजीचे दुसरे मुलगे चालून आले. अनसावा मारली गेली. पण मुलगा दाईनें पळविला. त्याचा सांभाळ बाजी पासलकरानें केला. ह्या मुलाचें नांव कान्होजी ( दुसरा ). पुढें पासलकरानें त्यास आपली मुलगी सावित्रीबाई देऊन जांवई केलें. हा घरगुती तंटा मिटतो न मिटतो इतक्यांत कान्होजीचें बांदल देशमुखाशीं वैर पडलें. दोघांनीं आपआपल्या पक्षाची मंडळी जमवून अनेक लढाया केल्या. दोन्ही पक्षाचे पुष्कळ लोक मारले गेले. एका दिवसांत जेध्यांकडील तीनशें मनुष्य मारले गेले. त्यांस जाळावयास घरें मोडून जाती जाती लोक एके जागीं जमा करून जाळले. पुढें हा कज्जा शिवाजीच्या वेळेस मिटला. कान्होजी जाऊन शिवाजीस मिळाला, आणि शिवाजीनें बांदल देशमुखाचा पाडाव केला. कान्होजीचा मुलगा बाजी यानें विशेष पराक्रम केल्यावरून त्यास शिवाजीनें 'सर्जेराव' हा किताब दिला, तो त्या घराण्याकडे चालतो.

रोहिडखोऱ्यांतील जेधे देशमुखांच्या दप्तरांत (खं. १५–३६४ ) मावळांतील शिवाजीच्या व दादाजी कोंडदेवाच्या उपक्रमाबद्दल उल्लेख आहे, तो असा. ' कान्होजी नाइकांनीं ' महाराज राजश्रीसाहेब कै० यांजवळ स्वारांनिशीं सेवा केली. त्यास थोरले कैलासवासी स्वामी पुण्यास पाठविले, त्यां समागमें कान्होजी नाईक जेधे देशमुख स्वारांनिशीं दिले. यांनीं एकनिष्ठेनें सेवा करावयाची ती केली. राजश्री दादाजी कोंडदेव शिवापुरास आले, ते समयीं हिरडसमावळांतलि कृष्णाजी नाईक बांदल देशमुख बारा मावळांमध्यें जोरावारीनें बहते ( ? ) घेत होते. ते समयीं

कान्होजी नाइकांनीं बांदलास बहूते दिले नाहींत. जोरावारीनें तलवारीच्या बळें आपल्या महालांत येऊं दिलें नाहीं. त्यावरी राजश्री थोरले कैलासवासी स्वामी कारभार करूं लागले, ते समयीं गनीम चालोन आला. याकरितां पायींच्या लोकांचा व लष्कराचा जमाव करूं लागले. कान्होजी नाईक यांस बोलावूं पाठविलें. तेही आपल्या जमावानिशीं गेले. त्यावरी मावळे लोकांचा व स्वारांचा जमाव करून, मौजे खलदबेलसर येथें गनीम आला होता, त्यावरी थोरले स्वामी गेले. त्यांबरोबर कान्होजीचे पुत्र बाजी नाईक हे निशाणाचा भाला घेऊन गेले. आपले लोकांचें व गनिमांचें भांडण झालें. तेथें तलवारीची शर्थ करावयाची ते केली. गनीम मारून मोडिला. त्यावरून स्वामींनीं मेहेरबान होउनी बाजी नाइकास ‘ सर्जेरावी ’ दिली. त्याउपरी स्वामींनीं मातबर जमाव करून राज्यें हस्तगत करूं लागले. मावळ प्रांतींचे गड घेतले. राज्यवृद्धीतें होत चाललें. त्यावरी अफ्झलखान चालोन आला, तो वाईस येऊन राहिला. त्यावरी खंडोजी खोपडे पारखे होऊन अफ्झलखानास भेटले, आणि कैलासवासी स्वामीस धरून देतों अशी कबुलात केली. ते समयीं कान्होजी नाइकांनीं आपलीं माणसें व वस्तभाव पळविली ती तळेगांवीं नेऊन ठेविली; आणि कान्होजी नाईक, बाजी सर्जेराव वगैरे पांच पुत्रांसह राजश्री स्वामींचे भेटीस आले. तेव्हां राजश्री बोलले, कीं ‘ खंडोजी खोपडे अफ्जलखानासी भेटले; आपली देशमुखी खानापासून मागून घेतली. तुम्हीही खानाची भेट घेऊन आपली देशमुखी जतन करणें ’ म्हणून बोलिले. त्यावर कान्होजी नाईक बोलिले कीं ‘ आपण देशमुखी साहेबांच्या पायावरी ठेविली आहे. साहेबांच्या बऱ्यानें आपलें बरें हेच निष्ठा आपली आहे. ’ ऐसें बोलिले आणि इमान दिलें. त्यावरी राजश्री स्वामीनेंही इमान देऊन डोईवरी हात ठेवून बोलिले जे, "भोसल्यांचे वंशीं जो राज्य करील, त्यानें तुमचें वंशपरंपरेनें चालवावें." त्यावरी जमाव करून राजश्रीसमागमें प्रतापगडास गेले. अफ्झलखानाचे भेटीचे समयीं बाजी सर्जेराव व त्यांचे बंधु धारेकऱ्यांमध्यें नेमून बरोबर घेतले. अफ्झलखान जिवें मारिला. कुल फौज लुटली. ते समयीं बाजी नाइकानें शर्थ करावयाची ती केली. खंडोजी खोपडा पाडाव झाला. त्यास राजश्री स्वामींनीं शास्ती केली. त्यावरी शाएस्तेखानावर स्वामी पुण्यास चालून गेले, त्यासमागमें बाजी नाइक व त्याचे बंधु समागमें गेले. तेथेंही

शर्थ करणें ते केली. त्यावरी राजश्री स्वामींनींही बोलल्या बोलाप्रमाणें चालविलें. मानपान आपला आपणास देत आले. त्याउपरी स्वामी दिल्लीस पादशहाचे भेटीस गेले ते समयीं बाजी सर्जेराव समागमें गेले होते. कर्नाटकांतही चंदीप्रांतें स्वामीसमागमें होते. ह्याप्रमाणें त्यांनीं एकनिष्ठेस अंतर केलें नाहीं. स्वामींनींही सर्वस्वी चालविलें.'

जेधे देशमुखांच्या वतनाबद्दल पुढें अनेक भानगडी झाल्या. खोपड्यांनीं त्यांस उपद्रव केला. संभाजी व राजारामाच्या वेळेस शिवजी जेधे देशमुख वगैरे मंडळी मोगलांस जाऊन मिळाली. देशांत शत्रूची धामधूम चालू असली म्हणजे असले प्रकार घडतात. अशा अनेक हकीकती आहेत. त्या कादंबरीकारासही चांगल्या उपयोगी पडतील.

शिवाजी वेळ पडेल तसा लोकांचे बचावाचा उपाय योजीत असे, हें ले० २८६ वरून दिसून येतें. शिवाजीनें हें पत्र स. १६६२ त बाजी देशमुख सर्जेराव ह्यास लिहिलेलें आहे. 'मोगल प्रस्तुत तुमच्या तप्यांत ( पेट्यांत ) धावणीस येताती, म्हणोन जासुदांनीं समाचार आणिला आहे. तरी तुम्हांस हें पत्र पोचतांच तुम्ही आपले तमाम तप्यांत गांवचे गांवीं ताकिदी करून, माणसें लेकरें बाळें समस्त तमाम रयतेसी लोकांस घांटाखालीं बांका जागा असेल तेथें पाटविणें. जेथें गनिमाचा आजार पोंचेना ऐशा जाग्यासी त्यांस पाठविणें. या कामास हयगय न करणें. रोखा पोंचतांच सदरहू लिहिलेप्रमाणें अंमल करणें. हें करण्यांत तुम्हापासून अंतर पडल्यास मोगल जे बांद धरून नेतील त्याचें पाप तुमच्या माथां बैसेल. ऐसें समजोन, गांवचे गांव हिंडून, रातीचा दिवस करून, लोकांचीं माणसें घांटाखालीं जागा असेल तेथें पाटविणें. या कामास एक घडीचा दिरंग न करणें. तुम्ही आपले जागीं हुशार असणें. गांवगन्नाही शेत पोत जतन करावया जे सडे असतील त्यांस ही तुम्ही सांगणें कीं, डोंगरावर आसरा कुबल जागीं आसरे असा, ऐसें सांगणें. व गनीम दुरून नजरेस पडतांच त्याचे धावणीची वाट चुकवून पळून जाणें. तुम्ही आपले जागां हुशार असणें.' स. १६६२ च्या नोव्हेंबरचें हें पत्र म्हणजे शाएस्तेखान शिवाजीचे पारिपत्यासाठीं पुण्यास आला, त्या वेळचें आहे. स. १६६३ च्या एप्रिलांत शिवाजीनें पुण्यांत खानावर छापा घातला.

१५ व्या खंडांत कान्होजी जेधे याच्या नांवचे कागद स. १६४९ चे असून स. १६६२ चा कागद त्याचा पुत्र बाजी नाईक याचे नांवचा

आहे. स. स. १६६२ च्या पूर्वी केव्हां तरी कान्होजी वारला, त्या वेळीं बाजीनाईक प्रौढ होता. बाजी नाइकास सर्जेरावी मिळाली, तेव्हां तो बराच लहान होता. खळदबेलसरची लढाई दादाजीचे हयातींत झाली असल्यामुळें, ती स० १६४४ व १६४५चे दरम्यान झाली असली पाहिजे.

८. बाजी पासलकर.—हा मुसेखोऱ्याचा देशमुख. कान्होजी जेधे याप्रमाणेंच पासलकर हा मावळांत इभ्रतदार गृहस्थ होता. पुष्कळ महजरांवर त्या दोघांच्या व दादाजी कोंडदेवाच्या साक्षी आहेत. देशमुखांच्या वतनांचे तंटे तोडण्यांत हा प्रमुख होता. त्यांनीं अनेकांचे वतनी व इतर तंटे तोडल्याचे उल्लेख आहेत. वणगोजी नाईक निंबाळकर मावळांतील ह्या देशमुखांची मर्जी संभाळून असे. हे देशमुख एकमेकांचे आप्तसंबंधी असत. खून वगैरे होऊन बायकामुळें देशोधडीस लागत त्यांस बाजी पासलकर आश्रय देऊन सांभाळ करी. कान्होजी जेधे याचा त्यानेंच परामर्ष घेऊन त्यास जांवई केलें (खं. १७–१,२). कानदखोऱ्याचा बाबाजी झुंजारराव मरळ देशमुख, लहानपणीं जंगलांत लपून बसला असतां बाजीनें त्याचें संरक्षण केलें.

मरळ देशमुख—कानदखोरें.
( खं. १७–२,७७ ).

१ परसोजी=पुतळाबा.
- २ बाबाजी झुंजारराव
  - ३ कान्होजी झुं०
- तुलबाजीराव शिवाजीच्या वे.

अबई आवा
|
बाबाजी
|
कान्होजी
|
नारायणजी
|
बाबाजी
} पेशवाईत होते.

देशमुखांस कर्जाबद्दल किंवा चांगल्या वर्तणुकीबद्दल जामीन राहून त्यांच्या तो उपयोगी पडत असे. अशा इभ्रतीचा बाजी पासलकर हा मावळा देशमुख शिवाजीस आढळतांच त्यास त्यानें हाताशीं धरिलें. शिवाजीनें प्रथम मावळांतील वजनदार घराणीं, त्यांचे स्वभाव व कल ह्यांची खडानखडा माहिती स्वतः सर्व ठिकाणीं हिंडून मिळविली; आणि प्रसंग पडेल तसा त्या माहितीचा उपयोग केला. बाजी पासलकराचें पूर्ण नांव बाजी वलद बापूजी यशवंतराव पासलकर. 'यशवंतराव' हा किताब होय. स. १६४० पासून स. १७१७

पावेतों त्याचें नांव कागदात आढळतें. यावरून तो पुष्कळ वर्षें जिवंत राहून राष्ट्राची सेवा करीत होता. तुळाजी व रामाजी यशवंतराव हीं नांवे पुढें आढळतात, ते बाजीचे मुलगे असावे.

देशांत राजकीय उलाढाली चालू असून निरनिराळ्या ठिकाणचे देशमुख सरदार एकमेकांचें साह्य मागत. मुधोजी वणगोजी नाईक निंबाळकर ( स. १६३०–१६४४ ) यानें कान्होजी राजे जेधे देशमुख तर्फ रोहिडा ह्यास पुढील पत्र लिहिलेलें आहे ( खं. १५–३२७ ). 'कागद पाठविला, सकल अभिप्राय विदित झाला. लिहिलें कीं, रजा झाल्यास इसाबतीच्या कामाबद्दल हुजूर येऊं म्हणून, तरी बहुत बरवें. कागद देखतांच स्वार होऊन येणें. एके घडीचा देर न करणें. आम्हांस हजरत आलमपन्हा साहेब ( आदिलशहा ) रोहिड तर्फेस नामजाद करिताती. याकरितां स्वार होतां वेळे जवळ असलेत, म्हणजे तुम्हांस हातीं धरून इसाबती व हक्कलाजिमा व इनामबाब असे तुमचे दुमाला करवून व आपणाबराबरी नामजादी घेऊन सकल अर्थ बराच होईल. सत्वर येईजे, कोणे बाबें कांहीं फिकीर न कीजे. तुमचे जसे मनोगत आहेत तैसी सरंजामी करूं.' असेंच दुसरें एक पत्र आहे, त्यांत भोसल्यांचा संबंध आहे. 'हजरत साहेबीं आम्हांस मदतीखातर, दिलावरखान व भोसले व बाजे वजीर असे वजारतपन्हाचे मदतीस येताहेत गनीमही स्वार होऊन पलीकडे चालले. तरी तुम्ही मदतीस कृष्णाजीराजे व आम्हांस मिळवून घेणें.' ही गोष्ट स. १६४४ च्या अगोदरची आहे.

९. दादाजी कोंडदेव, चरित्र व कामगिरी.–'तारीख–इ–शिवाजी' ह्या नांवाची एक फारशी बखर इंडिया ऑफिसांतून प्रो. जदुनाथ सरकार, पाटणा कॉलेज, ह्यांस मिळाली असून, तिच्यांतले कांहीं भाग त्यांनीं मॉडर्न रिव्ह्यूमध्यें प्रसिद्ध केले आहेत ( स. १९०७ ). त्यांत दादाजी कोंडदेवासंबंधानें मजकूर आहे, तो असा: —

'स. १६३३च्या सप्टेंबरांत नागरगांव येथें मुरार जगदेवाच्या फौजेचा तळ पडला असतां सूर्यग्रहण झालें. त्या समयीं मुरार जगदेवानें आपली तुळा करून दानधर्म केला. हत्तीच्या वजनाइतकें दान करावयाचें असल्यामुळें, हत्तीचें वजन काढण्याची पंचाईत पडली. तें वजन शहाजीनें काढून दिलें, त्या वरून नागरगांव हें नांव जाऊन तुळापुर हें नांव त्या गांवास

पडलें. ह्या स्वारींत मुरार जगदेवाला शहाजीनें चांगली मदत केल्यावरून त्यानें चाकणच्या किल्ल्यापासून, पुणें, सुपें, इंदापुर व वाईपावेतोंचा प्रदेश विजापुर दरबाराकडून शहाजीस जहागीर देवविला. हिंगणी, बेरडी, देऊळगांव येथील कुळकर्ण्यांचें काम करीत असलेला दादाजी कोंडदेव म्हणून एक गृहस्थ होता, त्याजला शहाजीनें ह्या नवीन जहागिरीची व्यवस्था सांगितली, आणि त्याच्या तैनातीस एक हजारांची पागा करून दिली. सीदी हलाल नांवाचा एक गृहस्थ दादाजीच्या हाताखालीं फौजेंत ठेविला, आणि शिवाजी व जिजाबाई यांचा नीट सांभाळ करण्याविषयीं त्यास ताकीद केली. शहाजीनें फर्माविल्याप्रमाणें दादाजीनें शिवाजीला पुणें येथें आपणाजवळ आणिलें. बाहेरचे निरनिराळ्या जातींचे लोक आणून पुणें शहराची वसाहत केली, आपल्याच राहत्या घराजवळ शिवाजीस एक वाडा बांधून दिला, आणि त्याजला मोलवान कपडे व जवाहीर देऊन, व चांगलें शिक्षण देऊन, तयार केलें. शिवाजीकरितां दादाजीनें एक उत्तम शिक्षक नेमिला, आणि घोड्यावर बसणें, लढाई करणें व इतर कला थोड्याच वेळांत त्यास शिकविल्या. मुलखांतील लांडगे वगैरे जनावरें मारून, सरकार देण्याच्या रकमा नक्की करून, दादाजीनें जहागिरीच्या मुलखाची आबादानी केली. शिवाजीच्या नांवानें एक उत्कृष्ट बाग तयार करून त्यांत उत्तमोत्तम फळांचीं झाडें तयार केलीं. दादाजीची ही कामगिरी शहाजीला उत्कृष्ट पसंत पडली, पोषाख व बक्षीस देऊन शहाजीनें त्याचा चांगला गौरव केला; आणि त्यास पूर्वीं जो तनखा होता, त्यावर सातशें होनाची बढती दिली. शिवाजीची बंडाळी दादाजी कोंडदेवास आवडली नाहीं; आणि त्यानें विष घेऊन प्राणत्याग केला. त्या वेळीं शिवाजीचें वय १७ वर्षांचें होतें. त्यानें मोठा द्रव्यसंचय केला होता, तो शिवाजीस मिळाला. ह्याच पैशानें शिवाजीनें मावळ्यांची पंचवीस हजार फौज तयार केली; आणि श्यामराज नीळकंठ यास पेशवा व राघव बल्लाळ अत्रे यास चिटणीस नेमिलें. शहाजीनें आपल्या मुलाची ही योग्यता पाहून त्यास जहागिरीची व्यवस्था पाहण्याची सनद पाठवून दिली.'

ह्या उताऱ्यावरून दादाजी कोंडदेवाची बरीच उपयुक्त माहिती मिळते; आणि ती मुसलमानी तवारीखेंतली असल्यामुळें तिची किंमत विशेष आहे. दादाजी केवळ कारकून नव्हता, तो धूर्त मुत्सद्दी व इमानी नोकर असून

शिवाजीला राज्यकारभाराचें वळण त्यानें लाविलें, हें ह्यावरून उघड आहे. हिंगणी बेर्डी, देऊळगांव, मळठण हीं गांवें गारदौंडच्या पुढें रेल्वे लाइननेंच आहेत. पूर्वी भोसल्यांनीं ज्या पाटिलक्या खरेदी केल्या, त्या गांवचाच दादाजी हा कुळकर्णी होता, म्हणजे भोसल्यांस त्याची लहानपणापासून माहिती होती. मरणसमयीं त्याचें वय ७० वर्षांचें असल्यामुळें, भोसल्यांच्याच तंत्रानें त्याचा सर्व जन्म गुदरला होता. कागदोपत्रीं दादाजीस 'सुभेदार नामजाद, किल्ले कोंडाणा व महालानिहाय' असें लिहीत. म्हणजे कोंडाणा व त्याखालील मुलखाचा हा सुभेदार (हल्लीं कलेक्टर) शहाजीनें नेमिलेला होता. उत्तरेस चाकण, दक्षिणेस वाई, पूर्वेस सुपें, बारामती, इंदापूर, व पश्चिमेस सह्याद्रींतील मावळांची रांग, असा हा टापू नकाशावर पाहिला असतां कोंडाण्याच्या मध्यबिंदूवरून बंदोबस्त राखण्यास योग्य असा आहे. कोंडाण्यास लागूनच दक्षिणेस शिवापुर आहे. त्यास शिवपट्टण म्हणत, आणि १६५० च्या सुमारास तें कांहीं दिवस शिवाजीचें राजधानीचें शहर होतें. प्रथम पुण्याहूनच दादाजी कारभार पाहत होता; परंतु लष्करी ठाणें कोंडाणा किल्ला असून, तेथून पुणें जरा दूर म्हणून शिवाजीच्या नावानें शिवापुर गांव वसवून तेथेंच शिवाजीसह तो कित्येक दिवस राहिला. ह्या प्रांताची दादाजीला लहानपणापासून चांगली माहिती होती, हें एक, आणि शहाजीजवळ इमानानें व एकनिष्ठेनें त्यानें पुष्कळ दिवस नोकरी केली, हें दुसरें. ह्या कारणांस्तव विजापुरीं जातांना शहाजीनें कुटुंबाची व जहागिरीची सर्व व्यवस्था दादाजीकडे सोंपिली. 'मुज्मुदार सुभे जुन्नर' असेंही दादाजीस म्हटलेलें आहे, (खं. १८–१९).

वरील हकीकतींत दोन किरकोळ बाबतींची तफावत आहे. त्याच्य मरणसमयीं शिवाजीचें वय १६ वर्षांचें होतें म्हणजे स. १६४५ हा मरण काळ येतो. हल्लीं तो काल स. १६४७ ऑक्टोबर असा निश्चित झाल आहे. (भा. इ. सं. मं. अ. शके १८३५–अं. ५३). तसेंच दादाजीनें शिवाजीवर नाराज होऊन विष घेऊन प्राणत्याग केला, हेंही संभवत नाहीं शिवाजीच्या बंडाळींत शहाजीचें अंग नाहीं असें दाखविण्याकरितांच विजा पुरास हा प्रकार लिहून पाठविण्यांत आला असावा आणि तो शहाजीच्य तर्फेनें जाहीर करण्यांत येऊन मुसलमानी तवारिखींत नमूद झाला असावा

कारण दादाजीच्या मरणानंतर लवकरच शहाजी बंदींत पडला. दादाजी शहाजीच्या सर्व खटपटींत व कारस्थानांत आरंभापासून त्याजबरोबर असावा; शहाजीचीं सर्व धोरणें त्यास पूर्ण अवगत होतीं. साबाजी अनंत, मुरार जगदेव इत्यादि मुत्सद्दी पुरुषांचें चातुर्य त्यानें चांगलें पाहिलें असून, जहागिरीची व्यवस्था लावण्यांत त्यानें जें कौशल्य दाखविलें, तें वरील मुत्सद्यांपासून त्यानें उचललें असावें. दादाजी कोंडदेव प्रसंग आला असतां लढण्यासही कमी करीत नसे, ह्याबद्दल ( खं. १५-३०२ मध्यें ) उल्लेख आहे तो असा. ' कैलासवासी स्वामीपाशीं कान्होजी नाईक जेधे स्वारांनिशीं पुण्यास राहिले. त्यावरी दादाजी कोंडदेव शिवापुरास आले. त्या वेळीं बारा मावळांमध्यें कृष्णाजी नाइक बांदल देशमुख दाईत घेत होते. बांदलावर दादाजी कोंडदेव गेले ते समयीं कृष्णाजी बांदलानें स्वारांवरी चालोन घेतलें. स्वार पिटून काढिले. घोड्याच्या दांड्या तोडिल्या. दादाजी कोंडदेव नामोहर होऊन शिवापुरास आल्यावरी कान्होजी नाइकास बोलिले कीं, तुम्ही कृष्णाजी नाइकास भेटीस घेऊन येणें. तुम्ही हे गोष्ट मनावर धरिली तरी होईल. बारा मावळांचे देशमुख कांहीं आले आहेत, कांहीं राहिले आहेत, तेही भेटीस आणावे. त्यावरी कान्होजी नाइकांनीं कारीहून कृष्णाजी बांदल यास चार गोष्टी सांगोन पाठविल्या. त्यावरून कृष्णाजी नाईक भेटीस शिवापुरावरी आले. त्यावर सर्व देशमुख भेटले. कुल मावळे लोक जमाव करून तीन हजार लोक खलदबेलसर येथें मैदानास झुंजावयास पाठविले. ते समयीं मोगलानें चालोन घेतलें. मावळया लोकांनीं शर्थ केली. मोगल मारून लाविला. त्यांमध्यें कान्होजीचे पुत्र बाजी नाईक लहान होते, त्यांनीं निशाणाचा भाला घेऊन जमावाबरोबर गेले. तरवारेची शर्थ केली. छत्रपति स्वामींनीं मेहरबान होऊन बाजी नाइकास सर्जाराई दिली. बाई खोपडी मोगलांकडे पहिलीच गेली होती. ( खोपडे व जेधे यांचें भांडण होतें ). मावळे लोक रणामध्यें जखमी होऊन राहिले होते ते दाखवून तिनें त्यांच्या गर्दना मारविल्या. त्यावरी सर्व मावळे जमा झाले. राज्यवृद्धीतें चाललें. ''

दादाजीचा निकाल पक्षकारांस पसंत पडला नाहीं अशींही उदाहरणें आहेत. ' मग दादाजी कोंडदेव याचे कारकिर्दीस फुलाजी व बाजी मौजे भिडमावणे निमे ता मा येथें उतरले. तों सिलीमकर अवघे पळोन गेले.

त्यावरी फुलाजी नाईक याणें दादाजी पंताकडे जाऊन आपलें अवघें वर्तमान विदित केलें जे, सिलीमकर यांणीं माझे वडिलाचा मारा करून माझे वतन घेतले आहे ते त्यापासून देविले पाहिजे. तेव्हां दादाजीपंतांनीं सिलीमकर ह्यास बोलावून आणून चौकसी केली. माहालोमाहालच्या साक्षी पाहिल्या. तो सगळेच वतन हे खरे. तेव्हां दादाजी पंतांनीं फुलाजीस विचारिलें जे, सिलीमकर व तुम्ही ऐसे निमे निमे वतन खाणें. तुमच्या वांटणी करून देतों. तेव्हां फुलाजी म्हणाला कीं त्यास सुईच्या अग्रावरील मृत्तिका देत नाहीं. तेव्हां दादाजी पंतानीं मध्यस्त घालून फुलाजीस कितेक प्रकारचे सांगितलें. परंतु फुलाजीनें दादाजीपंताचें न ऐकतां माघारा का केतवणियास आला. उपरांतिक सिलीमकर यांनीं दादाजीपंतास गैरवाका समजावून लांच दिला त्यावरून दादाजीपंतीं सिलीमकर याचें अगत्य धरून फुलाजीस नेऊन बासाचा मार देऊन जिवें मारिलें. त्याचें प्रेत माघारे घरास घेऊन आले.' इ. इ. ( खं. १६-२ ).

दादाजीला देशस्थिति चांगली ठाऊक होती. मुसलमानांच्या तीन राज्यांतले झगडे व शहाजीचे उद्योग त्यानें पुष्कळ दिवस पाहिले होते. त्याची निरीक्षणशक्ति दांडगी असली पाहिजे. शहाजीला फौजेची भरती व युद्धसामग्रीचा पुरवठा करण्यांत झाला बऱ्याच गोष्टींचा अनुभव आला. देशांत लढवय्ये लोक आहेत, मात्र त्यांची शक्ति एकमेकांशीं भांडण्यांत फुकट जात आहे. हे तंटे तोडतां तोडतां दादाजीला पुरेपुरे झालें. अर्थात् ह्या तंट्यांचें मूळ कारण दूर केल्यास लोकांचा उपयोग दुसऱ्या चांगल्या कार्याकडे करून घेतां येईल असा विचार त्याच्या मनांत आला. शिवकालीन पत्रव्यवहारांत दादाजीनें निकाल लावलेल्या तंट्यांचे अनेक महजर छापिलेले आहेत. त्यांवरून दादाजीच्या उद्योगाची कल्पना करितां येते.

मावळांतील देशमुखांचें शौर्यबळ एकमेकांशीं भांडण्यांत फुकट जात होतें. हा प्रकार दादाजी कोंडदेवानें ओळखून त्यानें शिवाजीस पुढें करून त्याच्या समोर प्रथम या देशमुखांचे आपसांतले तंटे तोडिले, तेव्हां त्यांच्या वीर्यशक्तीचा उपयोग शिवाजीस आपल्या कार्याकडे करून घेतां येऊं लागला. शिवाजीची जहागीर या मुलखांत असल्यामुळें हे तंटे तोडल्याशिवाय जहागिरीची व्यवस्था सुरळीत चालणारी नव्हती. ही व्यवस्था करण्यांत दादाजी कोंडदेवाचें अंग मुख्य होतें. या सन्मान्य

पुरुषाची राष्ट्रीय कामगिरी अद्यापि लोकांपुढें चांगलीशी आली नाहीं; आणि कदाचित् येणारही नाहीं. दादाजी कोंडदेव हा मलठणचा कुळकर्णी, कोंढाण्याचा सुभेदार होता. त्याची योग्यता ओळखूनच शहाजीनें त्याजकडे मुलाचें संगोपन व जहागिरीची व्यवस्था हीं कामें सोंपविलीं. तो अत्यंत इमानी व करारी होता. शिवाजीचें शिक्षण त्याचे देखरेखीखालीं झालें, हें तर सुप्रसिद्धच आहे. मावळांच्या देशस्थितीची, तेथील रहिवाशांची व वसुलाच्या पद्धतीची त्यास चांगली माहिती होती. महजरांशिवाय इतर कागदपत्रांतूनही त्याच्या नांवाचा उल्लेख क्वचित् कोठें दृष्टीस पडतो. 'दादाजीनें व्यवस्था केली असेल तीच चालू ठेवावी, तींत फेरफार करूं नये' असे उल्लेख आढळून येतात. (खं. १८-१८, १९, २०, २५, ५ भा. इ. अ. १८३५-४ इ०). पूर्वींचीं मुसलमान रियासतींतलीं इनामें व वतनें दादाजीनें नवीन सनदा देऊन पुढें चालविलीं (खं. १७-२०) राज्य स्थायिक करण्याचें हें एक साधन होय. देशमुखांना ताब्यांत आणण्यांत त्यानें कित्येक प्रसंगीं लढाया मारल्याचेही उल्लेख आहेत. तो स्वतः आपली सही 'दादो कोंडदेव' अशी करी, आणि लोक त्यास कागदोपत्रीं 'दादाजी कोंडदेव' अशा नांवानें व मोठ्या गौरवानें लिहीत. सर्व कागदपत्रांतून दादाजीचा उल्लेख मोठ्या गौरवानें केलेला आढळतो. मावळांतील देशमुखांचे तंटे तोडल्यावर त्या सर्वांचा त्यानें एक संघ निर्माण केला. कित्येकांना त्यानें युक्तीनें शिवाजीकडे वळवून व बांदल-देशमुखासारख्या कित्येकांस लढाईनें नरम करून मावळ प्रांत काबीज केला. शिवाजी बारा वर्षांचा झाला, तेव्हांपासून सोळा सतरा वर्षांचा होईपर्यंत हीं कामें दादाजीनें शिवाजीकडून करविलीं. सारांश, शिवाजीच्या राज्याचा आरंभींचा पाया म्हणजे शहाजीची पुणेंसुप्याची जहागीर तिची व्यवस्था लावण्याचें काम दादाजीनें केलें आहे.

शिवाजीच्या शिक्षणाची देखरेख दादाजी कोंडदेवाकडे होती. हा अत्यंत सचोटीचा, प्रामाणिक, धार्मिक, व लोककल्याणेच्छु पुरुष शहाजीला लाभला हें त्याचें मोठें भाग्य होय. तत्कालानुरूप मर्दुमकीचें शिक्षण, जमीन महसूल व हिशेब; लष्कर जमवून स्वतःचा व देशाचा बचाव करण्याची आणि लोकांना संतुष्ट ठेवण्याची युक्ति, ह्या गोष्टी दादा-

जीनें शिवाजीस समजावून दिल्या; तसेंच त्यास धर्माचें व नीतीचें योग्य शिक्षण दिलें. भारत, भागवत इत्यादि ग्रंथ त्यानें शिवाजीस ऐकवून, त्यांतील युद्धकथा, नीति व धर्मांची उदात्त तत्वें त्यास पढविलीं. त्या योगानें शिवाजीच्या भावी उन्नतीचा पाया रचिला गेला. दादाजीचें वर्तन अत्यंत पवित्र व पापभीरु असल्यामुळें, त्याच्या समागमानें शिवाजीचें मन व बुद्धि हीं सुसंस्कृत झालीं. दादाजीचें जीवनचरित्र फारसें उपलब्ध नाहीं. स. १६४७ त मरणसमयीं त्याचें वय ७० वर्षांचें होतें. यावरून त्याचा जन्म सन १५७७त झाला असावा. ह्या कालांत त्यानें राज्याच्या अनेक उलाढाली पाहिल्या. त्याच्या शिक्षणाचा लाभ शिवाजीस १०।१२ वर्षेंच मिळाला; परंतु तें काम हातीं पडलें तेव्हां तो वयानें, अनुभवानें व वृत्तीनें त्यास अगदीं लायक होता. त्याची बायकोही पतिनिष्ठ साध्वी होती. पतिनिधन होण्याबरोबर ती निश्चेष्ट पडली, ती पुनरपि उठली नाहीं असें म्हणतात. हातून कांहीं आगळिक घडल्यामुळें दादाजीनें स्वतःस शिक्षा व्हावी म्हणून आपल्या हाताची बाही आजन्म आंखूड ठेविली होती. या गोष्टीवरून त्याचा करारी स्वभाव व पापभीरुता व्यक्त होते. महजरांवरून तो निष्पक्षपाती व चोख न्याय करीत असे असें दिसतें. मरणापूर्वी त्यानें शिवाजीस उत्तम प्रकारचा उपदेश केला. त्याच्या मृत्यूपासून शिवाजी, जिजाबाई व इतरांस अत्यंत दुःख झालें. दादाजीचें उदाहरण विसरून जाण्याजोगें नव्हतें. त्यानें घालून दिलेला कित्ता शिवाजीच्या दृष्टीसमोर कायम होता.

लेखनवाचनाशिवाय घोड्यावर बसणें, तिरंदाजी करणें, भाला मारणें, तरवार, पट्टा वगैरे हत्यारें चालविणें इत्यादि गोष्टी योग्य शिक्षक नेमून दादाजीनें शिवाजीस शिकविल्या. त्या योगें शिवाजीचे ठायीं साहसाची व उद्यमाची आवड उत्पन्न झाली. दादाजीनें यजमानासाठीं पुण्यांत मोठा वाडा बांधून तेथें त्याच्या राहण्याची सोय करून दिली. पुण्यास* कसबा पेठेंत हा वाडा

---

* पुणें शहरासंबंधीं कांहीं प्राचीन माहिती भा. इ. सं. मं. मार्फत प्रसिद्ध झाली आहे. मुसलमानी अंमल होण्यापूर्वीं ह्याचें नांव 'पूनक' असें असून तें हल्लींच्या शनवारपेठेच्या जागेवर होतें. मुसलमानी अमलांत त्यास पुणेवाडी म्हणूं लागले. त्या वाडीचे पाटिल झांबरे व कुळकर्णी राजार्षि अद्यापि

कसब्याचे गणपतीजवळ होता. त्यास 'राजमहाल' असें म्हणत; आणि बाहेरील बागेस राजबाग असें म्हणत (इ. सं.). शिवाजी लहानपणापासून साहसप्रिय होता. डोंगरांतून फिरणें, खेडेगांवांतील लोकांची संगत धरून उन्हातान्हांतून स्वारी शिकारी करणें, ह्या गोष्टींत तो नेहमीं गुंतलेला असे. माहितगार लोकांस बरोबर घेऊन आपल्या जहागिरींतील व आसपासच्या प्रांतांतील एकूणएक महत्त्वाच्या जागा व किल्ले त्यानें बारकाईनें पाहिले; यवनांचा बंदोबस्त प्रत्येक किल्ल्यावर कितपत आहे त्याची माहिती मिळविली; दऱ्याखोऱ्यांतून हिंडून सगळ्या चोरवाटा व हमरस्ते पाहिले; बहुतेक देशमुखांशीं ओळखी व मसलती केल्या; कोणते लोक आपल्या उपयोगीं पडतील व कोणते आपणांस हरकत करितील तें पाहून ठेविलें; अशा रीतीनें लोकसंग्रह व इतर तयारी तो करूं लागला. शिवाजीचीं हीं धाडसाचीं कृत्यें पाहून दादाजीस धास्ती वाटे. परंतु पुढें पुढें ह्या हूडपणाबद्दल दादाजीस वाईट वाटेनासें झालें. शिवाजीच्या अंगीं कांहीं लोकोत्तर गुण आहेत, व त्याच्या मनानें जी दिशा घेतली आहे, तींत अपयश आलें, तरी तें भूषणावहच होय, असें दादाजीस पुष्कळदां वाटे. थोडासा मोठा झाल्यावर किल्ले वगैरे काबीज करून शिवाजीनें पुंडाई चालविली, तेव्हां विजापुरच्या दरबारास दुखविल्यानें आपला सर्वस्वी नाश होईल असें वाटून, त्यास काय करावें हे सुचेना. ह्या बाबतींत वयोमानाप्रमाणें शिवाजी इतका तो हिंमतवान व साहसी अर्थात्च नव्हता. अशा पेंचांत त्यानें जहागिरीच्या व्यवस्थेचें बहुतेक काम शिवाजीच्या अंगावर टाकिलें आणि त्यास गुंतवून

---

पुण्यांत नांदत आहेत. शेजारीं दुसरीं अनेक खेडीं होतीं त्यांचा हळू हळू पुणें शहरांत समावेश झाला. नागझरीपलीकडे लोहगांव म्हणून खेडें होतें, तेथें तुकाराम बुवाची सासुरवाड असून, याच ठिकाणीं त्याच्या कीर्तनास शिवाजी जात असे. ह्या लोहगांवाला व इतर खेड्यांना पुढें कसबा पुणें अशी संज्ञा मिळाली. ही गोष्ट शिवाजीच्या पूर्वी घडली. ह्या कसब्याचे देशमुख शितोळे व देशपांडे होनप. यांचीं घराणीं हल्लीं पुण्यांत आपल्या जुन्या ठिकाणींच आहेत. होनप देशपांड्यांचे कागदपत्र रा. राजवाडे यांच्या १८ व्या खंडांत छापले आहेत. पेशव्यांच्या अंमलांत पुण्याचा विस्तार मोठा होऊन अनेक पेठा निर्माण झाल्या.

ठेविलें. या नवीन कामानें शिवाजीस जो अनुभव आला, तो पुढें त्याच्या उपयोगीं पडला.

शिवाजीचें हें शिक्षण चालू असतां त्यानें कांहीं गोष्टी विशेष लक्षांत ठेविल्या. ( १ ) लोकांच्या जमिनीवर सरकार देणें कसें लागू करावें; ( २ ) साऱ्याची ही रक्कम कशी वसूल करावी; ( ३ ) राज्य चालतें कसें व सरकार आपला कारभार चालवितें कसें; ( ४ ) आणि लोकांचे तंट्यांचा न्याय कसा तोडावा. ह्या गोष्टींचा अनुभव घेतल्यावर त्यास असें कळून आलें कीं रयत लोकांस शेतीवाडींत आनंद वाटला पाहिजे, आणि प्रत्येक गांवास आपला अंत:स्थ कारभार करण्याची संपूर्ण मोकळीक पाहिजे. येणेंकरून सरकारची जबाबदारी कमी होऊन लोकही संतुष्ट राहतात. हेंच धोरण शिवाजीच्या पुढें उपयोगीं पडलें. प्रस्तुत जहागिरींत चार प्रकाराची सुधारणा करण्याची अत्यंत जरूर होती:— ( १ ) प्रांताच्या बंदोबस्तासाठीं लष्कर ठेवणें; ( २ ) वाघ, लांडगे वगैरे जनावरांपासून शेतीस व लोकांस होणारा उपद्रव बंद करणें, ( ३ ) उत्पन्न वाढविण्यासाठीं जमीन महसूल ठरवून व लोकांस अनेक सवलती देऊन शेती सुधारणें आणि ( ४ ) तंटे तोडून लोकांस उद्योगास लावणें.

( १ ) लष्कर. —शहाजीची मूळची जहागीर पुणें व सुपें हे प्रांत असून पुढें लवकरच कर्नाटकांतील मोहीम फत्ते केल्याबद्दल बारामती, इंदापूर व मावळ हे प्रांत त्यास मिळाले. मावळे लोक दिसण्यांत अडाणी पण प्रामाणिक, मेहनती व चपळ होते. ह्या लोकांवर शिवाजीची भक्ति विशेष बसली दादाजीनें देशाच्या बंदोबस्ताकडे त्यांचा चांगला उपयोग केला. बिनकवाइती लोकांची एक पायदळ पलटण त्यानें तयार केली; आणि तिजवरील हुकमतीचे दर्जे ठरवून दिले. तसेंच गांवोगांव चौक्या पहारे बसवून, चोरांची भीति नाहींशी केली; आणि आपल्या हद्दींतील किल्ले वगैरे दुरुस्त करून त्यांजवर शिबंदी ठेवून दिली.

( २ ) दादाजीनें लोकांस असें जाहीर केलें, कीं जो कोणी वाघ किंवा लांडगा मारून आणील, त्यास बक्षीस मिळेल. बक्षिसाच्या आशेवर पुष्कळ जनावरें मारलीं गेलीं व देशांतील उपद्रव नाहींसा झाला.

( ३ ) शेतीच्या कामीं दादाजीनें पुष्कळ उपाय योजले. दरएक गांवीं फिरून, मलिकंबराचे पद्धतीप्रमाणें जमिनीची मोजणी व प्रतबंदी करून

दरसाल पिकाचे मानानें वसूल घेण्याचा ठराव केला. पुष्कळ वर्षेंपर्यंत साऱ्याची माफी दिल्यामुळें लोकांनीं भराभर वसाहती करून लागवड केली. लोकांच्या मालकीच्या व गांवांच्या हद्दी ठरवून दिल्या, निरनिराळ्या कामास जबाबदार माणसें नेमून दिलीं; आणि सर्व बाबतींची व्यवस्था बांधून दिली. ह्या गोष्टींचा उल्लेख ठिकठिकाणीं आढळतो ( खं.१८,१६, ७,८,९ ). ह्या व्यवस्थेनें पूर्वीं जेथें सारें रान होतें, अशा ठिकाणीं बागाईत उत्पन्न झालें; लोकवस्ती वाढली; आणि दहा वर्षांत मुलखांत आबादानी व भरभराट होऊन वसूलही पुष्कळ येऊं लागला. सारांश, जो प्रांत अहंमदनगर व विजापुर यांच्या सरहद्दीवरील कलहांमुळें पुष्कळ उद्ध्वस्त झाला होता, तोच फार उत्पन्नाचा व महत्त्वाचा आहे, असें लवकरच दिसून आलें.

( ४ ) तंटे तोडण्यासंबंधानें उल्लेख वर आला आहे. त्या वेळीं सरकारची व्यवस्था बरोबर नसल्यामुळें लोकांत भाऊबंदकीचे व वतनांचे तंटे शेंकडों वर्षें चालून त्यांतच लोकांचें सामर्थ्य गुंतून गेल्यानें दुसरे उद्योग त्यांस सुचत नसत. शिवाजीला सदरेंत बसवून त्याच्या समक्ष लोकांस आणून, पुरावा गोळा करून दादाजीनें तंट्यांचे निकाल समाधानकारक करून दिले. दहा वर्षांचे आंत तंट्यांचें निर्मूलन होऊन देशांत स्वस्थता झाली, आणि लोक जमिनी सुधारण्यांत लक्ष घालूं लागले. लोकांना आपले तंटे आपसांत तोडण्याचें हें नवीन वळण लागलें आणि त्या नमुन्यावर इतर व्यवसायांतही लोकांच्या संघशक्तीचा उपयोग होऊं लागला. सैन्याच्या पुढें कांहीं लोकांनीं जाऊन जंगल तोडून रस्ते वगैरे करावे लागतात तशा सारखेंच दादाजींचें हें आरंभाचें काम होतें.

जमिनी सुधारून शेती वाढविणें, देशांत झाडांची वगैरे लागवड करून, लोकांची वसती व आबादानी करणें, मापणी करून महसुलाचे धारे बांधून देणें इत्यादि कामें करण्यांत तत्कालीन अंमलदार कसूर करीत नसत. भोसल्यांनीं तरी पूर्वींच्याच अंमलदारांचा प्रघात पुढें चालविला स. १६१९त रोहिडखोऱ्याच्या मुसलमान अंमलदारानें झाडांसंबंधी खालील नियम बांधून दिला. 'गांवगन्ना नवी लावणी अंबराई व चिंचा व अनार व निंबोळी, यांची झाल्यास दहा झाडास एक झाड इनाम; बाकी झाडें नऊ, त्यास मुख्य राजवांटा एक व प्रजावांटा दोन उतार होईतों ( झाडास लाग

आहे तोंपर्यंत ), येणेंप्रमाणें घेणें, कौल असे. वडिलांनीं झाडझाडोरा लाविला असेल तो देशमुखास इनाम असे. कोणें बाबें अंदेशा न करितां झाडझाडोरा नवीन करून सुखी असावें. '

एवढें काम तडीस गेल्यावर शिवाजीच्या मनांत सर्व मराठ्यांचें एकराज्य करावें, ही कल्पना उद्भवली. या जास्त विस्तृत प्रयोगाची सुरवात तोरणा काबीज करून व जास्त बलवान् सरदारांवर शह बसवून शिवाजीनें केली. तेव्हां त्याजबद्दल विजापुरच्या दरबारास संशय येऊं लागला. ही विस्तृत राज्याची कल्पना पूर्णपणें राष्ट्रीय असून तिचा उद्भव शिवाजी सोळासतरा वर्षांचा असतांना म्हणजे सन १६४४ च्या सुमारास झालेला आहे. कारण रोहिडेश्वरासमक्ष ह्या प्रयोगाच्या शपथा घेतल्याबद्दलचा उल्लेख पूर्वी पृष्ठ १७१ वर आला आहे. अर्थात् स्वराज्याची कल्पना परिपक्क झाल्यावर हे प्रकार घडले. ह्या उपक्रमास दादाजी कोंडदेवाचें काम चांगलें उपयोगी पडलें. एकुणिसाव्या वर्षी तोरणा किल्ला घेऊन शिवाजीनें आपला उपक्रम सुरू केला, याचा अर्थ त्यानें पुढील विस्तृत राज्याचा आरंभ केला, असा आहे. वास्तविक राज्याचा आरंभ अगोदरच झाला होता. या कामांत शिवाजी सर्वथैव योग्य व तयार झालेला पाहून, आणि हा उद्योग आतां फलद्रूप होणार असा भरंवसा येऊन, दादाजी कोंडदेव सन १६४७ च्या ऑक्टोबरांत मोठ्या समाधानानें मरण पावला. यावरून ' स्वराज्यस्थापनेच्या विरुद्ध दादाजी शिवाजीस उपदेश करीत होता, आणि शिवाजीनें त्याचें न ऐकिल्यामुळें हताश होऊन अगर विष घेऊन दादाजी मरण पावला,' हा प्रकार केवळ काल्पनिक होय. दादाजीच्या पश्चात् त्याचा मुलगा कृष्णाजी शिवाजी पाशीं राज्याचें काम करीत होता.

१०. **स्वराज्याची कल्पना कोणाची?**—आपण आपल्या स्वपराक्रमानें उद्योग करून नांव कमवावें, हा बाणा सर्व भोसल्यांचा. तो मालोजीनें सिद्ध करून दाखविला. पुढें शहाजीनें त्यांत कशी भर घातली, हें मागील विवेचनावरून ध्यानांत येईल. प्रत्यक्ष स्वराज्याच्या खलबतांत शिवाजी व त्याची आई जिजाबाई ह्या दोघांचाच अंतर्यामीं संकल्प असावा. कित्येक समवयस्क कारकून व मावळे त्यांत होते. दादाजी कोंडदेवाची

सर्व करामत त्या कार्यास उत्कृष्ट पोषक झाली. तो अंतर्यामांत बहुधा असावा. कदाचित् नसेलही.

स. १६२६ पासून १६३६ पर्यंतच्या दहा वर्षांत शहाजीनें, निजामशाहीच्या नांवानें पण वस्तुत: पूर्ण स्वतंत्रतेनें-राज्यकारभार केला. नानातऱ्हेचीं कारस्थानें रचिलीं. आदिलशाही व कुत्बशाही यांच्याशीं केव्हां संधान ठेवून तर केव्हां जरब दाखवून शहाजीनें आपलें वर्चस्व कायम ठेविलें, आणि दहा वर्षें पावेतों शहाजहानसारख्या पराक्रमी मोगल बादशहास दाद दिली नाहीं. दहा वर्षांत मोगलांची लाख दोन लाख फौज सारखी शहाजीच्या छातीवर होती. निजामशाहीची फौज सोडूनही शहाजीची स्वत:चीच अशी सुमारें ४०।५० हजार फौज नेहमीं जय्यत तयार असे. हातांत मुबलक द्रव्य असल्यावर देशांतील लढवय्ये लोक नोकरीस ठेवून त्यांच्या मदतीनें हिंदुस्थानांत राज्य स्थापन करणें शक्य आहे, हा जो मोठा शोध पुढें शंभर वर्षांनीं डुप्ले व क्लाइव्ह यांनीं जगाच्या निदर्शनास आणिला, तो शहाजीनें स्वत: आगोदरच प्रत्यक्ष अंमलांत आणिला होता. त्याचें पारिपत्य करण्याचें काम शहाजहानच्या हातून कधींच झालें नाहीं. शहाजीशहाजहानांचाच प्रकार शिवाजी-औरंगजेबांसंबंधानेंही पुढें तसाच घडून आला. जें काम लढून होत नाहीं, तें शहाजहाननें मुत्सद्देगिरीनें तडीस नेलें. विजापुरकरांच्या मध्यस्थीनें शहाजीशीं कशीबशी तडजोड करून शहाजहाननें निजामशाही बुडाविली. आदिलशाहीच्या वांटणीस आलेला मुलूख विजापुरच्या दरबारानें शहाजीस जहागीर म्हणून देऊन टाकिला; कारण तो मुलुख शहाजीकडून हिसकून घेणें शक्य नव्हतें; आणि घेऊनहि त्या अवघड प्रदेशांत त्यास राज्यव्यवस्था ठेवतां आली नसती. ह्याच मुलखांत शहाजीची मालोजीच्या वेळेपासून मिळालेली वडिलोपार्जित जहागीर होती. या जहागिरींतच शिवाजीचीं पहिलीं दहा वर्षें मातुःश्रीच्या सहवासांत गेलीं. सांगण्याचा मुद्दा इतकाच कीं, स्वतंत्र राज्यस्थापनेचा प्रयोग प्रत्यक्ष शिवाजीच्या बापानेंच करून दाखविला होता. कदाचित् तो व्यक्तीपुरता अगर आपल्या घराण्यापुरता असेल. राष्ट्राची विस्तृत कल्पना शहाजीच्या मनांत नसावी.

शहाजीचा जन्म मुसलमानी राज्यांत झाला. त्याचे सर्व पराक्रम व सर्व कमाई मुसलमानी राज्यें तारण्यांत सिद्ध झाली होती. मुसलमानी धर्मा-

विषयीं त्याचे मनांत वैर नव्हतें. शिवाजीनें धारण केलेलें गोब्राह्मणप्रतिपालकत्व शहाजीस ठाऊक नव्हतें. फार फार तर मोगलबादशाहीला दक्षिणेंत वाढूं न देतां, दक्षिणच्या सर्व राजांनीं एकमत करून मोगलबादशाहीचा प्रतीकार करावा, आणि दक्षिणच्या राज्यांत आपल्या सारख्या सरदारांचें प्राबल्य असावें, अशा प्रकारचे शहाजीचे विचार होते. संपूर्णपणें मुसलमानांस झुगारून देण्याइके त्याचे विचार पुढें गेले नाहींत. हा नांवाचा फरक शिवाजीनेंच प्रथम दूर केला.

मुसलमानी राज्यांत न्याय अपवादात्मक होता. 'ऐसा अंधेर कारभार बादशाहीमध्यें कोणी मनास आणीत नाहींत. पैके पावले म्हणजे एकाचें वतन एकास देतील,' (खं. ५–३). स्त्रियांवर बलात्कार, हिंदूंचे खून, हिंदूंचीं मंदिरें फोडणें, गाई मारणें, इत्यादि अनन्वित प्रकार उघड सर्व समाजापुढें होत होते. जिजाबाईच्या पित्यास व बंधूस निजामशहानें ठार मारिलें. प्रत्यक्ष तिला वैजापुराहून मोगलांनीं पकडून गेलें. खेळोजी भोसल्यास औरंगजेबानें ठार मारिलें. मुसलमानी अमदानींत अब्रूनें उद्योग करून स्वतंत्र लौकिक मिळविण्याचें व धर्माचरण करण्याचें साधन कोठेंच राहिलें नाहीं. अशा स्थितींत स. १६४२–४३ च्या सुमारास शिवाजी विजापुरास गेला असतां गोवध वगैरे प्रकार पाहून त्याच्या चौकास मनांत निराळीच कल्पना उद्भवली. याच सुमारास शिवाजीचा मासरा मुधोजी निंबाळकर मारला जाऊन मेहुणा बजाजीस मुसलमानी धर्म पत्करावा लागला. अशा गोष्टींनीं शिवाजीच्या मनांत चेतना उत्पन्न झाली. मुसलमानी राज्यासंबंधानें लोकांत मोठा आब होता. ह्या धाकावर राज्य चाललेलें होतें; कारण राज्याची खरी शक्ति किती होती, ती प्रसंगोपात शहाजीनें अजमावून पाहिलीच होती. विचार करतां करतां शिवाजीच्या मनांतून हा आब व हा दिखाऊ वचक हळू हळू नाहींसा झाला; आणि त्याच्या विचारांनीं निराळी दिशा घेतली. त्याचा स्वाभिमान व स्वातंत्र्यप्रीति जागृत झाली.

ह्या बातींत आईचें व त्याचें एकमत होतें. त्या मानी बाईची स्थिति एकंदरींत अगदीं निराधार झाली होती बाप व नवरा या दोघांशीं विरोध असल्यामुळें तिची सर्व भिस्त शिवाजीवर होती. उभय कुलाहून अधिक असा कांहीं तरी लोकोत्तर पराक्रम शिवाजीकडून झाला तरच आपला

तरणोपाय आहे, आणि जगण्याचें सार्थक आहे, असें तिला वाटत असे. अशा विवंचनेंत जवळच्या मंडळींशीं रोज त्याच विषयाची चर्चा करून तिनें पुढील उद्योगाचा मार्ग हळू हळू कायम केला. या खलबतांत शिवाजी नेहमीं पुढें असे. याच धोरणानें तिनें त्याला लहानपणापासून वाढविलें. त्याचें लहानपणचें चिन्ह पाहून तिच्या मनांतील स्फूर्ति दुणावत गेली. सारांश, जी गोष्ट शहाजीनें प्रत्यक्ष करून दाखविली, तीच तिनें उचलून, आणि तींत स्वयंस्फूर्तीची भर घालून, ती तडीस नेण्याकरितां शिवाजीच्या हवालीं केली.

शिवाजीच्या उपक्रमाची यथायोग्य माहिती अद्यापि सांपडलेली नाहीं. शिवाय वर जे कित्येक देशमुख वगैरे त्याचे साह्यकारी दिले आहेत, तसे आणखी किती तरी पुरुष त्याचे बरोबर कामास असतील. शिवाजी व त्याचे सोबती लहानपणीं चोऱ्यामाऱ्या करून एक प्रकारचा भुरटेगिरीचा खेळ करीत, असा सामान्यतः लोकांचा समज आजपावेतों होता, तो उगाच आतां कोठें थोडा दूर होत आहे. शिवाजीचा खेळ भुरटेगिरीचा नसून, आरंभापासून मावळांत व्यवस्थित राज्यपद्धति निर्माण करण्याचा होता. ह्याचा त्यानें वारंवार निरनिराळ्या इसमांशीं खल केला; डोंगर, किल्ले, खोरीं, सर्व प्रदेश स्वतः हिंडून तपासून पाहिले; आणि निरनिराळ्या ठिकाणची अव्यवस्था मोडून त्यानें शिस्त निर्माण केली. मुख्य देशमुख शिवाजीच्या बाजूस वळल्यावर, त्यांचे हस्तक जे देशपांडे, तसेंच गांवोगांवचे पाटील व कुळकर्णी ते आपोआप शिवाजीच्या पक्षांत आले. ह्या उपक्रमास विरुद्ध असलेले बांदल देशमुख, सुपेकर मोहिते, जावळीकर मोरे वगैरे मंडळींशीं शिवाजीला निराळाच पंथ पुढें योजावा लागला.

दादाजी नरसप्रभु, जेधे देशमुख इत्यादि लोकांशीं शिवाजीनें फितवा सुरू करून युक्तिप्रयुक्तीनें मावळांतील वतनदार लोकांस फोडिलें, हीं कारस्थानें अफझलखानास ठाऊक होतीं, आणि शिवाजीविषयीं तोच विशेष जळफळत होता. म्हणूनच ह्या दोघांचें प्रकरण पुढें विकोपास गेलें.

**११. पहिल्या उपक्रमाची सिद्धि.**—ह्या सर्व गोष्टी करितांना शिवाजीस उत्तम व जरूर असें राष्ट्रीय शिक्षण प्राप्त झालें. त्यानें जमीनमहसुलाची व राज्याची जी व्यवस्था पुढें बांधिली, ती दादाजीनें घातलेल्या पायावर रचिलेली होती. न्यायमनसबा करितांना दादाजी हा शिवाजीस लहानपणापासूनच आपलेजवळ बसवून घेत असे. तसेंच

जमाबंदीची व लोकस्थितीची माहिती होण्याकरितां त्यास आपले बरोबर गांवोगांव हिंडवी.

शिवाजीबरोबर दुसरीं कित्येक माणसें वाढलेलीं होतीं. दादाजीचा वचक मोठा होता. दादाजीचे हाताखालील कित्येक कारकूनमंडळी व बाहेरचे कित्येक मावळे लोक हे शिवाजीस मिळून असत. तो लहानपणीं कित्येक मसलती व कारस्थानें करी, त्यांत या मंडळीची सल्ला व मदत त्यास पूर्णपणें मिळत असे. दादाजीच्या कानावर न जातां परभारें अनेक उलाढाली ते करीत. आबाजी सोनदेव, रघुनाथ बल्लाळ कोरडे व बाळकृष्णपंत मुजुमदार हे नवीन दमाचे कारकून दादाजीच्या हाताखालीं कामें करीत होते. तसेंच येसाजी कंक, तानाजी मालुसरे, बाजी पासल्कर, कान्होजी जेधे वगैरे मावळे लोक, गोमाजी नाईक पानसंबळ वगैरे घरची मंडळी, यांचेंही शिवाजीस चांगलें पाठबळ होतें. या मंडळीच्या साह्यानें मावळ प्रांतांत वरचेवर फिरून तेथील दऱ्या, खोरीं, बिकट वाटा, ह्यांची शिवाजीनें चांगली ओळख करून घेतली. गांवोगांव फिरून देशस्थिति पाहवी, स्वारी शिकारी करावी, शेटसावकारांची ओळख करून घ्यावी, असा क्रम शिवाजीनें चालविला. त्याचें वर्तन इभ्रतीचें असल्यामुळें, सर्वांवर त्याचें वजन चांगलें पडत चाललें. सारांश, मुसलमानशाहींत मराठे लोकांचा अपमान व उच्छेद होत असे, तो कोणत्या रीतीनें दूर करावा याचा विचार करण्याकडे शिवाजीचें मन वेधलें. त्याच्या मनांत आलें कीं, 'जें वडिलांनीं मेळविलें, तें खाऊन राहणें योग्य नाहीं. आपण हिंदु, सर्व दाक्षिण देश यवनांनीं ग्रासिला; देव ब्राह्मण गायी ह्यांस व क्षेत्रांस पीडा केली, धर्म बुडविला. ह्या रक्षणार्थ प्राणही वेंचून धर्म रक्षूं; व आपले पराक्रमें नवीन दौलत संपादूं. तें अन्न भक्षूं. नवें साधावें हें या कुळांत जन्मल्याचें सार्थक. दैवावर भार न घालूं. पुरुषयत्न बलवत्तर होय. दैव पंगु आहे, यास्तव प्रयत्न अचळ करावे. त्यास दैव जसें अधिक साह्य होईल, तसतसें अधिक करीत जावें. दैव परिणामास नेणार समर्थ आहे.' दादाजीस सल्ला विचारितां त्यानें सांगितलें, 'वडिलीं दौलत संपादिली, ती गमावली हें तुमच्या वांट्यास येऊं नये.' दादाजीच्या बोलण्यांतील गुण तेवढे घेऊन शिवाजीनें दोषांकडे लक्ष दिलें नाहीं. पुढें 'कारकून सरदार वगैरे ममतेंत मसलतींत येतील त्याप्रमाणें घेऊन, आणखी चांगले

मर्द शिपाई पाहून त्यांस जवळ ठेवावे. कारकून चांगला कर्ता लिहिणार पाहून त्यास ठेवावा. तसेंच राजकारणें करावीं; मातबर चहूंजागचे मराठे यांसीं आप्तपणा करावा; पत्रें लिहावीं; त्यांस आणून भेट घ्यावी, आपण त्यांजकडे जाऊन आम्हांस अनुकूळ असावें असें बोलावें. असें करण्यांत ज्यांनीं महाराजांचें बोलणें परम आदरानें व पराक्रमाचें ऐकावें, त्यांस वेध लागून वाटावें कीं, हे परम थोर आहेत. यांचेच संमतें चालावें, हे सांगतील तसें चालावें. प्राणही गेले तरी जावोत, परंतु सेवा करून यांचे आज्ञेत चालावें. अशीं सर्वांचीं चित्तें वेधून घेतलीं.' (शिवछत्रपतीचें सप्तप्र. चरित्र पृ. २९–३०. ) हें कार्य शिवाजीनें कसें उपक्रमास आणिलें हें आतां सांगावयाचें.

स. १६३८ साल शिवाजीच्या हालचालींचा प्रारंभ असें धरण्यास हरकत नाहीं. बेंगरुळाहून परत येतांना शामराव नीलकंठ पेशवे, बाळकृष्णपंत मुजमुदार, सोनोपंत डबीर, व रघुनाथ बल्लाळ कोरडे सबनीस ह्या मंडळीस शहाजीनें शिवाजीबरोबर पुण्यास पाठविलें. पुण्यास येतांच ' बारा मावळें काबीज केलीं, मावळे देशमुख बांधून, दस्त करून, पुंड होते त्यांस मारिलें. ' ( सभासद ). मावळे सरदारांस मसलतींत घेऊन, त्यांस अनुकूल करून घ्यावें, त्यांस पत्रें लिहावीं व भेटावें; असें करूं लागले, ( चिटणीस ). पुण्याखालील बारा मावळांत उत्तरेस राजमाची व चाकणपासून दक्षिणेस रायरेश्वराचा डोंगर, अंबेड खिंड, व खांबटकीचा घांट ह्या स्थानांपर्यंतचा मुलूख येतो. हींच पुण्याखालचीं बारा मावळें शिवाजीनें प्रथम काबीज केलीं. ह्या मुलखापैकीं राजमाचीचा किल्ला, कल्याण भिंवंडी येथील मुल्ला अहंमदाकडे होता. बिलाल हबशी लोहगडावर राहून, अंदर, नाणें व पवन ह्या तीन मावळांचा बंदोबस्त ठेवी. फिरंगोजी नरसाळा चाकणच्या किल्ल्यावरून घोटण, पौड व मुसें ह्या तीन मावळांवर ताबा राखी. गुंजण मावळ तोरण्यावरील किल्लेदाराच्या देखरेखीखालीं होतें. वेळवंड व भोर हीं तेथील देशमुखांच्या हातांत होतीं. हिरडस मावळांत बांदल देशमुख नांदत होते; व शिवथर खोरें बाबाजी कोंडदेवाच्या ताब्यांत होतें. पूर्वेकडील मुलुखांत पुणें व सिंहगड दादाजी कोंडदेवाकडे होते. पुरंदर किल्ला निळो नीळकंठ नाइकवाडी याजकडे व सुपे प्रांत शहाजीचा मेहुणा संभाजी ( बाजी ? ) मोहिते याजकडे होता.

येणेंप्रमाणें स. १६३८ च्या सुमारास राजमाची, लोहगड, चाकण, पुरंदर, तोरणा व रोहिडा या किल्ल्यांमध्यें पुणें प्रांतांत शिवाजीची स्थापना झाली होती. ह्या प्रांतांत राहून बाहेरच्या लगत्यास शिवाजीस आपला अंमल बसवावयाचा होता. ह्या खटपटीचा उपक्रम स. १६३८ पासून ४६ पर्यंतच्या अवधींत बारा मावळांतील देशमुखांना दस्त करून व बांधून ह्या मुत्सद्यांनीं केला. मावळांतील जे देशमुख शिवाजीला अनुकूल झाले त्यांस त्यानें बांधिले, म्हणजे आपल्याला बांधून घेतले; जे प्रतिकूल होते, त्यांस नरम केले; जे केवळ पुंडाई करून होते त्यांस जिवें मारिलें. देशमुखांना अनुकूल करून घेण्यांत ज्या राज्यकार्यकुशल मुत्सद्याचा उपयोग शिवाजीस झाला, त्याला डबीर म्हणजे युक्त्यभिज्ञ हा हुद्दा शिवाजीनें दिला. तोच सोनोपंत डबीर होय. ज्या हुद्देदारानें त्यांस दस्त केलें, त्यास म्हणजे श्यामराज नीळकंठ यास त्यानें पेशवाई म्हणजे मुख्य प्रधानकी दिली, आणि ज्या लहानशा सैन्याच्या जोरावर त्यानें पुंडांना जमीनदोस्त केलें, त्या सैन्याची व्यवस्था ठेवण्याकरितां एक सबनीस नेमावा लागला, तोच रघुनाथ बल्लाळ कोरडे होय. येणेंप्रमाणें बारा मावळें काबीज करितांना हे हुद्देदार अस्तित्वांत आले. मुलूख ताब्यांत आल्यामुळें जमाखर्चाचें काम पडूं लागलें तेव्हां अमात्याची जरूर लागली, व तें काम बाळकृष्णपंत याजकडे शिवाजीनें दिलें. हे अधिकारी सन १६४३ च्या सुमारास निर्माण झाले. सन १६४६ पर्यंत शिवाजजवळ घोडदळ नसून फक्त पायदळ होतें. वरील चारही हुद्देदारांचा पेशा केवळ लष्करी होता. सन १६४१ त शहाजी विजापुरास आला असतां शिवाजी त्यास तेथें जाऊन भेटला. विजापुरांत कांहीं उद्दामपणाचीं कृत्यें शिवाजीनें केलीं असें बखरकार म्हणतात, तीं ह्याच वेळचीं असावीं. त्याचें वय १४ वर्षांचें होतें. विजापुरास असतां मुसलमानांचा हिंदूंवर जुलूम कसा होतो, याजबद्दल शिवाजीची चांगली खात्री झाली. लगेच पुण्यास आल्यावर त्यानें आपल्या उद्योगाची सुरुवात झपाट्यानें चालविली.

शहाजी, जिजाबाई, शिवाजी, दादाजी कोंडदेव, प्रभु देशपांडे, मावळे देशमुख व सरदारघराणीं ह्या सर्वांचे ठिकाणीं त्या संधीस एक विशिष्ट राष्ट्रीय भावना उत्पन्न होऊन तिच्या योगानें महाराष्ट्रीय वातावरण उचंबळून गेलें होतें. त्याचा परिणाम शिवाजीच्या आरंभास परिपोषक होऊन

त्यास पुढें अनेक साहसांचीं व राष्ट्रोद्योगाचीं कृत्यें करण्याची शक्ति आली. वरील प्रत्येकाचा उद्योग व हेतु स्वराज्यघटनेस पोषक झाला. सर्वांनीं एकत्र संगनमतानें बुद्धिपुरःसर जरी ही घटना सुरू केली नसली तरी एकमेकांचा उद्योग एकमेकांस सूचक व साह्यकारक झाला. शहाजीच्या उद्योगानें व उलाढालीनें स्वराज्याचे मूर्तिमंत नमुने लोकांच्या डोळ्यासमोर आले. रयतेची आबादानी व मुलखाची व्यवस्था दादाजीनें केली. रामदासानें पारमार्थिक हेतूंची ऐहिक कर्तव्यांशीं सांगड घालून लोकांचे मनांत आत्मप्रत्यय व वीर्यतेज यांची प्रेरणा आपल्या उज्ज्वल व निरिच्छ वाणीनें केली. नानाप्रकारचीं संकटें सहन करितांना जिजाबाईच्या मनांत नवीन निश्चय उत्पन्न होऊन त्या निश्चयाच्या जोरावर तिनें शिवाजीला अप्रतिम प्रोत्साहन दिलें. शिवाजीच्या अंगाचा प्रत्येक कण अशा या परिस्थितींतच सर्वस्वी बनला असल्यामुळें पुढील प्रचंड काम सिद्धीस नेण्याची धमक उत्पन्न होऊन त्यानें लायक इसम व साधनें निर्माण केलीं. अशा रीतीनें जी तयारी झाली ती कोणत्याही कसोटीनें तपासून पाहिली तरी पुढील कार्यास योग्य व पुरेशी होती, असें दिसून येतें. शिवाजीनें वादळ उत्पन्न करून त्याजवर आरूढ होऊन अश्वाप्रमाणें त्याला आपल्या उद्दिष्ट कार्याप्रत नेलें, असें ओवेन म्हणतो पूर्वी देशांत जुलमाच्या दडपणाखालीं निराशा व उद्वेग सर्वत्र पसरला होता. हा प्रकार मोडून शिवाजीनें सर्वत्र चळवळ उडवून दिली. लोक अस्वस्थ झाले. फार दिवस चालत आलेला मनु एकदम पालटूं लागला. प्रत्येकास स्वतंत्र विचार करण्याची जरूर भासूं लागली. दहावीस वर्षें शिवाजीनें अशी जबरदस्त खळबळ देशांत उडवून दिली कीं, तिच्या योगानें पादशहापासून तों शेतकऱ्यापर्यंत प्रत्येकाला स्वतःचा म्हणून कांहीं तरी स्वतंत्र पंथ पाहवा लागला. त्यांत कांहीं शिवाजीच्या बाजूला वळले, कांहीं त्याच्या विरुद्ध झाले. स्वस्थ मात्र कोणाला बसतां येईना. राष्ट्रांत प्रचंड घडामोडी होतात, त्यापूर्वी अशी खळबळ उडालेली इतिहासांत पुष्कळदां दिसून येते.

स. १६४६ पर्यंत मुलकी व न्याय खात्यांची उत्पत्ति शिवाजीनें केली नाहीं. त्या वेळीं शिवाजीच्या ताब्यांत किल्ले नसल्यामुळें किल्ल्यांवरील नामजाद लोक ठेवण्याचीही त्यास आवश्यकता नव्हती. तथापि मावळांतील

जो मुलूख त्याच्या ताब्यांत आला, त्यांत दोघांची राजसत्ता उत्पन्न झाली. शिवाजीनें वर सांगितलेले नवीन अधिकारी नेमिले, त्यांशिवाय पूर्वापरचे आदिलशाही म्हणजे शहाजीच्या तर्फेचे अंमलदार कायम होतेच. शिवाजीचा प्रधान श्यामराज नीळकंठ, तर शहाजीचा दादाजी कोंडदेव; शहाजीचा मुज्मुदार नारो सुंदर, तर शिवाजीचा बाळकृष्णपंत. केव्हां केव्हां दादाजीसही मुज्मुदार म्हटलेलें आहे. मावळांतील देशमुखांना दस्त करण्याचें शिवाजीचें काम चालू होतें. आदिलशाही सत्तेचे अगदीं शेवटले असे सामर्थ्यवान् प्रतिनिधि म्हटले म्हणजे हे देशमुख होते. शिवाजीसारख्या नव्या राजपुरुषाला त्यांनीं अडथळा करावा हें योग्यच होतें. आपला घराचा पाया मजबूद करण्याकरितां ह्या देशमुखांची व्यवस्था लावणें शिवाजीला भाग पडलें. मात्र ह्या गोष्टी विजापुरच्या दरबारास कशा पसंत पडल्या, व शिवाजीवर एकदम स्वारी करून त्याचा त्यांनीं बंदोबस्त कां केला नाहीं, हें समजत नाहीं. लवकरच शिवाजीस किल्ल्यांची जरूर भासूं लागली. तेव्हां त्यानें राजगड बांधून तोरणा काबीज केला, ( सन १६४६ चा सुमार ). बांदल देशमुख शिरजोर होते, त्यांना दस्त करण्यास हे किल्ले उपयोगी पडले.

मावळांतील वजनदार देशमुखांचें साह्य शिवाजीनें आरंभींच मिळाविलें. घांटावरील मावळांच्या बंदोबस्तांत शिवाजीस जसा बाजी पासलकराचा उपयोग झाला, तसाच घांटाखालील कोंकणांतील डोंगरी प्रदेशाची व्यवस्था करण्यांत तानाजी मालुसऱ्याचा उपयोग झाला. मावळांतल्या देशमुखांप्रमाणेंच कोंकणचे हे लोक ' राव ' म्हणून प्रसिद्ध असून तेही क्षत्रियच आहेत, आणि त्यांचाच उपयोग शिवाजीनें करून घेतला. अशा रीतीनें मावळ प्रांत शिवाजीचे कबजांत आला; आणि तेथें शेतीची, वसुलाची वगैरे व्यवस्था लागली. हाच शिवाजीच्या राज्याचा मूळ पाया होय. ज्या मुलखांत शेंकडों वर्षें अंदाधुंदी माजून राहिली होती त्याची सुव्यवस्था वरप्रमाणें दादाजी कोंडदेवाच्या मदतीनें शिवाजीनें केली. यांत शिवाजीला तर राज्यस्थापनेचा पहिला प्रयोग करून पाहतां आला; आणि हा प्रकार शहाजीस व विजापुरच्या सरकारासही आवडला, कारण ह्या अवघड प्रदेशावर विजापुरचा अंमल पूर्वी कधींही चांगलासा बसला नव्हता.

सारांश, हल्लींच्या बहुतेक पुणें जिल्ह्यास वेष्टून जी शहाजीची जहागीर होती, तेवढया भागांत एक लहानसें, व्यवस्थित व नमुनेदार, नांवानें परतंत्र पण वस्तुतः सर्वांशीं स्वतंत्र, असें राज्य स. १६३९ पासून ४६ च्या सात वर्षांत निर्माण झालें. तें इतकें व्यवस्थित झालें कीं, इतर आदिलशाही मुलखाच्या मानानें लोकांस ह्या राज्यांत ज्यास्त सुख व ज्यास्त विश्वास वाटूं लागला. लोकांची स्थिति सुधारली; चोऱ्यामाऱ्या व दंगे बंद होऊन शांतता झाली; सरकारचा वसूल वेळेवर येऊं लागला. शिवाजीच्या मनांतलें लहान राज्य निर्माण झालें. पुढील विस्तृत उद्योगाचा पाया पुरा झाला. त्याचें स्वरूप अद्यापि झांकलेलें होतें. पुढचे विचार शिवाजीला सुचत होते. दादाजी व शहाजी ह्यांना बहुधा त्यांची कल्पना नव्हती. शिवाजीनें आपले प्रधान वगैरे नेमून सर्व व्यवस्था संपूर्ण केली. स. १६४६ त ' छत्रपति ' ही पदवी शिवाजीला सरकारी कागदांत वापरूं लागले. [ सरस्वती मंदिर—अस्सल कागद. ]

---

## प्रकरण सहावें.

## राज्यस्थापनेची तयारी व परिस्थिति.

१. पायाची मजबुदी व व्यवस्था.
३. ह्या उपक्रमाचे लाभ.
   (१) बाळाजी आवजी (२) लोकसंग्रह.
४. शहाजीची कैद ( स. १६४८ ).
५. दोन प्रसिद्ध व्यक्तींचा खेळ.
७. औरंगजेबाचो गोवळकोंड्यावर झडप.
९. शिवाजीचा मोगलांशीं संबंध.

२. विशिष्ट कृत्यें:—
   (१) तोरणा. (२) राजगड.
   (३) संभाजी मोहिते. (४) चाकण.
   (५) कोंडाणा. (६) पुरंदर.
   (७) कल्याण. (८) कोंकण.
६. औरंगजेबाचा दक्षिणेंतील कारभार.
८. औरंगजेबाचा आदिलशाहींतील डाव.
१०. औरंगजेबशिवाजींचे विरोधी कावे.

**१ पायाची मजबुदी व व्यवस्था.**—शिवाजीचा पहिला उपक्रम स. १६४५ त संपला. तेथपासून पुढें सात वर्षेंपर्यंत शिवाजीचा वेळ पहिल्या पायाची मजबुदी करण्यांत गेला. प्रथमचा त्याचा उद्योग केवळ जहागिरी-

पुरता होता. परंतु आजूबाजूचा प्रदेशही त्याच धरतीचा असून शिवाजीला तो सर्व सलंग करून, किल्ले, फौजा व राज्यव्यवस्था ह्यांनीं मजबूद करावयाचा होता. जुन्नरवरून वसई, वसईवरून राजापुर, राजापुरवरून इंदापुर, आणि इंदापुरवरून जुन्नर, असा हा टापू पुढील सात वर्षांच्या उद्योगानें शिवाजीनें हस्तगत केला. त्यांतील ठिकठिकाणचे किल्ले त्यानें मजबूद करून त्यांजवरून प्रदेशसंरक्षणाची तजवीज ठेविली. फौज वाढविली. राज्यव्यवस्था ठरविली. हीं कृत्यें करण्यांत त्याचे विजापुरकरांशीं व मोगलांशीं कसे संबंध आले, आणि त्याच्या उद्योगावर ह्या बाह्य स्थितीचा काय परिणाम घडला, हें ह्या प्रकरणांत स्पष्ट करावयाचें आहे.

स. १६४६ त शिवाजीनें नवीन विस्तृत उद्योग सुरू केला, त्यानंतर लवकरच दादाजी मरण पावला. ह्या वेळीं शिवाजीचें वय १९।२० वर्षांचें होतें. ह्या ठिकाणीं त्याच्या आयुष्याचा पहिला भाग संपला, असें म्हणण्यास हरकत नाहीं. येथून पुढें त्याचा उद्योग अंतकाळपर्यंत सारखा स्वतंत्र राज्य स्थापण्यासाठीं चालू होता. शिवाजी स्वतंत्र कारभार करूं लागल्याचें जाहीर होतांच लोक आपण होऊन त्याच्या आश्रयास येऊं लागले. कित्यक त्याचा आश्रय मिळविण्याची इच्छा करूं लागले. येथून पुढें राज्याचा उपक्रम त्यानें व्यवस्थितपणें व फार सावधगिरीनें केला. उगाच विचार करीत तो स्वस्थ बसला नाहीं. सिद्धि येत गेली, तसतसे त्याचे प्रयत्न वाढले. त्यानें लोकांचीं मनें आपणाकडे आकर्षून घेतलीं. केव्हांही तो कचरला नाहीं. दुःसाध्य कृत्यास हात घालून पुढें माघार घेण्याचा प्रसंग येऊं नये, या शहाणपणाच्या पद्धतीस अनुसरून अखेरपर्यंत शिवाजीचें वर्तन होतें. देशकालवर्तमान, परिस्थिति, स्वपरबलाबल इत्यादि सर्व गोष्टींचा पुरता विचार करून, शिवाजीनें आपला कार्योपक्रम ठरविला होता. प्रत्येक कार्य अमुक मुदतींत संपवावयाचें असा त्याचा निर्धार पदोपदीं व्यक्त होतो. मागील अनुभवाचा पूर्ण उपयोग पुढील कार्यांत त्यानें केला नाहीं, असा प्रसंगच नाहीं. सारांश, नेहमीं सावध व साशंक राहून व साह्यकर्त्यांच्या सल्ल्यानें दूरवर विचार करून, तो प्रत्येक कार्य हातीं घेत असे. हे विचार पुढील सर्व कृत्यांस सारखे लागू पडतात, आणि तत्कालीन कागद वाचून ते व्यक्त होतात.

वास्तविक शिवाजीच्या चरित्राचे भाग पृथक्पणें पाडतांच येत नाहींत. कारण अमुक एक प्रकार संपला व दुसरा सुरू झाला, असें त्यांत कांहीं नाहीं. मोगल बादशहा व आदिलशहा ह्यांच्याशीं शिवाजीचे युद्ध प्रसंग झाले; परंतु त्या दोघांचा वर्तनक्रम एकमेकांस विरोधी असल्यामुळें, युद्ध किंवा तह हल्लींप्रमाणें जाहीर रीतीनें प्रसिद्ध होत नसत व टिकत नसत. तथापि उघड रीतीनें आतां विजापुरकरांशीं शिवाजीचें वैर सुरू झालें; म्हणून पुढील भागास विजापुरकरांशीं बेबनाव असें नांव देतां येईल. हा बेबनाव घडण्यापूर्वी शिवाजीनें विशिष्ट कृत्यें कोणतीं केलीं तें प्रथम सांगितलें पाहिजे. शिवाजीनें आपल्या कार्यास हात घातला, त्या वेळेस घाटमाथ्याच्या भागांतील किल्ल्यांवर फौजफांटा नसून, त्यांची डागडुजी ठेविलेली नव्हती. किल्लेदार बाहेरच्या राजांस न जुमानतां सभोंवारच्या टापूवर आपला अंमल गाजवीत. निजामशाहीचा शेवट झाल्यानें ही बेबंदशाही ज्यास्तच वाढली. दिल्लीचे मोगल व विजापुरकर यांचीं युद्धें याच प्रदेशांत चालू झालीं. यांतील बराच भाग शिवाजीच्या जहागिरीस लागून होता, म्हणून या बंडखोर किल्लेदारांशीं शिवाजीच्या आरंभीं खटपटी झाल्या. औरंगाबादेस मोगलांचें ठाणें होतें. त्यांजशीं अगर विजापुरकरांशीं उघड शत्रुत्व जोडण्याचें साहस प्रथम शिवाजीनें केलें नाहीं. जहागिरीच्या सभोंवारचे किल्ले विजापूरकरांच्या दुर्लक्षामुळें अव्यवस्थित झाले होते, ते आपल्या ताब्यांत घेऊन, त्यांची दुरुस्ती ठेविल्यास थोड्या श्रमानें व थोड्या खर्चानें जहागिरीचें रक्षण होऊन, आपल्या इष्ट कार्याचा पाया मजबूद होईल, असें शिवाजीस वाटलें. याप्रमाणें जहागिरीचा पाया मजबूद करणें ही पहिली गोष्ट. दुसरी गोष्ट ही कीं, सभोंवारच्या मराठे सरदारांस वश करून त्यांच्याशीं स्नेहसंबंध जोडणें अगर त्यांस आपल्या हुकमतीखालीं आणणें. असें केल्यानें मुलखाचा बंदोबस्त होऊन त्यांत स्वस्थता व्हावी. या द्विविध धोरणावर शिवाजीचा पुढील उपक्रम चालू झाला. हे हेतु त्यानें खालीं लिहिल्याप्रमाणें तडीस नेले.

२ **विशिष्ट कृत्यें. (१) तोरणा काबीज (सन १६४६).**—पुण्याच्या नैर्ऋत्येस सुमारें वीस मैलांवर तोरणा नांवाचा किल्ला आहे. मागें सांगितलेल्या तीन अनुयायांचे साह्यानें तेथील किल्लेदाराशीं संधान बांधून

शिवाजीनें तो किल्ला हस्तगत केला. त्या वेळीं शिवाजीचें वय १९ वर्षांचें होतें. शिवाजीनें ह्या किल्ल्याची डागडुजी मोठ्या झपाट्यानें केली, आणि मावळे लोक आंत जमवून किल्ल्याचा बंदोबस्त केला. किल्ल्यांतील एका पडीत जागेंत शिवाजीस द्रव्यसंचय सांपडला, तो त्याचे फारच उपयोगी पडला. देवी भवानीनें प्रसन्न होऊन या कामीं साह्य करण्याकरितां हा द्रव्यसंचय दिला, असें त्यानें जाहीर केलें; आणि दारू गोळा वगैरे सामान विकत घेऊन किल्ल्याचे संरक्षणाची सिद्धता केली. तोरणाकिल्ल्याचें नांव प्रचंडगड असें ठेविलें.

**( २ ) राजगड बांधिला.**—लागलाच शिवाजीनें तोरण्याचे आग्नेयीस तीन मैलांवर राजगड नांवाचा दुसरा किल्ला बांधिला. किल्ल्याचें बांधकाम **मोरोपंत पिंगळे** याचे देखरेखीखालीं झालें. शिवाजीच्या या कृत्यांनीं विजापुरच्या दरबारास त्याजविषयीं बराच संशय आला. परंतु जहागिरीच्या बंदोबस्तासाठीं या किल्यांची जरूर आहे व यामुळें सरकारचाच फायदा होणार आहे, असें शिवाजीनें दरबारास कळविलें. दरबारानें या कामीं शहाजीचा जाब घेतला. परंतु ह्या गोष्टी आपणांस माहीत सुद्धां नाहींत, असें शहाजीनें दरबारास कळवून, पुण्यास दादाजी कोंडदेव यास खरमरीत पत्र लिहून, शिवाजीचा बंदोबस्त करण्यास सांगितलें. हा प्रकार स. १६४६ तच घडला असावा.

किल्ला बांधण्यास अवकास लागत असल्यामुळें राजगड बांधण्याची सुरुवात पुष्कळ अगोदर झालेली असावी, आणि त्या वेळीं तोरणा हस्तगत झालेला नसावा. राजगड बांधल्यावर तोरणा सहज हातीं आला. हे किल्ले ताब्यांत घेण्याचें व बांधण्याचें कारण असें होतें कीं दक्षिणेस रोहिडखोऱ्यांत बांदल देशमुख राहत होते, ते शिवाजीस अनुकूल नव्हते. त्यांजला कबज्यांत आणण्यासाठीं हे दोन किल्ले शिवाजीनें हस्तगत केले. या योगानें स. १६४६ त महाराष्ट्रराज्याची मुहूर्तमेढ भक्कम रोवली गेली. ( रा० राजवाडे ).

**( ३ ) संभाजी मोहिते याचें उच्चाटन.**—स. १६४७ त दादाजी कोंडदेव मरण पावल्यामुळें जहागिरीची संपूर्ण व्यवस्था शिवाजीकडे आली. मागील राहिलेला वसूल मागण्याकरितां शहाजीकडून मनुष्यें आलीं असतां शिवाजीनें त्यांस ‘ इकडे खर्च वाढल्यामुळें येथचा पैका आम्हासच पुरत

नाहीं,' असें सांगून वाटेस लाविलें. तेव्हां 'सर्व आटोप पुत्रानें केला, अचाट कर्में करूं लागले, द्रव्य व मुलूख त्यांचाच आहे,' हा संतोष मानून शहाजीराजे आपणावर कांहीं किटाळ येऊं नये, म्हणून विजापुराहून तंजावराकडे चालता झाला. परंतु पुण्याच्या जहागिरींत शहाजीच्या तर्फेची कित्येक मंडळी होती, त्यांस शिवाजीचें वर्तन खपत नसे, ते त्यास जुमानीत नसत. त्या मंडळींत संभाजी मोहिते शहाजीच्या दुसऱ्या बायकोचा भाऊ, हा सुपें येथें प्रमुख होता. शहाजीच्या हुकमाशिवाय मुलूख किंवा वसूल तो शिवाजीस देईना व भेटीसही येईना. त्याजपाशीं तीनशें स्वारांची पागा होती. शिवाजीनें मावळे लोकांची एक टोळी बरोबर घेऊन एके दिवशी मध्यरात्रीं संभाजी मोहिते याजवर छापा घातला; त्यास व त्याचे पक्षाचे लोकांस कैद करून मुलूख व पागा हिसकावून घेतली. त्याच्या खजिन्यांत द्रव्य, जवाहीर, वस्त्रें वगैरे मोलवान वस्तु सांपडल्या. शिवाजीनें आपणास साह्य करण्याविषयीं मोहिते यास सांगितलें असतां, तो कबूल होईना म्हणून त्यास शाहाजीकडे कर्नाटकांत रवाना केलें. परंतु ह्या गोष्टीकडे विजापुरकरांनीं लक्ष दिलें नाहीं.

(४) **फिरंगोजी नरसाळा व चाकण.**–संभाजी मोहिते यास घालवून दिल्यानें शिवाजीचा वचक जिकडे तिकडे एकदम चांगला बसला. 'प्रत्यक्ष मामाची मर्यादा हा ठेवीत नाहीं, केवळ नीतीनें राहील त्याचाच आस, वरकड्यांचा शत्रु, याशीं दुसरा विचार करील त्याचें शासन करील, आश्रेंत राहील त्याचा कैवारी,' असें लोकांस वाटलें. पुण्याचे उत्तरेस चाकण किल्ला फिरंगोजी नरसाळा याचे ताब्यांत होता. पुण्याचा रस्ता या किल्ल्याचे आटोक्यांत असल्यामुळें शिवाजीनें फिरंगोजीस वश करून किल्ला काबीज केला; आणि आपल्या तर्फेनें त्यालाच पुनः तेथली किल्लेदारी दिली. फिरंगोजी हा शिवाजीशीं अखेरपर्यंत मोठ्या इमानानें वागला.

(५) **कोंडाणा ऊर्फ सिंहगड (१६४८?).**—कोंडाण्याचा मजबूद व अवघड किल्ला एका मुसलमान किल्लेदाराच्या ताब्यांत होता. त्या किल्लेदारास पैका भरून शिवाजीनें किल्ला त्याजकडून सोडवून आपणाकडे घेतला व त्यास सिंहगड असें नांव दिलें. या सर्व गोष्टी सलोख्यानें व रक्तपात झाल्याशिवाय तडीस गेल्या.

( ६ ) पुरंदर ( १६४८ ).—बारामती व इंदापुर हे प्रांत शिवाजीच्या जाहागिरींत मोडत होते. पुणें व बारामती यांजमधील रस्ता पुरंदर किल्ल्याचे टप्प्यांत होता. तो किल्ला नीळकंठ नाईक नांवाच्या एका ब्राह्मण किल्लेदाराच्या ताब्यांत होता. हा नाईक दादाजी कोंडदेवाचा स्नेही असून, शिवाजीचा व त्याच्या घराण्याचा चांगला घरोबा होता. या नाइकाचे पिलाजी व शंकराजी असे दोन भाऊ होते; या भावांमध्यें किल्लेदारीविषयीं तंटे लागले असतां त्यांनीं हा तंटा तोडण्याविषयीं शिवाजीस विनंति केली. शिवाजी सुप्यास जाण्याचे मिषानें फौज घेऊन पुरंदरास गेला आणि किल्ला स्वतःचे ताब्यांत घेऊन त्यानें तिघां भावांस इनामी वतनें करून दिलीं; आणि वडील भावाकडे पूर्वीचें वंशपरंपरेचें वतन चालविलें. ( शिवदिग्विजय, १२२. ) ह्या प्रसंगीं तिघां भावांच्या भांडणामुळें पुढें होणारा त्रास चुकविण्याकरितां, किल्ल्यावरील शिबंदीचे लोक आपण होऊन शिवाजीस अनुकूळ झाले. शिवाजीनें त्या भावांस नोकऱ्या देऊन योग्यतेस चढविलें.

( ७ ) कल्याण प्रांत व किल्ले काबीज (१६४८ .—हळूहळू ज्यास्त हिंमतीचीं कृत्यें करण्यास शिवाजीस सामर्थ्य आलें. निजामशाही बुडाल्यावर कोंकणचा प्रदेश विजापुराकडे आला, त्यांत भिंवडीपासून नागोठण्यापर्यंतचा कल्याण प्रांत मोडत होता. ‘ हा प्रांत आदिलशहानें मुल्ला अहंमद नटिया यास जहागीर म्हणून दिला, आणि पुणें व सुपें हे दोनच महाल शहाजीस जहागीर दिले. मुल्ला अहंमद कल्याण येथें राहत असे. कांहीं वर्षांनीं महंमद आदिलशहा आजारी पडला, आणि हा त्याचा आजार बरेच वर्षे चालला. तेव्हां विजापुरास थोडीशी गडबड उडाली, त्या वेळीं बंदोबस्तासाठीं आदिलशहानें मुल्ला अहंमद यास विजापुरास बोलवून घेतलें. तेव्हां कोंकणचा बंदोबस्त ढिला पडला, ही संधि शिवाजीनें साधली. ’ ( बसातिन-इ सलातिन ). विजापुरच्या या प्रांतांत मुल्ला अहंमदच्या ताब्यांत बरेच किल्ले असून, त्यांचा बंदोबस्त चांगला नव्हता. एकदां कोंकणांतून कांहीं खजिना विजापुराकडे रवाना होत आहे, अशी बातमी ठेवून शिवाजीनें कांहीं लोकांनिशीं त्याजवर एकदम छापा घालून खजिना काबीज करून राजगडीं नेला; आणि लगेच कांगारी, तिकोना, लोहगड, वगैरे किल्ले हस्तगत करून उत्तरेकडील

मावळ प्रांत आपले ताब्यांत आणिला. इकडे आबाजी सोनदेव यानें फौज घेऊन त्याच वेळीं कल्याण प्रांतावर हल्ला केला, आणि तो प्रांत व किल्ले हस्तगत केले. शिवाजी स्वतः कल्याणास गेला; आणि आबाजीची हुशारी पाहून त्यास त्यानें कल्याणचा सुभेदार नेमिलें. आणि आबाजीनें नजर केलेली किल्लेदाराची सून सन्मानानें परत पाठविली; त्यामुळें शिवाजीच्या सद्वर्तनाची छाप लोकांवर बसली. ( विजापुरच्या मुसलमानी इतिहासांतील वरील उताऱ्यांत मुल्ला अहंमद यास आबाजीनें काबीज केल्याची हकीकत नाहीं ).

(८) दक्षिणकोंकण व किल्ले काबीज.—शिवाजीनें कोंकणांत स्वारी केली, तेव्हां जंजिऱ्याचा अंमलदार फत्तेखान सीदी म्हणून होता. त्याचे जवळच्या कित्येक सरदारांनीं शिवाजीचा घांटावर चालू झालेला उद्योग ऐकून त्यास असें सांगून पाठविलें कीं, आपली स्वारी कोंकणांत यावी, म्हणजे तळें, घोसाळा, हे किल्ले आम्हीं आपल्यास घेऊन देतों. त्यावरून शिवाजीनें जाऊन दोनही किल्ले घेतले; आणि त्या प्रांतांत आपला अंमल बसवून बिरवाडीस किल्ला बांधिला. पुढें हरिहरेश्वराचें दर्शन घेऊन, परत येत असतां गोवळकर सावंत भेटले. त्यांस नांवाजून आपले चाकरीस ठेविलें. त्यांजपाशीं तीनशें होन किंमतीची नामांकित तलवार होती, ती, तीनशें होन व पोशाख देऊन घेऊन, तिचें नांव भवानी ठेविलें. ती आल्यावर बहुत यशस्वी झाले, म्हणून तिची पूजा नित्य नेमें करीत,' याच स्वारींत रायरीचा डोंगर सीदीकडून शिवाजीनें काबीज केला. तेथें पूर्वी लहानसा किल्ला होता; परंतु शिवाजीनें लिंगाणा नांवाचा मजबूत किल्ला नवीन बांधीला, त्यासच पुढें ( १६६२त ) त्यानें रायगड असें नांव दिलें.

दक्षिण कोंकणांतील मुलूख समुद्रकिनाऱ्यावर असल्यामुळें हबशाचेच ताब्यांत होता. राजापुर शहर त्या वेळीं श्रीमान् होतें. सीदीच्या अमलास सर्व लोक त्रासले होते, हें शिवाजीस ऐकून ठाऊक होतें. सन १६४८त शिवाजीनें राजापुरावर स्वारी केली, व तें शहर हस्तगत करून घेतलें; आणि गुन्हेगारांची चौकशी वगैरे करून, व आपला अंमल त्या प्रांतांत बसवून शिवाजी परत आला. ह्या स्वारींत विजयदुर्ग, सुवर्णदुर्ग, रत्नागिरि, खारेपाटण वगैरे ठिकाणीं शिवाजीचा अंमल बसला. शके १५७६ ( स. १६५३ ) विजयनाम संवत्सर, ह्या सालीं शिवाजीनें

विजयदुर्गचा किल्ला नवीन बांधिला; संवत्सराच्या नांवावरून विजयदुर्ग असें नांव ठेविलें. आंतील इमले वगैरेच्या कामास खर्च अडीच लाख रु० आला. ( भा. इ. मं. अ. १८३४-२९ ).

३. ह्या उपक्रमाचे लाभ.—( १ ) बाळाजी आवजी चिटणीस. आबाजी हरी चित्रे मुजूमदार नांवाचा एक प्रभु गृहस्थ जंजिऱ्याचे सीदी-जवळ दिवाण होता. त्याजवर हबशीसरकारची इतराजी होऊन त्याला व त्याचे भावाला हबशानें ठार मारलें; आणि आबाजीचे बायकामुलांस मस्कत येथें नेऊन गुलाम म्हणून विकण्याचा हुकूम केला. आबाजीची बायको गुलबाई ही धूर्त होती. तिनें खलाशांचें मन वळविलें तेव्हां मस्कत येथें न नेतां त्यांनीं तिला राजापुर येथें आणून सोडिलें. राजापुर येथें गुल-बाईचा भाऊ विसाजी शंकर हा मोठा व्यापारी होता. त्यानें ही आपली बहीण आहे अशी ओळख न देतां खलाशांपासून त्या मंडळीस विकत घेतलें. बाळाजी हा गुलबाईचा वडील मुलगा होय. चिमणाजी व श्यामजी असे आणखी त्यास दोन भाऊ होते. विसाजीनें या तिघां मुलांचा विद्याभ्यास चांगला करविला. बाळाजी मोठा झाल्यावर हबशी सरकारच्या भीतीमुळें त्यास आपल्या नांवानें प्रकट होण्याची शक्ति नव्हती. शिवाजी नांवाचा कोणी पराक्रमी पुरुष यवनांच्या हातांतून हिंदूंची सुटका करण्यास अवतरला आहे, ही खबर बाळाजीस लागतांच त्यास अत्यानंद झाला. त्या वेळेस तो राजापुरांतील कसबेदाराच्या हाताखालीं कारकुनीचें काम करीत असे. संधि साधून आपल्या दैन्यावस्थेचें एक पत्र त्यानें शिवाजीस लिहिलें. पुढें शिवाजी राजापुरास आला, त्या वेळेस पकडलेल्या इतर मंड-ळीमध्यें बाळाजी सांपडला. बाळाजीची चौकशी चालत असतां, त्याच्या आईनें धांवत येऊन शिवाजीचे पायांवर लोटांगण घातलें; आणि आपली सर्व हकीकत निवेदन केली. त्याच वेळेस शिवाजीनें त्या कुटुंबास आपल्या पदरीं ठेविलें, आणि बाळाजीची हुशारी पाहून त्यास आपल्या चिटणिशीचें काम सांगितलें ( स. १६४८ ). यापुढें शिवाजीचा चिटणीस बाळाजी आवजी हा शिवाजीच्या हरएक व्यवहारांत नेहमीं हजर असे. बाळाजीच्या पूर्व हकीकतीवरून तत्कालीन दैन्यस्थितीची बरीच अटकळ होते.

( २ ) लोकसंग्रह.—वर सांगितलेल्या शिवाजीच्या पराक्रमांवरून कल्याणपासून राजापुरपर्यंतचीं कोकणपट्टींतील मुख्य ठिकाणें, तसेंच

तेवढ्या टापूंतील घाटमाथ्यावरील मोठमोठे किल्ले हे शिवाजीच्या हस्तगत कसे झाले, हें कळून येईल. नकाशावर वसईवरून इंदापुरपर्यंत एक रेघ काढून, इंदापुरवरून कोंकणांत राजापुरपर्यंत दुसरी रेघ काढावी. म्हणजे राजापुरपासून वसईपर्यंतचा किनारा ही पायाची रेषा धरून इंदापुरच्या शिरोबिंदूवर जो त्रिकोण होईल, एवढा टापू स्थूल मानानें शिवाजीनें ह्या तीन चार वर्षांच्या उद्योगांत आपल्या कबजांत आणिला. समानसंकटामुळें निरनिराळ्या पक्षांतील भेदभाव नाहींसे होतात, आणि तें संकट परिहार करण्याचा पुढाकार घेऊन जो उद्योग करूं लागतो, त्यास ते कसें साह्य करितात, हा प्रकार शिवाजीच्या ह्या उपक्रमांत चांगला व्यक्त होतो. त्यामुळेंच शिवाजीला लवकर यश येत गेलें. शिवाजीची जरब जिकडे तिकडे बसत चालली. द्रव्यसंचय झाल्यामुळें फौजफांटा वाढला. 'द्रव्येंकरून लोक राजी राहतात, किल्लेकाव्यानें मुलूख जेरदस्तींत येतो, मुलूख मिळाल्यावर राज्य साध्य होतें. मोगलाई राज्यांत बिकट जागा सह्याद्री ओळ. त्या मुलुखांतील लोक माहीतगार, पावसांत डोंगरावर चढणें, झाडींत शिरणें, यास मावळे व कोंकणे यांवांचून घडणें नाहीं; हेच आधीं ठेवावे. त्यांत सरदार एसजी कंक, तानाजी मालुसरे, पासलकर, देशपांड्ये वगैरे यांस सरदारी व किताबा देऊन नांवनिशीवार शिपाई ठेविते झाले. नामांकित मनुष्य शिपाई असेल तेथून आणावा, किल्यांचीं राजकारणें करून किल्ले घेण्यास आपणच जावें, भेदांनीं व माहितगार यांचे युक्तींनीं ते घ्यावे. घरें शाकारण्याचें गवत घेऊन लोक किल्यावर जात असतां आपण व आपले लोकांनीं डोईवर भारे घेऊन आंत तलवारा घालून आपणही आंत जावें, वर किल्ला घ्यावा. किल्लेकोट घेतले त्यांवर विश्वासू आणि मर्द असे हवालदार, सरनोबत, घाडगे, निंबाळकर, गुजर, पारकर, जगताप, शिर्के, मोहिते वगैरे सरदार व स्वार लोक ठेविले.' 'याप्रमाणें दिवसेंदिवस राज्याची वृद्धि होत चालली. मोठमोठीं मातबर मनुष्यें जमा झालीं. संपूर्ण स्थळोस्थळींचीं राज्यकारणें यावीं, आणावीं. महाराज आर्तवंत, मनुष्याचे भुकेले, सर्वांचा संग्रह करूं लागले. स्वराज्याचा बंदोबस्त, चंचुप्रवेश शत्रूचा नाश होय. हजारों माणूस जागजागीं ठेविलें. त्यांस सदर परवानगी कीं, आपणास राजी राहून आज्ञेप्रमाणें वागतील त्यांचें संगोपन करावें, उन्मादेंकरून हेळणा करितील त्यांचा नाश जसा कळेल त्या

रीतीनें करणें. आला दिवस संपादून, यवनी परराज्यांत स्पर्धार्थी; त्यांचे गांवीं अगर शहरीं हरएक जागा मातबर, गृहस्थ, अगर सावकार चांगला पाहून धरून आणावा, त्याजपासून द्रव्य घेऊन सोडून द्यावें. यवनांचा उत्कर्ष, यास्तव त्यांचीं मोठमोठीं शहरें, तेथें द्रव्य बहुत आहे, त्याची पाळद राखून आणावें. द्रव्यवान ते जेरदस्तींत आणून त्यांजपासून खंड अगर कर्ज म्हणून घ्यावें ' ( शिवदिग्विजय व चिटणीस ). अशा प्रकारें शिवाजीनें कार्योपक्रम चालविला. बरोबरच्या मंडळीसही त्यानें मोठमोठीं कामें दिलीं; कारण अशीं कामें देण्याइतकी शिवाजीची तयारी या वेळीं झाली होती. आबाजी सोनदेव कल्याणच्या सुभ्यावर होताच; त्याचा भाऊ निळो सोनदेव यास मुजूमदार केलें. अण्णाजी दत्तोस सुरनिशी दिली. गंगू मंगाजीस वाकनिशी सांगितली. माणकोजी दाहातोंडे याजकडे सरनोबती होती. तो वारला, म्हणून नेताजी पालकर यास सरनोबती दिली, आणि फौज पुष्कळ वाढविली. राघो बल्लाळ कोरडे याजकडे फौजेची सबनिशी होतीच. येसजी कंक यास पायदळाची सरनोबती दिली. बाळाजी आवजीस चिटणिशी सांगून, त्याचा भाऊ चिमणाजी यास फडनिशी दप्तरचें काम, व तिसरा भाऊ श्यामजी यास रायगडचीं कारखाननिशी दिली. श्यामराज नीळकंठ रांझेकर याजला अपसव्य (सव्य) लिहिण्याचा अभ्यास येत होता, त्याजला जवळ ठेवून घेऊन, हत्ती, उंट, तोफखाना वगैरे सरंजामाचें काम सांगितलें. याच श्यामराजपंताला शिवाजीनें पुढें आपला पेशवा केलें.

स. १६४८ च्या सुमारास विजापुरचे नोकरींतील पांचसातशें पठाण शिवाजीकडे चाकरीस राहण्यास आले. शिवाजीच्या मनांत त्यांस आपणाकडे ठेवावयाचें नव्हतें. परंतु गोमाजी नाईक पानसंबळ याचा सल्ला विचारतां बोलला, कीं 'तुमचा लौकिक ऐकून हे लोक आले आहेत, त्यांस विन्मुख जाऊं देणें योग्य नाहीं. हिंदूंचाच संग्रह करूं, इतरांची दरकार ठेवणार नाहीं, अशी कल्पना धरिली, तर राज्य प्राप्त होणार नाहीं. ज्यास राज्य करणें त्यानें अठरा वर्ण, चाऱ्ही जाती यांस आपआपले धर्माप्रमाणें चालवून त्यांचा संग्रह करून ठेवावें.' ही सल्ला फार चांगली जाणून राघो बल्लाळ कोरडे याचे निसबतीस त्यांस ठेवून घेतलें.

४. शहाजीची कैद. १६४६च्या सेप्टेंबरच्या अगोदर शहाजी विजापुर सोडून कर्नाटकच्या स्वारीवर निघून गेला. तत्पूर्वीच तोरणा किल्ला शिवाजीनें घेतल्याची कागाळी त्याजकडे आली होती. पण त्याचा निकाल लागण्यापूर्वीच शहाजी स्वारीवर निघून गेला. इकडे शिवाजीच्या कृत्यांची थोडथोडी गुणगुण विजापुरदरबारच्या कानावर गेलीच होती. त्यांत खजिना लुटला, किल्ले घेतले, कल्याणच्या सुभेदारास कैद करून सर्व प्रांत सर केला, इत्यादि खबरा एकामागून एक आलेल्या ऐकून, विजापुरचे दरबारांत मोठी चळवळ उडून गेली. मुल्ला अहंमद यानेंही विजापुरास येऊन अनेक प्रकारची कागाळी केली. सुलतानास असें वाटलें कीं, शिवाजीची ही बंडाळी शहाजीच्या संमतीनेंच झाली असावी, म्हणून शहाजीचा बंदोबस्त केला, कीं शिवाजीचें बंड मोडेल; शिवाजीवर निराळी फौज पाठविण्याची जरूर नाहीं. शिवाय रणदुल्लाखान कर्नाटकांतून परत आल्यापासून, तिकडेही शहाजीची सत्ता विशेष वाढत चालली होती; ती कमी करण्यासाठीं शहाजीसच हुजूर आणिला असतां सर्व गोष्टी सिद्ध होतील, असा विचार करून सुलतानानें शहाजीस पकडून आणण्याविषयीं कर्नाटकांत बाजी घोरपडे यास गुप्त हुकूम पाठविला. घोरपडे हाही शहाजीप्रमाणेंच विजापुरकरांचा एक सरदार असून कर्नाटकाकडे होता, त्यानें शहाजीस आपल्या घरीं भोजनास बोलाविलें, आणि दग्यानें पकडून विजापुरीं आणिलें (१६४७).* शहाजी कर्नाटकच्या स्वारीस गेल्यावर त्याचें व मुस्तफाखान याचें वांकडें पडून युद्ध झालें. त्या युद्धांत शहाजीचा मोड होऊन बाजीघोरपड्यानें त्यास ता० ६ ऑगस्ट सन १६४७ रोजीं पकडून मुस्तफाखानाच्या स्वाधीन केलें. मुस्तफाखानानें त्यास विजापुरीं पाठवून दिलें असें बसातिन-इ-सलातिनकार म्हणतो, 'मुस्तफाखानानें जिंजीचा वेढा चालू असतां बाजी घोरपड्याकडून शहाजीचा पाठलाग करवून त्यास सन १६४८ त पकडिलें.' यावरून घोरपडयानें दगा करून शहाजीस पकडलें नाहीं असें दिसतें. नंतर शहानें शहाजीस सांगितलें, कीं 'मुलानें दंगा केला, यांत तुमचें अंग आहे. तर त्याचा बंदोबस्त तुम्हीं

* मे सन १६४७. या वेळच्या अनेक प्रसंगांचा उलगडा नीटसा झालेला नाहीं. पुष्कळ प्रसंग मागचे पुढें व पुढचे मागें होण्याचा संभव आहे.

एकदम करावा.' शहाजीनें उत्तर केलें. 'मुलगा आमच्या कह्यांत नाहीं. तो सरकारचा गुन्हेगार आहे. त्याजवर फौज पाठवून सरकारांनीं पाहिजे तसा त्याचा बंदोबस्त करावा.' तरी सुलतानाची खात्री पटेना. त्यानें शहाजीस निक्षून कळविलें, कीं 'अमुक दिवसांत शिवाजीचा बंदोबस्त न झाल्यास तुम्हांस भिंतींत जिवंत चिनून प्राण घेऊं.' विल्कसनें बखरी व तोंडी माहिती मिळवून म्हैसूरचा इतिहास लिहिला आहे, त्यांत शहाजीसंबंधानें पुढील मजकूर आहे. 'जेव्हां शिवाजी विजापुरच्या फौजेस जुमानीनासा झाला आणि मोगलांच्या सत्तेसही त्यानें धाब्यावर बसविलें, तेव्हां शिवाजीनें ही आपली बेकैदी वर्तणूक बंद करावी, अशी दरबारानें शहाजीस ताकीद केली. मुलाच्या कृत्यास आंतून बापाची फूस आहे, अशा प्रकारचे उद्गार कित्येक मंडळींनीं काढिले. शहाजीनें मात्र कानावर हात ठेविले व कळविलें, कीं 'दुसरें लग्न करण्यापूर्वींच मी आपली पहिली बायको व तिचीं मुलें यांजबरोबर धर्मशास्त्रानुसार संबंध तोडून टाकला असून, तीं आतां माझीं कोणी लागत नाहींत.' परंतु शहाजीची आंतून मुलास फूस होती इतकेंच नाहीं तर स्वतंत्र राज्य स्थापण्याचा शहाजीचाही मनापासून उद्योग होता, ही गोष्ट उघड सिद्ध करण्यास पुरेसा पुरावा आम्हांस सांपडला आहे, त्यांत दोन मुद्दे महत्त्वाचे आहेत. त्या वेळच्या (सन १६४२ तल्या) शहाजीनें दिलेल्या कांहीं सनदा व दुसरे कागदपत्र सांपडले आहेत, त्यांतील भाषेंत रीतीप्रमाणें वरिष्ठ सरकाराचा उल्लेख असला पाहिजे, तो कोठेंही नाहीं. दुसरी गोष्ट बाजी घोरपड्यानें दरबारच्या हुकुमानें शहाजीस विश्वासघातानें पकडिलें, म्हणून त्याचा सूड घेण्याविषयीं शहाजीनें शिवाजीस पुढें विशेष अगत्यानें कळविलें, त्याप्रमाणें घोरपड्यास शिवाजीनें ठार मारल्याचें शहाजीस कळलें, तेव्हां त्यास मोठी कृतकृत्यता वाटली. शहाजीच्या अपराधाविषयीं दरबारची पुरेपूर खातरी झाल्यामुळेंच, शहाजीस अशा रीतीनें पकडण्याचा असल्या भरंवसेदार सरदारास हुकूम झाला.' (Wilke's Mysore, Vol. I, pp 75.)

बापाच्या जिवावर येऊन बेतली, हें वर्तमान शिवाजीस समजतांच तो मोठ्या पेंचांत पडला. त्यास विजापुरकराकडून बोलावणें आलेलें होतें. परंतु मातुश्रीची व इतरांची सल्ला त्यानें विजापुरीं जावें, अशी नव्हती. शिवाजीची बायको सईबाई इनेंही त्यानें विजापुरीं जाऊं नये, असेंच

सांगितलें. तेव्हां हें संकट निवारण्याची त्यानें केलेली युक्ति पाहून त्याच्या चातुर्याची व धूर्ततेची वाखाणणी केल्याशिवाय राहवत नाहीं. ह्या वेळ-पर्यंत मोगल सरकारास त्यानें कोणत्याही तऱ्हेनें दुखविलें नव्हतें. आपणा-वर पुढें असा प्रसंग आल्याशिवाय राहणार नाहीं हें त्यास ठाऊक होतेंच. ह्या वेळीं दिल्लीस शहाजहान बादशहा राज्य करीत असून दक्षिणेंतील मुसलमानी राज्यें बुडविण्याचा त्याचा कृतसंकल्प असल्यामुळें, शिवाजीनें विजापुरकरांविरुद्ध चालविलेल्या बंडाळीनें बादशहाला एक प्रकारचें समाधा-नच वाटत होतें. शिवाजीनें शहाजहानकडे वकील पाठवून बोलणें चालविलें, व त्याची नोकरी करण्याची आपली इच्छा दाखविली. शहाजहान व औरंगजेब ह्या दोघांसही मराठे सरदारांची, विशेषत: शहाजीची, व ऐकीव माहितीवरून शिवाजीची योग्यता माहीत होती. हे अनुकूळ झाले असतां विजापुरचें राज्य जिंकण्यास विलंब लागणार नाहीं, अशा हेतूनें शहाजहाननें शिवाजीची विनंती एकदम मान्य केली. शहाजीचीं पूर्वीचीं कृत्यें विसरून त्यास आपल्या नोकरींत ठेवून, शिवाजीस पांच हजारांची मनसब देण्याचें शहाजहाननें अभिवचन दिलें. ह्याच वेळेस दक्षिणेंतील कांहीं प्रदेशांवर चौथाई व सरदेशमुखी हे आपले वडिलोपा-र्जित हक्क वसूल करण्याची आपणास परवानगी देण्याविषयीं शिवाजीनें बादशहास विनंती केली होती. परंतु 'तुम्ही स्वत: येऊन भेटल्या-शिवाय ह्याचा जबाब देतां येत नाहीं,' असें उत्तर बादशहानें दिलें. ह्या हक्कांविषयीं विशेष चर्चा पुढें यावयाची आहे. मात्र ह्या मागणीवरून शिवाजीची दूरदृष्टि दिसून येते.

शहाजीस सोडून देण्याविषयीं विजापुरच्या सुलतानास शहाजहाननें पत्र पाठविलें, त्या वेळीं शहाजहानचा सुभेदार त्याचा मुलगा मुरादबक्ष याज-कडून शहाजी व शिवाजी यांस खालील पत्रें आलीं, (खं०८-ले० ३, ४). दोनही पत्रें ता. ३० नोव्हेंबर स. १६४९ चीं आहेत.

'उमरावी सरदारीच्या योग्यतेचे, शूर पराक्रमी, दौलतीचे उत्तम अभीष्टचिंतक, राजनिष्ठ शिरोमणी, महत्कृपेस पात्र, शहाजी भोसले यांनीं बादशाही कृपेस आपला सत्कार जाणोन समजावें कीं, तुमचे पुत्र शिवाजी यांनीं अर्जदास्त हुजूर येण्याविशीं पाठविली, ती पाहून कृपेस कारण जालें. पेशजीच्या गोष्टी मनांत न आणितां तुमची मोकळीक करण्या-

विषयीं लिहिलें आहे. त्यास हाली आम्ही दिल्लीकडे जात आहों. तुम्हांस खुषखबर देतों कीं तुम्ही सर्व प्रकारें खातरजमा ठेवावी जे, आम्ही हुजूर पावलियावरी तुमचे मजकुराविषयीं अर्ज करून बंदोबस्त करून देऊं. परंतु तुम्ही आपला एक वकील इतबारी पाठवून द्यावा. म्हणजे त्या समागमें फर्मान कौलाचें, चिरंजीव संभाजी वगैरे सरकारकृपेस पात्र होऊन पेशजी-प्रमाणें मनसबा व नूतन सरफराज पावतील. इकडील स्नेहांत व इकडील लक्षांत वागणें हें सर्व आपले मनोरथ पूर्ण करून घेण्यास कारण आहे. म्हणोन तसें वागोन खातरजमा ठेवावी. आणि तुम्हाकरितां पोषाख पाठविला हा घेऊन आपणावर पूर्ण लोभ आहे असें मनांत आणावें. छ ५ माहे जिल्हेज, सन २३ जुलूस, सन १०५९ हिजरी.'

'नाना प्रकारच्या स्नेहकृपेस योग्य, महत्कृपेचे पात्र, उत्तम उमदेपणास लायक, शिवाजी भोसले यांणीं बादशाही कृपेची इच्छा करून जाणावें कीं, तुमचें पत्र रावोपंत याजबरोबर पाठविलें, तें पावलें, आणि बादशाही कृपेस कारण जालें. जुन्नर व अमदानगर येथील देशमुखीविषयीं लिहिलें. त्यास, आम्ही हुजूर गेल्यानंतर हा मजकूर घडोन येईल. खातरजमा ठेवावी. परंतु आपणाकडील एक वकील पाठवून द्यावा. म्हणजे मजकूर समजून घेऊन अमलांत येईल, व वकिलास जो मजकूर विचारूं त्याचें उत्तर द्यावें, म्हणजे काम होण्यास दिरंग लागणार नाहीं. जाणोन उद्योग करावा आणि लोभ पूर्ण जाणावा. छ. ५ जिल्हेज, सन २३ जुलूस, सन १०५९ हिजरी.'

बादशहाचा हुकूम आल्यावर शहाजीस अपाय करण्याची आदिलशहाची छाती झाली नाहीं. प्रत्यक्ष त्याचें व त्याच्या मुलाचें कर्तृत्व आदिलशहा ओळखून होताच. अशा बाबतीवरून बादशहाशीं वैर करण्यास तो तयार नव्हता. स्वत: महंमद आदिलशहा फारच शांत वृत्तीचा व अत्यंत भोळा होता. शिवाय त्याची प्रकृतिही पुढें पुढें सारखी बिघडूं लागल्या-मुळें, त्याच्या अंगीं जोर व तडफ बिलकूल राहिली नव्हती. विजापुरांत मुरारपंत व रणदुल्लाखान* हे शहाजीच्या मुक्ततेबद्दल अतिशय खटखट-

* रणदुल्लाखान ता. १० मार्च स. १६४३ पासून ता. १७ फेब्रुवारी स. १६४४ च्या दरम्यान केव्हां तरी वारला [ रा. पां. न. पटवर्धन, चित्रमय जगत् ], तेव्हां त्याचें साह्य शहाजीस झालें नाहीं हें उघड आहे.

करीत होते. ह्यांपैकीं कोणत्या कारणानें आदिलशहाचें मन वळलें असेल तें असो; पण त्यानें शहाजीची सक्त कैद कमी करून त्यास जामिनावर खुलें केलें, आणि विजापुरांतच नजरेखालीं राहण्याची परवानगी दिली. एकंदर चार वर्षें शहाजी विजापुरांत होता. सन १६५३ चे आरंभीं त्यास कर्नाटकांत परत जाण्याची परवानगी मिळाली. तेवढ्या अवधींत शिवाजीनें विजापुरकरांस उपद्रव दिला नाहीं, आणि विजापुरकरांनींही शिवाजीकडे विशेष लक्ष दिलें नाहीं. दिल्लीची नोकरी पतकरण्याचें शिवाजीनें तूर्त लांबणीवर टाकिलें. येणेंकरून एकदम आलेलें संकट टळलें व शिवाजीस थोडीशी फुरसदही मिळाली.

५. दोन प्रसिद्ध व्यक्तींचा खेळ:—दक्षिणेंत पुण्याच्या बाजूस शहाजीची कर्तबगारी संपून शिवाजीची सुरू होते, त्याच सुमारास आणि त्याच बाजूस, शहाजहानचा पुत्र औरंगजेब ह्याचेंही भावी कर्तृत्व झळकूं लागतें. सन १६३६ पासून पुढें हिंद इतिहासाच्या चित्रपटावर दोन प्रसिद्ध पुरुष खेळ करूं लागतात, एक शिवाजी व दुसरा औरंगजेब. ह्या दोन प्रसिद्ध पुरुषांच्या डावपेचांनीं नुसत्या मराठशाहीचाच नव्हे तर समग्र हिंदुस्थानचा भावी इतिहास सर्वस्वी बदलून गेला आहे. त्या दोघांचे स्वभाव, त्यांचे वर्तनहेतु, त्यांच्या एकमेकांशीं चाललेल्या झटापटी, ह्या गोष्टी जितक्या स्पष्टपणें उकलून विशद होतील, तितका हिंदुस्थानचा पुढील इतिहास स्पष्ट होणार आहे. औरंगजेब शिवाजीपेक्षां नऊ वर्षांनीं मोठा होता; आणि परमेश्वर कृपेनें शिवाजीच्या मागें तो सत्तावीस वर्षें वांचला. जगाच्या इतिहासांत पृथ्वीवर मोगल बादशहांइतके पराक्रमी व वैभवशाली बादशहा दुसरे कोणी झाले नाहींत. दोनशें वर्षेंपावेतों एकामागून एक सहा पुरुष सारखे पराक्रमी झाले, असा प्रकार सहसा दृष्टोत्पत्तीस येत नाहीं. त्या सहा पुरुषांतही लोकसुखाच्या दृष्टीनें जर कोणास प्रथम पद द्यावयाचें असेल, तर तें शहाजहानासच दिलें पाहिजे. शहाजहान जितका पराक्रमी तितकाच प्रजापालनदक्ष होता त्या वैभवशाली बादशहाचा सर्वांत नामांकित पुत्र औरंगजेब. शिक्षण, अनुभव, स्वधर्माभिमान, महत्त्वाकांक्षा, निर्व्यसन इत्यादि बाबतींत शिवाजी व औरंगजेब समसमान होते. ह्यांपलीकडे त्या दोघांतील विरोधही तितकाच तीव्र होता. दोघांमध्यें कापट्य पूर्ण होतें. औरंगजेब आपल्या कपटाचा उपयोग दुसऱ्याला दुखवि-

ण्यांत करी. शिवाजी आपल्या कापट्याचा उपयोग दुसऱ्याला सुखविण्यांत करी. औरंगजेबानें आपल्या कपटवर्तनाच्या खेळानें सत्तर वर्षें पावेतों दीर्घ परिश्रम करून आपला, आपल्या कुटुंबाचा, व आपल्या राज्याचा कायमचा नाश करून घेतला. शिवाजीनें आपल्या पस्तीस वर्षांच्या कर्तबगारींत सौजन्य व कापट्य ह्यांचा, जशास तसें ह्या न्यायानें, योग्य उपयोग करून, आपलें, आपल्या कुटुंबाचें व आपल्या राष्ट्राचें चिरंतन कल्याण करून ठेविलें. असा ह्या दोन प्रसिद्ध व्यक्तींचा खेळ मोठा चित्ताकर्षक व बोधप्रद आहे. ह्या खेळांतील प्रत्येक बाबतीचा जितका ज्यास्त तपशील सांपडेल, तितकी ती बाब जास्त खुलून दिसेल. औरंगजेबाचा स्वभाव व धोरणें ह्यांचें सामान्य विवेचन मुसलमानी रियासतींत आलें आहे. स. १६३६ पासून १६४४ पावेतों व सन १६५२ पासून १६५७ पावेतों तेरा वर्षें औरंगजेब दक्षिणच्या कारभारावर सुभेदार म्हणून होता, त्या वेळच्या मानानें, तो स्वतंत्रच राज्य करीत होता, असें म्हटलें तरी चालेल. हाच काल शिवाजीच्याही पहिल्या उद्योगाचा आहे. शिवाजीचे उद्योग समजून घेण्यापूर्वी, औरंगजेबाचे उद्योग काय चालले होते, ते प्रथम स्पष्टपणें समजले पाहिजेत; म्हणजे त्यांवरून, एका बाजूस शहाजहान आणि दुसऱ्या बाजूस विजापुर व गोवळकोंडा, ह्यांच्याशीं चाललेले औरंगजेबाचे व्यवहार कळून येतील; आणि औरंगजेबाचे हेतु वेळेवर ओळखून शिवाजीनें आपला उद्योगक्रम कसकसा बदलला, हें त्यावरून स्पष्टपणें कळून येईल.

६. **औरंगजेबाचा दक्षिणेंतील कारभार***.-सन १६१८ त औरंगजेबाचा जन्म झाला. ता. १६ जुलई सन १६३६ रोजीं त्याची नेमणूक दक्षिणच्या सुभ्यावर झाली. तो कारभार त्यानें २८ मे १६४४ पावेतों जवळ जवळ आठ वर्षें केला. ह्या आठ वर्षांत मराठ्यांशीं त्याचा संबंध फारसा आला नाहीं. विटोजीचा मुलगा खेळोजी भोसले ह्यास त्यानें ठार मारिलें; आणि बागलाण प्रांत जिंकिला, हे दोन प्रकार मागें सांगण्यांत आलेच आहेत. दक्षिणेंत औरंगजेबाच्या मदतीस मुर्शिदकुलीखान हा दिवाण म्हणून वसुलाच्या कामावर होता. शहाजहानचा वडील मुलगा दारा हा बापाजवळ असून औरंगजेबाच्या कारभारांतील दोष काढून त्याजबद्दल बापाकडे नेहमीं कागाळी करीत असे. त्यावरून औरंगजेबाच्या कामा-

* ह्या कलमास मुख्य आधार प्रो. सरकारकृत औरंगजेब भा. १.

संबंधानें शहाजहानचें मत हळूहळू बिघडत गेलें. बादशहाची आवडती वडील मुलगी जहानआरा भाजून आजारी पडली; आणि बरी झाल्यावर शहाजहाननें आनंदोत्सव केला. त्या वेळीं औरंगजेब बहिणीला भेटण्याकरितां मे ता. २ सन १६४४ रोजीं आग्र्यास गेला. तेथें तीन आठवड्यांनीं बापानें त्याला दक्षिणच्या सुभेदारीवरून दूर करून त्याची नेमणूकही बंद केली. त्याचें खरें कारण काय तें समजत नाहीं. पुढें दहा वर्षांनीं आपल्या एका पत्रांत जहानआराला त्यानें खालील मजकूर लिहिलेला आहे. " मीं आपलें सर्व आयुष्य हालअपेष्टेंत काढून शेवटीं दुःखांत मरून जावें, अशीच जर बादशहांची इच्छा असेल तर तीही मला मान्य केलीच पाहिजे; परंतु माझ्या हाताखालच्या लोकांकडून माझा असा अपमान करविण्यापेक्षां मीं मरून जावें हेंच बरें. कारण हल्लींच्या स्थितींत राज्याचें मात्र नुकसान होत आहे. ह्याच कारणास्तव दहा वर्षांपूर्वीं मी आपल्या कामाचा राजीनामा दिला; आणि कोठें तरी एकांतांत राहून कालक्रमणा करण्याचा निश्चय केला होता." ईशसेवेंत आपलें आयुष्य घालवावें, हें त्याचें निव्वळ ढोंग होतें. राज्यांत ढवळाढवळ हवी तशी करावयाला सांपडेना म्हणून त्यानें राजीनामा दिला; पण राजीनामा देऊन रिकामा बसल्यामुळें दाराच्या व त्याच्या भांडाभांडींत बादशहास जास्तच त्रास होऊं लागला. म्हणून १६ फेब्रुवारी १६४५ रोजी शहाजहाननें त्याची नेमणूक गुजराथच्या सुभ्यावर केली. पुढें अफगाणिस्तानांत युद्ध सुरू झाल्यामुळें शहाजहाननें त्यास परत बोलावून त्या युद्धावर पाठविलें. गुजराथचा कारभार त्यानें जानेवारी १६४७ पावेतों सुमारें दोन वर्षें केला; परंतु तेवढ्या अवधींत गुजराथेंत चाललेली बंडाळी त्यानें जोरानें मोडून काढिली; आणि सर्व प्रांतावर अशी जरब बसविली कीं, अफगाणिस्तानावर त्याचीच नेमणूक करणें शहाजहानास योग्य वाटलें. तेथून सन १६४८ च्या मार्चांत औरंगजेब परत आला; आणि त्याची नेमणूक मुलतानच्या सुभ्यावर झाली. चार वर्षें तो मुलतानास होता. तेथून जुलई ता. १४, १६५२ रोजीं त्याची नेमणूक पुनः दक्षिणच्या सुभ्यावर झाली. औरंगजेबास दुखविण्याकरितांच शहाजहाननें ही नेमणूक रागारागानें केली होती. त्या वेळीं तो एक महिना बापाजवळ अफगाणिस्तानांत राहिला. ९ सेप्टेंबर १६५२

रोजीं त्यानें अटक येथें सिंधुनदी ओलांडिली; आणि नोव्हेंबरच्या अखेरीस आग्र्याहून निघून सन १६५३ जानेवारीच्या १ तारखेस तो नर्मदेवर येऊन पोंचला; आणि त्या महिन्याच्या अखेरीस खानदेशची राजधानी बऱ्हाणपुर येथें आला. ह्या वेळीं औरंगाबाद शहर मोगलांचें दक्षिणेंतील मुख्य ठाणें असून दौलताबाद हें लष्कराचें ठाणें होतें. ह्या ठिकाणीं तो नोव्हेंबर १६५३ त आला. तेव्हांपासून सन १६५८ पावेतों त्यानें दक्षिणचा कारभार केला. ह्या पांच वर्षांत त्यानें जीं कामें केलीं त्यांची कच्ची हकीकत समजल्यानें शिवाजीचे उद्योग व धोरणें स्पष्ट समजूं लागतात. शहाजहान बादशहा आजारी पडल्याचें ऐकून ता. ५ फेब्रुवारी १६५८ रोजीं औरंगजेब दक्षिणदेश सोडून दिल्लीचें तख्त मिळविण्याकरितां मोठ्या सावधगिरीनें तिकडे गेला, तो सन १६८२ पर्यंत पुन: दक्षिणेंत आला नाहीं.

त्या वेळीं औरंगजेबानें दक्षिणेंत खूप चैन केली. औरंगाबादेनजीक सातारें गांव आहे, तेथें तो नेहेमीं हरण व नीलगाई वगैरेंच्या शिकारीस जात असे. तेथील खंडोबाचें देवस्थान उद्ध्वस्त करून मुरळ्यांचा धंदा त्यानें बंद केला. वाघाची शिकार सुद्धां तो करीत असे. जे औरंगजेबाचे गुणदोष त्याच्या वैभवास व नाशास पुढें कारण झाले त्या सर्वांचा अंकुरपरिपोष दक्षिणेंतील पांच वर्षांच्या या कार्कीर्दींत स्पष्टपणें दिसून येतो. हिंदुधर्माचा उच्छेद व सर्वांवर बेभरंवसा ह्यांमुळें त्याचा नाश झाला. शिवाजीला तरी त्याची इतकी चीड येण्याचें कारण हिंदूंचा व विशेषत: रजपुतांचा छल हेंच होय. औरंगाबाद हें त्याचें आवडतें ठिकाण होतें. तेथें तलावाच्या कांठीं त्यानें एक वाडा बांधिला, त्यास आलमगिरीमहाल म्हणतात. त्याची बेगम दिलरास बानू हिची कबर त्यानें येथें बांधिली, ती ताजमहालचीच छोटी आवृत्ति आहे. १६८२ त तो दक्षिणेंत आला, तेव्हां औरंगाबाद शहर मराठ्यांनीं उद्ध्वस्त केलेलें त्यास दिसलें. तेव्हां तीन लाख रुपये खर्च करून चार महिन्यांत त्यानें चार मैल लांबीचा नवीन तट शहाराच्या सभोंवतीं बांधिला. आरंभींचे निजाम व त्यांच्या फ्रेंच फौजा औरंगाबाद येथेंच राहत असत.

औरंगजेबास लवकरच असें आढळून आलें कीं, स. १६४४ त आपण दक्षिणचा कारभार सोडल्यापासून इकडे मोगलांच्या सत्तेची भरभराट व्हावी तशी झाली नाहीं. ह्या दहा वर्षांत लढाई, बंडाळी वगैरे

कांहीं एक नव्हतें. सर्वत्र शांतता होती. तथापि शेती वगैरे वाढून मुलखांत आबादानी झाली नाहीं. मुलूख ओसाड पडून सरकारचा वसूल पुष्कळच कमी झाला. असा परिणाम होण्याचें कारण काय ? दक्षिणेंत अलीकडे मोगल सुभेदारांच्या बदल्या वारंवार होऊन, आलेले इसमही नालायक होते. मे १६४४ पासून जून १६४५ पावेतों खानडौरान सुभेदार होता. पुढें थोडे दिवस जयसिंगानें कारभार केल्यावर, जुलई १६४५ पासून नोव्हेंबर १६४७ पर्यंत इसलामखान सुभेदार झाला. त्यानंतर शहानवाजखानानें कांहीं दिवस काम केलें. १६४८ च्या जुलईंत मुरादबक्षाची नेमणूक झाली. त्यापुढें १६४९ च्या सेप्टेंबरांत शाएस्तेखान त्या कामावर आला, तो १६५२ त औरंगझेब येईपर्यंत होता. मोगलांचे हे अधिकारी वरचेवर बदलत असतां, इकडे शिवाजीचा उद्योग झपाट्यानें चालला होता. एकच जोरदार इसम पुष्कळ दिवस मोगलांच्या कारभारावर असता, तर कदाचित् शिवाजीला जास्त अडचण पडली असती. खानडौरान वृद्ध व क्रूर होता. त्यानें रयतेस इतकें पिळून काढिलें कीं, खानाच्या मरणाची बातमी ऐकून परमेश्वरानें आपणास सोडविल्याबद्दल लोकांनीं आनंदोत्सव केले. इसलामखान हा इतका वृद्ध होता कीं, त्यास घोड्यावरही बसवत नसे. त्यानें आपल्या कठोर वर्तनानें सगळ्या प्रजेचें शत्रुत्व संपादिलें. तो पैसेखाऊ असून किल्ल्यावर भरून ठेविलेली सरकारी सामुग्री विकूनही त्यानें आपले खिसे भरले. शहानवाजखान व मुरादबक्ष ह्यांचें मुळीं पटलेंच नाहीं. त्यांनीं एवढा गोंधळ उडविला कीं त्यांस एक वर्षाच्या आंत कामावरून दूर करणें बादशहास भाग पडलें. सारांश, आठ वर्षांत सहा कामदार झाले, आणि प्रत्येकाची रीत वेगळी; त्यामुळें देशाची नासाडी होऊन सरकारचेंही नुकसान झालें. दक्षिणचा हा देश बहुतेक डोंगराळ व जंगली असून पुष्कळ ठिकाणीं लागवड नव्हती. पाऊस वेळेवर न पडल्यामुळें दुष्काळ वगैरे वरचेवर होत; आणि ठरलेला वसूल कधींच जमा होत नसे. शिवाय बंदोबस्तास खर्च फार येई. शहाजहाननें मुलखाची पाहणी करून दक्षिणच्या सुभ्याचा सरकारी वसूल मुद्दामच बारा लाख कमी ठरविला. तरीसुद्धां ठरलेल्या रकमा वसूल झाल्या नाहींत. दक्षिणेंत मोगलांचे चार जिल्हे होते. ह्या चार जिल्ह्यांचा कमाल आकार तीन कोटी बासष्ट लाख

रुपये होता. पैकीं सन १६५२ त एक कोट वसूल येतां येतां मुष्कील झाली. एकंदर मुलखापैकीं ३७॥ लाख उत्पन्नाचा प्रदेश औरंगजेबास व त्याच्या कुटुंबास जहागीर म्हणून तोडून दिलेला होता. अशाच आणखी इतरांना जहागिरी होत्या. त्याशिवाय सरकारी तिजोरींतून कांहीं रोख पगार औरंगजेबास मिळे. जहागिरीचा वसूल पीकपाण्याच्या मानानें कमी जास्त होई. नक्त पगार कायमचा असे, त्यांत कमी जास्त होत नसे. आपल्या मुलांस असे मोठमोठे स्वतंत्र अधिकार शहाजहाननें दिले, याचा परिणाम त्यास अंतीं घातक झाला.

वरील अव्यवस्थेमुळें दक्षिणच्या सुभ्याचें उत्पन्न खर्चास पुरत नसे; म्हणून खर्चासाठीं सालोसाल बादशहास दुसरीकडून रकमा पाठवाव्या लागत. हा प्रकार शहाजहान बादशहाला मुळींच आवडला नाहीं. म्हणून औरंगजेबास पाठवितांना त्यानें त्यास सक्तीची ताकीद दिली कीं, शेतकऱ्यांची स्थिति सुधारून उत्पन्नांतून खर्च भागेल अशी तजवीज करावी. तो आला तेव्हां दक्षिणच्या कारभाराचा खर्च एकतीस लक्ष होता. त्यापैकीं औरंगजेब व त्याचे मुलगे ह्यांचा पंचवीस लाखांचा तनखा वजा जातां बाकीचे सहा लाख फौजेच्या व इतर खर्चाकरितां लागत. जमिनीचा सारा सुमारें अडीच लाख वसूल होई; नऊ लाख खंडणीचे येत. बाकीची वीस लाख रुपये तूट येई; ही तूट दौलताबादच्या किल्ल्यांतील शिलकेंतून भरून काढीत. त्या किल्ल्यांत पूर्वीं ऐशीं लाख रोख रुपये शहाजहाननें शिल्लक ठेविले होते, ते आतां फक्त चाळीस लाख राहिले. हा तुटवडा भरून काढण्यांत औरंगजेबाचें व शहाजहानचें सडकून वांकडें आलें. त्याच्या हाताखालचे लोक नाखुष झाले, आणि बापाकडे तकरारी नेऊं लागले. लोकांना दुखवून औरंगजेब स्वत: पैसे गडप करतो, असें त्याच्या बापास वाटूं लागलें. शेतीची व जमिनीची सुधारणा एकदम वर्ष सहा महिन्यांत घडून येणारी नव्हती. ह्या साठीं उत्तरेंत ज्याप्रमाणें तोडरमल्लाची जमीनमहसुलाची पद्धत लागू करण्यांत आली, त्याप्रमाणें दक्षिणेंत मुर्शिदकुलीखानानें तीच पद्धत लागू केली. ' मुर्शिदकुलीखानाचा धारा ' म्हणून दक्षिणेंत प्रसिद्ध आहे. हें काम पुरें होण्यास दोन तीन वर्षें लागलीं. तसेंच सरकारी नोकरींत व फौजेंत नालायक माणसें भरलीं होतीं, ती औरंगजेबानें दूर करून नवीन चांगले लोक

नेमिले; आणि लोकांचे पगार वाढवून अव्यवस्थित प्रकार बंद केले. तोफखान्याची व्यवस्थाही त्यानें सुधारली. ह्यांपैकीं बरेच प्रघात व विशेषतः मोगलांची जमीनमहसुलाची पद्धत शिवाजीनें स्वीकारिली असावी असें वाटतें.

औरंगजेबानें पुष्कळ मेहेनत केली, तथापि त्याच्या बापाचा संतोष झाला नाहीं. त्या दोघांचें उत्तरोत्तर इतकें बिनसलें कीं, त्यामुळेंच पुढें औरंगजेबाला त्वेष येऊन त्यानें आपल्या भावांच्या व बापाच्या विरुद्ध इतकें क्रूर आचरण केलें. औरंगजेबाच्या भावांस व त्यांच्या मुलाबाळांस वाढदिवसांच्या वगैरे निमित्तानें वरचेवर मोठमोठीं बक्षिसें व जवाहीर मिळे. परंतु औरंगजेबास किंवा त्याच्या मुलांस बादशहाकडून कधीं फुटकी कवडीही मिळाली नाहीं. औरंगजेबानें केलेल्या नेमणुका व व्यवस्था बादशहानें कित्येक मंजूर ठेविल्या नाहींत. औरंगजेबाचें दुसरें असें एक मागणें होतें कीं, विजापुर व गोवळकोंडा येथील दरबारांशीं होणारे व्यवहार बादशहाकडून परभारें वकिलांमार्फत चालत, ते सर्व आपल्या मार्फत चालावे; कारण ते सुलतान आपले करार बरोबर पाळतात किंवा नाहीं, हें औरंगजेबासच रोजच्या व्यवहारांत ज्यास्त कळून येत होतें. उलट पक्षीं ते सुलतान बहुतेक स्वतंत्र असून त्यांच्याशीं बोलाचाली करण्याचें काम बादशहाचें होतें. औरंगजेबाचें म्हणणें शहाजहाननें मंजूर ठेविलें नाहीं; आणि औरंजेबानें पुढें जीं कृत्यें विजापुर गोवळकोंड्यासंबंधानें केलीं, तीं शहाजहानला पसंत पडलीं नाहींत. अशी ही भांडाभांडी वाढत जाऊन शेवटीं शेवटीं औरंगजेब अगदीं त्रासून गेला. त्यास काय करावें हें सुचेना. विजापुर आणि गोवळकोंडा हीं दोन राज्यें जिंकून घशांत टाकण्याचा त्यानें प्रयत्न केला. ह्याप्रमाणें सर्व दक्षिणदेश जिंकून आपली फौज व शक्ति वाढविल्यावर मग बादशाही पद मिळविण्याची खटपट करावी, असा त्याचा विचार कदाचित् एव्हांपासूनच असेल. कारण हल्लींच्या स्थितीवरून पहतां राज्यप्राप्तीच्या युद्धांत त्यास मिळालें तितकें यश मिळेल, अशी आरंभीं मुळींच खात्री नव्हती.

**७. औरंगजेबाची भयंकर हांव, गोवळकोंड्यावर झडप.—** गोवळकोंड्याचें राज्य लहानच पण धनाढ्य होतें. प्रदेश सुपीक, कालव्यांचें विपुल पाणी व लोक उद्योगी. राजधानी हैदराबाद हिरेमाणकांच्या व्यापाराचें आदिस्थान; सर्व पृथ्वीवर एवढा रत्नांचा व्यापार दुसरे कोठें

नव्हता. राज्यांत उद्योगधंदे परिपूर्ण होते. निर्मळ व इंदूर येथील पोलादाचीं शस्त्रें, तलवारी, भाले वगैरे सर्व हिंदुस्थानभर खपत. मच्छलिपट्टणचे कोष्टयांस मुद्दाम मोठे पगार देऊन बऱ्हाणपुर व दिल्ली येथील बादशाही कारखान्यांत आणीत. तेथील मलमल सर्व भूतलावर नांवाजलेली होती. एल्लूर येथील गालिचे शेकडों वर्षें नामांकित होते. पिकास आलेलीं नेत्ररम्य शेतें, विविध मत्स्यजातींनीं भरलेले तलाव, हस्तकौशल्याची भरभराट व हिरे सोन्याच्या खाणी, ह्यांच्या योगानें गोवळकोंड्याचें नांव युरोपांत सुद्धां त्या वेळीं प्रसिद्ध झालें होतें. मच्छलिपट्टणच्या उत्कृष्ट बंदरांत दूर देशचीं जहाजें येऊन नांगरत. राज्यांतील जंगलांत मोलवान् हत्तींची निपज होत असे. तंबाखू, नारळ, ताडी इत्यादि अनेक जिनसांच्या व्यापारावर गोवळकोंडा हें कैक वर्षें लक्ष्मीचें माहेरघर बनलें होतें.

औरंगजेब सुभेगिरीवर दाखल झाल्यापासून गोवळकोंड्याच्या सुलतानाशीं त्याची घासाघासि सुरू झाली. दोन लाख होन खंडणी यावयाची ती वसूल करण्यास केवढी मारामार पडे. अर्धी खंडणी रोख व अर्धीचे हत्ती द्यावे, असें बादशहानें ठरविलें; पण तेंही वेळेवर होत नसे. तेव्हां औरंगजेबाने खंडणीच्या बदल्यांत राज्याचा कांहीं प्रदेश कायमचा तोडून मागितला. पूर्वीं होन चार रुपयांचा असे, त्याचा भाव पुढें पांच रुपये झाला. पूर्वीच्या भावानें सुलतान खंडणीचे आठ लाख रुपये देई. त्याबद्दल औरंगजेबानें दहालाख रुपये मागितले; आणि मागील दहा वर्षांच्या नुकसानीबद्दल वीस लाख रुपयांची एकदम मागणी केली. जो नेहेमींची खंडणी देण्यास नाखुष, तो वीस लाख रुपये एकदम फाजील कसचे देणार ? शिवाय अलीकडे सुलतानानें कर्नाटकच्या श्रीरंगरायाचा कांहीं देश जिंकिला होता. ही गोष्ट त्यानें बादशहाची परवानगी घेतल्यावांचून केली. त्याबद्दल औरंगजेबानें त्याजपाशीं जबरदस्त दंड मागितला. यांतच सुलतानाचा दिवाण मीरजुमला ह्याच्या कारस्थानानें एक नवीन प्रकरण उपस्थित झालें तें असें.

मीरजुमला ह्याची हकीकत पूर्वी मुसलमानी रियासतींत आली आहे, (पृ० ६४६ ). ह्याचें मूळ नांव महंमद सयद. सन १६३० च्या सुमारास इराणांतून दक्षिणेंत येऊन तो हिऱ्यांचा व्यापार करूं लागला.

ह्या कामांत चांगली किफायत होऊन कुत्बशहानें त्यास आपला प्रधान नेमिलें. त्याच्या अंगीं अनेक गुण असल्यामुळें दरएक काम तो इटकून शेवटास नेई युद्धाच्या कामांतही तो कुशल होता. सुलतानानें त्यास कर्नाटकांतील प्रदेश जिंकण्यास पाठविलें. मीरजुमलानें युरोपियन लोकांकरवीं तोफखाना तयार करवून कर्नाटकावर स्वारी करून कडापा प्रांत व गंडीकोटा किल्ला जिंकून घेतले; आणि त्या बाजूचीं अनेक मोठमोठीं मंदिरें लुटून पुष्कळ संपत्ति आणिली. मंदिरांतील तांब्याच्या मूर्ति आटवून त्यानें तोफा तयार केल्या. हिऱ्यांच्या खाणी नवीन शोधून काढून किंवा जुन्यांत नवीन काम करवून त्यानें अपरंपार द्रव्य मिळाविलें. नंतर त्यानें आपली फौज व तोफखाना वाढविला आणि आपली जहागीर वाढवून कर्नाटकांतला तो एक स्वतंत्र राजाच बनला, असें म्हटलें तरी चालेल. तेव्हांपासून त्याची संपत्ति व शक्ति त्याच्या धन्याच्या डोळ्यांत खुपूं लागली; आणि त्यांच्यांत वैमनस्य उत्पन्न झालें. जिंकलेल्या संपत्तीचा व मुलखाचा हिस्सा तो कुत्बशहास देईना. इतकें वैभव प्राप्त झाल्यावर प्रधानगिरीही त्यास नकोशी झाली सुलतानानें त्यास पकडून त्याचे डोळे काढण्याचा प्रयत्न केला; पण वेळींच तो बेत मीरजुम्ला ह्यास कळून तो निघून कर्नाटकांत गेला, तो पुन: गोवळकोंड्यांत आला नाहीं. त्यास जिंकण्यासाठीं सुलतानानें कर्नाटकांत फौज रवाना केली.

अशा स्थितींत मीरजुम्ला दुसऱ्या कोणाचा तरी आश्रय पाहूं लागला. त्यानें विजापुरच्या आदिलशहाला नजराणे देऊन वश करून घेतलें. इकडे इराणच्या शहाशींही त्यानें संधान चालविलें. कोणीकडून तरी आपली सर्व संपत्ति घेऊन सुरक्षितपणें इराणांत पळ काढावा, एवढीच त्याची इच्छा होती. प्रथम त्यानें चंद्रगिरीच्या राजाशीं स्नेह जोडिला. कुत्बशहाची फौज त्याजवर चालून आली, तरी तिला लांच देऊन अगोदरच त्यानें वश करून घेतलें होतें. तिकडे मोगलबादशहाशींही त्यानें संधान सुरू केलें. औरंगजेबास गोवळकोंड्याचें राज्य जिंकण्याची मोठी हाव सुटली होती. ह्या कामांत त्यानें मीरजुम्लास गोडगोड वचनांनीं वश करून घेतलें. मीरजुम्ला वस्ताद होता, त्यानें औरंगजेबास एकदम दाद दिली नाहीं. उलट आपणास नोकरींत ठेवण्याविषयीं त्यानें शहाजहानकडे विनंतिअर्ज पाठविला. अशा रीतीनें सर्वांना खूष ठेवून आपला डाव साधण्याचा

त्याचा विचार होता. शहाजहानच्या नोकरींत तो जाणार हें ऐकून आदिलशहा व कुत्बशहा चिडून गेले, आणि त्या दोघांनीं आपल्या फौजा मीरजुम्लावर रवाना केल्या. इकडे मीरजुम्ल्याचा मुलगा महंमद अमीन व कुटुंबाची मंडळी गोवळकोंड्यास होती, त्यांस सुलतानानें कैद करून त्यांची संपत्ति जप्त केली, ( नोव्हेंबर १६५५ ).

औरंगजेबाला हें कारण पुरलें. त्यानें लगेच बादशहाला लिहून मीरजुम्ल्याचें कुटुंब सोडविण्याकरितां गोवळकोंड्यावर स्वारी करण्याची परवानगी मागितली. हें पत्र शहाजहानला पोंचण्यापूर्वींच त्यानें मीरजुम्ला यास आपल्या दरबारीं नेमणूक करून देऊन तावडतोब निघून येण्याविषयीं हुकूम पाठविला होता. हा हुकूम औरंगजेबानें कुत्बशहाकडे रवाना केला; आणि मीरजुम्ला, त्याचें कुटुंब व त्याची सर्व संपत्ति ह्यांस सुरक्षितपणें बादशहाकडे पाठवून देण्याविषयीं लिहिलें. सुलतान कदाचित् नाहीं होय म्हणेल,म्हणून मागोमाग औरंगजेबानें आपला मुलगा सुलतान महंमद याजबरोबर गोवळकोंड्यावर फौज रवाना केली.सुलतानानें बादशहाचा हुकूम एकदम मानिला नाहीं, त्याबरोबर औरंगजेबानें गोवळकोंड्यावर स्वारी केली, ( ता. १० जानेवारी १६५६ ). कुत्बशहानें आदिलशहास मदतीस बोलाविलें. आदिलशहानें आपली फौज अफजलखानाच्या हाताखालीं तयार केली, परंतु पाठविली नाहीं. २० जानेवारी रोजीं औरंगजेब स्वत: दौलताबादेहून फौज घेऊन निघाला. ह्याच वेळेस शिवाजीनें मोगलांच्या प्रदेशावर प्रथमच स्वारी करून जुन्नर शहर लुटलें. परंतु शिवाजीकडे लक्ष देण्याइतकें औरंगजेबास ह्या वेळीं त्याचें महत्त्व वाटलें नाहीं. राज्यांत फौज आलेली पाहतांच कुत्बशहानें मीरजुम्ल्याची मंडळी सोडून देऊन बादशहाची माफी मागितली. परंतु औरंगजेबानें आपल्या फौजा परत नेल्या नाहींत. त्यानें हैदराबादेवर तोफा सुरू केल्या. दुसरे दिवशीं मोगल फौजेनें शहरांत लूट केली. कुत्बशहा अगोदरच गोवळकोंड्यास पळून गेला म्हणून बचावला. हैदराबाद काबीज करून औरंगजेबानें गोवळकोंड्यास वेढा दिला. बाहेर व किल्ल्यांत लढाया सुरू झाल्या. बिचारा कुत्बशहा तहाची विनवणी करीत होता; परंतु औरंगजेबाचे मनांत सर्वच राज्य खाऊन टाकावयाचें असल्यामुळें त्यानें कुत्बशहाच्या विनंतीकडे बिलकूल लक्ष दिलें नाहीं. त्यानें बापास लिहिलें

कीं 'हा प्रदेश किती सुंदर आहे म्हणून सांगूं. पाणी किती विपुल, हवा किती चांगली, सर्व प्रदेश शेतांनीं भरून गेलेला आहे. लोकवस्ती किती तरी दाट आहे. गोवळकोंडयाच्या हद्दींत मीं पाय ठेवला मात्र, जिकडे तिकडे सुंदर तलाव, गोड पाण्याचे झरे, झुळझुळ वाहणारे नदीनाले आणि नाना प्रकारच्या शेतांच्या मध्यभागीं बसलेलीं टुमदार गांवें एकामागून एक माझ्या दृष्टीस पडूं लागलीं. तुमच्या ह्या एवढ्या अफाट राज्यांत असा सुंदर प्रांत एकही नाहीं. असला मोलवान् प्रदेश ह्या मूर्ख राजाच्या हातांत पडावा, हें केवढें दुर्भाग्य ! ' अशा नाना तऱ्हेच्या गोष्टी लिहून हें राज्य जिंकण्याविषयीं औरंगजेबानें बापाची परवानगी मागितली. त्यानें असेंही कळविलें, कीं, ' कुत्बशहा नीच आहे, धर्मभ्रष्ट आहे, कितीही दया दाखविली तरी तो उपकार ओळखणारा नाहीं, सर्व लोक त्यास त्रासले आहेत, सुनी मुसलमानांचा तो छळ करितो, व्यसनी तर इतका आहे, कीं राजाला असलें वर्तन कधींच शोभायचें नाहीं. अशा ह्या राजाला योग्य शिक्षा न करणें, म्हणजे आपल्या कर्तव्यांत चुकण्यासारखें आहे. अशी संधि पुनः येणार नाहीं, आणि हें राज्य चालू ठेवण्याची चूक इतःपर आपण करूं नये.'

पण त्या विचारी बादशहाला ही गोष्ट रुचली नाहीं. त्याला वाटलें, कुत्बशहाही आपल्यासारखाच राजा. वजीर बंडखोर निघाला, त्याला शिक्षा करून ताब्यांत आणणें हा कांहीं त्याचा गुन्हा नव्हे; आणि ह्याबद्दल त्याचें राज्य खालसा करणें महत्पाप होय. राजधानींत शहाजहानजवळ वडील मुलगा दारा होता. तो औरंगजेबासारखा दुष्ट नव्हता. गोवळकोंड्याच्या दिल्ली येथील वकिलानें दाराची विनवणी केली, आणि त्यास खरा प्रकार समजावून दिला. तेव्हां दाराच्या विद्यमानें बादशहानें असें ठरविलें कीं, कुत्बशहाकडून दंड घेऊन तह करावा. हा हुकूम औरंगजेबास २४ फेब्रुवारी रोजीं पोंचला. त्या वेळीं कुत्बशहा अगदीं रडकुंडीस आला होता. त्याची वृद्ध आई येऊन औरंगजेबाचे पाय धरीत होती. 'खंडणीची सर्व बाकी देतों, मागाल तो दंड देतों, आपली मुलगी तुमच्या मुलाला देतों, परंतु आमचें राज्य तारा,' अशी त्याची विनवणी चालू होती. शहाजहानचें पत्र औरंगजेबानें कुत्बशहास दिलेंच नाहीं. त्यानें एक कोट दंड मागितला. ही जबर रकम कुत्बशहाच्यानें देववेना.

इकडे त्यानें औरंगजेबाचीं सर्व कृष्ण कारस्थानें दाराच्या मार्फत शहाजहानचे कानावर घातलीं. ' बादशहांचे हुकूम औरंगजेबाकडे येतात ते मला पोंचत नाहींत. तिकडून हुकूम येतो एक, आणि इकडे प्रकार घडतो निराळाच, ' ही कुत्बशहाची ओरड बाहेर आली. त्यावरून बादशहाच्या अंगाचा तिळपापड उडाला. लगेच त्यानें सणसणीत हुकूम औरंगजेबास पाठविला कीं, ' पत्र देखत गोवळकोंडा सोडून चालतें व्हावें.' हा हुकूम बादशहानें गुप्त न पाठवितां सर्व लोकांस जाहीर केला, त्यामुळें औरंगजेबाला काय वाटलें असेल ह्याची कल्पनाच केली पाहिजे !

मार्च ३० सन १६५६ रोजीं औरंगजेब गोवळकोंड्याचा वेढा उठवून कांहीं अंतरावर जाऊन राहिला. नंतर चार दिवसांनीं तेथील राजकन्येचें लग्न औरंगजेबाचा मुलगा महंमद सुलतान ह्याच्याशीं तरवारीच्या मध्यस्थीनें लागलें. इतःपर बादशहाचे हुकूम यथायोग्य पाळण्याचें वचन कुत्बशहानें स्वहस्तानें लिहून दिलें. १३ एप्रिल रोजीं बादशहानें स्वहस्तानें लिहून पाठविलेलें तहाचें पत्र औरंगजेबानें कुत्बशहास दिलें. त्यांत ' राज्याचें संरक्षण करूं ' असें वचन होतें. दंड पंचवीस लाख ठरला होता, त्यांतून कुत्बशहाच्या आईच्या व औरंगजेबाच्या बायकांच्या मध्यस्थीनें दहा लाख माफ करण्यांत आले. सोन्याच्या भावानें होनाची किंमत वाढल्यावरून वीस लाख बाकी निघत होती ती सुद्धां पुढें शहाजहाननें माफ केली. ता. २१ एप्रिल रोजीं औरंगजेब परत निघाला, तो १७ मे रोजीं औरंगाबादेस येऊन पोंचला. त्यापूर्वी २० मार्च रोजीं मीरजुम्लानें औरंगजेबाची भेट घेतली. त्या वेळीं त्याचा थाट स्वतंत्र राजास शोभण्यासारखा होता. बरोबर ६ हजार स्वार, १५ हजार पायदळ, १५० हत्ती व तोफखाना असा त्याचा सरंजाम होता. त्यानें औरंगजेबाला व मुलांला पुष्कळ लाखांचे नजराणे केले. लगेच तेथून निघून ७ जुलई रोजीं मीरजुम्ला दिल्लीस पोंचला. त्या वेळीं त्यानें बादशहास पंधरा लाखांचा नजराणा केला. वजीर सादुल्लाखान नुकताच मरण पावला होता, त्याच्या जागीं शहाजहाननें मीरजुम्लाची नेमणूक केली.

अशा प्रकारें सर्व बेत फसून औरंगजेबास रिकामें परत यावें लागलें, यामुळें बापासंबंधानें त्याची भयंकर चडफड सुरू झाली.त्यानें हैदराबाद शहर लुटून नाहक लोकांस जाच केला; आणि शिवाय कुत्बशहाकडून नानातऱ्हेचा

लांच व नजराणा घेऊन तो औरंगजेबानें सरकारांत जमा केला नाहीं अशा कागाळ्या बादशहाकडे गेल्या. उलट औरंगजेबाचा खर्च मोठा होऊन लोकांचेही त्यास तगादे लागले. ह्यासंबंधानें बापलेकांची पुष्कळ भांडाभांडी झाली. मीरजुम्ला बादशहापाशीं होता, त्यानें औरंगजेबाची बाजू बरीच सांवरून धरिली. पुढें औरंगजेबानें श्रीरंगराय ह्याचें कर्नाटकांतील राज्य हळू हळू कसें घशांत टाकिलें हें पाहिलें, म्हणजे मोगल बादशाहीच्या राजनीतीचा अत्यंत वीट येऊं लागतो. हिंदी राजांनीं इंग्रजांचें राज्य संतोषानें पत्करिलें, ह्याचें कारण मोगलांचा हा भयंकर अपहार होय. (प्रो० सरकार).

८. **औरंगजेबाचे आदिलशाहींतील डावपेच.**—सन १६३६ त शहाजहाननें निजामशाहीची वांटणी केली, त्या तहानें दक्षिणेंतील राज्यांच्या हद्दी स्पष्ट ठरविण्यांत आल्या. कुत्बशहा मोगलांचा मांडलिक झाला; आणि आदिलशहा दोस्त झाला. राजनीति अगाध आहे म्हणतात, त्याचे असे प्रत्यय इतिहासांत वारंवार दृष्टोत्पत्तीस येतात. निजामशाहीचा बराच मुलूख मिळाल्यामुळें आदिलशाहीचें राज्य वाढलें; परंतु पुढें उत्तरेच्या बाजूस हालचाल करण्याची सोय त्यास राहिली नाहीं. ताब्यांत बरीच फौज होती, तिचा कोठें तरी उपयोग झाला पाहिजे. पश्चिमेस कोंकणांत, पूर्वेस कर्नाटकांत आणि दक्षिणेत म्हैसुरास आदिलशहानें आपल्या फौजेस काम दिलें. सन १६३७ त आदिलशहानें बेदनूर प्रांत जिंकिला. पुढच्या वर्षी रणदुल्लाखानाच्या हाताखालीं चाळीस हजार फौज कर्नाटकांत शिरली. त्यांनीं बंगळूर, शिरें वगैरे कावेरीच्या उत्तरेकडील प्रांत काबीज करून, ईशान्येकडे कर्नाटकांत प्रवेश केला. त्या प्रदेशांतील किल्ले व शहरें जिंकण्याचें काम कित्येक वर्षे चालू होतें. ह्या कामांत रणदुल्लाखानाबरोबर शहाजी होता. सन १६४७ त विजापुरचा मुख्य सरदार मुस्ताफाखान ह्यानें विजापुरची सर्व फौज घेऊन कर्नाटकावर स्वारी केली. त्या बाजूस पुष्कळ लढाया होऊन, मुस्ताफाखानानें जिंजीचा मजबूद किल्ला काबीज केला, (१७ दिसेंबर सन १६४९). त्याबरोबर कर्नाटकांतील सर्व दक्षिण भाग आदिलशहाच्या हस्तगत झाला. ह्याच वेळेस मुस्ताफाखानानें बाजी घोरपड्याकडून शहाजीस पकडून कैद केलें. ह्या स्वारींत चार कोट होन विजापुरच्या खजिन्यांत येऊन पडले. पश्चिमच्या बाजूस सन १६४५ त,

गोव्यापासून साष्टीपावेतोंच्या प्रदेशांत विजापुरच्या फौजा हल्ला करून परत आल्या. एवंच महंमदशहाच्या कार्किर्दीत, आदिलशाहीची भरभराट अतोनात झाली.

सन १६३६ पासून महंमदशहा शहाजहानशीं फारच गोडीनें वागला. कारणपरत्वें दोघांमध्यें नजरनजराणे जात येत असत. महंमदशहाचा साधा भोळा स्वभाव व त्याचें पापभीरु वर्तन शहाजहानला फारच आवडत असे. पूर्वीचे बादशहा विजापुरचे राजांस 'शहा' म्हणून संबोधीत नसत, खान म्हणत. परंतु शहाजहान त्यांस आतां 'शहा' असें लिहूं लागला. एक दोनदां मात्र त्यांचें जरा बिघडलें होतें. मोगल बादशहांप्रमाणें किल्ल्याच्या बाहेरील पटांगणांत हत्तींचे वगैरे खेळ करून महंमदशहा ते उंचावरून पाहूं लागला; तसेंच तो आपल्या सरदारांस खानखानान अशा पदव्या देऊं लागला. हा प्रकार शहाजहानास समजतांच त्यानें तावडतोब खरमरीत पत्र लिहिलें, आणि पूर्वीच्या चाली सोडल्यास एकदम मोगल फौज विजापुरावर चालून जाईल अशी धमकी दिली. त्याबरोबर महंमदशहा नवीन प्रघात सोडून शहाजहानच्या मर्जीप्रमाणें वर्तन करूं लागला. हा सदाचारी महंमदशहा तीस वर्षें राज्य करून, वयाच्या ४७ वे वर्षी ता. ४ नोव्हेंबर १६५६ रोजीं मरण पावला, आणि जी गोष्ट महंमदशहाच्या मनांत सारखी डांचत होती, ती दत्त म्हणून पुढें उभी राहिली.

हा प्रकार समजण्यास जरा बादशाहीकडे गेलें पाहिजे. मीरजुम्ला यास औरंगजेबानें संपूर्ण वश करून घेतलें होतें. तो दिल्लीस वजीर झाल्यापासून जिकडे तिकडे हिरेमाणकांची रेलचेल झाली. बादशहापासून तों लहानशा अंमलदारापर्यंत सर्वांस मीरजुम्लानें आपल्या रत्नांनीं वश करून घेतलें. अशीं रत्नें ज्या देशांत पिकतात, तो प्रांत आपल्या राज्यांत कां नसावा असें शहाजहानासही वाटूं लागलें. दुसऱ्याचा अपहार करूं नये असें म्हणणारा दाराचा पक्ष खालीं आला. औरंगजेबाच्या सूचना दरबारांत पसंत होऊं लागल्या. मीरजुम्ला यास दक्षिणची खडानखडा माहिती होती. इकडच्या रियासतींत कोण इसम काय लायकीचा आहे हें सर्व त्यास ठाऊक होतें. तेव्हां दरएक बाबतींत मीरजुम्लाचीं कारस्थानें सिद्धीस जाऊं लागलीं. मीर जुम्लाच्या नादीं लागून, बादशहानें दाराचा व आपला पक्ष इतका दुर्बल करून घेतला कीं, त्यामुळेंच शेवटीं औरंगजेबाचे फांसांत सांपडून,

शहाजहाननें आपल्या घराण्याचा व हिंदुस्थान देशाचा भावी इतिहास सर्वस्वी बदलून टाकिला. महंमद आदिलशहा बरेच दिवस आजारी असून, तो आतां फार दिवस वांचत नाहीं असें पाहून, औरंगजेबानें गोवळकोंड्याचें नुकसान विजापुरांतून भरून काढण्याचें मनांत योजिलें. हा बेत सिद्धीस नेण्यासाठीं त्यानें मीर जुम्ला यास कांहीं तरी निमित्त काढून दक्षिणेंत बोलाविलें. महंमदशहा मरण पावल्यावर त्याची बेगम बडीसाहेबा (कुत्बशहाची बहीण) व वजीर खानमहंमद यांनीं मयत सुलतानाचा अठरा वर्षांचा मुलगा अली म्हणून होता, त्यास गादीवर बसविलें. त्यावरून औरंगजेबानें बापास लिहून कळविलें, कीं 'अली हा महंमदशहाचा खरा पुत्र नव्हे. सबब विजापुरावर स्वारी करून, तें राज्य काबीज करण्याची परवानगी व्हावी.' इकडे त्यानें सरहद्दीवर मोठी फौजही जमविली.

महंमदशहा मरण पावल्यावर नवीन जिंकिलेल्या कर्नाटक प्रांतांत बंडाळी सुरू झाली; आणि ज्यास जसा वाव सांपडेल, तसा तो यत्न करूं लागला. शहाजी भोसले मूळपासून तिकडे उद्योग करीतच होता; परंतु इतउत्तर दरबारचे हुकूम न मानतां, तो सर्वस्वी स्वतंत्र कारभार करूं लागला. प्रत्यक्ष विजापुरांत अंदाधुंदी माजून, निरनिराळे अंमलदार एकमेकांत भांडूं लागले. औरंगजेबानें त्या सर्वांस लांच चारून, अंतस्थ रीतीनें फोडून ठेविलें. विजापुरच्या फौजेंतले जे लोक नोकरी सोडून आपलेकडे येतील, त्यांस तो बक्षिसें देऊं लागला. शिवाजीचा वकील औरंगजेबाकडे येऊन, शिवाजीनें विजापुर जिंकण्यास मदत केल्यास त्यास काय मिळेल, याचा खुलासा काढूं लागला. त्यास कांहीं तरी धरसोडीचें उत्तर औरंगजेबानें दिलें, (मार्च १६५७). नोव्हेंबर ता. २६ रोजीं विजापुरावर स्वारी करण्याची परवानगी शहाजहाननें सोडिली; आणि त्याची सर्व व्यवस्था औरंगजेबाचे हातांत दिली. त्याचे मदतीस शाएस्तेखानास माळव्यांतून जाण्याचा हुकूम झाला. मीरजुम्लाही बादशहाचे हुकुमानें निघून आला.

या युद्धाच्या मुळाशीं कांहीं एक आगळीक झालेली नव्हती. विजापुरचें राज्य मांडलिक नव्हतें; आणि तेथील गादीचा वारस ठरविण्याचें काम मोगल बादशहाचें नव्हतें. विजापुरांत नवीन सुलतान गादीवर आल्यानें बजबजपुरी माजली, ही संधि औरंगजेबानें साधली. मीरजुम्ला १६५७ च्या जानेवारींत येऊन पोंचला, आणि त्याच दिवशीं तो व

औरंगजेब विजापुरावर निघाले. तोफखाना बरोबर असल्यामुळें त्यांस उशीर लागूं लागला. मार्चच्या आरंभीं त्यांनीं बेदर शहरास वेढा घातला. मोगलांची हद्द उदगीरपर्यंत होती. उदगीरच्या दक्षिणेस मांजरा नदीच्या पलीकडे उंच डोंगरावर बेदर आहे. हें शहर फार भरभराटीचें होतें. सीदीमर्जान नांवाचा शूर सरदार विजापुरच्या तर्फेनें किल्ल्याचें संरक्षण करीत होता. तीस वर्षेपर्यंत त्यानें किल्ल्यांत सर्व साहित्य जमवून उत्कृष्ट तयारी ठेविली होती. तथापि कांहीं दिवस गेल्यावर मोगलांची मोठी फौज व मीरजुम्लाच्या तोफा यांपुढें किल्ला ढासळूं लागला. सीदीमर्जान शौर्यानें लढत असतां गोळा लागू पडला. त्याबरोबर किल्ला मोगलांच्या हस्तगत झाला. किल्ल्यांत बारा लक्ष रुपये रोख व आठ लाखांचें दारू-सामान औरंगजेबास मिळालें. ह्या वेळीं औरंगजेबानें शिवाजीला लिहि-लेलें खालील पत्र उपलब्ध आहे. 'सांप्रत ईश्वरकृपा व आमचें दैवशा-लित्व व फौजेचा शेरपणा ह्यांनीं इकडील वाईट इच्छिणारे नाहींसे झाले. दिवसेंदिवस इकडे जय येत चालला, तो असा कीं किल्ला बेदर मोठा मजबूद, आजपावेतों कोणीच सर केला नव्हता; आणि कोणास सर करा-वयाची कल्पनाही येत नव्हती, तो दक्षिण व कर्नाटकचा केवळ दरवाजा एक दिवसांत हस्तगत झाला. इतरांस वर्षोंवर्षेंही हस्तगत झाला नसता. सर्व साह्य ईश्वराचें, इकडील प्रतापशूरांचे शौर्यामुळे. ये विषयीं संतोष मानून वरचेवर आमचे जय होत जातील, त्या संतोषाच्या वर्तमानावर कान देत असावें. आमचा लोभ पूर्ण आहे, असें समजावें.' ता. २३ एप्रिल १६५७, (खं. ८-२).

ता. १ एप्रिल रोजीं बेदरच्या मशिदींत शहाजहानच्या नांवानें खुत्बा वाचण्यांत आला. इकडे विजापुरची कांहीं फौज मोगलांवर चालून आली. खानमहंमद व अफझलखान हे सरदार तिजवर मुख्य होते. मोगलांकडे महाबतखान व दिलेरखान हे होते. त्यांनीं विजापुरच्या फौजेचा पराजय केला; आणि कल्याणीच्या किल्ल्यास वेढा घातला. मागाहून औरंगजेबही तेथें आला. बाहेरच्या बाजूस मोगलांवर विजापुरची फौज चालून आली. मोगलांकडील रजपुतांनीं तिजवर निकरानें हल्ला केला. ह्या प्रसंगीं रजपु-तांनीं अतिशय शौर्य दाखविलें. पुष्कळ रजपूत सरदार मरण पावले. मोगलांस विजय प्राप्त झाला. तीन महिने वेढा चालून, जुलईच्या अखे-

रीस कल्याणी किल्ला मोगलांनीं हस्तगत केला. ह्याप्रमाणें राज्याचें संरक्षण करणारे पूर्वेकडील दोन मोठे किल्ले हस्तगत करून, औरंगजेब प्रत्यक्ष विजापुरावर चालून येणार, इतक्यांत विजापुरामार्फत दिल्लीस चाललेल्या खटपटीस यश येऊन, विजापुरशीं तह करून एकदम परत यावें, असा बादशहाचा हुकूम आला. हा हुकूम ऐकून औरंजेबाच्या जिवाची लाही लाही झाली; परंतु हुकमापुढें करतो काय! हुकूम आला तेव्हां कल्याणीचा वेढा चालू होता. एक महिना त्यानें हुकूम बाहेर न फोडतां कल्याणीचा किल्ला काबीज केला; आणि शेवटीं निरुपायानें तह करून औरंगजेब ४ ऑक्टोबर १६५७ रोजीं परत फिरला. तहांत असें ठरलें कीं, आदिलशहानें दीड कोट रुपये दंड द्यावा. बेदर, कल्याणी, परिंडा हे तीन किल्ले व निजामशाही कोंकणांतले किल्ले आणि वांगी प्रांत मोगलांस द्यावा. तह मंजूर करितांना शहाजहाननें दंडापैकीं अर्ध कोट रक्कम माफ केली. हें होत आहे तोंच ता. ६ सेप्टेंबर रोजीं शहाजहान एकदम आजारी पडून मरणोन्मुख झाला, त्यावरून एकदम मोगल राज्यांत सर्वत्र गडबड उडाली; आणि दाक्षिणच्या कामांत लक्ष देण्यास औरंगजेबास फार दिवस फावलें नाहीं. दक्षिणेंतील राज्यें जिंकण्याचा अंतःकरणांतील मनोदय पुढें तीस वर्षेपर्यंत त्यास सिद्धीस नेतां आला नाहीं.

९. **शिवाजीचा मोगलांशीं संबंध.**—सन १६५६ च्या आरंभीं औरंगजेब विजापुरवर स्वारी करण्याच्या तयारींत असतां, शिवाजीचा वकील अहंमदनगरास मोगाल अधिकाऱ्याकडे आला; आणि शिवाजीची त्यानें अशी विनंति कळविली, कीं 'आदिलशाहीचा कोंकणांतील भाग माझ्याकडे चालविण्याचें आपण वचन देत असल्यास विजापुरच्या युद्धांत मोगलांस मदत करण्यास मी तयार आहें.' ह्याचा जबाब उडवाउडवीचा मिळाला. ही धरसोड शिवाजीला आवडली नाहीं. म्हणून त्यानें विजापुरकरांसच मदत केली; आणि मोगलांचा जुन्नर वगैरे मुलूख लुटला. एके रात्रीं त्यानें जुन्नरवर छापा घातला. दोरीच्या शिड्यांवरून तट चढून मराठ्यांनीं आंतील पहारेकऱ्यांस कापून काढिलें; आणि ११ हजार होन, २०० घोडे, व जवाहीर, कापड वगैरे पुष्कळ सामान त्यांनीं नेलें. मराठे स्वारांच्या चपळ टोळ्या सर्व मुलखांत हिंडूं लागल्या. त्यांनीं मोगलांची रसद व लहान मोठीं गांवें लुटलीं; आणि प्रत्यक्ष अहंमदनगरच्या दरवा-

ज्यापर्यंत मोगल राज्यांत प्रळय उडवून दिला. अहंमदनगर लुटण्याच्या बेतांत मराठे होते, इतक्यांत किल्ल्यांतील फौजेनें वेळेवर येऊन त्यांस हांकून लाविलें; पण त्यामुळें अहंमदनगरच्या लोकांस इतकी दहशत बसली, कीं तेथील अधिकाऱ्यानें लोकांचें सर्व जड जवाहीर किल्ल्यांत नेऊन ठेविलें. मिनाजी भोसले ( ? ) आणि काशी ( ? ) हे दोन मराठे सरदार असे चपळ हल्ले करण्यांत विशेष प्रवीण होते.

औरंगजेबानें ही बातमी ऐकून लगेच अहंमदनगराला मदत पाठविली. त्याचे अंमलदार मराठ्यांवर चालून जाण्यास दिरंगाई करूं लागले, त्यांस त्यानें ठपके दिले. त्या वेळच्या त्याच्या पत्रांत सूड व द्वेष जळजळित दिसतो. 'गांवें जमीनदोस्त करा, लोकांना कापून काढा, दयामाया कशी ती बिलकूल करूं नका, त्यांचें सर्वस्व लुटून आणा, पुणें व चाकण हीं शिवाजीचीं दोन ठिकाणें धुळीस मिळवा, आमचे मुलखांतील पाटील कुळकर्णी, जे कोणी त्यास सामील असतील, त्यांचीं डोचकीं उडविण्यास कमी करूं नका.' अशा प्रकारचीं पत्रें लिहून त्यानें आपल्या लोकांस शिवाजीच्या मुलखावर एकदम चहूंकडून पाठविलें. शिवाय त्यानें सरहद्दीवर भरंवशाचे शूर सरदार ठेवून आपल्या प्रदेशास फौजेचा गराडा घालून ठेविला. जुन्नरजवळ कर्तलबखान, गड नमुना येथें अब्दुल मुनीम, चांभारगुंडा येथें हुशदारखान, आणि बीड व धारूर येथें रायसिंग व नासिरीखान, अशा रीतीनें हे सरदार आपल्या रयतेचें संरक्षण करीत समोरून येणाऱ्या मराठ्यांस गिळण्यासाठीं टपून बसले. बादशहानें त्यांना ताकीद दिली, 'सरहद्दीवर नुसते बसून राहूं नका. संधि दिसतांच मराठ्यांच्या मुलखावर हल्ला करून लगेच आपआपल्या जागेवर परत या. नासिरीखान नेहेमींच जरा ढिला असे. बादशहानें वारंवार ठपका दिल्यामुळें संतापून १६५७ च्या मे महिन्यांत अहंमदनगरच्या बाजूस शिवाजी आलेला पाहतांच त्यानें जोराचा हल्ला केला; आणि पुष्कळ लूट मिळवून आणिली. त्यानंतर शिवाजीचा जलद पाठलाग करण्यास औरंगजेबानें नासिरीखानास सांगितलें. इतक्यांत पावसाळा येऊन घांटांतून मोगल फौजेचें शहाणपण चालेना, तेव्हां ते परत आले. त्याच पावसाळ्याच्या अखेरीस मोगलांचा व विजापुरकरांचा तह झाला. तेव्हां आतां एकट्यानेंच लढण्यापासून फायदा नाहीं असें पाहून शिवाजीनें आपला एक वकील रघुनाथपंत ह्यास

नासिरीखानाकडे, आणि दुसरा वकील कृष्णाजी भास्कर ह्यास औरंगजेबाकडे, केलेल्या आगळिकीबद्दल माफी मागण्यासाठीं, पत्रें देऊन पाठविलें. हे वकील आले तेव्हां औरंगजेब बादशाही पद मिळविण्यासाठीं दिल्लीस जाण्याच्या धांदलींत होता. म्हणून त्यानें बाह्यतः शिवाजीस सामोपचाराचें पत्र लिहिलें; परंतु अंतर्यामीं तो शिवाजीबद्दल जळत होता. त्यानें शिवाजीचा स्वभाव पूर्णपणें ओळखिला होता; आणि शिवाजी केव्हां काय दगा करील ह्याचा त्यास भरंवसा नव्हता. म्हणून तूर्त त्याच्या बंदोबस्ताबद्दल शक्य तितकी तजवीज लावून औरंगजेब उत्तरेकडे निघून गेला. ह्या प्रसंगीं खालील पत्र औरंगजेबानें शिवाजीस लिहिलें.

'तुमची अर्जदास्त कृष्णाजी भास्कर पंडित यांचे पत्रासुद्धां रघुनाथपंत वकील यांजबरोबर आलेली पाहून मजकूर ध्यानास आला. यद्यपि तुमच्या पेशजीच्या गोष्टी विसरावया जोग्या नाहींत, तथापि तुम्हीं आपले कृतकर्मांचा पश्चात्ताप केला; आणि हा दरबार उपेक्षेचा नाहीं जाणून, वाडिलांचें लक्ष निभ्रांत इकडे आहे असें समजून, तुमचें पूर्व कृत्य मनांत आणीत नाहीं. येविषयींचा संतोष मानून इकडील दौलतीविषयीं कोशीस करीत जावी. आपले वतनी महाल किल्ले व कोंकण देश सुद्धां, निजामशाहीचे खेरीज, विजापुर आदिलखानाचे इलाख्यांत जे आहेत ते, त्यांजकडून मुलूख हस्तगत झाल्यानंतर बंदोबस्त होण्याविषयीं वचन असावें, म्हणजे सोनोपंत ह्यास हुजूर पाठवितों; आणि इकडील लक्षांत वागून सरकारी मुलखांची सरहद्द रक्षण करून कामदारांशीं परीख होतों, कीं ज्या योगें बंड बखेडे वगैरे न व्हावे, म्हणोन लिहिलें; त्यास, तुम्हीं लिहिल्या अन्वयें वर्तून हा फरमान पाहतांच आपले मजकुराची अर्जी लिहून सोनोपंताबरोबर पाठवून देणें. म्हणजे त्याप्रमाणें केलें जाईल. जाणून लक्षांत वागवून, आमचे लोभाची पूर्णता समजावी. ता २४ फेब्रुवारी १६५८. ( खंड ८-६. )

१०. **औरंगजेब व शिवाजी यांचे विरोधी कावे.**-मागें सांगितलेंच आहे कीं, सन १६५७, ४ ऑक्टोबर रोजीं औरंगजेब कल्याणीहून निघाला, तो औरंगाबादेस येऊन तेथून २५ जानेवारी १६५८ रोजीं दिल्लीकडे जाण्यास निघाला. मध्यंतरींचे त्याचे दिवस अत्यंत विवंचनेंत गेले. पुढें काय होणार व आपण काय करावें, ह्याबद्दल त्यास कांहीं उमज पडेना. मात्र ह्या वेळच्या त्याच्या वर्तनावरून त्याचें शहाणपण, सावधगिरी, लोकांना

ताब्यांत ठेवण्याची खुबी, आणि भयंकर कारस्थान हे गुण चांगले व्यक्त होतात. तो इकडून निघून जातांच विजापुर आणि गोवळकोंडा ह्यांनीं पुनः उचल खाल्ली. त्या दोघांशीं लढण्यांत पैसा व श्रम खर्च केलेले सर्व फुकट गेले. आदिलशहाकडून दंड व मुलूख याव-याचा होता, पण छातीवर बसून तो वसूल केल्याशिवाय कसा येणार. ह्या प्रसंगीं त्याचें मन कसें द्विधा होत होतें, मनांत एक व दाखवायचें एक, असे प्रयोग त्यानें किती केले, ह्या गोष्टी मीरजुम्ला ह्यास लिहिलेल्या त्याच्या गुप्त पत्रांत नमूद आहेत. शहाजहानच्या आजाराची बातमी बाहेर फुटण्याच्या अगोदर, विजापुरकडील मुलूख व दंड त्यास पदरांत पाडून घ्यावयाचा होता. म्हणून मीरजुम्ला ह्यास त्यानें परिंडा किल्ला ताब्यांत घेण्यास पाठविलें, तेव्हांपासून बहुधा दररोज एक पत्र मीरजुम्ला ह्यास औरंगजेबानें लिहिलेलें आहे. इकडे महाबतखान व राव छत्रसाल ह्या दोन मोठ्या सरदारांस दिल्लीच्या हुकमावरून ताबडतोब हिंदुस्थानांत जावें लागलें. नासिरीखान कल्याण सोडून माळव्यांत गेला. हे सर्व सरदार बादशाही हुकमाचे ताबेदार होते, औरंगजेबाच्या हाताखालचे नव्हते. ह्याप्रमाणें मोगल फौजा निघून गेलेल्या पाहून विजापुर व गोवळकोंडा येथील फौजा बाहेर पडल्या, आणि खुशाल आपला पूर्वींचा मुलूख परत घेऊं लागल्या. विजापुरचा सरदार अफझलखान कल्याण व बेदर हे किल्ले परत घेण्यासाठीं चालून आला. इतक्यांत दैवयोगानें औरंगजेबाचें मीरजुम्लास जात असलेलें एक गुप्त पत्र अफझलखानानें पकडलें. त्यांत बादशहाच्या आजाराची व पुढील सर्व गोंधळाची इत्थंभूत हकीकत होती. जी गोष्ट औरंगजेबानें महाप्रयासानें झांकून ठेविली होती, ती एकदम चहूंकडे जाहीर झाली; आणि औरंगजेबाचा कावा सर्वांस समजला. तरी त्यानें आपली सर्व व्यवस्था शांतपणें चालविली. इकडे औरंगाबाद येथें त्याची बायको दिलरासबानू, तीन मुलांची आई, मरण पावली. मीरजुमला परिंडा घेण्याच्या खटपटींत होता; पंतु शहाजहान आजारी पडल्याची बातमी बाहेर फुटतांच मीरजुम्ला यास कोणी दाद देईना. इतक्यांत त्यास निघून येण्याविषयीं दिल्लीहून निकडीचा हुकूम येऊन मीरजुम्ला परत निघाला, तो ता. १ जानेवारी सन १६५८ रोजीं औरंगाबाद येथें औरंगजेबास येऊन मिळाला. परिंडा किल्ला राहिला, आणि विजापुरकडील एक कोट

दंडही राहिला. तिकडून दाराचे बेत औरंगजेबाच्या विरुद्ध चाललेच होते. मीरजुम्ला ह्यास परत जाणें प्राप्त होतें. तें चुकविण्यासाठीं दोघांनीं संगनमत करून पुढील मार्ग ठरविला. औरंगजेबानें मीरजुम्ला ह्यास कैद करून आपणाजवळ ठेविलें; आणि ते दोघे निघून उत्तरेकडे गेले. जाण्यापूर्वी औरंगजेबानें विजापुर व गोवळकोंडा येथील सुलतानांस गोडगोड पत्रें लिहून त्यांचीं मनें शांत केलीं. परिंडा किल्ला व नवीन मुलूख घ्यावयाचा होता, तो त्यानें उघड पत्र लिहून सोडून दिला. दंडापैकीं आणखी ३० लाख रु० माफ केले. ह्या प्रसंगीं आदिलशहास लिहिलेल्या पत्रांत खालील मजकूर आहे. 'देशाचें संरक्षण करा, व्यवस्था चांगली ठेवा, शिवाजी किल्ले बळकावून बसला आहे त्यास हुसकावून द्या. त्याच्या नोकरीची जरूरच असेल, तर त्याला नवीन जहागिरी कर्नाटकांत द्या; पण ह्या डोंगरी मुलखांत त्यास ठेवूं नका. आमच्याशीं निष्ठेनें वागाल तर तुमचें कल्याण होईल. आम्ही हल्लीं फौजेसह हिंदुस्थानांत जात आहों. तुमची निष्ठा आणि मैत्री दाखविण्याची हीच वेळ आहे. तुमच्या वडिलांनीं आम्हास जरूर लागल्यास फौज पाठविण्याचें वचन दिलें होतें, तर तुम्ही १० हजार स्वार एकदम पाठवून द्या, म्हणजे बाणगंगेपर्यंतचा सर्व मुलूख तुम्हास देऊं. बुहलोलखानाच्या मुलांना किंवा शहाजीला आम्ही कधींही आमच्या नोकरींत घेणार नाहीं, ह्याजबद्दल खात्री ठेवा. तुमच्या राज्यावर कोणीं येऊन हल्ला केल्यास मी स्वतः तुमचें संरक्षण करीन.' हे सर्व गोडगोड शब्द काय किंमतीचे आहेत, हें आदिलशाही दरबार ओळखून होतें. औरंगजेब हिंदुस्थानांत गेला, तेव्हां कित्येक मराठे सरदारांची फौज त्यानें आपणाबरोबर तिकडे घेतली होती. वरील उल्लेखावरून शहाजीचें औरंगजेबाकडे संधान असून त्याची आदिलशहास भीति वाटत होती, असें दिसतें.

औरंगजेबास शिवाजीबद्दल मात्र अतिशय भीति वाटत होती. जातेवेळीं औरंगाबाद येथें त्यानें वडील मुलगा मुअज्जम ह्यास बंदोबस्तासाठीं ठेवून दिलें; आणि अशी ताकीद दिली कीं, 'त्या * * विषयीं खबरदारी ठेव. आम्ही दूर आहों असें पाहून तो वाटेल तें साहस करील.' एव्हांपासूनच औरंगजेब बादशाही हुकमत वापरूं लागला होता. त्याचा सासरा शहानवाजखान त्याच्या ह्या बंडाळीस अनुकूल नव्हता, म्हणून त्यास

त्यानें कैद करून ठेविलें. पुढें पांच महिन्यांनीं म्हणजे जुलई १६५८ त औरंगजेबास दिल्लीचें तक्त प्राप्त झालें.

प्रकरणाच्या आरंभीं सांगितलेला शिवाजी व औरंगजेब ह्या दोन व्यक्तींचा खेळ कसा रंगत चालला, हें वरील हकीकतीवरून बरेंच कळून येईल. औरंगजेबाच्या वर्तनाचा जसा एक ठरीव हेतु होता, तसाच शिवाजीचाही होता. मात्र शिवाजीचा अत्यंत उदात्त होता. नर्मदेच्या अलीकडील दक्षिणच्या सर्व प्रदेशावर खिस्ती शकाच्या अव्वलपासून तत्रस्थ लोकांचेंच राज्य होतें. मध्यंतरीं बहामनी राज्य जरी झालें, तरी पुढें पुढें त्याचा परकेपणा निघून जाऊन लोकांनाही त्याजबद्दल ममत्व वाटूं लागलें होतें, हें मागें सांगितलेंच आहे. ठिकठिकाणीं मराठ्यांचीं घराणीं स्वातंत्र्य उपभोगीत होतीं. त्यांत भोसल्यांना महत्त्व आलें. शहाजीचा व शिवाजीचा मुख्य हेतु असा दिसतो कीं, ' दक्षिणचा राज्यकारभार आमचा आम्ही पाहून घेऊं. मोगल सत्तेनें नर्मदेच्या अलीकडे येऊं नये. ' ही गोष्ट शहाजीकडून सिद्धीस गेली नाहीं. तें काम त्याच्या जास्त पराक्रमी पुत्रानें अंगावर घेतलें; आणि तें सिद्धीस नेण्यासाठीं प्रसंगोपात्त त्यास जे उपाय सुचले, किंवा ज्या साहसांत उडी घ्यावी लागली, त्यांपासून त्यानें यत्किंचित् माघार घेतली नाहीं. शहाजी कर्नाटकांत गेला, तिकडे महंमद आदिलशहाच्या मरणानंतर म्हणजे स. १६५७ पासून तो स्वतंत्रच कारभार करूं लागला. शिवाजीनें प्रथम जहागिरीची व्यवस्था करून नंतर पुढील दहा वर्षांत आजूबाजूचे किल्ले व सरदार कबजांत आणिले.

उलट पक्षीं सर्व हिंदुस्थान पादाक्रांत करण्याचा वडिलांचा संकल्प पूर्ण करावा, अशी हांव औरंगजेबानें धारण केली. ह्या कामांत आदिलशहा किंवा कुत्बशहा ह्यांच्याही पेक्षां त्यास जास्त भीति शिवाजीची वाटत होती, हें वरील हकीकतीवरून निदर्शनास येईल. प्रथम विजापुर व गोवळकोंडा जिंकून तेथील द्रव्याच्या व फौजेच्या मदतीनें मागाहून शिवाजीचा समाचार तेव्हांच घेतां येईल, असा त्याचा विचार होता. दुसरा एक प्रकार औरंगजेबाच्या मनांत होता कीं, जर कदाचित् बंधूंबरोबर झगडून हिंदुस्थानचें बादशाही पद आपणास मिळालें नाहीं, तर निदान दक्षिणेंत तरी आपणास स्वतंत्र राज्य असावें. दक्षिणचा सुपीक व सधन प्रदेश हातांत असल्यावर मग पुढें हिंदुस्थान जिंकण्यास वेळ लागणार नाहीं;

आणि कदाचित् हिंदुस्थान आपल्या हस्तगत न झालें, तरी दक्षिणचें राज्य कांहीं कमी नाहीं, असें त्यास वाटत होतें. ह्याच उद्देशानें त्यानें आपल्या सर्व कुटुंबाची व मुलाबाळांची राहण्याची व बंदोबस्ताची सोय आरंभापासूनच औरंगाबादेस केली होती. दक्षिणेवरील हें त्याचें प्रेम त्याच्या शेवटच्या पंचवीस वर्षांच्या स्वारींतही असेंच व्यक्त होतें. ह्याच हेतूस्तव विजापुर व गोवळकोंडा हीं दोन राज्यें हस्तगत करण्यास तो इतका उतावीळ झाला होता. शहाजहान आजारी पडून पुढें निराळाच पंथ उपस्थित झाला हा प्रकार वेगळा, तसा प्रकार झाला नसता तर विजापुर व गोवळकोंडा पादाक्रांत करून दक्षिणेंत त्यानें बापाविरुद्ध उघड बंड करून स्वतंत्र राज्य स्थापन केलें असतें.

इकडे शिवाजीचा हेतु विजापुर व गोवळकोंडा हीं दोन राज्यें आपण हस्तगत करावीं असा होता. हीं राज्यें आतां स्वतंत्र टिकणें शक्य नाहीं हा प्रकार बाहेर सर्वांस व प्रत्यक्ष तेथील मुत्सद्यांसही, सर्वथा कळून चुकला होता. तीं कोणाच्या भक्ष्यस्थानीं पडणार, एवढाच काय तो प्रश्न होता. तीं आपण हस्तगत करून मग औरंगजेबाशीं उघड सामना करावा, असा शिवाजीचा विचार होता. इकडील अवघड प्रदेशांत, विजापुरगोवळकोंड्याची संपत्ति हातांत असेल तर, चपळ व शूर मराठे वीरांच्या जमावानें आपण औरंगजेबास तेव्हांच हुसकून देऊं, असें शिवाजीस वाटत असावें. औरंगजेब उत्तर हिंदुस्थानांत निघून गेल्यामुळें शिवाजीच्या मार्गांतील एक मोठी अडचण कांहीं दिवस तरी दूर झाली. अर्थात् शिवाजीस थोडी मोकळीक मिळून त्यानें आपले प्रयत्न प्रथम विजापुरावर चालविले. विजापुरच्या मुत्सद्यांत एकच शूर मनुष्य अफझलखान प्रमुख होता. त्यास जिंकिल्यावर विजापुरचें राज्य बहुतेक पडल्यासारखेंच झालें. परंतु तें हस्तगत करण्यापूर्वींच औरंगजेबास बादशाही पद प्राप्त होऊन, पुढील इतिहास बदलून गेला. दक्षिणेंतली छातीवरची धोंड उत्तरेंत गेली, तर तिकडे ती वृद्धि पावून पुन: जास्त जोरानें शिवाजीस दडपून टाकूं लागली. औरंगजेबास अल्पावधींत तिकडे राज्य प्राप्त झालें नसतें, तर शिवाजीनें विजापुर व गोवळकोंडा हे दोनही प्रांत लगेच हस्तगत केले असते. गोवळकोंडा तर त्यानें पुढें बहुतेक हस्तगत केलाच. सारांश, औरंगजेब दिल्लीचा बादशहा झाल्यावर उभयतांचे पहिले डावपेच अगदीं बदलून

गेले. औरंगजेबानें शिवाजीचा एकसारखा पिच्छा पुरविला; आणि शेवटीं औरंगजेब म्हणजे आहे तरी काय, हें प्रत्यक्ष पाहून घेण्याकरितां, शिवाजीनें दिल्लीस जाण्याचें धाडस केलें. औरंगजेबही शिवाजीस सारखा पाण्यांत पाहत होता; आणि मध्यंतरीं अनेक अडचणी आल्या नसत्या, तर दक्षिणेंत स्वतः येण्यास १६८३ पर्यंत त्यानें विलंब केला नसता. औरंगजेब दक्षिणेंतच स्वतंत्र होऊन शिवाजीचें व त्याचें इकडे जें द्वंद्वयुद्ध माजलें असतें, तें मात्र टळलें; आणि औरंगजेबाला प्रत्यक्ष दोन हात दाखविण्याची संधि शिवाजीला आलीच नाहीं.

---

# प्रकरण सातवें.

## विजापुरकरांशीं युद्ध.

१. जावळीचे मोऱ्यांचा पाडाव. २. अफझलखानाचा वध.
३. बाजीप्रभूचा पराक्रम. ४. आवाजी विश्वनाथ प्रभु.
५. तिसरी मोहीम—घोरपडे व सीदी. ६. शहाजीमार्फत विजापुरशीं तह.
७. शहाजीचें उत्तरचरित्र व मृत्यु.

**१. जावळीचे मोऱ्यांचा पाडाव,(१६५५ नोव्हेंबर—मार्च १६५६).**— विजापुर व गोवळकोंडा येथील सुलतानास आपलें जिणें किती अडचणींचें झालें होतें, हें मागील हकीकतीवरून व्यक्त होईल. औरंगजेबाचीं व्यवधानें शिवाजीस कळत होतीं; आणि विशेष अडचणींत आल्याशिवाय, युक्तीयुक्तीनें आपला हेतु सिद्धीस नेण्याचा शिवाजीचा विचार होता. मागें सांगितलेला विशिष्ट मर्यादेंतील टापू तयार होतांच, शिवाजीच्या उपक्रमास अडथळा करणारे असे जे कोणी डोईजड सरदार होते, त्यांचा बंदोबस्त करणें शिवाजीस भाग पडलें. शहाजी विजापुरास नजरकैदेंत होता, तेथपर्यंत शिवाजीनें आदिलशहास राग येण्यासारखें कृत्य कांहीं एक केलें नाहीं. स. १६५३ नंतर शहाजीची पुनः कर्नाटकांत रवानगी झाली, आणि स. १६५५त मोऱ्यांना जिंकण्याचें महत्त्वाचें प्रकरण शिवाजीनें हातीं घेतलें.

शिवाजीचा बंदोबस्त करण्यासाठी बाजी श्यामराज नामक एक सरदाराचे हाताखालीं विजापुरकरांनीं कांहीं फौज पाठविली. त्या वेळीं शिवाजी महाडास होता आणि महाडास लागूनच जावळीचे मोऱ्यांचें राज्य होतें. मोरे याच्या आश्रयानें बाजी श्यामराज पारघाटाचे पायथ्याशीं शिवाजीच्या वाटेवर दबा धरून बसला. मोरे व बाजी ह्यांची तयारी शिवाजीस पकडण्याची होती. शिवाजीस ही बातमी अगोदरच कळून त्यानें बाजी श्यामराज याचे टोळीवर एकाएकीं तुटून पडून, त्यास हटविलें ( १६५२ ). परंतु त्या सरदारास मोरे याची मदत असल्यामुळें तो सुटून विजापुरास गेला. त्यामुळें मोऱ्यांविषयीं शिवाजीच्या मनांत वांकडे आलें. जावळीचें राज्य शिवाजीनें काबीज केलेल्या प्रदेशास लागून होतें. ह्या मराठे सरदारास आपणाकडे अनुकूळ करून घेतल्यानें शिवाजीस पुष्कळ फायदा होणार होता. परंतु सामोपचारानें तो विजापुरकरांस सोडीना. त्याबरोबर उघड लढाई करण्याची ताकद शिवाजीस नव्हती. मोरे यांस तसेंच शिरजोर राहूं दिलें असतां शिवाजीनें हातीं घेतलेलें काम तडीस जात नव्हतें. तेव्हां कांहीं तरी युक्ति योजून त्यांस आपल्या कह्यांत आणण्याचा विचार शिवाजीनें ठरविला. पूर्वी मोरे व शिवाजी यांजमध्यें बराच घरोबा असे. एकमेकांकडे जासूद व कारकून जात येत असत.

रा० य० रा० गुप्ते यांनीं संपादिलेल्या बखरींत मोरे व शिवाजी यांच्या वैराचें खरें कारण मार्मिक रीतीनें दाखाविलेलें आहे, (इ. सं.), तें असें:-

आदिलशाहींत मोरे यांच्या कुटुंबांतील चंद्रराव या नांवाचा पुरुष पराक्रमी निघाला. त्यानें जावळी सर केली, तेव्हांपासून 'जावळीचे चंद्रराव मोरे' असें या घराण्याचें आडनांव पडलें. या वंशांत पुढें कृष्णाजी बाजी मोरे जावळीस राज्य करीत होता. त्यास शिवाजीनें सांगून पाठविलें कीं, 'तुम्ही मुस्तफद राजे म्हणवितां. राजे आम्ही. आम्हां श्रीशंभूनें राज्य दिधलें आहे. तर तुम्हीं राजे न ह्मणावें. आमचे नौकर होऊन आपला मुलूख खाऊन, हामराहा चाकरी करावी. नाहीं तर बदफैल करून फंद कराल, तर जावळी मारून तुह्मांस कैद करून ठेवूं.' ऐशी पक्की इशारत लिहिली. त्याजवरून, रावराजे मोरे कृष्णाजी बाजींहीं शिवाजीराजे यांस लेहून पाठविलें जे, 'तुम्ही काल राजे जाहलां. तुम्हांस राज्य कोणें दिधलें? मुस्तफद राजा आपले घरीं म्हटलियावर कोण

मानितो ? येतां जावळी, जातां गोवली. पुढें एक मनुष्य जीवंत जाणार नाहीं. तुम्हांमध्यें पुरुषार्थ असला, तर उदईक याल तर आजच यावें. आम्ही कोंकणचे राजे असून, आमचा राजा श्रीमहाबळेश्वर. त्याचे कृपेनें राज्य करितों. आम्हां श्रीचे कृपेनें पादशाहानें राजे किताब, मोरचेल, सिंहासन मेहेरबान होऊन दिधलें. आम्ही दाईमदारी दरपिढी राज्य जावळीचें करितों. तुम्ही आम्हासीं खटखट कराल, तर पष्ट समजून करणें. आणखी वरकड मुलूख तुम्हांस आहे. येथें उपाय कराल तर अपाय होईल. यश न घेतां अपयशास पात्र होऊन जाल.' असें कृष्णाजी राजे मोरे यांहीं शिवाजी महाराजांस लेहून पाठविलें. त्यांचीं पत्रें शिवाजी महाराजें ऐकून परम संतप्त जाहले. आणखी प्रतिउत्तर पाठविलें जे, 'जावळी खालीं करून, राजे न म्हणोन, मोरचेल दूर करून, हात रुमालें बांधून, भेटीस येऊन, हुजूरची कांहीं चाकरी करणें. इतकियावर बदफैली केलिया मारले जाल.' ऐसें पत्र चंद्रराव मोरे ऐकून परम राग आला. मग करडा जबाब शिवाजी राजे यांस लिहिला कीं, 'दारूगोळी महझूद आहे. कांहीं बेजबाबास खुतें घालून लिहिलें, तें कासियास ल्याहाविलें ? थोर समर्थ असों.' याउपर चंद्ररायाचा व शिवाजी महाराजांचा थोर आकस पडला. मग शिवाजी महाराजांचे सुरराव कांकडे दोन हजार हासम जावळीवर रवाना केले. महाबळेश्वराचा निसणीचा घाट दरियाचा उतरून जावळीस वेढा घातला. जावळी अवघड वाट, जाळ्या कळकीच्या दाट, तेथें महिनाभर झुंज जाहलें. महिन्या एका कृष्णाजी बाजी मोरे राजे जावळी सोडून, आपले हासमसुद्धां रायगडास गेले. रायगड बळकावून राहिले. तेथें शिवाजीमहाराजें चढाई करून गेले. रायगड तीन महिने चंद्ररावांहीं भांडाविला. मग सल्ला जाहला. जावळींत ठाणें शिवाजी महाराजांचें बैसलें. रायगडही महाराज शिवाजीराजे यांसीं सर जाहला. कृष्णाजी राजे मोरे यांचा शिवाजी राजियांहीं बहुत मान केला. घोडा व सिरपाव दिधला. कृष्णाजी चंद्ररायांहीं रुमाल न घेतला. शिवाजीराजांहीं चंद्रराजांचा मोरचेल दूर करविला. शिवाजीचें मानस होतें कीं यांस आपले नोकर म्हणून स्थापावें. जेव्हां हुजूर बोलावूं तेव्हां येतील ऐसें करून यांची जावळी त्यांस द्यावी. पुढें कृष्णाजी राजानें मुधोळकर व्यंकोजी राजे घोरपडे यांजकडे संधान लावून शिवाजीचा पाडाव करण्याची खटपट

चालविली. या फितुराचे कागद शिवाजीच्या हातीं पडले. त्यावरून मोरे बेइमान असें समजून चाकण येथें त्यांची गर्दन मारिली. तेथपासून जावळींतून मोऱ्यांचें राज्य नष्ट झालें.

हा प्रकार खरा दिसतो. ' आम्हास श्रीशंभूनें राज्य दिलें आहे, ' हें शिवाजीचें खोंचदार वाक्य स्मरणीय आहे. ग्रंथकारांत ह्यासंबंधानें अत्यंत मतभेद आहे. त्यांत सामान्यतः असें दिसतें, कीं मोऱ्यांचा फितूर उघडकीस आल्यावर शिवाजीनें राघो बल्लाळ व संभाजी कावजी या दोन सरदारांस थोडक्या लोकांनिशीं मोरे यांची मुलगी आपणाकरितां मागण्याचे मिषानें जावळीस पाठविलें. जावळी प्रांताची व मोऱ्यांचे तयारीची माहिती मिळवावी असा त्याचा अंतस्थ हेतु होता. ते जावळीस गेले. तेथें मोरे स्वतः कैफी असून त्याचे लोकांतही फूट आहे असें पाहून, वरपांगीं स्नेह दाखवून त्यास ठार मारण्याचा बेत केला, आणि शिवाजीस लिहून आपले मदतीसाठीं आसपास फौज तयार ठेवविली. एके दिवशीं राघो बल्लाळ यानें चंद्रराव व त्याचा भाऊ सूर्यराव यांस मसलतीकरितां म्हणून एके बाजूस बोलाविलें; आणि तेथें ते आले, तेव्हां त्या दोघांस एकदम वार करून ठार मारिलें. ' मोरे यांचीं माणसें अंगावर चालून आलीं, तेव्हां शिवाजीचे ते दोनही सरदार पळून रानांत घुसले. पूर्वसंकेतानुसार शिवाजी त्यांचे मदतीसाठीं फौज घेऊन हजर होता. त्यानें जावळीवर चोंहोंकडून हल्ला केला. चंद्ररावाचे पुत्र बाजीराव व कृष्णराव मोरे व दिवाण हणमंतराव शूरपणें लढले. परंतु हणमंतराव मारला जाऊन, चंद्ररावाचें सर्व कुटुंब व राज्य शिवाजीचे हस्तगत झालें. त्यांचा बंदोबस्त जामीन वगैरे घेऊन करावा असा शिवाजीचा बेत होता. परंतु त्या संधींत विजापुरकरांकडे राजकारण करून पळून जावें असा त्यांनीं विचार केला. ' त्याचे कागदपत्र मुद्देदस्त केले, तेव्हां रुजुवात करून शिवाजीनें उभयतांचा शिरच्छेद केला. बायका व लेकी सोडून दिल्या. जावळी बहुतां दिवसांची जागा, पुंडपणा करून मोरे यांनीं अमोल्य वस्तु जातीमात्र संग्रह केला होता, ती सर्व हरण केली. ' ( शि. दि. पृ. १३१ ). जावळीचे मुलखांतील वासोटा किल्लाही शिवाजीस मिळाला ( १६५५ ).

मावळांतील व कोंकणांतील जो प्रदेश प्रथम शिवाजीनें सन १६५६ पर्यंत हस्तगत केला, त्याच प्रदेशांत मोऱ्यांचें वतन होतें. हे मोरे पूर्वी-

पासूनच आपणास थोडेबहुत स्वतंत्र समजत, आणि शिवाजीनें जसा स्वतंत्र होण्याचा प्रयत्न चालविला तसाच प्रयत्न मोऱ्यांचाही कांहीं अंशीं चालू होता. यामुळें शिवाजीनें मोऱ्यांस जिंकिलें. येणेंकरून एक शिरजोर सरदार परभारें कमी झाल्यानें विजापुरदरबारास समाधानच वाटलें, आणि त्यांनीं मोऱ्यांस मदत पाठविली नाहीं. ह्या अवघड प्रदेशांतील बंडाळी मोडून शिवाजीनें धाक बसवून व्यवस्था केली, हा प्रकार विजापुरकरांस आरंभीं तितका वाईट वाटला नाहीं, आणि सन १६५६ पावेतों शिवाजीच्या पारिपत्याचा विचार दरबारानें केला नाहीं. वांई, कऱ्हाड वगैरे विजापुरच्या मूळच्या प्रदेशांत जेव्हां शिवाजी आपली सत्ता बसवूं लागला, तेव्हां त्याजबद्दल दरबारास धास्ती उत्पन्न झाली. शिवाजीनें दियानतराव वगैरे अधिकाऱ्यांचीं मनें चांगलीं पारखून आपणाबद्दल बरीच शुद्ध ठेविलीं होतीं. त्याचा बाप शहाजी विजापुरची नोकरी निष्ठेनें बजावीत होता, म्हणून शिवाजीकडे महंमदशहाचें लक्ष विशेष गेलें नाहीं. शिवाजीनेंही बेताबातानें वागून परिस्थितीचा उपयोग करून घेतला.

मोरे यांचे संबंधाची सर्वच हकीकत अत्यंत संदिग्ध व अपुरी आहे. 'त्या प्रसंगांत चंद्रराव मरण पावला त्याचे पुत्र पुण्यांत निमजग्यांत कैदेंत होते. राघो बल्लाळ व संभाजी कावजी ह्या मोहिमेंत प्रमुख होते, व हें प्रकरण निदान चार महिने चाललें होतें, एवढ्याच गोष्टी विश्वसनीय आहेत.' ( रा. राजवाडे. )

या प्रकरणांत शिवाजीच्या माथीं येणाऱ्या दोषाचा वांटा ठरविण्याची पुष्कळांनीं खटपट केली आहे. कोणत्या तरी युक्तीनें मोरे यास ताब्यांत आणिल्यावांचून शिवाजीचें काम पुढें चालत नव्हतें, ह्यासाठीं मोरे याची वाट लावावी लागली. तें कार्य सिद्धीस नेण्यास दुसरा उपाय नव्हता. या कृत्याची बरीचशी जबाबदारी राघो बल्लाळ* व

---

*चिटणिशी बखरींतील मजकुरावरून 'असें दिसून येईल कीं ज्या राघो बल्लाळानें चंद्रराव मोऱ्यास मारिलें, तो लष्करचा सबनीस असून त्याचें उपनांव कोरडे असें होतें. विजापुराहून आलेल्या सातशें पठाणांवर ज्याची नेमणूक झाली ( पृ. २०६ ) तो हा नसून, राघो बल्लाळ अत्रे या नांवाचा शिवाजीच्या पदरीं एक चिटणीस होता, त्यास नेमिलें होतें; व त्यालाच पुढें

संभाजी कावजी यांजवर येते. त्यांनीं शिवाजीस काय पत्र पाठविलें तें कळत नाहीं. शिवाजीवर दोषारोप करतां येण्याजोगें हें त्याचें पहिलेंच कृत्य होय यांत संशय नाहीं. या कृत्यानें मोरे याच्या-सारख्य बलिष्ठ सरदाराची वाताहत झालेली पाहून शिवाजीबद्दल इतर मराठे जहागीरदारांच्या मनावर विलक्षण वचक बसला, आणि ते विजापुरकरांस सोडून एकदम शिवाजीस शरण आले. त्या योगें राज्यस्थापनेचें काम झपाट्यानें चाललें. जावळी घेतल्यावर शिवाजीनें कृष्णेच्या उगमाजवळ पारघाटाचें नाकें ताब्यांत ठेवण्यासाठीं व ह्या नवीन मुलखाच्या बंदोबस्तासाठीं एका उंच डोंगरावर मजबूद किल्ला बांधिला. तें काम त्यानें मोरो त्रिंबक पिंगळे यास सांगितलें. ह्या नवीन किल्ल्याचें नांव प्रतापगड असें ठेवण्यांत आलें. मोरो त्रिंबक हा पुरंदर किल्याच्या व्यवस्थेस शिवाजीनें ठेविला होता. त्याचा बाप शहाजीपाशीं कर्नाटकांत होता. सन १६५३ च्या सुमारास मोरोपंत कर्नाटक सोडून शिवाजीस येऊन मिळाला. मोरोपंतानें वर सांगितलेला किल्ला बांधण्याचें काम फारच उत्तम रीतीनें तडीस नेऊन (१६५६), शिवाजीची मर्जी संपादिली. इतउत्तर मोरोपंत पिंगळे हा शिवाजीचा केवळ उजवा हात होता. तुळजापुरास देवीचें दर्शन घ्यावयास जाणें लांब पडतें, सबब तुळजापुरच्या देवीचीच एक प्रतिमा एका चतुर कारागिराकडून करवून सुमुहूर्तानें तिची स्थापना प्रतापगडावर केली. ह्या देवीवर शिवाजीची निष्ठा विशेष होती.

जावळी घेतल्यावर थोड्याच दिवसांनीं हिरडसचा देशमुख शिरजोर होता, त्याजवर शिवाजीनें एकाएकीं रात्रीं हल्ला केला. देशमुखाचा रोहिडा नांवाचा मजबूद किल्ला होता, तो किल्ला देशमुखानें मोठ्या शौर्यानें पुष्कळ वेळ लढविला, परंतु लढाईत देशमुख मारला जाऊन, किल्ला शिवाजीचे हस्तगत झाला. देशमुखाचा दिवाण बाजी प्रभु ह्याचें शौर्य पाहून

---

अठरा कारखाने व बारा महाल स्थापिले तेव्हां स्वारांचा सुभा व दुसऱ्या एका प्रसंगीं विजापुरच्या फौजेनें खराब केलेल्या मुलखाचा सुभा देण्यांत आला. पण चंद्रराबाचा खून करणाऱ्या राघो बल्लाळास (म्हणजे कोरडे यास) किल्ल्याची खबरदारी व सामानभरतीची चौकशी ठेवण्यापेक्षां जास्त महत्त्वाची कामगिरी सांगितलेली नाहीं. (ग्रंथमाला—देऊसकर). राघो बल्लाळ अत्रे व रघुनाथ बल्लाळ कोरडे हे दोन वेगळे पुरुष होते.

शिवाजीनें त्यास मोठ्या आदरानें आपले पदरीं घेतलें, आणि त्याचें पूर्वीचें उत्पन्न त्याजकडे चालू ठेविलें. बाजी प्रभूनेंही शिवाजीची नोकरी अखेरपर्यंत मोठ्या इमानानें केली. येणेंकरून पन्हाळगडापर्यंत शिवाजीचा अंमल बसला. वाडीचे सावंत, शृंगारपुरचे सुर्वे, दक्षिण कोकणांतील दळवी, इत्यादि सरदार शिवाजीच्या मर्जीप्रमाणें वागूं लागले. हा सर्व मोरे यांचे उदाहरणाचा परिणाम होय. रोहिडा, तोरणा व राजगड हे किल्ले भोर संस्थानांत जवळ जवळच आहेत.

ह्या गोष्टींनीं व विशेषतः मोरे यांचे प्रकरणानें विजापुरचें दरबार चिडीस गेलें. शिवाजी हा आपल्या ताब्यांतील सरदाराचा मुलगा आहे, अथवा तो केवळ पुण्यांतील-जहागिरीचा मालक आहे, असें समजून स्वस्थ राहणें दरबारास शक्य नव्हतें. आपल्या जहागिरींतच शिवाजी स्वतः होऊन राहिला नाहीं. तो किल्ले वगैरे बांधून आपली मजबुदी क लागला. विजापुरच्या ताब्यांतील मराठे सरदारांस आपल्या कटांत आण मराटमंडळाचें वर्चस्व तो सर्वांस भासवूं लागला. तरी त्या करण्याची विजापुरच्या दरबारास पंचाईत पडली. बापा शिवाजी नाहीं, आणि त्याच्या कृत्यांत बापाचें अंगही नाहीं अशा खात्री असल्यामुळें, बापाच्या मार्फत शिवाजीस शह देणें शक्य न एक तर शहाजी फौजबंद होता, तेव्हां त्यास जिंकणें बरेंच दुर्घट होतें. दुसरें, शहाजीचा कर्नाटकांत चांगला उपयोग होता. तेथून शहाजीला दूर केल्यास कर्नाटक प्रांत विजापुरच्या हातांतून लगेच गेला असता. शिवाय ही वेळ म्हणजे स. १६५६-५७ ची होती. ह्या वेळीं औरंगजेब विजापुर जिंकण्यासाठीं चालून येत होता. विजापुरचा महंमद आदिल-शहा बरेच दिवस आजारी राहून स. १६५६ च्या नोव्हेंबरांत मृत्यु पावला. तो शांतताप्रिय व शेवटीं बरेच वर्षे आजारी असल्यामुळें शिवाजीचा बंदोबस्त अगोदर झाला नाहीं. त्याचा मुलगा अली हा अठरा वर्षांचा तरुण मुलगा पुढें गादीवर येऊन राज्यांत बरीच अव्यवस्था झाली. जुने मुत्सद्दी बहुतेक नाहींसे होऊन नवीन जम बसला नव्हता. म्हणून शिवाजीवर फौज पाठवून आणखी एक विघ्न उपस्थित करणें दरबारास योग्य वाटलें नाहीं. इकडे शिवाजी एकदम मोगलांस जाऊन मिळेल आणि आपल्यावर दुसरेंच अरिष्ट आणील, ही भीति

दरबारास होती. औरंगजेबानें विजापुर जिंकण्यासाठीं मीर जुम्ला यास फौज देऊन पाठविलें. त्यानें विजापुरास वेढा घातला. इतक्यांत दिल्लीस शहाजहान बादशहा आजारी पडल्यामुळें औरंगजेब एकदम दक्षिण देश सोडून दिल्लीस गेला, त्यामुळें दक्षिणच्या इतिहासाचें भावी स्वरूप बदललें. औरंगजेब स. १६५८ च्या आरंभीं उत्तरेंत गेला आणि मग शिवाजीच्या बंदोबस्ताचा विचार दरबारानें हातीं घेतला.

२. अफ्झलखानाचा वध (ता. ७ नोव्हेंबर, स. १६५९).–अफ्झलखान वाई प्रांताचा सुभेदार होता. त्याचे कागद स. १६४९ पासूनचे सांपडतात. अफ्झलखानाचे अगोदर रणदुल्ला फराहादखान तें काम करीत असे. अफ्झलखान स. १६५९ त मारला गेल्यानंतर दरवेश महंमद व सर्जाखान ह्यांनीं कांहीं काळ पावेतों वाईचा कारभार केला. ह्या संबंधांत 'वाईचे चित्राव' यांचे कागदांत स्पष्ट उल्लेख आहेत. (रा. खं. २०–ले. ६५–११६). त्यांनीं इनामें व उत्पन्नें नवीन करून दिलीं, किंवा जुनीं पुढें चालविलीं. देवस्थानांचीं उत्पन्नें हे मुसलमान अंमलदार कसोसीनें चालवीत असत. निंबच्या मठाचीं उत्पन्नें पूर्वींप्रमाणें चालविण्याबद्दल अफ्झलखानाच्या ताकिदी सक्त आहेत. मठाकडून बोभाटा येतां नये असे त्याचे हुकूम आहेत. देशमुखदेशपांड्यांचा प्रकार मात्र ह्याच्या उलट होता. स. १६४९ पासून अफ्झलखान व शिवाजी दोघेही देशमुखदेशपांड्यांस आपापले पक्षांत वळवीत होते. हा प्रकार खालील पत्रांवरून व्यक्त होतो (खं. १५, ३३४–३५).

'खुदावंतखान अलीशान खानेअज्जम अफ्झलखान महमंदशाही यांजकडून कान्होजी जेधा यास कळावें कीं, तुमचे बाबें तिमाजी पंडित व त्र्यंबक पंडित (त्र्यंबक कान्हो हवालदार पेटा वाई) यांनीं लिहिलें होतें, त्यावरून मालूम झालें. तरी तुम्हापासीं जी जमायत असेल ती घेऊन येणें. पन्नास घोड्यांची सरदारगी तुम्हास दिधली असे. बरलेख पाहून सरंजामी करून देऊं. याखेरीज पायींचे खलक जे आणाल त्यांसीं चाकर ठेवूं व दरसाली लोक आणाल त्यांसीं अडिसरी (पोटास दाणा) देऊं. पेशजी तुमची सरफराजी केली होती. हल्लीं सरफराजी बहुत करून तुम्ही शिताफ स्वार होऊन पंडित मशारनिल्हेपासीं जाणें. कोणें बाबे शक अंदेशा न धरणें.'

त्याच सुमाराचें कान्होजी जेधे यास शिवाजीचें पत्र. ' तुम्ही पत्रिका पाठविली त्यावरून सकल अभिप्राय कळों आला. लिहिलें कीं, खान-अलीशान अफ्झलखान यांनीं लिहिलें आहे कीं, ' जावळी वरी सुरू केलें आहे; तरी तुम्ही आपले जमावानिशीं ताबडतोब येणें, म्हणून लिहिलें आहे, तरी तुमचा व त्यांचा पहिलेपासून घरोबा आहे. गेलें तरी पाहिजे. खासा अगर पुत्र पाठवावयाचे झाले तरी त्याचा बोलभाक बरवे रीतीं घेऊन मग जाणें. दगा होय ऐसें न करणें. एक भले माणूस दरम्यान देऊन मग जाणें. तुमचे नजरेसीं पडत असलें तरी खासाच जावें; जरी तुमचें मन बार देत नसलें, तरी कौल बोल घेऊन पुत्राबराबरी लोक देऊन पाठविणें. हरएक बाहणा करून तुम्ही राहणें. दोनही गोष्टी तुम्हास लिहिल्या आहेती. यांत तुम्ही शहाणे असां, बहुत लिहिणें नलगे.' (वरील ३३८).

अफ्झलखान हा विजापुरचा नामांकित सरदार होता. महंमद आदिलशाहाची त्याजवर कृपा असून कर्नाटकच्या युद्धांत त्यानें चांगलें नांव मिळविलें होतें. महंमद आदिलशहाचा हा दासीपुत्र असावा. कारण वाई येथें सांपडलेल्या एका हुकूमनाम्यांत त्यास महंमदशाही हें विशेषण दिलें आहे. त्याची आई भटारीण (=स्वयंपाकीण) असावी असें त्याचे पवाड्यावरून दिसतें. राजवाड्यांच्या शोधावरून कळतें, कीं रणदुल्लाखान हा विजापुरतर्फे वाईप्रांताचा सुभेदार असून सन १६४४ च्या सुमारास तो वारल्यावर, वाईची सुभेदारी अफ्झलखानास मिळाली; ती सन १६५८ च्या नोव्हेंबर पर्यंत व अर्थात् वध होईपर्यंत त्याजकडेसच होती. शहाजीचें व त्याचें वांकडें होतें. कर्नाटकांतील कनकगिरि काबीज करण्याकरितां शहाजीनें आपला मुलगा संभाजी* यास पाठविलें होतें.

---

* लुइ राइस् कृत पुस्तकांत स. १६५४, १६५५, व स. १६६३ चे कर्नाटकांतले तीन शिलालेख छापले आहेत, त्यांत 'श्रीमद्राजाधिराज राजमान्य राजश्री संभाजीराज महाराज,' असे शब्द आहेत. त्या पुढील एक शिलालेख स. १६६६ चा दिला आहे त्यांत संभाजीची बायको जैताबाई इचा उल्लेख आहे. अर्थात् संभाजी स. १६६३ व स. १६६६ च्या दरम्यान केव्हां तरी वारला हें उघड असून, 'अफ्झलखानास मारून भावाचा सूड घे', वगैरे जिजाबाईनें शिवाजीस सांगितलेला मजकूर खरा नाहीं. तसेंच भोसल्यांचे पुरुष आपणास 'राजाधिराज महाराज' वगैरे पदव्या लावीत असत. (सरस्वतीमंदिर–वर्ष ४)

त्या हल्ल्यांत अफ्झलखानानें दगा केल्यामुळें संभाजी मारला गेला, त्याजबद्दल अफ्झलखानाचा सूड उगविण्याची शहाजीची इच्छा होती. म्हणून अफ्झलखान शिवाजीवर चालून आला त्या वेळेस भावाच्या मरणाचा सूड घेण्याविषयीं शहाजीनें शिवाजीस कळविलें असावें असें दिसतें. शिवाजीचे अलीकडचे उद्योग वाई प्रांतांतच चालू होते. प्रतापगड, जावळी ह्या जागा वाईच्या आटोक्यांत होत्या. तेव्हां शिवाजीबद्दल दरबारास खरी खबर कळविण्यासाठीं व त्याच्या बंदोबस्ताचा विचार करण्यासाठीं सन १६५८ च्या नोव्हेंबरच्या सुमारास अफ्झलखान विजापुरास गेला. तेथें बरीच वाटाघाट होऊन शेवटीं ' डोंगरांतील उंदीर शिवाजी यास जिवंत अगर मेलेला कसा तरी पकडून आणितों, ' अशी भर दरबारांत प्रतिज्ञा करून व बारा हजार निवडक फौज बरोबर घेऊन, सन १६५९ च्या सेप्टेंबर महिन्यांत अफ्झलखान शिवाजीवर येण्यास निघाला, तो पंढरपुर, तुळजापुर, माणकेश्वर, करकमभोसें, शंभुमहादेव, मलवडी, रहिमतपूर ह्या रस्त्यानें वाईस आला. शिवाजी त्या वेळेस रायगडावर होता. परंतु पुण्याच्या बाजूस अफ्झलखानानें येऊं नये, म्हणून तिकडील बंदोबस्त करून पुरंदरावरून शिवाजी प्रतापगडावर गेला. कारण अफ्झलखानाबरोबर उघड मैदानांत न लढतां अडचणीच्या प्रदेशांत त्यास गुंतवून टाकण्याचा शिवाजीचा विचार होता. शिवाजी प्रतापगडावर आहे, असें ऐकून त्या रोखानें अफ्झलखान वाईकडेच आला. रस्त्यानें पंढरपुरच्या विठोबास नाहींसा करून तुळजापुरच्या भवानीचे तुकडे केले. मलवडी येथें बजाजी निंबाळकरास पकडून आणून त्यानें जरब दिली. यामुळें व खानाच्या गर्विष्ठ स्वभावामुळें त्याजबद्दल लोकांच्या मनांतील पूज्यबुद्धि नाहींशी झाली. देवस्थानें बाटविल्यामुळें रयतेस चीड येऊन ह्या युद्धास एक प्रकारचें धार्मिक स्वरूप प्राप्त झालें; आणि कोणत्या तरी युक्तीनें शिवाजीच्या हातून खानाचा नाश व्हावा, असें लोकांसही वाटूं लागलें. उभय पक्षांकडील लोकांचीं मनें फार खवळून गेलीं होतीं. या संग्रामाचे परिणाम महत्त्वाचे होते. हें महत्त्व शिवाजी व त्याचे साथीदार यांनीं पूर्णपणें ओळखिलें, आणि तदनुसार खानाशीं सामना करण्याची जय्यत तयारी केली. वाईस आल्यावर तेथील कुळकर्णी कृष्णाजी भास्कर म्हणून होता त्याला खानानें शिवाजीकडे पाठविलें. सध्यांच्या वाईच्या

कुळकर्ण्यांचा कृष्णाजी भास्कर हा पूर्वज होय. अफझलखान वाईचा सुभेदार असल्यामुळें त्याचा व कृष्णाजी भास्कराचा विशेष परिचय अगोदरपासूनच होता हें उघड आहे. कृष्णाजीच्या नांवचें संभाजीचें एक आज्ञापत्र खं. २०, ले. ४१ येथें छापलेलें आहे. कृष्णाजी भास्कर शिवाजीकडे गेल्यावर पंताजी गोपीनाथ यास शिवाजीनें अफझलखानाकडे पाठविलें. पंताजी गोपीनाथ हा शिवाजीच्या पदरचा कारकून होता. सातारा येथील बहिरोपंत पिंगळे याच्या कुळकर्णाच्या दप्तरांत पंताजी गोपीनाथ सुभेदार हें नांव एका हुकुमनाम्यावर आहे.* विश्वासराव नानाजी मुसेखोरेकर म्हणून एक सरदार शिवाजी जवळ होता, त्यानें फकिराच्या वेशानें खानाच्या छावणींत वारंवार जाऊन तेथील खडानखडा बातमी आणून शिवाजीस दिली. त्यावरून व वकिलांच्या बोलाचालीच्या धोरणानें शिवाजीनें आपला पुढील बेत ठरविला. खानाकडे वरचेवर तो असे निरोप पाठवूं लागला, कीं 'एवढ्या मोठ्या सैन्याशीं सामना करण्याची ताकद माझ्यांत नाहीं; झालेले अपराध पोटांत घालून खान जीवदान देतील, तर मी आपल्या ताब्यांतील सर्व मुलूख सोडून देण्यास तयार आहें.' अशा नम्रतेच्या निरोपांनीं खानास वाटलें, कीं आपली मोहीम आतां खचित फत्ते होणार. वाई प्रांताची त्यास उत्तम माहिती होती; आणि त्या डोंगराळ व झाडीच्या प्रदेशांत लढाई सुरू केल्यास विनाकारण फौजेची खराबी होईल हेंही तो जाणून होता. तेव्हां सौम्योपचारांनीं शिवाजी हस्तगत होईल तर बरें असें त्यास वाटलें. शिवाय दगाबाजीनेंही शिवाजी हस्तगत होईल तर करावा, अशी खटपट खानानें चालविली होती. रोहिडखोऱ्यांतील देशमुख खोपडे म्हणून होते. त्यांचें व जेधे देशमुखांचें

---

*'पंताजी गोपीनाथ हा सन १६५९ च्या पूर्वीपासूनच शिवाजीच्या अत्यंत ऋणानुबंधांत होता व पुढेंही तो शिवाजीचा नोकर होता, हें सिद्धच आहे. पोवाड्यांतील 'पंताजी तो काका,' यांतलें पंताजी हें नांव गोपीनाथाचें आहे. गोंधळ्यांनी पंताजीला काका म्हटलेलें आहे. जिजाबाईशीं सोंगट्या खेळण्याचा त्याचा अधिकार होता. खुद्द शिवाजीशींही सोंगट्या खेळण्याचा त्याचा अधिकार होता, वगैरे गोष्टींवरून तो शिवाजीचा पूर्वापार नोकर असावा.' राजवाडे. स. १६६६–६७ ंतील दोन कागदांत (खं. २० ले. १६,१७) याचें नांव आहे.

वांकडें होतें. जेधे देशमुख आरंभापासूनच शिवाजीस सामील होते. म्हणून अफ्झलखानानें खोपड्यांस अनेक प्रकारची लालूच दाखवून आपल्या बाजूस वळविलें. ' बबई खोपडी पहिलीच तिकडे गेली होती. त्यावर अफ्झलखान वाईस राजश्री छत्रपति स्वामीवर चालोन आले, ते समयीं खंडोजी खोपडे पारख ( परकी ) होऊन अफ्झलखानास भेटले, आणि स्वामीस धरून देतों म्हणऊन कबुलाती केली' (खं १५ - ले ३०२). यावरून खानाच्या उद्देशाबद्दल संदेह राहत नाहीं. कोणीकडून तरी शिवाजीस किल्ल्यांतून बाहेर काढावें, व साधल्यास कैद करून विजापुरास न्यावें, असा त्याचा विचार होता. त्याचें सैन्य वाईपासून महाबळेश्वरपर्यंत पसरलें होतें. शिवाजीची गोष्ट तशी नव्हती. त्याची फौज दाट झाडींतून व दऱ्याखोऱ्यांतून लपून बसल्यामुळें एकदम दिसून येत नव्हती. आपण शरण येण्यास तयार आहों, असें शिवाजीनें आपला वकील पंताजी गोपीनाथ याजबरोबर खानास कळविलें. शिवाजीच्या म्हणण्याची सत्यता कृष्णाजी भास्करामार्फत खानास कळत असली पाहिजे. शिवाजीनें खानाच्या वकिलाची तजवीज चांगली ठेविली आणि दुसऱ्या बैठकीस त्याची एकांतीं गांठ घेऊन, खानाचा खरा उद्देश काय आहे हें शिवाजीनें काढून घेतलें. आपण 'आरंभिलेल्या महत्कृत्यास तुमच्या सारख्या ब्राह्मणांची मदत अवश्य पाहिजे,' इत्यादि गोष्टी सांगून शिवाजीनें त्या वकिलाचें मन आपणाकडे वळविलें. त्याच्या अंतःकरणांत धर्माभिमान व देशाभिमान जागृत करणारें भाषण शिवाजीनें केल्यावर, स्वधर्मीयांविरुद्ध वागण्याचें धाडस कृष्णाजीस झालें नाहीं. पुढें ह्या उभयतांनीं खानास किल्ल्याखालीं भेटीस बोलवावें असें ठरविलें. शिवाजीचा वकील पंताजी गोपीनाथ यासही हा बेत पसंत पडला. दोघां वकिलांनीं खानाकडे जाऊन प्रतापगडाखालीं शिवाजीच्या भेटीस येण्याविषयीं त्याचें मन वळविलें. खानास आपल्या शहाणपणाची घमेंड होती. ' शिवाजी दुर्बळ आहे, त्याचे हातून काय व्हावयाचें आहे ! एकदां विश्वास पटल्यावर तो वाटेल तेथें तुमच्याबरोबर येईल,' इत्यादि भाषणें वकिलाचे तोंडून ऐकिल्यावर, त्यानें शिवाजीचें म्हणणें कबूल करून भेटीस जाण्याचें ठरविलें आणि रडतोंडीच्या घाटानें आपली फौज जावळीपर्यंत नेली.

इकडे शिवाजीनें खानाच्या भेटीची व आपल्या बचावाची सर्व तजवीज फार बारकाईनें व काळजीपूर्वक लाविली. खुद्द खानाची व त्याच्या फौजेची, खाण्यापिण्याची वगैरे तजवीज इतकी उत्तम ठेविली, कीं शिवाजीविषयीं कोणाचे मनांत अंदेशा आला नाहीं. किल्ल्याखालीं शिवाजीनें भेटीकरितां एक उत्तम मंडप तयार करविला. खानाकडील मंडळीनें येऊन ती जागा पसंत केली. रानांत जागोजाग शिवाजीनें चौक्या बसविल्या होत्या. तसेंच किल्ल्यावर येण्याची एक वाट खुली ठेवून बाकीच्या सर्व वाटा झाडें तोडून बंद करून टाकिल्या होत्या. भेटीची व पुढील व्यवस्था कशी व्हावयाची त्याजबद्दल बारीक तपशील अगाऊ ठरवून ठेविलेले होते. कदाचित् अनिष्ट घडल्यास किल्ल्याचा व राज्याचा बंदोबस्त कसा करावयाचा ह्याची निरवानिरवही शिवाजीनें मातुःश्रीच्या विचारानें केली होती. किल्यावर जिजाबाई व संभाजी यांजपाशीं कोणी तरी अधिकारी असावेत, म्हणून मोरोपंत पिंगळे,आण्णाजी दत्तो सचिव व बाळाजी आवजी चिटणीस इत्यादि ठेविले. त्यांचे हवालीं जिजाबाई व संभाजीस केलें. 'आम्हीं ही होड आरंभिली. श्री सिद्धी नेईलच. कदाचित् वांकडेंही पडल्यास तुम्हीं घाबरे न होतां शत्रूस बुडवावें, राज्य रक्षावें!' असें सांगून शिवाजीनें निघण्याची तयारी केली.

पुतण्या उमाजि राजाला । पांचशें लोक दिले त्याला ॥
आणे, सराईत उमाजी । राज्य होईल तुम्हाला ॥

असा मजकूर अफझलखानाच्या पोवाड्यांत आहे. उमाजी हा शिवाजीचा वडील भाऊ संभाजी याचा मुलगा. या कामांत शिवाजीला अपाय झाला तर उमाजीला राज्य द्यावें, असा बेत होतासें दिसतें.

भेटीसाठीं नेमिलेल्या दिवशीं शिवाजीनें आपल्या बचावाचा सर्व पोषाख चढविला. अंगांत चिलखत व त्यावर अंगरखा, डोकीस शिरस्त्राण व वर पागोटें, उजव्या हातांत भवानी तलवार व बाहींत बिचवा, डाव्या हातांत वाघनखें, ह्याप्रमाणें त्याचा पोषाख होता. वेळ होतांच देवीचा आणि मातुःश्रीचा आशीर्वाद घेऊन शिवाजी निघाला. तिकडून खानही भेटीस येण्याकरितां पंधराशें लोक घेऊन निघाला. परंतु इतके लोक घेऊन गेल्यास शिवाजी घाबरेल व भेटीस येणार नाहीं, असें वकिलानें सांगितल्यावर

ते लोक अर्ध्या रस्त्यांत ठेवून, खान एक हत्यारबंद शिपाई घेऊन सदरेस आला. तिकडून शिवाजीही तानाजी मालुसरे यास बरोबर घेऊन आला. शिवाजी एकटा फारशीं हत्यारें न घेतां येत आहे असें पाहून, खानास समाधान वाटलें. शिवाजी दबकतच आंत आला. प्रथमच आलिंगन देतांना खानानें शिवाजीस आपल्या डाव्या बगलेंत आंवळून धरिलें आणि आतां वार करणार, इतक्यांत शिवाजीनें डाव्या हाताचीं वाघनखें खानाच्या पोटांत खुपसलीं. त्याबरोबर, 'दगारे दगा' म्हणून ओरडून खानानें शिवाजीचे डोक्यावर वार केला, परंतु डोक्यास शिरस्त्राण असल्यामुळें तो वार शिवाजीस लागला नाहीं. इतक्यांत शिवाजीनें आपल्या तलवारीचा वार खानाच्या खांद्यावर करून त्यास पोटापर्यंत चिरिलें, त्याबरोबर खान गतप्राण होऊन पडला. त्याचा शिपाई सय्यद बडेखान हा शिवाजीवर चालून आला, त्यास तानाजीनेंच ठार केलें. इकडे पालखीचे भोयांनीं खानाचा मुर्दा पालखींत घालून चालविला, परंतु शिवाजीच्या माणसांनीं भोयांस ठार मारिलें आणि खानाचें शीर कापून किल्ल्यावर नेलें.

'तारिखी-शिवाजी' बखरींत ह्या प्रकरणाची हकीकत अशी आहे:—

'शिवाजीचा वकील कृष्णाजी भास्कर आणि अफझलखानाचा रघुनाथ पंत होता. त्यांच्या मार्फत वाई व प्रतापगड येथून उभयतांच्या दरम्यान पुष्कळ बोलाचाली झाली. शिवाजीनें आपल्या लोकांस खालील ताकीद दिली होती. 'खानाच्या व आमच्या भेटींत गोष्टी विपरीत थरास गेल्यास ( परमेश्वरकृपेनें असें न होवो ) मी खानास ठार करीन. त्यावर किल्लेदारानें तयार राहून लगेच तोफ सोडावी. ती ऐकूं जातांच मावळ्यांनीं आपआपल्या डोंगरी वाटेनें बाहेर येऊन खानाच्या फौजेचा पराभव करावा; जे शरण येतील त्यांस जीवदान द्यावें, पळून जातील त्यांस प्रतिबंध करूं नये.' खान बेसावधपणानें प्रतापगडानजीक तंबूची जागा तयार केली होती तेथें गेला. त्याजबरोबर ३२ भोई ५ नोकर, व कृष्णाजी पंत आणि गोपिनाथपंत हे वकील होते. तंबूजवळच एका दरींत तरवारी घेतलेले चाळीस शिपाई शिवाजीनें लपवून बसविले होते. त्यांजमध्यें संभाजी कावजी, हिरोजी फर्जंद, सुजन मल्हार, जिवा मल्हार वगैरे मुख्य असून, त्यांस अशी ताकीद होती कीं, 'विपरीत प्रकार दिसून येतांच, तुम्ही तुमच्या गुहेंतून बाहेर येऊन काम करावें.' शिवाजीनें

आपल्या अंगांत चिलखत चढविलें, डोक्यास पागोटीच्या आंत शिरस्त्राण घालून समशेर, पट्टा, बिचवा, वाघनख, व दुसरीं हत्यारें व्यवस्थित घेऊन तयार झाला. नंतर मातु:श्रीच्या पायां पडून तिचा आशीर्वाद मागितला. गुजर, महाडिक, पालकर, निंबाळकर, निळोपंत, निराजीपंत वगैरे सोळा सरदारांस हांक मारून तिनें शिवाजीचा हात त्यांच्या हातांत दिला; आणि त्याचें संरक्षण करण्याविषयीं त्यांस जिजाबाईनें आज्ञा केली. जिवा महाल्या म्हणून एक दांडगा मनुष्य रखवालीसाठीं तिनें दारावर ठेविला. अफझलखान गोपीनाथपंतासह तंबूत आल्याची वर्दी कृष्णाजीनें शिवाजीस दिली. ती ऐकून शिवाजी वर सांगितलेलीं हत्यारें धारण केलेला, न घाबरतां खानापुढें आला; आणि त्यानें खानास सलाम केला. खान शिवाजीस ओळखीत नव्हता, म्हणून त्यानें गोपीनाथपंतास 'हाच शिवाजी काय' असें पुन: पुन: विचारिलें; आणि शिवाजीस बोलला 'हें राज्य लुटून तुम्ही किल्ले वगैरे काबीज करतां याचा अर्थ काय?' शिवाजीनें उत्तर केलें, 'पूर्वीं हा देश व हे किल्ले मोगलांच्या ताब्यांत होते. मोगलांस घालवून ते मीं आपल्या ताब्यांत घेतले आहेत, आणि या प्रांतांतील अंदाधुंदी मोडून मुलखाची आबादानी केली आहे.' त्यावर खान बोलला, 'बरें, झालें तें झालें. आतां सर्व किल्ले स्वाधीन करून, मजबरोबर विजापुरचे दरबारीं चला.' शिवाजी म्हणाला, 'गुन्हा माफ केल्याचें शहाचें फर्मान मला द्या; म्हणजे मी त्यांचे हुकूम जिवानिशीं पाळीन.' इतक्यांत गोपीनाथपंत बोलला 'तुम्ही खानसाहेबांच्या ताब्यांत आलां आहां. केलेल्या गुन्ह्याबद्दल त्यांची माफी मागा.' शिवाजीनें उत्तर केलें, 'मी व माझा जीव शहाचे खिजमतीस तयार आहेत. खान माझ्या अपराधांची माफी कशी देणार! तथापि तुम्ही म्हणतां तसें करणें माला प्राप्त आहे. मी आपलें शीर खानाच्या पोटांत ठेवितों, असें म्हणून तो पुढें सरला आणि खानानें त्यास आलिंगन दिलें. मिठी मारतांना खानानें शिवाजीस आपल्या पोटाखालीं आवळून धरिलें आणि खंजिरानें त्यास वार केला. शिवाजीच्या अंगांत चिलखत असल्यामुळें वार त्यास लागला नाहीं. त्यानें धडपड करून आपल्या हाताचीं वाघनखें व बिचवा खुपसून खानाचीं आंतडीं बाहेर काढिलीं. अशा रीतीनें शिवाजीनें संकटांतून आपली मुक्तता करून घेतली. तितक्यांत खानानें मोठ्या शौर्यानें अंगावरील शाल

पोटाच्या जखमेवर बांधून शिवाजीच्या डोक्यावर वार केला. त्या वारानें शिरस्त्राणाचा छेद होऊन शिवाजीच्या कपाळास थोडीशी जखम झाली. नंतर शिवाजीनें पट्टा चालवून खानास कापून खालीं पाडिलें. खानाचा नोकर सय्यद बंडू धन्याच्या बचावासाठीं पुढें आला, त्याचा समाचार तानाजीनें घेतला. इतक्यांत गोपीनाथपंतानें पुढें येऊन शिवाजीवर प्रहार केला. शिवाजी त्यास बोलला, ' मी ब्राह्मणावर हात चालवीत नाहीं. तूं येथून निघून जा.' तितक्यांत जिवा महाल्या पुढें आला आणि त्यानें पंतास ठार मारिलें. ( ग्रँट डफ म्हणतो, गोपिनाथपंतास शिवाजीनें पुढें बक्षीस दिलें. ) इतक्यांत एसाजी कंक आंत आला; आणि शिवाजीस आपल्या पाठीशीं घालून आपण पुढें उभा राहिला. भोई लोक खानाचा मुडदा घेऊन चालले होते. त्यांचा एसाजीनें पाठलाग करून त्यांस अडविलें आणि खानाचें शीर कापून शिरोभूषणासहित तें किल्ल्याच्या दिंडीदरवाजावर लावून दिलें. तुळजापुरच्या देवीची मूर्ति खानानें भग्न केली, त्याबद्दल त्यास अशी शिक्षा भोगावी लागली. नंतर शिवाजीच्या फौजेनें बाहेर येऊन खानाच्या फौजेचा पाडाव केला. शिवाजीला खानाचें निशाण, नगारा, हत्ती व १२,००० घोडे मिळाले. '

आलमगीरनामा, खाफीखान वगैरेंचे लेखांत कमी जास्त फरकानें वरचीच हकीकत आहे. यासंबंधानें प्रो. जदुनाथ सरकार लिहितात. ' अफझलखानाच्या मृत्यूचा खरा प्रकार बाहेर येणें शक्य दिसत नाहीं. दोन पुढारी अशा रीतीनें एकांतांत भेटून जेव्हां घात होतो, तेव्हां खरा प्रकार बाहेर येणें शक्यच नसतें. मुसलमान लेखकांत खाफीखान मात्र या प्रकारास शिवाजीनें खून केला असें म्हणतो. ग्रँट डफनें त्याच्यांतही भर घालून, जाणून बुजून केलेला खून, ' असें त्याचें व्याख्यान केलें आहे. मुसलमान लेखकांत तफावत आहे; आणि ग्रँड डफच्या लेखांतही बऱ्याच गोष्टी विसंगत दिसतात. या प्रसंगीं शिवाजीची फौज २०००० असून खानाची १२००० होती, असे सर्व मुसलमान इतिहासकार सांगतात. शिवाय मावळ्यांना ह्या जागेची पूर्ण माहिती असल्यामुळें, त्यांजपुढें खानाच्या फौजेचा नाश झाला ह्यांत आश्चर्य कांहीं नाहीं, किंवा खानाच्या भीतीनें शिवाजी निराश झाला होता, हें ग्रँट डफचें म्हणणेंही संभवनीय नाहीं. भेटीच्या प्रसंगीं शिवाजीपेक्षां खानाजवळ ज्यास्त लोक असावेत असा ठराव होता. अशा स्थितींत

खून करण्याचा बेत आगाऊ ठरविणें शिवाजीला मुळींच शक्य नव्हतें. तिसरें, भेटीच्या प्रसंगीं प्रत्येकाजवळ एकच नोकर होता, या म्हणण्यास पुरावा नाहीं. दोघे हातघाईवर येतांच दोघांचेही लोक आंत घुसले, असें मुसलमान लेखकांचें म्हणणें आहे. आणखी असें कीं, खानाची फौज भेटीच्या जागेपासून बरीच जवळ होती. तिच्या योगानें खानाचा मृत्यु जरी टळला नसता, तरी इतक्या जवळ फौज आहे हें माहीत असतां शिवाजीच्या मनांत खुनाचा बेत असणें संभवनीय नाहीं. अशा आणखी बऱ्याच विसंगत गोष्टी ग्रँट डफच्या लेखांत दाखवितां येतील.

‘ शिवाजीचा कांटा एकदम काढण्याचा खानानें प्रयत्न केला, परंतु तो सिद्धीस न जाऊन तोच त्यांत फशीं पडला. भेटीच्या पूर्वी शिवाजीनें हरएक प्रकारची सावधगिरी ठेविली होती, यावरून त्याच्याच मनांत कपट असावें असें म्हणावें, तर शिवाजीनें अलौकिक सावधगिरी अशी कांहींच ठेविली नव्हती. असे प्रकार इतिहासांत वारंवार घडलेले आहेत. शिवाजी नेहमींच धूर्त व सावधगिरीनें वागणारा होता, त्या मानानें विजापुरची फौज बेसावध होती. विजापुरचा पडता काळ आलेला होता; आणि खून व रक्तपात यांची क्षिति अशा पडत्या काळांत फारशी राहत नाहीं. चांदबिबी, महंमद गवान, मादण्णापंत, मुरार जगदेव, लुकजी जाधवराव, इत्यादि नामांकित माणसें मुसलमानांच्या हातून खून होऊन मारलीं गेलीं आहेत. अशा स्थितींत शिवाजीनें सावधपणा ठेविला नसता तर त्याची गणना शहाण्या माणसांत करतां आली नसती. सारांश, शिवाजीचें एकंदर चरित्र पाहिलें म्हणजे मुद्दाम भेटीस बोलावून आणि-लेल्या पाहुण्याचा खून करण्याचा त्याचा संकल्प प्रथमपासून होता असें दिसत नाहीं. ’ (Modern Review,-1907.)

पुढें कांहीं वेळपर्यंत उभय फौजांची लढाई झाली, तीस प्रतापगडची लढाई म्हणतात. अफझलखानाचा वध होऊन संकेताप्रमाणें किल्ल्यावरून तोफा झाल्या, त्या वेळेस सायंकाळचा चार घटका दिवस राहिला होता. इशारा मिळतांच चोहोंकडून मावळे लोकांनीं एकदम बाहेर पडून मुसलमानी फौजेस घेरलें, त्यांस हत्यारें घेण्यास किंवा घोड्यावर चढण्यासही सवड मिळाली नाहीं. पुढें लवकरच दिवस मावळून अंधार पडल्यानें मुसलमान लोक त्या भयाण रानाच्या मध्यभागीं पेंचांत सांपडले. खानाबरो-

बर आलेले लोक किल्ल्याचे पायथ्याशीं होते, त्या बहुतेकांची नेताजी पालकर यानें कत्तल उडविली. मागच्या फौजेवर मोरोपंत पिंगळे तुटून पडला. 'शरण येतील त्यांस जिवदान द्यावें, व्यर्थ रक्तपात करूं नये,' अशी शिवाजीची मोरोपंतास ताकीद होती. त्याप्रमाणें त्यानें वर्तन केलें. विजापुरच्या फौजेची दाणादाण होऊन त्यांचें पुष्कळ द्रव्य व सामान शिवाजीचे हातीं लागलें. चार हजार घोडे, अनेक हत्ती, उंटें, तोफखाना वगैरे साहित्य शिवाजीस मिळालें. कित्येक पळून गेलेले लोक संकटानें मार्गक्रमण करीत स्वदेशीं गेले. हस्तगत झालेल्यांपैकीं खुशी होते ते शिवाजीचे नोकरींत राहिले, बाकीच्यांस त्यानें परत जाऊं दिलें. झुंजारराव घाटगे म्हणून एक विजापुरचा प्रतिष्ठित सरदार शहाजीचा स्नेही असून शिवाजीचे हस्तगत झाला होता, तो शिवाजीजवळ राहण्यास कबूल झाला नाहीं, म्हणून त्याचा मोठा सन्मान करून शिवाजीनें त्यास त्याचे मुलखांत जाऊं दिलें. परंतु खंडूजी कांकडे नामक एका मावळे सरदारानें द्रव्याचे लालचीनें शत्रूंस मिळून अफझलखानाचा मुलगा फाझलखान व बायकांमाणसें यांस आडवाटेनें पळवून नेऊन कऱ्हाड येथें सुरक्षितपणें नेऊन पोंचविलें, हें वर्तमान शिवाजीस कळतांच त्यानें कांकडे याचा शिरच्छेद केला.

अफझलखानाच्या वधानें सर्व देशांत मोठी चळवळ उडाली. अलीकडे ऐतिहासिक जागृति होऊं लागल्यापासून तर, ह्या प्रकरणाची चर्चा थोडीबहुत चालूच आहे. महाराष्ट्र, मुसलमान, इंग्रज व इतर ग्रंथकार यांनींही नाना तऱ्हेचे अभिप्राय या प्रकरणावर दिले आहेत, तेव्हां यावर पुनः विशेष चर्चा किंवा अभिप्राय येथें देण्याची जरूर नाहीं. मात्र कित्येक मुद्दे स्पष्ट करणें अवश्य आहे.

इतिहासांत असे अद्भुत प्रकार घडतात, त्यांची तपशीलवार खरी हकीकत बहुधा बाहेर येत नाहीं. तेव्हां प्रचलित वार्ता व कल्पना यांवरच बहुतेक भिस्त ठेवावावी लागते. तोच प्रकार येथें लागू पडतो. अफझलखान व शिवाजी हे दोघेही एकमेकांस सर्वथा पाण्यांत पाहत होते. कोणी तरी एक हरल्याशिवाय भांडणाचा निकाल लागणार नव्हता. शिवाजीनें राज्यस्थापनेचें काम हातीं घेतलें होतें. विजापुराहून आलेल्या ह्या सरदाराचा जर कोणत्या तरी रीतीनें पाडाव झाला, तर शिवाजीचें काम एकदम फत्ते झाल्यासारखें होतें. त्याचप्रमाणें शिवाजीच एकदम

नाहींसा झाला, म्हणजे विजापुरकरांचा एक मोठा शत्रू गेला, असें खानास वाटत होतें. तथापि जिवंत सांपडल्यानें कार्यभाग उरकण्यासारखा असता, तर जीवच घेतला पाहिजे, असा त्या दोघांचाही विचार नसेल; परंतु एकही दुसऱ्याच्या हातांत जिवंत सांपडणें संभवनीय नव्हतें. शिवाजीस ठार मारण्याचा अफझलखानाचा विचार नव्हता असें घेऊन चाललें, तरी त्यास पकडून नेण्याचा त्याचा इरादा होता, यांत संशय नाहीं. तेव्हां खानाच्या हातांत न सांपडण्याचा उपाय करणें शिवाजीस जरूर पडलें. खानही शिवाजीच्या हातांत जिवंत सांपडणारा नव्हता. अशा स्थितींत शिवाजीचा डाव साधला याचें कारण, दोहों पक्षांचीं मनें इतकीं प्रक्षुब्ध झालीं असतां, व मोरे यांचें प्रकरण खानाच्या डोळ्यांपुढें ढळढळीत असतां, त्या मुसलमान सरदारानें बेसावधपणाचें वर्तन केलें. गोब्राह्मण-प्रतिपालकाचें ब्रीद धारण केलेल्या शिवाजीकडून त्याला ज्या गोष्टी कळल्या, त्या सर्वांवर त्यानें डोळे मिटून विश्वास ठेवावयाचा नव्हता. आणीबाणीच्या प्रसंगीं आपली खरी बाजू लपवून ठेवून, शत्रूस काव्यानें फसविणें हा युद्ध-मार्ग प्रशस्त मानिला जातो. इतिहासांत या तोडीचीं अनेक उदाहरणें सांपडतील. सारांश, खानाचें वर्तन निष्काळजी, बेफिकीर व तोऱ्याचें असल्यामुळें, तें सेनानायकास शोभण्यासारखें नव्हतें, म्हणून त्याचा घात झाला. असें निष्काळजी वर्तनही अगदींच अलौकिक आहे असें मात्र नाहीं.

शिवाजीस मारण्याचा किंवा जिवंत सांपडल्यास पकडून नेण्याचा खानाचा हेतु होता हें निर्विवाद आहे; कारण बंडखोर शत्रूचा पाडाव करण्याकरितांच खान विडा उचलून शिवाजीवर चाल करून आला होता. उलट पक्षीं, एकदां खानाचे हातीं आपण सांपडल्यावर जिवाची किंवा राज्याची आशा नको, हें शिवाजीस ठाऊक होतें. म्हणूनच कोणत्या तरी युक्तीनें खानापासून आपल्या जीविताचा व राज्याचा बचाव करणें शिवाजीस भाग पडलें. हें कर्तव्य तडीस नेण्याचे मार्ग दोन, एक उघड-पणें खानाशीं लढणें, आणि दुसरा, खानास कोणत्या तरी युक्तीनें आपल्या कबज्यांत आणणें. पहिल्या मार्गाचा अवलंब खानानें केला नाहीं. म्हणून शिवाजीस दुसऱ्याचाच अवलंब करावा लागला. पण या मार्गाचा अवलंब केल्यावरही खानास ठार मारण्याचा शिवाजीचा हेतु नव्हता. कारण खानाच्या वधाचीच शिवाजीस अपेक्षा असती, तर त्याचा

समाचार घेण्यास, स्वतःचा जीव मुद्दाम धोक्यांत घालण्याचें शिवाजीस प्रयोजन नव्हतें. तें काम बिनधोक करण्यास एक दोन मल्ल शिवाजीस सहज मिळाले असते; आणि भेटीच्या प्रारंभीं त्यांसच शिवाजीनें पुढें केलें असतें, म्हणजे काम भागलें असते. तसें शिवाजीनें केलें नाहीं, आणि स्वतः होऊन खानाच्या भेटीस जाऊन त्यानें आपलें वचन पाळिलें. खानास आपल्या येथें बोलावून त्यास राजरोसपणें भेटावयाचें, त्याच्याशीं बोलाचाली करून आपणास फायदेशीर असा संधि अगर तह ठरवावयाचा; खान विशेष हट्ट धरून बसेल तर त्यास पकडून आपल्या कबज्यांत ठेवावयाचें; इतकें झाल्यावर त्याजकरवीं त्याचें सैन्य आपल्या मुलखांतून काढून लावावयाचें; आपण होऊन खान आपली फौज विजापुरास परत न पाठवील, तर त्या विगतनायक फौजेशीं सह्याद्रीच्या बिकट जागेंत लढून तीस चांगला हात दाखवावावयाचा; आणि अशा रीतीनें शत्रूचा पाडाव झाल्यावर बंदिवान झालेल्या खानास सुखरूपपणें त्याचे घरीं नेऊन पोंचवावयाचें; अशा प्रकारचा शिवाजीचा एकंदर बेत असावा, असें स्पष्ट दिसतें. ह्याप्रमाणें खानास पकडून नंतर सजीव सोडून देणें जितकें शिवाजीच्या फायद्याचें होतें, तितका खरें पाहतां त्याचा वध त्यास फायद्याचा नव्हता. हा शिवाजीचा बेत खानानें तडीस जाऊं दिला नाहीं. भेटतांक्षणींच त्यानें शिवाजीवर प्रथम वार केला असें म्हणतात, तें खरें असलें पाहिजे. स्वतःच्याच जिवावर बेतली, तेव्हां खानावर हात उगारणें शिवाजीस अपरिहार्य झालें, आणि अशाही प्रसंगास आपण सर्वथैव तयार आहों हें पूर्वीच्या सावधगिरीनें, व भेटीच्या वेळच्या वर्तणुकीनें, शिवाजीनें सर्वांस दाखवून दिलें. असा एकंदर स्पष्ट प्रकार असतां शिवाजीवर खुनाचा अगर कपटाचा आरोप कसा येतो तें समजत नाहीं. ‘ मी शरण येण्यास तयार आहें; आपण माझे घरीं येऊन माझें म्हणणें ऐकून घ्यावें, व सलोखा करावा, ’ अशा प्रकारचा निरोप शिवाजीकडून खानास आला होता. ह्या निरोपांतील वचनें अक्षरशः पाळण्याचा शिवाजीचा इरादा नव्हता असें म्हणण्यास कांहींच पुरावा नाहीं. असा निरोप आल्यावर खानानें दोन वैकल्पिक चुका केल्या. शिवाजीचा निरोप खरा समजून तदनुसार खानानें अखेरपर्यंत वागलें पाहिजे होतें: किंवा निरोप लबाडीचा समजून वाईच्या पुढें एकदम एकटें न जातां उघडपणें लढाई करून शिवाजीस जेरीस

आणावयाचें होतें. खानास निरोप लबाडीचा वाटला नाहीं; कारण त्याजवर पूर्णपणें भरंवसा ठेवून स्वशक्तीच्या घमेंडींत तो शिवाजीच्या भेटीस गेला, आणि पोटांत कपट ठेवून परस्पर भेटींतच शिवाजीस चीत करण्याचा त्याचा घाट होता. उघडपणें शिवाजीशीं लढून त्यास कबजांत आणणें खानास शक्य वाटलें नाहीं, म्हणूनच त्यानें हा कपटमार्ग पत्करिला, त्याचा परिणाम त्याला भोंवला.

शिवाजीनें आपल्या मोहिमी कसकशा केल्या व त्याजबद्दल अफ्झलखानास एवढा राग कां आला, हें समजून घेण्यासारखें आहे. वाई, मिरज, रायबाग, जमखिंडी वगैरे ठिकाणांतून थेट कृष्णानदीपावेतों प्रदेश अफ्झलखानाकडे जहागीर म्हणून होता. ह्या प्रदेशांत शिवाजी सारखा दहा पांच वर्षें हिंडत असून, त्यानें तेथील जहागीरदार व जमीनदार ह्यांस आपणाकडे वळवून घेतलें. त्यामुळें अफ्झलखानाचा वसूल सर्वस्वी बंद पडला. अर्थात् विजापुरच्या उमरावांत शिवाजीबद्दल जर अत्यंत कोणास चीड आली असेल, तर ती अफ्झलखानास आली. शिवाजीचा पाडाव केल्याशिवाय अफ्झलखानास तरणोपाय राहिला नव्हता. शिवाय तो मोठा बलाढ्य व ह्या प्रदेशाचा वाकब होता; म्हणूनच शिवाजीचा पाडाव करण्यासाठीं दरबारांत त्यानें विडा उचलून घेतला; आणि गोब्राह्मणप्रतिपालक म्हणवून घेणाऱ्या शिवाजीबद्दल आपला तिरस्कार व्यक्त करण्याकरितांच, त्यानें तुळजापुर, पंढरपुर व सिंगणापुर येथील देवस्थानें भ्रष्ट केलीं. शिवाजीनें धारण केलेल्या ब्रीदाला हें एक उघड आव्हानच होतें. परंतु शिवाजीच्या धूर्ततेपुढें त्याचा टिकाव लागला नाहीं. शिवाजीनें त्याचा नाश करून मराठे सरदारांना पाठबळ दिलें; आणि राष्ट्रापुढें आपलें ब्रीद कायम राखिलें. शहाणपण, धूर्तता, टापटीप, आगाऊ योजना या शिवाजीच्या गुणांपुढें खानास हार खावी लागली.

अफ्झलखानाचा वध झाल्यानंतर लवकरच जिजाबाईनें अज्ञानदास शाहिरास बोलावून त्याजकडून ह्या अद्भुत प्रकरणावर एक पोवाडा रचिला, आणि पाठीमागून कांहीं दिवसांनीं दुसरा एक पोवाडा रचिला. ह्याबद्दल एक शेर सोन्याचा तोडा व एक घोडा तिनें शाहिरास बक्षिस दिला. हे दोन्ही पोवाडे छापून प्रसिद्ध झाले आहेत. त्यांत बरीच माहिती मिळते, ती त्या वेळची असल्यामुळें बऱ्याच अंशीं विश्वसनीय मानण्यास हरकत

नाहीं. दोन्ही पोवाडे जिजाबाई व शिवाजी यांनीं स्वतः ऐकिले असले पाहिजेत, आणि कदाचित् त्यांनीं त्यांत कांहीं तपशिलाची भरही घातली असेल. असले ऐतिहासिक प्रसंग जागृत ठेवण्याचें त्या वेळचें साधन पोवाडे हेंच होतें.

ह्या पोवाड्यांवरून असें कळतें, कीं शिवाजीच्या ताब्यांत त्या वेळीं ४०-५० किल्ले होते. शिवाजीचें राज्य लोकांस मान्य झालें होतें. शिवाजीस 'महाराज' आणि 'छत्रपति' हीं विशेषणें त्या वेळीं लावलीं जात होतीं. 'शिवाजीच्या तळ्यांत पाणी पिती सर्व जीवू' ह्या वाक्यावरून शिवाजीचें राज्य लोकांस आवडत होतें. शिवाजीजवळ द्रव्य संचय चांगला असून आदिलशाहीच्या बरोबरीनें त्यानें आपला इतमाम ठेविला होता. खान धर्मवेडा असून, तुळजापुर व पंढरपुर येथील कृत्यांशिवाय त्यानें पालीच्या खंडोबाची कुचेष्टा केली; औंधच्या यमाईची खोड काढिली, इत्यादि गोष्टी व असेच आणखी पुष्कळ प्रकार ह्या पोवाड्यावरून उघड होतात. वाईचा कुळकर्णी कृष्णाजी भास्कर हा विजापुरापासूनच खानाचे बरोबर होता. ह्या पोवाड्यांचें पृथक्करण कोणीं एका इतिहासभक्तानें ग्रंथमाला मासिकांत केलें होतें, तें मार्मिक व वाचण्यालायक आहे.

या प्रकरणांत शिवाजीवर काय अरिष्ट येतें, याजबद्दल मोठी भीति होती. तेव्हा झालेला परिणाम ऐकून जिजाबाईला किती धन्यता वाटली असेल, याची कल्पनाच केली पाहिजे. शहाजीलाही मोठें समाधान वाटलें. शिवाजीनें ह्या विजयाबद्दल पुष्कळ दानधर्म केला. ज्यांनीं विशेष पराक्रम केले, त्यांस बक्षिसें वगैरे देऊन संतुष्ट केलें. मराठशाहीच्या खऱ्या स्थापनेस शिवाजीचा हा पराक्रम कारण झाला. लोकांवर त्याचा वचक बसला. अचाट कल्पना, साहस, प्रसंगावधान इत्यादि थोर पुरुषांच्या अंगीं असणारे गुण त्याजमध्यें आहेत, अशी लोकांची एकदम खात्री होऊन हा कोणी तरी अद्वितीय पुरुष आहे आणि हा म्हणेल तें करील, असा त्याचा लौकिक सर्वत्र झाला. 'पुणें, इंदापुर, चाकण, सुपें, बारामती ऐसे इनाम हिंदु व मुसलमान यांसी आहेत, त्यास, पेशजी आपणांस मुकासा असतां, अफ्झलखानाआधी जेणें प्रमाणें ज्यास जें पावत असेल त्यास तेणेंप्रमाणें देणें. ऐसा तह (=ठराव) केला असे.' १८ डिसेंबर १६६०, (खंड ८-११). यावरून अफ्झलखान मेल्यावरही पूर्वींचीं इनामें शिवाजीनें जशींच्या तशीं चालविलीं.

**३. बाजी प्रभूचा पराक्रम ( जुलै, १६६० ).**—अफझलखानाच्या वधानें ही पहिली मोहीम संपली नाहीं. त्या वधाचा फायदा घेण्याकरितां शिवाजी मोठ्या त्वरेनें फौज घेऊन बाहेर पडला. प्रथमतः कोल्हापुर प्रांतांत शिरून, त्यानें पन्हाळा किल्ला युक्तीनें काबीज केला. कोल्हापुर प्रांत त्या वेळीं विजापुरचा एक सुभा होता. त्या सुभ्याचें काम रुस्तुमुज्जमान नांवाचा सरदार पाहत असे. त्या प्रांतांत पन्हाळा किल्ला फार मजबुदीचा होता. हा प्रांत मुसलमानांचे ताब्यांत असूनही त्यांतील जागोजागचे ठाणेदार व किल्लेदार बहुतेक हिंदु होते. कारण ह्या डोंगराळ प्रदेशाचा बंदोबस्त राखण्यास हिंदु कामगारांचाच विशेष उपयोग दरबारास होत असे. पन्हाळा, पवनगड, विशाळगड, खेळणा, रांगणा हे किल्ले ह्या प्रांतांत प्रसिद्ध होते. हा प्रांत काबीज करण्याकरितां शिवाजी फार दिवस उत्सुक होता. अफझलखानाचा पाडाव होतांच पन्हाळ्याच्या हिंदु किल्लेदाराशीं संधान बांधून शिवाजीनें अनाजी दत्तो याजकरवीं तो किल्ला हस्तगत केला. त्याचप्रमाणें पवनगड व वसंतगड (कऱ्हाडाजवळ) हेही त्यास मिळाले; आणि कृष्णाकांठचे प्रदेशांतून शिवाजी खंडणी वसूल करूं लागला. पुढें रांगणा व खेळणा हे किल्ले मोठ्या शर्थीनें लढून त्यानें घेतले व खेळण्यास विशाळगड हें नांव दिलें. या गोष्टी ऐकून आदिलशहाच्या हुकुमानें रुस्तुमुज्जमान मिरजेहून फौज जमा करून शिवाजीवर चालून आला. परंतु त्याची फौज थोडी असल्यामुळें, त्याजबरोबर लढून शिवाजीनें त्यास कृष्णा नदीचे पार हांकून लाविलें, आणि आपण थेट खंडण्या वसूल करीत विजापुरा पर्यंत गेला; पण तेथून तो इतक्या वेगानें परत फिरला कीं कोणाच्यानेंही त्याचा पाठलाग करवला नाहीं याप्रमाणें पुष्कळ लूट मिळवून, शिवाजी सन १६६० च्या जानेवारींत राजगडीं परत आला, आणि विजापुरकरांच्या युद्धांतील ही पहिली जंगी मोहीम संपली. इकडे शिवाजीच्या सरदारांनीं राजापूर व दाभोळ हीं ठिकाणें काबीज केलीं.

अफझलखान मरण पावला, रुस्तुमुज्जमानचा पराभव झाला, व शिवाजीनें विजापुरच्या राज्यावर पाहिजे तसा हात मारण्याचा सपाटा चालविला, इत्यादि गोष्टी ऐकून आदिलशहाची पांचावर धारण बसली आणि शिवाजीचा बंदोबस्त कसा होतो, हा सर्वांस मोठा विचार पडला. सीदी जौहर नांवाचा सरदार कर्नाटकांत कर्नूल येथें कारभारावर होता. हा

मूळचा मलीक रयहान नामक सरदाराचा नोकर असून, धनी मेल्यावर तो त्याच्या मुलांस बाजूस सारून आपण कारभार बळकावून बसला होता; म्हणून आदिलशहाची त्याजवर मर्जी नव्हती. प्रस्तुत प्रसंगीं शहानें त्यास बोलावणें पाठवून कळविलें, कीं 'शिवाजीवर जाऊन त्याची तुम्ही खोड मोडाल, तर तुम्हांवरील आमची इतराजी नाहींशी होईल.' सीदी जौहर यानें ही गोष्ट तत्काळ मान्य केली. आदिलशहानें त्यास सलाबतजंग असा किताब देऊन शिवाजीवर पाठविलें. त्याजवळ दहा हजार स्वार व चौदा हजार पायदळ इतकी फौज असून शिवाय अफझलखानाचा मुलगा फाजल महंमद हा बापाच्या वधाचा सूड घेण्याकरितां त्याजबरोबर हजर होता. ही तयारी पाहून जंजिऱ्याचा सीदी व वाडीचे सावंत हेही शिवाजीवर उठण्यास उद्युक्त झाले. इकडे शिवाजीनें न घाबरतां आपला बंदोबस्त चांगला केला. स्वपरबलाबलाची त्यास आतां बरीच पारख झाली होती. त्यानें आपले भरंवशाचे सरदार आजूबाजूच्या बंदोबस्तास ठेविले. राघो बल्लाळ यास सीदीचे बंदोबस्तास पाठविलें. बाजी पासलकर यास वाडीचे सांवताचा बंदोबस्त करावयास सांगितलें. पुरंदर, सिंहगड, प्रतापगड यांच्या आटोक्यांतील मुलखांत मोरोपंत पिंगळे फौजबंद राहिला. कल्याण प्रांतीं आबाजी सोनदेव होताच. ह्याप्रमाणें तयारी करून, स्वतः शिवाजी पन्हाळा किल्ल्यावर राहिला. शिवाजीस वाटला होता तितका हा किल्ला मजबूद नव्हता. सीदी जौहर थेट पन्हाळ्यावर आला. पावसाळा असतांही त्यानें मोर्चे बांधून किल्ल्यास वेढा दिला. तेव्हां बाहेरच्या लोकांशीं शिवाजीचें दळणवळण अगदीं बंद झालें. शिवाजी आतां आपले हातीं खाचित येतो, अशी सीदीस मोठी आशा लागली आणि तो वेढ्याचें काम जोरानें चालवूं लागला. तेव्हां 'किल्ला स्वाधीन करून देतों, आणि अभयवचन दिल्यास आपण स्वतः किल्ल्याखालीं येऊन स्वाधीन होतों,' असें शिवाजीनें सीदीशीं बोलणें लाविलें. त्याप्रमाणें इमान झाल्यावर शिवाजी एका मोर्च्याजवळ येऊन सीदीस भेटला, तेव्हां दुसरे दिवशीं किल्ला स्वाधीन करण्याचें ठरलें. नंतर शिवाजी परत किल्ल्यांत गेला. त्या रात्रीं विजापुरचे लोक तह ठरला असें समजून बेसावध होते. मध्यरात्र होतांच शिवाजी मावळ्यांची एक टोळी बरोबर घेऊन अंधारांतून शत्रूचे चौक्यापहारे चुकवीत किल्ल्याखालीं

उतरला आणि थेट विशाळगड* किल्ल्याकडे चालता झाला. शिवाजी निघून गेला हें बराच वेळ विजापुरच्या फौजेस कळलें सुद्धां नाहीं. परंतु पक्की खबर लागतांच फाजल महंमद व सीदी जौहरचा मुलगा सीदी अजीज (सीदी हिलाल ?) हे तावडतोब घोडेस्वार बरोबर घेऊन शिवाजीच्या पाठलागावर निघाले. परंतु सकाळीं बराच वेळपर्यंत त्यांस शिवाजी दिसला नाहीं. त्या वेळीं शिवाजी किल्ल्याचा घाट चढत होता. शत्रूचें सैन्य पाठलाग करीत आलेलें पाहून शिवाजीनें बाजी प्रभु याचे हाताखालीं कांहीं मावळे लोक देऊन त्यास किल्ल्याजवळील खिंडींत पांढऱ्या पाण्यानजीक ठेविलें, आणि सांगितलें कीं, 'मी किल्ल्यावर सुखरूप पोंचल्याच्या तोफा ऐकूं येईपर्यंत शिकस्त करून शत्रूस पुढें येऊं न देतां तेथेंच अडवून धरावें. ह्याप्रमाणें तो शूर वीर बाजी प्रभु शत्रूस अडविण्याकरितां खिंडींत आडवा उभा राहिला. यवन येऊन अंगाशीं भिडले. बाजी प्रभूनें शूर मावळ्यांनिशीं शत्रूंवर असा निकराचा मारा केला, कीं त्यांस खिंडींतून परत खालीं घालविलें. पुढें विजापुरचें पायदळ येऊन पोंचल्यावर त्यानें दोनदां हल्ले केले. तेही बाजीनें मागें हटविले. त्यानंतर दुपारचे सुमारास फाजलखान ताज्या दमाची टोळी घेऊन पुनः चाल करून आला. बाजी प्रभूचे यापूर्वीं बरेच लोक पडले होते. तरी तो मोठ्या आवेशानें लढूं लागला. त्याचें सर्व लक्ष किल्ल्यावरील तोफेकडे होतें. त्याचे अर्धे अधिक मावळे लोक रणांगणीं पडले. त्यांत बाजीही गोळी लागून पडला. पण प्राणोत्क्रमणापूर्वी शिवाजी सुखरूप पोंचल्याबद्दल किल्ल्यावरील तोफा त्यास ऐकूं आल्या.

* ग्रँट डफ रांगणा म्हणतो तें खरें नाहीं. शिवाजी पन्हाळ्यावरून विशाळगडावरच गेला, ही गोष्ट चर्चा होऊन ठरली आहे. ( पहा, केसरी २६-७, व २-८, स. १९१० ). 'तारिखी शिवाजी' ह्या फारशी बखरींत विशाळगड असें स्पष्ट आहे. रांगणा किल्ला कोल्हापुर संस्थान, सावंतवाडी व रत्नागिरि जिल्हा यांचे सरहद्दीवर वेंगुर्ल्याचे पूर्वेस घांटावर आहे. पन्हाळ्यापासून त्याचें अंतर सुमारें ७५ मैल आहे प्रचितगड व हनुमंतगड हेही किल्ले त्याजवळ आहेत. या वेळीं सीदी जौहर यास शिवाजीनें फसविलें, असें ग्रँट डफचें म्हणणें आहे तें खरें नाहीं. तहाचें बोलणें चालू असतां एका रात्रीं तो उघडपणें विजापुरच्या फौजेंतून रस्ता करून निघून गेला. मुसलमान इतिहासकारांनीं असें लिहिलें आहे, कीं सीदी जौहर यानें आपण होऊन धन्याशीं बेइमान करून शिवाजीस किल्ल्यांतून जाऊं दिलें.

त्यामुळें मरतांना अत्यंत समाधान वाटून, 'मी आपली कामगिरी बजाविली,' असे उद्गार काढून, त्यानें प्राण सोडिला. त्यासंबंधानें इतिहाससंग्रहांत खालील हकीगत आहे, [जुन्या ऐतिहासिक, गोष्टी २३]:-

'शत्रूचें अफाट लष्कर, किल्ला तीन कोस दूर, प्रसंग तर महाराजांचे जिवावर येऊन गुदरलेला, हें पाहून बाजींनीं प्रभुचरणीं विनंति करून, शत्रूस खिंड उलटून पुढें येऊं देत नाहीं असा पण लावून, अत्यंत आग्रहानें शिवबांना अर्धे लष्कर देऊन किल्ल्यावर पाठविलें, व आपण बाकीचे मावळे झाडींत लपवून ठेवून, निवडक पन्नास साठ लोकांनिशीं, खिंडीचे तोंडावर उभा राहिला. शत्रु पुढें आला कीं, यानें हाणून पाडिलाच, असा प्रकार दोन प्रहरांपर्यंत चालला होता. तेवढ्या अवकाशांत त्या मर्दाला पंचवीस जखमा लागल्या असतांही तिळप्राय न डगमगतां शिवरायांच्या क्षेमकुशलतेचा इशारा किल्ल्यावरून येईपावेतों त्यानें शत्रूस एक रेसभर सुद्धां पुढें पाऊल ठेवूं दिलें नाहीं.' या लढाईचा काळ जुलै सन १६६० असा आहे. इंग्लंडचा बाजू राखण्याकरितां प्राण देणारा नेल्सन यानें आपली कामगिरी बजावल्यावर मरतांना असेच उद्गार काढिले होते, त्याचें येथें स्मरण झाल्याशिवाय राहत नाहीं. मावळे लोकांनीं बाजींचें प्रेत शत्रूंच्या हातीं लागूं न देतां मोठ्या शिताफीनें किल्ल्यावर पोंचतें केलें. त्या वेळीं शिवाजीस किती दुःख व ह्या निःसीम राजभक्तीबद्दल किती प्रेम वाटलें असेल, याची कल्पनाच केली पाहिजे.

इतिहासांत अनेक प्रसंगीं मराठ्यांच्या अंगचें अप्रतिम शौर्य प्रगट झालें, अशा प्रसंगांमध्यें विशाळगडच्या खिंडींतला हा प्रसंग गणिला जातो. ग्रीसच्या इतिहासांत थर्मापिलीच्या* खिंडीचा प्रकार अशाच तऱ्हेचा आहे. एका एकनिष्ठ सरदाराच्या कर्तबगारीनें सर्व राज्याचा बचाव होणें, व त्या कामगिरींत त्या सरदाराचे प्राण खर्ची पडणें, अशा गोष्टी क्वचित् घडतात. महाराष्ट्रीयांच्या अंगीं त्या वेळेस कोणत्या प्रकारचा आवेश उत्पन्न झाला होता याची प्रचीति ह्या प्रसंगावरून पटते. सरदार बाजी

* ग्रीस देशांतील स्पार्टा प्रांत जिंकण्याकरितां इराणच्या राजानें अवाढव्य फौजेनिशीं स्वारी केली असतां, स्पार्टांत शिरण्यास थर्मापिली नांवाची लहानशी खिंड आहे, त्या खिंडींत दोनशें स्पार्टन लोकांनीं प्रचंड इराणी फौजेशीं टक्कर देऊन आपले प्राण खर्ची घातले.

प्रभु देशपांडे सिंधकर प्रधान हा हिरडस मावळांतील देशमुखांचा आश्रित असून, मोऱ्यांपासून जावळी सर केल्यावर शिवाजीनें हिरडस प्रांत व रोहिडा किल्ला काबीज केला, तेव्हां तो शिवाजीचे नोकरींत आला पृ० २३९). तेव्हांपासून मरेपर्यंत त्यानें शिवाजीची नोकरी एकनिष्ठपणें बजाविली. त्यास सात मुलगे होते. वडील मुलगा बाबाजी बाजी यास शिवाजीनें बापाची सरदारी दिली, आणि इतरांस पालख्या व तैनात करून मावळे लोकांची सबनिशी सांगितली.

शिवाजी सुटून गेल्यामुळें आदिलशहाची व सर्व सरदारांची हिरमोड झाली. सीदी जौहरनें लांच घेऊन शिवाजीस जाऊं दिलें, असा संशय आदिलशहास येऊन, त्यानें त्यास परत बोलाविलें. परंतु तो विजापुरास न जातां आपल्या जहागिरीकडे कर्नूल येथें निघून गेला. याप्रमाणें विजापुरच्या युद्धाची ही दुसरी मोहीम आटोपली. सीदी जौहर संबंधानें 'बसातिन-इ-सलातिन' नामक विजापुरच्या इतिहासांत खालील मजकूर आहे.

'त्याच सुमारास सीदीजौहर म्हणून विजापुरचा एक सरदार कर्नाटकांत बंड करून उठला होता, त्यानें आदिलशहास पत्र पाठविलें कीं, 'मी शरण आलों आहें; मला अपराधांची क्षमा व्हावी, आणि दर्शनास येण्याची परवानगी होऊन कांहीं तरी कामगिरी सांगावी, सेवा करून दाखवितों.' अलीआदिलशहानें त्यास अपराध माफ करून भेटीस बोलाविलें. त्याप्रमाणें सीदीजौहर विजापुरास आला. त्यास शहानें शिवाजीवर जाऊन त्यास पकडून आणण्यास सांगितलें. जौहर शिवाजीवर चालून गेला; शिवाजीची फौज त्यानें उधळून दिली. शिवाजीचा टिकाव लागेना, तेव्हां शिवाजीनें पन्हाळ्याचे नाइकवाडी वश करून घेतले, आणि त्यांच्या मदतीनें त्या अवघड किल्ल्यावर तो जाऊन बसला. सीदीजौहरनें किल्ल्यास वेढा घातला. वेढा चालू असतां शिवाजीनें सीदीजौहर यास पत्रें पाठविलीं कीं आपण शरण येतों आणि अपराधांची क्षमा होईल तर दोन तीन नोकरांनिशीं येऊन भेटतों.' सीदीजौहरनें धन्याशीं बेइमान करून मूर्खपणानें शिवाजीचें म्हणणें कबूल केलें. शिवाजी सीदीच्या भेटीस गेला. सीदीनें दरबार भरवून त्याचा सत्कार केला; आणि उभयतांची आणभाक होऊन शिवाजी परत किल्ल्यावर गेला. आदिलशहास हें वर्तमान कळतांच, तो ह्या दोघां बंडखोरांचें पारिपत्य करण्यासाठीं स्वतः फौज घेऊन त्वरेनें

चालून मिरजेपावेतों आला. त्याबरोबर शिवाजी व सीदीजोहर दोघांचीही गाळण उडाली. शिवाजी तर लगेच पन्हाळा सोडून पळून गेला, आणि कांहीं एक आयास न पडतां किल्ला शहाचे हातांत आला. पुढें शिवाजीचा पाठलाग करून त्यास पकडावें असें शहाच्या मनांत होतें, परंतु डोंगर पोखरून उंदीर काढण्याचें हें काम असल्यामुळें तें सोडून आदिलशहा मिरजेहून विजापुरास परत आला. इकडे सीदीजोहर शहाच्या विरुद्ध बंड करून कर्नाटकांत गेला. तिकडे आदिलशहानें त्याजवर स्वारी करून त्यास ठार मारिलें पुढें बेदनूरच्या भद्राप्पा नायकाचा पराभव करून शहा परत विजापुरास आला.'

४. आबाजी विश्वनाथ प्रभु.—शिवाजीच्या उपक्रमांत अनेक प्रभुमंडळी प्रमुख होती. कदाचित् अगदी आरंभीं साहस करण्यांत ब्राह्मणांपेक्षां प्रभूच शिवाजीस ज्यास्त साह्यकारी झाले, असें त्या वेळच्या कागदपत्रांवरून दिसून येतें. आबाजी विश्वनाथ प्रभु दिघे देशपांडे मुठेखोरेकर हा एक शूर सरदार आरंभींच शिवाजीस मिळाला. त्याचें चरित्र त्याच्याच एका वंशजानें इतिहाससंग्रहांत प्रसिद्ध केलें आहे, ( ऐतिहासिक चरित्रें, १ ); त्यावरून शिवाजीच्या उपक्रमाची चांगली कल्पना होते.

आबाजीचा जन्म स. १६३१ त झाला. बाजी पासलकराबरोबर नेहेमीं राहून तो राज्याचें काम करीत असे. त्याची हुशारी पाहून शिवाजीनें त्यास स. १६४९त आपल्या सरदारांत दाखल केलें, तेव्हांपासून किल्ले वगैरे काबीज करण्यांत व शिवाजीच्या इतर मोहिमांत आबाजी प्रभु नेहमीं हजर असे. जावळी काबीज करितांना मोरे बंधूंचे खून झाल्यावर त्याची फौज शिवाजीच्या फौजेवर चालून आली, तेव्हां शिवाजीचा मोड होतो, असें दिसूं लागतांच, आबाजी पुढें झाला आणि सगळ्या मावळे लोकांस परत फिरवून आवेशानें त्यानें मोरे यांच्या फौजेशीं लढाई केली आणि जय मिळविला. तेव्हां जावळी हस्तगत झाली. पुढें वासोटा किल्ला काबीज करण्यांतही आबाजीनें बहुत पराक्रम केला. रोहिडा किल्ला घेण्याचा शिवाजीचा विचार झाला, तेव्हां आबाजीनें फकिराच्या वेषानें गुप्तपणें किल्ल्यावर जाऊन तेथील सर्व माहिती आणिली. हिरडस मावळचा बांदल देशमुख व जावळीचा बाजी प्रभु हे दोघे किल्ल्यावर बंदोबस्तास होते. एके दिवशीं रात्रीं शिवाजी आपली मावळी फौज बरोबर घेऊन तटास शिडी लावून वर चढला.

प्रथम शिवाजी वर चढला, त्यानंतर आबाजी प्रभु व मग इतर लोक चढले. तेव्हां किल्ल्यांतील लोक जागे होऊन हातघाईची लढाई झाली. एकमेकांस ओळखतां यावें म्हणून आबाजीनें एक गवताची गंजी पेटवून दिली. तो स्वत: मोठ्या शौर्यानें लढला. पुष्कळ जखमा लागल्या तरी त्यानें माघार घेतली नाहीं. बांदल देशमुख घायाळ होऊन पडला, तरी पुढें बाजी प्रभु लढूं लागला. तेव्हां आबाजीनें त्यास 'असें एकमेकांनीं आपसांत लढून निरर्थक मरून जाणें योग्य नाहीं,' असें सांगून शिवाजीच्या पक्षास वळविलें. लगेच शिवाजीनें बाजी प्रभूस नोकरींत घेऊन सरदारी दिली. बाजी प्रभूनें पुढें विशाळगडच्या खिंडींत शिवाजीच्या संरक्षणासाठीं आपले प्राण खर्ची घातले. शिवाजीनें रोहिडा काबीज केला तेव्हां जे लोक नोकरीस राहण्यास कबूल झाले त्यांस ठेवून घेतलें, आणि जे कबूल नव्हते त्यांस घरीं जाण्यास परवानगी दिली.

आबाजी प्रभूनें शिवाजीची नोकरी एकनिष्ठपणें बजाविली. शिवाजी वारल्यानंतर संभाजीनें पुष्कळ सरदारांचीं वतनें खालसा केलीं, तेव्हां हे मावळे सरदार फार हवालदील झाले. त्या प्रसंगीं आबाजी प्रभूनें लोकांस दीलदिलासा देऊन औरंगजेबाच्या फौजेपुढें प्रांताचें संरक्षण केलें. संभाजीचा हृदयद्रावक शेवट ऐकून आबाजीस अतिशय त्वेष आला, आणि सेनापति खंडेराव गोमाजी पानसंबळ याचे हाताखालीं राहून, आणि 'शिवाजी महारारा जांचा लोभ व राजाराम महाराजांची आज्ञा, तसेंच स्वराज्याचा अभिमान हीं चित्तांत आणून, जिवाची पर्वा न बाळगतां, मोगल फौजेशीं लढण्याचा त्यानें क्रम चालविला. या त्याच्या पराक्रमाबद्दल राजारामानें सेनापतीच्या सांगण्यावरून त्यास नवीन इनामें करून दिलीं. रामचंद्रपंतानें मोगलांचे हातांतून दाभोळ प्रांत परत मिळविण्याकरितां शंकराजी नारायण गांडेकर यास व आबाजी विश्वनाथास पाठविलें. आबाजीचा पराक्रम पाहून शंकराजीनें संतोष प्रगट केला. औरंगजेबाच्या फौजेनें सन १६९४ त तोरणा ऊर्फ प्रचंडगड किल्ल्यास वेढा घातला असतां आबाजीनें त्या किल्ल्यांचें संरक्षण मोठ्या मर्दुमकीनें केलें. मोगलांशीं लढून किल्ल्यांतून निघून जात असतां सन १६९४ त हा शूर वीर धारातीर्थी पतन पावला. आबाजीचा मुलगा जनाजी याजकडे त्याचें वतन चालू होतें.

५. तिसरी मोहीम, (अ) बाजी घोरपडे.—वर सांगितलेल्या दोनही मोहिमा विफल झालेल्या पाहून अली आदिलशहा स्वत: सर्व फौज घेऊन शिवाजीवर आला. त्यानें पन्हाला, पवनगड वगैरे किल्ले काबीज केले, आणि पावसाळा आल्यामुळें कृष्णाकांठीं चिमुलगें या गांवीं तो छावणी देऊन राहिला. रांगणा व विशाळगड हे त्याचे हातीं आले नाहींत. या संधीस कर्नाटकांत बंड झाल्यामुळें, आदिलशहाला विचार पडला, कीं शिवाजीचें बंड मोडणें व कर्नाटकांतील बंड मोडणें ह्यांपैकीं अगोदर कोणतें करावें ? इतक्यांत वाडीचे सावंतानें आदिलशहास अर्ज केला, कीं 'मला कुमक दिल्यास मी शिवाजीचें पारिपत्य करितों.' सावंत हा पुष्कळ दिवस विजापुरच्या तर्फेनें शिवाजीशीं लढत होता. शिवाजीशीं केलेला तह मोडून सावंतानें आदिलशहाची मदत मागितली. आदिलशहानें सावंताचें म्हणणें कबूल केलें; आणि बाजी घोरपडे व बुह्लोलखान यांस सावंताची मदत करण्यास ठेवून आपण कर्नाटकांत निघून गेला. ही व्यवस्था शिवाजीच्या चांगलीच पथ्यावर पडली. घोरपडे हा सावंतास मदत करण्याचें सोडून आपल्या जहागिरींत मुधोळास जाऊन स्वस्थ बसला.

बाजी घोरपडे हा शहाजीस पकडण्यांत मुख्य होता. शिवाजीचा त्याजवर डोळा होता. तो मुधोळास बेसावध आहे अशी विशाळगडावर शिवाजीस बातमी लागतांच, तो ताबडतोब मुधोळास गेला, आणि छापा घालून घोरपडे व त्याचीं माणसें यांस त्यानें ठार मारिलें. बाजी घोरपड्याच्या मुलास शिवाजीनें पुढें सामोपचाराचें पत्र लिहून आपणाकडे वळविलें, तो प्रकार दहाव्या प्रकरणांत येईल. घोरपड्याचे जागीं विजापुराहून खवासखानाची नेमणूक झाली. खवासखान व बुह्लोलखान यांनीं शिवाजीचें पारिपत्य केलें असतें, परंतु त्यांसही शहानें लवकरच कर्नाटकांत बोलावून घेतलें. तेव्हां वाडीकर सावंत शिवाजीचे तडाक्यांत एकटाच सांपडला. त्यास शिवाजीनें तेव्हांच जेरीस आणिलें. तो व शृंगारपुरकर दळवी यांनीं गोवेकर पोर्तुगीझ यांजपाशीं आश्रय मागितला. परंतु पोर्तुगीझ लोकांस अन्य तऱ्हेनें धमकी घालून शिवाजीनें सावंत व दळवी यांस त्यांजपासून अलग केलें. तेव्हां ते शिवाजीस शरण आले.

(आ) वाडीच्या सावंतांची पूर्वपीठिका पूर्वीं दिली आहे. (पृ. १३१) लखम सांवतास वाडीची देशमुखी पूर्ववत् सांगून शिवाजीनें

आपले पदरीं ठेविलें, त्या वेळीं शिवाजीनें त्याच्याशीं सन १६५९ च्या एप्रिलांत तह ठरविला, तो काव्येतिहास संग्रह–पत्रेंयादी ले. ४११ वर दिला आहे. त्यांत असें ठरलें कीं प्रांताचा निंमा वसूल शिवाजीस देऊन तीन हजार हेटकरी फौजेनिशीं नोकरीस यावें; गोव्यांजवळचा फोंडें किल्ला शिवाजीनें काबीज केला आहे, त्याचें रक्षण करावें, स्वराज्य वाढविण्याचा उद्योग करीत जावा; आणि सरकारी अमंलदार तपासणीस येतील त्यांस हिशेब दाखवावा. हा तह पाळला म्हणजे पुरातनचीं वतनें व किताब सावंतांकडे चालविण्यांत येतील. हा तह किती खुषीचा आहे, आणि शिवाजीनें आपला राज्योपक्रम कसा केला हें त्यावरून दिसून येतें. हा तह अफ्झलखानाच्या वधापूर्वी झाला.

सावंतांप्रमाणेंच दळवीही शिवाजीची नोकरी पतकरून राहिला. दोघांच्याही मुलखांत शिवाजीनें आपली शिबंदी ठेविली. ह्याप्रमाणें शिवाजीच्या ताब्यांत सर्व कोंकणपट्टी येऊन नवीन शूर लोकांची त्याच्या सैन्यांत भरती झाली. शिवाजीनें ह्या प्रदेशांत कित्येक नवीन किल्ले बांधिले.

(इ) जंजिऱ्याचा सीदी पूर्वपीठिका.—कोंकणांतील विजापुरकरांच्या ताब्यापैकीं जंजिरेकर सीदीचा पाडाव शिवाजीकडून अद्यापि झाला नव्हता. कोंकणांतील कांहीं किल्ले काबीज केले तेव्हां सीदीशीं झगडण्याचा प्रसंग शिवाजीवर आला. हा प्रकार समजण्यासाठीं प्रथम जंजिऱ्याची पूर्वपीठिका दिली पाहिजे.

जंजिरा म्हणजे पाण्यांतला किल्ला. किल्ले दोन प्रकारचे, एक भुईकोट व दुसरा जंजिरा. भर समुद्रांत बेटावर अगर समुद्रांत गेलेल्या जमिनीच्या चिंचोळ्या भागावर जे किल्ले बांधीत त्यांस जंजिरा असें म्हणत. त्यांजवर मारा करावयाचा तो पाण्यांतून आरमाराच्या साह्यानें करावा लागे. शिवाजीच्या वेळीं पश्चिम किनाऱ्यावर असे जंजिरे पुष्कळ होते. पण हल्लीं जें जंजिरा संस्थान म्हणून प्रसिद्ध आहे, तें रत्नागिरि व कुलाबा या जिल्ह्यांच्या दरम्यान पश्चिम किनाऱ्यालगत आहे. महाड दासगांव वरून सावित्री नदी बाणकोटाजवळ येऊन समुद्रास मिळते. ही नदी रत्नागिरि जिल्ह्याची उत्तरहद्द, व जंजिरा संस्थानाची दक्षिणहद्द होय. सावित्रीच्या मुखाजवळ दक्षिण बाजूस बाणकोट व उत्तर बाजूस श्रीवर्धन हीं प्रसिद्ध गांवें आहेत. तेथून किनाऱ्या किनाऱ्यानें मुंबईकडे जाऊं लागलें म्हणजे थोड्या अंतरावर

दुसरी एक खाडी लागते, ती राजपुरीची खाडी. ह्या खाडीच्या उत्तर टोंकावर राजपुरी नांवाचें लहानसें गांव असून तें मराठशाहीच्या वेळीं आरमाराचें ठाणें होतें. राजपुरीखाडीच्या मुखाजवळ समुद्रांत एक अवघड बेट असून त्याजवर मजबूद किल्ला आहे, तोच जंजिरा ह्या विशेष नांवानें प्रसिद्ध आहे. तेथून पुढें आणखी उत्तरेस जाऊं लागलें म्हणजे रेवदंड्याची खाडी लागते, तिच्या दक्षिण बाजूस रेवदंडा व उत्तर बाजूस चौल हीं गांवें आहेत. चौलच्या उत्तरेस थोड्या अंतरावर अलीबाग शहर मुख्य किनाऱ्यावर आहे, तेथील किल्ल्यास कुलाबा हें नांव होतें. कुलाबा व मुंबई यांचे दरम्यान समुद्रांत दोन अवघड बेटें आहेत त्यांस खांदेरी व उंदेरी अशीं नांवें आहेत. जंजिरा प्रांतास हबसाण असेंही नांव आहे. या प्रांताचे पूर्वेस व उत्तरेस कुलाबा जिल्हा आहे. रत्नागिरि जिल्हा संपला म्हणजे कल्याणपर्यंत जो उत्तर कोंकणचा पूर्वेकडील भाग तो कुलाबा जिल्हा. कुलाबा जिल्ह्याचें मुख्य ठिकाण अलीबाग. अलीबागच्या किल्ल्याचें नांव कुलाबा. हेंच नांव सर्व प्रांतास लागू आहे. हल्लींच्याप्रमाणें जंजिरा व कुलाबा असे भिन्न प्रांत मराठ्यांचे वेळेस नसल्यामुळें, जंजिऱ्याचे इतिहासांतच कुलाब्याची हकीगत येणार आहे. अलीबागनजीक कुलाबा, रोहें गांवापासून तीन मैलांवर अवचितगड, तेथूनच सहा मैलांवर बिरवाडी व घोसाळगड; महाडापासून अकरा मैलांवर कंगोरी ऊर्फ मंगळगड व आग्नेयीस सोळा मैलांवर चंद्रगड, ईशान्येस सोळा मैलांवर लिंगाणा, उत्तरेस १६ मैलांवर रायरी ऊर्फ रायगड, चौलबंदराचा रेवदंडा, तळें येथील तळेगड, व मुंबई बंदराच्या नाक्यावरील मजबूद खडकाचीं बेटें खांदेरी व उंदेरी, हे या प्रांतांतील मजबूद किल्ले असून, चौल, महाड, दंडाराजपुरी, रोहें, श्रीवर्धन इत्यादि या प्रांतांतील बंदरें आहेत. त्यांत चौल हें प्राचीन काळीं व दंडाराजपुरी शिवाजीच्या वेळेस महत्त्वाचीं होतीं. जंजिऱ्याचे सीदीची हकीकत समजण्यास ह्या वरील भूगोलाचा तपशील ध्यानांत ठेविला पाहिजे.

शिवाजीनें ज्या पायावर राज्यस्थापना केली, त्या पायाचें एक मुख्य अंग पश्चिमकिनारा ताब्यांत ठेवणें हें होतें. समुद्रकिनाऱ्याचें महत्त्व शिवाजीच्या वेळेस वाढूं लागलें होतें, आणि तो हें महत्त्व पूर्णपणें ओळखून होता. पश्चिम किनारा ताब्यांत ठेवण्याकरितां त्यानें व त्याच्या अनु-

यायांनीं पाण्याप्रमाणें माणसांचा, पैशाचा व कालाचा व्यय केला. किनारा ताब्यांत राहिल्यानें इराण, आरबस्तान, आफ्रिका इत्यादि देशांचा व्यापार शिवाजीचे आटोक्यांत येऊन, त्याच्या राज्याचें महत्त्व, सुबत्ता, शक्ति व कीर्ति हीं त्या व्यापारावर अवलंबून होतीं. शिवाय मुसलमानांचा पाडाव करण्याचें तें एक मुख्य साधन होतें. विजापुरची आदिलशाही व दिल्लीचे मोगल यांचा पाडाव करण्यास जी मेहनत शिवाजीस पडली, तिजहून किंबहुना ज्यास्तच काळजी जंजिऱ्याचे सीदीबद्दल शिवाजीस वाटत होती. इंग्रज, पोर्तुगीज, डच ह्या दर्यावर्दी लोकांवर व परदेशाहून दक्षिणेंत येणाऱ्या मुसलमानांवर दाब ठेवण्यासाठीं पश्चिम किनाऱ्याची त्यास अत्यंत जरूर वाटली. शिवाजीनें आदिलशहास तेव्हांच उडवून दिलें, आणि प्रत्यक्ष औरंगजेबास दहशत घातली, परंतु सीदीचा बंदोबस्त त्याचे हातून झाला नाहीं. शिवाजीच्या मनांतलें मोठें शल्य हा जंजिरा होतें. हा जंजिरा तो काबीज करूं शकला नाहीं. सीदीशीं लढत असतांच शिवाजीस मृत्यूनें गांठिलें. बापाचें अर्धें राहिलेलें काम तडीस नेण्याविषयीं संभाजीनेंही कांहीं कमी खटपट केली नाहीं. पुढें हें काम शाहू व त्याचा वीर्यशाली पेशवा बाजीराव यांनीं मनावर घेतलें; पण तेव्हांही तें पूर्ण तडीस गेलें नाहीं. नानाफडणिसानें जंजिऱ्यांत फूट पाडून बाळूमिया नांवाच्या इसमास आपल्या हाताशीं धरिलें आणि त्यास सुरतेनजीक लहानशी जहागीर दिली, तेंच हल्लींचें सचीन संस्थान होय. सन १८३४ त इंग्रजांचें सार्वभौमत्व जंजिऱ्यावर चालू झालें. सारांश, मराठे व सीदी यांचें युद्ध नेहमींच चालू होतें. उभयपक्षांनीं एकमेकांचा पिच्छा सोडिला नाहीं. दोघांनीं आपापल्यापरी लढण्याची अगदीं शिकस्त केली. शिवाजी व त्याचे मोठमोठे सरदार; संभाजी, शाहू व त्याचे पेशवे; आंगरे, धुळप व दुसरे नामांकित सरदार, आणि अगदीं अखेरीस नानाफडणिसासारखे मुत्सद्दी यांनीं सीदीचा पाडाव करण्यांत आपलें सर्व शौर्य व बुद्धिसामर्थ्य खर्च केलेलें आहे.

बाराव्या व तेराव्या शतकांत हा प्रांत देवगिरि येथील यादवांच्या ताब्यांत होता. पुढें कांहीं दिवसांनीं तो विजयनगरच्या राजांचे हस्तगत झाला. सन १४२९च्या सुमारास ब्राह्मणी सुलतानांनीं आपली सत्ता या प्रांतावर स्थापिली. पुढें तो अहंमदनगरच्या निजामशहाचे वांटणीस आल्यावर त्याच्या प्राप्तीसाठीं पोर्तुगीज, गुजराथचे सुलतान व निजामशहा यांजमध्यें झगडे सुरू

झाले. चौल येथें पोर्तुगीझ लोकांनी आपलें मुख्य ठाणें बसविलें. सन १६०० सालीं अकबर बादशहानें अहंमदनगरावर स्वारी केली, त्या वेळेस हा प्रांत मोगलांचे ताब्यांत गेला. परंतु तो पुढें मलिकंबरानें परत घेतला. शहाजहान बादशहानें अहंमदनगरचें राज्य बुडविल्यावर तो पुनः मोगलांस मिळाला, परंतु त्यांजकडून बंदोबस्त न होतां शहाजीनें आपल्या जहागिरींत राहून हा मुलूख हस्तगत केला. पुढें निजामशाहीपैकीं आदिलशहाच्या वांट्यास कांहीं भाग आला, त्यांत हा प्रांत आदिलशहाकडे गेला. आदिलशहानें या मुलखाचे दोन भाग केले, एक उत्तरेकडचा भिंवंडीपासून नागोठण्यापर्यंतचा, याचें मुख्य ठिकाण कल्याण. दुसरा दक्षिणेकडचा, नागोठण्यापासून सावित्री नदीपर्यंतचा. याचें मुख्य ठिकाण जंजिरा. दोहोंवरही मुसलमान अंमलदार नेमिलेले होते. पैकीं कल्याण प्रांत शिवाजीनें काबीज केला, त्याची हकीगत वर आली आहे.

जंजिरा हा शब्द जझीरा म्हणजे बेट, या आरबी शब्दाचा अपभ्रंश दिसतो. जंजिरा हें एक लहानसें बेट राजपुरी खाडीच्या मुखाशीं आहे. हें मजबूद किल्ल्यानें बांधून काढिलेलें आहे. राजपुरी खाडी फार लांब नाहीं, पण रुंद व खोल असल्यामुळें तींत आरमार राहण्याची सोय उत्तम आहे. एक मैल आंत दंडा व राजपुरी हीं दोन गांवें असून इतिहासांत दंडाराजपुरी असें एकच जोडनांव प्रसिद्ध आहे. निजामशाहींत तें व्यापारामुळें फार भरभराटीस आलें. आफ्रिकेच्या ईशान्य कोपऱ्यास हबाशिस म्ह० अबिसिनिया नामक देश असून तेथील लोकांस हबशी असें म्हणत. त्यांस सीदी असें नांव पडण्याचें कारण ते प्रथमत: सय्यदी (=सीदी) पंथाचे मुसलमान असावे. बहामनी राज्याचे दरबारांत परदेशी म्हणून जो पक्ष प्रमुख असे, त्यांत अशा परदेशाहून आलेल्या लोकांचा भरणा विशेष असे. ते आफ्रिकेंतून चौल, दाभोळ इत्यादि बंदरीं येऊन उतरत आणि तेथून बहामनी दरबारांत जात. एकदां दरबारांत आपला प्रवेश झाल्यावर ते आपल्या दुसऱ्या जातवाल्यांस आफ्रिकेंतून आणीत. असें होतां होतां त्यांचा भरणा मोठा झाला. आरंभीं यांपैकीं कित्येक गुलाम म्हणूनही इकडे आलेले होते. त्यांजकडे पुढें मोठमोठीं हुद्याचीं कामें आलीं. त्यांत विशेषत: खलाशी व शिपाई ह्या दोन प्रकारचीं कामें ते उत्कृष्ट करीत. प्रसिद्ध मलिकंबरही असाच इकडे आला. बहामनी राज्याचे विभाग होऊं

लागले, तेव्हां गोवें येथील ब्राह्मणी अंमलदाराजवळ सीदी याकुत नांवाचा आरमारावर एक सरदार होता. तो इतरांचें उदाहरण पाहून कोंकण प्रांत बळकावयाच्या उद्योगास लागला. निजामशाहीचा संस्थापक अहंमद निजाम-उल्-मुल्क यानें सन १४९० त दंडाराजपुरी व जंजिरा हीं ठिकाणें घेतलीं व याकुतखान सीदी यास तेथील बंदोबस्ताचें काम सांगितलें. तेव्हांपासून जंजिरा येथें हबशी सरदारचे हाताखालीं निजामशहाचें आरमार राहूं लागलें. जलमार्गानें परदेशांशीं चालणाऱ्या व्यापारावर देखरेख ठेवावी आणि मक्केस जाणाऱ्या यात्रेकरूंची ने-आण करावी, हीं दोन कामें ह्या आरमारानें करावयाचीं होतीं. स. १५७१ त खाडीच्या मुखाशीं असलेल्या ओसाड खडकावर हबशी सरदारांनीं मजबूद किल्ला बांधिला. सन १६२१त सीदी अंबर नांवाचा एक हबशी सरदार निजामशहाचे वतीनें जंजिरा येथील आरमारावर मुख्य झाला. तो तें काम पाहत असतां सन १६३६ त जंजिऱ्यासुद्धां कोंकण प्रांत विजापुरकरांकडे गेला, तेव्हां सीदी अंबर हा विजापुरचा ताबेदार झाला. आदिलशहानें जंजिऱ्याचे अधिकाऱ्यास 'वजीर' हा किताब दिला. अंबर सीदी सन १६४२ त मरण पावल्यावर त्याचा मुलगा सीदी यूसुफ हा जंजिऱ्याचा अधिकारी झाला. तो सन १६५५ त मरण पावला, तेव्हां फत्तेखान सीदीकडे तें काम आलें. या सर्व सीदी सरदारांत एक प्रकारची जूट असल्यामुळें, ते सहसा जिंकले गेले नाहींत.

पुढें शिवाजीनें आरमार तयार केलें आणि सन १६६१-६२ त जंजिरा काबीज करण्यासाठीं पेशवे शामराजपंत व बाजी घोलप ह्यांस रवाना केलें. त्या वेळीं सीदी खैर्यत व सीदी कासम हे दोन हबशी सरदार जंजिऱ्याचा बचाव करण्यास पुढें आले. शामराजपंताचा तळ राजपुरीस होता. सीदीबरोबर बोलणें करण्याच्या निमित्तानें शामराजपंत त्यांच्या भेटीस आपण होऊन किल्यांत गेला. तेथें खैर्यत खानानें त्यास कैद केलें. फौज मागें किनाऱ्यावर राहिल्यामुळें शामराजपंताचा कांहीं इलाज चालेना. तेव्हां आपण पुनः कधीं जंजिऱ्यावर येणार नाहीं, असें वचन देऊन त्यानें आपली सुटका करून घेतली; आणि फौज घेऊन तो परत निघून गेला. शिवाजीनें पुनरपि त्यास जंजिऱ्यावर जाण्यास सांगितलें. तेव्हां वचन दिलें असल्याकारणानें जंजिऱ्यावर जाण्याचें

त्यानें नाकबूल केलें. तेव्हां शामराजपंतावर शिवाजीची इतराजी होऊन त्यास घरीं बसावें लागलें.

**शामराजपंत** रांझेकर राहणार हिवरें हा शिवाजीचा पहिला पेशवा होय. शिवाजीचा राज्योपक्रम सन १६४५ च्या अगोदरच पूर्ण होऊन त्यानें छत्रपति नांव धारण केलें, तेव्हांच शामराजपतास पेशवाईपद दिलें असलें पाहिजे. शामराजपंताचे शिक्के सन १६६२ पर्यंत सांपडतात. ( पहा-खंड १५-२७४;२७५; ३३९; ४४० ). ह्या शिक्क्यांत 'महादेव मतिमंत प्रधान' असें शामराजपंतानें आपणांस म्हणविलें आहे. अर्थात् शामराजपंतानें शिवाजीची पेशवेगिरी १६६२ पर्यंत केली. त्यासालीं सीदीवरील स्वारींत त्याचा पराभव झाला, तेव्हां शिवाजीनें त्यास दूर करून मोरोपंत पिंगळे यास पेशवा केलें. शामराज पंताच्या हाताखालीं मुसें व मुठें खोरें यांतील पुष्कळ प्रभु देशपांडे काम करीत होते. त्यानें ह्या प्रभूंची उत्पन्नें धाक दपटशा दाखवून व छळ करून हस्तगत केलीं, ह्या कारणानरून तो लोकांस अप्रिय झाला होता; आणि शिवाजीकडेही त्याजबद्दल ऱ्याच कागाळ्या झाल्या असल्या पाहिजेत, असें त्या वेळच्या कागदपत्रांवरून दिसतें. पुढील कारकीर्दींत लोकांनीं आपलीं वतनें शामराजपंताच्या वंशजांकडून सोडवून घेतलीं. [ इ. संग्रह, जुन्या ऐतिहासिक गोष्टी १-७ ]. शामराजपंताचे वंशज हल्लीं भोर संस्थानांत आहेत.

पुढें जंजिरा काबीज करण्यास शिवाजीनें निळोपंत व रघुनाथपंत यांजबरोबर आरमार व फौज देऊन पाठविलें. आरमारावर दर्यासारंग, दौलतखान व मायाजी भाटकर हे आणखी अंमलदार होते. ह्या स्वारींत सीदींची व मराठ्यांची जंजिरा किल्ल्याचे सभोंवार निकराची लढाई होऊन मराठ्यांचा मोड झाला आणि ते वेढा उठवून परत आले. पुनः स. १६६१ च्या पावसाळ्यांत शिवाजीनें व्यंकाजीपंताबरोबर दुसरी फौज जंजिऱ्यावर पाठविली, आणि मागून मोरोपंत पिंगळे ह्यासही व्यंकाजीच्या मदतीस पाठविलें. दर्यासारंग व दौलतखान यांनीं नवीन उत्कृष्ट आरमार वाढवून जंजिऱ्यास वेढा घातला आणि लढाईचें काम निकरानें चालविलें. सीदी खैयंतही मोठ्या शिकस्तीनें लढत होता. हें रणकंदन असेंच कित्येक वर्षे थोडेंबहुत निकरानें चाललें. पुढें मीर्झाराजा जयसिंग ह्याच्या मध्यस्थीनें औरंगजेबाचा व शिवाजीचा

स. १६६५ त तह ठरला, त्यांत जंजिरा शिवाजीस द्यावा असें कलम होतें. पण सीदी खैर्यत व कासीमखान ह्यांनीं बादशहाकडे जाऊन खटपट केली, तेव्हां बादशहानें जंजिरा शिवाजीस देण्याचें मंजूर केलें नाहीं. स. १६६७ त सीदी फत्तेखान मरण पावला आणि सीदी खैर्यत जंजिऱ्याचा मुख्य झाला. त्यानें आणखी निकरानें मराठ्यांबरोबर युद्ध चालविलें. परंतु एकही पक्ष हार जाईना. स. १६६१ पासून सारखा नऊ वर्षें व्यंकाजीपंत राजपुरीस तळ देऊन होता. तेव्हां बाहेरची मदत आल्याशिवाय आपला निभाव लागत नाहीं अशी सीदींची खात्री होऊन त्यांनीं औरंगजेब बादशहामार्फत सुरतच्या मोगल आरमाराची मदत मागितली. ह्या आरमारावर सीदी संबूळ हा मुख्य होता. वास्तविक म्हटलें तर हा एक पर्यायानें हिंदुमुसलमनांचाच झगडा होता. सीदीवर आपला ताबा कायमचा बसविण्यासाठीं शिवाजीनें मोठें आरमार तयार केलें. लहान मोठीं चार पांचशें जहाजें बांधून, त्यांचें मुख्य ठिकाण कुलाबा हें केलें. तसेंच सुवर्णदुर्ग व विजयदुर्ग येथेंही कांहीं जहाजें ठेवून दिलीं. त्या सर्वांवर दर्यासारंग व मायनाक भंडारी हे दोन मुख्य सरदार नेमून त्यांचे हाताखालीं कोळी लोक व तोफासुद्धां सर्व सज्ज करून बंदोबस्त केला. ह्या आरमारामुळें पोर्तुगीझ लोकांवरही शिवाजीचा वचक बसला. त्यांनीं आपला वकील शिवाजीकडे पाठवून तह केला, कीं शिवाजीनें पोर्तुगीझ मुलखास उपद्रव करूं नये, आणि त्यांनीं तोफा, दारूगोळा वगैरे सामान शिवाजीस पुरवावें. आरमाराविषयीं जास्त माहिती पुढें देण्यांत येईल. ( पारसनीस कृत मराठ्यांचें आरमार ).

६. शहाजीमार्फत विजापुरकरांशी तह ( सन १६६२ ).—एकंदरींत विजापुरच्या या युद्धांत शिवाजीनें आदिलशाहीवर आपला शह पूर्णपणें बसविला. शिवाजी आपणास आटपत नाहींसें पाहून, त्याच्याशीं सामोपचारानें सख्य करावें, असें शहानें मनांत आणिलें. सावंत, दळवी, घोरपडे, सीदी वगैरे प्रमुख लोक शिवाजीचे ताब्यांत गेले. अफझलखान व सीदी जौहर यांच्यानें शिवाजीचें कांहीं न होतां, उलट विजापुरच्या फौजेची खराबी होऊन, शिवाजीची दहशत चांगली बसली. तिकडे कर्नाटकांतलें बंड वळावतच होतें. तेव्हां शिवाजीशीं तह तरी कसा होतो, याची आदिलशहास काळजी लागली. शहाजी कर्नाटकांत व शिवाजी महाराष्ट्रांत दोघेही अत्यंत

प्रबळ होते. त्यांच्या वाटेस जाणें किंवा त्यांस कबजांत आणणें आदिलशहास आतां शक्य नव्हतें. त्यांतल्या त्यांत शिवाजी वळला तर बापाच्या मार्फत वळेल असें जाणून विजापुर दरबारानें शहाजीस बोलावून आणून शिवाजीची समजूत घालण्यासाठीं पाठविलें. शहाजीचे मनांतही फार दिवसांपासून पुत्रास भेटावें असें होतें. अफझलखान व बाजी घोरपडे यांचा सूड घेतल्यानें शिवाजीच्या कर्तृत्वाबद्दल शहाजीच्या मनांत विशेष अभिमान उत्पन्न झाला होता. तेव्हां ' पुत्र माझ्या ताब्यांत नाहीं, तरी यत्न करून पाहतों ' असें सांगून शहाजी तंजावरास गेला. ' त्यांनीं आपल्याबरोबर आपलें दुसरें कुटुंब तुकाबाई आणि कनिष्ठ पुत्र व्यंकोजी राजे यांस बरोबर घेतलें. ते कूच दरकूच तुळजापुर येथें आले. तेथें कुलदेवतेचें दर्शन घेऊन भोसल्यांचें मूळ गांव जें सिंगणापुर तेथें गेले. तेथें शंभुमहादेवाचें दर्शन घेऊन ते पंढरपुरास आले. तेथें श्रीविठोबाचें दर्शन घेऊन ते शिवाजी महाराजांस भेटण्यासाठीं पुणें प्रांतीं येण्यास निघाले. शिवाजी महाराजांनीं आपल्या वडिलांची भेट जेजुरी येथें भेण्याचें ठरवून त्यांच्या स्वागताची उत्कृष्ट तयारी केली. ते कित्येक दिवसपर्यंत आपल्या वडिलांस सामोरे जाण्यासाठीं पायीं चालत गेले. नंतर त्यांनीं मोरोपंत पेशवे यांस पुढें पाठवून, भेटीचा मुहूर्त ठरवून जेजुरी येथें श्रीचे देवालयांत भेटीचा बेत योजिला. शहाजीराजे व शिवाजी महाराज ह्यांची पुष्कळ वर्षें भेट न झाल्यामुळें प्रथम त्यांची देवालयांत शास्त्रोक्त विधिपूर्वक भेट झाली. नंतर शहाजीराजांच्या चरणीं शिवाजी महाराजांनीं मस्तक ठेवून उभयतां पितापुत्र प्रेमपूर्वक भेटले. नंतर महाराजांनीं शहाजीराजे ह्यांस पालखींत बसवून व आपण स्वतः पालखीची तबकडी धरून पायीं चालत आपल्या डेऱ्यास गेले. ही शिवाजी महाराजांची अलौकिक पितृभक्ति पाहून सर्वांस अतिशय आश्चर्य व कौतुक वाटलें.

नंतर शिवाजीमहाराजांनीं वडिलांपुढें हात जोडून आपल्या सर्व अपराधांबद्दल त्यांची क्षमा मागितली. शिवाजी महाराजांचें अतिशय विनम्र भाषण ऐकून शहाजीराजे सद्गदित झाले व त्यांनीं महाराजांस पोटाशीं धरून त्यांची फार स्तुति केली व त्यांच्या कर्तृत्वाबद्दल व सद्गुणांबद्दल धन्योद्गार काढिले. शिवाजी महाराजांनीं सहा महिनेपर्यंत शहाजी राजांस आपणाजवळ ठेवून घेतलें; आणि त्यांचे अनेक रीतींनीं सत्कार करून

त्यांची मर्जी सुप्रसन्न करून सोडिली.' (इ. सं., जुन्या ऐतिहासिक गोष्टी भा. २ पा. ४४).

सर्व मंडळी पुण्यास आल्यावर तेथें महिना दोन महिने राहून शिवाजीनें राजगड, प्रतापगड रायगड वगैरे किल्ले बापास दाखविले. पुढें रामदास स्वामींचें दर्शन घेऊन मंडळी पन्हाळ्यास आली, आणि तेथून शिवाजीचा निरोप घेऊन, शहाजी परत विजापुरावरून तंजावराकडे गेला. विजापुरच्या दरबारानें शहाजीसच तह करण्यास पाठविलें, म्हणून दरबारास बराच फायदेशीर असा तह झाला. 'आम्ही जीवंत आहों तोंपर्यंत तुम्ही विजापुरकरांशीं झगडूं नये,' अशी बापानें शिवाजीस शपथ घातली. शिवाजीनें जिंकिलेला सर्व मुलूख त्याजकडेसच राहिला, आणि इत:पर त्यानें विजापुरचे मुलखास त्रास देऊं नये असें ठरलें.

येणेंप्रमाणें शिवाजीच्या चरित्रांतील हा तिसरा भाग समाप्त झाला. स. १६५२ त शिवाजीकडे जहागिरीशिवाय चाकणपासून निरेपर्यंतचा प्रदेश व पुरंदरपासून कल्याणपर्यंतचे सह्याद्रीवरील सर्व किल्ले इतका टापू होता. तो या पुढील दहा वर्षांत पुष्कळ वाढला. कल्याणपासून गोंव्यापर्यंत सर्व कोंकणपट्टी; व भिमेपासून वारणेपर्यंतचा देश मिळून दक्षिणोत्तर १६० मैल लांबीचा व पूर्वपश्चिम शंभर मैल रुंदीचा प्रांत त्याच्या ताब्यांत आला. पन्नास हजार पायदळ, सात हजार स्वार व शिवाय आरमार इतकी त्याची तयारी जमली. रायगड येथील मजबूद किल्ल्यांत राजधानीसारखी सर्व सोय करून शिवाजीनें आपल्या सर्व मुख्य कचेऱ्या तेथेंच आणविल्या. वाई, कऱ्हाड, कोल्हापुर इत्यादि ठाणीं शिवाजीचें हातीं आलीं. घोरपडे, दळवी, घाटगे वगैरे सरदारांस त्याचा वचक बसला. प्रांतांचे बंदोबस्ताकरितां जागजागीं, त्यानें नवीन किल्ले बांधिले. समुद्रकिनाऱ्यावरही मालवण, सुवर्णदुर्ग, विजयदुर्ग, रत्नागिरि, जंजिरा, खांदेरी, कुलाबा, इत्यादि ठाणीं किल्ले वगैरे बांधून त्यानें मजबूद केलीं, आणि एकमेकांची एकमेकांस मदत व्हावी अशी तजवीज केली. या किल्ल्यांचे आश्रयानें त्यानें आरमाराचीही व्यवस्था केली.' कल्याण तों तहत् बिदनूरपर्यंत कोंकण किल्ले सुद्धां राज्य महाराजांचें झालें. विजापुरची पादशहात फार करून त्यांनीं घेतली. राहिली तीही पादाक्रांत करूं अशी त्यास उमेद आली. अमीर आले तितके नामोहरम केले.'

या युद्धानें वर सांगितल्याप्रमाणें शिवाजीचे अनेक फायदे झाले, हें तर खरेंच, पण वस्तुत: या वेळेस त्यानें स्वराज्याची स्थापना संपूर्ण केली. विजापुरकरांशी युद्ध म्हणजे हिंदु व मुसलमान यांजमधील युद्ध नव्हे. अशा प्रकारचें स्वरूप त्या युद्धास येणें त्या वेळीं शक्य नव्हतें. शिवाजीची अगदीं प्रथमची अडचण निराळीच होती. विजापुरच्या ताबेदारींत मोठमोठीं सरदारघराणीं गुंतलेलीं होतीं. त्यांचे मनांत शिवाजीबद्दल अभिमान अगर पूज्यबुद्धि नव्हती, आणि ती असण्याचें कारणही नव्हतें. हे सर्व सरदार आदिलशाहीचे पिढीजाद नोकर असून, स्वतंत्र राज्यस्थापना त्यांस कितीही संमत असली तरी ते त्या कामीं पुढाकार घेण्यास समर्थ नव्हते. मावळे लोक शिवाजीला एकदम मिळाले, यांत त्यांनीं मोठासा स्वार्थत्याग केला नाहीं. शिवाजीचा प्रयत्न फसून ते राजद्रोही बनले असते, तरी त्यांचें नुकसान म्हणण्यासारखें झालें नसतें. परंतु सरदार लोकांची स्थिति पुष्कळ निराळी होती. आज आपण धन्यावर उठून शिवाजीसारख्या बंडखोरास सामील झालों तर, शिवाजीचा पाडाव झाल्यास, त्या सर्व घराण्यांची अत्यंत दुर्दशा झाली असती. त्यांचीं उत्पन्नें खालसा होऊन घरेंदारें लुटलीं जातीं; आणि त्यांची पिढीजाद चालत आलेलीं वतनें जाऊन ते भिकेस लागले असते. शिवाजीच्या बंडास कायदेशीर राज्याचें स्वरूप येईपर्यंत लोकांना त्याचा पक्ष स्वीकारितांना फार दूरवर विचार करावा लागे. म्हणून स्वजातीय सरदारांस आपल्या पक्षाची सत्यता व सामर्थ्य दाखविणें हें शिवाजीचें पहिलें काम होतें. मोहिते, घोरपडे, मोरे, सावंत, दळवी, सुर्वे, वगैरे सरदार आरंभापासून कमीजास्त प्रमाणानें शिवाजीच्या विरुद्ध होते. तेव्हां 'मी तुमचें संरक्षण करण्यास समर्थ व योग्य आहें,' अशा प्रकारचा वचक आपणांविषयीं स्वजातीयांमध्यें शिवाजीनें उत्पन्न केला, हा ह्या वरील युद्धाचा मुख्य परिणाम होय. ह्यावरून शिवाजीची कर्तबगारी व्यक्त होते. इतर सरदारांप्रमाणेंच शिवाजीही आदिलशहाचा अंकित होता. पण एकदां मनाची खात्री झाल्यावर अत्यंत साहस करून तो उघडपणें बंडखोर बनला; आणि लवकरच स्वतंत्र राज्य स्थापून त्यानें आपला बंडखोरपणा नाहींसा केला. हा प्रकार त्यानें किती खुबीनें व चातुर्यानें पार पाडिला, ही गोष्ट वरील हकीकतींत व्यक्त होते.

**७. शहाजीचें उत्तरचरित्र व मृत्यु (सन १६६४).**–शिवाजी सुरतच्या स्वारीहून परत आल्यावर, शहाजी राजे कर्नाटकांत अकस्मात् घोड्यावरून पडून मृत्यु पावल्याचें वर्तमान शिवाजीस कळलें. तें ऐकून त्यास व त्याच्या आईस अनिवार दुःख झालें. आजपर्यंत बापाच्या आड लपून अनेक गोष्टी करण्यास शिवाजीस सवड होती. यापुढें प्रत्येक गोष्टीची जबाबदारी केवळ त्याजवर आली. शहाजीच्या मृत्यूनें शिवाजीच्या कार्यक्रमांत एक दोन ध्यानांत ठेवण्याजोगे फरक घडले. आजपर्यंत राज्याच्या अनेक उलाढाली त्याच हातून घडल्या, तरी बाप जिवंत होता तोंपर्यंत त्यास दुखविण्याचें कृत्य त्यानें कोणतेंही केलें नाहीं. परंतु ह्यापूर्वीच मोगलांशीं उघड युद्ध करून त्यांत जय मिळाल्यामुळें त्यानें आपल्या नांवचीं नाणीं पाडण्यास सुरुवात केली, आणि स्वराज्याचीं चिन्हें उघडपणें धारण केलीं.

विजापुरकरांची नोकरी धरीपर्यंत शहाजीचें चरित्र पूर्वीं आलें आहे. तदनंतर त्याची कैद, शिवाजीनें त्यास सोडविण्यास केलेली युक्ति व विजापुरकरांचे मार्फतानें शहाजीनें शिवाजीस भेटून केलेला तह, हे विषय प्रसंगानुसार वर येऊन गेलेच आहेत. आतां शहाजीचे कर्नाटकांतील पराक्रम व त्याची योग्यता यांजविषयीं थोडें विवेचन करावयाचें आहे.

सन १६३८ पासून स. १६४७ पर्यंतच्या दहा वर्षांत शहाजीनें कर्नाटकांत आदिलशाहीची सत्ता स्थापन करून तेथें नवीन महाराष्ट्रीय राज्यपद्धति सुरू केली. प्रथम त्यानें बंगळूर हें राहण्याचें मुख्य ठिकाण करून आजूबाजूच्या पाळेगारांस जिंकिलें. पुढें कोलार प्रांत जिंकून तेथें थोरला मुलगा संभाजी यास ठेविलें. संभाजीनंतर त्याचा मुलगा सुरतसिंग कोलार येथें राहत असे. त्या वेळीं तंजावरास रघुनाथ नायक, जिंजीस व्यंकट नायक आणि त्रिचनापल्लीस त्रिमल नायक हे राज्य करीत असून त्यांजमध्यें आपसांत झगडे चालू होते. ह्या झगड्यांचा फायदा घेऊन शहाजीनें ते प्रांत हस्तगत केले. स. १६४९त मुस्तफाखानानें जिंजी प्रांत जिंकून विजापुरास जोडिला. स. १६५२त विजापुरच्या कैदेतून सुटल्यावर शहाजी पुनः कर्नाटकांत गेला; तेथें पुढील दहा वर्षांत त्यानें सर्व प्रांताची राज्यव्यवस्था बांधून दिली. सर्व मुलखाची विभागणी करून संमत, तर्फ, मौजे, मजरे, असे त्याचे पोटभाग करून त्यांजवर वेगवेगळे अंमलदार नेमिले.

ह्या अंमलदारांस देशमुख, देशपांडे, कुळकर्णी, नाडगौड, कानगो अशा संज्ञा होत्या. हिशेब करण्यासाठीं शिरस्तेदार नेमिले, आणि सर्व कागद मराठींत लिहिण्याचा प्रघात घातला. तंजावर प्रांत कोणत्या सालीं जिंकिला, तें निश्चित नाहीं. शहाजीनें जरी तो प्रांत जिंकिला होता, तरी स. १६७५ पर्यंत त्या प्रांताचा संपूर्ण ताबा व्यंकोजीस मिळाला नव्हता. स. १६७५ त व्यंकोजीनें तंजावरच्या नायक राजास अजीबात नाहींसें केलें आणि तेथील चोलमंडलाधिपतीचें प्राचीन सिंहासन हस्तगत केलें. (इ.सं., तंजावरचें घराणें).

विजापुरकरांची नोकरी शहाजीनें उत्तम प्रकारें बजाविली, म्हणून त्या दरबारीं त्याचा बडेजाव विशेष होता. मुरार जगदेव, रणदुल्लाखान, सर्जाखान, वगैरे उमरावांचें शहाजीस पाठबळ होतें. आरंभींच कर्नाटक प्रांताच्या बंदोबस्ताचें काम शहाजीस सांगण्यांत आलें होतें. राय रावल नामक एक हिंदु राजा कर्नाटकांत प्रबळ होता. त्याजबरोबर शहाजीनें दोन मोठ्या निकराच्या लढाया मारिल्या. त्या युद्धाचा परिणाम असा झाला कीं, कोलार, बंगलूर, उसकोटा, बाळापुर आणि शिरें हे प्रांत जिंकिले गेले, ते शहाजीसच जहागिरीदाखल देण्यांत आले. पुढें लष्कर व रतनपूर, देवगड, राजदुर्ग, वगैरे परगणे शहाजीस प्राप्त झाले. अप्पाखान नामक सरदाराकडे कनकगिरि होती, ती तो शहाजीस देईना त्या खटपटींत शहाजीचा थोरला मुलगा संभाजी पडला. पुढें शहाजीनें अप्पाखानाचा पुरा सूड उगवून, कनकगिरि काबीज केली. विजयराघव म्हणून तंजावरचा अधिकारी होता, त्याचें व त्रिचनापल्लीकर अंमलदारांचें वांकडें होतें. तें पाहून त्रिचनापल्लीकरांच्या साह्यानें विजयराघवाचा नाश करून तंजावरचें ठाणें शहाजीनें घेतलें.* 'जागा चांगली पाहून अंतःकरणांत

---

* तंजावर प्रांत शहाजीनें कधीं व कसा जिंकिला, ह्याजबद्दल पुष्कळ मतभेद आहे. ऑर्मनें चर्चा करून असें ठरविलें आहे, कीं तो व्यंकोजीनें सन १६८० च्या सुमारास जिंकिला. ईस्ट इंडिया कंपनीचा एक इतिहासकार आहे, तो म्हणतो कीं सन १६९६ त तंजावर प्रांत मराठ्यांनीं जिंकिला. परंतु स्कॉट वेरिंगनें ह्या सर्वांचे म्हणणें जमेस धरून व चर्चा करून असें ठरविलें आहे, कीं तंजावर प्रांत स्वतः शहाजीनें जिंकिला. तंजावरचा जमीनदार पंची रंगू व मुद्रलचा पाळेगार जंजाप्पा नाईक यांचा कलह लागून, जंजाप्पानें शहाजीस आपल्या मदतीस बोलाविलें. पुढें लढाई होऊन पंची

आपले राहण्यायोग्य आहे असें सर्वानुमतें प्रशस्त करून, तुकाबाई व व्यंकोजी व व्यंकोजीची बायको दीपाबाई यांस तेथें ठेविलें, व ती आपली राहण्याची जागा केली.' पुढें लगेच त्रिचनापल्लीचें ठाणेंही शहाजीनें काबीज केलें.

सन १६६२ पासून १६६४ पर्यंत बेदनूरचे पाळेगार भद्राप्पा नाईक व शिवाप्पा नाईक यांजबरोबर शहाजी लढत होता. हा भद्राप्पा नाईक धनाढ्य असून, विजापुरच्या मुलखास उपद्रव देऊं लागल्यामुळें आदिलशहानें बेदनूरकरावर फौज पाठविली. तिजवर शहाजी भोसले व सर्जाखान हे सरदार मुख्य होते. बेदनूरकरही तयार होऊन लढाईस आला; परंतु शहाजीचा सरंजाम फार मोठा होता, त्यापुढें हतवीर्य होऊन नाईक शहाजीस शरण आला. तेव्हां विजापुरकरांचे प्रांत बेदनूरकडे आले होते, ते सोडवून नाईक याचे उपजीविकेपुरते त्याजकडे ठेविले; आणि बाकीचे सर्व खालसा करून शहाजीनें आपल्या ताब्यांत घेतले. 'हें वृत्त विजापुरीं कळल्यावर, आदिलशहा बहुत संतोषी होऊन, मोठे मरातबांनीं पत्र, वस्त्रें, भूषणें, अलंकार, हत्ती, घोडेसुद्धां पाठवून, सर्व अमीर उमराव यांनीं तारीफ करून आपापली हकीगत स्नेहवादाची लिहून, गौरव केला. फत्ते झाल्यामुळें तेथून कूच करून दुसरीं ठाणीं बखेडेदार होतीं, त्यांचा बंदोबस्त करावा, म्हणून तुंगभद्रातीरीं बेदिकेरें उर्फ बसवपट्टण* येथें आले. तेथें अनेक श्वापदें उत्पन्न झालीं. राजांस शिकार करावयाची इच्छा होऊन, घोड्यावर स्वार होऊन हरणाचे पाठीस लागले. ईश्वरेच्छा, त्या योगें घोड्याचा पाय भंडोळींत अडकून, घोडा व राजे एकावच्छेदें पडले, ते गतप्राण झाले, ( सन १६६४ ). मागाहून लोक, माणसें आलीं. त्यांनीं व्यंकोजी राजांस तेथें आणविलें. व्यंकोजी राजे यांनीं

---

रंगू मारला गेला, व तंजावराबद्दल कलह लागून, शहाजीनें जंजाप्पास ठार मारिलें आणि स्वतः तंजावर व व मुद्रल हे दोनही प्रांत काबीज केले. ही गोष्ट शहाजीनें विजापुरचे दरबारीं कळवून तिकडून ह्या नवीन जिंकिलेल्या प्रदेशाबद्दल संमति आणविली; आणि ते प्रांत आपला मुलगा व्यंकोजी ह्याचे नांवानें करून घेतले. ही गोष्ट शहाजीचे मरणापूर्वी अर्थात् १६६४ चे पूर्वी घडून आली.

* बसवपट्टण म्हैसूर हद्दींत हरिहरच्या दक्षिणेस सुमारें ४० मैलांवर आहे.

उत्तराक्रिया सांग केली. आदिलशहाकडून दुखवटा येऊन मनसबदारीचीं वस्त्रें व्यंकोजीचे नांवें झालीं. शिवाजीस वृत्त कळून जिजाबाई सुद्धां शोकसमुद्रीं पडून बहुत विलाप केला. शहाजी राजे तुंगभद्रातीरीं वारले, त्या जाग्यास छत्री इमारत मजबूद करविली; आणि पादशाही सनद घेऊन वेदिकेरें गांव तेथील खर्चास लावून दिला. तो गांव छत्रीकडे अद्याप चालत आहे,' आणि तेथील वृंदावन शिवाजीची पितृभक्ति यथायोग्य व्यक्त करीत आहे. शिवाजीनें समुद्रांतून दक्षिणेस पुढें लवकरच सफर केली, तींत बेदनूरकर शिवाप्पा नाईक यास शरण आणवून त्याजशीं तह केला. तीन लक्ष होन दरसाल खंडणी घेण्याचें ठरवून व अपार संपत्ति घेऊन शिवाजी परत आला. येणेंप्रमाणें शहाजीचा चरित्रक्रम समाप्त झाला. मरणसमयीं त्याचें वय ७० वर्षांचें होतें.

शहाजीची योग्यता येथपर्यंतच्या हकीकतीवरून सहज कळून येईल. त्याचा पुत्र शिवाजी हा तर स्वतःच राज्यकर्ता झाला; परंतु शहाजी हा त्याचे खालोखालचा राज्याची घडामोड करणारा, हातांत धरीन त्यास राज्यपद देईन,-अशा हिंमतीचा बाणेदार सरदार होता. शौर्य, उत्साह, धाडस हे गुण त्याच्या अंगीं होतेच, तथापि त्याचा विशेष गुण म्हटला म्हणजे धन्याची नोकरी एकनिष्ठपणें बजावणें हा होय. निजामशहाची नोकरी करितांना त्याजवर अनेक संकटें आलीं, पण त्यांस न जुमानतां त्यानें तेथची तड पोंचविली. पुढें विजापुरची नोकरी धरल्यावर सुद्धां त्याच्या चित्तास स्वस्थपणा प्राप्त झाला नाहीं. त्याजवर अनेक संकटें आलीं, व अनेक भानगडी उत्पन्न झाल्या. पुत्रास सामील आहे, अशा सबबीवर त्यास कैदेंत पडावें लागलें. तथापि सर्व संकटांपासून मुक्तता होऊन त्याच्या एकनिष्ठपणाविषयीं दरबाराची खात्री झाली. आदिलशाहीची सत्ता कर्नाटक प्रांतावर बसविण्यास यापूर्वी पुष्कळांनीं खटपट केली, पण तें काम अखेरीस शहाजीनेंच तडीस नेलें. कनकगिरि, तंजावर व बेदनूर येथील त्याचे पराक्रम स्मरणीय आहेत. ह्या त्याच्या पराक्रमांची तपशील-वार हकीकत उपलब्ध नाहीं, आणि मुलाच्या वाढत्या कीर्तीपुढें त्याची कर्तबगारी अखेरीस थोडीशी लोपून गेली. नाहीं तर निजामशाही सोडल्या-पासून पुढील पंचवीस वर्षे पाहिल्या इतकींच पराक्रमाचीं झालीं, असें दिसून येतें. त्याजला मुसलमान सरदारांचें पाठबळ असून, त्याच्या स्वामिभक्ती-

बद्दल सर्वांची खात्री होती, म्हणून त्याचे हातून मोठमोठीं कामें शेवटास गेलीं. मुसलमान इतिहासकारांनीं शहाजीविषयीं असे उद्गार काढिले आहेत. ' शिवाजीचा बाप शहाजी हा बंडखोर, फंदफितुरी व संकटें उभीं करणारा होता. परंतु तोही अलीकडे धन्याचें खाल्लेलें मीठ स्मरून इमानानें व नम्रतेनें वागूं लागला. यामुळें शहाजीनें आपले राहिलेले आयुष्याचे दिवस धन्यास ओळखून सुरक्षितपणें घालविले. ' एकंदरीत शहाजीचें विजापुरकरांवर अत्यंत प्रेम होतें. त्यानें शिवाजीचा विजापुरकराशीं तह जुळविला, तेव्हां ' मी जिवंत असेंपर्यंत तरी विजापुरावर उठूं नको, ' असें शहाजीनें पुत्राजवळ मागणें मागितलें होतें. शिवाजीच्या आडदांड कृत्यांबद्दल आरंभीं शहाजीस वाईट वाटत असे, तरी शिवाजीची खरी कर्तबगारी ओळखिल्यावर त्याजविषयीं शहाजीचे मनांत पूज्यबुद्धि उत्पन्न झालीच होती. शहाजीची व शिवाजीची भेट झाली, त्या वेळीं आपले पश्चात् व्यंकोजीचें पालन करण्याविषयीं शहाजीनें शिवाजीस सांगितलें असावें. कारण तंजावरीं ' परत गेल्यावर व्यंकोजीस बोलावून त्यानें आज्ञा केली, कीं शिवाजीनें जवांमर्दीनें नवें राज्य मेळविलें आहे. तुम्ही आमची दौलत संपादिली आहे, यांत विठोजी राजे आमचे काका, यांचे कुटुंबाचें व शरीफजी राजे आमचे भाऊ यांचे वंशाचें तुम्ही वडीलपणें चालवावें, आणि प्रजापालन करून राज्य करावें. वडील शिवाजी राजे यांनीं सर्वांचें संगोपन करून चालवावें, तरी त्यांनी पृथ्वी आक्रमण करण्याचा इरादा धरिला; तेव्हां ईश्वरकृपेंकरून त्यांचे मनोरथ परिपूर्ण झाले असतां, सर्वांचें संगोपन करावयास अधिकारीच आहेत, करतील; कदाचित् त्यांजवरी समय गुदरला, तरी आम्ही पादशहापासून इतला तोडून दौलतीचा बचाव करून घेतला आहे. ही दौलत तुम्हां उभयतांची; परंतु दौलत रक्षावयाकरितां तुम्ही वडीलपणें सांभाळ करावा. मुख्यार्थ आमचे कुळीं आम्ही, आमचे कुटुंबांत शिवाजी राजे ज्येष्ठ, त्यांचे ठायीं तुम्हीं. त्यास राजधर्मप्रवाहें तुम्ही वडीलपणें कुटुंबीयांचा सांभाळ करणें. पराक्रमी शिवाजी राजांचे तुम्ही भाऊ, आमचे चिरंजीव; त्यांहून आवडते विशेष आहां; तरी सर्वांपासून चांगलें म्हणून घ्याल, पदरीं वडिलोपार्जित दोनचार माणसें आहेत, त्यांचे विचारें तुम्ही चालल्यास तुमचें कल्याण आहे. (शिवदिग्विजय पृ. २०४-२०५.) असा

शहाजीनें व्यंकोजीस केलेला उपदेश ध्यानांत ठेवण्याजोगा असून त्याचें पुढें काम पडणार आहे.

मुत्सद्दीपणांत शहाजी भोसले फार नामांकित होता. एवढेंच नव्हे, तर सतराव्या शतकाच्या प्रथमार्धांत राज्याचा कारभार हाकणारे शहाजीच्या तोडीचे पुरुष फारसे नव्हते. यास प्रमाण साबाजी अनंत अगर चतुर साबाजी म्हणून जो त्याचे वेळीं नांवाजलेला पुरुष होता, त्याची व शहाजीची स्पर्धा पुष्कळ दिवस चालू असून शहाजीनें चतुर साबाजीस मागें टाकिलें होतें असें दिसतें. कित्येक बखरींमध्यें असें लिहिलें आहे कीं, निजामशाहीच्या अखेरीस राज्यांत दोन पक्ष झाले. एका पक्षास जाधवराव, फत्तेखान, मलिकंबर व चतुर साबाजी ही मंडळी असून दुसऱ्या पक्षास शहाजी होता. निजामशहानें वरील चारही मंडळींस बाजूस सारून शहाजीच्या हातीं सर्व कारभार दिला. त्याजबद्दल साबाजीस विषाद वाटून त्यानें मोगलांकडे संधान बांधून त्यांचे पदरीं जाधवरावास ठेविलें आणि मोगलांच्या मदतीनें शहाजीचा पाडाव केला. ह्या भानगडी चालू असतांच साबाजी मरण पावला, असा उल्लेख आहे. कित्येक बखरींमध्यें असा उल्लेख आहे कीं, चतुर साबाजी हा आदिलशाहींतील प्रसिद्ध मुत्सद्दी मुरार जगदेव ह्याच्या तालमेंत तयार झालेला होता. ज्या वेळेस निजामशाहीमध्यें कोणी कर्तबगार मुत्सद्दी उरला नाहीं, तेव्हां साबाजीस निजाम सरकारानें विजापुरकरांकडून विशेष आर्जव करून मागून घेतलें. त्याच्या कर्तबगारीबद्दल बखरींतून खालीं लिहिल्याप्रमाणें उल्लेख आढळतो. ‘साबाजी अनंत कारभारी बहुत चतुर, गुणज्ञ, सर्वकलानिपुण, विद्वान्, सव्यापसव्यांत लिहिणार, धुरंधर, कोणत्याही गोष्टींत उणें नाहीं, असे दक्ष होते. त्यांनीं संपूर्ण दक्षिण प्रांत, हजरतीची अंमल, तितक्याची नजर पाहणी केली. ते समयीं बिघोटीची काठी सात हात, पांच हात, त्याजवरील दस्त काय, हक्कदाराचा अंमल किती, सरकारी कानू कायदे काय, रयतेस सूट कशी असावी, अर्जबाब कशी द्यावी, व्यापारी उदमी यांनीं सरकारी भरणा कोणता करावा, त्याची बरदास्त कोणती ठेवावी, इत्यादि धारे बांधून, वसाहत पाडित रानाची लागणां करून दिली, याजमुळें त्यांसच चतुर साबाजी म्हणत होते. त्यांचा मरातब पादशहाजवळ फारच फार; केवळ विश्वासांतील वागणार.’ साबाजीपंतांनीं कारभाराचा आटोप दौलतीचा

केला. साबाजीपंत मर्द, शहाणे, नेकदार, रयतेचा वगैरे बंदोबस्त उत्तम प्रकारें ठेविला. ' साबाजीपंतीं लावणीचे धारे व जमीनमोजणी वगैरे शिरस्ते केले. अद्यापि प्रसिद्ध वागतात. रयतेवरी जुलूम न कारितां राजी राखून दोन रुपये घ्यावे. नापीक जाले तरी सोडावे. कोणास बैल अगर पोटास नसेल, तर त्याचा बंदोबस्त करून द्यावा. अशा रीतीनें आबादी अमरपुरीप्रमाणें उघड मार्गें सावकारी व्यापार करावा. वस्त्रें, भूषणें, अलंकार ग्रहण करावे, बेपडदा शहरांत व मार्गांत फिरावें; सुतळीचा तोडा गमाविला तरी ज्यास सांपडेल, त्यांनीं ज्या हद्दींत असेल तेथील जमीनदाराचे हवालीं करावा. ज्याचा जो विषय गेला, तो शोधीत असतां, त्याजला द्यावा. अभिलाष करूं नये. वर्ष सहा महिने जाले, न आला, तरी सरकारांत दाखल करावा. यांत तफावत कोणीं केल्यास त्याचें पारिपत्य करावें. याप्रमाणें नियम साबाजीपंतीं अंमलांत आणिले.' (शिवप्रताप पृ. २८.) हा चतुर साबाजी शहाजीचे वेळचा असून तो मुरार जगदेव व मलिकंबर यांचे तालमेंत तयार झालेला होता, व त्याचें अनुकरण शहाजीनें केलें; आणि शहाजीच्या अनुषंगानें दादाजी कोंडदेव व शिवाजी ह्यांजला ह्या मुत्सद्देगिरीचा पुढें चांगला उपयोग झाला. सारांश, शहाजी राज्यकारभांत निपुण व युद्धकलेंत शूर असा पुरुष होता. मराठमंडळीस राज्यकारभार समजत नाहीं असें विधान करणारांनीं शहाजीचें उदाहरण पाहवें.

लोकाभिमान व शौर्य वगैरे जे गुण पुढें शिवाजीच्या अंगीं पल्लवित झाले, ते शहाजीमध्यें अंकुरावस्थेंत होते; आणि निजामशाहीच्या तर्फे झगडतांना त्यांचा प्रादुर्भाव झालेला होता. मुसलमानी राजघराण्यांवर शहाजीची भक्ति मूळपासूनच विशेष होती. त्याचें स्वतःचें नांव व भावाचें नांव शरीफजी हीं पिरावरून ठेविलेलीं होतीं. सन १६५६ त आदिलशहा मरण पावला, त्या वेळेस मुसलमानांचे अशौचविधि शहाजीनें मनापासून पाळिले. तो मोकळ्या मनाचा, निष्कपटी व शूर पुरुषाप्रमाणें कित्येक वेळां प्रसंग पाहून वागण्यांत अकुशल असा होता. ह्या गोष्टींत शिवाजी बापाच्या उलट दिसतो. शिवाजी धूर्त, होतां होईतों समोरासमोर लढण्याचा प्रसंग न आणितां कार्यभाग उरकून घेणारा होता. शिवाजी मधुर परंतु मित भाषण करणारा असून शत्रूचेंही मन तेव्हांच गार करून सोडी.

ती विद्या शहाजीस माहीत नव्हती. सारांश, शिवाजीसारख्या पराक्रमी पुत्रास शोभणारा बाप शहाजी होता, यांत संशय नाहीं.

निजामशाहींत शहाजीचें खरें कर्तृत्व इ. स. १६३३ च्या पुढें दिसून आलें. निजामशाही मोगलांच्या हातांत स. १६३३ त पडली असतां, चार वर्षेपर्यंत शहाजीनें मोगलांस जुमानलें नाही. इ. स. १६०० मध्यें अकबर बादशहानें निजामशाही जिंकून विजयोत्सव केला, पण तो व्यर्थ होता हें जसें मलिकंबरानें दाखविलें, तसेंच सन १६३३ त शहाजीनें शहाजहान बादशहासही दाखविलें. पण सन १६०० तील निजामशाहीची शक्ति व सन १६३३ तील शक्ति ह्यांत महदंतर असल्यामुळें शहाजीस यश आलें नाहीं. तथापि शहाजीची योग्यता मोगल बादशहा जाणून होता, म्हणूनच शहाजीच्या वाटेस तो पुढें गेला नाहीं. सारांश मलिकंबराप्रमाणेंच शहाजीचा लौकिक त्या वेळीं चहूंकडे झाला होता. आदिलशहास त्याचा गौरव व दरारा दोनही वाटत होते. गौरव वाटत असल्यामुळें शहाजीच्या शक्तीचा आदिलशहानें आपल्या कामाकडे उपयोग करून घेतला, व कर्नाटकांतील बंडाळी मोडिली. दरारा वाटत असल्यामुळें, त्यास त्यानें स्वतंत्र राहूं दिलें नाहीं. कारण शहाजी स्वतंत्र राहता, तर जें काम पुढें शिवाजीनें केलें, त्याचा उपक्रम शहाजीच्याच हातून उघडपणें झाला असता. स्वत: आदिलशहापेक्षां त्याचे सल्लागार रणदुल्लाखान व मुरारपंत यांच्या मनांत शहाजीविषयीं विशेष पूज्य बुद्धि वागत होती. सन १६३७ पासून मरणकाळपर्यंतचा शहाजीच्या कृत्यांचा खरा इतिहास अजून उपलब्ध झालेला नाहीं. शहाजीचें सामर्थ्य शहाजहानच्या मानानें फारच अल्प होतें, आदिलशहाच्या मानानेंही फारसें बरोबरीचें नव्हतें. तरी ह्या बादशहांना दक्षिणेंतील व्यवस्था लावितांना शहाजीचा विचार करावा लागे, हें तत्कालीन इतिहासावरून स्पष्ट आहे. त्याच्याजवळ वीस पंचवीस हजार सैन्य असल्यामुळें दोघांनाही त्याची भीति वाटत होती. सन १६३७ च्या पुढें शहाजीनें मनांत आणिलें असतें व आदिलशहानें त्याला आश्रय दिला नसता, तर आदिलशाहींतील कांहीं प्रांत बळकावून बसण्याचें सामर्थ्य त्याच्या अंगीं नव्हतें असें नाहीं. परंतु शहाजीचा स्वभाव एकदेशीय व उतावळा नसून अव्यवस्थित पुंडपणा करण्यापेक्षां कोणत्याही पादशहाची व्यवस्थित मनसबदारी करणें व अब्रूनें राहणें त्याला पसंत पडलें. जेथें जेथें तो जाई, तेथें

तेथें त्याचें वजन अतोनात वाढे व त्याजविषयीं इतर सरदारांच्या मनांत मत्सर उत्पन्न होई. शिवाजीच्या उदयासंबंधीं विचार करितांना शहाजीच्या ह्या उच्च स्थितीचाही अंदाज करून घेणें अगत्याचें आहे.' (राजवाडे, खं. ४ ). सारांश, महाराष्ट्र देशांत स्वतंत्र राज्यस्थापना करण्याचें काम जरी शिवाजीच्या हातून तडीस गेलें, तरी त्या कामाची शक्यता व तयारी ही शहाजीच्या हातूनच घडली होती. प्रत्यक्ष शहाजीला स्वातंत्र्य नको होतें असें नाहीं. स्वतंत्र होणें देशकार्यासाठीं जरूर आहे, प्रयत्न केल्यास तें साध्य आहे व तें तडीस नेण्याची शक्ति आपणांस आहे; हे सिद्धांत शहाजीच्याच मनानें टरविलेले असून, त्याजपासूनच ते शिवाजीनें उचलिले. मात्र ते सिद्धांत स्वत: अमलांत आणण्याची प्रत्यक्ष खटपट शहाजीनें आपण होऊन केली नाहीं. मुसलमानी अंमलाखालीं तो वाढला असल्यामुळें, उघडपणें बंड करणें त्यास योग्य वाटलें नाहीं. कदाचित् तसें त्यानें केलें असतें तर इच्छित कार्य तडीस गेलें नसतें. एकदम बंडखोर म्हणून आदिलशहाशीं उघड युद्ध करण्यांत स्वशक्तीचा व्यय त्यास करावा लागला असता. परंतु शिवाजीच्या कृत्यांस त्याची आंतून संमति असली पाहिजे असें वाटतें. स्वत:चीं धोरणें जाणणारी कित्येक योग्य मंडळी त्यानें शिवाजीच्या मदतीस दिली. दहा वर्षेपर्यंत शिवाजी जे उद्योग करीत होता ते शहाजीस समजले, आणि त्याची त्यांस संमति नसती तर मुलाचा बंदोबस्त करण्याचे कांहीं तरी प्रयत्न त्यानें केले असते. कैदेंत पडल्यावरही आपल्या सुटकेकरितां त्यानें शिवाजीस त्याचे उद्योग बंद करण्यास सांगितलें नाहीं. कर्नाटकांत तर त्यानें उघड उघड स्वातंत्र्य धारण केलें होतें. तेव्हां शिवाजीनें महाराष्ट्रांत व व्यंकोजीनें कर्नाटकांत स्वतंत्र राज्य करून नांवलौकिक मिळवावा, अशी त्याची इच्छा असली पाहिजे. मात्र मुसलमानशाही बुडून नर्मदेपासून कन्याकुमारीपर्यंत मराठ्यांचें एकछत्री स्वतंत्र राज्य स्थापन व्हावें, इतकी शिवाजीची धांव शहाजीचे मनांत नव्हती. ह्यास पूर्वपरंपरा व वयोमान हेंही कारण आहे. ज्या गोष्टी करण्यास शहाजी कचरे, त्या पुष्कळदां शिवाजीनें बेलाशक तडीस नेल्या; परंतु मराठ्यांचें मर्यादित राज्य उत्पन्न होऊन आपल्या लोकांचें व आपल्या कुलाचें आजपर्यंतचें नष्टचर्य संपून भाग्योदय व्हावा, अशी मर्यादित महत्त्वाकांक्षा शहाजीची असावी, ह्यांत संदेह दिसत नाहीं. ह्याच महत्त्वाकांक्षेस

शिवाजीनें साकार व साक्षात् राष्ट्रीय स्वरूप आणून दिलें. म्हणून शिवाजीला जर आपण मराठशाहीचा संस्थापक म्हटलें, तर शहाजीला मराठशाहीचा 'संकल्पक' असें पद देण्यास हरकत नाहीं. शहाजीची खरी योग्यता व कर्तबगारी अद्यापि बाहेर आलेली नाहीं. मात्र शिवाजीप्रमाणेंच शहाजीही राज्यनिर्माणकर्ता व महाराष्ट्रस्वातंत्र्याचा उत्पादक होता, हें कबूल केलें पाहिजे.

---

## प्रकरण आठवें.

## शिवाजी–औरंगजेबांचा अद्भुत सामना.

१. पूर्वप्रकोप. २. शाएस्तेखानाची दुर्दशा.
३. जयसिंगाची शिवाजीवर रवानगी. ४. मुरारबाजीचा पराक्रम.
५. जयसिंगाशीं शिवाजीची भेट. ६. आग्र्यास प्रयाण व कैद.
७. पुरंदरचा तह मंजूर(स.१६६८). ८. पुनः युद्धास सुरुवात.
९. तानाजी मालुसरे व सिंहगड. १०. सुरतस्वारी, चांदवड, साल्हेर.
११. युद्धाचा निष्कर्ष.

१. पूर्वप्रकोप.—औरंगजेब व शिवाजी ह्या दोन व्यक्तींचा खेळ उत्तरोउत्तर रंगत चालला. सन १६५८ च्या जुलईंत औरंगजेबास दिल्लीचें तख्त प्राप्त झालें. हळूहळू त्यानें आपल्या भावांची वाट लाविली. फौजेंतील मोठमोठे सरदारही त्यास अनुकूळ होते असें नाहीं. स. १६५९ च्या मे महिन्यांत दिल्ली येथें त्यानें यथाविधि राज्यारोहण केलें. शहाजहान जिवंत असेपर्यंत त्यास आग्र्यास जाण्याची छाती झाली नाहीं. संशयपिशाचानें त्यास इतकें ग्रासिलें होतें, कीं सर्वलोक त्यास शत्रूसमान वाटत. शहाजहान विशेष लोकप्रिय होता, म्हणून कैदेंतून सुटून तो पुनः राज्याधिकार हातीं घेईल अशी भीति औरंगजेबास सारखी वाटत होती. दिल्लीचे काजी औरंगजेबाच्या नांवानें खुत्बा वाचीत नव्हते, ते १६६० ऑक्टोबर पासून वाचूं लागले. १६६१ हें वर्ष साधारण स्थिरस्थावर करण्यांत गेलें. १६६२ त तो इतका आजारी पडला कीं एक वर्ष तमाम राज्यांत सर्वत्र गोंधळ उडून गेला. इकडे अफगाण लोक व इराणचे

बादशहा औरंगजेबाचीं अनुचित कृत्यें ऐकून त्याजवर इतके रुष्ट झाले होते, कीं ते केव्हां काय करतील ह्याचा नेम नव्हता. जशवंतसिंग, जयसिंग वगैरे डोईजड सरदारांस दूर कोठें कामागिरीवर पाठवून औरंगजेब आपली निभावणूक करीत होता. सन १६६६ च्या जानेवारींत शहाजहान मरण पावला, तेव्हां औरंगजेब स्वस्थचित्त झाला. त्यानंतर लगेच आग्र्यास जाऊन तेथें त्यानें ता. २७ मार्च रोजीं पहिला राज्यारोहणसमारंभ मोठ्या थाटानें केला. हा समारंभ म्हणजे मोगल बादशाहीच्या भरभराटीचा कळस होय. त्यापूर्वीं व त्यानंतर त्या बादशाहीचें वैभव एवढें मोठें कधीं नव्हतें. ज्या शिवाजीस आपल्या ताब्यांत आणण्यासाठीं तो इतका आतुर होता, तो सुद्धां ता. ९ मे रोजीं आग्र्यास येऊन बादशहापुढें मान वांकवूं लागला. सारांश, औरंगजेबाची ही पहिल्या आठ वर्षांची हकीकत मुसलमानी रियासतींत विस्तारानें दिली आहे ती वाचली असतां, शिवाजीकडे स्वतः लक्ष देण्यास त्यास कां फावलें नाहीं, हें समजून येईल. त्यानंतर लवकरच अफगाण व रजपूत युद्धें सुरू झालीं, त्यांतून मोकळा होण्यास बादशहास आणखी पंधरा वर्षें लागलीं. ह्या संधीचा उपयोग शिवाजीनें चांगला करून घेतला.

विजापुरकरांनीं शहाजीस प्रतिबंधांत ठेविलें, त्या वेळेस सन १६४९ च्या सुमारास शहाजहान बादशहाकडे संधान बांधून शिवाजीनें आपल्या बापाची सुटका कशी केली, हें मागें सांगण्यांत आलेंच आहे. त्या वेळीं मोगलांची नोकरी करण्याचें शिवाजीनें कबूल केलें होतें. विजापुरशीं झगडत असतां शिवाजी कोणत्याही तऱ्हेनें मोगलांशीं कुरापत काढण्यास तयार नव्हता. सन १६५७ त औरंगजेबानें विजापुरावर युद्ध सुरू केलें, त्यास मदत करण्याच्या हेतूनें शिवाजीनें त्याजबरोबर पत्रव्यवहार सुरू केला. औरंगजेबानेंही त्या वेळेस शिवाजीचें म्हणणें कबूल केलें, हें पुढील पत्रावरून दिसून येईल.

' शिवाजी भोसले, बादशाही कृपेस पात्र, कृतकृत्य पावून जाणोत कीं, तुमची अर्जदास्त इकडील पंजाचे निशाणाचें फर्मान पोहोचल्यानंतर चिठ्ठी पावली. हरएकाविषयीं जें सांगणें तें तुम्हांकडील वकील सोनाजी यांजपाशीं सांगितलें. त्यांनीं तुम्हांशीं बोलोन खातरजमा केलीच असेल. सांप्रत जे किल्ले व मुलूख विजापुराकडील तुमचे हातीं होते ते पेशजी-

प्रमाणें होऊन तुमचे मनोगताअन्वयें बंदर दाभोळ व त्याजखालील मुलूख तुम्हांस दिला असे. ऐशियास, इकडील दौलतीची किफायत मदत जी करणें असेल तिचा समय हाच आहे, जाणोन करण्यांत आणावें, आणि हुजूर भेटीस यावें. याखेरीज जे मतलब तुमचे मनांत असतील ते सर्व घडोन येतील. हालीं तुमचे वकील यांस परत जाण्याची जलदी होती, सबब निरोप दिल्हा आहे. त्यांचे जबानीं इकडील लक्ष दिसोन (दिवसें) दिवस तुमचा उत्कर्ष करण्याचा वगैरे सर्व ध्यानांत येईल. याजकरितां इकडील दौलतीचे लहान मोठे कामकाजाची तर्तूज आपले ऊर्जितांचें कारण समजून करीत जावी व वारंवार इकडील कृपेचें इच्छित असावें. ता. २३ एप्रिल १६५७.' [म. इ. साधनें, खं. ८–५].

औरंगजेबाचे मनांत राज्यप्राप्तीविषयीं मोठमोठे बेत घोळत होते. यासाठीं तूर्त सर्वांशीं सख्य ठेवण्यास तो उत्सुक होता. विजापुरकरांशीं युद्ध केल्यानें दोघांचाही फायदा आहे, हें शिवाजीस प्रत्यक्ष भेटून समजून सांगावें, असा औरंगजेबाचा मनोदय होता. पण शिवाजीनें भेटीचा योग येऊं दिला नाहीं. इतक्यांत शहाजहान आजारी पडल्यामुळें औरंगजेबही विजापुरशीं कसाबसा तह करून लगबगीनें दिल्लीस गेला.

सन १६५७ च्या मे महिन्यांत शिवाजीनें मोगलांस चिडविण्याचें पहिलें कृत्य केलें. त्यानें जुन्नर शहरावर एकाएकीं हल्ला केला आणि तेथून पुष्कळ लूट आणिली.(पृ.२२७).तसेंच अहंमदनगरावरही त्यानें छापा घातला, परंतु तेथें बंदोबस्त चांगला असल्यामुळें, त्याजला विशेष प्राप्ति झाली नाहीं. पुढें पुण्यास परत आल्यावर, त्यानें घोडेस्वारांची पागा वाढविली. इकडे रघुनाथपंत नामक वकिलास औरंगजेबाकडे पाठवून, झालेल्या गोष्टी माफ करण्याविषयीं त्यानें विनंती केली. त्याचा जबाब आला तो मागें पृ.२२९वर दिला आहे. इतक्यांत औरंगजेब दिल्लीस जाऊन राज्यप्राप्तीसाठीं झगडून बादशहा झाला, तेव्हां कृष्णाजी भास्कर यास पुनरपि त्याजकडे दिल्लीस पाठवून दक्षिणच्या मुलखाचें संरक्षण आपले हातीं द्यावें, अशी शिवाजीनें मागणी केली. औरंगजेबानें ह्या वेळेस त्यास खालील जबाब पाठविला. 'मुसलमान धर्मरक्षक शिवाजी यांनीं पादशाही कृपेचे उमेदवार होऊन जाणावें कीं, ईश्वरें, धर्मवृद्धि व न्याय यथास्थित होण्याबद्दल व जुल्म पृथ्वींतून नष्ट होण्याबद्दल, आम्हांस जय होऊन, जे शत्रू धर्म व

दौलत यांविषयीं उदासीन होते, त्यांस पादाक्रांत करून, छ २४ रमजान रोज रविवार या दिवशीं आम्हांस सिंहासनाधीश्वर केलें. त्या प्रभूचा बहुत उपकार मानितों. तुमची अर्जदास्त अशा संतोषसमयांत पावून मजकूर ध्यानांत आला. ऐशियास तुम्ही इकडील लक्षांत वागतच आहां, त्या अन्वयें वागून खैरखाही करीत जाणें. हालीं दक्षिणेकडील सुभ्याचे कामावर उमदेतुल्मुल्क अमीरुलउमराव (शाएस्तेखान) जावयाची योजना करून तेथील सर्व लोकांचा बंदोबस्त त्यांजकडे सांगितला आहे. तरी तुम्हीही त्यांचे सल्लेंत वागून, वारंवार कोशीस करून जसें पूर्वींचें बोलणें, त्याप्रमाणें अमलांत आणावें. या काळीं ईश्वरकृपेनें जे मनोरथ होते ते मुलूख व दौलत येविषयींचे सिद्ध होऊन कोणतीही इच्छा उरली नाहीं. जे जे शत्रु इकडील अपकर्षणाची वासना धरीत होते, ते ते आपले केलेले कर्मांचें शासन पावून शेवटीं मुलाबाळांसुद्धां बादेकाराचे सरहद्दींत हस्तगत झाले. ते लवकरच शिक्षाही पावतील. तुम्ही इकडील लोभ आपणांवर पूर्ण आहे असें जाणून लक्षांत वागोन कृपेचे, इच्छीत असावें. तुम्हांकरितां येथून पोषाख पांठविला आहे तो घ्यावा. १४ जुलै १६५९.' (खं. ८-७).

या प्रकरणांत दोनही पक्षांचें वर्तन जगास तसें होतें. दोघेही एकमेकांस आपला अंत लागूं न देतां आपलें काम साधण्याच्या विचारांत होते. औरंगजेब व शिवाजी यांचीं मनें एकमेकांबद्दल कधींच शुद्ध नव्हतीं. दोघांचे उद्योग अगदीं विरुद्ध होते आणि त्यांचे डावपेंच व सामने वेळ पडेल तसे बदलत होते, हें मागें सांगितलेंच आहे. शिवाजीनें जुन्नर शहरावर छापा घातला त्यामुळें शिवाजीच्या उद्देशाविषयीं औरंगजेबाची अगदीं खात्री झाली. परंतु त्या वेळीं तो आपल्या भावांशीं झगडत होता, म्हणून त्यानें शिवाजीची ज्यास्त कुचाळी केली नाहीं. सन १६६१ त शिवाजी विजापुरकरांशीं लढत असतां, मोगल फौजेनें शिवाजीच्या ताब्यांतील कल्याण व भिवंडी हीं ठिकाणें काबीज केलीं, तेव्हांच युद्धास सुरुवात झाली, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

विजापुरकरांशीं तह झाल्याबरोबर, शिवाजीनें मोगलांकडे मोर्चा फिरविला. मोरोपंताचे हाताखालीं पायदळ व नेताजी पालकराचे हाताखालीं घोडेस्वार अशी योजना करून, त्यांस शिवाजीनें मोगलांचे मुलखांत पाठविलें. मोरोपंतानें जुन्नरच्या उत्तरेकडील सरहद्दीवरचे कित्येक किल्ले

हस्तगत केलें; आणि नेताजी तर मोगली मुलखांतून खंडणी वसूल करीत थेट औरंगाबादपर्यंत मोहीम करून पुण्यास परत आला. त्यास कोणी मोगल सरदार आडवा आला नाहीं.

२. शाएस्तेखानाची दुर्दशा.—शिवाजीच्या कारकिर्दीत दक्षिणेंतील कारभारावर बादशहाचे सुभेदार कोण कोण होते हें समजल्यानें पुढील संबंध स्पष्ट होतील. दिल्लीस जातांना औरंगजेबानें आपला वडील मुलगा मुअज्जम यास मागें कारभारावर टेविलें ( १६५८ ). पुढें राज्यारूढ झाल्यावर त्यानें शाएस्तेखानाची नेमणूक इकडे केली, ( १६५९ ). ता. १३ मे १६६३ रोजीं औरंगजेबानें शाएस्तेखानास बंगाल्यांत बदलून पुनः आपल्या मुलास दक्षिणच्या कारभारावर पाठविलें, आणि त्याच्या मदतीस स. १६६४ त महाबतखानाची नेमणूक केली. पुढें १६६५ त जयसिंगाची नेमणूक झाली, तेव्हां शहाजादा परत गेला. विजापुरकरांकडून जयसिंगाचा पराभव झाल्यावर पुनः शहाजाद्याची नेमणूक ता. ३ मार्च १६६७ रोजीं झाली. त्याच्या जोडीस जशवतसिंग व दिलेरखान दिलेले होते. ता. १२ जुलै १६६७ रोजी जयसिंग बऱ्हाणपुर येथें मरण पावला. शहाजाद्यानें १६७२ पर्यंत दक्षिणचा कारभार केला. १६७३ च्या जानेवारीत बहादुरखानाची नेमणूक झाली. त्यानें तो कारभार १६७७ च्या अखेरपर्यंत केला. स १६७८ त त्यास बादशहानें परत बोलाविलें. बहादुरखान हा बादशहाचा दूधभाऊ असून त्यासच खान जहान कोकलताश असा किताब होता. सन १६७२ त शहाजाद्यानें शिवाजीशीं तह केला होता, तो मोडून एकदम युद्ध सुरू करावें, असा हुकूम बादशहानें १६७६ च्या एप्रिलांत बहादुरखानास फर्माविला, आणि दिलेरखानास त्याच्या हाताखालीं दिलें. सेप्टेंबर, ता. २८, १६७८ रोजी शहाजाद्याची पुनरपि नेमणूक झाली, ती १६८० च्या जून पर्यंत चालली. त्यानंतर बहादुरखानास पुनः नेमण्यांत आलें. तोच पुढें १६८२ त बादशहा स्वतः दक्षिणेंत आला तेव्हां कारभार करीत होता. बादशहाच्या आगमनापासून तो स्वतःच सर्व कारभार करीत असल्यामुळें सुभेदारांचें महत्त्व राहिलें नाहीं, आणि युद्धप्रसंगाशिवाय दुसरा कारभार चालला नाहीं. सारांश, सन १६३६ त निजामशाही पडल्यापासून सन १७०७ पर्यंत ७० वर्षें दक्षिणचा कारभार स्वतः औरंगजेब व त्याचा वडील मुलगा शहाआलम यांनींच बहुतेक

केलेला आहे. ह्यावरून बादशहांस दक्षिणचें महत्त्व किती वाटत होतें तें दिसून येईल.

शिवाजीनें मोगलांचा मुलूख लुटण्याचा सपाटा चालविला हें ऐकून औरंगजेब फारच चिडून गेला. शाएस्तेखान* हा दक्षिणचा सुभेदार असून त्यास अमीर उल्-उमराव असा किताब होता. शिवाजीचा पाडाव करण्याविषयीं औरंगजेबाकडून निकडीचे हुकूम शाएस्तेखानास आले. जिजाबाईचा चुलता जाधवराव यासही बादशहानें शिवाजीचा प्रदेश काबीज करण्यासाठीं पाठविलें. इकडे शिवाजी राजगड सोडून सिंहगडावर येऊन राहिला. ता. २८ जानेवारी १६६० रोजीं शाएस्तेखान औरंगाबादेहून निघाला, तो ११ फेब्रुवारीस अहंमदनगरास पोंचला. तेथून २५ फेब्रुवारी रोजीं निघून सोनवाडी, पुणें, बारामती ह्या ठिकाणीं मुक्काम करीत १६ एप्रिल रोजीं तो शिरवळ येथें दाखल झाला. तेथून २० मैलांवर राजगडच्या बाजूस जी शिवाजीची फौज होती, ती खानानें हल्ला केल्यामुळें पळून गेली. तेव्हां खान शिरवळाहून निघून ७ मे रोजीं पुण्यास दाखल झाला; आणि शिवाजीच्या वाड्यांत राहूं लागला. लगेच पुढें पावसांतून चाकणच्या किल्ल्यास वेढा घालून ऑगस्टांत त्यानें किल्ला काबीज केला. (Mod. Review). सन १६४७ त शिवाजीनें तो काबीज केला, तेव्हांपासून फिरंगोजी नरसाळा हा तेथील बंदोबस्तास नेमिलेला होता. आपण किल्ला सहज घेऊं

---

*शाएस्तेखानाची हकीगत मुसलमानी रियासतींत आली आहे. नूरजहानचा बाप अयाझ हा जहांगीरचा वजीर होता. तो १६१८त मरण पावल्यावर त्याचा मुलगा आसफखान यास वजिरी मिळाली. आसफखानास एक मुलगी व चार मुलगे अशीं पांच मुलें होतीं. मुलगी मुम्ताजमहल इचें लग्न शहाजहानशीं झालें, तिचाच मुलगा औरंगजेब. आसफखानाच्या मुलांचीं नांवें, शाएस्तेखान, मीर्झा मिस्ती ( काश्मिरांत नदींत बुडून मरण पावला ), मीर्झा हुसेन आणि शहानवाजखान. शाएस्तेखान हा औरंगजेबाचा मामा व चुलत सासरा होतो. मोगल बादशहांच्या घराण्याशीं असे पिढीजाद संबंध जडलेलें इतकें प्रसिद्ध तालीर घराणें इतिहासांत दुसरें नाहीं. शाएस्तेखान हा सन १६३८ पासून १६५२ पर्यंत वऱ्हाडचे सुभेदारीवर व १६५२ पासून १६५६ पर्यंत गुजराथचे सुभेदारीवर होता. राज्यप्राप्तीसाठीं औरंगजेबानें केलेल्या युद्धांत याच्या पराक्रमाचें वर्णन आलेलें आहे. औरंगजेबास सिंहासन प्राप्त झाल्यावर त्यानें शाएस्तेखानास दक्षिणचे सुभ्यावर नेमिलें ( सन १६५९ ).

अशी खानास घमेंड होती. पण दोन महिनेपर्यंत किल्ला हातीं आला नाहीं. शेवटीं एक सुरुंग उडून आंत जाण्यास लहानसें भोंक झालें. फिरंगोजी व त्याचे लोक इतक्या आवेशानें लढले, कीं प्रत्यक्ष शाएस्तेखानास मराठ्यांचे पराक्रमाविषयीं अचंबा वाटला. फिरंगोजी त्याच्या हातीं सांपडला तेव्हां त्याच्या शौर्याची तारीफ करून खानानें त्यास सन्मानानें वागविलें; आणि पुष्कळ प्रकारची लालूच दाखवून त्यास आपल्या नोकरींत येण्याविषयीं आग्रह केला परंतु त्यानें खानाच्या सूचनेचा असा कांहीं तिरस्कार दाखविला, कीं खानानें शाबास मानून त्यास इतमामानें शिवाजीकडे रवाना केलें. शिवाजीनें त्यास किती मान दिला असेल हें सांगणें नकोच. 'तूं शर्थ केलीस' म्हणून नांवाजून भूपाळगडची (खानापुरपासून दहा मैलांवर, जि. सातारा,) हवालदारी त्याला दिली. फिरंगोजी सारख्यांच्या स्वामिभक्तीचीं उदाहरणें त्या वेळीं अनेक घडलीं.

चाकणच्या अनुभवावरून मराठ्यांचे डोंगरी किल्ले घेणें फार दुर्घट आहे, असें शाएस्तेखानानें औरंगजेबास कळविलें. खान एकनिष्ठ, मुत्सद्दी व अनुभवी होता. दक्षिण देशाची व इकडील लोकांची त्यास चांगली माहिती होती. बादशहानें हा डोंगरी मुलूख जिंकण्याचा नाद सोडून, युक्तीनें शिवाजीशीं समेट करावा, अशी त्यानें बादशहास सल्ला दिली. परंतु मराठ्यांच्या पराक्रमाविषयीं औरंगजेबाची खात्री होण्यास आणखी असल्या पुष्कळ प्रसंगांची जरूर होती. म्हणून रजपूत राजा जशवंतसिंह यास औरंगजेबानें खानाचे मदतीस गुजराथेंतून पाठविलें. तेव्हां मोगलांची अफाट फौज पुण्याचे आजूबाजूस जमली. इकडे नेताजी पालकर मोगलांचा मुलूख उद्ध्वस्त करीत होता.

पुण्यांत स्वत: खान शिवाजीच्या वाड्यांत राहत होता. नजीकच सिंहगडावर शिवाजी होता. मराठ्यांनीं कपटानें घात करूं नये, म्हणून खानानें आपला बंदोबस्त विशेष काळजीनें केला होता. पुणें शहराची नाकेबंदी केली असून कोणाही इत्यारबंद मराठ्यास परवानगीशिवाय शहरांत येण्याची मनाई होती. अशा प्रसंगीं एक चमत्कारिक युक्ति शिवाजीनें योजिली, तिजवरून त्याचें साहस व कल्पक बुद्धि हीं व्यक्त होतात. दोन ब्राह्मण शहरांत पाठवून खानाच्या व्यवस्थेची बारीक खबर त्यानें आणविली; आणि त्यांजकरवीं मोगल फौजेंतील एका मराठे शिले-

दाराशीं संधान बांधून लग्न समारंभाकरितां म्हणून कित्येक मंडळीसह वाद्यें वाजवीत शहरांतून मिरविण्याचा परवाना त्या शिलेदाराकडून काढविला. रात्रीं समारंभानें वरात निघावयाची होती. ह्या वरातीबरोबर आपण शहरांत प्रवेश करण्याचा विचार ठरवून शिवाजीनें सिंहगडच्या वाटेनें ठिकठिकाणीं हजार पांचशें लोक ठेविले. कात्रजच्या घांटानें जागजागीं झाडांस व बैलांचे शिंगांस पोत बांधविले, आणि इशारतीचा करणा सिंहगडचे वाटेस वाजतांच ते पेटवून द्यावे, म्हणजे खान व त्याची फौज कात्रजकडे जाईल अशी तजवीज ठेविली. स्वतः शिवाजी अंगांत चिलखत वगैरे सर्व मजबुदीचा पोशाख घालून, येसाजी कंक व तानाजी मालुसरे व दुसरे पंचवीस लोक यासह रात्र पडतांच वरातीच्या मेळ्यांत जाऊन मिसळला. ' मध्यरात्रीस बराच वेळ लष्करी बाजा होत असे. तो बाजा वाजत असतां शिवाजीची मंडळी पिकांव घेऊन भिंत खोदूं लागली. भोंक पाडून ते वाड्यांत शिरले. जनानखान्यांतील बायकांनीं हे परके पुरुष आंत पाहून एकदम गोंधळ केला. त्याबरोबर खानाचा मुलगा अबदुल फत्तेखान तलवार घेऊन धांवला, त्याचें डोकें शिवाजीच्या लोकांनीं कापिलें. बायकांना वाटलें खानच कापला गेला, आणि ज्यास्त कांहीं दिसूं नये म्हणून दिवे मालवून त्यांनीं आरडाओरड सुरू केली. इकडे खान हातांत भाला घेऊन उभा राहिला, त्याच्या अंगावर कांहीं लोक धावून गेले, तेव्हां त्यानें एकाचें डोकें उडविलें, त्याबरोबर दुसऱ्यानें त्याच्या हातावर वार केला, त्यानें खानाचें बोट तुटून हातचा भाला सुटून खालीं पडला. इकडे खान मेला अशा बायकांच्या आरोळ्या ऐकून आपलें काम झालेंसें वाटून शिवाजीचे लोक मागें परतले; पण रस्ता न सांपडल्यामुळें आठ असामी टांकींत पडून बुडाले. बाकीचे दारें उघडून पळून गेले. ' ( मनूची ). कांहीं पहारेकऱ्यांस त्यांनीं कापिलें. शिवाजीही बाहेर पडून बरोबरची सर्व मंडळी जमवीत सिंहगडास आला. रस्त्यानें करणा वाजवितांच कात्रजच्या रस्त्याकडे दिवट्या पेटल्या, तेव्हां शिवाजी तिकडे गेला असें समजून खानाची फौज कात्रजच्या रस्त्यानें पाठलागास गेली. म्हणून शिवाजीस लढण्याचा प्रसंगच आला नाहीं. हें कृत्य स. १६६३ च्या एप्रिल महिन्यांत घडलें.

पहाट होतांच, गनिमाच्या फौजा मोठ्या त्वेषानें सिंहगडावर आल्या. त्या अगदीं जवळ तोफेच्या टप्यांत येतांच त्यांजवर शिवाजीनें तोफा सुरू केल्या. त्यामुळें लोक जायां होऊं लागले. वेढा घालून बसावें, तरी पुढें पर्जन्य काळ, शिवाजी दगेबाज, तोफखाना आल्याशिवाय किल्ला हातीं येणार नाहीं. तोफखाना आणवावा तर अडचणीच्या जागेंत मराठे तो लुटून टाकितील, अशा विचारांत खान असतां, त्याचा हत्ती किल्ल्यावरील गोळ्यानें ठार झाला. तेव्हां शाएस्तेखान नाउमेद होऊन, शिवाजीच्या नजीक राहणें ठीक नाहीं असें जाणून, मजल दर मजल करीत नगर जिल्ह्यांत भिमेच्या कांठीं पेडगांवीं जाऊन छावणीस राहिला.

ही वार्ता बादशहास काश्मिरांत ता. ८ मे रोजीं कळली. लगेच त्यानें खानाची बदली केली. पण शिवाजीचा सूड उगविण्याची खानास अनावर इच्छा असल्यामुळें त्यानें कांहीं दिवस इकडे राहण्याची परवानगी मागितली. 'आपणास लोक भित्रा म्हणतील, आणि एकवार सूड घेतल्याशिवाय आपणास चैन पडणार नाहीं,' असें खानानें आग्रहानें बादशहास अनेकदां लिहिलें. दुसऱ्यांनींही खानाचें म्हणणें कबूल करण्याविषयीं औरंगजेबास परोपरी सांगितलें. परंतु बादशहा म्हणाला, 'रागाच्या सपाट्यांत खानाची अक्कल ठिकाणावर राहणें शक्य नाहीं; अशा स्थितींत त्याचे हातून शहाणपणाचें काम होणार नाहीं.' असें सांगून त्यानें खानास एकदम बंगाल्यांत निघून जाण्याचा निक्षून हुकूम पाठविला. ( मनूची पु. २ ).

शाएस्तेखान, मोठ्या इभ्रतीचा व भरंशाचा सरदार होता. त्यानें आपल्या अप्रतिष्ठेचें कारण जशवंतसिंह* होय असें बादशहास लिहून कळविलें. पण खानाचीच कसूर आहे असें वाटून बादशहानें त्याची बंगालचे सुभ्यावर बदली केली; आणि आपला मुलगा मुअज्जम यास दक्षिणेंत पाठविलें. जशवंतसिंह लढण्याचे भानगडींत न पडतां जुन्नर व चाकण येथील बंदोबस्त करून कांहीं वेळ औरंगाबादेस जाऊन राहिला. शिवाजीनें ह्या

* जशवंतसिंग दाराच्या पक्षाचा असल्यामुळें त्याची औरंजेबास नहमींच भीति वाटे. स. १६६१–६२ त तो गुजराथच्या सुभ्यावर होता. शिवाजीनें त्याजबरोबर अंतस्थ कारस्थान ठेविलें होतें असें मनूची म्हणतो. त्यावरून स. १६६५ त त्यास औरंगजेबानें परत बोलाविलें.

प्रसंगीं जशवंतसिंगाचा पराभव केला, असें 'बसातिन–इ–सलातिन' ह्या विजापुरच्या इतिहासांत सांगितलें आहे.

**सुरतेवर छापा.**—शिवाजीची राजधानी पुणें होती. म्हणूनच मोगल सुभेदार पुण्यास येऊन राहत. मोगलांच्या हल्ल्यांपासून सहज बचाव व्हावा म्हणून शिवाजीनें पुणें सोडून पुढें डोंगरांत रायगडावर आपली राजधानी केली. पुढील मोहीम स्वतः शिवाजीनें सुरू केली. जंजिऱ्यानजीक दंडाराजपुरी येथें एक व कल्याण येथें दुसरी अशा दोन फौजा आदल्या वर्षीं शिवाजीनें तयार केल्या असून, त्या पोर्तुगीझ व सीदी यांचा पाडाव करण्याकरितां जमविल्या आहेत, असें जाहीर केलें होतें. पण अंतस्थ हेतु निराळाच होता. बहीरजी नाईक म्हणून शिवाजीचे नोकरींत एक गुप्त हेर असून तो निरनिराळ्या ठिकाणची माहिती काढून आणण्यांत पटाईत होता. त्यानें सुरत येथील खडानखडा बातमी आणून शिवाजीस दिली. सुरत हें त्या वेळचें श्रीमान् शहर मोगलाईतील पश्चिम किनाऱ्यावरचें नाकें व व्यापाराच्या प्रचंड घडामोडीचें ठिकाण होतें. त्यावर हल्ला केला म्हणजे पुण्याची मिठी सुटेल अशी योग्य युक्ति योजून सुरतेवर छापा घालण्याचा शिवाजीनें विचार ठरविला. नाशिकच्या बाजूस कांहीं निकडीचें काम काढून शिवाजी मोठ्या झपट्यानें नाशकास गेला आणि तेथेंच मुक्काम आहे असें लोकांस भासवून, चार हजार घोडेस्वारांनिशीं ता. ५ जानेवारी सन १६६४ रोजीं एकदम सुरत शहरावर येऊन थडकला. परदेशच्या व्यापाराचें मुख्य ठिकाण, सर्व पश्चिम हिंदुस्थानचें नाकें, व प्राचीन काळापासून संपत्तीचें माहेरघर असें तें शहर मोगली फौजेस दाद लागण्यापूर्वीं शिवाजीनें सावकाशपणें सहा दिवसपर्यंत लुटून तेथील सर्व द्रव्य रायगडास नेऊन पोंचविलें. मुसलमानांच्या फौजा त्याजवर आल्या, त्यांचा त्यानें पाडाव केला.

सन १६५८ पासून १७०७ पर्यंत सुरत शहराची अत्यंत भरभराट होती. कोणतेंही व्यापारी गलबत सुरतेस आल्याशिवाय जात नसे. सन १६६४ त सुरतेस दोन व्यापारी इतके सधन होते कीं त्यांच्या इतके पृथ्वीवर त्या वेळीं दुसरे कोणी नव्हते (Orme). एक हिंदु व्यापारी आठ कोटी रुपयांचा मालक होता. शिवाजीनें सन १६६४ त स्वारी केली, तेव्हां एका हिंदु व्यापाऱ्याचे घरीं त्यास २२ शेर वजनाचे

मोत्यांचे कंठे सांपडले. मुल्ला अब्दुल जाफर म्हणून एक व्यापारी होता त्याचीं स्वतःचीं १९ गलबतें मालानें भरलेलीं होतीं. दुसरे असे पुष्कळ व्यापारी होते कीं, ज्यांच्या वखारींतील मालानें एकेका जहाजाची भरती सहज होत असे. ( Mod. Review, 1907).

मोगल बादशाहीची केवळ पश्चिम राजधानी जें सुरत शहर तें लुटल्याबद्दल इंग्रज ग्रंथकारांनीं शिवाजीवर गहजब उडविलेला आहे. परंतु उभयतांमध्यें उघड युद्ध सुरू असून, शिवाजीच्या राज्यांत मोगल फौज चार वर्षें धुडगुस घालीत होती. शिवाजीची राजधानी पुणें शहर काबीज करून प्रत्यक्ष त्याचा वाडा मोगल सुभेदार चार वर्षें अडकवून बसले होते. अशा स्थितींत सुरतेचें नाक दाबल्याबरोबर पुण्याचें तोंड उकटलें, ही शिवाजीची अजब युक्ति हल्लींच्या युद्धकलेंतही वाखाणलीच जाईल. हा प्रकार इतका उघड आहे कीं त्यावर ज्यास्त चर्चा करण्याची जरूर नाहीं.

इकडे नेताजी पालकर मोगलांचे मुलखास उपद्रव देतच होता. मोगलांचे हातून त्याचा बंदोबस्त होईना. शिवाजीच्या आरमारानेंही या वेळेस पुष्कळ काम केलें. मुसलमान यात्रेकरूंनीं भरलेलीं मोगलांचीं जहाजें आरबस्तानास चाललीं असतां, त्यांस शिवाजीचे आरमारांतील लोकांनीं पकडिलें, आणि यात्रेकरूंपासून चांगली खंडणी घेऊन त्यांस सोडून दिलें. खुद्द शिवाजीनें अहंमदनगर पेठ्यावर छापा घातला आणि औरंगाबादपर्यंत मुलूख उद्ध्वस्त केला.

मोगलांशीं शिवाजीचें युद्ध चालू झालें, तेव्हां आदिलशहानेंही आपला तह मोडून शिवाजीवर दोन फौजा कोंकणाकडे रवाना केल्या; परंतु शिवाजीनें त्यांजवर एकदम हल्ला करून त्यांचा पराभव केला. विजापुरकरांचे सहा हजार लोक पडले. ह्या लढाईत वेंगुर्लें येथील लोक शिवाजीवर उठले म्हणून शिवाजीनें तें बंदर लुटून फस्त केलें. विजापुरकरांशीं पुढें जे व्यवहार घडले त्यांची हकीकत स्वतंत्रच येणार आहे.

औरंगजेब ह्या वेळीं आपल्या विवंचनेंत होता. जशवंतसिंग मुळपासून सरळ स्वभावाचा व व्यवस्थित होता. शिवाजीस जिंकणें शक्य नाहीं असें वाटून तो त्या नादास लागला नाहीं. तो व मुअजम यांनीं शिवाजीवर चाल करून येण्याचें सोडून दिलें. ह्याप्रमाणें बादशाही फौजेशीं उघड

सामना करून शिवाजीनें त्यांत चांगला जय मिळविला, त्यामुळें त्याचें स्वातंत्र्य राजरोस स्थापन झालें.

पूर्वींचे तह मोडून विजापुरकर व सीदी हे दोघे शिवाजीवर उठले, तेव्हां त्यांची खोड मोडण्याकरितां शिवाजीनें एकाएकीं आपलें आरमार घेऊन दक्षिण किनाऱ्यावर चाल केली. एकदम बारसिलोर येथें येऊन सुरतेप्रमाणें त्यानें मोठी लूट मिळावली. तेथून गोकर्णास जाऊन देवदर्शन घेऊन मोठा दानधर्म केला. नंतर चहूंकडे फौजा पाठवून प्रांतांतील मोठमोठ्या शहरांतून पैसे गोळा केले. कारवारच्या लोकांनीं त्यास कांहींसा अटकाव केला, पण त्यांचें कांहीं न चालतां शिवाजीनें खंडणी वसूल केली. या स्वारींतून शिवाजी जलमार्गानें परत आला. त्या वेळच्या जलप्रवासानें समुद्रावरील मार्गाची अनिश्चितता मनांत येऊन, स्वतः होऊन अशा सफरींत जावयाचें नाहीं, असा त्यानें निश्चय केला. पुनः शिवाजीनें जलप्रवास केला नाहीं.

सन १६६४ चे अखेरीस किंवा १६६५ चे आरंभीं शिवाजीनें खालील पत्र मुनशी नीलप्रभूचे हस्तें दक्षिणेंतील मोगल अधिकाऱ्यांस लिहिलें:-

'आज तीन वर्षें बादशहाचे मोठमोठे सल्लागार व योद्धे आमचा प्रदेश काबीज करण्यासाठीं चालून येत आहेत, हें तुम्हां सर्वांस माहीत आहेच. बादशहा हुकूम फर्मावितात, 'शिवाजीचे किल्ले व मुलूख काबीज करा.' तुम्ही जबाब पाठवितां, 'आम्ही लवकरच काबीज करितों.' आमच्या ह्या कठिण प्रदेशांत नुसता कल्पनेचा घोडा सुद्धां नाचविणें कठिण आहे, मग तो प्रदेश काबीज करण्याची गोष्ट कशाला ! भलत्याच खोट्या बातम्या बादशहाकडे लिहून पाठविण्यास तुम्हांला लाज कशी वाटत नाहीं ! कल्याणी व बेदरचे किल्ले उघड्या मैदानांत होते ते तुम्हीं काबीज केले. आमचा प्रदेश अवघड व डोंगराळ आहे. नदी नाले उतरून जाण्यास वाट नाहीं. अत्यंत मजबूद असे साठ किल्ले आज माझे तयार आहेत. पैकीं कांहीं समुद्रकिनाऱ्यावर आहेत. बिचारा अफझलखान जावळीवर फौज घेऊन आला आणि नाहक मृत्युमुखीं पडला. हा सर्व प्रकार आपल्या बादशहास कां कळवीत नाहीं ! अमीर-उल्‌उमराव शाएस्तेखान आमच्या या गगनचुंबित डोंगरांत व पाताळास पोंचणाऱ्या खोऱ्यांत तीन वर्षें सारखा खपत होता. 'शिवाजीचा पाडाव करून लौकरच त्याचा प्रदेश

काबीज करितों, ' असें बादशहाकडे लिहून लिहून थकला. ह्या खोडसाळ वर्तनाचा परिणाम त्याला भोंवला. तो परिणाम सूर्यासारखा स्वच्छ सर्वांच्या डोळ्यांसमोर आहे. आपल्या भूमीचें संरक्षण करणें माझें कर्तव्य आहे, आणि तुम्ही कितीही बादशहाकडे खोट्या बातम्या लिहून पाठविल्या तरी मी आपलें कर्तव्य बजावण्यास कधीं चुकणार नाहीं. ' ( Mod. Rev. )

सन १६६४ त शिवाजीनें भराभर पुष्कळ प्रदेश व किल्ले काबीज केले. जशवंतसिंगाच्या हातून त्याचा बंदोबस्त झाला नाहीं. किनाऱ्यावर किल्ले बांधून मोगलांचीं व इतर जहाजें तो लुटूं लागला. औरंगजेबानें मुहकमासिंग यास दहा हजार फौज देऊन औरंगाबादेहून शिवाजीवर जाण्याचा हुकूम केला. मुहकमासिंग चालून येत असतां शिवाजीनें प्रतापराव गुजर यास वीस हजार फौज देऊन त्याजवर पाठविलें. त्या दोघांची लढाई होऊन महकमासिंग मारला गेला. या प्रसंगीं मराठ्यांनीं मोगलांचे दहा हजार घोडे काबीज केले. ( १६६४ ).

३. जयसिंगाची शिवाजीवर रवानगी.—शिवाजीनें उघडपणें स्वतंत्र राज्य सुरू केलें. त्यानें सुरत वगैरे बादशहाचीं बलिष्ठ शहरें व मक्केचे यात्रेकरू लुटले. दक्षिण किनाऱ्यावरील व्यापारी बंदरांवर हल्ले केले. आरमार वाढविलें. शाएस्तेखान व जशवंतसिंग यांचा त्याजपुढें टिकाव लागला नाहीं. ही बातमी औरंगजेबास पोंचून, तो फार चिंताक्रांत झाला. शिवाजीस जेरीस आणण्याचा उपाय त्यास सुचेना. तेव्हां प्रथमतः विजापुरच्या आदिलशहाकडे वकील पाठवून त्याजकरवीं शिवाजीशीं युद्ध सुरू करून दोघांनीं मिळून एकदम लढण्याची तयारी औरंगजेबानें केली. त्याचा एक हुशार वकील विजापुरास आला. ' आम्हा उभयतां मुसलमान बादशहांस या सर्व फंदफितुराचें व बंडाचें मूळ कारण जो शिवा त्याचा समूळ नाश करून गरीब रयतेस त्याच्या जाचांतून सोडविणें प्राप्त आहे. इकडून पारिपत्यासाठीं शूर योद्धे व शिपाई रवाना होत आहेत. तसे आपणाकडूनही व्हावे व त्या शिवरूपी सर्पाचें मस्तक फोडून, त्याच्या गैररहा वागणुकीचा सूड घ्यावा. आम्हीं एका बाजूनें तुम्हीं दुसऱ्या बाजूनें शिवाजीवर स्वारी करावी.' आदिलशहानें ही गोष्ट कबूल केली आणि खवासखानास शिवाजीवर पाठविलें. शिवाजीनें खवासखानाच्या सर्व वाटा बंद केल्या. तरी तो गाफीलपणानें शिवाजीच्या मुलखांत आला. शिवाजीची फौज दबा धरून बसलेली

आहे, हें त्यास ठाऊक नव्हतें. खवासखानाचा समाचार घेऊन मग जयसिंहाच्या समाचारास जावें, असा शिवाजीचा मानस होता. त्यानें एकदम येऊन खवासखानास कोंडिलें. डावी उजवीकडे हलण्यास सुद्धां त्यास वाव राहिला नाहीं. विजापुरच्या फौजेची गाळण उडाली. खवासखानानें हाताखालच्या अंमलदारांस जवळ बोलावून निकरानें लढण्याविषयीं उत्तेजन दिलें. लढाई मोठ्या निकराची झाली. सीदी सर्वर, शहा हजरत व शेख मिरान इत्यादि विजापुरचे सरदार रणांगणीं पडले. तेव्हां स्वतः खवासखान तलवार घेऊन धावला. त्याबरोबर सर्व मुसलमान मराठी फौजेवर तुटून पडले. तेव्हां मराठे पराभव पावून पळून गेले. ( बसातिन-इ सलातिन ).*

इकडे औरंगजेब बादशहानें जशवंतसिंग व मुअज्जम यांस परत बोलावून, त्यांचे जागीं जयपुरचा मीर्झा राजा जयसिंग व पठाण दिलीरखान यांची नेमणूक केली. शिवाजीचा एकदम चांगला बंदोबस्त करावा, असें बादशहाच्या मनांत फार होतें; तथापि उत्तरेंत या प्रसंगीं असावें तसें स्वास्थ्य नसल्यामुळें, शिवाजीकडे स्वतः लक्ष देण्यास त्यास फुरसत मिळाली नाहीं. परंतु सुरत शहर व मक्केस जाणाऱ्या यात्रेकरूंचीं गलबतें शिवाजीनें लुटलेलीं पाहून औरंगजेबास त्वेष आला; आणि त्यानें वरील दोन सरदार शिवाजीवर रवाना केले. हे दोनही सरदार मोठे पराक्रमी होते. दिल्लीचें तख्त मिळविण्यासाठीं जें युद्ध औरंगजेबानें केलें, त्यांत ह्या सरदारांनीं दाराचा पक्ष स्वीकारिला असल्यामुळें, त्यांजबद्दल औरंगजेब नेहमीं साशंक असे; पण महाराष्ट्रासारख्या अपरिचित ठिकाणीं त्यांस पाठविलें असतां त्यांच्या हातून दगा होणार नाहीं, असा बादशहाचा अंदाज होता. त्यांजबरोबर सैन्याचा जमाव मोठा असून शिवाजीचा पाडाव केल्यावर विजापुर जिंक-

* या लढाईंत प्रत्यक्ष शिवाजी हजर होता असें दिसत नाहीं, व ही लढाई कोणत्या ठिकाणीं झाली याचाही उल्लेख नाहीं. औरंगजेबाच्या वकिलाची हकीकत प्रो. मोडक यांच्या विजापुरच्या इतिहासांत आढळते (पृ. २१०-२१३). आदिलशहानें पूर्वीचा तह मोडून शिवाजीशीं वैर सुरू केलें, याचें कारण औरंगजेबाचें कारस्थान होय. शिवाय पुढें जयसिंगाशीं स्नेह करून आदिलशहावर शस्त्र धरण्यास शिवाजी तयार झाला, याचें कारण वरील आदिलशहाचीच वर्तणूक होय. ह्या सर्व प्रकारांत औरंगजेबाचें प्रसंग पडेल तसें वर्तन त्याच्या स्वभावास अगदीं अनूरूप आहे.

ण्याविषयीं त्यांस सक्तीच्या ताकिदी दिलेल्या होत्या. औरंगजेबानें दक्षिणेंतील अंमलदार वरचेवर बदलिले, ही त्यानें शहाणपणाची गोष्ट केली नाहीं; यामुळें त्याचें फार नुकसान झालें. पहिला सरदार शाएस्तेखान हा नांवाजलेला असून, उत्तर हिंदुस्थानांत त्यानें मोठमोठे पराक्रम केले होते. जशवंतसिंगही कांहीं कमी नव्हता. मीर्झा जयसिंग सुद्धां चांगलाच पराक्रमी होता. परंतु मध्यें दिलीरखान होता. दिलीरखान स्वतः हिंमतीचा होता. परंतु या दोन हिंदु व मुसलमान सरदारांमध्यें चांगलें सख्य नव्हतें. औरंगजेबाच्या अविश्वासी स्वभावामुळें त्याचा कोणावरच भरंवसा नसे. त्याचा परिणाम असा झाला कीं, त्यास मुळींच यश आलें नाहीं. जयसिंग व दिलीरखान ह्या दोघांसही दक्षिण देशाची विशेष माहिती नसल्यामुळें येथें त्यांच्या हातून दगा होण्याचा फारसा संभव नव्हता. जयसिंगाला दहशत रहावी म्हणून त्याचा मुलगा रामसिंग ह्यास बादशहानें मुद्दाम बोलवून मानकरी म्हणून जवळ ठेवून घेतलं. ह्या कलमांतील पुढील बहुतेक हकीकत प्रो. सरकार यांनीं मॉडर्न रिव्ह्यूंत दिलेली उतरून घेतली आहे.

तारीख ३० सप्टेंबर सन १६६४ रोजीं औरंगजेबाचा वाढदिवस होता. त्या दिवशीं मीर्झा राजा जयसिंग यास त्यानें शिवाजीवर चालून जाण्याची आज्ञा केली. त्याच्या हाताखालीं दिलीरखान, दाऊदखान, राजा रायसिंग शिसोदिया, राजा सुजनसिंग बुंदेला, कीरतसिंग ( जयसिंगाचा मुलगा ) राजा नरसिंग गौड, पुराणमल बुंदेला व दुसरे अनेक मुसलमान सरदार दिलेले होते. त्या सर्वांची मिळून १४००० चौदा हजार फौज होती. जयसिंग आपली सर्व तयारी करून निघाला. ९ जानेवारी १६६५ रोजीं त्यानें नर्मदा नदी ओलांडिली आणि ता. १९ला बऱ्हाणपुरास पोंचला. तेथें ता. ३० पर्यंत मुक्काम करून फौजेची व सामानाची सर्व व्यवस्था केल्यावर बऱ्हाणपुराहून निघून फेब्रुवारी ता. १० रोजीं तो औरंगाबादेस आला. या ठिकाणीं शहाजादा मुअज्जम दक्षिणच्या सुभेदारीवर होता, त्याची व इतर अधिकाऱ्यांची भेट घेऊन ता. १३ फेब्रुवारी रोजीं जयसिंग औरंगाबादेहून निघाला, तो ता. ३ मार्च रोजीं पुण्यास पोंचला. पुणें येथें महाराजा जशवंतसिंगाकडून सर्व काम त्यानें सोंपून घेतलें. ता. ७ मार्च रोजीं जशवंतसिंग पुणें सोडून परत गेला.

जयसिंगास अपजय असा कधीं ठाऊक नव्हता. सन १६१७ त बारा वर्षांचा असतां तो मोगल फौजेंत प्रथम दाखल झाला. तेव्हांपासून मध्य-आशियांतील बाल्कपासून विजापुर आणि पश्चिमेस कंदाहारपासून मोंगीर एवढ्या प्रदेशांत त्यानें नाना प्रकारचे विजय संपादन केले होते. शहाजहानच्या कारकिर्दींत दरसाल कांहींना कांहीं तरी विजय संपादन केल्याबद्दल त्यास बक्षिस मिळालें होतें. बादशाही लष्करांत त्याचा मान शहाजाद्यांच्या बरोबरीचा होता. अलीकडे पुष्कळ वर्षे तो स्वतंत्र सेनापति होता. युद्धकौशल्यापेक्षां मुत्सद्देगिरीबद्दल त्याची विशेष ख्याति होती. एखादा विशेष भानगडीचा प्रश्न आल्यास जयसिंगास पाचारण होत असे. त्याचें भाषण मधुर व दुसऱ्यावर छाप पाडणारें होतें. तुर्की, फारशी, हिंदी व उर्दू या भाषा त्यास चांगल्या अवगत होत्या. मुसलमानी रीतरिवाजांत तो पूर्ण तरबेज होता. तरुणपणाचा त्याचा उत्साह वयानें व अनुभवानें बराच कमी होऊन त्याची वृत्ति अलीकडे शांत झाली होती. गंभीर वृत्तीनें व विचारी धोरणानें मनुष्यस्वभाव ओळखून आपला हेतु सिद्धीस नेण्याकडे हल्लीं त्याचा कल विशेष होता. असा हा ६० वर्षांचा वृद्ध व अनुभवी सरदार औरंगजेबानें शिवाजीवर पाठविण्यास योजिला; यावरून बादशहाला शिवाजीची केवढी दहशत पडली होती हें दिसून येतें.

शिवाजीचें वय या वेळीं ३७ वर्षांचें होतें. शौर्य, धोरण व अक्कल या गुणांच्या जोरावर त्यानें छत्रपतिपद संपादन केलें. राज्यकारभारांतही त्यानें आपलें कौशल्य अप्रतिम प्रगट केलें होतें. ह्या बाबतींत त्यास राजा रामचंद्राची उपमा देत. अशा पुरुषास जिंकणें हे काम जयसिंगासही सोपें वाटलें नाहीं. शाएस्तेखान, जशवंतसिंग, अफझलखान यांचीं उदाहरणें त्याच्या डोळ्यासमोर होतीं. आजपर्यंत दक्षिण देश जिंकण्यांत मोठमोठ्या मोगल सरदारांस अपयश आलें होतें. शिवाजीचा पाडाव करितांना विजापुर व गोवळकोंडा यांची त्यास मदत मिळूं नये अशी तजवीज जयसिंगास ठेवावयाची होती. जयसिंगाच्या मनास अहर्निश काळजी लागली होती. ‘ ज्या कामासाठीं मी आलों आहें, त्या कामापुढें रात्रंदिवस एक क्षणही मला विश्रांति किंवा शांतता मिळत नाहीं, ’ असें तो वारंवार बादशहास लिहितो. त्याचा व बादशहाचा संपूर्ण पत्रव्यवहार उपलब्ध

आहे. त्यावरून वरील गोष्ट उघड होते. शिवाजी व विजापुर ह्यांचा मिलाफ न व्हावा म्हणून त्यानें दोहोंच्या दरम्यान आपला तळ दिला. तळ-कोंकणांत जाऊन शिवाजीचा पाडाव करावा असें बादशहा त्यास वारंवार आग्रहानें सुचवीत होता. परंतु तळकोंकणांत गेल्यास आपला निभाव लागणार नाहीं आणि विजापुरची फौज शिवाजीस मिळाल्यास आपला सर्व बेत फसेल, असें त्यानें बादशहास कळविलें. जयसिंगाची ह्या वेळची सावधगिरी व स्वतः औरंगजेब बादशहा ज्या वेळीं पुढें दक्षिणेंत आला त्या वेळचा त्याचा हट्ट यांचा विरोध ध्यानांत ठेवण्यासारखा आहे. लोहगड, पुरंदर व राजगड ह्या तीन किल्ल्यांच्या दरम्यान शिवाजीचा मुख्य मुख्य प्रदेश असल्यामुळें तेवढ्यांत जयसिंगानें युद्ध चालविलें. आंतून विजापुरशीं संधान ठेवून त्यानें गोडगोड वचनांनीं त्यांस शिवाजीस मिळूं दिलें नाहीं, आणि अनेक ठिकाणीं शिवाजीवर अनपेक्षित घाले घालण्याचा क्रम चालविला. औरंगाबादला पोंचण्यापूर्वींच फ्रॅन्सिस माइल् व डिक माइल् ह्या दोन युरोपियन गृहस्थांस पत्रें देऊन गोवा, सुरत व मुंबई येथील व्यापाऱ्यांकडे बोलणें करण्यास त्यानें पाठविलें;आणि शिवाजीशीं युद्ध करण्यासाठीं त्यांच्या आरमाराची मदत जयसिंगानें मागितली. स. १६६५ त सुद्धां पाश्चात्यांच्या आरमाराचें महत्त्व केवढें होतें, हें ह्यावरून व्यक्त होतें. मे महिन्यांत त्यानें बादशहास लिहिलें, 'आमची फौज पुण्यास असल्यामुळें कोंकणकिनाऱ्याविषयीं शिवाजी अगदीं निर्धास्त आहे. या वेळीं जर गुजराथेकडून एखादें आरमार पश्चिम किनाऱ्यावर येईल तर शिवाजीच्या प्रदेशांतून आपणांस पुष्कळ लूट मिळेल.'

कर्नाटकांतील जमीनदारांकडेही जयसिंगानें आपले ब्राह्मण वकील रवाना केले. ब्राह्मण पवित्र समजत असल्यामुळें त्यांजला कोठेंही निर्भयपणें जातां येत असे. जावळीच्या मोऱ्यांसारखे जे कोणी मराठे सरदार शिवाजीच्या विरुद्ध होते, त्यांजकडेही जयसिंगानें आपले वकील पाठविले. अफ्झल-खानाच्या मुलास त्यानें आपल्या नोकरींत ठेविलें. प्रत्यक्ष शिवाजीच्या फौजेंतील सरदारांस लांच वगैरे देऊन त्यांस आपणाकडे वळविण्याचा त्यानें प्रयत्न केला. सुप्याचे दोन जमीनदार त्यानें अशा रीतीनें आपणाकडे वळवून घेतले. त्या वेळीं जयसिंगानें बादशहाकडून सर्व प्रकारचे अधि-कार स्वतःकडे मागून घेतले होते. पूर्वींच्या सेनापतींकडे फक्त युद्धाचें

काम असे. पण नेमणूक, बढती, शिक्षा वगैरे अधिकार सुभ्याकडे असत. ह्या अडचणीनें युद्ध यशस्वी होत नाहीं, अशी त्यानें बादशहाची समजूत घालून त्याजपासून सर्व अधिकार मिळविले. अहंमदनगर, परिंडा वगैरे ठिकाणच्या लष्करांस जयसिंगाच्या हाताखालीं काम करण्याचा हुकूम झाला. फौजेचे पगार सुद्धां तो स्वत: आपलेजवळ खजिना ठेवून वांटीत असे. त्यांत हिशेबी खास्याकडून त्यास अडथळा न व्हावा अशी बादशहानें तजवीज केली. पर्जन्यकाळ समीप आल्यामुळें, जयसिंगानें सर्व कामें अत्यंत तांतडीनें चालविलीं. जयसिंगानें आपल्या छावणीचा तळ सासवड येथें ठेविला; आणि आजूबाजूचा प्रदेश उद्ध्वस्त करण्यास सुरुवात केली. कुत्बुद्दीनखान नांवाच्या सरदारास ७००० फौज देऊन उत्तरेस लोहगड येथें ठेविलें. अशी आणखी निरनिराळ्या ठिकाणीं त्यानें सैन्याची व्यवस्था ठरवून दिली.

पुण्यास आल्यावर जयसिंगानें विचार करून मनाशीं दुसराही मुत्सद्दी बेत ठरविला आणि शिवाजीस निरोप पाठविला कीं, 'तुम्ही बादशहास शरण याल तर तुमचें सर्व प्रकारें कल्याण होऊन वैभव वाढेल. आमच्या मध्यस्थीनें तुमची बादशाहाशीं इतमामानें भेट होईल. आपण दोघेही हिंदु एकधर्मी आहों. ह्यांत कोणताही कपटभाव एकमेकांनीं मनांत ठेवूं नये. मी म्हणतों यास परमेश्वर साक्ष आहे.' दिलीरखानास जयसिंगाचें हें धोरण पसंत पडलें नाहीं.

जयसिंग ११ दिवस पुण्यास राहून तारीख १४ मार्च रोजीं पुणें सोडून सासवडास जाण्यास निघाला. तो ३१ मार्च रोजीं सासवडास पोंचला; आणि लगेच पुरंदरास वेढा घालण्याविषयीं त्यानें दिलीरखानास आज्ञा केली. ह्या वेढ्याची तपशीलवार हकीकत मोगल दप्तरांतील कागदपत्रांवरून तयार केलेली मॉडर्न रिव्ह्यूमध्यें दिलेली आहे. तारीख १४ एप्रील रोजीं रुद्रमाळ किल्ला आंतील लोकांनीं मोगलांच्या स्वाधीन करून दिला. ता. २५ एप्रिल रोजीं दाऊदखानास जयसिंगानें राजगडावर हल्ला करण्यास पाठविलें. ह्या सर्व हकीकतीवरून जयसिंगाची तयारी व धूर्तता उत्कृष्ट कळून येते. इकडे शिवाजीही रिकामा बसला नव्हता. नेताजी पालकर यास त्यानें परिंड्यावर पाठविलें, पण मोगलांच्या फौजेपुढें त्याचें फारसें चाललें नाहीं. ठिकठिकाणीं त्यानें मोगल फौजेचा बराच नाश केला.

पुरंदर किल्ल्याचा वेढा नेटानें चालवून कांहीं दिवस तोफांचा मारा होतांच किल्ला पडण्याच्या बेतांत आला.

४. मुरारबाजीचा प्रताप. (स. १६१६-१६६५).—खेळण्याच्या खिंडींत सरदार बाजी प्रभु देशपांडे सिंधकर ह्यानें अजरामर कीर्ति मिळविली, त्याचप्रमाणें पुरंदरच्या वेढ्यांत दुसरा एक पराक्रमी प्रभु सरदार मुरार बाजी देशपांडे महाडकर, यानें कीर्ति मिळविली आहे. मुरारबाजीचा बाप बाजी मुरार हा विजापुरचा सरदार चंद्रराव मोरे याचे पथकांत नोकरीवर होता. मोगलांबरोबर चाललेल्या युद्धांत विजापुरच्या तर्फेनें बाजी मुरारनें विशेष पराक्रम केल्यावरून त्यास आदिलशहानें उमराव असा किताब देऊन, हुजुरांत ठेवून घेतलें होतें; आणि त्याचे बदल्यांत मोरे याचे पथकांत त्याचा वडील मुलगा मुरार यास नोकरी दिली होती. मुरार याचा जन्म सन १६१६ त झाला. त्यावरून पुरंदरचे वेढ्याचे वेळेस त्याचें वय ५० वर्षांचें होतें. चंद्ररावाच्या पदरीं मुरारबाजीची नेमणूक सन १६३७ त झाली. त्रिंबक, शंकराजी, संभाजी व महादजी असे मुरारचे आणखी चार भाऊ होते. या पांच भावांच्या वंशास 'पंच बाजीचा वंश' असें म्हणतात. चंद्रराव मोरे याजवरील स्वारींत मुरारबाजी शिवाजीच्या फौजेशीं मोठ्या निकरानें लढला, परंतु तो हतवीर्य होऊन, मोरे यांचीं मुलेंमाणसें शिवाजीचे हातीं पडलीं. 'मुरारबाजीस आमचे नोकरींत द्याल, तर तुमचा जीव वांचवितों,' अशी अट शिवाजीनें मोरे यांस कळविल्यावरून त्यांच्या अनुज्ञेनें भ्रातृवर्गासह मुरारबाजी शिवाजीचे नोकरीस राहिला. शिवाजीनें त्यास पुरंदरची किल्लेदारी दिली.

सन १६६५ त मोगल फौज नजीक येतांच मुरारबाजीनें त्यांस दाणावैरण मिळूं नये, अशी तजवीज केली; आणि त्यांचा दारूगोळा पेटवून दिला. तथापि पुन: सर्व तजवीज करून दिलेरखानानें पुरंदर किल्ल्यास वेढा घातला, तेव्हां मुरारबाजीजवळ किल्ल्यावर मावळे व हेटकरी मिळून दोन हजार निवडक लोक होते. त्यांस कित्येक चोरवाटांनीं अन्नसामुग्रीचा पुरवठा होत होता. पुरंदरच्या किल्ल्याचे वरचा कोट व खालचा कोट असे दोन भाग होते. त्यांत दारूगोळ्याची उत्तम सामुग्री शिवाजीनें भरून ठेविलेली होती. मोगलांनीं शिकस्त करून खालचा को

स्वाधीन करून घेतला. तेव्हां मावळे लोक वरचे कोटांत शिरल्यावर मोगल फौज लढण्याचा उद्योग सोडून देऊन गाफीलपणानें लूट करूं लागली. मावळ्यांनीं त्यांची अव्यवस्थित स्थिति पाहून, त्यांजवर वरून गोळ्यांचा असा जोराचा मारा केला कीं, कित्येक मोगल लोक पळून गेले व कित्येक कोनाकोपऱ्यांत लपून राहिले. त्या वेळीं मोगल व मराठे यांची निकराची लढाई झाली. मुरारबाजी तर मोगलांस किल्ल्यांतून हाकून लावून त्यांचा पाठलाग करीत थेट दिलीरखानाच्या तंबूपर्यंत गेला. त्याच्या पराक्रमाचा सर्व मोगल लोकांस अत्यंत अचंबा वाटला. खानास त्वेष चढून तो आपली सर्व फौज गोळा करून मराठ्यांवर चालून आला. त्या वेळेस मुरारबाजीचे कित्येक लोक जखमी झाले, व कित्येक मरणही पावले. मुरारची ढाल तुटली, तेव्हां हातास शेला गुंडाळून तिजवर तो शत्रूंचे घाव झेलून घेऊं लागला. त्या झटापटींत मुरारचा एक वार खानाचे अंगावर लागला. याप्रमाणें लढाई चालू असतां एकाएकीं खानानें सोडिलेला बाण मुरारबाजीस लागून त्याचें शीर उडालें, आणि तो शूर पुरुष एकदम गतप्राण झाला. त्याच्या संबंधानें अशी एक आख्यायिका चालू आहे कीं, मुरारबाजीचे शीर तुटल्यावर नुसत्या कबंधानें तीनशें मुसलमानांची कत्तल उडविली.

शिवाजीच्या नामांकित शूर सरदारांत मुरारबाजीची गणना होते. धन्याची नोकरी बजाविण्यांत आपले प्राण खर्ची घालून, त्यानें आपल्या राष्ट्राची कीर्ति अजरामर केली आहे. मुरारबाजीचें शव त्याचे लोकांनीं मुसलमानांचे हातीं लागूं न देतां त्याचे तुकडे जमवून रायगडास शिवाजीकडे पाठविले.* त्या वेळीं शिवाजीस किती दुःख झालें असेल, याची कल्पनाच केली पाहिजे.

मुरारबाजी पडला, तरी वरचा किल्ला मोगलांस मिळाला नाहीं. मराठे लोकांनीं आपला बंदोबस्त टेवून, मोगलांस वरचे कोटांत येऊं दिलें नाहीं.

---

* मुरारबाजीचें चरित्र व बाबाजी बोवाजीची हकीकत प्रभु रत्नमालेंतून घेतली आहे. त्यांत व ग्रांट डफच्या वगैरे वर्णनांत बारीक सारीक गोष्टींची तफावत आहे. पुरुषोत्तम कवीच्या शिवकाव्य नामक संस्कृत ग्रंथांत पांचव्या चमत्कारांत मुरारबाजीच्या पराक्रमाचें सुरस वर्णन दिलेलें आहे.

खालचे कोटांत त्यांचा प्रवेश झाला होता, परंतु वरून गोळ्यांचा एकसारखा भडीमार होत असल्यामुळें खालचा कोटही मोगलांस सोडून द्यावा लागला.

पुरंदरचे ईशान्येस वज्रगड म्हणून दुसरा एक लहानसा किल्ला आहे. त्यास रुद्रमाळ असें नांव होतें.‡ तो किल्ला बाबाजी बोवाजी व यशवंतराव बोवाजी या दोघां प्रभु बंधूंच्या ताब्यांत होता परंतु त्यांजवळ फौजेचा पुरवठा चांगला नव्हता. दिलीरखानानें त्या किल्ल्यास वेढा घातला, तेव्हां मुरारबाजी आपणास सोडविण्याकरितां पुरंदरावरून येईल या भरंवशावर रुद्रमाळच्या तुटपुंज्या लष्करानें मोगलांशीं पुष्कळ वेळ चांगलाच टिकाव धरिला. तेथें झालेल्या हातघाईत वरील दोन प्रभु सरदार पडले, आणि किल्ला मोगलांस मिळाला. रुद्रमाळच्या किल्ल्यावरून पुरंदरवर मारा चालविण्याची दिलीरखानानें खटपट केली; पण पावसाळा लागल्यामुळें व मोगलांचा तोफखाना चांगला नसल्यामुळें पुरंदरचे वरचे कोटावर मारा लागू होईना. इकडे पुरंदर किल्ल्यावरचे लोकही टेंकीस येऊन किल्ला स्वाधीन करणार होते. इतक्यांत तसें न करण्याबद्दल शिवाजीचा हुकूम आला व त्यांनीं आपला बेत रहित केला.

दिलीरखान पुरंदरास वेढा घालून बसला होता. शिवाजी शरण येणार असें त्यास वाटत होतें. तसें झाल्यास पुरंदर जिंकण्याची संधि हातची जाईल म्हणून खानास वाईट वाटलें आणि त्यानें खालील पत्र शिवाजीस लिहिलें:—

'महालदाराबरोबर तुमचें पत्र आलें तें पावलें. मजकूर कळला. तह करण्याची तुमची इच्छाही कळून आली. लढण्याच्या पूर्वीच तुम्ही तहाचें बोलणें करितां हें आश्चर्य आहे. अशा बोलण्याकडे लक्ष देणें हें आमच्यासारख्या बादशाही अधिकाऱ्यांस शोभत नाहीं. तुमच्या या डोंगराळ प्रदेशांत शिकार व नाच करण्यासाठीं आम्ही हिंदुस्थानांतून इतके दूर आलों आहों. आमची एवढीच इच्छा आहे कीं, तुम्ही एकदां येऊन आमच्याशीं सामना करावा. आम्ही पाहुणे तुमच्या मुलखांत आलों असतां पुढें येऊन आमचा समाचार घेण्याऐवजीं तुम्ही दूर राहतां हें योग्य नाहीं. तुमचे ते मजबूद किल्ले, गगनचुंबित पर्वत आणि पाताळास पोंचविणारीं खोरीं प्रत्यक्ष पहाण्याची आमची इच्छा असतां, तुम्ही तर कोठें दिसत नाहीं आणि

‡ मुंबई गॅझेटियर—पुणें भाग २.

पर तहाचें बोलणें. हा विचार तुम्हीं प्रथमच केला असता तर बरें झालें असतें. आतां तरी हा विचार सुचला हें चांगलें झालें.' शिवाजीच्या पूर्वीच्या पत्रांतले टोले यांत दिलीरखानानें परत केले आहेत.

५. जयसिंगाशीं शिवाजीची भेट, ( जून १६६५ ).—इकडे समुद्राच्या सफरीवरून शिवाजी परत येतांच, त्यास मोगलांची ही सर्व धामधूम कळली. जयसिंगाची कडेकोट तयारी पाहून पुढें विचार काय करावा ह्याजविषयीं त्यानें आपल्या सरदारांशीं वाटाघाट केली. शिवाजीनें शरण यावें, अशी जयसिंगाचीही आंतून खटपट होती. जयसिंगाच्या तडफेमुळें शिवाजीस दुसरे उपाय योजण्यास अवकाशच मिळाला नाहीं. त्यांतून जयसिंगापेक्षांही दिलीरखान ज्यास्त हट्टी होता. ह्या प्रसंगीं विजापुरशीं संधान लावण्यास शिवाजीस अवकाशच मिळाला नाहीं. नाहींतर विजापुरच्या मदतीनें शिवाजीनें मोगलांशीं चांगलेंच झुंज मांडिलें असतें. शिवाय पावसाळा जवळ आलेला होता. एकदां पाऊस सुरू झाल्यावर मोगलांचे प्रयत्न हलके पडले असते. हें सर्व जाणूनच दिलीरखानानें पुरंदरचा वेढा सक्तीनें चालविला. पुढे मुरारबाजी व तीनशें मावळे लोक पडल्याची बातमी कळली. मोठमोठे योद्धे कुटुंबसह पुरंदर किल्ल्यावर होते; किल्ला पडल्यास त्यांचा शेवट भलताच होईल असें वाटून शिवाजीचा निश्चय कायम झाला. शिवाय आजपावेतों जे जे उपाय अडचणीच्या प्रसंगीं शिवाजीनें योजिले, त्यांव्यतिरिक्त, जयसिंगास भेटून त्याची सल्ला घेणें हा एक निराळाच मार्ग शिवाजीनें आपल्या मनांत कायम केला. देवीचा कौल घेतां, 'या हिंदु राजाचा पराभव तुझे हातून होणार नाहीं. याजबरोबर तूं तहच कर,' अशी देवीची आज्ञा झाली. सामोपचारानें आपलें कार्य साधून घेण्याचा शिवाजीचा नेहमींचाच क्रम होता. हा मार्ग स्वीकारण्यांत तो भ्याला असें होत नाहीं. भीतीपेक्षां सुविचारच त्याच्या कृत्यांत दिसून येतो. जयसिंगासारख्या कर्तृत्ववान् पुरुषाशीं स्नेह जोडून पुढें आपला कार्यभाग हळू हळू उरकून घ्यावा असा त्याचा उद्देश असावा. तेव्हां शरण जाऊन तह करण्याचा निश्चय कायम होऊन रघुनाथपंडित यास 'पंडितराव' असा किताब देऊन, 'आपण भेटीस येतों' असें सांगण्यासाठीं त्यास जयसिंगाकडे पाठविलें. जयसिंग संस्कृत जाणणारा होता, म्हणून त्याजकडे विद्वान् रघुनाथपंडित यास

शिवाजीनें पाठविलें. 'रघुनाथपंडिताची बोलण्याची उमदेपणाची प्रौढी, सरकारी खातरजमेचा इमानी चाकर,' म्हणून त्यासच पाठविलें. जयसिंगानें ता. २० मे रोजीं त्याची भेट घेऊन कळविलें, 'शिवाजीच्या मनांत खरोखरच बादशहास शरण येऊन त्याच्या आज्ञेंत वागावयाचें असेल, तर त्यानें बिनहत्यारी येऊन आमच्या स्वाधीन व्हावें.' शिवाजीनें नाइलाज होऊन ही गोष्ट कबूल केली, आणि भेटीची व्यवस्था आगाऊ ठरवून तो थोड्या लोकांनिशीं पावसाळ्याच्या आरंभीं ता. ११ जून स. १६६५ रोजीं रायगडाहून जयसिंगाचे भेटीस निघाला. जगन्नाथपंत व त्र्यंबक त्र्यंकटेश हे दोन कारकून शिवाजीबरोबर होते. (खं. ८, १३).

इकडे शिवाजी भेटीस येणार त्यापूर्वी पुरंदर काबीज करण्याचा झटून प्रयत्न करावा, निदान मराठी फौजेस अगदीं हैराण करावें, असें जयसिंगानें मुद्दाम दिलीरखान व कीरतसिंग ह्यांस कळविलें; मतलब कीं शिवाजीकडून होईल तितकी फायदेशीर कबुली करून घ्यावी. त्याप्रमाणें ता. १२ जून रोजीं पुरंदर किल्ल्यावर जोराचा मारा करून ६० इसम ठार व पुष्कळ जखमी करण्यांत आले. ही लढाई चालू असतांच शिवापुरचा मोगल ठाणेदार सफिशिकनखान ह्याजबरोबर शिवाजी आपल्या भेटीस येत आहे अशी खबर आली. लगेच जयसिंगानें आपला सेक्रेटरी उदयराज ह्यास पुढे पाठवून शिवाजीला रस्त्यांतच खालील निरोप कळविला. 'शरण येऊन आमच्या आज्ञेंत राहावयाचें असेल आणि किल्ले आमच्या स्वाधीन करावयाचे असतील, तर आमच्या भेटीस या, म्हणजे तुम्हांस अपराधांची क्षमा करून जीवदान दिलें जाईल. तसें नसेल तर पुढें येण्याचें कारण नाहीं. तुमचा मुलूख व किल्ले काबीज करण्यास आतां आम्हांस फार वेळ लागणार नाहीं.' शिवाजीनें उत्तर दिलें, 'मी स्वतःच तुमचे भेटीस येत आहें, आणि बादशहाला शरण येऊन आपण ठरवाल त्याप्रमाणें करण्यास तयार आहें.' ह्या उत्तरानंतर एक तासानें शिवाजी येऊन पोंचला. पगारमास्तर जानीबेग ह्यानें शिवाजीला जयसिंगाचे तंबूंत आणिलें. जयसिंगानें चार पावलें पुढें येऊन शिवाजीला आलिंगन दिलें. अफझलखानासारखा कांहीं दगा वगैरे होऊं नये, म्हणून सशस्त्र रजपूत शिपाई सभोंवार उभे होते. शिवाजी अगदींच निःशस्त्र असून त्याच्या बरोबर उंची पोषाख व दागदागिने घातलेले मोठमोठे सरदार व वकील

होते. मीर्झा राजा त्यास सामोरा येऊन भेटला; आणि त्यास त्यानें मोठ्या सन्मानानें तंबूंत नेऊन आपल्या गादीवर बसविलें. शिवाजीचा एक मोठा सरदार आनंदराव त्याचे जोडे हातांत घेऊन जवळ उभा राहिला. असे हे शिवाजीचे विश्वासू व एकनिष्ठ सरदार पाहून मोगलांस मोठें आश्चर्य वाटलें. शिवाजी व जयसिंग यांनीं पुढें एकांतांत बसून पुष्कळ वाटाघाट केली, असा उल्लेख कांहीं ठिकाणीं आहे.

शिवाजीनें हळू व नम्रपणानें असें कळविलें कीं, 'बादशाहाशीं विरोध केल्याबद्दल मला वाईट वाटतें: आपण माझ्या अपराधांची क्षमा कराल तर पुरंदर व दुसरे पुष्कळ किल्ले मी स्वाधीन करितों, आणि बादशाही फौजेस मदत करितों.' जयसिंगानें शिवाजीस शपथपूर्वक अभिवचन दिलें कीं, 'तुमच्या जिवास अगर जिंदगीस अपाय होणार नाहीं.' लगेच गाजीबेग व मीरतुजूक हे आपले दोन सरदार व शिवाजीचा एक इसम ह्यांस त्यानें दिलीरखानाकडे पाठवून, 'लढाई तहकूब करावी, आणि किल्ल्यावरील शिवाजीच्या लोकांस निघून जाऊं द्यावें,' असा हुकूम पाठविला. गाजीबेगनें दिलीरखानास तो निरोप कळविला, आणि शिवाजीच्या सरदारानें वर किल्ल्यांत जाऊन किल्ला खालीं करून देण्यास आपल्या लोकांस फर्माविलें. त्यांनीं एका रात्रीची मुदत मागून घेतली.

पण दिलीरखानास हा प्रकार रुचला नाहीं. शिवाजी आपणाकडे न येतां परभारें जयसिंगाकडे गेला, आणि किल्ला पडण्याच्या ऐन प्रसंगीं आपल्या हातचा हा विजय नाहींसा झाला, ह्याजबद्दल खानास राग आला. त्यानें जयसिंगाचा हुकूम न मानतां लढाईचें काम चालविलें. पण जयसिंगानें युक्तीनें त्याचा राग शांत केला. शिवाजी अगदीं सडाच आला होता. त्याजबरोबर सामान सुमान कांहीं नव्हतें. म्हणून जयसिंगानें त्यास आपल्याच जागेंत रात्रीं भोजनास व निजण्यास ठेवून घेतलें; आणि त्यास परमादरानें वागविलें. दुसऱ्या दिवशीं रायसिंगास बरोबर देऊन जयसिंगानें शिवाजीस दिलीरखानाचे भेटीस रवाना केलें. शिवाजी नम्र भावानें खानाकडे येतांच त्याचा राग मावळला; आणि खानानें त्यास लगेच दोन घोडे, तलवार, जडावाचें काम केलेला खंजीर आणि दोन भरजरी सणगें नजर दिलीं. नंतर दिलीरखान स्वत: शिवाजीस बरोबर घेऊन जयसिंगाकडे आला, आणि त्यानें आपण होऊन शिवाजीचा

हात जयसिंगाच्या हातांत मिळविला. नंतर जयसिंगानेंही शिवाजीस पोषाख, घोडा, हत्ती व तलवार हे जिन्नस नजर दिले. शिवाजीजवळ हत्यार वगैरे कांहीं नव्हतेंच. त्यानें लगेच खुषी करून थोडा वेळ ती तलवार कमरेस लटकावली आणि म्हणाला, ‘ माझ्यापाशीं हत्यार नाहीं, तरी पण मी बादशहाची नोकरी मोठ्या इमानानें करीन. ’

दुसऱ्या दिवशीं म्ह. ता. १३ जून रोजीं चार हजार फौज व शिवाय तीन हजार बायकामुलें वगैरे मिळून सात हजार शिवाजीचे लोक पुरंदर किल्ला खालीं करून निघून गेले; आणि मोगलांनीं किल्ला ताब्यांत घेतला. सामानसुमान हत्यारें तोफा दारूगोळा वगैरे सर्व मोगलांनीं आपल्या कबजांत घेतलें. दुसरे पांच किल्ले ताब्यांत घेण्यासाठीं मोगलांचे व शिवाजीचे सरदार पाठविण्यांत आले.

पुढें बरीच वाटाघाट होऊन शिवाजी व जयसिंग यांचा तह ठरला. त्यास पुरंदरचा तह म्हणतात. त्याचीं कलमें:—१ शिवाजीनें तेवीस किल्ले व त्यांजखालील सुमारें ४० लक्षांचा मुलूख मोगलांस द्यावा; बारा किल्ले व चार लक्षांचा मुलूख शिवाजीकडे रहावा; ( २ ) शिवाजीनें परत जाऊन आपला मुलगा संभाजी ह्यास जयसिंगाचे हाताखालीं फौजेनिशीं नोकरी करण्यास पाठवावें; ( ३ ) आणि जरूर पडेल तेव्हां स्वतः शिवाजीनें येऊन बादशहाची नोकरी करावी.

ह्या पूर्वींच जयसिंगानें बादशहाकडे पत्र पाठवून, शिवाजी शरण आल्यास त्यास देण्यासाठीं बादशहाचें फर्मान व खिलत म्हणजे पोषाख वगैरे मागविले होते. तें फर्मान अकल्पित संयोगानें दुसऱ्याच दिवशीं आलें. त्याबरोबर जयसिंगाचे सांगण्याप्रमाणें शिवाजी सहा मैल पायीं चालून त्या फर्मानास सामोरा गेला, आणि बादशहाकडून आलेला पोषाख त्यानें धारण केला.

हा तह ठरून शिवाजी राजगडास परत गेला. परत जातांना आणखी अनेक वस्तु जयसिंगानें त्यास नजर केल्या. शिवाजीची जयसिंगाशीं भेट होऊन तहाची वाटाघाट झाल्यावर जयसिंगाच्या सांगण्यावरून शिवाजीनें तेथून बादशहास पत्र लिहिलें, तें व बादशहाकडून माफी लिहून आल्यावर त्याचे आभार मानण्याचें दुसरें पत्र पुढें शिवाजीनें

लिहिलें तें अशीं दोन पत्रें प्रो० सरकार यांनीं मॉडर्न रिव्यूंत छापिलीं आहेत, त्यांचा मतलब येणें प्रमाणें:—

'मी आपला गुन्हेगार व अपराधी आहें; आपणांस शरण येऊन, जीव व धनदौलत रक्षण करण्याची इच्छा धारण करीत आहें. इतःपर आपली नोकरी इमानानें बजाविण्यास मी सदैव तत्पर राहीन, आणि आपले हुकूम पाळण्यांत मोठें भूषण मानीन. वंडाळी करून मी आपल्या सर्वस्वाचा घात कधीं करून घेणार नाहीं. मीर्झा राजा जयसिंग यांनीं सर्व वर्तमान आपणांस तपशीलवार कळविलेंच आहे. मला सर्व अपराधांची क्षमा करून जीवदान द्यावें, एवढेंच या दासाचें आपल्या चरणांपाशीं मागणें आहे.'

'बादशाही शिक्का व पंजा यांनीं अलंकृत झालेलें आपलें कृपापूर्ण फर्मान येऊन दाखल झालें, ही आनंदाची बातमी मीर्झा राजा जयसिंग यांनीं आम्हांस कळविली. त्यायोगें बादशहांनीं मला जीवदान दिलें आहे. बादशहांकडून पोषाख आला, हें मला अत्यंत भूषण वाटत आहे. या पापी दासाचे अपराध क्षमेस पात्र नसतांही बादशहांनीं केवळ उदार अंतःकरणानें ही कृपा मजवर केली हें त्यांस मोठें भूषण आहे. फर्मान आल्याप्रमाणें मी आपले हुकूम पाळण्यास सदैव तत्पर राहीन. आतां मीर्झा राजांची रजा घेऊन घरीं जातों, आणि लढाईची तयारी करून फौज घेऊन विजापुरवर जाण्यासाठीं त्यांच्या मदतीस येतों. या युद्धांत कांहीं विशेष पराक्रम दाखवून पूर्वीचा काळिमा धुऊन काढावा, अशी आशा बाळगीत आहें; आणि येणेंकरून आपल्या अनंत उपकारांची अल्प तरी फेड माझ्या हातून होईल, अशी उमेद आहे.'

शिवाजी शरण आल्याची बातमी बादशहास ताबडतोबीनें म्हणजे अकराव्या दिवशीं कळली. इकडे ठरविलेला तह बादशहानें मंजूर केला, ही गोष्ट दिलीरखानानें शिवाजीस कळविली तें पत्र असें:—

'तुम्हांस कळविण्यास संतोष वाटतो कीं, आम्हीं विनंति केल्याप्रमाणें तुमच्या राजनिष्ठेचा बादशहांनीं स्वीकार केला आहे. इतकेंच नाहीं तर सहा हजारांची मनसब, दोन लाख रुपये बाक्षिस आणि निशाण व नौबत घेण्याची परवानगी तुमच्या मुलास देण्याचा हुकूम झाला आहे. सबब हें पत्र

पावतांच संभाजीला ताबडतोब इकडे पाठवून द्यावें. म्हणजे हुकमाप्रमाणें त्याजला या वस्तु देण्यांत येतील. यासंबंधानें तुमच्या वकिलास बादशहाचें परभारें पत्र गेलेंच आहे. हा आपला स्नेह व ऐक्यभाव परस्परांनीं कबूल केल्याप्रमाणें जगाच्या निदर्शनास यावा एवढीच इच्छा आहे. '

मीर्झा राजा जयसिंग शिवाजीवर आला, तेव्हां त्यानें आपल्याबरोबर मनूची यास तोफखान्याच्या कामासाठीं घेतलें होते. मनूची व शिवाजीची भेट झाली त्याची हकीकत त्यानें आपल्या पुस्तकांत दिली आहे, त्याचा गोषवारा येणें प्रमाणें. जयसिंगानें शिवाजीच्या प्रधानांस पैसे भरून त्यांजकरवीं आपल्याबद्दल शिवाजीच्या मनांत चांगला ग्रह उत्पन्न केला. जयसिंगानें शिवाजीस कळविलें, ' तुम्ही माझ्या शब्दावर पूर्ण भरंवसा ठेवून निःशंकपणें सांगतों असें कराल, तर बादशहाकडून तुमचे मनोरथ चांगले तडीस जातील.' जयसिंगाच्या वचनावर सर्वस्वी भरंवसा ठेवून शिवाजी आपण होऊन त्याचे भेटीस गेला. शिवाजी दाखल झाला तेव्हां सर्व कँपांत मोठी चळवळ उडून राहिली होती. ज्याला त्याला वाटे, शिवाजी काय गडबड उडवितो कोणास ठाऊक. परंतु त्याजबरोबर फारसे लोक नाहींत असें पाहून लोकांचीं अंतःकरणें शांत झालीं. जयसिंगाच्या तंबूला लागूनच शिवाजीला तंबू दिलेला होता; आणि पाहिजे तेव्हां पाहिजे तेथें जाण्याची त्यास पूर्ण मोकळीक होती. एके दिवशीं रात्रीं मनूची व जयसिंग पत्ते खेळत बसले असतां शिवाजी आंत आला. त्या वेळीं सर्वांनीं उठून त्याचा सत्कार केला आणि खालीं बसल्यावर, मनूचीकडे बोट दाखवून ' हे कोण ' असें जयसिंगास शिवाजीनें विचारिलें. शिवाजीपेक्षां मनूची बारा वर्षांनीं लहान म्हणजे त्या वेळीं ऐन ज्वानींत होता. जयसिंगानें सांगितलें, ' हे फिरंग्यांचे राजे आहेत. ' नंतर मनूची व शिवाजी यांचें पुष्कळ वेळां संभाषण झालें. मनूचीला उर्दू व हिंदुस्थानी दोनही भाषा चांगल्या येत होत्या. युरोपांतील राजांविषयीं व लोकांविषयीं नाना प्रकारची माहिती शिवाजीनें मनूचीपासून विचारून घेतली.

या एकंदर प्रकरणाची तपशीलवार हकीकत पुढें जयसिंगानें बादशहास लिहून कळविली, ती थोडीसी एकतर्फी असली तरी महत्त्वाची व येथें देण्यास योग्य आहे. ' आमची फौज पुण्याकडे येऊं लागली, तेव्हां शिवाजीचे कामगार त्याचीं पत्रें घेऊन माझ्याकडे येऊं

लागले; परंतु मी त्यांच्याकडे लक्ष दिलें नाहीं. शिवाजीचा चांगलाच पाडाव केल्याशिवाय त्याच्या शब्दावर किंवा वचनावर विश्वास ठेवणें योग्य नाहीं हें मी जाणून होतों. पुढें करमाजी नांवाचा त्याचा एक कामदार हिंदींत लिहिलेलें एक पत्र घेऊन आला; आणि अत्यंत आर्जवें करून सांगूं लागला, 'एकवार पत्रांतील मजकूर वाचून उत्तर देण्याची मेहेरबानी करा.' तेव्हां मी शिवाजीचें पत्र वाचलें, त्यांत खालील मजकूर होता. 'मी बादशहाचा बंदा नोकर आहें; आणि मी लहान असलों तरी बादशहाचा पुष्कळ फायदा करूं शकेन. कोंकणच्या ह्या डोंगराळ प्रदेशांत लढण्याचा त्रास करण्यापेक्षां, विजापुरचा मुलूख आपल्यास सहज जिंकतां येईल.' त्यावर मी जबाब लिहिला, कीं 'बादशाही फौज आकाशांतील ताऱ्यांप्रमाणें असंख्य आहे. तुमचा पाडाव करण्यासाठीं ती आली आहे. तुमचा डोंगराळ व खडकाळ प्रदेश तिला दुर्गम आहे असें नाहीं. आमच्या अश्वांच्या पायांखालीं कसल्याही अवघड प्रदेशाची धूळ होईल. तुम्हाला जर जीव वांचवावयाचा असेल, तर बादशहाची गुलामगिरी धारण करून शरण या. अशी गुलामगिरी करण्यांत आमच्या सारख्या सरदारासही भूषण वाटतें. आतां तुम्ही आपल्या किल्ल्यांची व डोंगरांची आशा सोडा. असें न कराल, तर आपल्या हातानें तुम्ही आपली खराबी करून घ्याल.' ह्यावर शिवाजीनें आणखी अनेक पत्रें पाठविलीं. इकडे आमच्या फौजेनें त्याचा समाचार घेण्याचा सपाटा चालविला, तेव्हां बादशहास खंडणी देऊन एक दोन किल्ले स्वाधीन करण्यास तो कबूल झाला. त्यावर पुनः मी पहिल्याप्रमाणेंच जबाब पाठविला. पुढें आमच्या फौजेनें पुरंदर नजीकचा रुद्रमाळ किल्ला काबीज केला. आम्हीं आणखी फौजा त्याचे दुसरे प्रांत काबीज करण्यास पाठविल्या; आणि कांहीं फौज तर सारखी फिरती ठेवून सर्व मुलखांत धुमाकूळ उडवून दिला. बादशाही फौजेनें आपलें काम उत्कृष्ट केलें. मीही प्रत्येक ठिकाणीं जाऊन व्यवस्था पाहत होतों. अशी आमची करामत पाहतांच शिवाजी उघडपणें लोकांस सांगूं लागला, कीं 'आतां आपला निभाव ह्या मोगल फौजेपुढें लागत नाहीं.' इकडे पुरंदरचा वेढा मोठ्या निकरानें चालूच होता. पांच बुरूज व एक तट काबीज झाले; शिवाजीचा पुष्कळ मुलूख उजाड झाला. त्याच्या फौजेंतील पुष्कळ लोकांस फोडून मी मोठें आमिष दाखवून बाद-

शाही फौजेंत दाखल केलें. जावळीस खेळो भोसला पांचशें फौजेसह होता, त्यास मोठ्या युक्तीनें फोडून आमच्याकडे आणण्याचा प्रयत्न जारीनें चालू आहे. अशा स्थितींत शिवाजीला दोन मार्ग राहिले. एक, बादशहास शरण येऊन आपल्या जीविताचें व वित्ताचें रक्षण करावें, नाहीं तर तळकोंकणचा विजापुरचा प्रदेश आदिलशहास परत देऊन, त्यास जाऊन मिळावें, आणि दोघांनीं मिळून आमच्याशीं सामना करावा. ह्यांपैकीं पहिलाच मार्ग शिवाजीच्या फायद्याचा होता हें उघड आहे.

'इकडे गुप्त हेरांकडून मला अशी खात्रीलायक बातमी कळली कीं, आदिलशहा बाह्यत: आमच्याशीं गोडी दाखवून, आंतून शिवाजीशीं संगनमत करून, त्याच्या मदतीस कोंकणांत फौज पाठवीत आहे. आतां शिवाजी व आदिलशहा ह्या दोघांशीं सामना करणें जरी बादशाही फौजेस अशक्य नाहीं, तरी युक्तीनें कार्य साधल्यास विलंब कां करावा, असें मनांत आणून, शिवाजीला विजापुरकडे जाऊं देणें मला बरें वाटलें नाहीं. इतक्यांत ता. २० मे रोजीं शिवाजीचा विश्वासु व विद्वान गुरु रघुनाथ पंडितराव गुप्त बोलणें करण्यासाठीं माझ्याकडे आला; आणि हिंदु रिवाजाप्रमाणें अत्यंत पवित्र शपथा घेऊन शिवाजीच्या मनोदयाविषयीं त्यानें खातरजमा केली. त्यावर मीं कळविलें, कीं 'शिवाजीशीं तह करण्याची बादशहाची मला परवानगी नाहीं. म्हणून उघडपणें मला शिवाजीशीं बोलणें करतां येत नाहीं. तत्राप शिवाजी नि:शस्त्र होऊन अपराधी म्हणून क्षमा मागण्यास येईल व क्षमा मागेल तर, परमेश्वरस्वरूपी बादशहाच्या दयेचा ओघ कदाचित् त्याजकडे वळेल.' त्यावर रघुनाथपंडित परत गेला; आणि पुन: निरोप घेऊन आला, कीं 'शिवाशी आपला मुलगा संभाजी ह्यास सदरप्रमाणें पाठविण्यास तयार आहे.' त्यावर मी रघुनाथ पंडित यास कळविलें, 'संभाजी येऊन चालावयाचें नाहीं.' पुढें शिवाजीनें अशी विनंति केली, कीं 'आमच्या जीवितास अपाय होणार नाहीं, असें वचन बादशहाच्या तर्फेनें आपणास उघड देतां येत नसेल, तर निदान तुम्ही आपलें खासगी वचन द्या, म्हणजे त्यावर भरंवसा ठेवून मी नि:शंक आपणास येऊन भेटतों.' असें वचन देऊन व ठराव करून मीं शिवाजीस पुन: बजाविलें, कीं 'तुम्ही आमच्या भेटीस येऊन बादशहाचे हुकूम पाळण्याचें कबूल कराल तर, तुमच्या अपराधांची क्षमा होऊन

बादशाही कृपेस पात्र व्हाल. भेटींत ही गोष्ट तुम्हास कबूल झाली नाहीं तर सुरक्षितपणें परत जाण्याची परवानगी मिळेल. '

'ता. ९ जून स. १६६५ रोजीं रघुनाथ पंडित परत गेला; आणि ता. ११ रोजीं सकाळीं एक प्रहर दिवसास मी दरबारांत बसलों असतां पंडितानें येऊन कळविलें कीं, 'शिवाजी ठरल्याप्रमाणें आपल्या भेटीस आले आहेत; बरोबर सहा ब्राह्मण व पालखीसह भोई आहेत.' लगेच मी उदयराज मुनशी व उग्रसेन कछवा ह्यांस शिवाजीकडे रस्त्यांत पाठवून कळविलें कीं, ' सर्व किल्ले स्वाधीन करून देण्यास कबूल असाल तर पुढें या, नाहीं तर आल्या पायीं माघारे जा. ' त्यावर शिवाजीनें उत्तर पाठविलें, ' मी आतां बादशाही नोकरींत दाखल झालों आहें; आणि माझे पुष्कळ किल्ले बादशहास देण्यास मी कबूल आहें. ' असें बोलून त्याच गृहस्थाबरोबर शिवाजी आंत आला. जानीबेग बक्षी यास तंबूचे दाराशीं पाठवून त्याजकरवीं मीं शिवाजीस आंत आणिलें. याच वेळेस आम्ही आगाऊ ठरवून ठेविल्याप्रमाणें दिलीरखान व कीरतसिंग ह्यांनीं पुरंदर किल्ल्याचा खालचा कोट काबीज केला. तेथील धुराचा लोट व लढाईची हातघाई आमचे तंबूतून दिसत होती. शिवाजीनें हा प्रकार पाहून लगेच पुरंदर किल्ला स्वाधीन करण्याचें कबूल केलें. मी म्हणालों, ' पुरंदर किल्ला तर आम्हीं घेतलाच आहे. आतां थोडक्याच वेळांत आमच्या तलवारी आंतील सर्व लोकांची कत्तल करतील. बादशहास नजर करण्यासाठीं दुसरे किल्ले तुमच्या जवळ पुष्कळ आहेत. ' त्याबरोबर शिवाजीनें विनंती केली कीं, 'पुरंदरच्या लोकांची कत्तल करूं नका. मीच किल्ला खालीं करून देतों.' मी बरें म्हणून लगेच गाजीबेग व शिवाजीचा एक इसम अशा दोघांस दिलीरखानाकडे पाठविलें; आणि ' किल्ला ताब्यांत घ्या व आंतील लोकांस निघून जाऊं द्या ' असें कळविलें. किल्ला खालीं झाल्याची हकीकत आपणांस पूर्वी कळविलीच आहे. मीं आपल्या दिवाणखान्यांत शिवाजीला राहवून घेतलें. सुरतसिंग कछवा व उदयराज मुनशी ह्यांच्या मार्फत शिवाजीशीं पुष्कळ बोलणीं झालीं. मध्यरात्रपर्यंत प्रश्नोत्तरें, विनवण्या व क्षमेचीं आर्जवें, वगैरे प्रकार झाले. एक सुद्धां किल्ला कमी घेण्यास मी कबूल नाहीं असें मीं त्यास साफ सांगितलें. अशा रीतीनें बोलणीं होऊन खालील मुद्दे ठरावांत आले. चार लक्ष होन वसुलाचे लहान मोठे २३ किल्ले

बादशाही मुलखास सामील करावे; आणि राजगड वगैरे बारा किल्ले स्वतः-कडे ठेवून शिवाजीनें राजनिष्ठ राहून बादशहाची नोकरी करावी. शिवाजीनें अशीही विनंती केली कीं, 'आजपर्यंत मी अन्यायानें वागल्यामुळें मला बादशहांकडे तोंड दाखविण्यास जागा नाहीं. म्हणून त्यांच्या नोकरीस मी आपला मुलगा संभाजी पाठवून देतों. मी तर गुन्हेगार असून इतःपर बादशहाशीं बेइमान करणार नाहीं. दक्षिणेंत मला जी कामगिरी सांगण्यांत येईल ती मी करीन.'

'हे ठराव प्रथमच आपणास कळवून अपली मंजुरी त्यांस आणावयाची खरी, परंतु तसें करण्यास वेळ नव्हता. शिवाजी इतके दिवस येथें राहण्यास खुशी नव्हता. त्यास मी शपथपुरःसर अभयवचन दिल्यावरही जर तें वचन मोडून अडकवून ठेवावा, तर त्याचे हे दोन परिणाम होतील. या बाजूचे जहागीरदार, पाळेगार, नाईक वगैरे लोकांचा विश्वास आमच्या वचनावरून साफ उडून जाईल. वास्तविक आमचीं वचनें सिकंदरच्या तटाप्रमाणें सदैव भक्कम असलीं पाहिजेत. दुसारा परिणाम असा कीं, शिवाजी आमचे भेटीस आला, तो राज्याची व दौलतीची संपूर्ण निरवा निरव करून आला. जर कदाचित् आमचे कडून त्याच्या जिवास अपाय झाला, तर मागें सर्व व्यवस्था नीट चालावी, अशी त्यानें सोय करून ठेव ल्याची पक्की बातमी आम्हांस लागली. म्हणजे केवळ शिवाजी आमचे ताब्यांत आल्यानें, सर्व काम भागत होतें असें नाहीं.*

हे दोन परिणाम मनांत घेऊन मीं शिवाजीस दिलेलें वचन पाळून त्याची विनंती मान्य केली. दुसरे दिवशीं किल्ले आमच्या हवालीं करण्याविषयीं मीं त्यास तगादा लाविला. तेव्हां त्यानें आपला कामदार रोहिडा किल्ला स्वाधीन करून देण्यास पाठविला. मींही सुजनसिंहाचा भाऊ इंद्रामण ह्यास किल्ला ताब्यांत घेण्यास कळविलें त्याचप्रमाणें, लोहगड, इसागड ( विसापुर ) तुंग, व तिकोना हे किल्ले आमचे हवालीं करण्यासाठीं शिवाजीनें दुसरा कामदार पाठविला. हे चार किल्ले एकाच ओळींत जवळ जवळ आहेत. मीं ते किल्ले स्वाधीन करून घेण्यास कुतबूखानास पाठविलें. कोंडाण्यासंबंधानें शिवाजी बोलला, 'मी स्वतःच परत जातांना कोंडाणा किल्ला

* संभाजीच्या वधानें हाच प्रकार पुढें प्रत्यक्ष बादशहाचेही नजरेस आला.

खालीं करून मग राजगडास जाईन; आणि दुसरे किल्ले स्वाधीन करण्यास संभाजीला पाठवीन.'

'शिवाजी माझ्याकडे आल्याची बातमी अजून बाहेर फुटली नव्हती, तोंच म्हणजे ता. १३ जून रोजीं मी शिवाजीला हत्तीवर बसवून व राजा रायसिंगास बरोबर देऊन त्यास दिलीरखानाकडे पुरंदरचे माचीस पाठविलें. तेथून परत आल्यावर ता. १४ जून रोजीं त्याला एक हत्ती व दोन घोडे बक्षीस देऊन कीरतसिंगाबरोबर त्याची परत रवानी करून दिली. दुपारीं तो कोंडाण्यास पोंचला; लगेच त्यानें किल्ला माझ्या मुलाचे स्वाधीन केला. तेथून पुढें उग्रसेन कछवा ह्यास बरोबर घेऊन शिवाजी राजगडास गेला. उग्रसेनाबरोबर संभाजीस आमचेकडे पाठविण्याचें ठरलें होतें.

'ता. १५ रोजीं शिवाजी राजगडास पोंचला. ता. १६ रोजीं सर्व व्यवस्था करून ता. १७ रोजीं उग्रसेनाबरोबर त्यानें संभाजीस आमचेकडे रवाना केलें; तो ता. १८ रोजीं आमच्या छावणींत दाखल झाला. संभाजीला मीं आपल्याच तंबूंत ठेवून घेतलें. त्याच दिवशीं रोहिडा व लोहगड वगैरे किल्ले ताब्यांत आल्याची खबर आली. ह्या सात किल्ल्यांच्या किल्ल्या मीं गाजीबेगच्या हातीं आपल्याकडे रवाना केल्या आहेत. त्याचा मुलगा संभाजी दाखल झालाच आहे, तेव्हां आतां बाकीचे किल्ले ताब्यांत घेऊन त्यांच्याही किल्ल्या आपल्याकडे रवाना करितों.

'पुरंदर किल्ला काबीज करण्यासाठीं जेवढी रक्कम माझ्या नांवें खर्च पडली आहे, म्हणजे रोख रुपये तीस हजार व शिवाय दारूगोळा, तेवढी रक्कम ह्या सोबत आज मी आपल्याकडे परत भरणा करीत आहें. बाकी माझा देह आपल्या खिदमतीस अर्पण केलेला आहेच.

'आतां शिवाजीकडे अजून बारा किल्ले राहिले, ही गोष्ट खरी. परंतु त्याचे सर्व डोंगरी किल्ले त्याजकडे असतांच आम्ही त्यास जेरीस आणून शरण येण्यास लाविलें; आणि हल्लींही त्याच्या सभोंवार आमच्या किल्यांचा वेढा कायम आहेच. तेव्हां कराराप्रमाणें चालण्यास शिवाजी यत्किंचित् हयगय करील तर त्याचा नाश करण्यास आतां आपणांस विलंब लागणार नाहीं. त्याच्या मुलास पंचहजारी मनसब कबूल केली आहे; ही म्हणजे ह्यापूर्वींच शिवाजीच्या सरदारांस इकडून दिलेल्या मनसबींपेक्षां ज्यास्त नाहीं. मला वाटतें ही मनसब व जहागीर औरंगाबादचे सुभ्यांत

द्यावी; कारण तेथें ती वाटेल तेव्हां खालसा करितां येईल. आतां विजापुरचे कांहीं प्रांत शिवाजीच्या ताब्यांत आहेत. परंतु विजापुरशीं युद्ध करून तें राज्य काबीज करण्यास हा समय चांगला आहे; त्यांत शिवाजी मदत करण्याचें कबूल करीत आहे. तेव्हां हा कार्यभाग प्रथम उरकून घ्यावा, हें मला बरें दिसतें. ह्यासंबंधानें आपला मनोदय ताबडतोब दुसरे कोणास न कळवितां माझ्याकडेच लिहून यावा. तसेंच शिवाजीच्या मागण्यासंबंधानें आपला काय विचार आहे, तो खुलासेवार कळवावा. आपलें फर्मान शिवाजीच्या नांवचें येईल त्यांत मीं केलेले ठराव कबूल आहेत, आणि सर्व किल्ले ताब्यांत आल्यावर दुसरें नवीन फर्मान पाठविण्यांत येईल, असा उल्लेख असावा.'

ता. १४ जून रोजीं कोंडाणा शिवाजीनें खालीं करून दिला. किल्ल्यावर शिवाजीची आई व बायको यांची पुष्कळ आप्त मंडळी होती, ती सर्व व फौजसुद्धां सात हजार लोक निघून गेले. ता. १८ जून रोजीं संभाजी जयसिंगाचे छावणींत हजर झाला, आणि त्यास बादशहाचे हुकुमानें जयसिंगानें पांच हजारांची मनसब दिली.

मराठी बखरींतून ह्या प्रकरणाची थोडीशी निराळी हकीकत मिळते. जयसिंग तहाचें बोलणें करूं लागला, ह्याचें कारण मोगल फौजेची पुष्कळ दुर्दशा झाली होती. 'मराठ्यांनीं एकाएकीं येऊन रात्रीं दिवसा छापे घालावे, त्यांस विजय प्राप्त व्हावे; रस्ते, नाकीं, चोरवाटा सर्व बंद ठेवून त्यांनीं पाळतीवर राहवें, व रानांस आग लावून मोगल फौजेचा पिच्छा पुरवावा, अशा रीतीनें मुसलमानी फौज अगदीं हैराण होऊन त्यांचे असंख्य लोक व जनावरें प्राणांस मुकत होतीं ( खाफीखान, गॅझेटियर ). तेव्हां जयसिंगानेंही तहाचें बोलणें मान्य करण्यांत शहाणपणाच दाखविला. तो पंडितरावास म्हणाला, 'औरंगजेब बादशहा बलवान, पृथ्वीपति, त्याशीं तुम्ही सख्य करावें; शत्रुत्वानें राहून, या काळीं परिणाम लागणार नाहीं. आम्ही हिंदु जयपुरचे राजे; तुम्हीही उदेपुरचे थोर घराण्याचे वंशज, तुम्ही हिंदुधर्म स्थापन करितां, यास्तव आम्ही तुम्हांस अनुकूल आहोंत; तुम्ही बादशहास शरण याल तर त्यजकडून तुम्हांस माफी देववून कांहीं मुलूखही जहागीर देववूं; याजबद्दल रजपुतांची आणभाक घेऊन तुमची खात्री करण्यास आम्ही तयार आहों.' असें बोलून व दिलीरखानाचा

सल्ला घेऊन जयसिंगानें शिवाजीस भेटीस बोलाविलें. त्याप्रमाणें भेट घेण्याचा विचार ठरून शिवाजीनें सफेत पोषाख केला; आणि पांचपंचवीस मातबर माणसें व थोडी फौज व इतमाम बरोबर घेऊन रायगड सोडून, प्रतापगड, जावळीच्या मार्गानें सिंहगडनजीक राजा जयसिंग याचे छावणींत शिवाजी गेला. शिवाजी आल्याचें जयसिंग यास कळतांच तंबूच्या बाहेर येऊन त्यानें शिवाजीस आलिंगनपूर्वक भेटून तंबूंत आणिलें, आणि आपले उजवे बाजूस बसवून प्रेमादरानें संभाषण केलें. त्या वयातीत थोर रजपूत राजाचा शिवाजीनेंही चांगला सन्मान ठेविला. शिवाजी म्हणाला 'तुम्हांस जे गड पाहिजेत ते मी देतों, पुरंदर देतों, निशाण तुमचें चढवितों, पण मुसलमानांस यश न देणें; मी हिंदु; आपण रजपूत, तेव्हां हिंदूच; राज्य मूळचें हिंदूचें; आपणासारख्या विद्वान् व हिंदुधर्माचें रक्षण करणाऱ्या थोर पुरुषापुढें मी आपलें डोकें एकदां सोडून दहादां नमवीन. आपण आपल्या धर्माची व देशाची मानहानि होईल, असें कधींही करणार नाहीं.' असे गंभीर उद्गार काढून, शहाणपणानें सुचवून शिवाजीनें जयसिंगाचा लुप्त धर्माभिमान जागृत केला. शिवाजीची थोरवी त्यास कळून आली. तथापि दिलीरखानाच्या सल्ल्याशिवाय तह केल्यास, 'हिंदूस हिंदू मिळाला,' अशी आपणाबद्दल तो बादशहाकडे कागाळी करील, असें जाणून, त्यानें प्रथमत: दिलीरखानाची भेट घेण्यास शिवाजीस सांगितलें. जयसिंगाकडे मुख्य अधिकार होता खरा; तरी त्याजवर दाब ठेवण्यास म्हणून दिलीरखानास बादशहानें बरोबर दिलें होतें. म्हणून आपला मामा सुभानसिंग व मुलगा कीर्तिसिंग व स्वतःचे ५० रजपूत शिपाई शिवाजीबरोबर देऊन त्यास जयसिंगानें खानाकडे पाठविलें. पुरंदर किल्ला सर करण्यापूर्वी शिवाजी तहाचें बोलणें करण्यास आला, हें पाहून दिलीरखान जरासा खट्टू झाला. परंतु 'शिवाजी राजे तह करून पाहिजे ते किल्ले स्वाधीन करून देण्यासाठीं आले आहेत,' असे सुभानसिंगाचे मधुर शब्द कानीं पडतांच, नाइलाज होऊन, 'जयसिंग वडील आहेत, ते करतील त्यांत आपण आहों,' असें म्हणून त्यानें शिवाजीस निरोप दिला. पुढें शिवाजी व जयसिंग यांच्या कांहीं बैठकी होऊन कलमें ठरलीं, तीं शिवाजीच्या अर्जासोबत बादशहाकडे रवाना होऊन तिकडून जबाब आल्यावर तह कायम झाला.

घांटमाथ्यावरील विजापुरचे मुलखांतून चौथाई व सरदेशमुखी हे हक्क स्वतःचे खर्चानें वसूल करण्याची बादशहानें शिवाजीस मुभा ठेवावी, व त्याबद्दल शिवाजीनें दरसाल ११ लाख रुपयांच्या हप्त्यानें एक कोटि चाळीस लक्ष रुपये नजराणा म्हणून द्यावा, असें ह्या तहांत एक कलम बखरींत आहे.

या तहांतील कलमें दोघांच्याही फायद्याचीं होतीं. त्यांतून विशेषतः शेवटचें कलम कबूल झाल्यानें शिवाजीस विजापुरचे मुलखावर वाटेल तसा हात मारतां येण्याची सोय झाली. जयसिंगाच्या ह्या कामागिरीसंबंधानें अनेक मुद्दे लक्षांत ठेवण्यासारखे आहेत. जयसिंगानें कपट करून हिंदूस हिंदु मिळाला, असे दिलीरखान वगैरे मंडळींनीं त्याजवर आरोप आणिले. विजापुरवरील युद्धांत पुढें जयसिंगास यावें तसें यश आलें नाहीं, यामुळें बादशहाचा त्याला ठपका आला. तितक्यांत पुढें शिवाजीही बादशहाचे कैदेंतून सुटून पुनरपि मोगलांशीं लढूं लागला, तेव्हां औरंगजेबास ज्यास्त चीड येऊन शिवाजीला सर्व कूस जयसिंगाची व त्याच्या मुलांची आहे असेंही बादशहाचे मनानें घेतलें. वृद्धापकाळीं अशी ही मानखंडना जयसिंगास दुःसह झाली. ज्या बादशाहीची बारा वर्षांच्या वयापासून आपण इतकी एकनिष्ठेनें पन्नास वर्षे सेवा केली, त्या बादशाहींत आपला शेवटीं असा अपमान होऊन आपल्या राजनिष्ठेचाच संशय बादशहास आला, याबद्दल त्यास अत्यंत वाईट वाटून तो लवकरच पुढें दक्षिणेंत असतां मरण पावला. पण शिवाजीच्या प्रकरणीं जयसिंगानें यत्किंचित् कपट केलें नाहीं, हें उघड दिसतें. तीन महिन्यांचे अवधींत जयसिंगानें शिवाजीस शरण येण्यास भाग पाडिलें, ही एकच गोष्ट जयसिंगाच्या राजनिष्ठेची साक्ष देण्यास पुरे आहे. शिवाजीला जिंकणें अशक्य होतें. आजपर्यंत मी मी म्हणणारांची त्यानें खोड मोडिली होती. अनेक शत्रु व संकटें असतां त्यानें स्वतंत्र राज्य निर्माण केलें. आणखी चार दोन महिने त्यानें कसे तरी निभावून नेले असते. पुढें पावसाळ्यांत त्यानें मोगलांस पुरेपुरेसें करून सोडिलें असतें. विजापुरचा पाठिंबा त्यास मिळण्याचा संभव होता. शिवाजी मरण पावल्यावर व संभाजीचा वध झाल्यावर प्रत्यक्ष बादशहास मराठ्यांपुढें हार खावी लागली, ह्यावरून जयसिंगाच्या थोरपणाची परीक्षा होते; आणि त्यानें म्हणून इतकें तरी केलें, दुसऱ्याच्या

हातून इतकेंही न होतें. तेव्हां जयसिंगाच्या एकनिष्ठतेबद्दल बादशहाकडून त्यास शाबासकीच मिळावयास पाहिजे होती.

शिवाजीच्या दृष्टीनेंही या प्रकरणाचा विचार झाला पाहिजे. शत्रूस हुलकावण्या दाखवून नाना उपायांनीं त्यांस जेरीस आणणें हा त्याचा नेहमींचा क्रम या प्रसंगीं शिवाजीनें कायम ठेविला नाहीं. मोगलांची भीति वाटून तो शरण आला, हें तर मुळींच संभवत नाहीं. तो मोठा समयज्ञ होता. मनुष्याची परीक्षा त्यास होती. जयसिंगाची भेट घेऊन, त्याचा सल्ला घेऊन, आपला हा राष्ट्रीय उद्योग त्यास समजावून देऊन, औरंगजेबाचे उद्देश व त्याचें हृद्गत त्याजकडून समजून घेऊन, तदनुसार आपल्या उद्योगाचें पुढील स्वरूप ठरवू, असें शिवाजीच्या मनांत खास होतें. अफझलखानाशीं तसा प्रसंग झाला, जयसिंगाशीं असा प्रसंग करून पाहूं, असें त्यास वाटलें. कसें झालें तरी जयसिंग हिंदु होता, क्षत्रिय होता, रजपूत होता, त्याजकडे निःशस्त्र व निर्भय जाण्यास शिवाजीस शंका वाटली नाहीं. अफझलखानाच्या व जयसिंगाच्या भेटींमधील विरोध अनेक दृष्टींनीं मोठा हृदयंगम वाटतो. २० मे रोजीं रघुनाथपंत जयसिंगास भेटला, आणि त्यानें जयसिंगाचे मनांत शिवाजीबद्दल आदर उत्पन्न केला. ११ जून रोजीं शिवाजीनें जयसिंगाची भेट घेतली. दोन दिवस तो त्याच्याच घरीं पाहुण्यासारखा राहिला. त्या वेळीं निजणें बसणें, जेवणखाण सर्व जयसिंगाचेच येथें शिवाजीनें केलें. अर्थात् उभयतांचें यथेच्छ संभाषण झालें असलें पाहिजे. अशा कांहीं व्यक्ति असतात कीं, एकवार त्यांची गांठ पडल्यावर त्यांची छाप आपल्यावर बसल्याशिवाय राहत नाहीं. शिवाजी अशा व्यक्तींपैकीं होता. पाहिजे तशा व्यक्तीवर तो आपली छाप बसवीत असे. दुर्दैवानें औरंगजेबाची व त्याची अशी गांठ पडली नाहीं, नाहीं तर बादशहाकडूनही त्यानें फायदा करून घेतला असता. थोडेंसें संभाषण झाल्यावर शिवाजीचा सद्धेतु व राष्ट्रप्रेम यांचा परिणाम जयसिंगाचे मनावर तेव्हांच झाला. जयसिंगानें बादशहाचा व शिवाजीचा मिलाफ करून दोघांच्याही हिताचा मार्ग सांगितला. शिवाजीनें बादशहास भेटावें, आपली राजनिष्ठा नम्रपणें व्यक्त करावी, आणि बादशहानें शिवाजीचा योग्यप्रकारें सत्कार करून त्याजकडून राज्याची सेवा घ्यावी; शिवाजी हा मोगल बादशाहीचा एक मजबूद खांब व्हावा, अशा प्रकारची जयसिंगाची योजना होती. केवळ

बाह्य देखाव्याकडे नजर न देतां खरा मतलब साधून घेण्याची युक्ति जयसिंगानें शिवाजीस सांगितली. जयसिंगानें बादशहास लिहिलेल्या पत्रावरून त्याचें मुत्सद्दी शहाणपण चांगले व्यक्त होतें. त्यांत दोनही बाजूंचा त्यानें यथायोग्य विचार केलेला आहे. शिवाजी भिऊन शरण आला नाहीं, हें त्यावरून सिद्ध होतें. कदाचित् आपले जिवास कमजास्त झाल्यास राज्याची सर्व व्यवस्था करून नंतर तो भेटीस गेला. बादशहाच्या अविश्वासी स्वभावामुळें जयसिंगानें रचिलेला घाट पुढें बिघडला, त्याचा दोष जयसिंगाकडे येत नाहीं. तो घाट सिद्धीस जाता तर रजपूतराजांप्रमाणेंच शिवाजी हा एक मांडलिक राजा बनला असता. शिवाजीनें आपले करार यथायोग्य पाळिले. पुढें तो बादशहावर उठला, त्याची जबाबदारी जयसिंगाकडे नाहीं.

ह्या प्रसंगानिमित्त बादशहा व जयसिंग ह्यांजमध्यें जो पत्रव्यवहार झाला, तो पॅरिस येथील नॅशनल लायब्ररीच्या लेखांत प्रो. जदुनाथ सरकार ह्यांस उपलब्ध झाला. त्यावरूनच मागील पुरंदरच्या वेढ्याची हकीकत त्यांनी मॉडर्न रिव्ह्यूमध्यें जुलई १९०७ त छापिली. परंतु तो पत्रव्यवहार तेथेंच बंद झाला. त्यापुढचा उपलब्ध नसल्यामुळें, शिवाजी पुढें बादशहाचे भेटीस गेला, त्यासंबंधाची तितकी तपशीलवार व भरंवशाची हकीकत मिळत नाहीं. त्यामुळें शिवाजी कोणत्या उद्देशानें गेला, तेथें त्याचा व बादशहाचा बेबनाव कसा झाला, आणि त्या प्रसंगांतून त्यानें आपली सुटका कशी करून घेतली, ह्यांविषयीं नाना प्रकारचे तर्कवितर्क अद्यापि चालू आहेत.

शिवाजीचा व बादशहाचा तह ठरला, त्या वेळीं बादशहाचें खालील पत्र शिवाजीस आलें. ( खं.८–१४ ).

'........मुसलमानी धर्मरक्षक शिवाजीराजे यांनीं बादशाही कृपेचे उमेदवार होऊन जाणावें, कीं सांप्रत तुमचें पत्र बहुत नरमाईचें राजे जयसिंग यांची भेट, आपलें केलेलें कृत्य माफ व्हावें, म्हणोन घेतल्याचें, पावून मजकूर ध्यानास आला. यापूर्वी तुमचे मनांतील हांशील सरकारकामदारांनीं समजाविलें होतें, कीं तुम्ही आपले कृत्याचा पश्चात्ताप करून या दौलतीचे आश्रयास येऊन, वीस किल्ले आपणाकडील इकडील कामदारांचे स्वाधीन करून, बारा किल्ले व त्या खालचा मुलूख एक लक्ष होनांचा,

निजामशाहीचे किल्ले व मुलखापैकीं, त्याच प्रकारें आणखी चारलक्ष होनांचा मुलूख तळ कोंकणांतील विजापुरकरांचे इलाख्याचा जो हल्लीं तुम्हांकडे चालत आहे, व पांचलक्ष होनांचा मुलूख बालाघाटापैकीं विजापुरकरांचे इलाख्यांतील, येणेंप्रमाणें एकंदराचा फर्मान बादशाही मागतां व चाळीस लाख होन, दरसाल तीन लाख प्रमाणें पेशकशीबद्दल देऊं म्हणतां; ऐसीयास, तुमच्या गोष्टी, ज्या तुम्हीं दूर अंदेशा न पाहतां केल्या, त्या माफीजोग्या नाहींत. तथापि राजे जयसिंह यांणीं लिहिल्यावरून सर्व माफ करून तुमचे मनोरथाप्रमाणें बारा किल्ले, ज्यांचा तपसील खालीं लिहिला आहे ते व त्यांखालचा मुलूख देऊन आणखी हुकूम केला आहे कीं जो मुलूख नऊ लक्ष होनांचा, पैकीं चार लक्ष होनांचा तळ कोंकणापैकीं विजापुरकरांचे इलाख्यांतील हल्लीं तुम्हांकडे चालत आहे, तो बंदोबस्तामुळें इकडील सरकारांत आला सबब, व बालाघाटीं पांच लक्षांचा, विजापुर आमचे हातीं येई त्या आधीं तुम्ही त्याचेकडून घेतल्यास, या अन्वयें तुम्ही चांगले फौजेमुद्धां राजे जयसिंग यांशीं मिळोन बादशाही कामांत त्यांचे मर्जीप्रमाणें कोशीस केल्यास, विजापुर फत्ते जाहल्यानंतर तुम्ही पेशकशीचे ऐवजाचा भरणा केल्यास, तुम्हांकडे बहाल ठेवूं. हल्लीं तुमचे चिरंजिवास पांच हजारी मनसबा व पांच हजार स्वार, कीं एका एकाचीं दोन दोन तीन तीन घोडीं असावीं, याप्रमाणें देऊन, तुम्हांकारितां पोषाख पाठवून हा फर्मान आपले पंजाचे चिन्हामुद्धां पाठविला आहे. तरी तुम्ही इकडील लक्षांत वागोन बादशाही काम लहान मोठें मुद्धां करून, हें सर्व आपले ऊर्जिताची गोष्ट आहे असें समजत जावें. छ ५ रबिलावल सन १०७७ हिजरी.' शिवाजीकडे राहवयाचे बारा किल्ल्याचा तपसील:—

| | | | |
|---|---|---|---|
| १ राजगड. | १ तोरणा. | १ लिंगणगड. | १ महाडगड. |
| १ घोसाळा. | १ अलवारी. | १ भोरप. | १ कुंवारी. |
| १ रायरी. | १ पाल. | १ तळेगड. | १ उदयदुर्ग. |

शिवाजीनें वीस किल्ले जयसिंगाच्या स्वाधीन करून दिले. परंतु त्या सर्वांचा बंदोबस्त करण्याइतकी फौज जयसिंगाजवळ नव्हती. सिंहगड, पुरंदर व लोहगड या किल्ल्यांवर मात्र त्यानें मजबूद बंदोबस्त केला;

दुसऱ्या कित्येकांवर थोडेबहुत लोक ठेवून दिले; कित्येकांचे दरवाजे जाळून टाकून कांहीं तट वगैरे पाडिले, आणि सर्वांवर आपलीं निशाणें चढविलीं. नांवनिशीवार बारा किल्ले व सभोंवतालचा मुलूख जहागीर म्हणून बादशहानें शिवाजीस दिला. ठरल्याप्रमाणें संभाजीस मनसब मिळाली. शिवाजीच्या विश्वासाची खात्री होण्याकरितां विजापुर जिंकण्यास त्यानें जयसिंगाचे मदतीस जावें असें बादशहानें फर्माविलें. शिवाय 'कराराप्रमाणें तुम्हीं हुजूर तख्त दिल्ली मुक्कामीं यावें, म्हणजे मुद्दे असतील ते उलगडून देऊं, कोणेविशीं दिलांत न धरावी, बेकिलाफ यावें; निखालसपणें येऊन भेटावें' असें बादशहाचें पत्र आलें. येणेंप्रमाणें हा तह तडीस गेला; शिवाजीचें काम झालें; प्रस्तुतचें संकट टळलें; बादशहाचेंही बिनखर्चानें व बिनत्रासानें शिवाजीस ताब्यांत आणण्याचें काम तडीस गेलेंसें वाटलें, आणि विजापुर जिंकण्याची फार दिवसांची हांव सिद्धीस नेण्यास त्यास उत्तेजन आलें. शिवाजीस जंजिरा मिळाला नाहीं, हें त्याचें मोठें नुकसान झालें. तसेंच चौथाई व सरदेशमुखी हे हक्क बादशहानें, परराज्यावर कां होईना, शिवाजीस दिले व ते गोळा करण्याचें काम त्यालाच सांगितलें, हें बादशहाचें मोठें नुकसान व मराठ्यांचा मोठा फायदा. या हक्कांवर सर्व मराठ्यांनीं पुढें जे दिग्विजय केले ते, जंजिरा मिळता तर खरोखरच राष्ट्रास फार फायद्याचे होऊन, मराठ्यांना समुद्रावरही आपला ताबा ठेवितां आला असता.

६. आग्र्यास प्रयाण व कैद, ( मार्च ते डिसेंबर, १६६६ ).— शिवाजीचें इमान कसास लावण्याचा जयसिंगानें एकदम प्रसंग आणिला. त्यानें शिवाजीकडून घेतलेल्या किल्ल्यांचा बंदोबस्त करून बादशाही हुकुमाप्रमाणें आपला मोर्चा विजापुरकरांवर फिरविला आणि शिवाजीस मदतीस बोलाविलें. तो मोठ्या आनंदानें पुष्कळ फौज बरोबर घेऊन विजापुरकरांशीं लढण्यास गेला, ( नोव्हेंबर, स. १६६५ ). त्याजबरोबर नेताजी पालकर होता. त्यांनीं शत्रूंचे पुष्कळ किल्ले व मुलूख सर केला. शिवाजीला इकडील प्रदेशाची चांगली माहिती असल्यामुळें, जयसिंगास त्याचा चांगलाच उपयोग झाला. फलटणचा मुलूख तायवडा किल्ला वगैरे ( प्रभात, शिवछत्रपतीची बखर पृ. १५ ) काबीज करून त्यांनीं मंगळवेढें घेतलें; तेथें विजापुरची फौज त्यांस भेटली.

विजापुरच्या कामगिरीसंबंधानें खालील पत्र औरंगजेबाकडून शिवाजीस आलें. 'मुसलमानी धर्मरक्षक, शिवाजी याणें बादशाही कृपेंत आपला सत्कार जाणोन समजावें कीं, तुम्हीं फौजसुद्धां बादशाही लष्करांत आहांत, आणि ताथवडा फलटण हे किल्ले विजापुरकरांकडील होते ते घेऊन त्यांची फौज तळकोंकण प्रांतीं होती तेथें रात्रीं (?) पोहोंचविली, म्हणोन राजे जैसिंग याणें लिहिल्यावरून तुमचे शाबासकीस कारण झालें. सबब तुम्हांकरितां उत्तम पोशाख व जडावाची कट्यार पाठविली आहे. या लाभाचा संतोष मानून इत:पर या स्वारींत जितकें कोशीस कराल तितकें पहिल्यापेक्षां अधिक लोभास कारण होईल.' (खं. ८-१५).

या युद्धांत विजापुरच्या वतीनें व्यंकोजी राजे लढण्यास आला होता, परंतु उभयतां बंधूंचा सामना होण्यापूर्वीच, दिल्लीस येण्याविषयीं बादशहाचें निमंत्रण आल्यावरून शिवाजीस एकदम तिकडे निघून जावें लागलें. शिवाजीनें केलेल्या मदतीबद्दल त्याचा गौरव करून जयसिंगानें बादशहास पत्र लिहिलें, तें वाचल्यावर शिवाजीस बादशहानें दिल्लीस बोलाविलें.

दिल्लीस जाण्यांत अनेक प्रकारचा धोका आहे, हें शिवाजी जाणून होता. औरंगजेबास तो चांगला ओळखून होता. स्वत:चेच जिवास अपाय झाला असतां आजपर्यंतचे सर्व प्रयत्न विफल व्हावयाचे. याबद्दल जयसिंगाची सल्ला शिवाजीनें घेतली. जयसिंगानें त्याच्या जिवाची हमी घेतली, आणि जाण्यांत अनेक प्रकारचे फायदे आहेत असें सांगून, त्यास जाण्याचे भरीस घातलें. शिवाय त्यानें आपला मुलगा रामसिंग यास सर्व हकीगत खुलासेवार कळवून, शिवाजीचा बचाव करण्याविषयीं दक्ष असण्यास लिहिलें. जयसिंगाचा निरोप घेऊन शिवाजी रायगडीं आला. तेथें सर्व सल्लागार जमवून, दिल्लीस जाण्याविषयीं वाटाघाट होऊन, देवीचा कौल वगैरे घेऊन जाण्याचाच निश्चय ठरला. या प्रसंगीं शिवाजीनें आपल्या पाठीमागें केलेला बंदोबस्त पाहून त्याची धूर्तता व दूरदृष्टि यांची तारीफ करावी तितकी थोडीच होय. तो सर्व किल्ले स्वत: तपासून आला. प्रत्येक ठिकाणचा बंदोबस्त करून, सर्वांस सावध असण्याविषयीं त्यानें सांगितलें. रायगडीं सर्व कारभार पाहण्याकरितां मंत्रिमंडळ नेमून त्यांनीं जिजाबाईचे सल्ल्यानें वर्तावें असें ठरविलें. त्या मंडळांत मोरोपंत पिंगळे पेशवे, अण्णाजी दत्तो सुरनीस व निळो सोनदेव मुजुमदार हे प्रमुख होते.

आपल्या जिवास अपाय झाला, तरी राज्याचें काम बंद पडूं नये, अशी तजवीज शिवाजीनें केली. तिकडे कसाही प्रसंग पडला असतां तुम्ही जवां-मर्दीनें राजारामास घेऊन राज्य रक्षावें असें सांगितलें; आपणाबरोबर संभाजी, तानाजी मालुसरे, बाळाजी आवजी, प्रतापराव वगैरे अनेक भरं-वशाचे व पराक्रमी लोक घेऊन, फौज, सरंजाम, खजिना समवेत बंदोबस्तानें शिवाजी दिल्लीस जाण्यास निघाला, ( मार्च १६६६).

शिवाजी व औरंगजेबाची भेट दिल्ली येथें झाली नाहीं. आग्रा येथें झाली. आग्रा हीच फार दिवस मोगलांची राजधानी असून शहाजहान आग्र्यासच राहत असे. शहाजहानास औरंगजेबानें कैद करून त्याच्या वाड्यांतच ठेविलें होतें, तेव्हां आग्र्यास राहिल्यास आपल्या जिवास बाप कांहीं तरी धोका करील, अशा भीतीनें औरंगजेब दिल्लीस जाऊन राहिला. ता. २२ जानेवारी स.१६६६ रोजीं शहाजहान मरण पावला;आणि पुढें लगेच म्हणजे ता. १५ फेब्रुवारी रोजीं औरंगजेब सर्व जनानखाना व जडजवाहीर घेऊन आग्र्यास आला, तो त्या सालच्या ऑक्टोबरपर्यंत आग्र्यासच होता. ता. २७ मार्च रोजीं औरंगजेबानें आपल्या राज्यारो-हणाबद्दल पहिला वाढदिवस आग्र्यास मोठ्या थाटानें केला. पूर्वी बाप जिवंत असे तोंपर्यंत असा थाट त्यास करतां आला नाहीं.

जयसिंगानें शिवाजीशीं तह ठरवून बादशहाकडे पाठविला, तो बादश-हानें मंजूर करून असें लिहिलें कीं, शिवाजीला आपल्या भेटीस पाठवावें, प्रवासाच्या खर्चाकरितां एक लाख रुपये शिवाजीस द्यावे. या शिवाय शहाजाद्यांची तजवीज स्वारींत जशी राहते तशी शिवाजीची ठेवावी, असें बादशहाचें सरपत्र प्रांतोप्रांतीं गेलें होतें. जयसिंगानें गाजीबेग नांवाच्या सरदारास शिवाजीबरोबर दिलें. संभाजीला बरोबर घेऊन शिवाजी औरंगाबादेस आला; त्यानें आपणाबरोबर निवडक व भरंवशाचे पांचशें स्वार व पांचशें पायदळ घेतलें. औरंगाबादेंतील सर्व लोक शिवाजीचा थाट पाहण्यास बाहेर आले. औरंगाबादचा अधिकारी सफ्शिकनखान शिवाजीला सामोरा आला नाहीं. त्याचा समज कीं, शिवाजीच आपल्या भेटीस येईल. शिवाजीला याजबद्दल राग आला आणि तो तसाच शहरांतून थेट जयसिंगाच्या मुक्कामावर गेला. त्या ठिकाणीं जयसिंगानें शिवाजीचा विशेष आदर केलेला पाहून सफ्शिकन

सुद्धां सर्व अधिकारी शिवाजीच्या भेटीस आले. दुसऱ्या दिवशीं शिवाजीनें ज्याचे त्याचे योग्यतेप्रमाणें परत भेटी दिल्या. पुढें बादशहानें हुकूम केल्याप्रमाणें शिवाजीस बहुमान, पोषाख व नजरनजराणे देण्यांत आल्यावर तो औरंगाबाद सोडून हिंदुस्थानांत जाण्यास निघाला. तारीख ९ मे रोजीं आग्रा राजधानीच्या बाहेर शिवाजीचा मुक्काम झाला. जयसिंगाचा मुलगा कुमार रामसिंग व मुखलिसखान या दोघांस बादशहानें शिवाजीच्या तैनातीस देऊन ता. १२ मे रोजीं गादीचा वाढदिवस होता, त्या वेळेस आपल्या भेटीस दरबारांत आणण्यास सांगितलें. भेट कशी व्हावी तें या तीन दिवसांत आगाऊ ठरविलेलें होतें. विजापुरास आदिलशहाशीं शिवाजीची भेट झाली त्याप्रमाणें ही भेट व्हावी असा ठराव झाला. बरोबरीचे नात्यानें भेट व्हावी असें शिवाजीचे मनांत होतें. परंतु ही गोष्ट शक्य नाहीं असें सांगून रामसिंहानें शिवाजीची समजूत घातली. त्याप्रमाणें शिवाजी दरबारास गेला. त्यानें अत्यंत नम्रभाव व राजनिष्ठा दाखवून बादशाही रिवाजाप्रमाणें जमिनीस हात लावून मुजरे वगैरे केले, आणि पंधराशें मोहरा नजराणा व सहा हजार मोहरा बहुमान दिला. हा विधि झाल्यावर सिंहासनानजीक गालिच्यावर दरबारांतील सरदारमंडळींमध्यें जसवंतसिंगाच्या खालीं बादशहानें शिवाजीस उभें राहण्यास सांगितलें. शिवाजीला सन्मानानें वागवून त्याचा मानमरातब चांगला ठेवावा, कोणत्याही प्रकारें त्यास दुखवूं नये, असें जयसिंगानें बादशहास वारंवार कळविलें होतें. त्याप्रमाणें कांहीं बहुमान शिवाजीस देण्याचा बादशहाचा विचार असेल, परंतु तो पहिल्या भेटीस शिवाजीच्या दृष्टीस पडला नाहीं. कांहीं वेळ उभा राहिल्यावर तो रामसिंगास म्हणाला, 'माझा अपमान करण्याकरितां बादशहानें मला येथें आणिलें आहे कीं काय?' शिवाजीचें काय म्हणणें आहे, म्हणून बादशहानें विचारितांच रामसिंगानें शिवाजीचें म्हणणें बादशहास कळविलें, त्यावरून शिवाजीला आपणाजवळ येऊं देणें बादशहास इष्ट वाटलें नाहीं; आणि दरबार बंद करून बादशहानें त्यास घरीं घेऊन जाण्यास रामसिंगास सांगितलें. या भेटीबद्दल मनूची लिहितो कीं,—

' शिवाजी बादशहाच्या भेटीस गेला, तेव्हां त्यास दरबारांत पहिली जागा देण्याचा करार होता. हा करार जयसिंगानें व बादशहानें लेखी शपथपूर्वक ठरविलेला असतांही बादशहानें तो पाळला नाहीं. सोनेरी

कठड्याच्या आंतील पहिल्या वर्तुळांतली शेवटची जागा शिवाजीस देण्यांत आली. तें पाहून शिवाजी रागानें लाल होऊन म्हणाला, 'करार मोडून माझा असा अपमान कां करितां ? माझ्या योग्यतेस उभा राहण्यास तुमच्या दरबारांत एकही गृहस्थ नाहीं.' असें म्हणून शिवाजी दरबार सोडून बाहेर आला.' ( मनूची २–१३८ ).

शहराच्या बाहेर हल्लींच्या ताजमहालाजवळ रामसिंगाचा बाग होता, त्या बागेंत शिवाजीस ठेवावें, असा हुकूम झाला. पुढें रामसिंग वारंवार बादशहास भेटून शिवाजीची खबर कळवीत असे. संभाजी मात्र दर खेपेस रामसिंगाबरोबर दरबारास जात असे. बादशहानें शिवाजीवर नजर ठेवण्यास रामसिंगास हुकूम दिला. बादशहास राग येण्याचें खरोखर कारण काय झालें याचा निश्चय होत नाहीं. पण एकंदरींत मानापमानासंबंधीं उभयतांचीं मनें बिघडलीं एवढी गोष्ट खरी.

शिवाजीनें कांहीं तरी लबाडी करून आपणांस फसविण्याचा बेत चालविला आहे, असा बादशहास संशय आल्यावरून त्यानें शहरकोतवाल पोलादखान यास ताकीद दिली कीं, शिवाजीच्या घरावर बंदुका घेतलेल्या शिपायांचा पहारा बसवावा, आणि त्यास निघून जाऊं देऊं नये. त्याप्रमाणें पोलादखानानें पांच हजार शिपायांचा पहारा बसविला; आणि तो दररोज येऊन शिवाजीची खबर बादशहास कळवीत असे. १६६६ च्या मेच्या ३० तारखेस बादशाही तवारिखींत पुढील मजकूर आहे. 'सूर्योदयापासून तीन तासांनीं दरबार भरला. ( आग्र्याचा कोतवाल ) पोलादखान म्हणाला, 'शिवाजी व त्याचे सर्व लोक तक्रार करीत आहेत कीं, 'ह्या गारिबानें असा काय अपराध केला आहे, कीं त्याबद्दल बादशहानें मजवर एवढी निष्ठुरता करावी ?' बादशहानें हा मजकूर ऐकून घेतला, कांहीं जबाब केला नाहीं. बादशहा महंमद अमीनखानास म्हणाला, 'चोपदार गाझीबेग यास पाठवून, तपास करा, कीं इमामवर्दीखानापासून शिवाजीनें किती हत्ती खरेदी केले ?' अमीनखानानें तपास करून कळविलें, 'शिवाजीनें पंधरा हजार रुपयांचे हत्ती खरेदी केले आहेत. परंतु अजून त्यानें रक्कम दिलेली नाहीं.'

बादशहानें शिवाजीची हकीकत जयसिंगास कळविली, आणि पुढें काय करावयाचें, म्हणून विचारिलें. शिवाजी व बादशहा यांच्या भेटींत प्रत्यक्ष

काय प्रकार घडला, यासंबंधानें निरनिराळ्या लेखकांनीं अनेक हकीकती लिहून ठेविल्या आहेत, पण त्यांत सत्यापेक्षां कल्पनेचाच अंश पुष्कळ आहे. ही गोष्ट खरी कीं, 'आपण स्वतंत्र राजे आहों' हा आपला बाणा होईल तितका कायम ठेवण्याकडे शिवाजीचा कल असून, उलट त्याचा नक्षा होईल तितका कमी करण्याकडे बादशहाचा कल होता; आणि जयसिंग ह्या दोहींचा मिलाफ घालण्याच्या खटपटींत होता. हा मिलाफ तडीस गेला नाहीं. आपल्या इभ्रतीस अपमानकारक असा मिलाफ घडवून आणण्याचा शिवाजीचाही हेतु नसेल. जयसिंगाकडून असा जबाब आला कीं, 'शिवाजीला अभय वचन देऊन मी जामीन राहिलों आहें, म्हणून बादशहानें त्याचे अपराध माफ करावे; म्हणजे माझ्यावर मोठे उपकार होतील. आणि त्या योगानें आमचे इकडील उद्योगही चांगले तडीस जातील. शिवाजीच्या हातून गैरवर्तन होणार नाहीं, याजबद्दल मी जबाबदार आहें.' आपणांवर कोणता प्रसंग गुदरला आहे, हें शिवाजीनें पूर्णपणें ओळखिलें; आणि अशाही संकटांतून निभावून जाण्याची त्यानें जी चमत्कारिक युक्ति पुढें योजिली, तिजवरून त्याचें धाडस, प्रसंगावधान, व त्याच्या अनुयायांची निष्ठा हे गुण चांगले व्यक्त होतात.

ता. ९ मे पासून १९ ऑगस्ट पावेतों शिवाजीचा मुक्काम राजधानींत झाला. बादशहाची व त्याची प्रत्यक्ष भेट एकदांच दरबारांत दहापांच मिनिटें झाली असेल तेवढीच. दोघांचें प्रत्यक्ष भाषण तर मुळींच झालेलें दिसत नाहीं. कैदेंतून सुटण्याची युक्ति त्यानें योजिली, तिजरून त्याचें विलक्षण प्रसंगावधान दिसून येतें. प्रथमत: बादशहाची परवानगी घेऊन बरोबरची सर्व फौज परत पाठवून, कांहीं निवडक विश्वासु मंडळी मात्र त्यानें जवळ ठेविली. गोड भाषणानें व लालुचीनें शहरांतील अमीरउमराव व जवळचे पहारेकरी यांस त्यानें आपलेसें करून घेतलें, व मोठमोठे पेटारे भरून त्यांजकडे मिठाई नजर पाठविण्याचा परिपाठ घातला. पाहरेकरी आरंभीं हे पेटारे तपासून पाहत; परंतु विश्वास बसल्यामुळें तसें करणें पुढें त्यांनीं सोडून दिलें. इकडे बरोबरच्या मंडळींपैकीं बहुतेक लोक कांहींना कांहीं बहाणा करून त्याला सोडून गेले; व शहरांतच वेष पालटून राहिले. सर्व तयारी झाल्यावर शिवाजीनें आजारीपणाचें सोंग घेतलें. शेवटीं ता. १९ ऑगस्ट स. १६६६ रोजीं सायंकाळीं हिरोजी फर्जंद यास आपले बिछा-

न्यावर निजवून, संभाजी व आप० निरानिराळ्या मिठाईच्या पेटाऱ्यांत बसून पाहारेकऱ्यांचे हातून सुटून पार झाले. दुसरे दिवशीं सकाळीं, औषध आणण्यास जातों असें सांगून हिरोजीही स्वस्थपणें निघून गेला. आदले रात्रीं शिवाजी निघून गेला, ही बातमी दुसरे दिवशीं दुपारनंतर प्रसिद्ध झाली, तेव्हां बादशहानें त्याचा तपास करण्याविषयीं सक्तीनें हुकूम सोडिले.*

या दिल्लीच्या प्रयाणासंबंधानें फ्रेंच प्रवासी बर्नियर म्हणतो, ( बर्नियरचा प्रवास-ब्रॉकचें भाषांतर, पृ. २१३ ). जयसिंगानें आपल्या नेहमींच्या सामोपचाराच्या पद्धतीचा शिवाजीशीं उपयोग केला. बादशहाचें इराणशीं युद्ध सुरू झालें होतें. तेव्हां शिवाजीशीं सख्य करण्याच्या इराद्यानें बादशहानें त्यास फारच ममतेचें पत्र पाठवून त्याच्या अनेक गुणांची तारीफ केली. ह्या वेळीं शिवाजीस दुखविण्याचा बादशहाचा हेतु नव्हता. परंतु बादशहाची मामी, शाएस्तेखानाची बायको दिल्लीस होती, तिचा मुलगा शिवाजीनें पुण्यांत ठार मारिला होता. तेव्हां त्याचा पुरेपूर सूड उगविण्याविषयीं तिनें बादशहाचें मन वळविलें. म्हणून दिल्लीस गेल्यावर शिवाजीवर त्यानें पहारा बसविला. शिवाजी सुटून गेल्यावर बादशहाला जयसिंग व त्याचा मुलगा रामसिंग ह्यांचा वहीम आला; परंतु त्या दोघांचीही या वेळीं बादशहानें मोठ्या काकुळतीनें समजूत केली, ह्यावरून शिवाजीनें पळून जाण्यांत प्रत्यक्ष बादशहाचेंही अंग होतें, असा त्या वेळीं पुष्कळांचा समज झालेला होता. शिवाजीला अटकेंत ठेवल्यापासून जनानखान्यांतील बायकांनीं बादशहाचें डोकें उठविलें होतें. उलट पक्षीं शिवाजीला जिवंत ठेवण्यांतच बादशहास फायदा वाटत होता. त्यामुळें शिवाजीकडे कानाडोळा करून त्यास बादशहानें पळून जाऊं दिलें. ह्या बर्नियरच्या म्हणण्यांतील सत्याचा निवाडा होणें शक्य नाहीं.

शिवाजी सुटून गेल्याचें वर्तमान ऐकून बादशहास अत्यंत क्रोध आला. त्यानें रामसिंगास नोकरींतून दूर करून दरबारास येण्याची मनाई केली; आणि शिवाजीस पकडण्याविषयीं सर्व राज्यांत हुकूम सोडिले. इकडे शिवाजी व संभाजी घोड्यावर बसून उत्तरेच्या बाजूस आगऱ्याहून मथुरेस गेले. त्यांना थेट दक्षि-

---

*शिवदिग्विजय बखरींत शिवाजीच्या ह्या सुटकेची हकीगत फार खुलासेवार व मनोवेधक अशी दिलेली आहे.

णचा मार्ग धरणें धोक्याचें होतें, म्हणून प्रयाग, काशी वगैरे ठिकाणांवरून वेषांतरानें यात्रा करीत जाण्याचा त्यांनीं निश्चय ठरविला. मथुरेंत मोरोपंत पेशवे यांचे मेहुणे कृष्णाजीपंत, काशीपंत व विसाजीपंत हे त्रिवर्ग बंधु कुटुंबसुद्धां राहत होते, त्यांचा पत्ता निराजीपंत ( प्रल्हादपंताचा बाप ) यानें काढून आणिला. त्यांचेकडे संभाजीस ठेवून व कृष्णाजीपंत यात्रेचे माहीतगार म्हणून बरोबर घेतले. दाढीमिशी काढून बापलेकांनीं अंगास राख लाविली आणि फकीर गोसाव्यांच्या सोबतीनें काशीकडे गेले. त्यांजबरोबर तसाच वेष घेतलेले ४०-५० लोक होते. हातांतील पोकळ काठ्यांतून हिरे, माणकें व सोन्याचीं नाणीं त्यांनीं भरून घेतलीं होतीं. कांहीं पैसा पायांतील जोड्यांत व अंगांतील कपड्यांत शिवून घेतला होता. अशा प्रकारची बरीच हकीकत कल्पनेच्या भरारींत निरनिराळ्या लेखकांनीं वाटेल तशी लिहिलेली आहे, ती सर्व येथें देण्याचें प्रयोजन नाहीं. शिवाजीनें प्रयाग, काशी, गया, येथें जाऊन यात्रा केली; आणि कृष्णाजीपंतास परत पाठविलें. प्रयाग येथें भोसल्यांचा क्षेत्र उपाध्ये कवि कुलेश नांवाचा होता त्याचीही शिवाजीस मदत झाली. हाच कवि कुलेश पुढें संभाजीचा मुख्य प्रधान झाला. तेथून जगन्नाथाची यात्रा करून गोंडवणांतून भागानगरावरून विजापुरच्या वाटेनें शिवाजी रायगड सोडल्यापासून दहा महिन्यांनीं परत सुखरूप येऊन पोंचला ( डिसेंबर १६६६ ). मागाहून पुष्कळ दिवसांनीं संभाजी येऊन दाखल झाला. मथुरेचे कृष्णाजी त्रिमळ व बंधु आणि त्यांची मातुश्री अडचणींत फार उपयोगी पडलीं आणि संभाजीस घेऊन रायगडीं आलीं. या उपकाराबद्दल कृष्णाजीपंतास 'विश्वासराव' हा किताब शिवाजीनें दिला; आणि त्यास ५० हजार रुपये आणि काशी त्रिमळ व मातुश्री या प्रत्येकास २५ हजार रुपये बक्षिस दिले. त्याची सनद सन १६७१ ची खं० ८, ले० २३ यांत दिली आहे. शिवाजीनंतर संभाजी चार पांच वर्षांनीं दक्षिणेंत आला असावा असें यावरून दिसतें. शिवाजीची कैद व त्याचा प्रवास ह्या अद्भुत प्रकारांबद्दल नाना तऱ्हेचे तर्क व आख्यायिका प्रचलित आहेत. बखरकारांनींही आपली कल्पनाशक्ति वाटेल तशी चालविली आहे.

शिवाजी सुखरूप परत आल्याबद्दल मोठा उत्सव करण्यांत आला. किल्ल्यांतून आनंदाच्या तोफा झाल्या. ' किल्लेकिल्लयांस तोफांची सरबत्ती

अहोरात्र चालू झाली. तें वृत्त महाराजांस कळलें. नंतर कोणते कार्यास किती आवाज करावे, ते धारे बांधून दिले. ' जे लोक शिवाजीच्या विशेष उपयोगी पडले होते, त्यांस बक्षिसें वगैरे देऊन त्यानें खुष केलें. निराजी रावजी, बाळाजी आवजी, हिरोजी फर्जंद, त्र्यंबक सोनदेव, यांनीं उत्कृष्ट कामगिरी बजाविल्यामुळें, त्यांजबद्दल शिवाजीस अत्यंत अभिमान वाटूं लगला. हिरोजी फर्जंद यास शिवाजीनें पागेवर सरदारी व पालखी अबदागिरी दिली. ब्राह्मणांस व गोरगरिबांस बहुत धर्म केला. सर्व शहरांतून हत्तीवरून व किल्ल्यांवर साखरा वाटण्यांत आल्या. इनामें व बक्षिसें वांटण्यांत आलीं. सारांश, संकटाच्या महत्त्वाच्या मानानें शिवाजीच्या मुक्ततेबद्दल सर्व महाराष्ट्रभर आनंद प्रदर्शित करण्यांत आला. शिवाजीच्या जिवावरचें संकट टळलें; नूतनोद्भव मराठशाहीवरील दहा महिन्यांच्या ह्या पहिल्या मोठ्या आपाताचें निरसन झालें. यावज्जन्मांत आपण एक चूक केली असें शिवाजीस वाटत असे, ती चूक आपण आगऱ्यास बादशहाचे भेटीस गेलों ही होय. यांत आनंद मानण्यासारखाही कांहीं प्रकार आहे. शिवाजीच्या पाठीमागें सर्वांनीं आपापलीं कामें मोठ्या दक्षतेनें केलीं. शिवाजी परत आल्यावर त्यास सर्व व्यवस्था पूर्वीपेक्षांही कांकणभर चांगली अशीच आढळली. मोगल फौजेच्या ताब्यांत किल्ले व सभोंवारचा प्रदेश असतां कोणीही राजद्रोह केला नाहीं आणि सर्वांनीं आपलीं कामें नीट बजावलीं, हें भूषणावह आहे. जणूं काय कांहींच कमी ज्यास्त झालें नाहीं, अशा प्रकारें सर्व गोष्टी सुरळीत चालल्या. या एकंदर प्रकरणामुळें राष्ट्राचा तोटा न होतां उलट अनेक फायदेच झाले. शिवाजीच्या पश्चात् राज्य चालविण्यास लोकांचे अंगीं किती जोम होता, याची परीक्षा ह्या प्रसंगीं झाली. सर्वांत मोठा फायदा म्हटला म्हणजे मोगल दरबाराची शिवाजीनें मिळविलेली माहिती होय. कारागृहांत असतांही शिवाजी स्वस्थ बसला नव्हता. मोगल दरबार, मुत्सद्दी, सरदार, फौज, राज्यव्यवस्था, यांजविषयीं नानातऱ्हेची उपयुक्त माहिती बारकाईनें काढून घेऊन, तिच्या जोरावर पुढील कार्यक्रम शिवाजीस ठरवितां आला. इतउत्तर शिवाजीनें ह्या माहितीचा पदोपदीं उपयोग केलेला दिसतो. दिल्लीचे बादशहाबद्दल जो विलक्षण बाऊ सर्वांस वाटत असे, तो त्याचे व लोकांचे मनांतून साफ निघून गेला. राज्याचा केवळ आधार जे रजपूत लोक ते सर्व बिथरले आहेत, दिल्लीपतीची

सत्ता तिळतिळ कमी होत आहे आणि अशा प्रकारें ती लवकरच लयास जाणार; असें शिवाजीच्या दूरदर्शी डोळ्यांस दिसल्याशिवाय राहिलें नाहीं.

शिवाजी सुटून गेला, यांत जयसिंग व विशेषतः रामसिंग यांचें अंग असलें पाहिजे, असा संशय येऊन त्यांजवर बादशहाची इतराजी झाली. शिवाजी दिल्लीस निघून गेल्यावर, विजापुरकरांशीं लढण्यांत जयसिंगास फारसें यश आलें नाहीं. समोरासमोर युद्ध न झाल्यामुळें, विजापुरच्या फौजेनें जयसिंगास हैराण केलें. यांत गोवळकोंड्याची विजापुरकरांस मदत होती. त्यानें बादशहाकडे ज्यास्त फौज मागितली, ती त्यास मिळाली नाहीं. तेव्हां तो विजापुरचा वेढा उठवून परत औरंगाबादेस गेला. बादशहानें रामसिंगास दरबारास येण्याची मनाई करून जयसिंगास परत बोलाविलें, आणि त्याचे जागीं जशवंतसिंग व शहाजादा मुअज्जम यांस दक्षिणेंत सुभेदार नेमिलें. ह्याप्रमाणें तो वयातीत शूर रजपूत राजा दिल्लीस परत जात असतां रस्त्यांत बऱ्हाणपुर येथें मरण पावला, (१२ जुलै १६६७). मनूची म्हणतो, 'औरंगजेबाच्या सांगण्यावरून राजा जयसिंग बऱ्हाणपुर येथें विषप्रयोगानें मरण पावला. ही बातमी ऐकून औरंगजेबाचा जीव शांत झाला. कारण हा डोईजड सरदार त्यास दृष्टीसमोर नको होता. सुजावर चालून जात असतां पुष्कळदां औरंगजेब जयसिंगाचे कबजांत एकटा सांपडला होता, आणि जयसिंगानें त्यास सहज मारून टाकिलें असतें. औरंगजेबावर सर्व उपकार जयसिंगाचे होते. त्यानेंच दिल्लीचा बचाव केला. दाराचा मुलगा सुलेमान शेको ह्यास त्यानेंच पकडून आणिलें. जयसिंगामुळेंच शिवाजीचा बंदोबस्त झाला. ह्या सर्व उपकारांची फेड, मनूची म्हणतो, वरप्रमाणें औरंगजेबानें केली ! जशवंतसिंगाची अशीच वाताहत त्यानें केली.' ह्या रजपूत राजांचें स्वत्व किती नाहींसें झालें होतें हें ह्यावरून दिसून येतें आणि शिवाजीच्या उद्योगाची किंमत कळूं लागते. पुढें दिलीरखान यासही बादशहानें थोडे दिवस माळव्यांत बदलिलें. याप्रमाणें वरचेवर सरदार बदलण्यानें बादशहाचें अतोनात नुकसान झालें. जशवंतसिंगाचा अगोदरच शिवाजीनें परिचय करून ठेविला होता. तो मोठा उदार, शूर व हिंदु धर्माचा अभिमानी असल्यामुळें, त्याच्या-हातून शिवाजीस अपाय होण्याचा विशेष संभव नव्हता. शिवाय त्याजवर खुद्द बादशहाचाही फारसा भरंवसा नव्हता.

**७. पुरंदरचा तह मंजूर, ( स. १६६८ ).**—शिवाजी सुटून आल्यामुळें बादशहा अत्यंत क्रोधायमान झाला. परंतु त्या वेळीं अफगाणिस्थानांत व पुढें थोड्याच दिवसांत रजपुतांशीं युद्ध सुरू होऊन, तिकडे त्याची धांदल उडाल्यामुळें त्यास शिवाजीसंबंधाची कामगिरी सरदारांवरच सोंपवावी लागली. इकडे शिवाजीस बादशाहीचे स्थितीचा जो नवीन अनुभव मिळाला, त्याचा उपयोग तो लगेच करूं लागला. यापूर्वी बादशहाच्या बलाचा त्यास मोठा बाऊ वाटत होता त्यामुळें समोरासमोर लढून आपला निभाव लागेल असें त्यास वाटत नव्हतें. ही त्याची भीति नवीन अनुभवानें समूळ नाहींशी झाली. यापुढें त्यानें मोगल फौजेशीं समोरासमोर मोठमोठे निकराचे सामने केले. त्यांत प्रत्यक्ष शिवाजीनेंही कित्येक प्रसंगीं फौज घेऊन युद्ध केलेलें आहे. त्यानें आपल्या राज्याचा बंदोबस्त व विस्तार उघड उघड सुरू केला. चौथाई व सरदेशमुखीचे हक्क स्वराज्याबाहेरील प्रदेशांतून वसूल करण्याचा प्रघात घातला. यावरून शिवाजीचा पूर्वीचा उद्योग व यापुढील त्याचा क्रम हे अगदीं भिन्न दिसतात.

दिल्लीहून परत येतांना शिवाजी कुत्बशहास भेटला आणि त्याची फौज मदतीस घेऊन त्यानें विजापुरचे व पूर्वी जयसिंगास दिलेले बहुतेक किल्ले परत घेतले. थोड्या खर्चांत व दिवसगत न लावतां, लगोलग किल्ले काबीज करण्यांत शिवाजीचा हात खंडा होता ( खाफीखान ). परत आल्यावर पुढें शिवाजीनें जशवंतसिंगाला कळविलें कीं, 'बादशहांनींच मला हाकून दिलें. नाहीं तर मी बादशहांची वाटेल ती नोकरी बजाविली असती. जिवाच्या भीतीमुळें मला पळून यावें लागलें. मीर्झा राजा जयसिंग माझे दोस्त होते ते मरून गेले. आतां तुमच्या मध्यस्थीनें बादशहा माझे अपराध माफ करतील, तर मी आपला मुलगा संभाजी दक्षिणच्या सुभेदाराच्या हाताखालीं नोकरीस ठेवण्यास तयार आहें व मी स्वतः सांगाल ती कामगिरी करीन.' बादशहानें हा अर्ज मंजूर केला आणि प्रतापराव गुजर याजबरोबर संभाजीला त्यानें जशवंतसिंगाकडे पाठविलें. संभाजीस पांच हजारांची मनसब व वऱ्हाडांत जहागीर देण्यांत आली. कांहीं दिवसांनीं संभाजी परत आला आणि प्रतापराव एकटाच औरंगाबादेस राहिला.

पुरंदरच्या तहानें मोगलांकडे बरेच किल्ले आले, परंतु त्यांचा बंदोबस्त जयसिंगास करितां आला नाहीं. त्यांच्यांवर शिबंदी ठेवण्यास त्याचे जवळ फौज नव्हती. सबब सिंहगड, पुरंदर, लोहगड, माहुली व कर्नाळा (हा किल्ला उरण व कर्जत यांचेमध्यें आहे,) अशा पांच किल्ल्यांवर त्यानें शिबंदी ठेवून बंदोबस्त केला; व बाकीच्या किल्ल्यांचे दरवाजे वगैरे जाळून व पाडण्यासारखे भाग पाडून थोडे बहुत निरुपयोगी केले. शिवाजीस कैद केल्याची बातमी दक्षिणेंत येतांच मोरोपंत पिंगळ्यानें मोगलांकडे गेलेले किल्ले घेण्याचा सपाटा चालविला. जयसिंगानें नादुरुस्त केलेले किल्ले मोरोपंतानें दुरुस्त केले. येणेंप्रमाणें शिवाजी परत येण्याचे अगोदरच मोरोपंत पिंगळे यानें मोगलांकडे गेलेले बरेच किल्ले परत घेतले. शिवाजी आल्याबरोबर त्यानें फौज पाठवून कल्याण प्रांत व पुण्याचे उत्तरेकडचे किल्ले सोडवून घेतले. परंतु नेहमींच्या प्रघातास अनुसरून शिवाजीनें प्रत्यक्ष लढाई न करितां आपला कार्यभाग साधिला. जशवंतसिंगाचा स्नेह शिवाजीनें पूर्वी दिल्लींतच चांगला संपादन केला होता. शिवाय तो द्रव्यलोभी होता, हें शिवाजीनें ओळखून त्यानें त्यास वारंवार नजराणे पाठवून खूष ठेविलें. बादशहाबद्दल तो विशेष अनुरक्त नव्हताच. शहाजादा मुअज्जम हा औरंगजेबाचा वडिल मुलगा उदार व निष्कपटी होता. तोच पुढें औरंगजेबानंतर बादशहा झाला. बापाचा त्याजवर भरंवसा नव्हता, आणि जशवंतसिंगावर दाब राहण्याकरितां त्यास त्याजबरोबर दक्षिणेंत पाठाविलें होतें. बादशहास दुसरीकडे अडचणी असल्यामुळें त्यानें शहाजाद्यास असें सांगितलें कीं, शिवाजीशीं लढाईचा प्रसंग न आणितां समजुतीच्या मार्गानें पुरंदरचा तह कायम करून घ्यावा. शहाजाद्यानें हें धोरण व्यक्त करितांच शिवाजीनेंही त्यांत ओढून धरिलें नाहीं. शिवाजीला मुद्दाम युद्धांत पडणें नको होतें, आणि जशवंतसिंग व शहाजादा यांच्यांशीं स्नेह जोडून आपला कार्यभाग साधण्याचा त्याचा विचार होता. तदनुसार बाळाजी आवजी चिटणीस यास मोठा लवाजमा देऊन शिवाजीनें औरंगाबादेस तहाची वाटाघाट करण्यास पाठविलें. बाळाजीनें सर्व प्रकार बोलून तहाचा आशय शिवाजीस कळविला. त्यावरून पूर्वींचाच पुरंदरचा तह बहुतेक कायम झाला. संभाजीच्या हाताखालीं पांच हजार फौज मोगलांचे मदतीस राहवयाचें ठरलें. तिच्या

सरंजामासाठीं वऱ्हाड प्रांतांत आव्हडें व बाळापुर हे दोन परगणे नेमून मिळाले. वर ठरलेला तह स्वत: आग्रहाची शिफारस करून शहाजाद्यानें बादशहाकडे पाठवून दिला. तो मंजूर करून त्यानें पत्र पाठविलें तें असें:

'........लोभ करण्याचें पूर्णपात्र राजे शिवाजी यांनीं बादशाही कृपेचे उमेदवार होऊन जाणावें. आमचा बहुत लोभ तुम्हांवर आहे. याजकरितां तुमचा सर्व मजकूर हुजूर लिहिल्यावरून तुम्हांस राजेपणाचा किताब दिला असे. या गोष्टीस सत्कार मानून, पेशजीपेक्षां अधिक काम करून दाखवावें, म्हणजे सर्व मनोरथ पूर्ण होतील. तुमचे कार्याविषयीं विनंती लिहिली आहे, तोही बंदोबस्त यथास्थित घडून येईल. खातरजमा ठेवावी; आणि बादशाही लोभ आपणावर आहे, असें समजानें. छ. ५ माहे सवाल सन १०८० हिजरी' ( खं. ८–१७ ).

हें पत्र आल्यावर पूर्वीचा पुरंदरचा तह कायम होऊन शिवाय ( १ ) शिवाजीस बादशहानें राजा असा किताब दिला. म्हणजे त्यानें स्थापिलेल्या स्वतंत्र राज्याची कबुली बादशहानें दिली, आणि ( २ ) पुरंदर व सिंहगड खेरीज, पुणें, चाकण व सुपें हे जुन्या जहागिरींतील परगणे, आणि जुन्नर व अहंमदनगर या प्रांतांतील हक्कांबद्दल वऱ्हाड प्रांतांत एक नवीन जहागीर, शिवाजीस देण्यांत आली. शिवाजीस उघडपणें ताब्यांत आणण्याचा प्रयत्न विफल झाला, तेव्हां त्याच्या इच्छेप्रमाणें वर्तन करून, पुढें मागें अन्य तऱ्हेनें त्यास ताब्यांत आणण्याचा बादशहाचा बेत असावा.

ह्या तहानें राज्यव्यवस्थेंत महत्त्वाचे फेरफार झाले. शिवाजीनें प्रत्यक्ष बादशहासही न जुमानतां त्याजकडून आपलें स्वतंत्र राज्य उघडपणें कबूल करून घेतलें, एवढ्यावरून दक्षिणेंत आतां मराठ्यांचें स्वतंत्र राज्य कायम झालें याजबद्दल कोणाच्याही मनांत शंका राहिली नाहीं. मोगलांचे प्रांतोप्रांतींचे सुभेदार, जंजिऱ्याचे सीदी, विजापुर व गोवळकोंडा येथील सुलतान व एकंदर लोकसमुदाय यांजपासून शिवाजीस ' राजा ' असा मान मिळूं लागला. वऱ्हाड प्रांताची जहागीर संभाळणें व संभाजीनें बादशाही फौजेंत मनसबदारी करणें या शर्तींमुळें औरंगाबाद येथें सरहद्दीवर शिवाजीनें कायमची फौज ठेवून दिली, आणि संभाजी लहान असल्यामुळें तिचें आधिपत्य कडतोजी गुजर यास ' प्रतापराव ' असा नवीन किताब देऊन त्याजकडे दिलें. या फौजेमुळें आपल्या सरहद्दीचें संरक्षण

होऊन, मोगलांचे हालचालींवर नजर ठेवणें शिवाजीस सुलभ झालें. याप्रमाणें शिवाजी हा मोगलांचा मांडलिक बनला. परंतु जोधपुर व जयपुर येथील रजपूत राजे बादशहाचे मांडलिक होते, त्यांच्यांत व शिवाजींत लक्षांत ठेवण्याजोगा एक विशेष फरक असा होता, कीं ते राजे आपापलीं राज्यें चालविण्यास आपल्या तर्फे दुसरा इसम नेमून, स्वतः बादशाही फौजेंत जाऊन नोकरी करीत, आणि बादशहाच्या प्रांतांत सुभेदाऱ्या पत्करीत. परंतु शिवाजीनें बादशाही फौजेंत स्वतः जाऊन नोकरी करण्याचें न पत्करितां मूळपासूनच आपल्या मुलाच्या नांवें मनसब घेतली; आणि आपला राज्यकारभार पाहण्यास आपण नेहमीं मोकळा राहिला. असे आणखीही कित्येक फरक ह्या दोहोंत होते.

विजापुर व गोवळकोंडा हीं दोन राज्यें होईल तितक्या लौकर बुडवावीं, असें बादशहाचे मनांत होतेंच. त्यानें शिवाजीलाही असें कळविलें कीं, त्या राज्यांवर स्वाऱ्या करून त्यांस होईल तितकें कमकुवत करावें. त्याप्रमाणें शिवाजीनें त्या राज्यांवर हल्ले सुरू केले. तेव्हां आपला निभाव लागणार नाहीं, असें पाहून तेथील सुलतानांनीं बादशहाशीं तह करून घेतला, ( स. १६६८ ). हा तह चालू असतां शिवाजीनें शहाजाद्याकडून अशी कबुलात घेतली कीं, त्या दोन राज्यांतून चौथाई व सरदेशमुखीचे हक्क आपण वसूल करूं. त्यास मोगलांनीं प्रतिबंध करूं नये. परभारें हीं राज्यें दुर्बल करण्याच्या हेतूनें मोगलांनीं शिवाजीस हे हक्क दिले. लगेच शिवाजीनें त्यांच्या मुलखांत स्वाऱ्या करून वरील हक्क वसूल करण्याची सुरुवात केली. तेव्हां विजापुर व गोवळकोंडा येथील सुलतानांनीं शिवाजीस चौथाई व दरदेशमुखी या हक्कांबद्दल दरसाल अनुक्रमें तीन लाख व पांच लाख रुपये देण्याचें कबूल केलें. हे हक्क शिवाजी पुष्कळ दिवस मागत होता. पण या वेळीं ते त्यास राजरोस मिळाले, आणि सालोसाल खंडणी वसूल होऊं लागली. तेव्हां सन १६६८ हें वर्ष म्हणजे शिवाजीच्या राज्यस्थापनेची खूण होय. त्याची जहागीर व बहुतेक किल्ले त्यास परत मिळाले, आणि दक्षिणेंतील मुसलमानी राज्यांवर त्याचा कर चालू झाला. ही गोष्ट औरंगजेबास अर्थात् मान्य होण्याजोगी नव्हती. जशवंतसिंग व मुअज्जम हे शिवाजीस ताब्यांत आणण्याचें सोडून उलट त्यांस मदत करितात, हें त्यास आवडलें नाहीं.

शिवाजीशीं केलेला तह कसाबसा दोन वर्षें चालला, व सन १६६८ व १६६९ हीं दोन वर्षें शिवाजीनें आपल्या राज्याची व्यवस्था करण्यांत घालविलीं. खंडणीच्या वसुलीकरितां शामजी नाईक पुंडे यास विजापुरास व निराजीराव यास गोवळकोंड्यास वकील म्हणून त्यानें ठेवून दिलें.

८. पुनः युद्धास सुरुवात ( सन १६७०–१६७२ ).—औरंगजेबाच्या दरबारची तवारीख फारशींत लिहिलेली लंडनच्या रॉयल एशियाटिक सोसायटींत आहे. तिच्यांतून कांहीं उतारे प्रो० जदुनाथ सरकार यांनीं इंग्रजींत भाषांतर करून मेहरबानीनें पाठविले, ते खालीं देतों. त्यावरून शिवाजी व औरंगजेब यांचे डावपेंच; शिवाजी सुटून परत आल्यावर, कसकसे चालले हें दिसून येतें.

२२ एप्रिल स १६६७. शिवाजीकडून खालील पत्र आलें. ' हा बंदा गुलाम आपली नोकरी करून हुकूम पाळण्यांत मोठें भूषण मानीत आहे. हिंदुस्थानच्या बादशहाची फौज मजवर चालून येत आहे. या फौजेशीं टक्कर देण्याचें सामर्थ्य पृथ्वीमध्यें कोणास तरी आहे काय ? म्हणून माझी अशी नम्र विनंति आहे कीं, माझा मुलगा संभाजी यास ४ हजार स्वारांची मनसब बादशाही फौजेंत मिळावी. मनसब न मिळाली तरी ही फौज घेऊन नेहेमीं तो बादशहाची नोकरी करीत राहणार. माझ्या ताब्यांत किल्ले होते ते मीं सर्व बादशहाकडे सोंपून दिले आहेतच; आणि अद्यापि जे कांहीं किल्ले माझ्याकडे असतील व माझी सर्व जिंदगी आपल्या सेवेस अर्पण आहे. ' बादशहानीं पत्र वाचून दिवाणाजवळ दिलें.

२४ जानेवारी सन १६७०. खानदेशचा दिवाण आब्रफखान याजकडून लिहून आलें कीं, शिवाजीची फौज वऱ्हाड प्रांत लुटीत आहे. बादशाही प्रांतांतून २० लाख रक्कम त्यानें गोळा केली. औसा येथील किल्लेदार बरखुरदारखान याजकडून लिहून आलें कीं, ' शिवाजीची वीस हजार फौज या प्रांतांत आली आहे. मराठे सर्व प्रांत लूटून वसूल घेत आहेत. किल्ल्यापासून दोन कोसांवर त्यांचा मुक्काम आहे. मीं किल्ल्याची डागडुजी चालविली आहे. माझी सर्व जहागीर शिवाजीनें लुटली. मला निर्वाहालासुद्धां कांहीं साधन नाहीं. बादशहानीं मेहेरबानी करून कांहीं पैशाची मदत करावी.' त्यावर बादशहा बोलले,'असे पुष्कळ लोक मराठ्यांनीं लुटलें म्हणून पैसे मागत येतील. आम्हीं कितीकांना असें नुकसान भरून द्यायचें ? '

२७ जानुवारी स १६७०. शिवाजीनें सुरत लुटून किती रक्कम नेली, तें तपास करून कळवावें, असें बादशहाकडून विचारणें आल्यावरून 'शिवाजीनें सुरतेतून ५३ लक्षांचा व जवळच्या एका खेड्यांतून १३ लक्षांचा मिळून एकंदर ६६ लक्षांचा ऐवज लुटून नेला,' असें सुरतेहून लिहून आलें.

१ फेब्रुवारी सन १६७०. शेख सुलेमान यानें बादशहास जाहीर केलें, 'रेमंड नांवाचा एक फिरंगी व्यापारी जाहीर करितो, आम्हांस थोडीशी मदत द्या, म्हणजे आम्हीं एक फिरंगी आरमार तयार करून शिवाजीचा समाचार घेतों.' बादशहानें हुकूम केला, 'सुरतेस लिहून विचारा, हा मनुष्य कशा लायकीचा आहे!'

१२ एप्रिल स. १६७०. पर्वतराव यानें तयार केलेला राज्याचा नकाशा बादशहास दाखविण्यांत आला.

७ एप्रिल स. १६७०. 'शिवाजीनें चांदवड लुटलें; णचा फौजदार लुदीखान याचा पराभव केला, ही बा डचा फौजदार फत्तेजंगखान पळून गेला. बादशहानें केला, 'त्या फौजदाराचा 'जंग' हा किताब काढून टाका.'

८ एप्रिल सन १६७०. पूर्वी अफझलखानाच्या नोकरींत असलेला शहा हलाल हल्लीं बादशहाचे नोकरींत आहे. तपासाअंतीं असें कळतें कीं, हा गृहस्थ येथील दरबाराची कच्ची हकीकत शिवाजीस कळवितो.

८ मे स. १६७०. अहंमदनगर, जुन्नर आणि परिंडा या महालांतील ५१ गांवें शिवाजीनें लुटलीं. बादशहानें ही गोष्ट ऐकून घेतली. कांहीं बोलले नाहींत.

शिवाजीच्या या कृत्यांनीं औरंगजेबाचें मन उत्तरोत्तर जास्तच चिडून गेलें. त्यानें शहाजाद्यास सक्तीचा हुकूम पाठविला कीं, शिवाजीशीं एकदम युद्ध सुरू करून त्याचा पाडाव करावा. आपण बापावर रुसून आलों आहों, असें शिवाजीस भासवून त्यास युक्तीनें कबजांत आणावें असें बादशहानें मुलास पढवून ठेविलें होतें. दोन तीन वर्षें पावेतों शहाजाद्यानें बेमालूमपणें हा प्रयोग सिद्धीस नेला. दिल्लीवर चालून जाण्याची तयारी दोघांची झाली. पण शिवाजी त्याच्या ताब्यांत सांपडला नाहीं. त्यानें

आपला लाग मात्र चांगला साधून घेतला. शहाजादा खरोखरच बापावर उठला होता, असाही त्या वेळीं समज होता. ( मनूची ). शहाजादा शिवाजीस अनुकूळ होता, म्हणून बादशहाचा वरील हुकूम येतांच त्यानें प्रतापराव गुजर याजवर एकदम हल्ला न करितां त्यास आपली फौज घेऊन औरंगाबादेहून निघून जाण्यास सांगितलें. त्याप्रमाणें प्रतापराव निघून शिवाजीकडे आला; आणि थोडा वेळ बंद पडलेलें युद्ध पुनः सुरू झालें.

तानाजी मालुसरे व सिंहगड. ( १६७० फेब्रुवारी ).—औरंगजेबाचा युद्ध करण्याचा इरादा दिसतांच शिवाजीनें एकदम युद्धास सुरवात केली, आणि आपल्या सर्व मंडळीस जवळ बोलावून झपाट्यानें युद्ध चालविण्याचा निश्चय ठरविला. पुरंदर व सिंहगड हे दोन किल्ले मगील तहापासून मोगलांकडे गेले होते, ते प्रथम घेतल्यानें शिवाजीचा खरा प्रभाव प्रगट होण्याजोगा होता. तानाजी मालुसरा हा शिवाजीचा बाळमित्र व परम विश्वासु होता. तो आपला भाऊ सूर्याजी व एक हजार निवडक मावळे यांस बरोबर घेऊन सिंहगड काबीज करितों, असें हिंमतीचें भाषण करून शिवाजीच्या परवानगीनें रायगड सोडून माघ वद्य नवमीचे काळोख्या रात्रीं सिंहगडाखालीं आला. किल्ल्याचा बंदोबस्त मोगलांनीं उत्तम प्रकारचा ठेविला असून, तेथील शिबंदीवर उदेभान राठोड हा शूर रजपूत सरदार मुख्य होता. त्याचा उल्लेख खं. १८ ले. २२ त आहे. थोड्याशा मावळ्यांनीं हा किल्ला काबीज करणें हें काम मोठेंच मर्दुमकीचें व धाडसाचें होतें. तानाजीनें पांचपांचशेंच्या दोन टोळ्या करून, एक स्वतःबरोबर घेऊन तीसहित तो एका अपरिचित बिकट वाटेनें किल्ल्यावर चढूं लागला, आणि दुसरी टोळी आपला भाऊ सूर्याजी याचे हाताखालीं मागें मदतीसाठीं म्हणून ठेवून दिली. प्रथम एक हुशार मावळा घोरपडीच्या साह्यानें कड्यावर चढला, तेथून खालीं सोडलेल्या दोरानें तानाजीचे तीनशें लोक मुकाट्यानें किल्ल्याचे कोटांत उतरले. त्यांची किल्ल्यावरील रजपुतांस चाहूल लागून, ते सर्व एकदम सज्ज होऊन आले. त्या प्रसंगीं थोडा वेळ फारच निकराची तुंबळ लढाई झाली, तींत पन्नास मावळे व पांचशें रजपूत ठार झाले. त्याच वेळेस तानाजी व उदेभान यांची प्रत्यक्ष गांठ पडून दोघेही हातघाईवर येऊन एकमेकांच्या हातांनीं ठार झाले. तानाजी पडलेला पाहून मावळ्यांनीं पाठीमागें पाऊल घेतलें. इतक्यांत सुदैवानें

सूर्याजी आपल्या ताज्या दमाची टोळी घेऊन किल्ल्यांत येऊन पोंचला. त्यानें वीरश्रीच्या भाषणानें मागें पळणाऱ्या लोकांत आवेश उत्पन्न करून परत फिरविलें, तेव्हां मावळे बेफाम होऊन रजपुतांत अशा त्वेषानें घुसले, कीं त्यांनीं सर्वांची साफ कत्तल करून टाकिली. कांहीं पळाले, ते किल्ल्यावरून उड्या टाकून मरण पावले. याप्रमाणें तानाजी पडला, परंतु गड काबीज झाला. संकेतानुरूप सूर्याजीनें किल्ल्यावरील एका झोंपड्यास आग लावून त्या उजेडानें किल्ला हातीं आल्याची इशारत शिवाजीस राजगडावर दिली. त्या खुणेनें शिवाजीस आनंद झाला, पण आपला पाठीराखा सिंह आपणास सोडून गेला हें कळलें नाहीं. दुसऱ्या दिवशीं शिवाजी व त्याची आई यांस तानाजीचा पराक्रम व त्याचा शोचनीय अंत यांची वार्ता कळल्यावर किती शोक झाला असेल, हें सांगण्याची जरूर नाहीं.

सिंहगडावरील तानाजीचा पराक्रम इतिहास, कादंबरी व काव्य या सर्वांस अत्यंत महत्त्वाचा व वर्णनीय विषय झाला आहे. स्वामिसेवेंत देह अर्पण करून आपल्या मृत्यूनेंही राष्ट्रास मोठेपणा आणणारे जे कित्येक नरसिंह पृथ्वीच्या पाठीवर क्वचित् निर्माण होतात, त्यांपैकीं तानाजी हा होय. नेलसन, वुल्फ इत्यादि इंग्रज योद्धयांप्रमाणेच तानाजीची उज्ज्वल कीर्ति राष्ट्रेतिहासांत चिरकाल झळकत राहणारी आहे. त्यांतही सिंहगड घेण्याच्या ह्या अचाट कृत्यांतील कित्येक गोष्टींनीं ह्या प्रकारास एक प्रकारचें विलक्षण हृदयद्रावक स्वरूप प्राप्त झालें आहे. सिंहगड घेण्याविषयीं जिजाबाईचा अत्याग्रह असून तो तडीस नेण्यास दुसरा कोणी पुढें होईना. तेव्हां तिनें स्वतः तानाजीस बोलावून लोक नको नको म्हणत असतां, हें काम त्याच्या गळ्यांत घातलें. शिवाजीलाही तें पसंत वाटलें. नवमीस तानाजीनें गड काबीज केला, त्याच्या अगोदर तीन दिवस म्हणजे षष्ठीच्या दिवशीं तानाजीचा मुलगा रायाबा याचें लग्न ठरलेलें होतें. जिजाबाईनें देखतपत्र येऊन भेटण्यासाठीं बोलाविल्यावरून तो लग्नाची तयारी तशीच टाकून धांवत आला, आणि रायाबास शिवाजीचे स्वाधीन करून मग सिंहगड काबीज करण्यास गेला. उदेभानाशीं लढतांना तानाजीची ढाल तुटली असतां डाव्या हाताची ढाल करून तो लढूं लागला. सतराव्या व अठराव्या शतकांत तानाजीसारख्या बऱ्याच लोकांनीं महाराष्ट्रांत जन्म घेऊन आपलें नांव गाजविलें, म्हणूनच 'मराठे' या नांवास अद्यापिही विलक्षण मान हिंदुस्था-

नांत मिळत आहे. तानाजीच्या ह्या पराक्रमावर तुळसीदास शाहीर यानें लिहिलेला एक तत्कालीन उत्कृष्ट पोवाडा प्रसिद्ध आहे. त्या योगानें लोकांस स्वराष्ट्रेतिहासाची गोडी लागून तानाजीच्या पराक्रमासारखीं कृत्यें जागृत राहिलीं आहेत.

'गड आला पण सिंह गेला,' असें म्हणून शिवाजीनें कोंडाणा किल्ल्यास सिंहगड हें नांव दिलें असें म्हणतात. कोणी असेंही म्हणतात, कीं सन १६४७ त प्रथम हा किल्ला शिवाजीनें घेतला तेव्हांच त्यानें हें नांव त्यास दिलें होतें. सूर्याजी मालुसऱ्यास सिंहगडची किल्लेदारी दिली.

सिंहगड घेतल्यानंतर एक महिन्याचे आंतच सूर्याजी मालुसऱ्यानें पुरंदर किल्ला हस्तगत केला. उत्तरेकडे मोरोपंत पिंगळे व आबाजी सोनदेव हे माहुली किल्ला व कल्याण प्रांत सर करण्यास गेले. सन १६७० चे सुमारास मोगलांचा प्रदेश लुटण्याचा व किल्ले काबीज करण्याचा धूमधडाका शिवाजीनें चालविला. सुरतेवर स्वारी करून परत आल्यावर त्यानें मोरोपंतास पाठवून माहुली किल्ला काबीज केला. हा किल्ला मोगलांकडे गेल्यापासून तेथील किल्लेदार मनोहरदास हा होता (पृष्ठ १४७ पहा). मनोहरदासाजवळ विशेष तयारी कांहीं एक नव्हती. त्यानें शिवाजीस सांगून पाठविलें 'आम्ही रजपूत बादशहाचे नोकर मरणास भिणारे नाहीं. पुष्कळ लोकांची अहुती दिल्याशिवाय किल्ला तुमच्या हस्तगत होणार नाहीं.' शिवाजीनें किल्ल्यास वेढा घातला. एके रात्रीं पांच सहाशें लोक दोरीच्या शिड्यांनीं वर चढले. मनोहरदासानें त्या सर्वांचा फन्ना उडविला. तेव्हां मोरोपंत वेढा उठवून कल्याणवर आला. कल्याण भिवंडीचा ठाणेदार उझबगखान मराठ्यांशीं लढून मरण पावला. इकडे मनोहरदास माहुलीची किल्लेदारी सोडून गेला. त्याचे जागीं अलवर्दीबेग किल्लेदार आला. तेव्हां शिवाजीनें पुनः किल्ल्यावर हल्ला करून अलवर्दीबेग व त्याचे दोनशें लोक ठार मारून किल्ला हस्तगत केला. ( Modern Review ). कर्नाळा व लोहगड हे किल्ले पुढें लवकरच शिवाजीनें घेतले, तेव्हां कल्याणप्रांतावर त्याचा ताबा बसला.

**१०. सुरतेवर स्वारी, चांदवड साल्हेरच्या लढाया.**—सुरत शहराचा सुभेदार मरण पावला असून, तेथील शिबंदी जसवंतसिंग किंवा मुअज्जम यांनीं काढून घेतली, अशी बातमी शिवाजीस कळतांच तो पंधरा हजार फौज

घेऊन सुरतच्या वेशीबाहेर येऊन उतरला. (ऑक्टोबर ता. ३, १६७०). या वेळीं शिवाजीबरोबर त्याचे सर्व मोठमोठे सरदार होते. किल्ल्यांत शिबंदी होती, ती पुरती हजार सुद्धां नव्हती. मराठ्यांनीं तीन दिवसपर्यंत त्या शहरांतून सावकाशपणें पैसा गोळा केला. या वेळीं इंग्रज, डच व फ्रेंच यांचे व्यवहार घडले, त्यांची हकीकत इंग्रज व शिवाजी यांच्या कलमांत पुढें दिली आहे. बऱ्हाणपुराहून आपणांवर मोगलांची फौज चालून येत आहे अशी तिसऱ्या दिवशीं बातमी लागतांच सुरतशहरांतून दरसाल बारा लाख खंडणीची मागणी ठरवून शिवाजी परत रायगडीं येण्यास निघाला. निघते वेळीं सुरतच्या रहिवाशांस त्यानें असें लिहून कळविलें कीं ' प्रतिवर्षी बारा लक्ष रुपये खंडणी बिनबोभाट पावती केल्यास तुमच्या शहरास लुटीची भीति नाहीं. ' शिवाजीचा बेत साल्हेरमुल्हेरवरून चांदवडास येऊन तेथील कंचनच्या घाटानें कोंकणांत उतरण्याचा होता. चांदवडनजीक मोगल फौजेनें त्यास गांठल्यामुळें सुरतेची लूट सुस्थानीं कशी पोंचते, ही त्यास मोठी काळजी होती. पण अडचण आल्यावर युक्तीनें तींतून पार पडण्यांतच शिवाजीचें अप्रतिम चातुर्य दिसत असे. त्यानें आपल्या फौजेच्या चार लहान लहान टोळ्या केल्या; शिवाय लूट घेऊन जाणारी टोळी वेगळीच होती. तिच्या तंत्रानें व शत्रूचें धोरण राखून सर्व टोळ्यांनीं वर्तावें असें त्यानें ठरविलें; आणि आपण औरंगाबाद घेण्यास जातों अशी हूल उठविली. दोन टोळ्यांनीं मोगल फौजेच्या आगेंमागें राहून तीस हैराण करण्याचा क्रम चालविला. ह्या प्रसंगीं मोगल फौजेचें आधिपत्य, मोगलशाहींत पुढें फार प्रसिद्धीस आलेला दक्षिणेंतील सरदार दाऊदखान पन्नी ह्याजकडे असून शिवाय एखलासखान व बाकेखान हे दोन सरदार दोन टोळ्यांवर मुख्य होते. प्रथमतः चांदवडनजीक बाकेखान एकटाच पुढें आल्यामुळें, शिवाजीच्या हातून परभव पावून तो चांदवडच्या किल्ल्यांत लपून राहिला. शिवाजी तसाच धिमे धिमे पुढें जात होता. दुसरे दिवशीं दाऊदखानाची फौज येऊन पोंचली. तिच्या अघाडीस एखलासखान होता. मराठ्यांनीं एकदम हल्ला करून एखलासखानास जखमी केलें. तेव्हां रायमुकुंद व भवान पुरोहित हे दोन मोगलांचे सरदार मराठ्यांशीं लढूं लागले. इतक्यांत दाऊदही स्वतः लढण्याकरितां पुढें आला. त्या वेळीं प्रत्यक्ष शिवाजी व दाऊद यांची दोन प्रहर मोठ्या

निकराची लढाई झाली. तींत तीन हजार मोगल व थोडे मराठे पडले. दाऊदखान लढाई सोडून पळाला. मोगलांचे चार हजार घोडे व कांहीं सरदार शिवाजीनें काबीज केले; परंतु आपल्या संप्रदायाप्रमाणें त्यानें त्या लोकांस लगेच सोडून दिलें. ऐशी फत्ते करून पुढें चालला तों मोगलांच्या तर्फेनें शिवाजीशीं लढण्याकरितां रायबागीण नांवाची एक शूर स्त्री पुढें आली. वऱ्हाडच्या दक्षिण हद्दीवर माहूर म्हणून एक प्रसिद्ध ठिकाण औरंगाबादेच्या पूर्वेस सुमारें दोनशें मैलांवर आहे, तेथचे देशमुख औरंगजेबाचे नोकरींत होते. माहूरचा देशमुख उदाराम याची ही बहिण, उदारामाचा मुलगा जगजीवन यासह शिवाजीस अडविण्यास आली असतां तिचा शिवाजीनें पराभव केला. तेव्हां ती दांतीं तृण धरून शिवाजीस शरण आली, त्यांस कौल देऊन शिवाजी रायगडास सुखरूप परत आला. 'मालमत्ता आणलेचा हिशेब करून पाहतां पांच कोटी होनांची रकम झाली, व घोडे पांच हजार आणिले, त्यांची पागा केली, आणि घोड्यांचे उजवे चौकावर चौकडीचे डाग देऊन खूण केली.'

सुरतची मोहीम संपल्यावरही मोगलांचें युद्ध जोरानेंच चालू होतें. शिवाजीनें प्रतापराव गुजर व मोरोपंत पिंगळे यांस फौज देऊन मोगलांचे मुलखांत पाठविलें. ह्या दोन सरदारांनीं ह्या वेळच्या युद्धांत विलक्षण पराक्रम केले. शिवाजीचे हेतू व धोरणें त्यांस इतकीं बरोबर अवगत होतीं कीं, ते शिवाजीचें काम हटकून फत्ते करीत. हे दोघे सरदार मोगलांचे मुलखांतून चौथाई व सरदेशमुखी वसूल करूं लागले. प्रतापराव चौथाई वसूल करीत वऱ्हाडांत कारंजापर्यंत गेला. हें शहर अकोल्याचे दक्षिणेस थोड्या मैलांवर आहे. त्या वेळीं तें फार धनाढ्य होतें, आणि तेथें पुष्कळ द्रव्य पुरून ठेविलेलें होतें. प्रतापरावानें मोठमोठ्या लोकांचे वाड्यांना खणती लावून मुबलक द्रव्य हस्तगत केलें. पिंगळे बागलणांत शिरला; व प्रतापरावानें खानदेशांत जाऊन गांवोगांव खंडणी वसूल करून मोठमोठीं शहरें लुटण्याचा सपाटा चालविला. बागलण हा हल्लीं नाशीकजिल्ह्याचा वायव्येकडील तालुका असून, त्यांतून गुजराथेंत उतरण्याचा हमरस्ता फार दिवसांपासून चालू आहे. या तालुक्याचें मुख्य शहर सटाणा हें आहे. मराठ्यांनीं मोगलांच्या मुलखांत चौथाईचा हक्क वसूल करण्याचा हा पहिलाच प्रसंग होय. प्रतापरावानें गांवोगांवचे पाटील कुळकर्ण्यांकडून

'वसुलाचा चौथा हिस्सा शिवाजीस देत जाऊं' असें लिहून घेतलें, आणि हा वसूल घेतल्याबद्दल लोकांस पावत्या लिहून देण्याची वहिवाट पाडिली. तेणेंकरून जे पावती दाखवितील त्यांस मराठ्यांकडून उपद्रव व्हावयाचा नाहीं असा बंदोबस्त झाला.

मोरोपंत पेशवे यानें दाऊदखान पन्नी याजबरोबर लढून बागलणांतील औंढा, पट्टा, साल्हेर मुल्हेर, त्रिंबकगड, रामनगर वगैरे किल्ले व ठिकाणें काबीज केलीं. औंढा व पट्टा नाशिकच्या दक्षिणेस आहेत, ( जानेवारी सन १६७१ ).

शिवाजीचीं हीं कृत्यें ऐकून औरंगजेबास काय करावें हें सुचेना. जशवंतसिंग व मुअज्जम या दोघांवरही त्याचा पूर्ण विश्वास नसल्यामुळें तो त्यांस ज्यास्त फौज ठेवण्यास हुकूम देत नसे. माहुली किल्ला मोरोपंतानें घेतल्यावर शहाजाद्यानें जुन्नर येथें ज्यास्त फौज ठेविली; आणि सुरतेच्या बंदोबस्तासही पांच हजार लोक ठेविले. यावरून बादशहास असा वहीम आला कीं, शहाजादा शिवाजीच्या मदतीनें स्वतंत्र होऊं पाहत आहे; आणि शिवाजीचें व त्याचें गुप्त कारस्थान आहे. म्हणून दक्षिणेंतील फौज वाढविण्याविषयीं शहाजाद्यानें वारंवार शिफारस केली, त्याबद्दल बादशहाला ज्यास्तच संशय येऊन ज्यास्त फौज ठेवण्याचें त्यानें मंजूर केलें नाहीं. मात्र दक्षिणच्या कारस्थानांस जोर येऊं नये, म्हणून जशवंतसिंगास परत बोलावून बादशहानें महाबतखानास दक्षिणेंत पाठविलें, आणि सर्व फौज महाबतखानाचे ताब्यांत देऊन शहाजाद्याकडे फक्त एक हजार लोक औरंगाबाद येथें बादशहानें ठेविले. महाबतखानाचे हाताखालीं दिलीरखान यासही दिलें. या वेळेस उत्तरेंस औरंगजेबाची फारच धांदल उडाली होती. अफगाणिस्तानांत जोराची गडबड चालू असून, तिचा संपर्क प्रत्यक्ष दिल्लीसही येऊन पोंचला असल्यामुळें अफगाणिस्तानांतील युद्ध व रजपुतांशीं चाललेला झगडा, यांजमुळें बादशहास शिवाजीकडे लक्ष देतां आलें नाहीं; आणि फौजेचा पुरवठा करतां आला नाहीं. उत्तरेंतील व्यवस्था तडीस गेल्यावर स्वतःच दक्षणेंत येऊन मराठ्यांस जिंकण्याचा त्याचा विचार चालू होता.

दक्षिणेंत आल्यावर महाबतखानानें मराठ्यांचे किल्ले घेण्यास प्रारंभ केला, आणि लगेच औंढा व पट्टा हे दोन किल्ले काबीज केले. दिलीर-

खानानें आपल्या फौजेच्या दोन टोळ्या करून चाकण व साल्हेर या किल्ल्यांस वेढा घातला. त्याबरोबर मोरोपंत व प्रतापराव हे साल्हेरीच्या फौजेस मदत करण्याकरितां आले. तेव्हां महाबतखानानेंही मराठी फौजेस अडविण्याकरितां एखलासखानास पाठविलें. त्या वेळीं जी लढाई झाली तीस साल्हेरची लढाई असें नांव आहे. (१६७२). प्रथमः प्रतापरावानें घाबरलो असें दाखवून पळ काढिला; आणि मोगलांची फौज फांकली जाऊन पाठलागावर येतांच प्रतापराव उलटला. तेव्हां फारच निकराची लढाई झाली. तींत मोगलांचा पूर्ण पराजय झाला. मोगलांचे नामांकित बावीस सरदार व लहान मोठे दहा हजार लोक पडले. मराठ्यांकडचेही कांहीं लोक मेले, त्यांत म्हणण्यासारखा नामांकित सरदार सूर्यराव काकडे, शिवाजीचा लहानपणचा सोबती व साहाय्यकर्ता हा पडला. या साल्हेरच्या लढाईची बखरकारांनीं लिहिलेली हकीकत वाचून, व मराठ्यांचे हे पराक्रम पाहून, चित्तवृत्ति उचंबळल्याशिवाय राहत नाहींत. आधुनिक पाश्चात्य पद्धतीस अनुसरून तत्कालीन लढायांचीं स्मारकें आपणांमध्यें झालीं असतीं तर आसई, लासवाडी, चिलियनवाला, इत्यादि ठिकाणच्या लढायांप्रमाणेंच शिवाजीचे हे संग्राम इतिहासांत झळकले असते. साल्हेरच्या लढाईंत दिलीरखान व एखलासखान यांसारखे मी मी म्हणणारे व बादशहाच्या खुद्द भरंवशाचे सरदार मराठ्यांस हार गेले. एखलासखान मराठ्यांचे हातीं सांपडला; व दिलीरखान पळून गेला. या वेळीं शिवाजीचे मावळे व पागा हीं चांगलीं कसास उतरलीं. मराठ्यांस शत्रूंकडील पुष्कळ सामान मिळालें. साल्हेरचा किल्ला मोगलांनीं सोडिला व ते परत औरंगाबादेस गेले. पाडाव झालेल्या लोकांच्या व सरदारांच्या जखमा वगैरे बऱ्या झाल्यावर त्यांस नजर नजराणे देऊन शिवाजीनें सोडून दिलें. ज्यांची मर्जी होती ते शिवाजीजवळ राहिले. युद्धामध्यें शिवाजी किती नीतीनें वागत होता, हें यावरून दिसून येतें. पाडाव झालेले लोक तो सोडून देत असे. कधीं कोणाचे हाल करीत नसे. हिंदुमुसलमानांत भेद करीत नसे. सतराव्या शतकांतील शिवाजीची ही युद्धनीति विसाव्या शतकांतल्या सुधारलेल्या नीतीस लाजवीत नाहीं काय! साल्हेरच्या लढाईंत हत्ती, उंट, घोडे व पुष्कळ जड जवाहीर व युद्धोपयोगी सामान शिवाजीच्या हस्तगत झालें; आणि शिवाजीचे पुष्कळ सरदारांनीं अतिशय

बहादुरी दाखविली, त्याबद्दल त्यानें त्यांस वस्त्रें भूषणें दिलीं. मराठ्यांचें शौर्य व राष्ट्रतेज पाहून मोगल लोक थक्क होऊन गेले; आणि त्यांस शिवाजीची ज्यास्तच दहशत वाटूं लागली. समरांगणी शत्रूसमोर उभे राहून लढण्याचा मराठ्यांचा प्रघात साल्हेरच्या लढाईपासून निदर्शनास आला.

साल्हेरच्या लढाईनंतर लवकरच महाबतखान व शहाजादा मुअज्जम यांस बादशहानें परत बोलावून, गुजराथचा सुभेदार खानजहान यास दक्षिणाच्या सुभ्यावर पाठविलें; आणि महाबतखानची नेमणूक अफगाणिस्तानांत केली. तिकडे हा नामांकित सरदार स. १६७२त मरण पावला. खानजहानचे हाताखालीं दिलीरखान होताच. मराठ्यांनीं या खेपेस अहंमदनगर व औरंगाबाद या प्रांतांत धामधूम आरंभिली. मोगलांकडील अंमलदार वरचेवर बदलत; याचा फायदा शिवाजीनें चांगलाच घेतला. प्रतापरावास त्यानें पुन: सुरतेकडे पाठविलें.

११. युद्धाचा निष्कर्ष:—सन १६६४ त शिवाजीनें सुरतेवर हल्ला केला, तेव्हां तेथचा तट मातीचा होता. पुढें शहरसंरक्षणासाठीं औरंगजेबानें तो तट लवकरच मजबूद विटांचा नवीन बांधून काढिला. १६७० च्या ऑक्टोबरांत पुन: शिवाजीनें सुरतेवर स्वारी केली. त्यानंतर कांहीं महिन्यांनीं साल्हेर व मुल्हेर हे किल्ले त्यानें काबीज केले. ह्या गोष्टी झाल्यावर १६७३त (?) प्रतापरावानें आणखी एकदां सुरतेवर स्वारी केली. त्या वेळीं त्यानेंखालील जाहीरपत्र काढिलें. ( Modern Review, 1908 ).

‘ सुरत येथील कानगो,* देसाई, व्यापारी, महाजन व शेटे, आणि इंग्रज, फ्रेंच व डच वखारींचे कप्तान आणि रयत लोक यांस कळावें कीं:—

‘ सुरत येथील व्यापारी मालावर सालोसाल जकातीचें उत्पन्न किती येतें, त्याचा पूर्ण तपास करून चौथा हिस्सा शूर मराठी फौजेची खंडणी म्हणून घेत जावा, अशी आम्हांस महाराज शिवाजीची आज्ञा झाली आहे, आणि ह्या कामावर त्यांणीं माझी नेमणूक केली आहे. त्याबरहुकूम तुम्हां सर्वांस असें कळविण्यांत येत आहे कीं, या हुकमाअन्वयें बऱ्या बोलानें वागण्याची सुबुद्धि देव तुम्हांस देईल तर आमचा गुमास्ता जात आहे यास

* कानूनगो=कायदे जाणणारा; मुसलमानांचा एक मुलकी कामगार.

सर्व कागद दाखवून हिशेब चुकवून घ्यावा. असें तुम्ही न कराल तर आमचे शूर शिपाई तुमच्या शहरावर लगेच झडप घालतील व घरेंदारें जमीनदोस्त करून तुमची दुर्दशा करितील. तुम्ही त्यांच्या कबजांतून पळून जाऊं शकणार नाहीं. बादशहा तुमचें संरक्षण करील असें तुम्हांस वाटत असल्यास हा तुमचा भ्रम आहे. यापूर्वीं दोन वेळां आम्हीं तुम्हांस तुडविलें, तेव्हां कोठें त्यानें तुमचें रक्षण केलें! तटावरील तोफांचा धूर तुमच्या डोळ्यांवर येऊन त्या तुमचें रक्षण करतील असें तुम्हांस वाटत असेल तर आमचे शूर योद्धे पिंजलेल्या कापसाप्रमाणें क्षणमात्रांत ह्या तटाच्या चिंधऱ्या उडवून देतील आणि त्याच तोफांनीं तुमचीं घरेंदारें नाहींशीं करतील. साल्हेर मुल्हेरचे किल्ले कित्ती बळकट होते, ते आम्ही काबीज करूं अशी कोणास कल्पनाही होत नव्हती; परंतु महाराजांच्या पुण्य प्रतापानें आमच्या शिपायांनीं ते इतक्या लौकर काबीज केले कीं ही गोष्ट सांगण्यास सुद्धां वेळ ज्यास्त लागेल. हा प्रकार तुम्हांस ठाऊक आहेच. अशा आमच्या योद्ध्यांपुढें तुमच्या सुरतच्या तटाची किंमत ती काय? तुमचे नांवाजलेले योद्धे दिलीरखान व बहादूरखान हे साल्हेरवरून मनगटें चावीत परत गेले, हेंही तुम्हांस ठाऊक आहेच.

एकदम तुमच्या शहरावर फौज न पाठवितां तुम्हांस ही आगाऊ सूचना मेहेरबानीदाखल दिली जात आहे. ईश्वराची तुम्हांवर कृपा असेल तर हा हुकूम पाळण्याची सुबुद्धि तो तुम्हांस देईल. नाहीं तर तुमचे हाल तुम्ही जाणा.' याजवर सुरतेच्या अधिकाऱ्यांकडून आलेला जबाबः—

'प्रतापराय व मराठे, ब्राह्मण, नाईकवाडी व बारगीर यांचे तीव्र बुद्धीस कळावें कीं, तुमचें पत्र आतांच आमचे हातास आलें. दुष्टांनो, ज्या बादशहाचा लहानसा नोकर मीर्झा राजा जयसिंग यानें तुमच्या शिवाजीस वठणीस आणून बादशहापुढें नाक घांसण्यास लाविलें; विजापुर व गोंवळकोंडा येथील शहा, ज्या बादशहाच्या नोकरांपुढें नाक घांसून सालोसाल खंडणी भरून आपला बचाव करितात; त्या बादशहाचा प्रभाव तुम्हांस अजून ठाऊक झाला नाहीं काय? तुमच्या या उद्धट शब्दांबद्दल तो तुमची जीभ कापून तुम्हांस दगडाखालीं ठेंचून काढील, हें तुम्हांस कळत कसें नाहीं? पहिली ती सुरत ही नव्हे. तुम्हा उंदरांच्या बंदोबस्तासाठीं सुरतेला आतां नवीन तट बांधलेला आहे; आणि आतां येथें मोगलांचे शूर

सिंह जागत बसले आहेत. सबब हा भलताच खटाटोप सोडून देऊन, पळून जाऊन, लपून बसा कसे ? मुलतान शहाजादा सत्तर हजार फौज घेऊन तुमचे पाटीवर येत आहे. तो आल्यावर तुमच्या प्रेतांनीं शिवाजींची मात्र चैन होईल. आपला बचाव व्हावा अशी तुमची इच्छा असेल तर आजपर्यंत तुम्हीं जे कांहीं अपहार करून घेतलें आहे, तें सर्व बहादुरखान व दिलीरखान यांस नेऊन सोंपून द्या. म्हणजे ते तुम्हांस केलेल्या अपराधांची क्षमा करून बादशहाच्या कृपाछत्राखालीं घेतील.' शिवाजीऔरंगजेबांमधील वैर किती विकोपास गेलें होतें, तें या पत्रांवरून दिसून येतें.

बहादूरखानासच खानजहान हा किताब होता. म्हणून हीं दोन नांवें एकाचींच होत. बहादुरखानास बादशहानें सत्तर हजार फौज दिली होती. परंतु शिवाजीच्या फौजेच्या व बंदोबस्ताच्या मानानें आपल्या या फौजेचा टिकाव त्याजपुढें लागेल असें त्यास वाटलें नाहीं. तेव्हां युद्धाच्या भानगडींत न पडतां आपण आपल्या प्रदेशाचा बंदोबस्त करून रहावें असें त्यानें ठरविलें. दिलीरखानास हा बेत आवडला नाहीं. शिवाजीचे हल्ले मोगलांचे मुलखावर ज्यास्तच जोरानें चालूं लागले, तेव्हां खानजहाननें निरुपाय होऊन शिवाजीशीं गुप्त रूपानें सलोखा केला. बादशहा ज्यास्त फौज पाठविण्यास खुपी नव्हता, म्हणून त्यानें शिवाजीशीं युद्ध करण्याचें थांबविलें, आणि सन १६७२ च्या पावसाळ्यांत दौंडच्या पूर्वेस भीमानदीच्या कांकणावर पेडगांव येथें छावणी करून राहिला. येथें पुढें चाळीस वर्षे मोगलांनीं छावणी केली; आणि तेथें एक भुईकोट किल्ला बांधून त्यास बहादूरगड असें नांव दिलें. या ठिकाणाहून शिवाजीवर दाब टेवणें ज्यास्त सोईचें असें मोगलांनीं ठरविलें.

सन १६६७ च्या आरंभापासून १६७२ पर्यंतचा हा युद्धकाल अनेक प्रकरणांनीं भरलेला आहे. प्रथम जयसिंग व दिलीरखान हे सुभेदार होते. दोघांवरही बादशहाची इतराजी झाली, आणि त्यांस बादशहानें बदलिलें. सन १६६८ त जशवंतसिंग व शहाजादा मुअज्जम कारभारावर आले. त्यांनीं स. १६६८ च्या जून महिन्यांत शिवाजीशीं तह जुळवून आणिला. हा तह सुमारें दीडवर्ष टिकून स. १६७० त मोडला. त्यानंतर दोन वर्षेंपावेतों शिवाजीनें खूबच दंगल उडवून दिली. स. १६७०।७१ त जशवंत-

सिंगाच्या जागीं महाबतखान आला. तो जवळ जवळ एक वर्ष होता. स. १६७२ त बहादूरखानाची नेमणूक होऊन त्यानें युद्ध थांबविलें.

सन १६५७ त औरंगजेब दक्षिणच्या सुभेदारीवर असतां शिवाजीनें जुन्नरवर छापा घालून ज्या युद्धास सुरुवात केली, तें युद्ध वरप्रमाणें बारा वर्षे चालून त्याचें स्वरूप कसकसें बदलत गेलें हें वर सांगण्यांत आलेंच आहे. ह्या युद्धांत शिवाजीच्या बाजूस राष्ट्रीय जोम व मोगलांच्या बाजूस बादशाहाची धरसोड व अविश्वास या गोष्टी मुख्यत्वें दिसून येतात. एकाही सरदारावर बादशहानें विश्वास ठेविला नाहीं. प्रत्यक्ष त्याचा मुलगा सुद्धां त्याच्या डोळ्यांत सलत होता. त्याला वाटे, मुलाचे मदतीस फौज पाठविली असतां त्यास शत्रूवर जय मिळून तो प्रबल होईल; आणि मागें पुढें तो आपणांवरच शस्त्र धरून उठेल. त्यास मदत न पाठवावी तर शिवाजी प्रबळ होऊन दक्षिणचा मुलूख काबीज करणार. या धरसोडींत शिवाजीला आपलें कार्य साधण्यास चांगलें फावलें. शेवटच्या दोन तीन वर्षांत जे निकराचे युद्धप्रसंग झाले, त्यांत मराठ्यांचें शौर्य, पराक्रम व राष्ट्रतेज उत्तम कसास लागलें. याच युद्धांत मराठ्यांचें राष्ट्र तयार झालें. त्या राष्ट्राचा मध्यवर्ती स्तंभ शिवाजी होता. राष्ट्रावर जेव्हां असे चोहोंकडून सारखे आघात होऊं लागतात, तेव्हांच त्याचें ऐक्य होऊन त्याची संघशक्ति वाढत जाते, असा जो सामान्य नियम आहे तो या वेळीं चांगला प्रत्ययास आला. मराठे, ब्राह्मण, प्रभू वगैरे शेंकडो इसम जिवावर उदार होऊन राष्ट्रकार्य करूं लागले. आपण सर्व या राष्ट्राचे घटक आहोंत, राष्ट्रसेवेकरितां सर्वस्व खर्ची घालणें हे आपलें कर्तव्य आहे, अशा भावनेनें या वेळीं सर्वांनीं उद्योग केला. म्हणूनच चारही दिशांस शिवाजीचें राज्य वृद्धिंगत झालें. ठिकठिकाणाहून आणलेला पैसा व लूट सर्व सरकारांत जमा होऊन राज्याची शक्ति वाढली. अफझलखानाच्या वधापूर्वीं शिवाजी हा कोणी तरी पुंड आहे, एवढीच लौकिकांत सामान्य कल्पना होती. पण पंधरा वर्षे मोगल बादशहाशीं टक्कर देऊन त्यांत जेव्हां शिवाजीस चांगलें यश आलें, तेव्हां शिवाजीच्या प्रयत्नांचें खरें स्वरूप बाहेर पडलें. विजापुर व गोवळकोंडा येथील सुलतान शिवाजीस खंडण्या देऊं लागले, आणि मोगलांच्या राज्यांतील बऱ्याच प्रदेशांतून शिवाजीस चौथाईचा हक्क मिळूं लागला.

या गोष्टीनीं शिवाजीचें राज्य व मराठ्यांचें राष्ट्र लोकांचे मनांत कायम झालें. हा चौथाईचा हक्क शिवाजीनें बसविण्यांत मूळ तत्त्व असें होतें कीं, सरकारदेण्याचा जो एकंदर वसूल ठरलेला असेल, त्याचा एक-चतुर्थांश लोकांनीं दरसाल शिवाजीस देत जावा. हा वसूल दिला असतां मराठ्यांकडून त्या गांवाची लूट होऊं नये, इतकेंच नव्हे तर, दुसऱ्या कोणी त्या गांवास उपद्रव केल्यास शिवाजीनें त्याचें संरक्षण करावें, अशा प्रकारचा हेतु चौथाई बसविण्याचा होता. हा कर वसूल करण्यास खर्च लागे, तो भागविण्यासाठीं एकंदर वसुलाचा दहावा हिस्सा सरदेशमुखी म्हणून चौथाईबरोबर घेत जावा, असाही प्रकार हळू हळू सुरू झाला.

मोगलांबरोबरचें युद्ध समाप्त होतांच स्वराज्याची स्थापना यथासांग झाली हें दाखविण्यासाठीं यथाविधि राज्याभिषेक करवून घेणें हेंही ओघास आलें.

## प्रकरण नववें.

### राज्याभिषेकोत्सव व त्याचें रहस्य.

१. राज्याभिषेकाची अवश्यकता. २. समारंभाची सिद्धता, गागाभट्ट.
३. श. १५९६ ज्येष्ठ शु. १३ चा समारंभ. ४. स्वराज्याचें स्वरूप.
५. अष्टप्रधानांचीं नांवें व कामें. ६. शिवाजीच्या मराठशाहीची व्याप्ति.
७. सीदीशीं शिवाजीचें युद्ध. ८. शिवाजीचें आरमार.
९. शिवाजीची इंग्रजांस दहशत.

**१. राज्याभिषेकाची अवश्यकता.**—ऐतिहासिक घडामोडीचें विवेचन नुसतें कालक्रमानें करतां येत नाहीं. त्यांची संगति जुळविण्याकरितां, हरएक बाबत संपूर्णत्वानें एका ठिकाणीं सांगावी लागते. औरंगजेबाशीं युद्ध संपल्यावर शिवाजीचें आदिलशाहीशीं युद्ध झालें, परंतु तें जवळ जवळ शिवाजीचे अखेरपर्यंत चालू होतें, सबब तें सर्व एकाच ठिकाणीं पुढील प्रकरणांत दिलें जाईल.

स. १६७२ चे अखेरीस मराठ्यांचे राज्यास व्यवस्थित, स्थायिक व सार्वभौमत्वाचें असें स्वरूप प्राप्त झालें. मुसलमानी शहांस आपले अंकित करून शिवाजी हिंदु पादशहा बनला. पूर्वी शिवाजीच्या राज्याची हद्द

उत्तरेकडे कल्याणपावेतों होती, ती आतां खानदेश, औरंगाबाद, वऱ्हाड येथपर्यंत जाऊन पोंचली. दक्षिणेस हुबळी व बेदनूर, व पूर्वेस विजापुर गोवळकोंडा पावेतों सर्व प्रदेश त्याच्या स्वाधीन झाला. तापी नदीच्या दक्षिणेकडील सुरत वगैरे कडील मोगल प्रदेशांतून चौथाई व सरदेशमुखी वसूल शिवाजीस मिळूं लागला. येणेंप्रमाणें तीस वर्षें श्रम करून मिळविलेल्या एवढया मोठ्या वैभवाचें स्मारक म्हणून त्याला शोभेल असा उत्सव करावा, अशी कल्पना त्याच्या व त्याच्या मसलतगारांच्या मनांत आली. आणि शिवाजीनें स. १६७४ त रायगड येथें यथाविधि राज्याभिषेक समारंभ मोठ्या थाटानें करविला.

मराठ्यांच्या अंगीं नवीन जोम उत्पन्न झाला. त्यांच्या ठिकाणीं राष्ट्रैक्य उत्पन्न करून, त्यांचें स्वराज्य स्थापन करितां येईल, ही अंधुक कल्पना प्रथम शिवाजीच्या मनांत आल्यास सुमारें तीस वर्षें झालीं. ती कल्पना तडीस नेण्याइतकी आपल्या अंगीं योग्यता आहे, हें केवळ शिवाजीनेंच नव्हे, तर त्याचें साह्य करणाऱ्या सर्व मंडळींनीं जगाच्या निदर्शनास आणून दिलें. म्हणून स्वराज्यस्थापनेच्या या कल्पनेला कायमचें स्वरूप देणें सर्वांस अवश्य वाटलें. विधिपूर्वक जी गोष्ट होते, तिचा परिणाम लोकांचे मनावर कायमचा होऊन, त्यापासून राष्ट्राचे अनेक फायदे होण्याजोगे असतात. वास्तविक पाहिलें, तर सर्व महाराष्ट्रांत ठिकठिकाणीं पुष्कळ मराठे सरदार कमी ज्यास्त मानानें स्वराज्याचा व स्वातंत्र्याचा उपभोग घेत होते. परंतु त्या सर्वांचें एक मत नव्हतें. त्यांच्या कर्तृत्वाच्या दिशाही वेगळ्या होत्या. एवढ्यामुळें त्यांचें स्वातंत्र्य लोकांस किंवा स्वतः त्यांसही उपयोगी नव्हतें. त्या सर्वांचें एकचित्त करून, आदिलशाही व मोगलशाही यांचा मराठमंडळावरील ताबा झुगारून देऊन, आपल्या राष्ट्राचें स्वातंत्र्य विधिपूर्वक स्थापण्याचें श्रेय शिवाजीनें संपादिलें. अशा प्रकारें व्यवस्थित राज्यस्थापना करणें, हें ह्या राज्याभिषेकाचें पहिलें प्रयोजन होय.

दुसरें, मराठ्यांचे शत्रु, व आजूबाजूचे तटस्थ तिऱ्हाईत यांजवर मराठ्यांचा वचक व दरारा कायमचा बसविण्याची जरूर होती. आपण आजपर्यंत जे हक्क घेतले, कर वसूल केले, राष्ट्राच्या तर्फेनें अनेक मोठमोठ्या लढाया मारिल्या, शत्रूंचा पाडाव करण्यांत अव्याहत श्रम केले, तें सारें केवळ स्वराज्यासाठींच, असें सर्वांस दाखवून देण्याची जरूर होती.

सर्वांना आपल्या कृत्यांची यथार्थता भासविण्यास, स्वराज्य आहे व त्याच्या-साठीं आपण भांडत आहों, असें दाखवून देणें अत्यंत जरूर होतें. राज्य अस्तित्वांत नव्हतें तोंपर्यंत, शिवाजी हा बंडखोर, लुटारू, दुसऱ्यांस लुचाडून आपली पिशवी भरणारा, असें कोणासही वाटणें साहजिक होतें. कारण स्वत्वाचें अस्तित्वच जर नाहीं, तर स्वत्वाकरितां आपण झगडत आहों, अशी लोकांची खात्री त्याला कशी करितां यावी ? या म्हणण्याची यथार्थता परिणामावरून ही दिसण्याजोगी आहे. शिवाजीनें जीं धामधुमीचीं व लुटारूपणाचीं कृत्यें केलीं, तशींच किंबहुना त्यांहून ज्यास्त कृत्यें शिवाजीनंतर शेंकडों मराठे सरदारांनीं केलेलीं आहेत. संताजी घोरपडे, धनाजी जाधव, दाभाडे, बाजीराव, शिंदे, होळकर, भोसले इत्यादि अनेक मराठे सरदारांनीं सर्व हिंदुस्थानभर धामधूम करून मराठ्यांचे राज्याची मर्यादा हिंदुस्थानचे एका टोंकापासून दुसऱ्या टोंकापर्यंत पोंचविली, आणि शिवाजीच्या मातपटीनें देशांत खळबळ उडवून दिली. असें असतां, लुटारू व बंडखोर हीं विशेषणें शिवाजीलाच कां लावितात ? शिवाजीनें ज्यास्त अन्याय केला असें नाहीं. उलट धामधुमीच्या कृत्यांत शिवाजीनें दाखविलेली दयार्द्रदृष्टि पुढील मराठे सरदारांचे ठिकाणीं नव्हती, असेंच म्हणण्यास जागा आहे. शिवाजीला दूषणें देण्यांत इंग्रज वगैरे परकीय ग्रंथकारांनींच कमाल केली आहे असें नाहीं. मराठी बखरींतून सुद्धां पुंड, लुटारू इत्यादि विशेषणें बहुधा शिवाजीसच लाविलेलीं दिसतात. याचें कारण असें कीं, शिवाजीनें पराक्रम केले त्या वेळेस राज्य अस्तित्वांत नव्हतें. तें स्थापन करण्यास त्यास त्या वेळच्या राज्यांविरुद्ध उठावें लागलें; त्यामुळें अर्थात् तो बंडखोर ठरला; आणि सर्वतोमुखीं त्यास तशीं विशेषणें मिळत गेलीं. परंतु शिवाजीस राज्याभिषेक झाल्याबरोबर लोकांचीं तोंडें बंद झालीं. अभिषेकानंतर शिवाजीचा पक्ष न्याय्य आणि त्यास अडथळा करणारे ते बंडखोर अशी कल्पना सहजच लोकांचे मनांत बिंबली. ही कल्पना लोकांचे मनांत बिंबविणें हा राज्याभिषेक करण्याचा एक प्रधान हेतु तो शिवाजीनें अत्यंत शहाणपणानें तडीस नेला. ही गोष्ट ह्याचे पूर्वींच व्हावयास पाहिजे होती, पण अनेक अडचणींमुळें त्यास ती अगोदर करितां आली नाहीं.

यथाविधि अभिषेक झाल्यापासून आणखी एक मोठा फायदा होणारा होता. शिवाजीला साह्य करणारी मंडळी पुष्कळ होती खरी; परंतु केवळ त्याच्या भक्तमंडळाबाहेर सामान्य जनसमूहांत त्याजबद्दल स्वामिभक्ति उत्पन्न झाली नव्हती. कित्येक लोक मनांतून त्यास अनुकूल होते; परंतु त्याच्या कर्तृत्वाची शाश्वती नसल्यामुळें त्यास उघडपणें मिळण्यास त्यांस धीर होत नव्हता. नवीन राज्यस्थापनेच्या वेळीं असा प्रकार नेहमींच घडतो. शिवाजीच्या उद्योगाविषयीं कित्येक सरदार व सामान्य लोक बेपर्वा होते, त्या लोकांनीं आपल्या मनांतील बेपर्वाईचें वर्तन सोडून देऊन, मनाचा निश्चय कायम करून कोणता तरी पक्ष उघडपणें स्वीकारणें जरूर होतें. तसें करण्यास त्यांस भाग पाडण्यास अभिषेकासारख्या समारंभाची आवश्यकता होती. उदाहरणार्थ, फलटणचे निंबाळकर शिवाजीचे आप्त व दोस्त होते. परंतु ते शिवाजीच्या राज्यांत सामील झाले नव्हते. म्हणून स. १६६५ त शिवाजीचा जयसिंगाशीं तह करल्याबरोबर, त्यानें विजापुरच्या प्रदेशावर स्वारी केली, त्या स्वारींत फलटण लुटून त्यानें तेथचा कांहीं प्रदेश काबीज केला. ही दोस्तांची गोष्ट झाली. पण शिवाजीचे जे उघड शत्रु होते, त्यांस शिवाजीची खरी खात्री पटून आल्यामुळें, स्वपरबलाबलाची तुलना करून त्याजबरोबर उघड वैर किंवा उघड सख्य स्वीकारण्यास त्यास भाग पाडणारें अभिषेका-इतकें दुसरें चांगलें साधन नव्हतें. राज्याभिषेकांत विधिपूर्वक टोलेजंग समारंभ करणें; व राज्याची चिरस्थायी व्यवस्था बांधून देणें ह्या गोष्टींचा समावेश होतो. आपण जिंकिलेल्या प्रदेशांत दिवाणी फौजदारी वगैरे अंमलाची व्यवस्था लावून देणें हें नवीन राज्यसंस्थापकाचें पहिलें काम होय. लढाई करून केवळ प्रदेश जिंकल्यानें काम भागत नाहीं. राज्य कायम करावें लागतें. निरनिराळीं खातीं उत्पन्न करून, राज्यव्यवस्था ठरविल्याबरोबर लगेच राज्यांत शांतता होते असें नाहीं. परंतु ह्या बाह्य चिन्हांनीं लोकांच्या मनाचें समाधान होऊन राज्यकर्त्यास दोष देण्यास त्यांस सवड राहत नाहीं. अशा लौकिकी व दिखाऊ गोष्टीचा एकंदरींत उपयोग फार असतो, हें शिवाजीनें पूर्णपणें ओळखिलें.

शिवाजीला बंडखोर व लुटारू म्हटलें आहे, यांत आश्चर्यकारक असें कांहीं नाहीं. केव्हांही नवीन राज्य स्थापन करणाराच्या माथीं असा

लोकापवाद यावयाचाच. सन १७७६ सालीं अमेरिकेंतील इंग्रज लोकांनीं इंग्लंडचा ताबा झुगारून देऊन आपण स्वतंत्र आहों, असा जाहीरनामा लाविला, तेव्हां अमेरिकेंतले इंग्रज बंडखोर व राजद्रोही आहेत, असे दोषारोप इंग्रज राष्ट्रानें त्यांजवर केले. परंतु बाहुबलानें आपलें म्हणणें त्यांनीं खरें करून दाखविल्याबरोबर ते साव बनले. राज्यांच्या उलाढालींच्या प्रसंगीं, चोर, बंडखोर, वगैरे शब्दांस फारसा अर्थ नसतो. बंड सिद्धीस गेल्याबरोबर त्याचें अन्यायाचें स्वरूप बदलून त्यास स्वराज्य-स्थापनेचा झगडा अशी संज्ञा प्राप्त होते. तेंच बंड सिद्धीस गेलें नाहीं म्हणजे त्याच्या उत्पादकांवर राजद्रोहाचे आरोप येतात. इंग्रजांच्या राज्याचा मूळ पुरुष 'विजेता वुल्यम' हा आरंभीं अशाच प्रकारचा बंडखोर असून, इ. स. १०६६ त त्यानें हेस्टिंग्ज्ची लढाई जिंकल्यावर तो इंग्लंडचा कायदेशीर राजा झाला.

अशा अनेक कारणांस्तव यथाविधि राज्याभिषेक करण्याची शिवाजीस आवश्यकता वाटली. शहाजी जिवंत असेपर्यंत शिवाजीस हा विचार करितां आला नाहीं. त्यानंतर मोगलांकडील पेंचांत सांपडून त्यास बादशहाकडे जावें लागलें. तेथून सुटून आल्यावर मोगलांशीं युद्ध करण्याचा प्रसंग आला. त्या युद्धांत त्यास चांगलेंच यश मिळालें आणि स. १६७२ नंतर त्याचें चित्त थोडें स्वस्थ झालें. तेव्हांपासून राज्यारोहणाचा विचार त्याच्या मनांत उद्भवला. असें सांगतात कीं, एकदां भोजनप्रसंगीं पुष्कळ सरदारमंडळी रायगडावर जमली असतां, दरबारांत शिवाजीला उच्चासन ठेवलेलें होतें, तें कित्येक मराठे सरदारांस खपलें नाहीं. तेव्हां यथाविधि राज्यपद स्वीकारण्याचा प्रश्न विशेष जोरानें पुढें आला. आजपर्यंत जिंकलेल्या प्रांतांत राज्यपद्धति स्थापन करण्याचे त्यानें अनेक प्रयत्न केले. आपल्या नांवाचें नाणें पाडिलें, आपणास राजा हा किताब घेतला, तथापि धार्मिक व लौकिक दृष्ट्या विधिपूर्वक समारंभ न झाल्यामुळें, त्याच्या राज्यास कायद्याचें निश्चित स्वरूप प्राप्त झालें नव्हतें. पण राज्याभिषेक झाल्याबरोबर हा प्रकार बदलला. एखाद्या गोष्टीची जरूर वाटतांच आत्मीयांच्या सल्ल्याशिवाय एकदम ती सिद्धीस न्यावी असा शिवाजीचा स्वभाव नव्हता. त्यानें रामदासस्वामीचा, मातुःश्रीचा व स्नेही मंडळीचा या कामीं सल्ला घेतला; आणि रीतीप्रमाणें भवानी मातेचेंही अनुमोदन घेतलें. नंतर सर्वांच्या मतानें राज्याभिषेक

समारंभ करण्याचें ठरून तत्प्रीत्यर्थ शके १५९६ ज्येष्ठ शु. १३ ता. ६ जून सन १६७४ शनिवार हा दिवस मुक्रर करण्यांत आला.

२. समारंभाची सिद्धता, गागाभट्ट.—या समारंभास आरंभीं एक मोठी अडचण आली. तत्कालीन समजुतीप्रमाणें राज्याभिषेकाचा व राज्य करण्याचा अधिकार फक्त क्षत्रियांसच होता. शिवाजीचे आजपर्यंतचे धार्मिक संस्कार क्षत्रियांच्या चालीप्रमाणें झाले नसल्यामुळें, शिवाजीस राज्याधिकार नाहीं, अशी लोकांची समजूत होती. परंतु शिवाजीवर निस्सीम भक्ति ठेवून त्याचें साह्य करणारे लोक इतके होते, कीं कोणतीही गोष्ट त्याच्या तोंडावाटे येण्याचा अवकाश, कीं ती तडीस जावयाचीच; मग त्यांत प्राण खर्ची पडत असले तरी हरकत नाहीं. गतानुगतिक महाराष्ट्रीय मंडळ एकदम एखादा नवीन फेरफार करण्यास तयार नव्हतें. तेव्हां विद्वज्जनमान्य व नामांकित पंडित या कामीं पुढाकार घेण्यास पाहिजे होता. काशीचा प्रसिद्ध पंडित गागाभट्ट याच्या हस्तें हा विधि उरकून महाराष्ट्रमंडळास संतुष्ट करण्याचा विचार शिवाजीनें व त्याच्या सल्लागारांनीं ठरविला. त्याप्रमाणें रामचंद्र बाबाजी वगैरे विश्वासू मंडळीस काशीस व पैठणास पाठवून शिवाजीनें गागाभट्टास रायगडीं आणविलें.* शिवाजीचा राज्याभिषेकसमारंभ राष्ट्रीय व धार्मिक अशा दोन स्वरूपांचा होता. पैकीं धार्मिक बाबती गागाभट्टाच्या संमतीनें निश्चित करण्यांत येऊन त्याच्याच देखरेखीखालीं तडीस गेल्या. आपल्या समाजांत धार्मिक बाबतींसच प्राधान्य असतें; आणि शिवाजीचे वेळेस तर तें विशेषच होतें.

---

* या वेळीं ब्राह्मण व प्रभु यांमध्यें जातिद्वेष बराच वाढला असून बाळाजी आवजी चिटणीस व मिळो येसाजी पारसनीस या प्रभुमंडळीनें शिवाजी हा उदेपुरकुलोत्पन्न खरा क्षत्रिय आहे, अशी गागाभट्टाची खात्री करून त्यालाच काशीहून रायगडीं आणविलें. बाळाजीवर ब्राह्मणांनीं ग्रामण्य चालविलें होतें, त्याचेंही गागाभट्टानें निरसन करून बाळाजीच्या मुलांच्या मुंजी केल्या आणि प्रभूंस त्रिकर्मांचा अधिकार ठरविला. इत्यादि 'प्रभुरत्नमालें'तील हकीकत वाचण्यालायक आहे.

शिवाजीचा हा सर्व उद्योग धर्मसंस्थापनेचा म्हणून जाहीर झालेला होता; आणि त्या काळीं राज्याभिषेकसमारंभ महाराष्ट्रांत तरी बहुधा अश्रुतपूर्वच होता. यादवांचे राज्यनष्टतेपासून हा समारंभ कसा असतो, व तो कसा करावयाचा हें कोणासही माहीत नव्हतें. उत्तर हिंदुस्थानांत रजपुतांचीं राज्यें होतीं, तिकडे हे समारंभ होत असत. परंतु तिकडच्या व महाराष्ट्राच्या आचारविचारांत पुष्कळच फरक होता. शिवाय शिवाजीच्या पूर्वी तीन चारशें वर्षें धार्मिक कृत्यांचें स्वरूप सर्वथैव बदलून गेलें होतें. या काळीं नवीन ग्रंथ व ग्रंथकार झाले, त्यांनीं पूर्वींचीं शास्त्रें, रूढी व आचार यांचा शोध करून धर्मशास्त्रावर नवीन ग्रंथ लिहिले, हें मागें सांगण्यांत आलेंच आहे. या ग्रंथांची परीक्षा व योग्यता प्रत्यक्ष विधि करितांना दिसून येत असते. परंतु राज्याभिषेकसमारंभ प्रत्यक्ष करण्याचा प्रसंग न आल्यामुळें त्याचें स्वरूप शिवाजीचे वेळीं अगदीं अनिश्चित होतें. ह्या समारंभांत कोणकोणते विधि करावयाचे इत्यादि संबंधानें पंडितांची एकवाक्यता नव्हती. शिवाय शिवाजीनें महाराष्ट्रांत जो नवीन राष्ट्रीय समाज उत्पन्न केला, त्याचे घटक भिन्न जातींचे व भिन्न समाजाचे लोक असल्या-मुळें, सर्वांस मान्य होईल अशा रीतीनें हा समारंभ तडीस नेणें मोठें दुर्घट काम होतें. शिवाजी या राष्ट्रीय व्यक्तीविषयीं जरी महाराष्ट्रांतील लोकांत अत्यंत आदर होता, तरी इतर मराठा घराण्यांवर भोसले घराण्याचें राज्य या राज्याभिषेकसमारंभानें यथाविधि स्थापन व्हावयाचें होतें, तें भोसले घराण्याचें वर्चस्व पुष्कळ मराठे घराण्यांस मान्य नव्हतें. प्रत्येक घराणें आपणांसच श्रेष्ठ समजे. शिवाजीची मुंज झालेली नव्हती. भोसल्यांच्या क्षत्रियत्वाविषयींही पुष्कळांस संशय होता. अशा शेंकडों अडचणींचें निरसन यथायोग्य, सर्वांस पटेल असें झाल्याशिवाय हा समारंभ निर्विघ्नपणें पार पडणारा नव्हता. या गोष्टींची वाटाघाट शिवाजीकडे निदान वर्ष दोन वर्षें तरी चालली असली पाहिजे; पुष्कळ मोठमोठ्या पंडितांचे व मुत्सद्यांचे अभिप्राय घेण्यांत आले असले पाहिजेत; आणि असा विचार झाल्यावर शेवटीं या समारंभांत गागाभट्टास सर्व पुढाकार देण्यांत आला. हा गागाभट्ट कोण, व त्यास लोकांनीं एवढी मान्यता कां दिली, हें थोडें विस्तारानें सांगणें जरूर आहे.

गागाभट्टाचें घराणें हें मूळचें पैठणचें होतें, सन १४५० च्या सुमारास गोविंदभट्ट नांवाचा विश्वामित्र गोत्री ऋग्वेदी ब्राह्मण पैठणास राहत होता. रामेश्वरभट्टाचें विद्यापीठ शिष्यवर्गानें गजबजून गेलेलें होतें. तो विजयनगरच्या कृष्णदेवरायास (१५०९–१५३०) भेटून द्वारकेस जात असतां रस्त्यांत नारायणभट्टाचा जन्म झाला. नंतर तो काशीस जाऊन राहिला. त्याचा मुलगा रामेश्वरभट्ट. काशीस गेल्यावर ह्या घराण्यांत अनेक विद्वान् पुरुष निपजले. त्यांतील पुष्कळांचे हिंदुधर्मशास्त्रावर ग्रंथ हल्लीं उपलब्ध आहेत. नारायणभट्टाचा लौकिक काशींत मोठा आहे काशींतील विश्वेश्वराचें मंदिर नारायणभट्टानें बांधिलें. तोडरमल्लानें त्याचा मोठा सत्कार केला. त्याचे मुलगे रामकृष्णभट्ट व शंकरभट्ट हे विद्वान् असून त्यांचे ग्रंथ सर्वमान्य आहेत. रामकृष्णभट्टाचे तिघे मुलगे मोठे मीमांसक म्हणून प्रसिद्ध आहेत. पैकीं दिनकरभट्टाचे बारा ग्रंथ 'उद्योत' संज्ञेचे आहेत. कमलाकरभट्टानें 'कमलाकर' संज्ञेचे बारा ग्रंथ लिहिले. पैकीं निर्णयकमलाकर यासच 'निर्णयसिंधु' असें म्हणतात. हा ग्रंथ त्यानें सन १६१२ त रचिला.

**भट्ट घराण्याची वंशावळ.**

(विविधज्ञानविस्तार–डिसेंबर १९१४.)

गोविंदभट्ट (स. १४५०.)
(विश्वामित्र गोत्र, ऋग्वेदी, आश्वलायन सूत्र.)
|
रामेश्वरभट्ट.
(याची पैठणास पाठशाला होती.)
|
नारायणभट्ट (ज. स. १५१४.)
(प्रयोगरत्न ऊर्फ नारायणभट्टीचा कर्ता.)
|
- रामकृष्णभट्ट.
  - दिनकरभट्ट.
    - विश्वेश्वर ऊर्फ गागाभट्ट.
  - कमलाकरभट्ट.
  - लक्ष्मणभट्ट.
- शंकरभट्ट.
  - नीलकंठभट्ट. (व्यवहारमयूख वगैरे बारा मयूखांचा कर्ता. सन १६०० चा सुमार.)

दिनकरभट्टाचा मुलगा विश्वेश्वरभट्ट याला बापानें 'गागा' असें लाडकें नांव दिलें तेंच पुढें प्रसिद्ध झालें. यानें उत्कृष्ट विद्या संपादन करून आपल्या घराण्याचा लौकिक वाढविला. काशीला गेले तरी या घराण्याचे

शरीरसंबंध दक्षिणेंत होत असत. मीमांसा, न्याय, अलंकार व वेदान्त या विषयांत गागाभट्टाची प्रवीणता विशेष होती. 'दिनकरोद्योत ग्रंथांत त्याच्या बापानें कित्येक विषय सोपे म्हणून सोडून दिले होते, त्यांची पूर्तता गागाभट्टानें केली. त्यामुळें हेमाद्रीच्या 'चतुर्वर्गचिंतामणी' प्रमाणेंच दिनकरोद्योताची योग्यता मोठी आहे. जैमिनीसूत्रांवर गागाभट्टाची टीका आहे. शिवाय न्यायशास्त्रावरील 'भाट्टचिंतामणि,' व 'कायस्थधर्मप्रदीप' ऊर्फ 'गागाभट्टी' हे त्याचे ग्रंथ प्रसिद्ध आहेत. त्यानें संस्कृतांत शिवछत्रपतीचें चरित्र लिहिलें होतें असें समजतें; परंतु तें उपलब्ध नाहीं. गागाभट्टाच्या विद्वत्तेसंबंधानें दक्षिणेंत मोठा लौकिक असून दक्षिणेंतील ब्राह्मणवृंदावर त्याची छाप मोठी होती. सोळाव्या व सतराव्या शतकांत हिंदुस्थानांतील राजेरजवाड्यांचे व मुसलमान बादशहांचे दरबारीं या घराण्यांतील विद्वान् पुरुषांस मोठा मान मिळत असून धर्मकृत्यांच्या प्रसंगीं त्यांस बोलावण्यांत येत असे. बनारस येथें या घराण्यास अग्रपूजेचा मान मिळतो. धर्मसभा भरतात, त्यांत गंधाचा पहिला मान या भट्टांचा आहे. लोकांच्या धर्मव्यवस्थेचे निबंधग्रंथ या भट्टांनीं लिहिले, म्हणून मोठ्या धर्मकृत्यांच्या प्रसंगीं भट्ट घराण्यांतील पुरुषांस अध्यक्षस्थान देण्याचा रिवाज सर्वत्र असून, अद्यापिही हिंदुस्थानांतील राजेरजवाड्यांकडून अशा प्रसंगीं त्या घराण्यास आमंत्रण जातें. कमलाकरभट्टाचे हल्लींचे वंशज कांतानाथभट्ट हे वृद्ध व विद्वान् गृहस्थ मिर्झापुर येथील संस्कृत पाठशालेचे मुख्याध्यापक आहेत. त्यांनीं 'भट्टवंशकाव्य' नांवाचा ग्रंथ लिहिलेला आहे.

शिवाजीचे वेळीं या घराण्यांत गागाभट्ट प्रमुख होता. त्यास मराठीराज्याचा व दक्षिणी पंडितांचा विशेष अभिमान असून शिवाजीचा लौकिक माहीत होता. तसेंच तो देशकालज्ञ असून मुसलमानांच्या राज्यांत हिंदुधर्माची अवनति झालेली त्यास प्रत्यक्ष दिसत होती. राज्याभिषेकासारख्या दक्षिणेंतील अपूर्व धर्मप्रसंगास या भट्ट घराण्यास आमंत्रण पाठविणें सामान्यतः विहित होतेंच; तशांत गागाभट्टाच्या मनांत शिवाजीविषयीं आदर असल्यामुळें, त्याने मुद्दाम दक्षिणेंत येऊन, आणि पैठण वगैरे ठिकाणच्या अनेक विद्वान् पंडितांचें अनुमत घेऊन, शिवाजीचा राज्याभिषेकाविधि थाटानें पार पाडिला. त्याची मतें प्रागतिक होतीं, हें कायस्थधर्मप्रदीपावरून दिसून येतें. मनुष्याची योग्यता केवळ जन्मावरून न ठरवितां

त्याच्या चारित्र्यावरून ठरविली जावी असें गागाभट्टाचें मत होतेंसें दिसतें. शिवाजीच्या राज्याभिषेकप्रसंगीं त्यानें विरोधी मतांचें खंडन करून जो पुढाकार घेतला तो त्यास भूषणावह आहे. दक्षिणी पंडितांवर छाप बसविण्याकरितां मुद्दाम परदेशस्थ पंडित शिवाजीनें आणिला हें म्हणणें खरें नाहीं. ह्या समारंभाविषयीं शिवाजीनें पुष्कळांचें मत घेतलें. रामदासस्वामीकडे माणसें पाठवून त्याची संमति मिळविली. दुसरे साधुसंत, शास्त्रीपंडित राज्यांत होते त्यांचा विचार घेतला; कित्येक प्रतिष्ठित मंडळींस पालख्या व म्याने पाठवून सन्मानानें रायगडावर आणविलें; आणि त्यांच्यांशीं वादविवाद केला. सरदार, कारभारी, इष्टमित्र या सर्वांबरोबर विचार करून सर्वांचे विचारें हा समारंभ करण्याचें शिवाजीनें ठरविलें. गागाभट्टास बोलावण्याचें ठरून बाळाजी आवजी त्यास आणण्यास गेला. त्याजबरोबर केशव पंडित, भालचंद्रभट्ट पुरोहित व सोमनाथ कात्रे हे गेले होते. त्यांनीं मोठ्या इतमामानें गागाभट्टास रायगडावर आणिलें. तेथें पंडितांच्या सभा व वादविवाद झाले. जयपुर, उदेपुर वगैरे ठिकाणीं रजपुत राजांस राज्याभिषेक होतो तसा हा विधि करावा, असें ठरलें. शिवाजीचा व्रतबंध झालेला नव्हता तोही मुख्य विधीच्या अगोदर करून घ्यावा असें पंडितांनीं ठरविलें. नंतर महानद्यांचीं पुण्योदकें, सुलक्षण अश्व व गज, व्याघ्रचर्में, मृगचर्में, सिंहासन, सुवर्णकलश इत्यादि साहित्य जमविण्यांत आलें. राजेरजवाड्यांस, आप्तस्वकीयांस, लहानमोठ्या सरदारांस, विद्वान् पंडितांस, ठिकठिकाणच्या सेवकजनांस आमंत्रणें पाठविण्यांत आलीं. सर्व लोकांच्या राहण्यांच्या व उताराच्या जागा तयार करण्यांत आल्या. सिंहासन व त्याची रचना शास्त्रोक्त पद्धतीप्रमाणें करण्यांत आली. हजारों लोक जेवणास बसतील असे मोठमोठे मंडप तयार झाले. मंडप, तंबू, राहुट्या इत्यादिकांनीं खालच्या व वरच्या माचीवरील किल्ल्याच्या सर्व जागा व्यापून गेल्या. धान्याचीं व इतर सामानाचीं मोठमोठीं कोठारें भरून ठेवण्यांत आलीं. कोणत्याही गोष्टीची न्यूनता पडूं नये, अशी सर्व तजवीज शिवाजीनें अत्यंत दक्षतेनें करविली.

याच वेळीं शिवाजीच्या वंशाची उत्पत्ति उदेपुरच्या घराण्यापासून झालेली आहे, हें नक्की करण्यांत आलें. गागाभट्टाच्या व बाळाजी आवजीच्या खटपटीनें भोसले घराण्याची वंशावळ उपलब्ध झाली. यावरून

कित्येकांचा असा तर्क आहे कीं, कांहीं तरी अंतस्थ खटपटीनें भोसल्यांचा संबंध उदेपुरच्या शिसोदे घराण्यांशीं या वेळीं मुद्दाम जोडण्यांत आला. ह्या विषयाची चर्चा पूर्वी पुष्कळ झाली आहे व पुढेंही होईल.

एवढ्या मोठ्या अपूर्व राष्ट्रीय समारंभाची तपशीलवार माहिती आज उपलब्ध नाहीं, ही मोठ्या खेदाची गोष्ट होय. हिंदुस्थानांत स १९११ सालच्या डिसेंबर महिन्यांत जॉर्ज बादशहांचा राज्यारोहणविधि झाला, त्याचे कार्यक्रम वर्ष सहामाहिने आगाऊ ठरत होते, आणि त्याच्या तयारींत हजारों लोक गुंतले होते. पाहुणे, जागा, व्यवस्था, मानपान, मेजवान्या इत्यादि अनेक प्रकार आगाऊ ठरविले जाऊन त्याचीं छापील पुस्तकेंही प्रसिद्ध झालीं आहेत. रायगडावरील शिवाजीचा हा समारंभ एवढा विस्तृत व घोटाळ्याचा नसला तरी त्यावरून शिवाजीच्या अडचणींची आपणास थोडी बहुत कल्पना करितां येईल. मराठे सरदारांचा डामडौल, त्यांची शिवाजीविषयीं अपूर्व भक्ति आणि एकंदर समारंभाविषयीं लोकांचा अनुपम उत्साह इत्यादि कारणांनीं शिवाजीचा राज्याभिषेक समारंभ त्या वेळीं खरोखरच अत्यंत संस्मरणीय झाला. बखरकारांनीं केलेल्या वर्णनावरच आपणांस अवलंबून राहणें प्राप्त आहे.

हा समारंभ व्यक्तिविषयक नव्हता. हा राष्ट्रीय महोत्सव असून त्याच्या महत्त्वास अनुरूप अशा रीतीनेंच तो तडीस नेण्यांत आला. मोठमोठे शास्त्री, पंडित, प्रधान, मंत्री, यांस बोलावून, त्यांच्या मसलतीनें या समारंभांतील प्रत्येक कृत्य कसकसें करावयाचें, त्याचा फार सूक्ष्म रीतीनें व अत्यंत काळजीपूर्वक विचार करून, तदनुरूप व्यवस्था करण्यांत आली. निरनिराळ्या कामांची व्यवस्था निरनिराळ्या योग्य इसमांकडे पृथक्पणें सोंपून दिली. सिंहासन, छत्रचामर वगैरे राजचिन्हें, व अभिषेकविधीला लागणारें साहित्य शास्त्रोक्तरीतीनें तयार करण्यांत आलें. महाराष्ट्रांतील सर्व सरदार मंडळीस, विद्वान् लोकांस व आप्तस्वकीयांस शिवाजीनें आमंत्रणें पाठवून या महोत्सवासाठीं मुद्दाम आणविलें. राज्याभिषेकाचा मुहूर्त शके १५९६ आनंदनाम संवत्सर, शनिवार ज्येष्ठ शु० १३ हा मुक्रर करण्यांत आला.* हा दिवस मृगसालारंभाचा होता असें बखरकार म्हणतात.

* 'शके १५९६ आनंदनाम संवत्सरे ज्येष्ठ शु० ५ गुरुवारीं प्रातःकाळीं चार घटका दिवस आलियानंतर सिंहासनारूढ बसले शिवाजीमहाराज, ' असा वाईजवळच्या कण्हेरी येथील रामदासी मठांतील एका कागदांत उल्लेख आहे.

तसें असल्यास स. १६७४ त मृगसाल ता. ३ किंवा ४ जूनला असलें पाहिजे. त्याच्यापूर्वी दहा दिवस म्हणजे ज्येष्ठ शु० ४ स शिवाजीचा व्रतबंध समारंभ सुरू झाला. तेव्हांपासून दहा दिवसपर्यंत निरनिराळे विधि व समारंभ चालू होते. या एकंदर कृत्यांत दानधर्म, ब्राह्मणभोजन, मेजबान्या, आरास, व्यवस्था इत्यादि गोष्टींत शिवाजीनें अतोनात पैसा खर्च केला. जवळचे लोकही शिवाजीची योग्यता ओळखून कोणत्याही धार्मिक किंवा लौकिक कृत्यांत त्याच्या इच्छेस सर्वथैव अनुकूळ झाले.

३. ज्येष्ठ शु. १३ शके १५९६चा समारंभ.––अखिल महाराष्ट्राच्या भाग्योदयाच्या या पवित्र समारंभाचें विस्तृत वर्णन करण्याची जरूर नाहीं. बखरींतील रसाळ वर्णनें वाचिलीं असतां त्या महोत्सवाचें स्वरूप चांगलें लक्षांत येईल. एकंदर समारंभ पुष्कळ दिवस चालू होता. त्यांतले दहा दिवस मुख्य होते. ज्येष्ठ शु० ४ थीस व्रतबंधसमारंभ सुरू झाला. तो दोन दिवसांनीं उरकल्यावर पुढें दुसरे लुप्तविधी व आनुषंगिक विधी, पुण्याहवाचन, यज्ञ, शांति वगैरे करण्यांत आले. ब्राह्मणभोजनें सारखीं चालू होतीं. शेवटीं ज्येष्ठ शु० १३ शीचा म्हणजे स. १६७४ चा जून ता. ६ चा सुमंगल दिवस प्राप्त झाला. अखिल महाराष्ट्राच्या भाग्योदयाचा हा पवित्र समारंभ; आणि त्याचा रायगडावर चाललेला हा महोत्सव यांचें विस्तृत वर्णन बखरींतून दिलेलें आहे. एकंदर महाराष्ट्र-जन-समूहाचीं अंतःकरणें त्या दिवशीं आनंदोर्मींनीं उचंबळून गेलीं होतीं.

अभिषेकाच्या दिवशीं प्रातःकाळीं सर्व लोक मंगलस्नानें करून, व उंचीं वस्त्रभूषणें परिधान करून, सभामंडपांत दाखल झाले. शिवाजीही स्त्रीपुत्रांसह मंगलस्नान करून, अलंकार घालून, भवानी देवी, मातुःश्री जिजाबाई, व कुलगुरु बाळंभट इत्यादिकांस वंदन करून, मुहूर्त प्राप्त होतांच आसनावर विराजमान झाला. अष्टप्रधान, पत्रलेखक व गणकलेखक, द्वादशकोश, अष्टादशशाला इत्यादिकांवरील अधिकारी, मंगलस्नानें करून, शुभ्रवस्त्रें व अलंकार धारण करून स्वारीबरोबर आले. क्षीरवृक्षाचें आसन सव्वा हात उंच करून सुवर्णानें मढविलेलें होतें. त्याजवर महाराज बसले. जवळ पट्टराणी सोयराबाई पटबंधन करून संभाजीसह बसली. सिंहासनाचे सभोंवार हातांत सुवर्ण कलश घेतलेले अष्टप्रधान अष्टदिक्स्थानापन्न झाले. पूर्वेस मुख्य प्रधान मोरोपंत पिंगळे हातीं घृतपूर्ण सुवर्णकलश घेऊन उभा

राहिला. दक्षिणेस सेनापति हंबीरराव मोहिते दुग्धपूर्ण रौप्य कलश घेऊन उभा राहिला. पश्चिमेस रामचंद्र नीळकंठ पंडित अमात्य दधिपूर्ण ताम्र-कलश घेऊन उभा राहिला. उत्तरेस छंदोगामात्य प्रधान रघुनाथ पंडित-राव मधुपूर्ण सुवर्णकलश घेऊन उभा राहिला. त्याजपाशी मृत्तिकामय कुंभांत समुद्रजल व महानद्यांचें जल भरून ठेविलें होतें. उपदिशांच्या ठायीं क्रमेंकरून आग्नेयीस अण्णाजी दत्तो पंडित सचिव छत्र घेऊन उभा राहिला. नैर्ऋत्यभागीं जनार्दन पंडित हणमंते सुमंत व्यजन घेऊन उभा राहिला. ईशान्यभागीं बाळाजी पंडित न्यायाधीश दुसरें चामर घेऊन उभा राहिला. सन्मुख सव्यभागीं पत्रलेखक बाळाजी आवजी लेखनपात्र घेऊन उभा राहिला. वामभागीं गणकलेखक चिमणाजी लेखनपात्र घेऊन उभा राहिला. आसमंताद्भागीं सर्व कोश व शाळा यांचे अधिकारी उभे राहिले. सुहृज्जन व मांडलिक राजे सभोंवते उभे राहिले. ठिकठिकाणचीं तीर्थोदकें आणविलीं होतीं. मुहूर्तघटी प्राप्त होतांच, ब्राह्मणांच्या वेदमंत्रो-च्चारांबरोबर छत्रपतीवर मंगलाक्षतांचा वर्षाव झाला; आणि आम्रपल्लवांनीं तीर्थोदक सिंचन करण्यांत आलें. अभिषेकोत्तर शिवाजीची स्वारी उत्तम प्रकारें शृंगारलेल्या सिंहासनावर विराजमान झाली, त्या वेळेस, त्यांजवर सौवर्णरौप्य पुष्पांची वृष्टि लोकांनीं केली. ब्राह्मणांनीं मंत्र म्हणून आशीर्वाद दिले. सर्व राज्यांत १०८ तोफांची सरबत्ती झाली. पुत्राच्या भाग्योदयाचा हा अप्रतिम शुभ प्रसंग पाहून, जिजाबाईस किती धन्यता व कृतार्थता वाटली असेल, याची कल्पनाच केली पाहिजे. शिवाजीस लहानाचा थोर करून त्यास आज या स्थितीस आणण्यास तिनें पराकाष्ठेचे श्रम केले होते. या तिच्या श्रमांचें चीज होऊन, तिच्या जन्माचें सार्थक झालें; तिच्या डोळ्यांचें पारणें फिटलें. 'वीरसू' नांवाची सार्थकता तिनें करून दाखविली. तेव्हां असा सोहळा आपल्या डोळ्यांनीं पाहिल्या-वर, आपल्या आयुष्याची इतिकर्तव्यता आटपली असेंच तीस वाटलें. अभिषेकसंबंधीं सर्व कृत्यें यथासांग व निर्विघ्नपणें तडीस गेलीं. शिवाजीची सुवर्णतुला करण्यांत आली, तेव्हां त्याचें वजन १६००० होन भरलें. होनाचें वजन सुमारें ३½ तोळ्याइतकें धरितात. त्यावरून शिवाजीचें वजन (४० तोळ्यांचे) १४० शेर होतें. विद्वान् ब्राह्मणांची पूजा करून त्यांस मुबलक दक्षिणा दिल्या. गागाभट्टास एक लक्ष रुपये दक्षिणा व

बहुमोल वस्त्रभूषणें देऊन गौरविलें. ऋत्विजांस प्रत्येकीं पांच पांच हजार व पुरोहितास चोवीस हजार रुपये दक्षिणा दिली. इतर ब्राह्मणांस ज्याच्या त्याच्या योग्यतेप्रमाणें हजार, पांचशें, दोनशें अशा रकमा दिल्या. कमींत कमी दक्षिणा पंचवीस रुपये होती. शिवाय गोसावी, तापसी, गोरगरीब यांस पांच, चार, दोन याप्रमाणें रकमा वांटिल्या. देवस्थानास वतनें व इनामें करून दिलीं.

यानंतर अष्टप्रधान व इतर अधिकारी यांस वस्त्रें देण्याचा समारंभ झाला. ज्यानें त्यानें आपआपलीं पदें वस्त्रांसह स्वीकारून बहुमान पुरःसर महाराजांस नजराणा करून मुजरे केले. बाळाजी आवजी चिटणीस यास चिटणिशीचीं वस्त्रें दिलीं. सर्वांचे मुतालिकही नेमून दिले. अष्टप्रधान जेव्हां बाहेर स्वारीवर किंवा फिरतीवर असत, तेव्हां तळमुक्कामवर बसून त्यांचीं कामें या मुतालिकांनीं चालवावयाचीं होतीं. श्यामजी नाईक पुंडे, शेषाच्या नायकाचा नातू, यास फौजेच्या बक्षीगिरीचीं वस्त्रें दिलीं. तरकङ सुभेदार, महालदार, कारखानदार, फौजेचे सरदार व मानकरी यांस ज्या त्या अधिकाराची वस्त्रें देण्यांत आलीं.

अधिकाऱ्यांस वस्त्रें देऊन दरबार आटोपल्यावर महाराजांची स्वारी हत्तीवर सोन्याचे अंबारींत बसून देवदर्शनास जाऊन आली. त्या वेळीं सर्व प्रधान, अधिकारी, सरदार, दरकदार, फौजा, वाद्यें वगैरे आपआपल्या मिसलीनें स्वारीसमागमें होते. स्वारी परत येतांना रस्त्यांत ठिकठिकाणीं सुवासिनींनीं त्यांस आरत्या केल्या व लोकांनीं पुष्पवृष्टि केली. अशा रीतीनें हा त्रयोदशीचा समारंभ पुरा झाला. एकंदर समारंभास एक कोट बेचाळीस लक्ष होन म्हणजे चार कोटी रुपयांचे वर खर्च झाला, असें म्हणतात. मेजवान्या, देवदर्शनें व राज्यव्यवस्थेचीं कामें इत्यादि प्रकार पुढें पुष्कळ दिवस चालू होते.

राज्याभिषेकसमयीं शीतलपुरीनामक काशीचा संन्यासी, पोलादपुरचा परमानंद गोसावी, आणि त्र्यंबकेश्वरचा विद्वान् ब्राह्मण नारायण आश्रम ह्यांचा शिवाजीनें उत्कृष्ट सत्कार करून शीतलपुरीपासून उपदेश घेतला. ( तारीखी-शिवाजी. )

हा राज्यारोहण समारंभ व त्या योगें झालेली राज्यस्थापना सर्व देशभर चिरस्मरणीय व्हावी, एतदर्थ या प्रसंगीं कित्येक कायमच्या गोष्टी शिवाजीनें केल्या त्या अशा.

( १ ) अभिषेकाच्या दिवशीं सुवर्णतुला, तोफांची सरबत्ती, दानधर्म, पोषाख देणें, देवस्थानांच्या नेमणुका बांधणें, वगैरे वर सांगितलेलीं कृत्यें करून शिवाजीनें राजचिन्हें धारण केलीं. रामदास स्वामींच्या स्मरणार्थ 'भगवा झेंडा' हें सेनाचिन्ह ठरविलें.

( २ ) पूर्वींचा शक बंद करून राज्याभिषेकाच्या दिवसापासून 'राज्याभिषेक शक' नांवाचा नवीन शक सुरू केला; आणि 'क्षत्रियकुलावतंस शिव छत्रपति महाराज सिंहासनाधीश्वर' असा आपला किताब व कागदोपत्रीं लिहावयाचा मायना ठरविला. 'शककर्ता राजा निर्माण होणार' हें भविष्य शिवाजीनें अशा रीतीनें खरें केलें. युधिष्ठिर विक्रम, शालिवाहन यांच्या प्रमाणें 'शिव शक' असें नांव न ठेवितां 'राज्याभिषेक शक, असें नांव ठेवण्यांत स्वाभिमानापेक्षां राष्ट्रीय भावना त्याचे मनांत स्पष्ट होती. ह्यावरून हिंदुपदपादशाही स्थापन करण्याचा शिवाजीचा मनोदय चांगला व्यक्त होतो. हा नवीन शक व नवीन मायना सर्वत्र लिहीत जाण्याविषयीं सरपत्रें काढण्यांत आलीं. शिवाजीचा हा राज्याभिषेक शक १०४ वर्षे चालला. स. १७७७ त दुसरा शाहू गादीवर आला तेव्हां नानाफडणीस व सखाराम बापू यांनीं हा शक कागदोपत्रीं बंद करण्याचा हुकूम काढिला, ( भा. इ. अ. १८३५-८७ ).

( ३ ) रायगड किल्ला राज्याची राजधानी करण्यांत आली. 'रायगड पहाडी किल्ला चांगला. आजूबाजूस शत्रूंची फौज बसावयास जागा नाहीं. घोडें माणूस जाण्यास महत्संकट. वरकड किल्ले पन्हाळा वगैरे बहुत, पण खुलासेवार व मैदानांत; यास्तव आजच्या प्रसंगास ही जागा बरी, येथें लवकर उपद्रव होऊं न शकेल.' या कामीं गागाभट्ट वगैरे मंडळीस शिवाजीची योजना पसंत पडली. त्याप्रमाणें राजधानीस लागणाऱ्या अवश्य त्या सर्व तजविजी, वाडे, पागा, मंदिरें, सभा, गंगासागर तलाव, वगैरे सर्व व्यवस्था रायगडावर करण्यांत आल्या.

( ४ ) आजपर्यंत अनेक वेळां राज्यकारभाराची व्यवस्था शिवाजीनें प्रसंग पडेल तशी बदलली होती, परंतु राज्यास कायमचें स्वरूप आलें नसल्या-

मुळें अद्यापपर्यंत कोणतीच कायमची व्यवस्था झाली नव्हती. परंतु राज्याभिषेकप्रसंगीं सर्व खात्यांची व राज्याच्या बंदोबस्ताची व्यवस्था महाभारत, स्मृति इत्यादिकांत सांगितलेल्या पद्धतीवर शिवाजीनें केली. ह्या प्रसंगीं कामगारांचीं व व्यावहारिक शब्दांचीं मुसलमानी नांवें बदलून त्यानें संस्कृत नांवें प्रचारांत आणिलीं. दिल्लीच्या बादशाहीचें उदाहरण समोर असतां त्याचें अनुकरण शिवाजीनें केलें नाहीं. या नवीन राज्यव्यवस्थेमुळेंच शिवाजीचें नांव चिरस्मरणीय झालें आहे. ती व्यवस्था पुढें देण्यांत येणार आहे.

या राष्ट्रीय समारंभास परकीय राजेरजवाड्यांकडून नजर नजराणे घेऊन वकील वगैरे आले होते. त्यांत गोवळकोंडा येथील कुत्बशहानें हत्ती, घोडे, जवाहीर वगैरे नजराणा पाठविला. त्याचप्रमाणें इंग्रज, पोर्तुगीझ वगैरे परदेशचे व्यापारी, पाळेगार, व मांडलीक राजे यांनींही आपापल्या वकिलांच्या हातीं नजराणे पाठवून शिवाजीचें अभिनंदन केलें. इंग्रजांच्या वकिलाची हकीकत इंग्रजांचे कलमांत दिली आहे. एकंदरींत खऱ्या क्षत्रियास शोभणारे महापराक्रम करून शिवाजीनें महाराष्ट्रीयांचें स्वतंत्र राज्य स्थापन केलें, आणि तें राज्य चिरायू व खंबीर करण्यासाठीं हा दिव्य समारंभ केला, ही गोष्ट मराठ्यांच्या इतिहासांत अत्यंत स्मरणीय होय.

४. स्वराज्याचें स्वरूप.—मराठ्यांचें खरें धोरण औरंगजेबास पूर्णपणें कळलें होतें. दक्षिण देश जिंकण्याचा त्याचा इरादा होताच, पण मराठ्यांची दहशत त्यास विशेष नसती, तर एवढ्या मोठ्या प्रचंड सैन्यानिशीं आपल्या आयुष्याचीं पंचवीस वर्षें त्यानें दक्षिणेंत घालविलीं नसतीं. मराठे मोगल पादशाही उलथून पाडणार अशी त्याची खात्री असल्यामुळेंच त्यानें आपलें संपूर्ण सामर्थ्य एकट्या मराठशाहीचे नाशार्थ खर्चिलें. शिवाजी जिवंत असेपर्यंत मराठयांचा उच्छेद करणें त्यास शक्य वाटलें नाहीं. शिवाजीच्या मरणाची बातमी ऐकतांच रजपुतांबरोबर चाललेलें युद्ध कसेंबसें संपवून तो मोठ्या त्वरेनें दक्षिणेंत आला. यावरून शिवाजीची कर्तबगारी व्यक्त होते. औरंगजेबाची मराठयांस हाणून पाडण्याची कल्पना कित्येक बादशाही सरदारांचे हाडामासांत खिळली होती. त्यांपैकीं निजामुल्मुल्क हा एक होय. निजाम व मराठे यांच्या सतत वैराचें मूळ या ठिकाणीं व या कल्पनेंत आहे. खर्ड्यांचे लढाईनंतर सार्वभौमत्वाची कल्पना अंगांत भिनलेले सर्व मराठे पुरुष नाहींसे झाले,

आणि लगेच मराठशाहीची इमारत खचली. तथापि सार्वभौमराज्याची पुढील विस्तृत कल्पना शिवाजीला नव्हती, असा कित्येकांचा आक्षेप आहे. शिवाजीच्या हयातींत ही कल्पना तडीस न गेल्यामुळें ती त्याच्या मनांत अढळ होती, हें सिद्ध करण्यास शिवाजीचीं कृत्यें व उद्देश तपासून पाहवे लागतात. शिवाजीनें घातलेला पाया, वरील इमारत कदाकाळीं विस्तृत झाल्यास, तिला सहन करण्याइतका विस्तृत व मजबूद होता कीं नाहीं, हें पाहिलें पाहिजे. शिवाजीच्या अनुयायांना ही कल्पना होती, आणि ती त्यांनीं शक्त्यनुसार तडीसही नेली, हें वर दाखविलेंच आहे. ही कल्पना त्यांनीं स्वतः उत्पन्न केली नाहीं, तर ती त्यांनीं शिवाजीपासून उचलली एवढेंच दाखवावयाचें आहे.

( १ ) शिवाजीचा विचार केवळ महाराष्ट्रापुरताच असता तर त्याला इतका खटाटोप करण्याचा प्रसंग पडताना. आरंभापासून शिवाजी फार धूर्ततेनें वागत होता; केवळ बाह्य भपक्यानें लोकांस दिपवावें हें त्यास नको होतें. बापाच्या लहानशा जहागिरीपासून सुरुवात करून तो मोठया चाणाक्षतेनें आपल्या इमारतीचा पाया थोडथोडा वाढवीत गेला. राज्याभिषेकाच्या वेळेस हा पाया चांगला मजबूद झाला असें त्यास वाटलें, आणि अष्टप्रधानांची, लष्कराची, किल्ल्यांची वगैरे यथायोग्य व्यवस्था करून आणि छत्रपति हें विशिष्टार्थसूचक अभिधान धारण करून व राज्याभिषेक शक सुरू करून हा पाया त्यानें अशा स्थितींत आणून ठेविला, कीं त्याजवर वाटेल तेवढी विस्तृत इमारत पुढें बांधितां यावी. महाराष्ट्रापुरताच त्याचा हेतु असता, तर तंजावरीं व्यंकोजीनें केलें त्याप्रमाणें तेवढ्याचीच कायमची व्यवस्था बांधून, त्यास स्वस्थ बसतां आलें असतें.

( २ ) मराठ्यांचें राज्य केवळ महाराष्ट्रापुरतें मर्यादित न राहतां सवडीप्रमाणें पुढें मोठें व्हावें, एवढ्याच करितां त्याला आपल्या भावाशींसुद्धां भांडण्याचा प्रसंग पडला. जो दक्षिणप्रदेश भावाच्या ताब्यांत होता, तो किंवा त्याचा हिस्सा भावापासून हिसकून घेण्याइतका शिवाजी क्षुद्रदृष्टि किंवा अनुदार नव्हता. परंतु हिंदुपदपादशाहीची इमारत एक असावी; तिचें मूळ महाराष्ट्रांत असावें, त्या इमारतीच्या आश्रयाखालीं सर्व मराठमंडळानें सुखानें नांदून त्या इमारतीची वृद्धि करावी, या कल्पनेच्या विरुद्ध व्यंकोजी आदिलशाहींत राहिल्यामुळें, मराठशाहीच्या अंमलाखालीं नांदण्या-

विषयीं व्यंकोजीस भाग पाडण्यासाठीं शिवाजीला दक्षिणेंत स्वारी करावी लागली. राज्याचा विभाग न होऊं देण्याबद्दल शिवाजीचा विशेष कटाक्ष होता.

( ३ ) चौथाई व सरदेशमुखी हे हक्क वसूल करण्याची पद्धत घालण्यांत शिवाजीचा विशिष्ट हेतु उघड होतो. ह्या हक्कांच्या जोरावर मराठ्यांस वाटेल तिकडे व वाटेल तितकें बाहेर पसरण्यास सवड मिळाली. महाराष्ट्रापुरतेंच त्यास पाहवयाचें असतें, तर तो बहुतेक प्रांत त्याच्या हातांत आल्यामुळें नुसते हे हक्क वसूल करण्याचें त्यास प्रयोजन नव्हतें; आणि ह्या हक्कांवरच तृप्त राहवयाचें असतें, तर अष्टप्रधानादि विस्तृत राज्यव्यवस्था पण नको होती. महाराष्ट्र देश हा केवळ कार्यक्रमाचा पाया; त्या पायावरून पुढें वरील हक्कांच्या जोरावर सर्व हिंदुस्थान देश काबीज करावा असा शिवाजीचा हेतु स्पष्ट दिसतो.

( ४ ) विजापुर व गोवळकोंडा येथील राज्यें पादाक्रांत करण्यास उशीर नाहीं. तीं आपलींच आहेत, वाटेल तेव्हां तीं नाहींशीं करितां येतील असा शिवाजीचा समज दिसतो. पण मोगल बादशहाविषयीं त्याचा समज तसा नव्हता. दिल्लीपर्यंत मजल मारण्याचें त्याच्या मनांत नसतें, तर जयसिंगाशीं सख्य करून शिवाजी दिल्लीस गेला नसता. दिल्लीस जाण्यांत त्याचा मुख्य उद्देश असा कीं बादशहाची खरी शक्ति किती आहे हें प्रत्यक्ष आपल्या डोळ्यांनीं पाहवें, तेथें आपल्या ओळखी करून ठेवाव्या व पुढें मागें दिल्लीचें तख्त काबीज करणें झाल्यास तूर्त आपलें धोरण पुढें लोटून ठेवावें. लढाई व रक्तपात केल्याशिवाय आपला हेतु तडीस नेण्याचा शिवाजीचा नेहमींचाच रिवाज असल्यामुळें, सवलतीनें ज्या गोष्टी होतील, त्यांजविषयीं तो विनाकारण झगडत नसे. बुंदेलखंडचा राजा छत्रसाल याची व शिवाजीची भेट झाली होती, ( मु. रियासत पृ. ६९५ पहा ). कर्णोपकर्णी दिल्लींतील खडानखडा बातमी शिवाजीस समजत होती. ह्यावरून रजपूत राजांस आपलेसे केल्यास हिंदुपदपादशाहीची स्थापना सुलभ आहे, हें त्याच्या लक्षांत आलें असावें. औरंगजेब आपल्या दुष्कृत्यांनीं हिंदूंस छळीत आहे, हिंदूंचीं मनें दुखवीत आहे, येणेंकरून त्याचे राज्याची बळकटी नाहींशी होत जाऊन, तें 'राज्य' खालावत जाणार. अशा प्रसंगीं पाळत राखून आपण पुढें सरसावण्यास तयार असलें पाहिजे.

इत्यादि गोष्टी शिवाजी पूर्णपणें समजून होता. औरंगजेबाच्या इतकें दीर्घायुष्य शिवाजीस असतें, तर त्यानें आपले हेतु आपल्या स्वतःच्या हयातींत तडीस नेले असते. तथापि मोगलांशीं त्याचे जे व्यवहार घडले, त्यांच्या योगानें त्यानें आपल्या पराक्रमाची व धर्माभिमानाची मर्यादा दिल्लीपर्यंत पोंचवून पुढील रस्ता सुगम करून ठेविला.

( ५ ) समुद्रकिनारा ताब्यांत ठेवण्याकरितां सीदीचा पाडाव करण्यांत शिवाजीनें आपली शिकस्त केली. ह्याचा मुख्य हेतु महाराष्ट्रापुरताच नव्हता. तर किनारा व आरमार यांचे साह्यानें इंग्रज, पोर्तुगीझ वगैरे परदेशस्थांस आपल्या कह्यांत ठेवण्यास त्यानें केलेल्या प्रयत्नांवरूनही, त्याची सार्वभौमत्वाची कल्पना व्यक्त होते. याचें विवेचन निराळ्या कलमांत केलें आहे.

( ६ ) बखरींमध्यें अनेक ठिकाणीं कित्येक अस्पष्ट उल्लेख आहेत. 'दिल्लीस जाऊन अधिकार करावा, हा योग या काळीं दिसत नाहीं. कारण औरंगजेब पादशहा अवतारी आहे. त्याचा देह आहे तावत्काल आपला उपाय चालेल असा नजरेस येत नाहीं, (शिवदिग्विजय पृ. ३७५). अशा उल्लेखांवरून शिवाजीचा उद्देश दिल्लीपर्यंत जाण्याचा होता, पण औरंगजेबाचे हयातीपर्यंत ती गोष्ट घडून येणें अशक्य होतें, हा शिवाजीचा समज बखरींत अनेक ठिकाणीं थोडा बहुत व्यक्त झाला आहे.

( ७ ) गोब्राम्हणप्रतिपालन, स्वधर्मसंरक्षण, व स्वराष्ट्रसंवर्धन हें त्यानें आपल्या राज्याचें ब्रीद म्हणून धारण केलें. ह्या ब्रीदांत पाहिजे तितका उद्योग करण्यास लोकांस अवकाश सांपडणारा होता. हे हेतु तडीस नेणें राज्याचें कर्तव्य आहे, त्यांत प्रत्येकाचा फायदा आहे, ही गोष्ट शिवाजीनें सर्वांस दाखवून दिली. भवानी देवीची आपणावर कृपा आहे, तिच्याच कृपेनें आपले उद्योग तडीस जातात अशी त्यानें आपल्या लोकांची खात्री केली. भोसल्यांच्या कुळांत शककर्ता निर्माण होणार म्हणून दृष्टांत झाले तो हिंदुधर्मसंस्थापक अवतारी पुरुष शिवाजीच होय, अशी त्या वेळीं लोकांची भावना झाली. किल्ल्यांचें साह्य, युक्तीनें शत्रूंस कबजांत आणण्याचें चातुर्य, आणि द्रव्यबल व मनुष्यबल ह्यांची वृद्धि, हीं राज्यवृद्धीचीं साधनें त्यानें पुढील उद्योगाकरितां तयार करून ठेविलीं.

( ८ ) **लेखन प्रशस्ति.** राज्याभिषेकसमयीं शिवाजीनें जुने प्रघात वगैरे पाहून अनेक कामांच्या पद्धति बांधून दिल्या. त्यांतच लेखनप्रशस्ति

म्हणजे लिहिण्याचा शिरस्ता शिवाजीनें बाळाजी आवजी व इतर मुत्सद्दी यांच्या विचारानें रचिला. राज्याभिषेकापूर्वी साडेतीनशें वर्षे महाराष्ट्रांत मुसलमानांचा अंमल होता, त्या अवधींत मुसलमान रिवाज जारीनें चालू झाले मुसलमानांच्या पूर्वी हेमाद्रि ऊर्फ हेमाडपंत यानें पत्रें व सरकारी कागद लिहिण्याच्या पद्धति घालून दिल्या होत्या, त्यांचीं भाषांतरें व नवीन मुसलमानी प्रघात यांवरून नवीन पद्धति मुसलमानांच्या वेळेस बनल्या. पुढें शिवाजीनें राज्यस्थापना करून राज्यव्यवहार कोश वगैरे तयार करविले त्यांतच नवीन लेखनप्रशस्ति त्यानें अंमलांत आणिली. रा. राजवाडे ह्यांनीं ह्या प्रशस्तीचे कांहीं भाग प्रसिद्ध केले आहेत. ( भा. इ. सं. मं. अ. १८३२). या प्रशस्तींत सरकारी व खासगी व्यवहारांत लोकांनीं लिहिण्याचे मायने काय वापरावे, कागदाची व लेखनाची मोडणी कोणास कशी असावी, देवता, गुरु, वडील, लहान वगैरेंस पत्रें कशीं लिहावीं, इत्यादिकांचे निर्बंध ठरविलेले आहेत. सरकारी कागद किती प्रकारचे तयार होतात आणि त्यांची पद्धति कशी असावी, हेंही ह्या प्रशस्तींत सांगितलें आहे. पोवाडे रचविण्याचा व दरबारकवि नेमण्याचा प्रघात शिवाजी व जिजाबाई यांनीं सुरू केला. पुरुषोत्तम कवि, अज्ञानदास व तुलसीदास शाहीर वगैरे शिवाजीच्या कवींचीं नांवें प्रसिद्ध आहेत.

शिवाजीला फारशी भाषा येत नव्हती. परंतु ती दरबारची भाषा असल्यामुळें त्याच भाषेंत शिवाजीला पत्रव्यवहार करावा लागे. ह्या कामांत निष्णात मंडळी शिवाजीच्या पदरीं होतीं. शिवाय मुसलमान लेखकही त्यानें ठेविले होते. काजी हैदर नांवाचा एक गृहस्थ त्याचा अखबरनवीस होता. तो पुढें औरंगजेबाचे नोकरींत गेला, ( Mod. Review ).

सारांश, सार्वभौम हिंदुपदपादशाही स्थापन करण्याचा शिवाजीचा हेतु खास होता, याविषयीं संशय दिसत नाहीं. वास्तविकपणें 'थोर पुरुष' ही संज्ञा शिवाजीस देण्यास ही सार्वभौम कल्पना कारण आहे. स्वपरबलाबल बरोबर ओळखणें, काळ वेळ पाहून तदनुसार आपल्या हातून काय शक्य आहे हें ठरविणें, ह्यांत शिवाजीची खरी योग्यता व मोठेपणा आहे.

**५. अष्टप्रधानांचीं कामें व घराणीं.**—अष्टप्रधानांची नेमणूक शिवाजीनें केव्हां सुरू केली, तें निश्चित सांगतां येत नाहीं. सर्व नेमणुका त्यानें एकदम केलेल्या नाहींत हें खास आहे. आरंभापासूनच संपूर्ण राज्याधिकार

तो वापरीत असल्याचे कागदपत्र पुष्कळ आहेत. ( उदाहरणार्थ खं. १५ ले. ३०७, २[illegible] ) स्वराज्याचा उद्योग सुरू केल्यावर जसजशी जरूर भासत गेली, तसतसे त्यानें अधिकारी निर्माण केले. पेशवा अथवा मुख्य प्रधान याची नेमणूक पुष्कळ आरंभीं झाली असली पाहिजे. छत्रपति हें नांव सुद्धां शिवाजीनें सन १६४५ चे अगोदर घेतलें असावें. सन १६४० पासून १६४५ चे दरम्यान मावळांतील राज्यव्यवस्था करितांना कांहीं अधिकारी शिवाजीनें निर्माण केले, ( पृ. १९४–१९६ ). रा. राजवाडे म्हणतात, आरंभीं हे अंमलदार शहाजीचे व शिवाजीचे असे दुहेरी होते. शहाजीचा मुख्य अंमलदार दादाजी कोंडदेव असून, शिवाजीचा श्यामराज नीलकंठ होता. शहाजीचा मुजुमदार नारो सुंदर व शिवाजीचा निळो सोनदेव होता. दादाजी कोंडदेव निवर्तल्यावर जहागिरीची व्यवस्था स्वतंत्रेनें शिवाजीच्या हातांत आली, तेव्हां तो हळूहळू आपले कामदार कायम करीत गेला. स. १६५७ त शिवाजीचे अंमलदार कोण होते त्याचा उल्लेख खं. १७ ले. १० वर आला आहे. अष्टप्रधानांचीं कामें, का. इ. सं. पत्रें यादी लेखांक ४०४ यांत दिलेलीं आहेत.

अष्टप्रधान व त्यांचे पगार.

| फारशी नांव. | संस्कृत नांव. | कर्तव्य. | वार्षिक वेतन. |
|---|---|---|---|
| १ पेशवा. | पंतप्रधान. | मुख्य दिवाणगिरी | पंधरा हजार होन. |
| २ मुज्मुदार. | पंतअमात्य. | मुलकी वसूल व हिशेब. | बारा हजार होन. |
| ३ सुरनीस. | पंतसचिव. | दप्तराचा सांभाळ. | दहा हजार होन. |
| ४ वाकनीस. | मंत्री. | खासगी कारभार. | ,, |
| ५ डबीर. | सुमंत. | परराज्यव्यवहार. | ,, |
| ६ सरनौबत. | सेनापति. | फौजेची व्यवस्था. | ,, |
| ७ ० | न्यायाधीश. | न्याय करणें. | ,, |
| ८ ० | पंडितराव. | शास्त्रार्थ व दानधर्म. | ,, |

'प्रतिनिधि' हें पद राजारामाचे वेळेस नवीन निर्माण झालें. त्याचें वार्षिक वेतन १५ हजार होन असून, त्याची हुकमत आठही प्रधानांवर होती.

हल्लींच्या मानानें सुद्धां सदरील पगार मुबलक दिसतात. त्या वेळीं पैशाची किंमत ज्यास्त असून, पगार थोडे देण्याची वहिवाट सर्वत्रच होती, हें ध्यानांत ठेविलें म्हणजे वरील पगारांच्या आंकड्यांवरून शिवाजीच्या

राज्याचें मोठेपण व आपल्या नोकरांस पैशासंबंधानें ददात न ठेवण्याची त्याची उत्कट इच्छा हीं चांगलीं व्यक्त होतात. पगाराशिवाय दुसरी कोणत्याही प्रकारची प्राप्ति सरकारी नोकरांस होत नव्हती.

अष्टप्रधानांच्या गैरहजिरींत प्रसंगोपात त्यांचीं कामें चालविण्यास त्यांचे मुतालिक सरकारांतून नेमून देत. तसेंच प्रत्येक खात्यांत कारभारी, मज्मुदार, फडणीस, सबनीस ( अथवा दप्तरदार ) कारखाननीस, चिटणीस, जामदार आणि पोतनीस असे आठ दुय्यम कामगार असत. मालोजीचा सावकार शेषोनाईक पुंडे ह्याचा नातू श्यामजी नाईक शिवाजीचा खासगी जामदार होता.

या सर्व मंडळींत पेशवा हा मुख्य असून, त्याची हुकमत इतर सर्व प्रधानांवर होती. त्याची पायरी राजाचे खालची असून, त्याची बसण्याची जागा सिंहासनाचे नजीक उजव्या बाजूस पहिली असे. मुलकी व लष्करी या दोनही कामांवर त्याची संपूर्ण देखरेख असून, राज्याच्या सर्व घडामोडींची जबाबदारी त्याजवर होती. सेनापतीकडे सर्व लष्कराचा ताबा असून त्याची बसण्याची जागा डावे बाजूस पहिली होती. अमात्य, सचिव व मंत्री हे तिघे पेशव्याच्या खालीं अनुक्रमानें बसत. त्याचप्रमाणें सुमंत, पंडितराव आणि न्यायाधीश हे डाव्या बाजूस सेनापतीच्या खालीं अनुक्रमानें बसत. निरनिराळ्या कामांची वाटणी होऊन, त्यांची जबाबदारी ठरली जावी, व प्रत्येकानें एका कामांत प्रवीणता संपादून तें काम उत्कृष्ट रीतीनें तडीस न्यावें, हें तत्त्व साधण्याकरितां शिवाजीनें असलें प्रधानमंडळ अंमलांत आणिलें.

( १ ) पेशवा म्हणजे मुख्य प्रधान यांनीं सर्व राज्यकार्य करावें. राजपत्रावर शिक्का करावा. सेना घेऊन युद्धप्रसंग व स्वारी करावी. तालुका ताब्यांत येईल तो रक्षून चालावें. श्यामराजपंतास काढल्यावर (पृ.२६९ पहा) मोरोपंत पिंगळे यास शिवाजीनें मुख्य प्रधान केलें. त्याचा बाप शहाजीजवळ कर्नाटकांत कारकून होता. मोरोपंत पिंगळे सुमारें सन १६५३ त शिवाजीस महाराष्ट्रांत येऊन मिळाला. तो शिवाजीचा केवळ उजवा हात असून युद्ध व राज्यव्यवस्था या दोनही बाबतींत कुशल व सर्वांस प्रिय असा होता. किल्ले बांधणें व फौज तयार करणें, हीं त्याचीं मुख्य कामें होतीं. याच्या चरित्राचा तपसील फारसा उपलब्ध नाहीं, तो पुष्कळ

तर महाराष्ट्रेतिहासांत चांगली भर पडेल. शिवाजी बादशहाच्या भेटीस आग्र्यास गेला, तेव्हां पाठीमागें राज्याची व्यवस्था मोरोपंतानें फार चांगली ठेविली. सन १६६८।६९ सालीं मुलखाचे व फौजेचे नवीन कायदे व नियम शिवाजीनें केले, त्यांतील बहुतेक काम मोरोपंताच्या हातचें आहे. १६७१ त मोरोपंत पिंगळे व प्रतापराव गुजर या दोघांनीं मोगल फौजेवर अनेक विजय संपादन करून त्यांचा संपूर्ण पराजय केला. शिवाजीच्या मृत्यूनंतर संभाजीनें मोरोपंतास कैदेंत ठेविलें. 'श्रीशंभुनरपति-हर्षनिधान, मोरेश्वरसुत नीलकंठ मुख्य प्रधान' या शिक्क्याचा एक कागद सन १६८१ एप्रिलचा आहे, ( खं. २०–२७३ ), तेव्हां त्यापूर्वी म्ह. शिवाजीनंतर एक वर्षाचे आंत मोरोपंत वारला असावा. कॉडरिंग्टननें सातान्याचे शिक्क्यांवर एक लेख लिहिला आहे, त्यांत १६८१ हा त्याचा मृत्युकाल आहे. (R. A. S. Vol. 16, 1883).

( २ ) मुजमुदार म्हणजे पंत अमात्य. यांनीं सर्व राज्यांतील जमाखर्चाची चौकशी करावी. दप्तरदार, फडणीस हे यांचे स्वाधीन असावे. लिहिणें चौकशीनें आकारावें. फडणिशी पत्रांवर निशाण करावें. युद्धप्रसंग करावे. तालुका जतन करून आज्ञेंत चालावें. सर्व लष्करी व मुलकी खात्यांचे व किल्ल्यांचे हिशेब अमात्यानें तपासावे. खर्चांत कमी ज्यास्ती करणें झाल्यास तें याच्या मार्फत करावें, असा नियम होता.

आरंभीं बाळकृष्णपंत हणमंते हा शहाजीचा कारकून शिवाजीजवळ मुजूमदार म्हणून होता. सन १६४७ च्या सुमारास तें काम शिवाजीनें सोनोपंत डबीर याचा मुलगा निळो सोनदेव याजला सांगितलें. महाराष्ट्र-इतिहासांत निळोपंताच्या कुटुंबाचें महत्त्व मोठें आहे. हल्लींचे बावडेकर पंतअमात्य त्यांचेच वंशज होत. त्यांच्या कुटुंबाचा इतिहास नुक्ताच प्रसिद्ध झाला असून, त्यांच्या दप्तरांतील कागदपत्र रा. राजवाडे यांच्या ८ व्या खंडांत प्रसिद्ध झाले आहेत. त्यांचें मूळ ठिकाण कल्याणनजीक होतें. निळोपंताचा आजा नारोपंत हा मावळांत खेडेंबारें गांवीं ठकाराचे घरीं लहानाचा मोठा झाला. त्यानें मालोजी भोसल्याचा आश्रय करून लौकिक संपादिला. नारोपंताचा मुलगा सोनाजी हा सोनोपंत डबीर या नांवानें औरंगजेबाचे पत्रांत उल्लेखिलेला आहे. हा शहाजी भोसल्याजवळ कारकुनीचें काम करीत होता. तो शहाजीबरोबर नेहमीं स्वारींत असे.

निजामशाहींत व कर्नाटकांत चांगली कामगिरी करून त्यानें शहाजीची मर्जी संपादन केली. शहाजीनें त्यास शिवाजीजवळ पुणें येथें ठेवून दिलें. दादाजी कोंडदेवाप्रमाणेंच सोनोपंत डबीर व बाळकृष्णपंत हणमंते यांचें शिवाजीच्या संगोपनांत अंग होतें. सोनोपंत सन १६४५ त मरण पावला. त्यास निळोपंत व आबाजीपंत असे दोन पुत्र होते. हे दोघेही लहानपणापासून बापाबरोबर राहून शिवाजीच्या कुटुंबांत चांगले परिचित झाले होते. बाप मरण पावल्यावर त्याचें काम निळोपंत करूं लागला. शिवाजीच्या लहानपणच्या उद्योगांत त्यास निळोपंताचें चांगलें साह्य होतें. जवळ जवळ समवयस्क असल्यामुळें उभयतांची उमेद सारखीच होती. लवकरच त्यास शिवाजीनें सचिवाचा हुद्दा दिला. स. १६४४ त कोंकणांतील मुलूख काबीज केल्यावर व पुढें तोरणा किल्ला घेतल्यावर, निळोपंतानें जिंकिलेल्या मुलुखाची व्यवस्था चांगली केली. तें पाहून शिवाजीनें स. १६४७ त त्यास मुजुमदारीचा हुद्दा दिला. त्याचा धाकटा भाऊ आबाजीपंत हाही त्याच्या मदतीस असे. आबाजी पंताचा वंश गडनीस घराणें म्हणून हल्लीं प्रसिद्ध आहे. कल्याण प्रांत जिंकण्याची कामगिरी आबाजीपंतानें स.१६४८त तडीस नेली. मुल्ला अहंमदची रूपवती सून त्यानें पकडून शिवाजीकडे पाठवून दिली; त्याजबद्दल शिवाजीनें आबाजीस ठपका दिला, आणि तिला योग्य बंदोबस्तानें विजापुरास पाठवून दिलें. आबाजीपंतानें कल्याणपासून गोव्यापर्यंत मुलूख काबीज केला. त्या प्रांताची सुभेदारी आबाजीपंताकडे पुढें पुष्कळ दिवस होती. निळोपंताचें वजन शिवाजीजवळ मोठें होतें. ही गोष्ट विजापुरच्या दियानतराव वगैरे कामगारांस चांगली ठाऊक होती. दियानतराव अली आदिलशहाचा कारभारी होता. त्याची जन्मभूमि ओझर्डे गांव असून तो चंदनवंदनच्या नजीक होता. चंद्रराव मोऱ्याचा प्रदेश शिवाजीनें सन १६५६ च्या मार्चांत काबीज केला. त्यांत ओझर्डें गांव शिवाजीकडे आला. तो गांव शिवाजीनें सोडून आपला आपणांस द्यावा, अशाबद्दल दियानतरावानें निळोपंताचे मार्फत शिवाजीकडे रदबदली केली, त्यासंबंधाचीं दोन पत्रें खंड ८लेख१-२ हीं पाहण्यालायक आहेत. दिनायत म्ह० धर्म आणि दियानतराव म्हणजे धर्माजीराव. सन१६६१त शिवाजीनें आपल्या प्रांताची नवीन व्यवस्था केली, त्यांत निळोपंतास त्यानें असें ठरवून दिलें कीं, त्यानें लढाईवर न जातां

जिंकिलेल्या मुलखाचा बंदोबस्त राखावा. शिवाजीच्या राज्याची हिशेबी पद्धत निळोपंताच्या हातची आहे. यासंबंधांत खंड ८ चे लेखांक ९ व १० पाहण्या-लायक आहेत. शहाजीच्या मरणामुळें जिजाबाईनें सती जाण्याचा आग्रह धरला, त्या वेळीं तिला योग्य हितोपदेश सांगून निळोपंतानें त्यापासून परावृत्त केलें. शिवाजी बादशहाच्या भेटीस गेला, तेव्हां मागील कारभार करण्यासाठीं मोरोपंताबरोबर निळोपंत व अण्णाजी दत्तो ह्या दोघांस शिवाजीनें नेमिलें होतें. अशा प्रकारें मराठी राज्याची चांगली सेवा करून स. १६७२ त निळो-पंत मरण पावला. त्यानंतर त्याचा मुलगा नारोपंत अमात्याचें काम करूं लागला. परंतु नारोपंत साधुवृत्तीचा असल्यामुळें त्याचा भाऊ रामचंद्रपंतच कर्चें काम करी. संभाजीचा वध झाल्यावर मराठी राज्याचें संरक्षण कर-ण्यांत या रामचंद्रपंताचा उपयोग राष्ट्रास किती झाला, तें पुढें सांगण्यांत येईल. त्याचा जन्म सन १६५० चे सुमारास झालेला होता, आणि लहानपणापासून त्याचें सर्व आयुष्य शिवाजीसंनिध निळोपंताच्या सहवासांत गेलें होतें. सन. १६६७ त शिवाजीनें त्यास सिंधुदुर्ग किल्ल्याची सबनिशी सांगितली होती. रामचंद्रपंतानें अण्णाजी दत्तो यास मदतीस घेऊन जमि-नीची धारेबंदी पद्धत ठरवून दिली. स. १६८२ त रामदासस्वामींचा परळी येथें अंतकाळ झाला, तेव्हां रामचंद्रपंतानें संभाजीच्या हुकमानें तेथें जाऊन स्वामींचा अंत्यविधि करविला. रामचंद्रपंत हा मोरोपंत पिंगळ्याचा जांवई असून, तो रामोपासक व रामदासाचा भक्त होता.

( ३ ) तिसरा प्रधान सुरनीस अथवा सचिव यांनीं राजपत्रें शोध करून अधिक उणें अक्षर मजकूर शुद्ध करावा; युद्धप्रसंग करून तालुका स्वाधीन होईल तो रक्षून आज्ञेंत वर्तावें. राजपत्रावर चिह्न, संमत करावें. याची देखरेख सर्व दप्तरावर असे. हवालपत्रें, इनामपत्रें, सनदा, वगैरेंचीं नोंद ठेवून तीं सर्व यथायोग्य आहेत किंवा नाहींत, हें तपासून पाहणें सचिवाचें काम होतें. एकंदर सरकारी दप्तराची व्यवस्था त्याच्या हातांत असून ठिकठिकाणीं फिरून दप्तरें तपासावीं लागत. या कामावर शिवाजीनें अण्णाजी दत्तो प्रभुणीकर याची नेमणूक केली. हा मोठा अनुभवी असून शिवाजीच्या पदरीं मोठ्या योग्यतेस चढला. याजकडे रत्नागिरी तालुक्याचें देशपांडेपण असून शिवाय कोल्हापुर इलाख्यांत भूधरगडानजीक सामानगड किल्ल्याची सबनिशी ही त्याजला दिलेली होती. सामानगड किल्ला त्यानेंच

बांधिला. शिवाजीचे मृत्यूनंतर तो सोयराबाईच्या पक्षास मिळाला. म्हणून संभाजीनें त्यास ठार मारिलें. सचिवपद त्याच्या वंशाकडे चाललें नाहीं. पन्हाळा व रांगणा काबीज करून कोंकणपट्टींत शिवाजीचा अंमल बसविण्यांत ह्यानें फार खटपट केली. दक्षिण कोंकणचा कारभार बहुतेक याजकडेस होता. हल्लीं भोरच्या पंतसचिवाचें घराणें आहे, त्याचा संस्थापक शंकराजी नारायण याची नेमणूक राजारामाचे कारकिर्दींत झाली. हा शंकराजी नारायण शिवाजीचे लष्करांत मोरोपंत पिंगळे व रामचंद्रपंत यांच्या हाताखालीं काम करून वाढला होता.

( ४ ) चौथा प्रधान वांकनीस ऊर्फ मंत्री याजकडे खासगीची व्यवस्था असे. याच्या तब्यांत अठरा कारखाने व बारा महाल, हुजूरपागा व जिलबींचें पायदळ, इतक्यांचा कारभार असून खासगीकडील दप्तर व पत्रव्यवहारही याच्याच ताब्यांत होता. भोजनाची तजवीज, आमंत्रणें करणें इत्यादि कामें याजकडेस होतीं. राजपत्रावर संमत मंत्री व बार अर्शी निशाणें, मंत्री याणें करावयाचीं होतीं. सन १६४७ त गंगूमंगाजी या नांवाच्या गृहस्थास शिवाजीनें वाकनीस हें पद दिलें. सन १६६४ त गंगूमंगाजीवर इतराजी होऊन दत्ताजी त्रिमल नांवाचा एक हुशार कारकून पागेकडे होता त्याजला वाकनिशीचें काम सांगितलें. राज्याभिषेकाचे वेळेस या हुद्याचें नांव मंत्री असें ठेवण्यांत आलें. दत्तोपंतानें हें काम शाहू येईपर्यंत केलें. शाहूमहाराजानें नारो राम शेणवी याजला सन १७१३ त मंत्री नेमिलें. तेव्हांपासून त्याचेच घराण्यांत तें पद चाललें. हल्लीं याचें घराणें सातारा जिल्ह्यांत वागणी या गांवीं आहे. हे चार प्रधान सिंहासनाचे उजव्या ओळींतील झाले.

( ५ ) डाव्या ओळींत प्रथम सेनापति. त्याचा अधिकार सर्व लष्करावर असून त्याला सरनोबत असें म्हणत. पायदळाचा व स्वारांचा असे दोन सरनोबत असून घोडदळांचा सरनोबत यासच सेनापति म्हणत. एकंदर फौजेच्या शिस्तीची जबाबदारी त्याजवर असे. सन १६४१ त शिवाजीनें माणकोजी दहातोंडे यास सरलष्कर नेमिलें. तो पांचसहा वर्षांनीं मरण पावला. तेव्हां नेताजी पालकर याची त्या कामावर नेमणूक झाली. अफ्झलखानाच्या फौजेचा नाश नेताजी पालकर यानें केला. सन १६६२ च्या सुमारास नेताजीस त्या कामावरून काढून राजगड

किल्ल्यावर असलेला प्रतापराव गुजर यास शिवाजीनें सरनोबत केलें. हा शूर व यशस्वी पुरुष शिवाजीच्या मंडळींत प्रमुख होता. तो शिवाजी-बरोबर आग्र्यास गेला होता. सन १६७२ सालीं विजापुरकरांबरोबरील जेसरीच्या लढाईत प्रतापराव मरण पावला; आणि त्याच्या जागीं हंबीरराव मोहिते याची नेमणूक झाली. त्याचें पहिलें नांव हंसाजी असें असून ' हंबीरराव ' हा शिवाजीनें त्यास किताब दिला होता. संभाजीचे कार-किर्दींत हंबीरराव मरण पावला.

( ६ ) डबीर अथवा सुमंत याजकडे परराज्यांशीं होणाऱ्या व्यवहारांचें काम होतें. परदरबारास जाणारे व तिकडून येणारे खलिते व ते घेऊन जाणारे जासूद यांची व्यवस्था या प्रधानाकडे असे. आरंभीं सोनोपंत हा ह्या कामावर १६४१ पासून होता. सोनोपंत लवकरच वारला. कांहीं दिवस सोमनाथपंत याजकडे तें काम होतें. त्याचा मुलगा रावजी सोमनाथ हा वऱ्हाडांत व कोंकणांत कामगिरीवर होता. राज्याभिषेकसमयीं जनार्दन नारायण हणमंते याची नेमणूक सुमंत पदावर होती.

( ७ ) न्यायाधिशाकडे न्याय करण्याचें काम असून निवाडपत्रावर संमत न्यायाधीश व बार असें निशाण त्यानें करावयाचें होतें. या कामा-वर प्रथम निराजी रावजी हा गृहस्थ असून, पुढें अभिषेकसमयीं बाळाजी पंडित हा न्यायाधीश होता. सन १७१३ त होनाजी अनंत यास शाहूनें न्यायाधिशीवर नेमिलें. त्याच्याच घराण्यांत पुढें हें पद कायम झालें. निराजी रावजी हा न्यानाधीश असून, त्याचा मुलगा प्रल्हाद निराजी हा प्रथम कर्नाटकांत व्यंकोजीजवळ असून, पुढें गोवळकोंड्याचे दरबारीं शिवाजीचा वकील होता. राजारामाचे कारकिर्दींत जिंजीचें संरक्षण कर-ण्यांत यानें पराक्रम दाखविल्यामुळें त्यास राजारामानें प्रतिनिधि हें नवीन पद दिलें. प्रल्हादपंताविषयीं फलटणकरांचे दप्तरांत अशी हकीगत सांपडते कीं, 'शिवाजीमहाराज चंदावरासंनिध गेले. तेथें व्यंकोजी राजे भेटीस आले. त्यांस कैद करावें हें शिवाजी राजे यांचे मनांत आलें. तें वर्तमान तर्कज्ञानें-करून प्रल्हाद निराजी यांनीं जाणिलें; आणि व्यंकोजी राजे यांचीं वस्त्रें आपण अंगावर घेऊन, त्यांचे ठिकाणीं आपण राहिले, आणि व्यंकोजी राजे यांसी रात्रौ घोड्यावर बसवून चंदावरास लावून दिलें. प्रातःकाळीं प्रल्हादपंत यांसी शिवाजी महाराज यांनीं ओळखिलें. नंतर प्रल्हादपंतावर

शिवाजी राजे यांची बहुत मेहेरबानी झाली. यांसी पद काय द्यावें हें शिवाजी महाराज यांनीं विचार करून, प्रतिनिधि हें पद निर्माण करून, तें पद प्रल्हादपंतासि दिलें. मग चंदीस जाऊन चंदी घेतली.' ह्या मजकुरांत तथ्य काय असेल तें असो. मात्र प्रल्हादपंत तंजावराकडे होता व तिकडील राजकारणाची त्यास चांगली माहिती होती, ही गोष्ट खरी. रघुनाथ नारायण हणमंते व प्रल्हादपंत एकजुटीनें वागत होते. महाराष्ट्रावरील आपत्प्रसंगीं प्रल्हादपंतानें राजारामास कर्नाटक प्रांतीं जाण्याची सल्ला दिली. शिवाजीस तो प्रांत काबीज करण्यांत प्रल्हादपंताचा उपयोग चांगला झाला होता.

( ८ ) आठवा प्रधान 'पंडितराव' हा होय. यास प्रथम न्याय-शास्त्री असें म्हणत, अभिषेकाचे वेळेस 'पंडितराव' असें नांव ठेविलें. शास्त्रार्थ सांगणें, देवस्थानांस वगैरे दिलेल्या नेमणुकांची व्यवस्था पाहणें, सरकारांतून होणारे विधि व दानधर्म यांजवर देखरेख ठेवून व्यवस्था लावणें, हीं कामें या प्रधानाचीं होतीं. रघुनाथभट्ट उपाध्ये चंदावरकर यास शिवाजीनें सन १६६१ त दानाध्यक्ष केलें. त्यासच राज्याभिषेक-समयीं 'पंडितराव' पद मिळालें. हा विद्वान् पंडित शिवाजीच्या मर्जी-तील होता. फारशी भाषा काढून दरबारांत संस्कृत भाषेचा प्रवेश करण्यास शिवाजीला मदत रघुनाथपंताची होती. 'राजव्यवहारकोश' याच रघुनाथपंतानें केला. त्याचा मुलगा मोरेश्वर पंडितराय शिवाजीच्या अखेरीस व संभाजीच्या कारकिर्दींत ह्या कामावर होता, त्याचीं आज्ञापत्रें गोमंतकाच्या इ० साधनें ( इ. सं. ) व सत्कार्योत्तेजक सभा खं. ९ यांत छापलेलीं आहेत. रघुनाथपंडिताच्या घराण्याची हकीकत भारतवर्षांत खालीं दिल्याप्रमाणें सांपडते.

पूर्वी मल्हारभट्ट नांवाचा एक ब्राह्मण भोसल्यांपाशीं उपाध्याय होता. आपल्या यजमानांस ऊर्जितावस्था प्राप्त व्हावी म्हणून मल्हारभट्टानें उदे-पुरीं जाऊन पुष्कळ खटपट केली. मालोजीच्या पूर्वीपासून उदेपुरीं आप-णास राज्य किंवा वतन मिळेल असें भोसल्यांस वाटत असून, त्या कामीं त्यांचे प्रयत्न चालू होते, यावरून उदेपुरच्या राजघराण्याशीं भोसल्यांचा संबंध होता ह्यांत संशय नाहीं. मल्हारभट्टाचा मुलगा लक्ष्मणभट हा मालोजीजवळ होता. निंबाळकरांची मुलगी दीपाबाई मालोजीस कर-

विण्याची खटपट त्यानेंच केली. लक्ष्मणभटाचा मुलगा भास्करभट हा शहाजीपाशीं होता. शहाजी विजापुरच्या कैदेंत पडला असतां भास्करभटानें अनुष्ठानें वगैरे करून त्याच्या मुक्ततेची खटपट केली. शंभुप्रसादानें सुटका झाली म्हणून उपाध्यास शंभु उपाध्ये असें म्हणूं लागले. भास्करभट ऊर्फ शंभु शिवाजीपाशीं होता. शिवाजीबरोबर तो दिल्लीसही गेला होता. शंभु उपाध्ये याचे भाऊबंद तंजावरास व्यंकोजीराजे याजकडे होते, त्यांपैकीं रघुनाथभट उपाध्ये म्हणून एक विद्वान् गृहस्थ व्यंकोजीनें शिवाजीकडे रायगडास पाठवून दिला. शिवाजीनें त्याची विद्वत्ता जाणून आपणापाशीं ठेवून घेतलें व अभिषेकप्रसंगीं पंडितराय व दानाध्यक्ष हीं पदें व त्या दरखाचीं वस्त्रेंही त्यास दिली. रघुनाथभटाचें आडनांव चंदावरकर असें पडलें. ह्यानेंच राजव्यवहारकोश केला, त्यांत यवनी शब्दांस संस्कृत पर्यायशब्द दिले आहेत. भास्करभट अरवी येथें घर करून राहिला. शिवाजी वारल्यावर रघुनाथभट सोयराबाईच्या पक्षास मिळाला म्हणून संभाजीनें पंडितराईचा अधिकार त्याजकडून काढून त्याचा मुलगा मोरेश्वर रघुनाथ राजोपाध्ये यास दिला. पुढें लवकरच तो अधिकार कलुशा ब्राह्मण यास देण्यांत आला. संभाजी मरण पावल्यावर भास्करभटाचा मुलगा मुद्गलभट यानें येसूबाईच्या संनिध राहून राज्यसंरक्षणाची पुष्कळ खटपट केली. रघुनाथपंडित व मोरेश्वरभट हे राजारामाबरोबर चंदीस नव्हते. त्यांजकडे पुढें पंडितराई चालली नाहीं. तें पद राजारामानें श्रीकराचार्य कालगांवकर यांस दिलें. तो पुढें ताराबाईचे पक्षांस राहिला. शाहू परत आल्यावर ताराबाईकडून राज्य परत मिळविण्यांत मुद्गलभटानें पुष्कळ खटपट केली; म्हणून शाहूनें त्यास पंडितराईचें पद देऊन अधिकार व इनामें दिलीं; व सातारा शहरांतील अष्टाधिकार दिले, आणि सालीना पंधरा हजार होनांची नेमणूक बांधून दिली. मुद्गलभट हा लढाऊ असून त्यानें अनेक प्रसंगीं शाहूची मदत केली. मुद्गलभट शंभर वर्षे जगून सन १७२९ सालीं मरण पावला. नंतर त्याचा वडील पुत्र रघुनाथभट यास पंडितराईचें पद मिळालें, तो सन १७५९ त वारला. रघुनाथ हा आपल्या नांवापुढें 'राव' असें लावूं लागला, तेव्हांपासून भट हा शब्द गळाला. पुढें या कुटुंबांत भाऊबंदकीचा तंटा वाढला, तो थोरल्या माधवरावानें तोडून रघुनाथभटाचा मुलगा

रामचंद्रराव यास पंडितराईचा सर्व अधिकार दिला. रामचंद्रराव सन १७९४ त वारल्यावर, त्याचा मुलगा रघुनाथराव भाऊसाहेब हा पंडितराव होऊन तोही सन १८२८ त मरण पावला. त्याचा मुलगा रामचंद्रराव हा साताराचें राज्य खालसा होईपर्यंत पंडितराईचे कामावर होता.

दरबारांत बसण्याची मिसल अशी होती कीं, मध्यभागीं सिंहासनावर छत्रपति महाराज, पाठीमागें हुजरे यांनीं मोर्चलें, चामरें, पंखे, पानदान, इत्यादि घेऊन उभें रहावें. सिंहासनाचे बाजूस आत विश्वासु दहा बारा उभे राहवे.

| महाराजांचे उजवे बाजूस. | महाराजांचे डावे बाजूस. |
| --- | --- |
| १ पंतप्रतिनिधि राजारामाचे वेळेपासून. | १ सेनापति. |
| २ मुख्य प्रधान. | २ सुमंत. |
| ३ पंत अमात्य. | ३ न्यायाधीश. |
| ४ पंत सचिव. | ४ पंडितराय. |
| ५ मंत्री. | ५ फडणीस. |
| ६ चिटणीस. | ६ सेनाधिकारी, सरदार, शूर शिपाई योग्यतेप्रमाणें. |
| ७ परराज्यांतील वकील. | |

कारभारी मुत्सदी, तालुकदार, मामलेदार व किल्लेदार योग्यतेप्रमाणें.

ज्यांचे त्यांचे मुतालीक व कारकून यांनीं आपले मलाकाचे पाठीमागें बसावें. दोनही बाजूंस पाठीमागें कारखान्यांचे नाईक व हवालदार यांनीं उभें राहवें. कचेरींत मुजरे करविणें, योग्यतेप्रमाणें बसविणें, परकी कोणी आल्यास वर्दी लावणें, हें सर्व दोन चोपदारांनीं कचेरींत पुढें राहून करावें. ( भिडे कृत अष्टप्रधानांचा इतिहास. )

६. **मराठशाहीच्या व्याप्तीसंबंधीं शिवाजीचें मत.**—शिवाजीनें गोवळकोंड्यास जाऊन काय काय कारस्थानें केलीं, आजपर्यंतचें त्याचें वर्तन कोणत्या धोरणानें चाललें होतें, सगळें मराठमंडळ एकत्र करण्याविषयीं त्याचे प्रयत्न अहर्निश कसे सुरू होते, इत्यादि अनेक प्रकार स्पष्ट करणारें शिवाजीचें एक महत्त्वाचें पत्र सरस्वतीमंदिरांत प्रसिद्ध झालेलें आहे. हें पत्र शहाजीस पकडणाऱ्या बाजी घोरपड्याचा मुलगा मालोजी घोरपडे यास शिवाजीनें लिहिलेलें आहे. विजापुरची आदिलशाही बहुतेक

बुडालीच आहे, असा या पत्रांत शिवाजीचा स्पष्ट अभिप्राय आहे. कुत्ब-शहालाही शिवाजीनें आपल्या तंत्रानें वागण्यास लाविलें. म्हणजे सामान्यत: राज्याभिषेक झाल्या वेळेपासून शिवाजी हाच दक्षिण हिंदुस्थानांत मुख्य सत्ताधीश होता याबद्दल या पत्रावरून संशय राहत नाहीं. या पत्राला काय जबाब आला तें अर्थात् माहीत नाहीं; परंतु कर्नाटकाचें एकंदर राजकारण सिद्धीस गेलें, यावरून शिवाजीचा उद्योग सर्व मराठमंडळानें मान्य केला होता, असें मानण्यास हरकत नाहीं. हें पत्र सन १६७६ त गोवळकोंड्याहून लिहिलें असलें पाहिजे. कर्नाटकची स्वारी शिवाजीच्या राज्याभिषेकानंतर झाली, याबद्दलही या पत्रावरून संशय राहत नाहीं.

श्रीमहादेव.

राज्यश्री मालोजी राजे घोरपडे यांसी:—

छ अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य

प्रति राजश्री शिवाजी राजे जोहार. उपरि. पूर्वी निजामशाहींतून आमचे बाप कैलासवासी महाराज इभराईम अदिलशाहा ( मृ. १६२६ ) पादशाहाचे कारकीर्दीत इकडे आले. त्यास इभराईम आदिलशहानें पादशाही कारखान्याचा मदार महाराजांचे सिरीं टाकिला. तेव्हां महाराजानें हा विचार केला कीं, पादशाही मदार आपले हातास आला असतां आधीं तों आपले जातीचे लोक मराठे यांला हातीं धरून सरदारकी करून पोटें भरितात ते पादशाही वजीर करावे, पादशाही कामें यांकडून करवून नामोश होय, इज्जती थोर पावेत तें करावें. म्हणून तुमचे बाप बाजी घोरपडे सरदारकी करून होते ते आणून पादशहास भेटऊन पादशाही वजीर केले. त्या दिवसापासून तुमच्या बापाच्या हातें व तुमच्या हातें पादशाहीचीं कामें होत आलीं. पादशहांनीं तुमचें चालविलें. ऐशा तीन पिढ्या पादशहाच्या दोनी पिढ्या तुमच्या जाल्या. ऐशीयास, महाराजानें तुमच्या बापास इतकें बरें केलें हें स्मरण न धरून, जेव्हां कांहीं मुस्तफाखानें महाराजास दस्त करविलें तेव्हां तुमचे बाप बाजी घोरपडे हमी होऊन महाराजास दस्त करून मुस्तफाखानाचे हातीं दिलें. त्या दिवसापासून तुमच्या घराणियाचा व आमच्या घराणियाचा दावा वाढत चालिला. तो कितेक झगडियांत तुम्हीं आमचे लोक मारिले व आम्हीं तुमचे लोक मारिले. आदिकरून

तुमचे बाप बाजी घोरपडे त्यांला आमचे लोकीं झगडियांत मारिलें. ऐसा परस्पर दावा चालिला होता. ऐशीयास सांप्रती राजकारणवर्तमान तरी दक्षणेचे पादशाह तीन, निजामशाह, आदिलशाह, कुतुबशाह. त्यांमध्यें निजामशाही पादशाही बुडाली ते समयीं निजामशाही उमदे वजीर होते त्याणीं आदिलशाही दरगाहासी रुजुवाती करून आपणास रोजगारास जागा केला. हालीं आदिलशाही बहलोलखान पठाणीं घेतली, पादशाहा लहान लेकरूं नांवमात्र, ते आपलें कैदेंत ठेविले आहेत, आणि तख्त व छत्र व विजापुरचा कोट पठाणानें कबज केला आहे, कांहीं गुवारून मिळाला नाहीं. ऐसीयास, दक्षणचे पादशाहीस पठाण जाला, हे गोष्टी बरी नव्हे. पठाण बळवला म्हणजे एका उपरि एक कुल दक्षिणियांची घरें बुडवील, कोणास तगों देणार नाहीं, ऐसें आम्हीं समजोन, हजरत कुतुबशाहा पादशाहा यांसीं पहिलेपासून रुजुवात राखिली होती, त्यावरून सांप्रत हजरत कुतुबशाहांनीं मेहरबानी करून हुजूर भेटीस येणें म्हणून दस्तखत मुबारक व दस्तपंजीयानसी फरमान सादर केला. त्यावरून आम्हीं येऊन हजरत कुतुबशाहाची भेटी घेतली. भेटीचे समयीं पादशहाची आदब आहे कीं, शिरभोई धरावी, तसलीम करावी. परंतु, आम्ही आपणावरी छत्र धरिलें असे ही गोष्ट कुतुबशाहास मान्य होऊन, शिरभोई धरणें व तसलीम करणें हें माफ केलें. पादशाहा तिकडून आले; आम्ही इकडून गेलों. पादशाहांनीं बहुतच इज्जती होऊन, गळ्याला गळा लावून भेटले. आम्हास हातीं धरून नेऊन जवळी बैसविलें. कितीएक मेहेरबानी जाहीर केली. आम्हींही जैशी रुजुवात करूं नये तैसी केली, आणि कुतुबशाहाचा व आपला घरीं बरेपणा करून घेतला. या उपरी, राजकारणविषयीं हजरत कुतुबशाहांनीं महादण्णापंतास व आम्हास एकचित्त करून ऐसा तह केला कीं, जो काय उभयवर्गी तह द्यावा तो आपण कबूल करावाच. ऐसा कुलमनसबा व मदार आम्हावरी टाकिला आहे कीं, आपली पादशाही आम्हा दक्षणीयांचे हातें राहे तें करावें. म्हणून, त्यास हा मनसुबा ये प्रसंगीं आमचे हातास आलिया उपरि आम्ही हाच विचार केला कीं, जे कांहीं आपले जातीचे मराठे लोक आहेती, ते आपल्या कटांत घेऊन कुतुबशाहासी त्यांची रुजुवात करावी, दौलत देवावी, त्यांचे हातें पादशाही काम घेऊन पादशाहाची पादशाही दराज करावी, आणि तुम्हां लोकांच्या दौलताही चालेत, घरें राहेत, तें

करावें. आपल्या जातीच्या मराठिया लोकांचें बरें करावें, हें आपणांस उचित आहे, ऐसें मनावरी आणून, तुमचा आमचा पाहिल्यांपासून दावा वाढत आला होता, तो आम्ही मनांतून टाकून, निःकपट होऊन, तुम्ही मराठे लोक कामाचे, तुमचें बरें करावें ऐसें मनीं धरून, हजरत कुतुबशाहासी बहुत रीतीं बोलोन, तुम्हास हजरत कुतुबशहाचा कौलाचा फर्मान देऊन पाठविला आहे. तरी तुम्ही कुलीन आमचा भरोंसा मानून, देखतपत्र, हरेक उपायें, पटाणापासून निघून मजल दरमजल भागानगरास आम्हापासीं येणें. त्यास तुम्ही तरी स्वार होऊन मजल दरमजल यालच. परंतु आपला कुली खुलासा, नेखस्तमुदा व इतबारी हेजीब बहुत सत्वर पुढें पाठवून देणें-कीं, तुम्हांहून पुढें चार दिवस आम्हापासीं यावे ऐसा पाठवून देणें म्हणजे हजरत कुतुबशाहास आम्ही अर्ज करून दौलतेचें नेमस्त करून कौलाचा फर्मान दस्त पंजे मुबारक घेऊन, फर्मान व लुगडीं माहेताप तुम्हांस पाठवून देऊन. ते घेऊन, येऊन, आमचे हातें हजरत कुतुबशाहास भेटणें. ए प्रसंगीं ऐसें तुमचे दौलतेचें काम मजबूद करून देतों कीं, पुढें बहुत बरें केलें ऐसें तुम्हीं आठवावें, तुमचे पुत्रपौत्र आठवीत, व दौलत थोर होए, व हजरत कुतुबशहाचें काम तुमचे हातें होऊन ये. ऐसा समय असे. ऐशीयास, तुम्ही कदाचित् ऐसा विचार कराल कीं, आदिलशाहीचे आपण दों पिढीचे वजीर, आतां विजापुराकडून कुतुबशाहींत राजे यांचे बोलें कैसें जावें ? तरी जे समयीं खवासखान धरिला, बिजापुरचा कोट पटाणीं घेतला, विजापुरचा पादशहा धाकटा आहे त्याला कैदेत ठेविलें, तेच समयीं पादशाही बुडाली. विजापुर पटाणाचे हातास गेलें ! आतां आदिलशाही कैंची ! आणि उगीच तुम्ही तेथें आपली आदिलशाही आहे म्हणोन गुंतून राहिले आहां ! जरी पठाणाचीच चाकरी करोन राहों म्हणाल तरी पटाण कांहीं तुम्हांस थोर दौलत देणार नाहीं. आणि पठाणास तरी हजरती कुतुबशाहा व आम्ही तमाम दखणी मिळोन चालोन घेऊन बुडवीतच आहों ! तुम्ही मराठे लोक आपले आहां, तुमचें गोमटें व्हावें, म्हणून स्पष्टच तुम्हास लिहिलें असे. जें काय तुम्हांस पठाण देतो त्याची दुगुणी आम्ही कुतुबशाहापासून तुम्हांस देवीतच असों. किंवा ह्याहून अधिकही होऊन येईल तरी करून देऊंच. सर्व प्रकारें तुमचें गोमटें करून. एविशीं आम्हांपासून अंतर पडे तरी, व

मागील दाव्याचा किंतु आम्ही मनांतून टाकिला, एविशीं, आम्हांस श्री देवाची आण असे. तुम्ही निःसंदेह होऊन येणें. हेजीब आपला पुढें पाठवणें. त्या हातीं आम्हांसीं घरोबियानें बरें वर्तावें, मागील दाव्याचा किंतु मनांतून टाकिला, ऐसें, आपला आराध्य व कुलस्वामी असेल त्याचा शपथ लिहून, पत्र हेजीबाहातीं पुढें पाठवून देणें. आम्ही सर्व प्रकारें तुमचें गोमटें करावयासी अंतर पडों ने दऊन. बहुत काय लिहिणें. मर्यादेयं विराजते.'

ह्या पत्रावरून शिवाजीचे स्वतःचे उद्देश अगदीं स्पष्ट होतात. शिवाजीचा उद्योग स्वराज्यस्थापनेचा होता, खुद्द महाराष्ट्रांत त्यानें स्वराज्य प्रत्यक्ष स्थापन केलें. महाराष्ट्राच्या बाहेरही स्वराज्य स्थापन करण्याचा त्याचा हेतु निर्विवाद दिसतो. मुसलमानी राज्यांबद्दल त्यास यत्किंचित् आदर वाटत नव्हता. आपल्या देशावर आपल्या लोकांचें राज्य असावें, फौजेंत व मुत्स-द्देगिरींत कामें करून आपल्या लोकांनीं नांव लौकिक मिळवावा, आपल्या लोकांना हीनपद होऊन दुसऱ्याच्या तोंडाकडे पाहण्याचा प्रसंग येऊं नये, आपल्या धर्माचें व देशाचें यथायोग्य संवर्धन व्हावें, अशा प्रकारची शिवा-जीची स्वराज्याची कल्पना होती. ही त्याची कल्पना त्याच्या शब्दांत व कृत्यांत पदोपदीं दृष्टोत्पत्तीस येते. आपला देश, आपलें राज्य हे शब्द तो सर्वत्र वापरितो. बखरकारांचे उद्गारही याच मासल्याचे आहेत. अगदीं आरंभाच्या उपक्रमापासून अखेरपर्यंत शिवाजीचीं जीं पत्रें वर ठिकठिकाणीं दिलीं आहेत, त्यांतही हा त्याचा भाव उत्कृष्ट व्यक्त होतो. मालोजी यास लिहिलेलें पत्र व बंधु व्यंकोजीस लिहिलेलीं पत्रें वाचलीं असतां हीच भावना दृढ होते. बखरकारांचे शद्ब प्रत्यक्ष शिवा-जीचे नसले तरी त्या वेळच्या स्थितीचे निदर्शक आहेत. पश्चिम किनारा ताब्यांत ठेवण्याविषयीं शिवाजीनें आटोकाट प्रयत्न केले. त्यानें प्रत्यक्ष आपली राजधानीच किनाऱ्याजवळ केली. त्या किनाऱ्यानें उत्तरेस दमण, सुरत, भडोच पर्यंतच्या प्रदेशांत वारंवार स्वाऱ्या करून आपलें वर्चस्व स्थापन करण्याचा त्यानें प्रयत्न केला. दक्षिणेस कारवारपर्यंत व खालीं कर्नाटकांत जाऊन पूर्वकिनाऱ्यानें जिंजी, वेलोर वगैरे ठिकाणें काबीज करून तंजावरकडील सबंध प्रांत स्वराज्याखालीं आणिला. तिकडून वर चेपीत येऊन विजापुर व गोवळकोंडा या राज्यांचा दक्षिण, पश्चिम व उत्तर

या तीन बाजूंचा मुलूख बहुतेक व्यापून तीं राज्यें त्यानें संपुष्टात आणिलीं. मोगल बादशाहीस तर त्यानें चांगलाच शह दिला. वऱ्हाड औरंगाबादपर्यंतचा मुलूख बहुतेक त्याच्या हस्तगत झालाच होता. अशा रीतीनें शिवाजीनें स्वराज्याची सुरुवात केली. मोगल राजधानीस जाऊन पुढें स्वतः सर्व हिंदुस्थानची यात्रा केली. देशाची स्थिति पाहून घेतली. आपणास काय करितां येईल आणि काय करणें शक्य आहे, या गोष्टींचा त्यानें अजमास बांधिला. जयसिंग, जशवंतसिंग आणि छत्रसाल* इत्यादि रजपूत राजांस स्वराज्याची संपूर्ण विस्मृति झाली होती, ती त्यानें दूर केली. त्यांच्या ठिकाणीं स्वत्वाची जागृति उत्पन्न केली. हे प्रकार ध्यानांत घेतले म्हणजे शिवाजीचा स्वराज्याचा उद्योग केवढा विस्तृत होता हें लक्षांत येतें. पंधरा वर्षांचा असतां शिवाजी विजापुरास गेला, तेव्हां त्यानें आदिलशहास सलाम केला नाहीं. आग्र्यास औरंगजेबाचे दरबारीं गेला, तेथें सुद्धां असाच कांहीं प्रकार घडला. आम्ही मराठे स्वतंत्र, आम्ही दुसऱ्याचे ताबेदार होणार नाहीं, ही शिवाजीची स्वातंत्र्यप्रीति अव्वलपासून अखेरपर्यंत कायम होती. ती दिवसेंदिवस वृद्धि पावत होती, इतर महाराष्ट्रीयांस पछाडीत होती. ही कल्पना शिवाजीच्या एकंदर वर्तनक्रमांत रेखलेली दिसते. याच कारणास्तव व्यंकोजीला जिंकणें शिवाजीस पडलें. व्यंकोजीनें मुसलमानांची ताबेदारी करावी, हें शिवाजीस सहन झालें नाहीं. बाकी व्यंकोजीचे हाल करावे असें शिवाजीच्या मुळींच मनांत नव्हतें. हें स्वराज्याचें व स्वतंत्रतेचें वारें पुढें मराठ्यांचे अंगीं संचारूं लागलें. याच वाऱ्याचे एकदेशी जोरावर बाळाजी विश्वनाथ व बाजीरावापासून महादजी व नानाफडणिसापर्यंत सर्व महाराष्ट्र पुढारी वर्तत होते. पूर्वजांचा संकल्प तडीस नेण्यासाठीं शंभर वर्षे त्यांचा अट्टाहास चालला होता. शिवाजीनें या कल्पनेचें बीज इतक्या जोराचें पेरिलेलें होतें.

कोणताही उपक्रम आरंभीं फार कठिण असतो. पहिल्या अडचणींतून पार पडणें हें मोठें बिकट काम असतें. त्या प्रथमच्या अडचणी दूर होऊन एकदां कल्पिलेला आरंभ सिद्धीस गेला म्हणजे मग पुढील विस्तारास

* बुंदेलखंडाचा राजा छत्रसाल याचा चरित्रक्रम पुष्कळ अंशीं शिवाजीसारखाच असून शिवाजीची भेट घेऊन त्यानें आपला पुढील उद्योग ठरविला होता, ( मुसलमानी रियासत, पान ६९५ ).

विलंब लागत नाहीं. हा व्यवहारांतील अनुभव राज्यासही लागू पडतो-हिंदुस्थानांतील इंग्रजांचें राज्य अशाच मार्गानें विस्तृत होत गेलें. राज्यारोहण समारंभ करून शिवाजीनें आपला पहिला उपक्रम यशस्वी व जगजाहीर केला; आणि मुसलमानी अंमलाचा तीनशें वर्षांचा बाऊ महाराष्ट्रीयांच्या मनांतून काढून टाकिला. हा पहिला प्रयोग इतका भक्कम, इतका हेतुपूर्ण व इतका विस्तारसूचक होता कीं, शिवाजीस आयुष्यमर्यादा जर ज्यास्त असती तर त्यानें अल्पावधींत काय काय चमत्कार करून दाखविले असते, याची आपणांस सहज कल्पना करितां येते. परंतु शिवाजी जरी अल्पायुषी झाला पुढील तीस वर्षांत जरी नानाप्रकारचीं भयंकर संकटें मराठेशाहीवर आलीं, तरी शिवाजीनें पेरलेलें बीज फुकट गेलें नाहीं. त्यानें योजिलेला उद्देश कालांतरानें तरी फलद्रूप झाला. तीस वर्षेपर्यंत त्याच्या निकट सहवासांत तयार झालेले अनेक वीर, अनेक मुत्सद्दी, अनेक विद्वान् व कल्पक पुरुष स्वराज्याच्या नवीन वातावरणांत वाढले होते. शिवाजीच्या विचारांनीं त्यांचें सर्व जीवन व्यापून गेलें होतें. ह्या नवीन जीवनाचा फैलाव महाराष्ट्रीयांच्या अंतःकरणांत झालेला होता. शिवकालीं समाज जिवंत झाला. अर्थात् योग्य संधि येतांच महाराष्ट्रवीरांनीं शिवाजीची योजना तडीस नेण्याचा उद्योग केला.

७. सीदीशीं शिवाजीचें युद्ध.—कोंकणप्रांत शिवाजीच्या फार आवडीचा होता. त्या प्रांतांतील अडचणीच्या जागेंत शत्रूपासून आपला बचाव करणें त्यास फार सुलभ होतें. कोंकणांतील लोक हुशार, कष्टाळू व इमानी असून त्याच्या फार उपयोगी पडत. राजापुर, दाभोळ, चौल व दुसऱ्या कित्येक बंदरांतून ह्या पश्चिम किनाऱ्यावरून बाहेर मोठा व्यापार चाले, त्याची किफायत चांगली होत असे. सरहद्दीचा बंदोबस्त ठेवणें हें राज्यसंरक्षणाचें मुख्य काम असल्यामुळें कारवारपासून सुरतपावेतों पश्चिम-किनाऱ्यावर आपणांस कोणी शत्रु नसावा, अशी व्यवस्था शिवाजीस ठेवावयाची होती. हा हेतु सिद्धीस नेण्यास एका सीदीचीच कायती अडचण होती. म्हणून सीदीचा पाडाव करणें शिवाजीस प्राप्त झालें, आणि सीदीचा पाडाव करण्यांत त्याच्या आरमाराची उत्पत्ति झाली. १६६१ त राजपुरी बंदर शिवाजीनें कबजांत घेऊन तेथें फौज व आरमार कायमचें ठेवून दिलें, हें मागें सांगितलेंच आहे. ( पृ.२६४ ). तळें, घोसाळा व राथरी हीं ठिकाणें

काबीज करून त्यानें रायगड किल्ला अत्यंत मजबूद असा बांधिला. हीं ठिकाणें सीदीला दडपून टाकण्यास फार उपयोगाचीं होतीं. जयसिंगाचा शिवाजीशीं तह ठरत असतां जंजिरा व राजपुरीजवळचे दुसरे किल्ले आपणास द्यावे अशी मागणी जयसींगाजवळ शिवाजीनें केली आणि जयसिंग ती कबूलही करीत होता. तहाची वाटाघाट होत असतां सीदी संबूळ जयसिंगाकडे जाऊन जंजिऱ्याबद्दल तहांत काय ठरतें तें पाहण्यास टपून बसला होता. बादशहाच्या खास हुकमाशिवाय जंजीरा सोडून देण्यास तो कबूल झाला नाहीं. तेव्हां जंजिऱ्याचा हा प्रश्न नाइलाजास्तव बादशहाकडे गेला. सीदीनें आपलें म्हणणें परभारें बादशहाकडे जोरानें कळविलें. जयसिंगानें ठरविलेला तह जेव्हां बादशहानें मंजूर करून पाठविला तेव्हां त्यानें जयसिंगास असें लिहून कळविलें कीं, 'उभयतांनीं बहादुरी सांगून जंजिरे कलम बोलूं नये. वरकड किल्लेकोट पादशाहींतील सोडावे; चौथाई व सरदेशमुखी करार करावी; हुजूर भेटीस आल्यावर सफाईची चाल पाहून येथून प्रांत किल्ले देणें ते देतां येतील.' 'जंजीरा हबशी यांनीं दिला नाहीं त्यावरून सत्तावीस किल्ले मोकळे झाले नाहींत, ऐशियास राजे शिवाजी यांची खात्री कळेल तशी करून हुजूर पाठवून द्यावें. त्यांचे मनोदयानुरूप तुमचे काराराप्रमाणें दिल्लीचे मुक्कामीं सर्व फैसल करावयास येईल.' यावरून जंजिऱ्याबद्दल आग्रहच पडल्यास प्रत्यक्ष भेटीअंतीं सर्व काय करणें तें करूं, असें औरंगजेबानें या वेळीं कळविलें. या कामीं पुष्कळ खटपट झालेली दिसते. सीदीनेंही जंजिरा न सोडण्याबद्दल बादशहाकडे पुष्कळ रदबदली केली. शिवाजीनें आपले राज्याचा जो पाया घातला त्याच्या पश्चिम सरहद्दीवर त्यास शत्रु ठेवावयाचा नव्हता म्हणून या प्रश्नास इतकें महत्त्व आलें.

पुढें सन १६६७ पर्यंत शिवाजीनें दक्षिणेस राजापुर व घेरिया ऊर्फ विजयदुर्गपासून उत्तरेस दमणपर्यंत सर्व समुद्रकिनारा काबीज केला. मुंबई बेट मात्र त्याजकडे नव्हतें. फत्तेखान यास विजापुर सरकाराकडून मदत झाली नाहीं. तथापि तो जंजिऱ्याचें संरक्षण करून होता. पुढें सन १६७० पर्यंत दरसाल जंजिरा काबीज करण्याचा शिवाजी प्रयत्न करी, परंतु तो हस्तगत झाला नाहीं. हा किल्ला इतका मजबूद होता कीं, मुंबईच्या इंग्रज व्यापाऱ्यांस सुद्धां मुंबई सोडून, जंजिऱ्यास आपलें ठाणें

करावें असें पुष्कळ दिवस वाटत होतें. सन १६७० त शिवाजीनें जेरीस आणिल्यामुळें, फत्तेखान सीदीचा निरुपाय होऊन तो जंजिरा किल्ला शिवाजीच्या स्वाधीन करण्यास कबूल झाला. त्या वेळेस संबूळ, कासम, व खैर्यत हे तीन सीदी सरदार फत्तेखानाच्या हाताखालीं असून शिवाजीचे कट्टे वैरी होते. त्यांस फत्तेखानाचा बेत न आवडून, त्यांनीं त्यास कैद केलें. तेव्हां सीदी संबूळ हा जंजिऱ्याचा अधिकारी झाला. आदिलशहाकडे त्यानें मागितलेली मदत मिळाली नाहीं, तेव्हां औरंगजेबाचा दक्षिणेंतील सुभेदार खानजहान याजकडे संधान बांधून त्यानें आदिलशहास सोडून मोगलांचें स्वामित्व पत्करिलें. सन १६७० पासून पुढें सीदी मोगलांच्या तर्फे मराठ्यांशीं लढूं लागले व ह्या कामीं सुरतच्या मोगल सुभ्याचें सीदीस पाठबळ मिळूं लागलें. औरंगजेबानें सीदीस आपल्या पदरीं घेऊन त्याचा वजीर हा किताब काढून 'याकुतखान' हा नवीन किताब त्यास दिला, आणि त्यास सुरतच्या उत्पन्नांतून तीन लाखांची नेमणूक करून दिली. तेव्हांपासून संबूळ हा मोगलांच्या एकंदर आरमाराचा मुख्य झाला, आणि सीदी कासम हा जंजिरा येथें व सीदी खैर्यत राजपुरी येथें असे दोन सरदार त्याचे दुय्यम झाले. सन १६७७ त संबूळ मरण पावल्यावर कासम मोगल आरमाराचा अधिपति झाला, आणि खैर्यत जंजिऱ्याचा मुख्य झाला.

जंजिरा काबीज करण्याची शिवाजीची भारी इच्छा होती. सीदीनें मोगल सुभेदार खानजहानबहादूर याजकडून पुष्कळ मदत आणविली आणि शिवाजीशीं जोरानें युद्ध चालविलें. राजपुरी बंदर शिवाजीच्या ताब्यांत होतें व जंजिराबेट सीदीच्या कबजांत होतें. एके दिवशीं बंदरांतील जहाजांवर हल्ला करून सीदीनें दोनशें खलाशी पकडिले आणि गळ्यांत धोंडे बांधून त्यांस समुद्रांत बुडविलें. त्या दिवसापासून शिवाजी अतिशयच चिडून गेला. त्यानें पन्नास नवीन गलबतें बांधविलीं आणि सीदीशीं लढाई चालविली. युद्ध चालू असतां सीदी संबूळ मरण पावला आणि सीदी याकूत आरमाराचा अधिकारी झाला. याकूतनें पुष्कळ मराठ्यांस पकडून ठार मारिलें आणि कित्येकांस कैद करून सुरतेस पाठविलें. ( Mod. Review. )

मोगलांचा आश्रय सीदीनें केल्यामुळें शिवाजीचें युद्ध ज्यास्तच जोरांत आलें. शिवाजीनें आपलें आरमार पुष्कळ वाढविलें. उभयतांचे अनेक युद्धप्रसंग झाले, त्यांत सीदीस यश आलें असें मुसलमान इतिहासकार लिहितात. सन १६७१च्या होळीच्या दिवसांत सीदी कासम व खैर्यत यांनीं दंडाराजपुरी येथील शिवाजीच्या ठाण्यावर रात्रीं गुप्तपणें हल्ला केला आणि दारूगोळ्याचे कोठारास आग लाविली. त्या वेळीं जो धडाक्याचा आवाज झाला, तो शिवाजीस चाळीस मैलांवर रायगड येथें ऐकूं आला. त्याबरोबर राजपुरीस कांहीं तरी अपघात आहे असें म्हणत शिवाजी दचकून झोपेंतून जागा झाला. पुढें बातमी आली तों खरेंच. राजपुरी व दुसरीं कांहीं ठिकाणें सीदीनें घेतलीं; आणि बायकापोरांस गुलाम करून पुरुषांस ठार मारिलें. या कामगिरीबद्दल सीदी सरदारांस मोगलांकडून शाबासकी मिळाली ह्यांत नवल नाहीं. ह्या वेळीं औरंगजेबाबरोबर मराठ्यांचें पहिलें युद्ध सुरू होतें. तथापि शिवाजीची उमेद खचली नाहीं. त्यानें आपलें आरमार वाढविलें. सीदी यांनीं मुंबईच्या इंग्रजांस आपणाकडे वळविण्याचे पुष्कळ प्रयत्न केले, पण शिवाजीच्या धाकास्तव इंग्रज तटस्थ राहिले.

मुंबई बंदराचे पूर्व कांठावरील पेण पनवेलच्या पश्चिमचा उरण वगैरे प्रदेश फार सुपीक असून तो शिवाजीचे ताब्यांत होता. ह्या प्रदेशास कुर्ला असें म्हणत; व त्यांतून मुंबईचे इंग्रजांस पुष्कळ सामानसुमानाचा पुरवठा होई. हा कुर्ला दरसाल उद्ध्वस्त करून सीदी हा इंग्रजांस व शिवाजीस उपद्रव देत असे. म्हणून सीदीचा मोड करण्यासाठींच इंग्रजांशीं तह करून व त्यांचें नुकसान भरून देऊन, त्यांजशीं सख्य करण्यास शिवाजी तयार झाला. सन १६७३ त सीदीनें कुर्ला येथील मराठ्यांचे मुलखास पुष्कळ उपद्रव केला. कुर्ल्यांतील व्यापार फायदेशीर असल्यामुळें त्या प्रांतांत सीदीनें उपद्रव दिलेला इंग्रजास फार बाधक होई. त्यांनीं सीदीस मुंबई बंदरांत येऊं देऊं नये, अशी शिवाजीची इंग्रजांस ताकीद असे. सन १६७४ त शिवाजीनें आपलें आरमार वाढविलें, व दुसरी फौजही रायगडाहून एकदम सीदीवर आणिली. तेव्हां मराठ्यांनीं सीदीचे शेंकडो लोक कापून काढिले, आणि जंजिऱ्यापासून गोव्यापर्यंतचा सर्व किनारा काबीज केला. राजपुरी बंदर सीदीनें घेतलें होतें, तें फिरून मराठ्यांचे ताब्यांत आलें. सीदी हा दरसाल मुंबईच्या बंदरांत न विचारतां येऊन उतरे, तें

इंग्रजांस खपत नसे. सन १६७४ त शिवाजीनें सीदीचा पाडाव करून त्यास सुरतेपर्यंत हाकलून दिलें. हें वर्तमान ऐकून औरंगजेबास राग आला; आणि त्यानें सीदीस ज्यास्त मदत देऊन पुनः शिवाजीचे मुलखांत पाठविलें. तो एकदम वेंगुर्ल्यास आला, परंतु विजयदुर्ग व राजापुर येथील शिवाजीच्या आरमारानें त्यास हाकलून परत लाविलें, (ऑक्टोबर १६७६). इकडे शिवाजीचा पेशवा मोरोपंत यानें जंजिऱ्यास वेढा घातला, परंतु सीदीस ज्यास्त मदत आल्यामुळें जंजिरा मराठ्यांचे ताब्यांत आला नाहीं. सन १६७७ त सीदी संबूळ यानें कित्येक ब्राह्मण पकडून अटकेंत ठेविले. ब्राह्मणांच्या ह्या कागाळ्या शिवाजी तावडतोब मनावर घेऊन बंदोबस्त करी. कारण गोब्राह्मणप्रतिपालन हें शिवाजीच्या राज्याचें ब्रीद असून त्याचा सीदीकडून हा उघड अपमान झालेला शिवाजी कसा सहन करील ?

**खांदेरी व कुलाबा.** ‘ फिरंगी फार प्रबळ झाले असें पाहून छत्रपतींनीं चांगलीशी खडकाळ जागा समुद्रामध्यें पाहून तेथें किल्ला बांधावयास आरंभ केला. शके १६०० भाद्रपदमासीं गौरीचे मुळावर सन तिस्सा सब्राईन व अलफ या सालीं किल्ला बांधून त्यास लढाईचे फार उपयोगी असल्याकारणानें खांदेरी असें नांव ठेविलें. खेसगड, मांडवेगड, खांदेरी व सागरगड या किल्ल्यांवर फौज ठेविली. समुद्रांमध्यें गलबतें व आरमार ठेवून फिरंगी लोकांबरोबर लढाया केल्या. परंपरेनें लढाई होऊन प्राप्तव्य कांहीं नाहीं. ते समयीं हबशी राजपुरीहून फौज घेऊन खांदेरीनजीक खडक होता, तेथें शके १६०१ सन समानीन व अलफ वैशाखमासीं किल्ला बांधावयास आरंभ केला, व त्याला उंदेरी असें नांव ठेविलें. हबशी यानें उंदेरी किल्ल्यावर फौज ठेविली; तेथून रात्रीं कुलाबा प्रांतांत उतरून गांवें मारावीं, घरें लुटावीं व माणसें जिवें घ्यावीं, ह्याप्रमाणें क्रम ठेविला. फिरंगी यांनीं रेवदंडा येथें रयतेस धरून नेऊन ठेवावें, देवळें व मशिदी मोडून टाकाव्या. शिवाजी राजानें तह करण्याविषयीं बहुत प्रयत्न केला; परंतु तह होईना. देशास फार उपद्रव झाला. किल्लेकोट असतां प्रांताचा बंदोबस्त होईना. अलीबागेजवळ नऊघर येथें समुद्रकिनाऱ्याजवळ खडक होता, तेथें शके १६०२ सन इहिदे समानीन सालीं किल्ला बांधून जंजिरे कुलाबा असें नांव ठेविलें.’ ( खं० ३ ले० ५६८ ).

रॉबर्ट ऑर्म् यानें सीदी, इंग्रज व पोर्तुगीझ इत्यादि दर्यावर्दी लोकांशीं मराठ्यांचें झगडे झाले, त्यांची सविस्तर हकीकत दिली आहे. तो म्हणतो, सन १६७५ त शिवाजीचे आरमारांत लहान मोठीं सत्तावन जहाजें होतीं. त्यांपैकीं पंधरा ग्रॅब्स् व बाकीचीं गलबतें होतीं. सीदीचा डोळा कुल्यांवर होता. सन १६७८चे पावसाळ्यांत सीदीनें मुंबईचे माजगांव बंदरांत येऊन आपलें ठाणें दिलें. ही गोष्ट शिवाजी व इंग्रज यांचे स्नेहास बाधक होती. परंतु सुरतचे मोगल सुभेदारानें मुंबईचे इंग्रज प्रेसिडेंटाची परवानगी घेऊन सीदीस माजगांवांत राहूं दिलें. या वेळीं सीदीनें शिवाजीचे मुलखांत कल्लोळ उसळून दिला. त्यावरून सीदीचें आरमार जाळून टाकण्याचे उद्देशानें शिवाजीच्या आरमाराचे दोन सरदार दर्यासारंग व दौलतखान हे जुलै महिन्यांत ४००० लोकांनिशीं पनवेल येथें आले. परंतु पावसाळ्यामुळें त्यांचा इलाज चालला नाहीं. तेव्हां उत्तर दिशेनें सीदीवर हल्ला करण्यासाठीं दौलतखान कल्याणास गेला. कल्याणाहून माजगांवास येण्याचा रस्ता पोर्तुगीज लोकांचे हद्दींतून होता. ह्या मराठ्यांच्या फौजेची इंग्रज व पोर्तुगीज ह्या दोघांसही धास्ती पडली. वसई व साष्टी येथील लोकांनीं दौलतखानास पुढें येऊं दिलें नाहीं, तेव्हां दौलतखान सुरतच्या आजूबाजूची लूट जमवून परत रायगडास गेला. इंग्रजांनीं सीदीस मुंबईस आश्रय दिला, हें शिवाजीस सहन झालें नाहीं. इकडे त्यानें जंजिऱ्यावर फौज पाठविली असतां, सीदी कासम हा मुंबई बंदर सोडून परत आला नाहीं. ह्या वेळीं शिवाजी आपल्या आरमारांत विशेष भरती करीत होता. आरमाराचा झगडा मागेंपुढें निकराचा झाल्याशिवाय राहणार नाहीं हें तो जाणून होता. ( ऑर्म् पृष्ठ ७७ ). पश्चिम किनाऱ्यावरील व्यापार अत्यंत महत्त्वाचा होता, परंतु आपल्या लोकांचीं जहाजें युरोपियन लोकांच्या तोडीचीं नव्हतीं. शत्रु आला असतां झटकन पळून जाणें त्यांस चांगलें साधे; पण भरसमुद्रांत युरोपियन जहाजांशीं टक्कर देण्यास तीं समर्थ नव्हतीं. आरमाराची जंगी तयारी करून सीदीचा पाडाव करण्याचा शिवाजीचा प्रयत्न चालू असतांच तो मरण पावला. सीदी व जंजिरा हे शब्द मरणसमयीं त्याच्या जिव्हाग्रीं होते.

**८. शिवाजीचें आरमार.**—सीदीचा पाडाव करण्यांत शिवाजीच्या आरमाराची उत्पत्ति कशी झाली, हें मागील प्रकरणांत सांगितलें आहे.

सन १६६१ त लढाऊ जहाजें तयार करण्याची जरूर शिवाजीस भासली. सन १६४८ चे नंतर कल्याणपासून राजापुरपर्यंतची कोंकणपटी त्याचे ताब्यांत आली, तेव्हां शिवाजीस असें आढळून आलें कीं, विजापुरचे सुलतान या प्रांतावर आपला हक्क सांगत होतेच, पण त्याशिवाय जव्हारचे कोळी, जंजिऱ्याचे सीदी, वाडीचे सावंत, तसेंच पोर्तुगीज, डच व प्रसंगानुसार फ्रेंच व इंग्रज या सर्वांचे थोडे बहुत हक्क या किनाऱ्यावर उपस्थित झाले होते. ह्या सर्वांस त्यानें हळू हळू जेर केलें. सीदीच्या ताब्यांतील बहुतेक प्रांत त्यानें काबीज केला, आणि सन १६६१त राजपुरी खाडींतील जंजिरा बेट एवढा एकच किल्ला सीदीकडे राहिला. तो आरमाराशिवाय काबीज होत नाहीं, असें आढळून येतांच त्यानें आरमार बांधण्यास सुरुवात केली. राजापुर, बार्सिलोर, सुरत, चिपळूण इत्यादि ठिकाणीं स्वाऱ्या करण्याचा शिवाजीचा हेतु तेथें आरमार स्थापन करावें हा होता. व्यापाराच्या कमाईवर हीं शहरें धनाढ्य झालीं होतीं, हें शिवाजीस कळून चुकलें; आणि राजापुर, सुरत वगैरे ठिकाणीं मिळविलेली लूट त्यानें आरमार स्थापन करण्यांत खर्चिली. म्हणजे लोकांचा पैसा त्यानें लोकांच्याच कामीं लाविला. पांच सात वर्षांत मोठें बलाढ्य आरमार तयार झालें. कोळी व भंडारी हे उत्कृष्ट खलाशी त्याच्या आरमारावर होते; आणि गलबतें बांधण्याचे कारखानेही त्यानें ठिकठिकाणीं स्थापन केले. विजयदुर्ग, कुलाबा, सिंधुदुर्ग (मालवण) रत्नागिरी, अंजनवेल याठिकाणीं त्याच्या गोद्या असून तेथें मोठमोठीं जहाजें बांधण्यांत येत असत. (Radha kumud Mukerji). 'जंजिरा पाण्यांत किल्ला, जेर न होय, असाध्य, तो आपणांस यावा, समुद्रांत सत्ता करावी, म्हणून बहुत चित्तांत हेतु धरून, आरमार करावें असा बेत करून, जहाजें नवीन तयार महाराजांनीं करविलीं. त्यांचीं नांवें:—गुराव, तरांडी, गलबतें, दुबारें, शिबाडें, पगार, मचवे, बाथोर, तिरकटी पाल अशा जातींचीं चार पांचशें तयार करविलीं. दहा पांच लक्ष रुपये खर्च केला. त्यांजवर सरदार दर्यासारंग व मायनाक भंडारी यांसी सुभेदारी देऊन तोफा वगैरे सामान दर्यावर्दी केलें. लढाऊ कोळी व खलाशी ठेविले. सावकारी महाल जहाजें लुटून, हरजिनसी दर्यांतील पैदास्त करून महाराजांस आणून देऊं लागले. समुद्रांत सत्ता बसविली. दर्याकिनारीं जागां जागां शहरें मारूं

लागले. बेटें चांगलीं पाहून किल्ले बांधिले.' जमिनीच्या बाजूनें हबशास सामान मिळण्याची बंदी झालीच होती. आरमाराचे योगानें समुद्रांतूनही सामान त्यास न मिळे असा बंदोबस्त करण्यांत आला.

आरमार तयार झाल्यावर समुद्रकिनाऱ्यावरील बंदरें शिवाजीनें हळू हळू काबीज केलीं. सन १६६२ त वाडीकर सावंताचा पाडाव करून त्यांजकडील आरमारी योद्धे शिवाजीनें आपल्या आरमारावर घेतले. मालवणचा सिंधुदुर्ग किल्ला सन १६६५ त बांधून तेथें आरमाराचें मुख्य ठाणें केलें. कुलाबा येथेंही त्याचें आरमार होतें. त्यापूर्वीच विजयदुर्गचा किल्ला बांधून तयार झाला होता. शके १६७५ विजयनाम संवत्सरे, या सालीं तो किल्ला बांधिला, म्हणून त्यास विजयदुर्ग असें नांव ठेविलें. ( भा. इ. सं. मं. १८३४ ). ह्या आरमारी किल्ल्यांची व्यवस्था शिवाजीनें बांधून दिली, तीच पुढें पुष्कळ दिवस चालू होती. पोर्तुगीज अधिकाऱ्यांनीं शिवाजीकडे वकील पाठवून आणि तोफा व जवाहीर नजर करून, पश्चिमकिनाऱ्यावर व्यापार करण्याची परवानगी मिळविली; आणि तह ठरवून त्यांत त्या व्यापाराचे करार ठरविले. सन १६६५ त शिवाजीनें स्वत: जहाजावरून पश्चिमकिनाऱ्यावर स्वारी केली, तेव्हां कारवारच्या इंग्रज व्यापाऱ्यांनीं त्यास ११२० रुपये दंड देऊन आपली वखार बंद केली. ह्या सफरींत शिवाजीबरोबर तीसपासून दीडशें टन वजनाचीं व एका डोलकाठीचीं ८५ लहान जहाजें, व तीन डोलकाठ्यांचीं तीन मोठीं गलबतें होतीं, असें कारवारच्या इंग्रज व्यापाऱ्यांनीं लिहिलें आहे. गोव्याच्या खालीं १३० मैलांवर बार्सिलोर म्हणून प्रख्यात बंदर होतें, त्याजवर स्वारी करून शिवाजीनें पुष्कळ लूट आणिली. त्याच्या दाक्षिणेस शिवाजी गेला नाही. सन १६७० त शिवाजीच्या आरमारांत १६० जहाजें होतीं. त्याच वर्षी पोर्तुगीज जहाजांची व शिवाजीच्या आरमाराची लढाई होऊन शिवाजीचीं बारा लहान गलबतें पोर्तुगीजांनीं हस्तगत केलीं. परंतु लगेच दमणजवळ मराठ्यांनीं पोर्तुगीजांचा पराभव करून त्यांचें एक मोठें जहाज दाभोळ बंदरांत पकडून आणिलें. राज्याभिषेकाच्या वेळीं शिवाजीचें आरमार बरेंच प्रचंड होऊन युद्धसामुग्रीचा संग्रहही चांगला झाला होता. त्याचा उपयोग शिवाजीस तर झालाच, पण पुढें संभाजीनें या आरमाराच्या मदतीनें पुष्कळ विजय

संपादन केले. आरंभीं शिवाजीच्या आरमारांत मोठीं लढाऊ जहाजें तीन होतीं, तीं त्याच्या कारकीर्दीच्या अखेरीस साठांच्या वर गेलीं, असा उल्लेख आहे. आरमारखात्यांत एकंदर लोक पांच हजार होते. शिवाजीच्या वेळेस आरमाराचा स्वतंत्र सुभा नव्हता, तो पुढें पेशव्यांनीं केला. ठिकठिकाणच्या बंदरीं किल्ल्याकडेच आरमाराची व्यवस्था सोंपविली होती. दर्यासारंग, इब्राहीमखान, मायनाक भंडारी व दौलतखान हीं आरमारावरील सरदारांचीं नांवें आढळतात, परंतु प्रसंगानुसार लष्करचे कामगारही आरमारावर पाठविण्यांत येत असत. मोरोपंत पिंगळे, नेताजी पालकर, रघुनाथ बल्लाळ यांनीं आरमारी युद्धांत पुढाकार घेतलेला आहे. भिवजी गुजर व कान्होजी आंगरे हे शिवाजीच्या आरमारांत नोकरी करून पुढें प्रसिद्धीस आले. ता. १८ जानेवारी सन १६७५ चें एक पत्र छापलेलें आहे, त्यावरून आरमारसंबंधीं शिवाजीची दक्षता व्यक्त होते. तें पत्र असें:–( खंड ८. ३१ ),

"राजश्री शिवाजी विनायक सुभेदार व कारकून सुभे मामले प्रभावळी. प्रती राजश्री शिवाजी राजे दंडवत. दौलतखान व दरिया सारंग यांसी ऐवज व गल्ला राजश्री मोरोपंत पेशवे यांणी वराता सुभे मजकुरावरी दिधल्या. त्यास तुम्हीं कांहीं पावविलें नाहीं, म्हणोन कळों आलें. त्यावरून अजब वाटलें कीं ऐसे नादान थोडे असतील ! तुम्हांस समजलें कीं याला ऐवज कोठें तरी ऐवज खजाना रसद पाठविलिया मजरा होईल म्हणत असाल. तरी पद्मदुर्ग वसवून राजपुरीच्या उरावरी दुसरी राजपुरी केली आहे. त्याची मदत व्हावी, पाणी फाटी आदिकरून सामान पावावें, या कामास आरमार बेगीनें पावावें, तें नाहीं. पद्मदुर्ग हबशी फौजा चौफेर जेर करीत असतील; आणि तुम्ही ऐवज न पाववून, आरमार खोळंबून पाडाल ! एवढी हरामखोरी तुम्ही कराल; आणि रसद पाठवून मजरा करूं म्हणाल, त्यावरी साहेब रिझतील कीं काय ? हे गोष्ट घडायाची तऱ्ही होय न कळे कीं हबशियांनीं कांहीं देऊन आपले चाकर तुम्हांला केले असतील ! त्याकरितां ऐसी बुद्धि केली असेल ! तरी ऐशा चाकरांस ठीकेठीक केले पाहिजेत ! ब्राह्मण म्हणून कोण मुलाहिजा करूं पाहतो ? या उपरि तऱ्ही त्यांला ऐवज गल्ला राजश्री मोरोपंतांनीं देविला असेल तो देवितील. तो खजाना रसद पावलियाहून अधिक जाणून तेणें प्रमाणें आदा करणें कीं ते

तुमची फिर्याद न करीत व त्यांचे पोटास पावोन आरमार घेऊन पद्मदुर्गाचे मदतीस राहात तें करणें. याउपरी बोभाट आलियाउपरि तुमचा मुलाहिजा करणार नाहीं. गनीमाचे चाकर, गनीम जालेस, ऐसें जाणून बरा नतीजा तुम्हास पावेल. ताकीद असे. रवाना छ २ जिल्काद.'

एकादें गलबत वादळांत फुटून किनाऱ्यावर लागल्यास त्यावरील माल शिवाजी लगेच हस्तगत करून घेत असे. असें एक गलबत सन १६६४ त फुटून किनाऱ्यास लागलें. त्याजवर पुष्कळ व्यापारी माल होता. ते व्यापारी मुसलमान होते. त्यांचा सर्व माल शिवाजीनें घेतला आणि दंड घेऊन त्यांस सोडून दिलें.

९. शिवाजीची इंग्रजांस दहशत.*—इंग्रजांच्या उदयाची हकीकत ब्रिटिश रियासतींत विस्तारानें दिली आहे. येथें फक्त शिवाजीचा व त्यांचा कितीसा व्यवहार घडला हें सांगणें जरूर आहे. सन १६१२ त सुरतची वखार स्थापन झाल्यापासून इंग्रजांच्या व्यापारावर अनेक प्रकारचीं संकटें आलीं. त्यांतून ते निभावतात तोंच शिवाजीशीं त्यांची गांठ पडली. प्रथमत: सन १६६१ त राजापुरच्या बंदरांत दोघांचा सामना घडला. खेळण्याच्या खिंडींत विजापुरच्या फौजेचा पराभव केल्यावर शिवाजी राजापुरास गेला. राजापुर येथें इंग्रजांची लहानशी वखार होती. पन्हाळ्यास वेढा घालणाऱ्या विजापुरच्या फौजेस इंग्रजांनीं दारुगोळा पुरविला असा शिवाजीस वहीम होता, आणि तो वहीम येण्यास कारणही झालें होतें. याबद्दल इंग्रजांचें पारिपत्य करण्याचा शिवाजीचा विचार होता. शहरांतून पैसा वसूल केल्यावर त्यानें इंग्रजांची वखार लुटली, आणि तेथील व्यापाऱ्यांस पकडून दोन वर्षेपर्यंत एका डोंगरी किल्ल्यावर अडकवून ठेविलें. तेथून दंड भरल्यावर त्यांची सुटका झाली. राजापुरच्या लुटींत सुमारें दहा हजार पॅगोडांचें† इंग्रजांचें नुकसान झालें. त्यामुळें त्यांनीं राजापुरची वखार पुढें बंद केली.

---

*Anderson's English in Western India, Lowe's History of the Indian Navy, Orme &c. &c.

† पॅगोडा.—आपलेकडे होन म्हणून नाणें होतें, त्यासच इंग्रज लोक पॅगोडा म्हणत. त्याची किंमत सुमारें साडेतीन रुपये असून वजन $\frac{७}{२०}$ तोळ्याइतकें होतें. यावरून त्या वेळच्या सोन्याचा भाव १०–११ रुपये तोळा इतका होता असें दिसतें. पॅगोडा हा शब्द इंग्रजांच्या लेखांत वारंवार येतो.

राजापुरास इंग्रजांची वखार शिवाजीनें लुटली, असें इंग्रज ग्रंथकार लिहितात. पण शिवाजीनें ही गोष्ट कबूल केलेली नाहीं, ह्यावरून खरा प्रकार काय तें समजण्यास साधन नाही.

सुरतच्या इंग्रज व्यापाऱ्यांस शिवाजीची दहशत फारच बसली होती. ते डोळ्यांत तेल घालून त्याच्या हालचालींकडे लक्ष देत असत जेथें पाहवें तेथें शिवाजी आहेच; कसाही प्रसंग आला तरी त्याला तो तयारच,' अशा प्रकारचे उद्गार इंग्रजांच्या तोंडीं सर्वदा असत. सन १६६४, जानुआरी तारीख ५ रोजीं तो सुरतेस आला. सुरतच्या मोगल सुभेदारानें शहर संरक्षणाचा प्रयत्न केला नाहीं; आपण मात्र किल्ल्यांत दारें लावून राहिला. शहराच्या लुटींत शिवाजीच्या लोकांनीं स्मिथ नांवाच्या एका गृहस्थास पकडून शिवाजीकडे नेलें. शिवाजी तंबूंत बसून आपलें गुप्त धन न दाखविणाऱ्या लोकांस, कोणाचें डोकें उडविणें, कोणाचे हात तोडणें, इत्यादि शिक्षा करीत होता, असें त्या स्मिथसाहेबानें पुढें सांगितलें. डच व इंग्रज व्यापारी शिवाजीशीं पुष्कळ भांडले. इंग्रज व्यापाऱ्यांनीं तर शिवाजीशीं वाद करून स्वतःचा बचाव केला इतकेंच नाहीं, तर दुसऱ्या पुष्कळांस जाचांतून सोडविलें. सारांश उभयतांमध्यें लढाई वगैरे कांहीं झाली नाही, आणि शिवाजी इंग्रजांच्या वाटेस गेला नाहीं. सर हेन्री ऑक्झेंडन हा त्या वेळेस सुरत येथील इंग्रज वखारींचा प्रेसिडेंट होता. त्यानें सुरतच्या कित्येक लोकांस शिवाजीच्या हातून सोडविलें, म्हणून औरंगजेब बादशहानें त्यास बहुमानाचा पोशाख पाठविला.

सन १६६५ च्या फेब्रुआरी महिन्यांत शिवाजीनें कारवार शहरावर हल्ला केला. तेथेंही इंग्रजांची लहानशी वखार होती. कारवारची मजबुदी चांगली असल्यामुळें एकंदर शहरांतून ठरीव खंडणी घेऊन, शिवाजी परत गेला. त्या वेळीं इंग्रज व्यापाऱ्यांस त्या खंडणीपैकीं ११२ पौंड अथवा ११२० रुपये द्यावे लागले.

सन १६७० त ऑक्टोबर ता. ३ रोजीं शिवाजी पंधरा हजार लोकांनिशीं पुनः सुरतेवर आला. इंग्रजांच्या वखारी सर्वच एक ठिकाणीं नव्हत्या. त्या तुटक होत्या, त्या शिवाजीच्या तडाख्यांत आल्या. कांहीं इंग्रज लोक पडले, व बरीच मालमत्ता शिवाजीच्या हातीं आली. तरी इंग्रजांनीं आपल्या गोटाचा बंदोबस्त नेटानें केला. शिवाजीशीं इंग्रज प्रत्यक्ष लढले

असा उल्लेख प्रेसिडेंटानें कोर्ट आफ् डायरेक्टरांस पाठविलेल्या पत्रांत नाहीं. सुरतच्या खालीं किनाऱ्यावर सुवाळी येथें इंग्रजांचीं जहाजें असत. तेथून कांहीं इंग्रज खलाशी सुरतेस आले, आणि त्यांनीं वखारींचें संरक्षण शौर्यानें केलें. डच लोकांच्या वखारी एका कोपऱ्यांत होत्या, त्यांजकडे शिवाजीची दृष्टि गेली नाहीं. फ्रेंचांच्याही वखारी सुरतेस होत्या, त्यांजवर शिवाजी आला, तेव्हां फ्रेंच व्यापाऱ्यांनीं नम्रतेनें वागून आपला बचाव करून घेतला. कारस्कारचा एक तार्तार सुलतान मुलानें पदच्युत केल्या-मुळें मक्केची यात्रा करून सुरतेस औरंगजेबाच्या आश्रयास येऊन राहिला होता. त्याच्यापाशीं पुष्कळ संपत्ति आहे असें शिवाजीस कळलें. फ्रेंचांच्या वखारीवरून त्याच्या वाड्यास जाण्याचा रस्ता होता. फ्रेंचांनीं शिवा-जीस आपल्या जागेंतून बिनहरकत जाऊं दिलें. त्या लुटींत शिवाजीस सोनें, रुपें, जवाहिर वगैरे पुष्कळ द्रव्य प्राप्त झालें. फ्रेंचांनीं रस्ता दिल्या-मुळें त्यांच्या वाटेस शिवाजी गेला नाहीं. खंड ८ ले० ८ चें पत्र सन १६७१ त सुरतच्या फ्रेंच वखारींतील दुभाषा तापिदास यानें शिवाजीस लिहिलेलें आहे, त्यावरून फ्रेंचांचा व शिवाजीचा अत्यंत सलोखा होता असें दिसून येतें. सुरतच्या स्वारींत दोघांनींही एकमेकांशीं स्नेहाचें वर्तन केलें. फ्रेंचांस या दुष्कृत्याबद्दल इंग्रजांनीं अनेक दूषणें दिलीं आहेत.

हुबळीस इंग्रजांची वखार होती. सन १६७३ त शिवाजीनें हुबळी शहर लुटलें, तेव्हां ती वखारही लुटली. ह्या लुटींत ७८९४ पॅगोडा किंमतीचें इंग्रजांचें नुकसान झालें. तें त्यांनीं पुढें शिवाजीपासून भरून मागितलें. परंतु शिवाजीनें साफ जबाब दिला, कीं 'माझ्या लोकांनीं इंग्रजांच्या वखारीस मुळींच उपद्रव दिला नाहीं, म्हणून नुकसानीचा प्रश्नच राहत नाहीं. कांहीं थोडें सामान त्यांनीं नेलें असेल, पण त्याची किंमत दोनशें रुपयांहून ज्यास्त नाहीं.'

ईस्ट इंडिया कंपनीनें मुंबई बेट ताब्यांत घेऊन,सुरतचें ठिकाण हळू हळू सोडून दिलें. मुंबईस त्यांना जी स्वतंत्र व्यवस्था करतां आली ती सुरतेस शक्य नव्हती. आरमाराच्या साह्यानें मुंबईस त्यांना स्वसंरक्षण चांगलें करतां येऊं लागलें, आणि सुरतेस मराठ्यांचा त्रास होत असे तो मुंबईस त्यांस झाला नाहीं. महाराष्ट्रांत व कोंकणच्या किनाऱ्यावर शिवाजीनें आपली सत्ता स्थापन केली, तेव्हां त्याजला मान देऊन खुष ठेवणें इंग्रजांस

प्राप्त झालें. त्यास धान्यसामुग्री व सरपण शिवाजीच्या मुलखांतून येत होतीं, म्हणून सुरतेस तो त्रास देत असतांच मुंबईचे इंग्रज व्यापारी त्याची मोठ्या आर्जवानें समजूत घालीत होते. सन १६७२ त कुलाबा जिल्ह्यांतील चोड-बंदरची पोर्तुगीझ वसाहत काबीज करण्याचा शिवाजीनें प्रयत्न केला, तेव्हां तर मुंबईचे इंग्रज अगदींच घाबरून गेले, आणि त्याची मर्जी संपादून स्नेहाचा तह करण्याकरितां मिस्टर उस्टिक यास त्यांनीं शिवाजीकडे पाठ-विलें. हा तह करण्यांत शिवाजीचाही फायदाच होता. कारण त्यांच्या व्यापारामुळें शिवाजीनें जिंकलेल्या प्रदेशाचें उत्पन्न वाढूं लागलें. इंग्रजांशीं सख्य झाल्यानें त्यांनीं मोगल फौजेस शिवाजीवर आपल्या हद्दींतून येऊं दिलें नसतें. म्हणून शिवाजी तह करण्यास कबूल झाला. उस्टिकनें पूर्वींच्या नुकसानीबद्दल म्हणून शिवाजीकडे ३२ हजार पॅगोडांची मागणी केली, ती मागणी त्यानें धुडकावून दिली. 'तुम्हीं राजापुरास आपली वखार घालावी आणि जंजिऱ्याचे सीदीचा पाडाव करण्यास आपणास मदत करावी, म्हणजे इतःपर तुमच्या वाटेस न जातां, तुमच्याशीं स्नेहसंबंध ठेवूं ' असें शिवाजीनें इंग्रज वकिलास सांगितलें. या दोनही अटी कबूल झाल्या नाहींत. दुसऱ्यांदा ने सन १६७३ त निकोल्स नामक वकील इंग्रजांकडून शिवा-जीकडे आला, त्यानें संभाजीमार्फत शिवाजीची भेट घेतली; परंतु त्याच्या भेटीपासून विशेष कांहीं घडून आलें नाहीं.

शिवाजीला सर्वत्र विजय प्राप्त होऊन त्याचीं कृत्यें सर्व मराठ्यांस आवडूं लागलीं, आणि त्यांच्या संमतीनें सन १६७४ त त्यानें राज्यपदाचा यथाविधि स्वीकार केला. त्या समारंभास सुरतच्या प्रेसिडेंटाचा मुलगा हेन्री ऑक्झेंडन, मुंबईचा डे. गव्हर्नर, हा हजर होता. ईस्ट इंडिया कंपनीच्या तर्फे दुसरे दोन इंग्रज व्यापारी बरोबर घेऊन तो त्या समारंभास रायगडावर गेला. त्या वेळीं साधल्यास शिवाजीशीं तह करण्याचाही आक्झेंडनचा विचार होता. या कामासाठीं हे कंपनीचे वकील सन १६७४ च्या एप्रिल महि-न्याच्या अखेरीस मुंबईहून जहाजांत बसून निघाले, ते प्रथम चौलास जाऊन दुसरे दिवशीं रोह्यास पोंचले. रोह्याहून पालखी करून ते निजाम-पुरास आले. पांचवे दिवशीं रायरी डोंगराच्या पायथ्याशीं पांचाड म्हणून गांव आहे तेथें त्यांनीं मुक्काम केला. शिवाजी प्रतापगडावर गुंतलेला अस-ल्यामुळें, पांचाड येथें त्यांस कांहीं दिवस काढावे लागले. नारायणजी

पंडित नांवाचा शिवाजीचा हुशार कामदार त्यांस पांचाड येथें भेटला. शिवाजीच्या उद्देशांची त्यानें इंग्रज वकिलांस चांगली माहिती करून दिली. जंजिऱ्याचे सीदीशीं शिवाजीनें तह करावा, आणि त्यास बुडविण्याचा प्रयत्न शिवाजीनें करूं नये, तसेंच आपणास व्यापाराच्या सवलती देऊन उभयतांचा फायदा करून घ्यावा, असें इंग्रज वकिलांचें मागणें होतें. नारायणजीनें वकिलांस असा सल्ला दिला, कीं 'सीदीविषयीं शिवाजीशीं बोलणें काढाल, तर तुमचा सर्वच बेत फसेल, सीदीचा समूळ उच्छेद करण्याचा शिवाजीचा विचार असून तो तुमच्या बोलण्यास मान देणार नाहीं, व्यापाराचें बोलणें तुमचें वाजवी आहे; आणि आपल्या राज्यांतील व्यापार वाढविण्याची शिवाजीचीही फार इच्छा आहे. आजपर्यंत धामधुमींत काळ गेल्यानें ह्या गोष्टींकडे लक्ष देण्यास शिवाजीस फुरसत मिळाली नाहीं; परंतु आतां राज्याभिषेक झाल्यावर राज्यव्यवस्थेचेंच काम तो हातीं घेणार आहे.' नारायणजीचा अधिकार व धूर्तता विशेष आहे, असें इंग्रज वकिलांस आढळून आलें, आणि त्यांनीं त्यास एक आंगठी नजर केली.

ता. १५ मेच्या सुमारास शिवाजी रायगडास परत आल्यावर इंग्रज वकील किल्ल्यावर गेले. वाड्यापासून एक मैलावर वकिलांस राहण्यासाठीं बंगला देण्यांत आला, तेथें ते कांहीं दिवस मोठ्या आनंदानें राहिले. शिवाजी त्या वेळीं फारच गडबडींत होता. तथापि वकील आल्यानंतर चार दिवसांनीं नारायणजीच्या मार्फत शिवाजीनें त्यांची भेट घेतली. व्यापारवृद्धीविषयीं इंग्रजांचें म्हणणें शिवाजीस फारच पसंत पडलें; आणि त्याजबद्दलची वाटाघाट करून तहाचीं कलमें ठरविण्याचें काम शिवाजीनें पेशवा मोरोपंत पिंगळे याजकडे सोंपविलें. पुढें शिवाजीस नजर करण्याकरितां ज्या जिनसा इंग्रज वकिलांनीं आणल्या होत्या, त्या कशा रीतीनें द्याव्या हें दोन दिवसांनीं त्यांनीं नारायणजीस भेटून ठरविलें आणि मोरोपंत पेशव्याच्या मार्फत त्या जिनसा शिवाजीस देण्यांत आल्या. तसेंच तेथील मोठमोठ्या सर्व अधिकाऱ्यांस कांहीं तरी वस्तु नजर करणें चांगलें असेंही नारायणजीनें त्यांस सांगितलें. त्याप्रमाणें त्यांनीं बहुतेकांस पोषाख वगैरे दिले. शेवटीं नारायणजीच्या मार्फत तहाविषयीं शिवाजीचा अभिप्राय इंग्रज वकिलास कळला. अभिषेकाच्या दिवशीं झालेल्या मोठ्या दरबारास

इंग्रजांचा वकील गेला होता. त्या दरबाराचें वर्णन त्यानें लिहून ठेविलें आहे. अभिषेकानंतर कांहीं दिवसांनीं तह ठरून त्याजवर सर्व अधिकाऱ्यांच्या सह्या वगैरे झाल्यावर इंग्रज वकील परत निघाले, ते त्या वर्षाच्या नारळी पौर्णिमेच्या सुमारास मुंबईस पोंचले.

शिवाजी व इंग्रज यांजमध्यें झालेल्या तहांत वीस कलमें एकमेकांच्या सह्या होऊन कायम झालीं. राजापुरांतील लुटीच्या नुकसानीबद्दल दहा हजार होन कंपनीस देण्याचें शिवाजीनें कबूल केलें. परंतु ही रक्कम एकदम रोख द्यावयाची नव्हती. तीन वर्षेंपर्यंत दरसाल पांच हजार पॅगोडा किंमतीचा माल शिवाजीपासून इंग्रजांनीं विकत घ्यावा. त्याची निम्मी किंमत म्हणजे अडीच हजार रोख देऊन बाकीचे वरील नुकसानींत वजा करावे. याप्रमाणें तीन वर्षांत साडेसात हजारांची फेड होऊन अडीच हजार देणें राहतील ते राजापुरच्या वखारीवरील जकात माफ करून फेडावे असें ठरलें. सारांश, रकमेची फेड व्हावयास पाहिजे तर इंग्रजांस राजापुरास वखार उघडणें भाग पडलें. शिवाय दाभोळ, चौल, कल्याण या ठिकाणीं इंग्रजांनीं वखारी घालाव्या. मराठ्यांचे राज्यांत पाहिजे त्या ठिकाणीं इंग्रजांनीं व्यापार करावा; आपल्या मालाच्या विक्रीची किंमत मर्जीस येईल ती त्यांनीं ठेवावी; सरकार त्यांत हात घालणार नाहीं. इंग्रज जो माल देशांत आणतील, त्याच्या किंमतीवर शेंकडा अडीच टक्क्यांहून जास्त जकात शिवाजीनें घेऊं नये; कंपनीचें गलबत फुटून, मराठ्यांचे किनाऱ्यावर जो माल लागेल, तो सर्व शिवाजीनें कंपनीस परत करावा, अशीं आणखी कित्येक कलमें होतीं. माल परत करण्याचें शेवटचें कलम शिवाजीनें सर्वस्वी कबूल केलें नाहीं. गलबत फुटून किनाऱ्यावर जे कंपनीचे लोक लागतील, त्यांचें संरक्षण करण्याचें शिवाजीनें एकदम कबूल केलें; पण माल परत करणें हें शिवाजीच्या सार्वभौम हक्कास बाधक आहे, असें शिवाजीनें सांगितलें. ह्याप्रमाणें सर्व अडचणी दूर होऊन राजापुरची वखार सुरू झाली; पण ती सुरळीत चालली नाहीं.

वरील तहांतील कलमांची यादी ( खं. ८–२९ ) यांत दिली आहे, तींत इंग्रजांच्या चार मागण्या दाखल असून त्यांतून दोन शिवाजीनें मंजूर केल्या असें आहे. त्या चार मागण्या अशा:–(१) महाराजांच्या राज्यांत इंग्रजांचा या पार चालावा. ( २ ) व्यापारी मालावर इंग्रजांस जकात माफ असावी.

( ३ ) इंग्रजी शिक्क्याचे मोहरा, रुपये व पैसे महाराज्यांचे राज्यांत चालावे. ( ४ ) जहाजें फुटून किनाऱ्यास लागलेला इंग्रजांचा माल त्यांस परत द्यावा. यां पैकीं पहिलीं दोन कलमें शिवाजीनें मंजूर केलीं, व शेवटचीं दोन नामंजूर केलीं.

पश्चिम किनाऱ्यावर इंग्रज अगदीं स्वस्थ न बसतां होईल तितकी आपली बळकटी करीत चालले होते. जंजिऱ्याचे सीदीशीं त्यांचे व्यवहार चालूं लागले. शिवाजीच्या मुलखावर स्वारी करण्यासाठीं मुंबईच्या बंदरांत आपलें आरमार ठेवण्याची परवानगी सीदी इंग्रजांपाशीं वारंवार मागत, परंतु इंग्रजांस शिवाजीची भीति असल्यामुळें त्यांच्यानें सीदीस उघड आश्रय देववत नसे. आश्रय न द्यावा तर दुसरीकडून मोगल बादशहाची भीति इंग्रजांस होती. सन १६७७ त सीदी संबूळ हा दांडगाईनें मुंबई बंदरांत वरवा करून तेथून शिवाजीच्या कुर्ला वगैरेकडील मुलुखास उपद्रव देऊं लागला. त्यानें एका ब्राह्मणास वश करून त्याजला गलबतें व पैसे देऊन शिवाजीचे प्रदेशांतील कित्येक प्रमुख ब्राह्मणांस फुसलावून आणण्यासाठीं पाठविलें. पकडून आणिलेल्या ब्राह्मणांचे सीदीनें नानातऱ्हेचे हाल केले. हें शिवाजीस समजतांच त्यानें सीदीस आश्रय दिल्याबद्दल इंग्रजांस अशी कांहीं जबरदस्त तंबी दिली, कीं लगेच कंपनीच्या प्रेसिडेंटानें शिवाजीच्या मुलखास उपद्रव देणाऱ्या अकरा इसमांस पकडून तिघांस देहान्त शिक्षा दिली; आणि बाकच्यांस गुलाम करून आफ्रिकेच्या पश्चिम किनाऱ्यावर सेन्ट हेलेना येथें पाठविलें. दुसऱ्या वर्षी पुन: असाच प्रकार होऊन सीदीनें अनेक ब्राह्मणांचा छळ केला. शिवाजीस ब्राह्मण चांगलें साह्य करीत म्हणून या सीदीचा सर्व डोळा ब्राह्मणांवर असे. पुढें शिवाजीकडे ही तक्रार जातांच त्यानें कांहीं फौज सीदीवर रवाना केली, परंतु दुसऱ्या कामांमुळें सीदीचा सूड घेणें तसेंच राहिलें. सन १६८० च्या एप्रिल महिन्यांत सीदीनें शिवाजीच्या मुलखांतून कांहीं लोक पकडून मुंबईत विक्रीस आणिले, हें इंग्रजांस समजतांच त्यांनीं २१ असामींस सीदीच्या हातून सोडवून स्वदेशीं पाठविलें. तरी इंग्रज आपल्या बंदरांत सीदीस राहूं देतात हें शिवाजीस खपेना, आणि दोघांवरही चांगला दाब ठेवितां यावा, म्हणून सन १६७९ च्या भर पावसाळ्यांत शिवाजीनें खांदेरी बेट काबीज केलें. खांदेरी व उंदेरी

हीं दोन खडकाळ बेटें मुंबईच्या तोंडाशीं असून, त्यांजवर वसती वगैरे नाहीं. परंतु गर्दझाडी आहे. खांदेरी बेट शिवाजीनें हस्तगत केलें; आणि तेथें किल्ला, वाडे वगैरे बांधून मजबुदी केली, ह्याबद्दल इंग्रजांस फार वैषम्य वाटलें. पोर्तुगीझ लोकांनीं मुंबईबरोबरच हीं बेटें आपणास दिलीं, असा इंग्रजांनीं आपला हक्क दाखविला. हा हक्क वसईस पोर्तुगीझ लोकांस समजतांच त्यांनीं इंग्रजांचें बोलणें झिडकारून आपण स्वतः आपलाच हक्क ते त्या बेटांवर सांगूं लागले. पुढें इंग्रजांनीं सीदीशीं सख्य करून खांदेरीस शिवाजीच्या आरमारावर स्वारी केली. प्रथम शिवाजीच्या लोकांनीं इंग्रजांस शांतपणें बेटावर येऊं दिलें; आणि मग त्या सर्वांचा शिरच्छेद केला. नंतर रिव्हेंज नामक इंग्रजांचें पंधरा तोफांचें जहाज व दोनशें लोक असलेलीं दुसरीं गलबतें खांदेरीजवळ मराठ्यांस अडविण्याकरितां ऑक्टोबर महिन्यांत आलीं. क्यापटन मिंचिन व केग्विन हे त्या जहाजांवर मुख्य होते. त्या प्रसंगीं इंग्रज व मराठे यांची निकराची लढाई होऊन दोघांचीही पुष्कळ खराबी झाली. तरी खांदेरी बेट इंग्रजांस मिळालें नाहीं. ह्या वेळीं दौलतखान हा शिवाजीच्या आरमाराचा मुख्य होता.

खांदेरी व त्याच्या शेजारचें दुसरें लहान बेट उंदेरी हीं दोन खडकाळ बेटें एकमेकांपासून पाऊण मैलाच्या अंतरावर असून मुंबईहून आगबोटींत बसून दक्षिणेस जातांना लागतात. त्यांजवर वस्ती नाहीं, परंतु त्यांतून इंग्रजांस सरपण मिळे, आणि मुंबई बंदरांत येणाऱ्या सर्व जहाजांवर तेथून चांगली देखरेख ठेवतां येई. तीं काबिज करण्याकरितां इंग्रजांनीं नाना तऱ्हा केल्या. शिवाजीशीं युद्ध करून तीं घेण्याकरितां त्यांनीं कोर्ट ऑफ् डायरेक्टरांकडे पुनः पुनः परवानगी मागितली. कॉर्ट ऑफ् डायरेक्टर्सनीं दर खेपेस इतकेंच लिहावें, कीं ' खांदेरीउंदेरीकरितां आम्हांस लढाई कर्तव्य नाहीं, हें तुम्हांस वारंवार कळविलेलेंच आहे. शिवाय अशा प्रकारें युद्ध करण्याचा आपला बाणा नाहीं; आणि त्यांत आपला फायदाही नाहीं. म्हणून लढाई करूं नका असें कंठशोष करून आम्ही तुम्हांस सांगत आहों. ' या लिहिण्यानें आपणाविषयीं एतद्देशीय लोकांचे मनावर झालेला परिणाम पाहून मुंबईतील इंग्रजांस अत्यंत दुःख झालें. त्यांनीं

खालीं दिहिल्याप्रमाणें येथील लोक आपणास हिणवितात असें विलायतेस लिहून पाठविलें.

' तुमचे इंग्रज लोक इतकी बढाई कशास मारितात ? तुम्हीं कोणते विजय संपादिले आहेत ? तुमच्या तलवारीनें कोणतें महत्कृत्य केलें आहे ? तुमचा हुकूम कोणीं मानिला आहे ? तुमच्यापाशीं आहे काय ? डच-लोकांनीं तर तुमच्यावर शह ठेविलाच? पोर्तुगीज लोकांनीं तरी कांहीं माणु-सकीचीं कामें केलीं आहेत. परंतु तुमची तर सर्व लोक टर उडवितात. मुंबई तरी तुम्हीं जिंकून थोडीच घेतली ? आणि ती तरी राखण्याचें सामर्थ्य तुमच्यांत कोठें आहे ? असें असून तुम्ही उगाच लढाईचे डौल मारितां, व आमच्या राजांची बरोबरी करतां ती काय म्हणून ?' हे शब्द खरे करून दाखविण्यास मराठ्यांचा पुरस्कर्ता शिवाजी या पुढें वांचला नाहीं. तरी मरणापूर्वी इंग्रजांस त्यानें आपल्या तंत्रानें वागण्यास लाविलें. खांदेरी घेण्याचा नाद इंग्रजांनीं साफ सोडून दिला. त्यांचें आर-मार खांदेरीकडे सीदीच्या मदतीस होतें, तें त्यांनीं परत बोलाविलें आणि सन १६८० च्या मार्च महिन्यांत शिवाजीच्या वकिलांबरोबर त्यांनीं तह करून सीदीस मुंबई बंदरांत आश्रय द्यावयाचा नाहीं, असें त्यांनीं कबूल केलें. ह्या प्रसंगी सन १६७४ तील तह पुनः कायम करण्यांत आला.

शिवाजीचा दरारा इंग्रजांस किती होता याचा उल्लेख ईस्ट इंडिया कंपनीच्या इतिहासांत पदोपदीं आढळतो. कोणी मराठा सरदार आला तरी, शिवाजीच आला असें इंग्रजांस वाटे. त्यांजला शिवाजी हें एक सामान्य नामच होऊन बसलें होतें. सन १७०३ सालीं इंग्रज व्यापा-ऱ्यांनीं सुरतच्या डायरींत असें लिहून ठेविलें आहे, कीं ' शिवाजी पुनः सुरतेवर येत आहे. त्याची फौज तर अगोदरपासून सुरतेच्या आसपास गोळीबार करीत आहे. या भीतीनें त्यांनीं सुरतच्या ठाण्याची विशेष मज-बुदी केली. त्या वेळेस कित्येक इंग्रज कारकून मंडळीस लष्करी काम सांगण्यांत आलें, तें त्यांनीं केलें नाहीं, म्हणून कित्येकांस शिक्षाही झाल्या. हा सगळा प्रभाव शिवाजीच्या नांवाचा. बंगाल्यांतील इंग्रज व्यापाऱ्यांना शिवाजी तर अमरच आहे असें वाटे. सन १६८० च्या एप्रिल महिन्यांत शिवाजी मरण पावला, ही बातमी मुंबईच्या प्रेसिडेंटानें कलकत्त्यास कळ-विली, त्या वेळेस कलकत्याहून जबाब आला तो असा. ' शिवाजी इतक्या

वेळां मेला आहे, कीं तो अमरच आहे असें कित्येकांस वाटूं लागलें आहे. त्याच्या मरणाची वार्ता लोकांस खरी न वाटण्याचें कारण असें कीं, आजपर्यंत त्यास जिकडे तिकडे विजयच येत गेले; आणि त्याच्याप्रमाणें त्याच्यामागें हिंमतीनें काम चालविणारा कोणी नसल्यामुळें मराठ्यांच्या तावडींतून सुटल्याचा आम्हास प्रत्यक्ष अनुभव येईल तेव्हांच शिवाजी खरोखर मेला असें आम्ही समजूं. शिवाजी होतां होईल तो इंग्रजांस दुखवीत नसे. परकीयांना विनाकारण त्रास द्यावा, व त्यांचें वित्त हरण करावें, असा शिवाजीचा हेतु कधींच नव्हता. त्याचा मुख्य हेतु स्वराज्यस्थापनेचा. या कामीं त्यास अडथळा करणारे मोगल, विजापुरकर, सीदी वगैरे जे त्याच्या शत्रुवर्गांत गणले जात, त्यांचा पाडाव करणें त्यास प्राप्त झालें. राज्यस्थापनेच्या कामीं इंग्रज आड आले नाहींत; म्हणून त्यांच्या वाटेस जाण्याचें कारण शिवाजीस पडलें नाहीं. शिवाजीच्या स्वीकृत कार्यक्रमांतलें दुसरें काम राज्यस्थापनेचीं साधनें संपादन करण्याचें यांपैकीं मुख्य साधन म्हणजे पैसा. फौज ठेवणें, किल्ले बांधणें वगैरे साधनें पैशापासून उत्पन्न होणारीं होतीं. हा पैसाही होईल तितका न्याय्य मार्गानें व सलोख्यानें मिळविण्याचा शिवाजीचा परिपाठ होता. म्हणून एखाद्या धनाढ्य शहरास पोंचल्यावर शहराच्या ऐपतीप्रमाणें कांहीं एक ठरीव रक्कम तो लोकांपासून मागत असे. ती त्यांनीं त्यास निमूटपणें दिल्यास तो कोणास उपद्रव देत नसे. होतां होईल तो युद्धप्रसंग आणावयाचा नाहीं, थोडेसेंच नुकसान होत असेल, तर तें सोसावयाचें, हा शिवाजीचा संप्रदाय होता. अशा कारणास्तव इंग्रजांशीं त्यानें लढाईचा प्रसंग आणिला नाहीं. उलट इंग्रजांशीं स्नेहसंबंध कायम राखणें हेंच शिवाजीस इष्ट वाटलें. अठराव्या शतकांत हिंदुस्थानच्या राज्यप्राप्तीस्तव झगडणाऱ्या अनेक पक्षांमध्यें इंग्रजांची गणना होऊं लागली, तशी सतराव्या शतकांत शिवाजीच्या वेळीं होत नव्हती. म्हणून शिवाजीस इंग्रजांची भीति वाटत नसे. इंग्रज लोक हे कुशल व्यापारी आहेत; दूर देशाहून आपल्या देशाशीं व्यापार चालविण्यांत त्यांच्या इतके कुशल दुसरे कोणी नाहींत; व्यापाराच्या योगानें देशास सधनता प्राप्त होते, इत्यादि गोष्टी मनांत आणून, शिवाजीनें इंग्रजांस आपल्या मुलखांत व्यापार करण्यास उत्तेजन दिलें. शिवाजीच्या ताब्यांतील कोंकणचा व

घांटमाथ्यावरचा प्रदेश, बाहेरच्या प्रदेशांशीं दळणवळण नसल्यामुळें, कंगाल स्थितींत होता; परंतु इंग्रज ह्या देशांत मालाची नेआण करूं लागल्यापासून शिवाजीच्या रयतेस किफायत होऊं लागली, आणि शिवाजीच्या देखरेखीखालीं जमिनीची मशागत होऊन शेती सुधारली. असा हा शिवाजीशीं इंग्रजांचा संबंध होता.

---

## प्रकरण दहावें.

## दक्षिणदिग्विजय व अखेर.

१. आदिलशाहीशीं शिवाजीचा बेबनाव.
   (क) हुगळीची लूट.
   (ख) उंबराणी व जेसरीच्या लढाया.
   (ग) शिवाजीकडून विजापुरचें संरक्षण.
   (घ) सावनूरची लढाई
३. हणमंत्याचें कर्नाटकांतील कारस्थान.
५. कर्नाटकची स्वारी व व्यंकोजीचा रुसवा.
७. कर्नाटकस्वारीचा फलितार्थ.
२. सावित्रीबाई व दादजी रघुनाथ.
४. गोवळकोंड्यास दिलेला शह.
६. दोनबंधूंचा पत्रव्यवहार व तह.
८. औरंगजेबाशीं त्रिंशद्वार्षिक युद्ध.
   (क) पहिली मोहीम.
   (ख) संगमनेरची लढाई.
   (ग) संभाजीची फितुरी.
९. अखेर.

**१. आदिलशाहीशीं शिवाजीचा बेबनाव (१६७२–१६७९).**— विजापुरशीं शिवाजीचा तह झाला, तो पितृवचन असें समजून शिवाजीनें फारच काळजीनें पाळिला. मध्यंतरी मोगलांच्या खटपटीनें दोघांचें थोडेंसें बिघडलें, पण तो बिघाड फार वेळ टिकला नाहीं. सन १६७२त अली आदिलशाहा मरण पावला तेथपर्यंत शिवाजीसही विजापुरकरांनीं त्रास दिला नाहीं. अलीचे मरणानंतर विजापुरांत फारच घोटाळा उत्पन्न झाला. नवीन शहा अल्पवयी असून अब्दुल्करीम बुहलोलखान पठाण सेनापति होता, व हबशांचा मुख्य खवासखान हा वजीर असून, तो शिवाजीशीं तंटा करण्यास उद्युक्त नव्हता. पण सेनापतीनें मात्र मोगलांशीं सख्य करून शिवाजीस साफ बुडविण्याची खटपट चालविली. या वेळीं शिवाजी व मोगल यांचें युद्ध चालू होतें. विजापुरच्या दरबारीं

चाललेल्या खटपटी व त्यांचे मोगलांशीं चाललेले व्यवहार शिवाजीस सहज कळत होते. एकदां विजापुरकर पूर्वीचा तह मोडून, आपणावर चाल करून येतात, असें शिवाजीस कळल्यावर, शिवाजीनेंही त्याचा प्रतीकार करण्यास कमी केलें नाहीं. त्यानें विशाळगडास मोठें सैन्य गोळा करून त्यांतील एका टोळीनें पन्हळा किल्ला काबीज केला.

(क) हुबळीची लूट.—तेव्हां विजापुरची फौज चालून आली, तिला दुसरीकडे गुंतविण्याकरितां आण्णाजी दत्तो यानें हुबळी शहरावर चाल करून तें लुटलें. हें शहर मोठ्या व्यापाराचें व सधन होतें. हुबळीची लूट सुरतेपेक्षांही ज्यास्त असून तेथें इंग्रज, फ्रेंच व डच वगैरे युरोपियन लोकांच्या वखारी होत्या, त्या सर्वांपासून शिवाजीनें खंडणी घेतली, आणि वांईपासून तुंगभद्रेपावेतोंच्या देशांत व पश्चिमेस समुद्रकिनाऱ्यानें विजापुरच्या हद्दींत मराठ्यांनीं जिकडे तिकडे आपला अंमल बसविण्यास सुरुवात केली. ( स. १६७३-७४ ).

(ख) उंबराणी व जेसरीच्या लढाया.—शिवाजीचें पारिपत्य करण्यास बुहलोलखान मोठी फौज घेऊन निघाला, त्यापूर्वीच मराठ्यांनीं वरप्रमाणें धामधूम करून सोडिली. बुहलोलखानावर शिवाजीनें सेनापति प्रतापराव यास रवाना केलें. प्रतापराव बुहलोलखानावर चालून न जातां, आदिलशाही प्रांत लुटीत थेट विजापुरपर्यंत जोरानें चालून गेला. बुहलोलखान पन्हाळ्यास वेढा घालून बसला होता. तो वेढा उठवून विजापुरच्या मदतीस परत गेला. तेव्हां प्रतापराव त्याचा रस्ता अडवून बसला. त्या दोघांचा सामना हल्लींच्या जतसंस्थानांत उंबराणी येथें होऊन, दोन प्रहरपर्यंत कडाक्याचा झगडा झाला. बुहलोलखानास पाणीसुद्धां मिळेना, तेव्हां प्रतापरावाचीं आर्जवें करून त्यानें मराठ्यांचे वाटेस न जाण्याचें कबूल केलें.* प्रतापरावानेंही उदार मनानें शरण आलेल्या शत्रूस जीवदान दिलें. शिवाय मोगलांशीं चाललेलें युद्ध संपलें नसल्यामुळें विजापुरकरांशीं समेट करणें प्रतापरावास श्रेयस्कर वाटलें. असें करण्यांत बुहलोलखानास त्यानें पूर्णपणें ओळखिलें नाहीं हा बुहलोलखान विजापुरच्या राज्यांत पुष्कळ ढवळाढवळ करीत असून, शिवाजीशीं त्याचें प्रत्यक्ष वैर होतें. अलीकडे शिवाजीवर शस्त्र उचलण्याची मसलत विजापुरदर-

---

* या लढाईत शिवाजीचा पराभव झाला, असें विजापुरचे मुसलमान इतिहासकार म्हणतात.

बाराच तोच देत होता, आणि त्याची पुरी खोड मोडल्याशिवाय विजापुरकरांपासून आपण निर्भय होणार नाहीं, हें शिवाजी ओळखून होता. या संबंधीं शिवाजीचा उद्देश मागें पृ. ३७९ वर आला आहे. म्हणून प्रतापरावाचें करणें शिवाजीस न आवडून त्यानें त्यास ठपका देऊन ' विजापुरकरांची पूर्ण खोड मोडल्याशिवाय आम्हांस तोंड दाखवूं नये ' असा खरमरीत निरोप पाठविला. शिवाजीच्या बोलण्याची सत्यता लगेच कळून आली. प्रतापराव दूर गेला असें पहातांच, बुहलोलखान आपलें वचन मोडून, परत फिरून शिवाजीचे मुलखास उपद्रव करूं लागला. त्याबरोबर प्रतापराव त्वेषानें त्याजवर चालून आला; आणि रागारागानें आपली व्यवस्था बरोबर न करितां त्यानें शत्रूवर एकदम चाल केली. तो हल्ला लागू न पडतां तो व त्याचे कांहीं निवडक लोक रणांगणीं पडले. तेव्हां त्याच्या लोकांची विजापुरच्या फौजेनें दाणादाण केली. पण सुदैवानें हंसाजी मोहिते नांवाचा एक मराठा सरदार त्याच प्रांतीं कांहीं अंतरावर कामागरीवर होता, त्यास प्रतापराव पडल्याची खबर लागतांच तो मोठ्या वेगानें बुहलोलखानावर चालून आला. त्यामुळें प्रतापरावाच्या पळणाऱ्या लोकांस धीर येऊन, सर्वांनीं मिळून निकराचा हल्ला करतांच विजापुरचें सैन्य पराभव पावून विजापुरकडे पळून गेलें. ही लढाई स. १६७४ च्या फेब्रुवारींत ' जेसरी ' येथें झाली. तींत संताजी घोरपडे व धनाजी जाधव या दोन तरुण मराठे सरदारांनीं चांगला पराक्रम केला. या दोन सरदारांचीं नांवे पुढील इतिहासांत अजरामर झालीं आहेत.

येणेंप्रमाणें विजापुरच्या फौजेचा नाश झाला. शिवाजीस सर्व खबर कळली. प्रतापराव पडल्याबद्दल त्यास अत्यंत दुःख झालें. आजपर्यंत राज्यस्थापनेचे शिवाजीचे पराक्रम प्रतापराव व तानाजी मालुसरे यांच्या बळावर घडले असल्यामुळें, थोडक्यान्त अवधींत हे दोघेही शूरवीर आपणास सोडून गेलेले पाहून शिवाजी फार कष्टी झाला. प्रतापरावाची मुलगी जानकीबाई ही त्यानें आपला मुलगा राजाराम याच्याशीं तिचें लग्न केलें. लग्नप्रसंगीं दिल्लीकडील पुष्कळ ब्राह्मण बोलाविले; आणि त्यांस इतक्या भरपूर दक्षणा दिल्या कीं, दिल्लीकडच्या प्रदेशांत असा प्रकार कोणासही ठाऊक नव्हता. ( तारिखी–शिवाजी ). हीच राजारामाची पहिली बायको.

हंसाजीच्या समयोचित कामगारीबद्दल शिवाजीनें त्यास 'हंबीरराव' हा किताब व सेनापतिपद दिलें.

(ग) **शिवाजीकडून विजापुरचें संरक्षण.** अब्दुल करीम बुहलोलखान विजापुरास गेल्यावर मराठ्यांनीं आदिलशाहीची अगदींच त्रेधा उडवून दिली. तींत विजापुरीं चाललेल्या दुफळीची भर पडली. बुहलोलखानानें वजीर खवासखान यास ठार मारिलें. ह्या वाईट कृत्याचा परिणाम त्यास भोगावा लागला. अण्णाजी दत्तो, दत्ताजीपंत वाकनीस, हंबीरराव मोहिते इत्यादि मंडळींनीं झपाट्यानें विजापुरचा बहुतेक प्रदेश आक्रमण केला. बुहलोलखान व मोगल सरदार दिलीरखान दोघेही पठाण असून त्यांचें सख्य होतें. उभयतांचा बेत शिवाजीस बुडावेण्याचा असून, त्यांस औरंगजेब बादशहाचें चांगलें पाठबळ होतें. तथापि बुहलोलखान याचें दरबारांत व लोकांवर वजन नसल्यामुळें, त्याला आपला हेतु सिद्धीस नेतां येईना. इकडे शिवाजी स १६७४-७५ त राज्याभिषेक व राज्यव्यवस्था करण्यांत गुंतल्यामुळें विजापुर जिंकण्याचा त्याचा बेत लांबणीवर पडला.

पुढें स. १६७७ त शिवाजीनें कर्नाटकांत स्वारी केली. तो दूर गेला असें पाहून विजापुर व मोगल ह्यांनीं मोठाच कट उभारला. एका दृष्टीनें शिवाजीवर या वेळीं कठिण प्रसंग आला होता. स. १५६४ त तालीकोटच्या घनघोर संग्रामापूर्वी विजयनगरच्या रामराजास बुडवून जिकडे तिकडे मुसलमानशाही स्थापित करण्यासाठीं ज्याप्रमाणें दक्षिणच्या सर्व मुसलमान राजांनीं एक मोठा कट किंवा संप केला होता, त्याचप्रमाणें प्रस्तुत प्रसंगीं शिवाजीच्या संबंधानें सर्व मुसलमानांनीं कट केला. शिवाजीनें स्वतंत्र राज्य स्थापिलें, त्यानें मोगल बादशहास न जुमानतां, राज्यवृद्धि केली, आजपर्यंत अपयश असें त्यास केव्हांच कोठें आलें नाहीं. नर्मदेअलीकडील सर्व दक्षिण हिंदुस्थानचा हा संपूर्ण मालक होणार अशीं चिन्हें दिसूं लागलीं. तेव्हां मुसलमानांनीं त्याजविरुद्ध एकोपा केला. परंतु शिवाजी चतुर होता. सर्वांशीं एकक्षणीं उघड सामना करण्याचा प्रसंग त्यानें आणिला नाहीं. त्यानें प्रत्येकास वेगवेगळें गांठून, आपला कार्यभाग साधिला. मोगल व विजापुरकर यांचें ऐक्य झालेंच होतें. विजापुरांत पठाण व सीदी असे दोन पक्ष होते. पठाणांचा मुख्य बुहलोलखान असून सीदी पक्षाचा मुख्य सीदी जौहरचा जांवई मसऊद-

खान, अब्बनी प्रांताचा सुभा, हा होता. गोवळकोंड्याचा सुलतान अबू हुसन कुत्बशहा यानें बुहलोलखान व मसऊदखान यांस चार बोधपर गोष्टी सांगून, उभयपक्षांतील तंटा मिटविला; आणि शिवाजीशीं लढण्यास स्वतःही कंबर बांधिली. याचे पूर्वींच शिवाजीनें गोवळकोंड्यावर स्वारी करून, कुत्बशहाकडून खंडणी घेण्याचा ठराव केला होता. यामुळें मुसलमानांनीं या वेळेस जंगी कारस्थान तयार केलें. परंतु अनेक अड-चणींमुळें तें कारस्थान सिद्धीस गेलें नाहीं. मोगलांचा एक सेनापति इस-लामखान विजापुरांत सर्जाखानाशीं लढत असतां जून २४ स. १६७६ रोजीं मारला गेला. स. १६७७ त बुहलोलखान मरण पावला. त्याच सालाचे अखेरीस बहादूरखानाची बदली होऊन शहाजादा मुअज्जम दक्षि-णच्या कारभारावर आला. त्यानें पूर्वींचे सर्व बेत बदलून टाकिले. औरंगजबाचा भरंवसा कोणावरच नव्हता. फक्त शिवाजीस बुडविण्यापुरतें दिलीरखान व विजापुरकर यांस बादशहाचें साहाय्य होतें, तरी विजापुर-करांचा पाडाव करावा, अशी त्याची मनापासून इच्छा असल्यामुळें, वरील कटास विशष साह्य केलें नाहीं. शिवाजीनें तंजावर प्रांतीं स्वारी केली, त्या वेळेस प्रथम कुत्बशहास भेटून युक्तीनें त्यास शिवाजीनें आपणा-कडे वळविलें. दिलीरखानाचें मसऊदखानास मनापासून साह्य नसल्या-मुळें, त्याच्या हातून राज्यकारभार बरोबर चालेना. उलट विजापुर जिंकण्यास मोगल टपले आहेत आणि शिवाजीनें तर एकसारखा विजापुर प्रांतांत धुमाकूळ मांडिला आहे, असें पाहून, नाइलाजानें मस-ऊदखानानें शिवाजीशींच सख्य केलें. विजापुरांत दंगा सुरू झाला होता. चिंतो चिमणाजीनें विजापुर शहर लुटलें. विजापुरच्या रयतेची धूळधाण उडाली. तेव्हां विजापुरच्या दरबारानें शिवाजीची मदत मागितली. मसऊदखानानें शिवाजीस लिहिलें, 'आपण शेजारी आहों. एका ताटांत जेवणारे आहों. आदिलशाहीचा अभिमान आमच्या इतकाच तुम्हांस आहे. रात्रंदिवस शत्रू राज्याचा नाश करीत आहेत. आपण दोघांनीं एक होऊन परकीय शत्रूंना हाकलून देणें आपलें कर्तव्य आहे.' शिवाजीनें शपथपुरःसर मदत देण्याचें कबूल केलें. दिलीरखानास हा प्रकार कळून तो चिडून गेला; आणि विजापुर जिंकण्याचा त्यानें निश्चय केला. त्यानें विजापुरचे बहुतेक सरदार फोडून आपल्या पक्षास आणिले, आणि संभाजीसही फूसलावून आपणाकडे

आणिलें. मसऊदच्या शत्रूंनीं दिलीरखानाच्या मदतीनें आदिलशाहीचा घात केला. संभाजी हा दिलीरखानास मिळाल्यामुळें शिवाजी, कुत्बशहा व आदिलशहा या तिघांसही एकदम जिंकण्याची दिलीरखानास उमेद आली. परंतु काठिण प्रसंगीं शिवाजीनें मदत केल्यामुळें वरील दोन्ही मुसलमानी राज्यांचा कांहीं दिवस बचाव झाला.संभाजी व दिलीरखान यांनीं मोठी फौज पाठवून भूपाळगड काबीज केला.त्यांत शिवाजीकडील पुष्कळ लोक मेले. पुढें दिलीरखानानें विजापुरास वेढा घातला. तेव्हां त्या राजधानीचें संरक्षण करण्यास शिवाजीनें फार कष्ट केले. विजापुरचे मुसलमान सरदार व मालोजी घोरपडे हेही शहराचे बचावाची शिकस्त करूं लागले. शिवाजीनें आपल्या राज्यांतून मुबलक धान्य व सामान शहरांत पोहोंचविलें, त्यामुळें विजापुरांत नेहमींप्रमाणेंच स्वस्ताई कायम राहिली. उलट मोगलांचे फौजेस मराठ्यांनीं असा बेसुमार त्रास दिला कीं, धान्याची व दाणावैरणीची पंचाईत पडून निरुपायास्तव दिलीरखानानें तहाचें बोलणें लाविलें. इकडे शिवाजीच्या फौजेनें थेट औरंगाबादपर्यंतच्या मुलखांत शिरून दंगा उसळून दिला. औरंगबादजवळ असलेलें जालना शहर त्यानें लुटलें. मुअज्जमनें दिलीरखानास धान्य किंवा पैसे पाठविण्याचें साफ नाकारिलें, आणि विजापुरकरांकडून पैसे उपटून दिलीरखानास विजापुरांतून परत बोलाविलें. ह्या वेळीं शिवाजीनें मोठी फौज जमा केली आणि चारही दिशांकडे मोगलांच्या राज्यांत दंगा उडवून दिला. नर्मदेपर्यंतचा प्रदेश लुटून अपरंपार लूट आणिली. वऱ्हाड, खानदेश, बागलाण हे प्रांत त्यानें धुळीस मिळविले. १२ हजार घोडे व लाखों रुपयांची संपत्ति शिवाजीस मिळाली. ह्या प्रदेशांत मोगलांकडे मराठे मनसबदार होते, त्यांनीं बादशहाकडे गाऱ्हाणीं केलीं. ह्या सर्वांचा दोष दिलीरखानाचे माथीं मारण्यांत येऊन, त्यास बादशहानें कामावरून दूर केलें. तरी त्यानें कर्नाटकांतील विजापुरच्या मुलखांत स्वारी करून पुष्कळ त्रास दिला. पेमनाइकानें तर त्याचा पुरा पराभव केला. अशा विपत्तींत औरंगाबादेस परत येऊन तेथें आजारी पडून सन १६८० त (?) दिलीरखान मरण पावला. बसातिन्–इ–सलातीन या विस्तृत इतिहासांतून वरील हकीकत संक्षेपून घेतली आहे. शिवाजीनें मदत केल्याबद्दल मसऊदखानानें शिवाजीचे फार फार आभार मानिले आणि वकिलाबरोबर वस्त्रें, जवाहीर, हत्ती, घोडे वगैरे नजर पाठविले. शिवाजीनेंही त्यास यथोचित गौरवानें

उत्तर पाठविलें. त्यानंतर शिवाजी व विजापुरकर यांचा तह होऊन कोपल, बेलवाडी ( बल्लारी ) व त्यापुढें दक्षिणेस जिंजी वगैरे जे प्रांत शिवाजीनें काबीज केले होते, त्यांजवरील व तंजावरच्या जहागिरीवरचा आपला हक्क आदिलशहानें सोडून दिला.

इकडे शिवाजीनें कुत्बूशहाशीं केलेलें सख्य पाहून, दिलीरखानास फार राग आला. शिवाजी कर्नाटकांत गेलेला पाहून, त्यानें एकाएकीं गोवळकोंड्यावर चाल केली. मादण्णापंताची तयारी कांहीं कमी नव्हती. त्यास हें भविष्य ठाऊकच होतें. मोगल व विजापुरकर ह्या दोनही फौजांचा पराभव करून त्यानें त्यांस परत लाविलें. ही सगळी हकीकत शिवाजीस कर्नाटकांत समजली. शिवाय औरंगजेबानें आपल्या पारिपत्याची जय्यत तयारी चालविली आहे असें कानीं आल्यावरून, शिवाजी लगबगीनें कर्नाटकांतून परत महाराष्ट्रांत आला. कर्नाटकची कामगिरी रघुनाथपंत, संताजी भोसले, हंबीरराव व धनाजी जाधव इत्यादिकांवर त्यानें सोपविली. व्यंकोजीचा कलह शिवाजी परत आल्यावर पत्रानेंच तुटला. या मंडळीस कर्नाटकांत स्वस्थपणा म्हणण्यासारखा मिळाला नाहीं. परत येतांना शिवाजीचे विजापुरकरांच्या फौजेशीं कित्येक झगडे झाले.

( घ ) सावनूरची लढाई.* ( १६७८-७९ )—. कृष्णा व तुंगभद्रा यांजमधील दुआबांत विजापुरचा सरदार यूसुफखान मायणा म्हणून होता. साजरा गोजरा वगैरे नवीन किल्ले बांधून तिकडे शिवाजीनें बंदोबस्त केला, तो मायणा यास आवडला नाहीं. शिवाजीच्या सरदारांस मायणा यानें त्याजबद्दल जाब विचारिला. तेव्हां हा रानटी ओसाड मुलूख आपण कबजांत घेतला; व बंदोबस्त करून प्रवाशी लोकांस निर्धास्त केलें, असा त्यास शिवाजीच्या लोकांनीं जबाब दिला. ‘ प्रांताचा बंदोबस्त राहणें अवश्य आहे. तुमच्या हातून होत नसल्यास आम्ही करितों,’ इत्यादि प्रकारें शिवाजीनें विजापुरदरबारास पूर्वीच समजाविलें असतां, विजापुराकडून कांहींच दाद घेण्यांत आली नाहीं. शिवाय त्या प्रांतांतील जमीनदार वगैरे मंडळींनीं यूसुफ-

---

* ह्या लढाईची हकीगत शिवदिग्विजयांत खुलासेवार आहे. इतर बखरींत फक्त एक दोन ओळींचा हवाला आहे. चिटणीसांचे बखरींत हुसेनखान व लोदीखान मायणा अशीं नांवें आहेत.

खानाबद्दल शिवाजीकडे पुष्कळ कागाळी केली. 'हा यूसुफखान फार खस्त आहे. याची नेक नजर नाहीं. जुलूम जाजती करणें, बायकापोरांस उपद्रव देणें, गोवधादि निंद्य कर्में करणें. हा अविचारी, याचे हाताखालीं वागण्यास आम्ही फार कंटाळलों. याजकरितां तुम्ही यश घ्या, आम्हांस या दुष्टाचे हातून सोडवा. याचा संसर्ग आम्हास नको असें करा. तुम्ही म्हणाल आम्ही तुम्हांस बोलावूं कोठें पाठविलें, तर मधुकर अरण्यांत स्वेच्छेंकरून विहार करितो, परंतु वायूच्या योगें सुगंध आला म्हणजे, तें स्थान सोडून सुगंधाकडे जसा जातो, तसे तुम्हीं हिंदु धर्माचे स्थापक, या म्लेंच्छांचे नाशक, म्हणून तुम्हांकडे आलों. तुम्हांकडे आम्ही आलों हें ऐकून आमचे द्वारा आज तीन दिवस चौकी बसविली आहे. अन्न पाण्यावांचून जीव घेण्यास उद्युक्त झाले आहेत. तरी तुम्ही पत्र पावतांच रात्रीचा दिवस करून यावें.' शिवाजीनें स्वराज्याचा पुढाकार घेतांच त्याच्या छत्राखाली जाण्याबद्दल लोकांचीं मनें कशीं बनत चाललीं, आणि तेणेंकरून शिवाजीचा उद्योग कसा झपाट्यानें फैलावत गेला, हें वरील उद्गारांवरून निदर्शनास येतें. हंबीरजीनें जमीनदारांचे जामीन आपल्याकडे ठेवून घेऊन रघुनाथपंत व धनाजी जाधव यांजला मजकूर विदित करून, जमीनदारांस आश्वासन देऊन परत लाविलें, आणि फौजेसह जाऊन जमीनदारांच्या मुलखांत जागोजाग आपलीं ठाणीं बसविलीं. हें वर्तमान यूसुफखानास कळतांच तो त्वरेनें जीनबंदी होऊन फौजेसहित हंबीरजीच्या थोड्याशा लोकांवर चालून आला. 'मायणा शरीरेंकरून जबर, कजाखही विशेष, हंबीररावाजवळ सरंजाम थोडा, मायण्याची जमियत मोठी, असें असतां हंबीररावानें वीज चकाकतां अंधकार दूर होऊन शुद्ध उदयधारा नजरेस येते, तद्वत् सैन्यांत हलकल्लोळ होऊन खानाचे लोकांनीं रस्ता देऊन, जसे वेणीचे केस दुभांग करून स्त्री वेणी घालते, तशा रीतीनें हंबीररायानें हत्यार चालवितांच, फळी फुटोन दुभांग केलें. शेंकडों मनुष्य जातां येतां मारिले, खान नामोहरम होऊन पळूं लागले, त्यास धरून आणिलें, सरंजामसुद्धां सर्व लष्कर पाडाव करून आणिलें. हंबीररायाकडील फक्त पांचपन्नास लोक जखमी झाले. हें वर्तमान विजापुरीं गेल्यावर मायण्यास सोडविणेचा विचार काय करावा, अशी चिंता दरबारांत उत्पन्न झाली. शेवटीं मायण्यास सोडविण्याकरितां विजापुराहून फौज रवाना झाली. हंबीरराव

तयारीनेंच होता. कृष्णा व तुंगभद्रा यांच्या दुआबांत विजापुरची फौज येतांच उभयतांची तलवार चालूं लागली. लढाईची एकच गर्दी उसळली. विजापुरकरांचा पराभव झाला. दांतीं तृण धरून शरण आले, त्यांजकडे न पाहतां, ज्यांनीं शस्त्र उचलिलें, त्यांचा चेंदा काढिला, चार घटका लढाई मातबर झाली. इतक्यांत धनाजी जाधव वगैरे दुसरे सरदार विजापुरची फौज आलेली ऐकून, हंबीररावाचे मदतीस आले. मग चहूंकडून लांडगे तोड करून बेजार करून दिलें. मुक्कामीं छापा घालावा, चालत्या मार्गी लांडगे-वृकारासारखे पाडाव करावे, याप्रमाणें विजापुरास पोंचेपर्यंत गलबल करून दिली. आईस लेंकरूं, लेंकरांस आई ओळखीना, आपला जीव वांचला तरी सर्व कांहीं मिळेल, परंतु पळावें असेंच मनास वाटावें; पुन: ' मराठ्यांचे लढाईची गांठ ईश्वरा घालूं नकोस ' असें अंत:करणांत म्हणावें. येणेंप्रमाणें विजापुरची फौज पिटाळून आपला अंमल बसविल्यावर अंणाजी रंगनाथ मालेकर यास बरोबर घेऊन, धनाजी जाधव शिवाजीचे भेटीस रायगडास गेला, आणि मोहिते वगैरे इतर सरदार परत कर्नाटकाचे बंदोबस्तास गेले. शिवाजीनें मोठ्या आनंदानें व समारंभानें सामोरा येऊन धनाजीची तारीफ करून नांवाजणी केली. ' हीं मनुष्यें प्रतिसृष्टि निर्माण करतीं. आम्ही नसतां पादशहाशीं स्पर्धा करून मुलूख घेऊन गर्वहत केला. आम्हांशीं बोलण्यास त्यांस उरूज न राहिला. यांचे उतराई कोठें व्हावें ? असो. आमच्या साह्यार्थ हे देवलोकींहून मनुष्यरूपी निर्माण झाले असेंच वाटतें. जाधवराव, पंचवीस तीस हजार मुसलमान फौजेशीं लढाई सहा सात हजार माणसांनीं कशी घेतली ? तुम्ही पोंहोचून पुढें पाठलाग कसा केला, हें साद्यंत वर्तमान सांगावें.' त्यावरून अंणाजी रंगनाथानें मजकूर निवेदन केला, आणि डोळ्यांसमोर लढाई चालली आहे असें शिवाजीस भासविलें. शिवाजीनें प्रसन्न होऊन वस्त्रें अलंकार दिले; शाबास म्हणून नांवाजणी करून गौरविलें. याप्रमाणें ' माणसांचे जाणणार महाराज होते, म्हणून कार्यकर्तीं माणसें वाढलीं' असें बखरकार म्हणतात. ही वरील लढाई सावनूरचे आसपास झाली, म्हणून तीस ' सावनूरची लढाई ' असें नांव देणें योग्य होईल.

**२. बेलवाडीकर ठाणेदारीण सावित्रीबाई व दादजी रघुनाथ.—** शिवाजीनें कर्नाटक काबीज करण्याकरितां जी मंडळी ठेविली होती, त्यांत

दादजी रघुनाथ प्रभु महाडकर हा एक स्वामिनिष्ठ सरदार होता. त्यानें कर्नाटकांतील पुंड पाळेगारांस जिंकून शिवाजीच्या ताब्यांत आणिलें. त्याच वेळीं त्यानें बेलवाडी म्हणजे बल्लारी हा भुइकोट किल्ला सर केला, त्या वेळची हकीकत विशेष चित्तवेधक असून तींत महाराष्ट्रांतील प्रभु ज्ञातीच्या एका वीरस्त्रीचें नांव पुढें आलेलें आहे. बेलवाडीचा किल्ला येसप्रभु नामक एका ठाणेदाराचे ताब्यांत होता. त्यास दादजीनें वेढा घातला. तीन महिने झाले तरी किल्ला हस्तगत होईना. दादजीनें फितुरी करून किल्ल्यांतील घरांस आग लाविली, तेव्हां आग विझविण्यांत लोक गुंतले असतां, दादजीनें आपली फौज किल्ल्यावर चढविली. त्या वेळीं जी हातघाईनें निकराची लढाई झाली, तींत येसप्रभु मारला गेला. त्या बरोबर किल्ला दादजीच्या हस्तगत होणार, इतक्यांत येसजीची बायको सावित्रीबाई हिनें पतिनिधनाचें दुःख गिळून आपल्या लोकांस धीर देऊन परत लढाईस आणिलें आणि स्वतः आपण पतीची तलवार घेऊन, घोड्यावर स्वार होऊन, युद्धास सिद्ध झाली. दोनप्रहरपर्यंत मोठ्या शिकस्तीनें लढून तिनें दादजीस परत फिरविलें. स्त्री होऊन इतक्या आवेशानें लढते हें पाहून किल्ल्यांतील सर्व लोकांस विशेष स्फुरण चढलें. दुसरा निकराचा हल्ला होऊन त्यांत दादजीनें बाईच्या घोड्याचे मागील पाय तोडिले, त्याबरोबर बाई जमिनीवर उजवा हात तुटून बेजार होऊन पडली आणि दादजीकडून धरली जाऊन त्याच्या हस्तगत झाली. दादजीनें किल्ला काबीज केला, आणि सर्व धनसंपत्तीसह सावित्रीबाईस शिवाजीकडे आणिलें. शिवाजीनें तिचा चांगला सत्कार करून व ह्या मराठी राज्याचें अभीष्ट चिंतन करीत रहा असें सांगून, तिजला नेमणूक करून दिली, आणि तीस बेलवाडी येथें तिच्या घरीं पोंचविलें. ही गोष्ट १६७३ त घडली, असें शिवदिग्विजयकार म्हणतो, तें बहुधा खरें नाहीं. १६७८ च्या सुमारास हा प्रकार घडला असावा.

दादजी रघुनाथ हा महाडचा राहणारा. याचेंही नांव प्रथमतः येथेंच आलें आहे. बाळाजी आवजी चिटणीसाशीं याचें संगनमत होतें. पुढील दोन तीन कारकिर्दींत मराठशाहीच्या तर्फेनें ह्यानें पुष्कळ पराक्रम केले. बाळाजी विश्वनाथ हा पेशव्याचे पदरीं होता. तो सन १७२२ च्या सुमारास वारला.

कर्नाटकांत संताजी भोसले, हंबीरराव मोहिते, जनार्दनपंत वगैरे मोठमोठ्या सरदारांनीं पराक्रम करून प्रदेश जिंकिले. पुढील कारकिर्दीत प्रसिद्धीस आलेले बहुतेक सरदार प्रथम या कर्नाटकच्या मोहिमेंत उदयास आले. शिवाजीनें पत्रें, वस्त्रें, अलंकार वगैरे पाठवून सर्वांचा परामर्ष घेतला. 'या प्रकारें चाकरी मनुष्यांची जाणून न मागतां बक्षिस देणें, दिलें तें परंपरेस चालावयाजोगें, यामुळें सर्व लोक संतुष्ट. आपणही असेंच काम करूं, केलें असतां, लेंकरा लेंकरी चालावयाजोगें बक्षिस मिळवूं, मिळालें म्हणजे आमचें कोण खाईल ? अशी हुशारी ठेवून सर्व लोक आपलाले सेवेचे ठायीं तत्पर राहते झाले.' कर्नाटकच्या स्वारींत पाळेगार, देशमुख इत्यादिकांस जिंकण्यास शिवाजीचे सरदारांस पुष्कळ प्रयास पडले. या लोकांनीं विजापुरकरांसही कधीं मोजिलें नव्हतें. ह्या बंडखोरांचा पाडाव झालेला पाहून गोवळकोंडेकरांसही बरें वाटलें. कुत्बशहाचा व शिवाजीचा स्नेह कायम राहिला. कर्नाटकांत शिवाजीनें नवीन राज्यव्यवस्था सुरू केली.

दिलीरखानानें विजापुरास वेढा घातला असतां विजापुरचा कारभारी मसऊदखान यानें शिवाजीचें सख्य संपादून त्याची मदत घेतली. त्यामुळेंच विजापुरचा तूर्त बचाव झाला. या मदतीबद्दल विजापुराकडून रायचूर दुआब म्हणजे कोपल, बल्लारी वगैरे प्रांत शिवाजीस मिळून तंजावरसुद्धां द्रवीड देशावरील त्याचा ताबा कायम झाला. टोकळमानानें शिवाजीच्या राज्याची हद्द थेट दक्षिणपर्यंत गेली. हल्लींचा म्हैसूरप्रांत त्याजकडे आला. सांप्रतच्या मलबार प्रांतांत मात्र तो गेला नाहीं. इतक्या गोष्टींनीं शिवाजीचा विजापुरकरांशीं संबंध संपला. दिलीरखान व शिवाजी हे लवकरच पुढें मरण पावले.

**३. हणमंत्यांचें कर्नाटकांतील कारस्थान (सन १६७६–७८).**—शिवाजीनें आपल्या हयातींत ज्या अनेक मोहिमा केल्या, त्या सर्वांत ही कर्नाटकावरील मोहीम फार मोटी व विशेष स्मरणीय आहे. एका दृष्टीनें पाहिलें तर ही मोहीम विजापुरच्या युद्धाचाच एक भाग आहे. कारण विजापुर व गोवळकोंडा येथील राज्यांचे कांहीं भाग शिवाजीनें ह्या स्वारींत आपल्या हस्तगत केले. शहाजीनें विजापुरच्या तर्फेनें लढून कर्नाटकांत पुष्कळ प्रदेश काबीज केला; व नवीन जहागीर संपादन करून तंजावर हें आपलें राहण्याचें ठिकाण केलें. शहाजीच्या मृत्यूनंतर शिवाजीचा सावत्र

भाऊ व्यंकोजी हा विजापूरतर्फेनें त्या जहागिरीचा उपभोग घेत होता. शिवाजी विजापुरकरांशीं लढत असतां, त्याचा प्रत्यक्ष भाऊ विजापुरच्या तर्फेचा असणें ही गोष्ट लौकिकांत विपरीत व शिवाजीच्या स्वातंत्र्यस्थापनेस बाधक होती. जर शिवाजीनें स्वतंत्र राज्यपद धारण केलें, तर त्याचा प्रत्यक्ष भाऊ त्याच्याशीं मिळून कां नसावा ? तेव्हां फार तर व्यंकोजीप्रमाणेंच शिवाजी हाही विजापुरच्या पदरचा एक जहागीरदार असून, बापाच्या वेळचीच जहागीर थोड्याशा अरेरावीपणानें उपभोगीत होता, असा समज विजापुरीं व बाहेरही बऱ्याच अंशीं असण्याचा संभव होता. हा समज शिवाजीस बाधक होता. आपल्या स्वातंत्र्याविषयीं लोकांची खात्री व्हावी, एवढ्याकरितांच अभिषेकासारखा डामडौलाचा समारंभ त्यास करावा लागला. तेव्हां दक्षिणेंत स्वारी केल्यानें दोन तीन फायदे साध्य होण्याजोगे होते. एक तर दक्षिणचा विस्तृत प्रांत जिंकल्यानें राज्याची मर्यादा पुष्कळ वाढणार होती. तो प्रांत जिंकण्यास विशेष श्रम पडण्यासारखे नव्हते. दुसरें असें कीं, नर्मदेच्या दक्षिणेकडील हिंदुस्थानचा सर्व भाग आपल्या कबजांत असावा, अशी मराठ्यांची व ह्या भोसले घराण्याची फार दिवसांची इच्छा होती. शहाजी व शिवाजी हे पितापुत्र याच धोरणानें आजपर्यंत वागत आले. ह्याच धोरणानें त्यांनीं अनेक लढाया केल्या. आदिलशाही व कुत्बशाही मागें पुढें मोगलबादशहा काबीज करणार हें निश्चित होतें. त्यापूर्वीं तीं राज्यें आपणच जिंकावीं असें शिवाजीचें धोरण होतें. म्हणजे एका अर्थानें औरंगजेबाशींच शिवाजीचा हा सामना होता. विजापुरकरांनीं शिवाजीशीं युद्ध चालविलें होतें, तेव्हां त्यांचा कर्नाटक प्रांत जिंकल्यानें विजापुरकरांची खोड सहज मोडणार होती. शिवाय शिवाजीचा प्रभाव कर्नाटकाकडे मुळींच कोणाला माहीत नव्हता, तो माहीत होऊन तिकडे आपल्या नांवाचा दरारा बसावा, असेंही शिवाजीच्या मनांत होतें. तशांत ही स्वारी करण्यास त्यास आणखी एक चांगली सबब सांपडली; तीमुळें त्यांचा बेत कायम झाला.

मागें सांगण्यांत आलें आहे कीं, दादाजी कोंडदेव व नारोपंत हणमंते हे दोन कारकून शहाजीच्या पदरीं पुण्याच्या जहागिरीवर होते. शहाजी कर्नाटकांत गेला, तेव्हां नारोपंतास स्वतःबरोबर घेऊन, दादाजीस त्यानें पुण्यांत ठेविलें. नारायण त्रिमल हणमंते हा राजनिष्ठ व मुत्सद्दी पुरुष आरंभीं निजाम-

शाहींत मलिकंबरचे हाताखालीं होता. मलिकंबरची कारकीर्द म्हणजे आपले लोकांस राज्यकारभाराचें शिक्षण देण्याची एक शाळाच होती. शहाजी, बाबाजी अनंत, दादाजी कोंडदेव वगैरे अनेक पुरुष याच शाळेंत तयार झाले. शहाजीनें हणमंते यास आपल्या बरोबर सन १६३८ त कर्नाटकांत नेलें. तेथें काम करून तो बंगळूर येथें सन १६५३ त वारला. त्याचे दोन पुत्र—रघुनाथ व जनार्दन. पुढें उदयास आले. रघुनाथ नारायण कर्नाटकांत शहाजीचे हाताखालीं बापाचें काम पाहूं लागला. तंजावरचें राज्य जिंकिल्यावर तेथील राज्यव्यवस्था रघुनाथ नारायण यानें शेवटास नेली. महाराष्ट्रांत शिवाजीनें मराठ्यांचें राज्य स्थापिलें, त्यास पुष्टि देऊन हें राज्य थेट दक्षिण टोंकापर्यंत वाढवावें, अशी खटपट रघुनाथपंतानें करून शहाजी व व्यंकोजीचे हाताखालीं राहून ती त्यानें बहुतेक सिद्धीस नेली. शिवाजीला अभिषेक झाला, त्या सुमारास व्यंकोजी व रघुनाथ नारायण यांचें पटेनासें झालें होतें. व्यंकोजी इतर लोकांच्या नादानें चाले, तें रघुनाथरावास खपेना. रघुनाथराव सगळ्या गोष्टींत वाकब असल्यामुळें तो व्यंकोजीस थोडासा डोईजड वाटे. अखेरीस सन १६७५त दोघांमधील वितुष्ट वाढून, रघुनाथरावास कारभार सोडावा लागला. रघुनाथराव तजावर सोडून शिवाजीकडे आला, आणि कित्येक कामें चांगलीं बजावून त्यानें शिवाजीची मर्जी संपादन करून त्यास कर्नाटकावर मोहीम करण्यास भर दिली. व्यंकोजीवर स्वारी करण्यास शिवाजीला कांहीं सबब पाहिजे होती, ती रघुनाथरावानें दाखविली. शिवाजीनें व्यंकोजीपाशीं बापाच्या जहागिरीचा हिस्सा मागितला. वडिलोपार्जित दौलत दोवां बंधूंनीं सारखी विभागून घ्यावी अशी मागणी करून, व्यंकोजीपासून जहागिरीचा वांटा घेण्याकरितां कर्नाटकांत स्वारी करावयाची, असें शिवाजीनें जाहीर केलें.

शिवाजीची ही सबब योग्य दिसत नाहीं. व्यंकोजीपासून जर बापाच्या जहागिरीचा वांटा घ्यावयाचा तर पुण्याच्या जहागिरीचा वांटा व्यंकोजीस कां द्यावयाचा नाहीं? ही भांडाभांडी पुढें होऊं नये, अशीच तजवीज शहाजीनें करून ठेविली होती. पुण्याची जहागीर सर्वस्वी शिवाजीच्या स्वाधीन करून व्यंकोजीकरितां दूर अंतरावर दुसरी दौलत शहाजीनें संपादिली, कीं जेणेंकरून आपल्या द्वितीय संबंधाच्या वंशास जिजा-

बाई किंवा शिवाजी यांजकडून उपसर्ग लागूं नये. शिवाजीनें दाखविलेली सबब त्याची त्यासच योग्य वाटली असेल असें दिसत नाहीं. लोकांस सांगण्याकरितां कांहीं तरी कारण हवें म्हणून ही सबब पुढें केलेली होती. वास्तविक शिवाजीचा उद्देश म्हटला, तर कर्नाटकासारखा मोठा प्रदेश आपल्या राज्यास जोडावा, विजापुरकरांस बुडवावें, आणि मराठशाहीची हद्द पूर्व किनाऱ्यास नेऊन भिडवावी असाच होता. हा मतलब त्याच्या सार्वभौमत्वाच्या कल्पनेस हुबेहुब जुळतो. बखरकारांनींही हा उद्देश कित्येक ठिकाणीं स्पष्ट सांगितला आहे. सारांश, रघुनाथ नारायण यास बरोबर घेऊन, लाख पाऊण लाख फौजेनिशीं सन १६७७ चे आरंभीं शिवाजी रायगड सोडून कर्नाटकाकडे निघाला.

कर्नाटकांतील या मोहिमेचा उत्पादक रघुनाथ नारायण हणमंते होय.

हणमंते यांचा वंश, त्रिमल
- नारो
  - रघुनाथ मृ. १६८२
    - तिमाजी कोल्हापुरकरांचा पेशवा;
  - जनार्दन, सुमंत १६७४-१६९७
- बाळकृष्ण

यांचीं नातीं ठरविण्याचें काम बिकट आहे. नारोपंताचे* वशिल्यानें त्याचा मुलगा जनार्दनपंत याची शिवाजीकडे सोय होऊन, राज्याभिषेकसमयीं त्यास सुमंत पद मिळालें नारोपंताचा भाऊ बाळकृष्णपंत याजकडे शिवाजीनें मुजुमदारीचे काम आरंभीं सांगितलें होतें, तें कांहीं दिवसांनीं त्यानें निळो सोनदेव यांस दिलें. शहाजी जिवंत असतां रघुनाथपंत फार नांवाजलेला नव्हता. परंतु शहाजीचे पश्चात् व्यंकोजीचा कारभार त्यानें शहाणपणानें केला. कांहीं दिवस दोघांचें चांगलें पटलें. परंतु कांहीं अंशीं व्यंकोजीचें अयोग्य वर्तन व कांहीं अंशीं रघुनाथपंताचा मानी व शिरजोर स्वभाव, यांमुळें उभयतांचा बेबनाव झाला. रघुनाथपंतानें व्यंकोजीस जरब घालून उपदेश केला.

---

* 'शिवप्रताप' बखर, पृष्ठ २४ वरून कळतें, कीं नारो त्रिमल व गोमाजी नाईक पानसंबळ हे दोन आपल्या पदरचे भरंवशाचे गृहस्थ जाधवरावानें जिजाबाईचे लग्नानंतर तिचे तैनातीस दिले.

त्या जरबेचा उपयोग झाला नाहीं. 'आमची बरदास्त दुसरे ठिकाणीं होणार नाहीं, असें आपण म्हणाल तर आज्ञा द्यावी, प्रत्यक्ष दाखवूं.' असे रघुनाथपंताचे शब्द ऐकतांच व्यंकोजी राजे यास क्रोध आला होता, त्यांत पंताचीं जरबेचीं भाषणें ऐकून त्यास त्यानें विडे आणवून रजा दिली. रघुनाथपंत तसेंच मुजरे करून शहराबाहेर डेरे देऊन राहिला. तेथें विचार केला कीं, 'आतां पुढें काय करावें ? व्यंकोजीस बोललेले शब्द खरे करून दाखविले तर आमची प्रौढी, नाहीं तरी वृथैव जल्पना.' यास्तव कोणता प्रकार योजावा ? असे विचार करीत असतां, दक्षिणदेशची स्थिति व शिवाजीचें कर्तृत्व हीं त्याचे मनांत आलीं. शिवाजीनें दक्षिणदेशावर स्वारी केल्यास आपला कार्यभाग होऊन व्यंकोजीचाही गर्व उतरेल, तर नजर नजराणे बरोबर घेऊन न जातां, कांहीं राजकारण घेऊन शिवाजीकडे जावें, असा निश्चय करून रघुनाथपंत निघाला. परंतु त्याचे मनांत एक भीति होती. शिवाजी विजापुरकरांशीं व मोगलांशीं लढण्यांत गुंतला असेल, तर तो कर्नाटकांत येणार नाहीं. तेव्हां या कामीं गोवळकोंड्याचा कुत्बशहा व शिवाजी यांचें सख्य करावें, म्हणजे प्रसंगीं कुत्बशहाची शिवाजीस मदत होईल. त्यांत गोवळकोंडयाचा कारभार मदनपंत ऊर्फ मादण्णा व त्याचा भाऊ एकनाथपंत ऊर्फ आकण्णा या दोन मुत्सद्यांकडे असल्यामुळें, त्यांच्यामार्फत आपला कार्यभाग उरकतां येईल, ही कल्पना रघुनाथपंतास सुचली. सभोंवारचें धोरण राखण्यांत रघुनाथपंत प्रवीण होता. औरंगजेब बादशहा गोवळकोंडयाचें राज्य घेण्यास टपला आहे, विजापुरवालेही मोगलांस मिळून आहेत, तेव्हां अशा संधीस कुत्बशहा मराठ्यांशीं मोठ्या खुशीनें सख्य करील, असा रघुनाथपंताचा तर्क असून तो खरा ठरला.

४. **गोवळकोंड्यास दिलेला शह.**—रघुनाथपंतानें ह्या वेळीं एक शहाणपणाची गोष्ट केली. व्यंकोजी आपल्या तंत्रानें चालत नाहीं, तर आजूबाजूच्या पाळेगार वगैरेंच्या मदतीनें व्यंकोजीशीं बंड अगर फितुरी करण्याच्या नादास तो लागला नाहीं. त्याच्या महत्त्वाकांक्षेस व्यंकोजी-जवळ स्थळ नव्हतें, तें शिवाजीजवळ मिळविण्याच्या हेतूनें त्यानें वर सांगितलेला घाट घातला. दिलीरखानाच्या हाडवैरामुळें मादण्णापंत शिवा-जीची दोस्ती करण्यास इच्छित आहे, अशी संधि पाहून रघुनाथपंत

थोड्या सरंजामानिशीं निघून प्रथम हैदराबादेस मादण्णापंताकडे गेला.* मादण्णापंताचे स्नानसंध्येचे समयीं त्याजकडे ब्राम्हणांस जाण्यास प्रतिबंध नसे. त्या वेळेस रघुनाथपंत दोन विद्यार्थी घेऊन वैष्णव मंडळींत जाऊन बसला. तेथें पंताची हुशारी पाहून, त्यास मादण्णापंतानें राहवून घेतलें. पुढें उभयतांची एकांत गांठ पडून बोलणीं चालणीं झालीं. रघुनाथपंतानें आपली छाप मदनपंतावर इतकी उत्तम बसविली, कीं तो त्याचे म्हणण्यास कबूल झाला.उभयतांनीं मिळून कुत्बशहाची भेट घेतली. रघुनाथपंतानें फारशी भाषेंत संभाषण करून कुत्बूशहास अगदीं गार करून सोडिलें. त्यानें आपले जवळच राहवें अशी शहाची मर्जी होती, परंतु ' हीं पराक्रमी माणसें महाराजांचे प्राणांपलीकडे आहेत. त्यांस सोडून हे राहणार नाहींत, व तेही सोडणार नाहींत; आज्ञा यावी हें सर्वोपरी चांगलें, ' असें मादण्णापंतानें विनविल्यावरून, शहानें तहनामा ठरावांत आणून व शिवाजीस भेटण्याची इच्छा दर्शवून, रघुनाथपंतास रजा दिली. तेथून जासुदांबरोबर पुढें खबर पाठवून पंत पन्हाळ्यावर येऊन शिवाजीस भेटला. शिवाजीनें पंताचें हार्द ऐकून घेतलें. हैदराबादकरांकडील राजकारणाचें सविस्तर वृत्त समजून त्यास संतोष झाला. 'वडिलांचे आशीर्वादें व श्रीतुळजेचे कृपेनीं यावत्भरतखंड तावत् राज्य आक्रमण करावें, हा मनोधर्म. या कृत्यास रघुनाथपंताचें साह्य अवश्य पाहिजे. तेव्हां तिकडे पांच चार मातबर राजकारणें आहेत त्यांचा जाऊन बंदोबस्त करावा. लौकिकांत चंदावरास भाऊ-वांटणी द्यावयास स्वारी जाणार, या वदंतेच्या पोटीं सहजांत सर्व कार्यें भागतील.' असा शिवाजीनें मनांत उद्देश आणिला, आणि रायगडास जाऊन व मुत्सद्दी मंडळीची सल्ला घेऊन, त्यानें कर्नाटकांत स्वारी करण्याचा निश्चय कायम केला.

गोवळकोंड्याची स्थिति या वेळेस फार निकृष्ट झाली होती. राजाच्या हातांत कांहीं एक सत्ता नव्हती. लोक जुलमास त्रासले होते. परराज्यांतून कोणी कांहीं मागण्यास आला, कीं राजा त्यास खुष करून वाटेस लावी. पोर्तुगीझ व डच लोकही त्या राजास आपल्या धाकांत ठेवीत असत.

* रघुनाथपंताच्या कर्नाटकांतील कामगिरीची हकीकत शिवदिग्विजयांत भरपूर दिली आहे. (पृ. २८७-३६१.)

बर्नियरनें आपल्या प्रवासांत सन १६६७ सालांत गोवळकोंड्याची या वेळची हकीकत लिहिलेली वाचण्यालायक आहे. गोवळकोंडा हाताखालीं घालण्याच्या इराद्यानें प्रथम हैदराबादेस जाण्याचा शिवाजीचा निश्चय ठरला. रघुनाथपंतानें पुढें जाऊन शिवाजीच्या आगमनाची सर्व तजवीज केली. त्याबरोबर निराजी रावजी व प्रल्हाद निराजी हे दोघे शिवाजीचे वकील म्हणून होते. निराजी रावजी पुढें लवकरच वारला आणि प्रल्हाद निराजी हा गोवळकोंड्यास शिवाजीचा वकील म्हणून बरेच दिवस होता. शिवाजीनें फौज वगैरे पुष्कळ सरंजाम बरोबर घेतला. सुमुहूर्तीं रायगडाहून निघून पन्हाळ्यास स्वारी आली. तेथून रस्त्यानें खंडण्या वसूल करीत, भागानगरासमीप येऊन पांच सहा कोसांवर मुक्काम केला. तेथें मादण्णापंत अमीरउमरावांसह शहाच्या आज्ञेनें भेटावयास आला. शिवाजी फौजेसह आल्यामुळें शहरांत गडबड उडाली. पुष्कळ मुत्सद्यांस वाटलें, शिवाजी आतां हें राज्य जिंकणार. परंतु मादण्णापंतानें शिवाजीच्या सद्धेतूसंबंधानें शहाची व प्रमुख मंडळीची खात्री केली, आणि शिवाजीची मदत असेल तरच राज्याचा तरणोपाय आहे हें सिद्ध करून दाखविलें. इकडे शिवाजीनें आपल्या फौजेस सक्त ताकीद देऊन कोणीं रयतेस यत्किंचित् त्रास देऊं नये, असा बंदोबस्त केला. हा हुकूम तोडल्याबद्दल कांहीं जणांस त्यानें कडक शासन केलें, तेव्हां शिवाजीच्या संबंधानें लोकांचीं मनें पुष्कळ स्वस्थ झालीं. तेथून मोठ्या समारंभानें शिवाजीनें शहरांत प्रवेश केला, तेव्हां त्याच्या व शहाच्या भेटी बरोबरीच्या नात्यानें झाल्या. शहाकडील मंडळीची मुलाकात रघुनाथ-पंतानें शिवाजीशीं करून दिली. शिवाजीचें भागानगरीं राहणें मासपक्ष झालें. शहानें महाराजांस खासे विडे हातांनीं दिले, अत्तरगुलाब दिला. महाराजांचे जवळचीं निवडक माणसें पाहून शहा चकित झाला. त्यानें त्या लोकांची नांवाजणी करून वस्त्रें, जवाहीर, हत्ती, घोडे, बाके सरंजामसुद्धां आपले हस्तें देऊन, संपूर्ण सरदारांस वस्त्रें, कंठी, शिरपेच, तुरे, कोपास हत्यारें, जसा ज्याचा रुबता, तसें त्यास दिलें. भागानगरानजीक मुक्काम होता तेथपर्यंत, घांसलकडी, शिधापाणी सुद्धां फडफर्मास नित्य पावती करावी. याप्रमाणें शहानें बरदास्त केली. उभयतांचा स्नेह कायम होऊन तह ठरला. आकण्णा व मादण्णापंतांनीं शिवाजीस मेजवानी केली.

हिंदुधर्माची वृद्धि व्हावी हा त्यांचा हेतु, तदनुसार शिवाजीचें करणें पाहून, त्यांस तो महाराष्ट्रवीर केवळ देवमाणूस वाटला, व कर्नाटकांतील शिवाजीच्या मसलतीस चित्ताविर्तानिशीं मदतगिरी करावयाची त्यांनीं ठरविली. शिवाजीनेंही शहास व अमीरउमरावांस मोठी मेजवानी व नजरनजराणे देऊन संतुष्ट केलें. मादण्णा व आक्कण्णा या बंधुद्वयासही मेजवानी देऊन शिवाजीनें त्यांचा मोठा गौरव केला. उभयतांचा स्नेह वृद्धिंगत झाला. एकमेकांनीं एकमेकांस साहाय्य करावें, कोणीं कोणास अंतर देऊं नये, शिवाजी कर्नाटकांत जाऊन मुलूख जिंकील त्याचा अर्धा हिस्सा कुत्बशहास द्यावा; आणि कुत्बशहानें आपला तोफखाना शिवाजीचे मदतीस द्यावा, असा पक्का ठराव झाला. तसेंच विजापुरांत दिलीरखान व बुहलोलखान यांनीं कारस्थान करून दक्षिणचा प्रदेश मोगलांचे ताब्यांत देण्याचा घाट चालविला आहे, तो बंद पाडण्याची खटपट करावी असें ठरलें. सारांश मोगल बादशहास दक्षिणेंत येऊं द्यावयाचें नाहीं हा जो शिवाजीचा संकल्प, त्याचीच पूर्तता ह्या सर्व खटपटीनें करावयाची होती; आणि मादण्णापंत व रघुनाथपंत या मुत्सद्यांचा डाव शिवाजीच्या मार्फत तडीस जाण्याचा होता. याप्रमाणें गोवळकोंड्याची मसलत पुरी करून मग शिवाजीनें दक्षिणेकडे कूच केलें.

५. कर्नाटकची स्वारी व व्यंकोजीचा रुसवा.—तेथून तुंगभद्रातीरीं प्रेमळ येथें मुक्काम झाला. तेथें आनंदराव देशमुख कर्नोळकर ( कडप्यानजीक ) येऊन भेटले, व पांच लक्ष होन खंडणी देण्याचें ठरवून निशा देऊन निरोप घेऊन गेले. तेथून बारा कोसांवर श्रीशैलमल्लिकार्जुन व निवृत्तिसंगम या ठिकाणची तीर्थयात्रा शिवाजीनें केली. तुंगभद्रेस चिरेबंदी घाट व मठ, धर्मशाळा वगैरे बांधून, व नानाविध दानधर्म करून स्वारी मद्रासेवरून चंदी ( जिंजी ) प्रांतीं गेली ( मे १६७७ ). तत्पूर्वी वेलोरचें ठाणें काबीज करण्यास फौज पाठविलेली होती. त्या फौजेनें वेलोरनजीकच्या डोंगरावर साजरागोजरा नांवाचा किल्ला बांधून, तेथून वेलोरवर तोफांचा मारा करून किल्ला हस्तगत केला. शिवाजीचा मुक्काम चंदीनजीक चक्रावती नदीचे कांठीं चक्रापुरीं असतां, चंदी किल्ल्यावरील विजापुरचा अधिकारी अंबरखान व त्याचे रूपखान व नासीरमहंमद वगैरे आठ मुलगे यांनीं, शिवाजीशीं लढून निभाव लागणार नाहीं हें

जाणून, रघुनाथपंताचे विद्यमानें किल्ला खाली करून दिला. शिवाजीनें रामजी नलगे यास किल्ल्याची हवालदारी दिली; आणि तेथील सुभा विठ्ठल पिलदेव गरुड यास सांगितला. तसेंच महाराष्ट्रांतील बंदोबस्ताप्रमाणेंच कर्नाटक प्रांतांतही जमिनीची मोजणी, प्रतबंदी व साऱ्याची आकारणी वगैरे पद्धति सुरू केल्या. पुढें कांहीं दिवसांनीं चंदी प्रांताची सुभेदारी शिवाजीनें आपला जावई हरजीराजे महाडिक यास दिली, आणि त्याजकडून त्या प्रांताचा बंदोबस्त फार चांगला ठेवविला. हरजी राजे हा मुत्सद्दी व पराक्रमी होता. त्याच्या व्यवस्थेमुळेंच पुढें राजारामास या जिंजीप्रांताचा फार उपयोग घडला. तेथून कावेरीतीरीं त्रिनमल्ली ऊ० त्रिवादी येथें शिवाजीचा मुक्काम पडला. हा प्रांत विजापुरचा असून तेथें शेरखान नांवाचा अधिकारी होता.

कर्नाटकांतील ही स्वारी शिवाजीनें प्रथम गोवळकोंड्याच्या तर्फेनें केली. परंतु पुढें गोवळकोंड्याची मदत येणें बंद झालें, तेव्हां शिवाजीनें स्वतः-च तो उद्योग तडीस नेला. या प्रसंगीं शिवाजीची दहशत तिकडील लोकांस किती पडली होती हें इंग्रजांच्या खालील लेखावरून दिसून येतें.

'शिवाजी महाराज द्राविडदेशांत शिरले हें वर्तमान चोहोंकडे पसरलें, तेव्हां सर्व लोक पराकाष्ठेचे घाबरून गेले. तो मोठा भयंकर पुरुष असून त्याने पश्चिम किनाऱ्यावरील प्रांताचे प्रांत लुटून जाळून उद्ध्वस्त केले, व यवनपादशहांस त्राहि त्राहि करून सोडिलें, अशी त्याची ख्याति चोहोंकडे पसरली होती. यास्तव त्या लोकांस त्याची फार दहशत वाटूं लागली. आपली आतां धडगत कशी लागते याचा ज्याला त्याला विचार पडला. द्रव्य कोठें आहे, व कोणावर हल्ला केला असतां खचित द्रव्यलाभ व्हावयाचा हें कांहीं दैवी शक्तीच्या योगानें शिवाजी महाराजांला कळत असून ते जातील तिकडे त्यांस हटकून यश प्राप्त व्हावयाचें, असा त्या लोकांचा समज होऊन गेला होता.'

त्रिवादी येथें शहाजीराजे यांच्या नाटकशाळेचा पुत्र संताजी म्हणून होता तो व्यंकोजीशीं भांडून शिवाजीस येऊन भेटला. त्यास सन्मानानें वागवून शिवाजीनें चंदीचे ठाण्यांत मुख्य म्हणून ठेविलें. नंतर भाऊ व्यंकोजी यास पत्र लिहिलें, कीं 'वडिलार्जीत मिळकतीचा निम्मे हिस्सा द्यावा. तुम्हीं जुनीं मनुष्यें उठवून लाविलीं, त्या अर्थीं सरबराई करतां फळ नाहीं.

तुम्हीं समजून तोडजोड काढिल्यास आम्हांस तिकडे येण्याचें कारण पडणार नाहीं. उत्तर येईल तसें करूं,' इत्यादि. त्याजवर व्यंकोजीनें आपले पदरची कांहीं मंडळी बोलाचाली करण्यास पाठविली. त्यांचीं बोलणीं होऊन शिवाजीनें दौलतीचा वांटा मागण्याकरितां आपलेकडील आणखी मंडळी देऊन त्या सर्वांस व्यंकोजीकडे पाठविलें. व्यंकोजी मुसलमानांचे भरंवशावर राहून शिवाजीस मिळण्यास तयार नव्हता; तथापि उघड वैर दाखविण्याचा हा प्रसंग नाहीं असें जाणून तो शिवाजीचे भेटीस गेला. हीच दोघां भावांची पहिली व शेवटची भेट असें विल्कूस् म्हणतो ( पृ. ८४ ). त्या भेटींत त्यानें मोकळया मनानें शिवाजीची समजावणी केली नाहीं. शिवाजीनें बारंवार सांगावें कीं- ' वडिलांचे संपादिल्या अर्थाचे उभयतांही विभागी; तुम्हीं आम्हांस कांहींच न कळवितां आपले विचारांनीं वहिवाट केली. तुम्हीं संपादल्या दौलतींत आम्हीं विभाग मागत नाहीं. तुम्हांस ईश्वरानें सामर्थ्य द्यावें; नवीन संपादावें. परंतु वडिलांचे जोडीचे अर्थात आमचे विचाराशिवाय करणें चालणें तुम्हांस विहित नाहीं. काय दौलत आहे त्याचे कागदपत्र समजवावे. तुम्ही आम्ही समजून चालूं. तुम्हांस जड पडेल तेथें आम्ही मदत देऊं. कोणेविशीं मनांत खतरा ठेवूं नये. ' व्यंकोजीनें ' आज्ञा प्रमाण,' या शब्दांपलीकडे कर्तव्याकर्तव्यतेचें बोलणें काढिलें नाहीं. शिवाजीचे मनांतला उद्देश हा, कीं ' उभयतां शहाजीचे पुत्र, त्यांत वडीलपणा मजकडे; माझे विचारांनीं चालावें, तें राहून आपमुखत्यारीनें दौलतीचा खराबा करितात; जुन्या मनुष्यांचा त्रास करून घालवितात; यवनांचा संग्रह करितात; मराठे हिंदु लोकांचा अपमान करून खुशामती हलकीं मनुष्यें यांचा आदर ठेवितात. रघुनाथपंताचे विचारें चालावें, म्हणजे आमचा वांटा आम्हांस पावला. आम्हीं मार्ग सांगावा त्याप्रमाणें चालावें, म्हणजे आम्हांस या दौलतीपैकीं काय घ्यावयाचें ? यांजवळ आहे ती आमचीच आहे. ' व्यंकोजीच्या पदरच्या माणसांनींही त्यास परोपरी समजाविलें, परंतु त्याची समजूत पडली नाहीं. दोन अडीच महिने व्यंकोजी शिवाजीजवळ होता. शेवटीं शिवाजीनें नाराज होऊन व्यंकोजीस निरोप दिला. जातेसमयीं सर्व मंडळीस मेजवानी, पोषाख, जवाहीर वगैरे देऊन शहाजीपेक्षांही शिवाजीनें आपल्या भावाचा सत्कार अधिक केला. आपल्या उदार वर्तनानें व्यंकोजीच्या मनुष्यांचीं

युद्ध। मग शिवाजीनें आपणाकडे वेधून घेतलीं, तेव्हां तेही व्यंकोजीस चाहीतनासे झाले. शिवाजीनें पुनरपि वकील पाठवून, व्यंकोजीकडे दौलतीचा वांटा मागितला. 'हल्लीं त्रिवर्ग पाठविले आहेत. यांजजवळ निकाल करून द्यावा. न दिल्यास वांटा सुटणार नाहीं, द्यावा लागेल. तुम्ही विचारांनीं चालल्यास कमी ज्यास्तीचा विचार घरांतील आहे.' त्याजवर व्यंकोजीनें उत्तर दिलें, कीं 'वडील असतां शिवाजी महाराजांनीं बंडपणा पादशहाशीं केला. तमाम मुलूख घेतला, त्यामुळें वडिलांस कित्येक प्रकारें इजा झाली. आम्ही वडिलांजवळ तंत्र देऊन राहिलों. त्यामुळें बादशहांनीं दौलत रक्षिली. वांटा देणें ही वतनदारी तरी नाहींच. वतनबाब असेल त्याचा वांटा घ्यावा. चाकरीची दौलत सर्व विजापुरचे शहाची; आम्ही शहाचे चाकर; त्यांचे हुकुमाचे मालक; यांत तुमचा संबंध नाहीं.' व्यंकोजीचा हा जबाब त्याच्या कांहीं सल्लामसलतगारांच्या शिकवणीनें दिलेला होता. शिवाजीचा पाडाव करण्याविषयीं मदुरा व म्हैसूर येथील नायकांचा मनोदय असून त्यांनीं व्यंकोजीस विशेष भर दिली. तेव्हां प्रसंगीं शिवाजीशीं दोन हात करण्याचा निश्चय व्यंकोजीनें आपल्या मनाशीं ठरविला. तसेंच त्यानें विजापुरचे दरबारीं ही सर्व हकीकत लिहून कळविली. परंतु दरबारांत या वेळीं कांहींच तालतंत्र राहिलें नव्हतें. शिवाजी त्यांस आटपत नव्हता. विजापुराहून व्यंकोजीस आलेला जबाब पाहिला, म्हणजे दरबारच्या स्थितीची चांगली अटकळ करितां येते. 'गृहकलह करून सरकारांत दुष्मनी आणतां याचें कारण काय ? आम्हीं न देण्याचा मजकूर लिहिला असतां, त्यांणीं आमचे अंमलास खलेल करावी, स्पर्धा वाढवावी हें नीट नाहीं. त्यांचे ( शिवाजीचे ) वडील आमचे चाकर; दौलत खातील ते आमची चाकरी करतील. शत्रुत्व नसोन शिवाजी मित्रत्व ठेवून चाकरीचा हक्क मागत असल्यास, वाजवी असेल तें देणें. वडील अधिकारी ते दौलतीस मालक आहेत.' विजापुर दरबार शिवाजीची शक्ति ओळखून होतें. व्यंकोजीच्या मनांत मात्र दरबारच्या पाठीमागें लपून आपल्या बंधूचें वर्चस्व कबूल करावयाचें नव्हतें. विजापुर दरबारकडून हा जबाब आल्यावरही व्यंकोजीस कित्येक मुसलमानांनीं शिवाजीशीं युद्ध करण्याची भर दिली. दरबारचा जबाब शिवाजीसही आंतून कळला. गृहकलह वाढूं नयेत,

म्हणून युद्धाविषयीं साफ जबाब शिवाजीनें दिला नाहीं. परंतु व्यंकोजीनें चाल करतांच त्याजवर चालून जाण्यास शिवाजीची फौज हजर होती. हंबीरराव मोहिते, संताजीराजे व रघुनाथपंत यांच्या हाताखालीं असलेल्या टोळीशीं व्यंकोजीची गांठ पडून, वालगोंडपुरच्या* लढाईत व्यंकोजीचा पराभव झाला, आणि त्याचे बरेच लोक पाडाव होऊन शिवाजीच्या हातीं पडले. शिवाजी डबीर व शहाजीच्या नाटकशाळेचे दोन पुत्र प्रतापजी राजे व भिवजीराजे हे व्यंकोजीच्या बाजूनें लढत असलेले पाडाव होऊन शिवाजीच्या हातीं सांपडले, असेंही वर्णन आहे. तेव्हां व्यंकोजी हताश झाला. लढाईचा मजकूर शिवाजीस कळल्याबरोबर, त्यानें भावास आर्जवाचें व समजुतीचें पत्र लिहिलें, त्यांतील भाव, कीं 'घडलेला प्रकार अनिष्ट झाला; आतां तरी पत्र पावतांच अर्धा वांटा वडीलकी सुद्धां द्यावा; या उपरी वडिलांचे चालींनीं चालावें; दुष्ट दुर्मद मर्दावे; प्रजेचे आशीर्वाद घ्यावे. मार्गाचें असेल त्यास इकडून अंतर होणार नाहीं. दौलत तुम्हांजवळ तीच आम्हांजवळ. परंतु मुलखीं वांटा घेण्याचें कारण भाऊपणाचा वारसा पुढें मागें होऊं नये. उभय पक्षीं बेकिलाफ चालावें. परस्परें हिताहित जाणावें. हें न कराल तरी तुंगभद्रातीरापासून पन्हाळ्यापर्यंत तीन लक्ष होनांची जागा तुम्हांस तुमचे मर्जीजोगी पाहिजे तेथें घ्यावी. बाकी आमचा अंमल आम्ही करूं.'

६. दोघां बंधूंचा पत्रव्यवहार व तह.—ह्या प्रसंगीं शिवाजीनें व्यंकोजीस खालील पत्र लिहिलें, त्यावरून या दोन बंधूंच्या कलहांतील बहुतेक भाग अस्सलपणें नजरेस येईल. हें पत्र बाळाजी आवजीच्या हातचें ग्रँट डफ यास मिळालें होतें.

---

* विल्कूस् म्हणतो, 'ह्या लढाईंत शिवाजीचा सेनापति संताजी म्हणून होता त्याचा व्यंकोजीनें पराभव केला. हा संताजी शिवाजीचा भाऊ असें मद्रास-दप्तरांत लिहिलें आहे तें खोटें आहे. हा गुत्तीकर घोरपड्यांचा मूळ पुरुष संताजी घोरपडे होय.' विल्कूसचें हें म्हणणें खरें नाहीं. संताजी हा शहाजीच्या नाटकशाळेचा मुलगा असून शिवाजीचा भाऊच होय. लढाईंतील जयापजयाविषयीं तर मतभेद आहेच.

'श्री महादेव. श्री कुलस्वामिनी.

श्री सहस्रायु चिरंजीव अखंडितलक्ष्मीअलंकृत राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री येकोजी राजे प्रति राजश्री शिवाजी राजे, आशीर्वाद. येथील क्षेम जाणोन स्वकीय कुशललेखन केलें पाहिजे. उपरी. कैलासवासी साहेबीं कैलासवास केला, त्यास आज तेरा वर्षे झालीं. महाराजांचे पैके व जडाव व हत्ती व घोडे व मुलूख अवघेही राजश्री रघुनाथपंतीं तुम्हांला राज्यावर बैसवून संपूर्ण राज्य तुमचे हातीं दिलें. ऐशियास आमचा अर्धा वांटा तेरा वर्षे तुम्हींच खादला. आम्हीं जरी तुम्हाजवळी मागावें, तर बहुत दूर होतां. बऱ्या बोलें तुम्ही देणार नव्हां. म्हणून तेरा वर्षे सबुरी केली. मनामध्यें ऐसा विचार केला, कीं बरें, महाराजांचे पुत्र तेही आहेत. खाती तोंवरी खात. मालाचे धनीच आहेत. जे समयीं आम्हांला फावेल, ते समयीं आम्ही वेव्हार समजोन घेऊं. असें मनीं धरोन राहतों. ऐशीयास राजकरण-प्रसंगें आम्ही कुत्बशहाचे भेटीस भागानगरास गेलों. तेथून कर्नाटकांत गेलों. चंजीस आलों. चंजी घेतली, व येलूरतर्फेचा मुलूख घेतला, व सदरखानास ( शेरखानास ? ) झगड्यांत मोडून गर्दीत मेळाविलें. सदर-खानाचे हातीं मुलूख होता तेवढाही घेतला. त्यावरी मजल दरमजल कावेरीतीरास गेलों. तेथून तुम्हांला पत्रें लिहिलीं, कीं राजश्री गोविंदभट गोसावी व राजश्री काकाजीपंत व राजश्री निळोबा नाईक व राजश्री रंगोबा नाईक व तिमाजी यक्षियार राऊ असे भले लोक आम्हांपाशीं पाठ-विणें, म्हणून तुम्हांला बहुतां रीतीं लेहून पाठविलें. त्यावरून सदरहू भले लोक आम्हांपाशीं पाठवून दिले. त्या भल्या लोकांशीं बहुतां रीतीं घरोबि-याचा व्यवहार सांगून आमचा अर्धा वांटा आम्हांस बऱ्या बोलें द्या म्हणून सांगून पाठविलें. व त्यांबराबरी राजश्री बाळंभट गोसावी, व राजश्री कृष्ण ज्योतिषी, व कृष्णाजी शेखजी असे आपले तर्फेनें भले लोक दिल्हे. हे भले लोक तुम्हांजवळी जाऊन बहुतां रीतीं बोलले, कीं घरकलह करूं नये. आपला अर्धा वांटा मागतात तो द्यावा. असें बोलले. परंतु कपटबुद्धि तुम्हीं ऐसी मनीं धरिली, कीं या समयांत आम्ही थोर राजे झालों आहों. आम्हांसी आपण खासा भेटीस येऊन तुम्हांजवळ नरमी बहुत दाखवावी, आणि आमचा वांटा बुडवावा. तेरा वर्षे सारें राज्य आपणच खादलें. पुढेंही आपणच सारें राज्य खावें. अशी बुद्धि मनीं

धरून वांटियाचा निवाडा तह न करितां आपण खासाच आमचे भेटीस आले. यास आमची व तुमची भेट जहाली. त्याउपरी आम्ही बहुतां रीतीं तुम्हांसी बोलिलों, कीं आमचा अर्धा वांटा द्या. परंतु तुम्ही वांटा द्यावा हा विचार मनीं धराचना. मग जरूर जाहलें, कीं तुम्ही धाकटे भाऊ; आपण होऊन आमचे भेटीस आले (त), यास तुम्हांला धरावें आणि वांटा मागावा ही गोष्ट थोरपणाचे इजतीमध्यें लायख नव्हे. यानिमित्त तुम्हांला चंजाउरास जाण्याचा निरोप दिला. तुम्ही चंजाउरास गेलेसी. त्याउपरी गृहकलह वाढवूं नये, वाढविल्यानें पहिले युगीं पांडव कौरव बहुत कष्टी झाले; ते सारी भारताची कथा मनांत आणून गृहकलह वाढविलियांत उभय पक्षीं कष्टी होईजेतें. असें मनांत जाणून राजश्री श्यामजी नाईक व कोन्हेरीपंत व शिवाजी शंकर यांहातीं मागतें बहुतां रीतीं सांगून पाटविलें, कीं तुम्ही व आम्ही वांटे करून घेऊं; परस्परें समाधानें राहूं. परंतु तुम्हीं दुर्योधनासारखी दुष्टबुद्धि धरून संधि न करावा, युद्ध करावें ऐसेंच मनीं धरिलें. ऐशियास आम्हांला रायगड प्रांतें बहुत कांहीं कार्य होतें. या निमित्तें चिरंजीव संताजी भोसले व राजश्री रघुनाथपंत व राजश्री हंबीरराव असे ते प्रांतीं ठेवून आम्ही स्वार होऊन तोरगळ प्रांतास आलों. येथें अशी खबर ऐकली, कीं तुम्हीं तुरुक लोकांच्या बुद्धीस लागून, आमचे लोकांशीं झगडा करावा असें मनीं धरून आपली सारी जमेत एकवट करून आमचे लोकांवर पाठवून दिलेत. ते वालगोंडपुरास आले. तुमचे लोक चालून आल्यावर तुमचे आमचे लोकांत थोर झगडा झाला. तुमचे लोक पराजय पावले. प्रतापजी राजे व भिवजी राजे व शिवाजी डबीर असे तिघे धरिले, व कितीएक लोक मारिले. कितीएक लोक पळून दाणादाण होऊन गेले. ऐसा समाचार ऐकिला. हें ऐकून बहुत नवल असें वाटलें, कीं कैलासवासी महाराज, त्यांचे तुम्ही पुत्र, बहुत थोर लोक, ऐसें असून कांहीं विचार करीत नाहीं व धर्माधर्म विचारीत नाहीं. असे असतां कष्टी व्हाल याचें नवल काय? तुम्ही म्हणाल कीं काय विचार करावा? तरी ऐसा विचार करावा होता कीं, अधर्मेंकरून तेरा वर्षें आपण सारें राज्य खादलें तें खादलें; आतां अर्धावांटा मागतात तो त्यांचा त्यांस द्यावा; आणि आपण सुखी राहावें; ऐसा विचार करावा होता. दुसरा विचार करावा होता, कीं श्री देवाची व श्रीची कृपा त्यांवरी पूर्ण

झाली आहे. दुष्ट तुरुकांला ते मारितात. आपल्या सैन्यांत तुरक लोकच असतां जय कैसा होतो, आणि तुरक लोक कैसे वांचूं पाहतात. हा विचार करावा होता; आणि युद्धाचा प्रसंग पाडावा नव्हता. परंतु दुर्योधनासारखी बुद्धि करून युद्ध केलें आणि लोक मारविले. जें जाहलें तें जाहलें. पुढें तरी इष्ट न करणें. तेरा वर्षे तुम्हीं सारें राज्य खादलें तें खादलें. या उपरी कितेक ( प्रांत ? ) आमचे आम्हीं घेतले असे. अरणी, बंगरूल, कोलार, हुसकोट, शिराळकोट व किरकोळ जागे व चंजाऊर असे जागे तुमचे हातीं उरले आहेती, ते आमचे लोकांचे हातीं देणें. आणि जमेत, पैका व जडाव व हत्ती व घोडे यांचा अर्धा वांटा देणें. ऐसा विचार करून आम्हांशीं संधि करणें. तुम्ही ऐसा संधि निर्मलपणें केलीया आम्ही आपणापसून तुम्हांला तुंगभद्रे अल्याड पन्हाळे प्रांतें तीन लक्ष होनांची दौलत देऊं, अथवा आम्हांजवळील दौलत तुम्हाला मानेना, तरी कुत्बशाहास अर्ज करून त्यापासून तुम्हांस तीन लक्षांची दौलत देऊं. असे दोनही विचार तुम्हांला लिहिले आहेत. या दोनही मधील एक मनीं धरून मान्य करणें. दुष्टाचे हातीं न देणें. आपल्या आपल्यांत आपण कलह करावा आणि कष्टी व्हावें याचें कांहीं प्रयोजन नाहीं. या उपरी तरी आमचा आपला संधि व्हावा असे बुद्धि मनीं धरून वांटियाचा व्यवहार निर्गमून टाकणें, आणि सुखी राहणें. गृहकलह बरा नव्हे. आम्हीं रीतीनें वडीलपणें आजवरी तुम्हांला सांगितलें. आतांही सांगतों. ऐकाल तरी बरें. तुम्ही सुख पावाल. न ऐकाल तरी तुम्हीच कष्टी व्हाल. आमचें काय चालतें ? बहुत काय लिहिणें.'

हें सबंध पत्र येथें देण्याचें प्रयोजन विशेष आहे. त्याजवरून अनेक गोष्टी उघडकीस येतात. प्रथमतः ह्या कर्नाटक स्वारींत शिवाजीनें काय काय गोष्टी केल्या, कोणकोणत्या ठिकाणीं तो गेला, कोणकोणते प्रांत त्यानें जिंकिले, इत्यादि गोष्टींचें निरूपण त्यांत आहे. दुसरी गोष्ट त्यावरून व्यक्त होते ती ही कीं, हें पत्र बहुतांशांनीं शिवदिग्विजयकारानें आपल्या बखरींत घेतलें आहे. ह्या बखरींत शिवाजीच्या कर्नाटकस्वारीची हकीकत फारच विस्तारानें सुमारें ६०–७० पानें दिलेली आहे. त्यांत बहुतेक अस्सल कागद पत्रांचे उतारे घेतले आहेत, यावरून त्या वेळचा अस्सल पत्रव्यवहार बखरकारास सर्वस्वी उपलब्ध झालेला होता, हें वरील पत्रावरून उघड होतें. म्हणून त्या बखरींतील ह्या कर्नाटकस्वारीची हकीकत अक्षरशः

खरी मानण्यास हरकत नाहीं. तिसरी गोष्ट अशी, कीं जरी ह्या पत्रावर मिति नाहीं, तरी शहाजी वारल्यानंतर तेरा वर्षांनीं हें पत्र लिहिलें आहे, असा त्यांत वारंवार उल्लेख आहे. ह्यावरून शहाजीच्या मरणाचा व ह्या स्वारीचा काल निश्चित होतो. कर्नाटकांतील एकंदर प्रकार घडण्यास वर्षसहामहिने तरी लागले असावेत. ह्यावरून ही स्वारी सन १६७७ त झाली व शहाजी १६६४ त मरण पावला असें सिद्ध होतें.

इतकें जरी हें पत्र उपयोगाचें आहे, तरी भावाशीं भांडण्याचा शिवाजीचा अंतस्थ हेतु ह्यांत स्पष्टपणें शब्दांनीं व्यक्त केलेला नाहीं. तो हेतु इतर पुराव्यावरून दिसून येतो. मुसलमानशाही पादाक्रांत करून मराठ्यांचें सार्वभौम राज्य स्थापन झालें ही गोष्ट निर्विवाद सिद्ध करण्याचा शिवाजीचा मुख्य उद्देश होता. व्यंकोजीला स्वतंत्र रीतीनें राहूं द्यावयाचें नाहीं, त्यानें आपणास विजापुरचा ताबेदार समजूं नये; मराठ्यांचीं दोनें भिन्न राज्यें असूं शकणार नाहींत, हें शिवाजीच्या मनांत व्यक्त करावयाचें होतें. बाकी पैशाच्या किंवा सुखोपभोगाच्या संबंधानें व्यंकोजीचे हाल व्हावे, असें शिवाजीस बिलकुल वाटत नव्हतें. विजापुरची ताबेदारी व्यंकोजीच्या अंगीं खिळलेली होती; तिचें समूळ उच्चाटन करण्याकरितांच दक्षिणेंत दुसरी जहागीर तुम्हांस देतों, अगर मुसलमान धनी पाहिजे असाच आग्रह असेल, तर निदान कुत्बूशहाचे पदरीं जहागीर देववितों असें शिवाजीनें भावास कबूल केलें. तुरुक लोकांच्या बुद्धीनें व्यंकोजीनें चालूं नये; त्यांस मारण्याचा आपला अवतार आहे; तेव्हां प्रत्यक्ष आपल्या भावानें आपल्या शत्रूंच्या ताबेदारींत राहवें यासारखें दुसरें लांछन शिवाजीस कांहींच नव्हतें. आम्हांवर श्रीदेवाची कृपा, सार्वभौम राज्य आमच्या हवालीं श्रीनें केलें आहे, हें तो आपल्या भावास वारंवार बोलून दाखवितो. 'आम्ही थोर राजे झालों,' असा व्यंकोजीस गर्व झाला आहे, तो त्याचा गर्व जिरवावयाचा हाच शिवाजीचा हेतु होय. व्यंकोजी आपलें म्हणणें बऱ्या बोलानें सोडीना. तो आपल्या भावास बंडखोर समजे. 'बापास विजापुरच्या कैदेंत यातना भोगाव्या लागल्या,' असले सापत्नबंधूस शोभणारे कुत्सित उद्गार काढून शिवाजीस टाळा देण्याचा त्यानें प्रयत्न केला. व्यंकोजी आपणास पादशाहीचा ताबेदार म्हणवितो, म्हणून शिवाजी त्यास उपदेश करितो, कीं शत्रूंना

पादाक्रान्त करून आपलें राज्य आपण परत घ्यावयाचें, कीं भीक घाला म्हणून शत्रूपाशीं तोंड वेंगाडायचें ? ‘मला वतनदारी नाहीं; वतन नाहीं; मी केवळ बादशहाचा नोकर; या नोकरीचा वांटा कसा द्यावयाचा ?’ हे व्यंकोजींचे उद्गार. सारांश व्यंकोजीला शिवाजीची ताबेदारी नको होती. कदाचित् शिवाजीप्रमाणें आपणासही स्वतंत्र राज्य असावें असें त्यास वाटत असेल. आपला हेका तडीस नेण्यासाठीं त्यानें विजापुरकरांस लिहून पाहिलें. तिकडूनही बंदोबस्त होईना, तेव्हां शेवटचा उपाय शस्त्रधारण, तो त्यानें करून पाहिला. त्यांतही अपयश आल्यावर त्यानें वैंताग सुरू केला, पण त्यापासूनही कांहीं फायदा झाला नाहीं. तेव्हां निरुपायास्तव शिवाजीनें केलेला ठराव त्यानें निमूटपणें कबूल केला. पण अनेक अडचणींमुळें तंजावरकडील प्रांतावर आपला हक्क बजावण्यास शिवाजीस किंवा त्याच्या लोकांस अवकाश मिळाला नाहीं.

शिवाजीचें वरील पत्र वाचून व्यंकोजीस अत्यंत उदासीनता प्राप्त झाली. रात्रंदिवस चैन नाहीं. तेव्हां व्यंकोजीची स्त्री दीपाबाई हिनें त्याचें समाधान केलें; आणि रघुनाथपंतास शरण जाऊन त्याजकरवीं शिवाजीचें समाधान करण्याची सल्ला दिली. त्याप्रमाणें रघुनाथपंतास व्यंकोजीनें लीनतेचें पत्र लिहून भेटीस बोलाविलें. रघुनाथपंत जिंजीहून तंजावरास जाऊन व्यंकोजीस भेटला. व्यंकोजीनें त्याचा सत्कार चांगला केला. दीपाबाईनेंही रघुनाथपंताची परोपरी विनवणी केली. तेव्हां दोघां भावांचा तह रघुनाथपंतानें करून दिला. तहाचे कागदपत्र सनदा, सोडचिठ्या, वांटा, बक्षीस सुद्धां सर्व कागदपत्रें लिहून पंतांनीं शिवाजीकडे पाठविलीं, आणि आपण निघून आपल्या कामावर चंदीस गेला.

रघुनाथपंताच्या लेखाअन्वयें शिवाजीनें तहाची मान्यता दाखवून जो जबाब लिहिला, त्यांत असा मजकूर आहे, कीं ‘आमची भावजई शहाणी, पुढील होण्यमाण जाणून विचारावरी आणिलें; उत्तम झालें. आम्हांस विभाग घेऊन तरी काय कर्तव्य ? त्यांजकारितांच संपादन करणें. जनरीति म्हणून बोलणें आलें. आम्हांस तरी मेळवून काय कर्तव्य. पदरचीं मनुष्यें यांचें चालावें, आपली कीर्ति उरावी इतका अर्थ. विचारांनीं चाललें असतां तुम्हांस फार श्रेयस्कर आहे’. असें म्हणून रघुनाथपंतास पत्राचा जबाब शिवाजीनें पाठविला. रघुनाथपंतानें दक्षिणेंतील मुज्मीचा कारभार

आपला भाऊ जनार्दन पंडित यास सांगून, स्वतः व्यंकोजीचा कारभार पाहवा व कर्नाटकाचा बंदोबस्त ठेवावा, असें शिवाजीनें लिहिलें. ह्या प्रसंगीं व्यंकोजीशीं जे करार करावयाचे ते शिवाजीनें लिहून पाठविले, त्यांतील मुख्य कलमें व वर्तनाचे नियम येणेंप्रमाणें:—

( १ ) सोयरे मानकरी यांचा बंदोबस्त माफक करून, अपमान होऊं न देतां आदर ठेवावा, कामांत वागवूं नयेत. ( २ ) दरखदार व कामदार यांचे इतल्ल्याशिवाय कामकाज होऊं नये. लौकिकांत त्यांचे हातीं कांहीं नाहीं, असें दिसूं नये. दरखांत खलेल करूं नये. भूषण देऊन चालवावें. ( ३ ) शागीर्दपेशा मंडळी चांगली कुलीन इमानी पाहून जवळ कृपेंत ठेवावे. बातमी सर्वांठायींची राखावी, परंतु ऐकतात असें दुसऱ्यास कळूं न देतां जरबेंत वागवून, नाजूक कामीं चाकरी घेत जावी. ( ४ ) शत्रुमित्राचे ठायीं संस्थानमाफक वकील व बातमीदार ठेवून दुसऱ्यास न समजतां, सर्व जागेंतील बातमी आणवीत असावी. ( ५ ) पागा, पथकें, तोफा, वगैरे कारखाने कायम व हुशारींत ठेवावे; व चाकरीचा राबता नित्य ठेवावा. गाफिली येऊं देऊं नये. ( ६ ) दुष्ट, हिंदुद्वेषी यांस आपले राज्यांत ठेवूं नये; व बंदोबस्त राखावा. ( ७ ) लहानथोरांशीं तह वगैरे करितांना तंटा न पाडतां गोरगरीब अनाथ यांचा अभिमान धरून चालावें. ( ८ ) देवस्थानें वगैरेचा बंदोबस्त चांगला ठेवून उच्छेद करूं नये. ( ९ ) फिर्यादीचा इनसाफ तोडतांना पैशाचा लोभ न धरितां गोरगरिबांचा अभिमान धरून चालावें. ( १० ) वचनप्रमाण झाल्यावर दंडेली करणें हें आपले कुलांत झालें नाहीं व पुढें होऊं नये.

येथपर्यंतचे नियम सामान्य वागणुकीचे असून यापुढचे मुलखाच्या वांटणीचे व बंदोबस्ताचे आहेत, ते असेः—( ११ ) अरणी प्रांत वेदोभास्कर व त्याचे आठ मुलगे यांजकडे चालवावा, त्यांस कोणतेंही प्रकारची तोसीस लावूं नये. हा वेदोभास्कर शहाजीचा विश्वासु ब्राम्हण सरदार अरणी येथें होता. शिवाजीनें कर्नाटकांत स्वारी केल्याबरोबर व्यंकोजीस न जुमानतां तो येऊन शिवाजीस मिळाला. या कृत्या-बद्दल रागास येऊन व्यंकोजी कदाचित् त्याचा सूड घेईल सबब हें कलम शिवाजीनें मुद्दाम घातलें. ( १२ ) विजापुरकरांचा व आमचा (शिवाजीचा) वडिलांमार्फत तह ठरला, त्यांत विजापुरकरांची चाकरी आपण अगर

व्यंकोजी करणार नाहीं, प्रसंग पडेल तेव्हां इमानें इतबारें मदत करूं, त्यास अंतर पडणार नाहीं, इतकेंच ठरलेलें आहे. तरी त्याप्रमाणें पांच हजारपर्यंत फौजेची मदत विजापुरकरांनीं मागितल्यास करीत जावी; चाकरी करणें असें समजूं नये. हें कलम मोठें खुबीचें आहे. व्यंकोजीच्या मनांतून विजापुरकरांची तावेदारी शिवाजीनें कशी काढून टाकिली हें यावरून चांगलें व्यक्त होतें. तसेंच नवीन पाळेगार व संस्थानिक यांजवर आपला अंमल बसला आहे तो कायम राखावा. ( १३ ) दक्षिणेंत हिंगणी, बेरडी, देऊळगांव वगैरे ठिकाणीं वडिलार्जित पाटिलक्या वगैरे वतनें आहेत, त्यांजवर व्यंकोजीनें आपला हक सांगूं नये. ( १४ ) वक्तशीर इकडील तिकडे व तिकडील इकडे कोणी माणूस, रघुनाथपंताप्रमाणें रुसून वगैरे गेल्यास, एकमेकांनीं त्याचा परामर्श राखून, जिकडील तिकडे सोंपावें. ( १५ ) बेंगरूळ, वासकोट व सिलेकोट हे दोन लाखांचे प्रांत आम्हीं जिंकिले असून, ते पांच लाखांपर्यंत उत्पन्नास येतील. ते आम्ही चिरंजीव दीपाबाई ( व्यंकोजीचें कुटुंब ) यांस चोळीबांगडीसाठीं दिले आहेत. त्यांजवर देखरेख व्यंकोजीनें राखावी, परंतु हक सांगूं नये. हे प्रांत मुलीच्या वंशाकडे चालावे; व सौभाग्यवती देतील त्यांनीं खावेत. ( १६ ) चंदीनजीकचा आम्हीं सोडविलेला सात लाख होनांचा मुलूख व्यंकोजी राजे यांस दूधभाताकरितां म्हणून वंशपरंपरा देण्यांत येत आहे. ( १७ ) कर्नाटकांत एक लाख उत्पन्नाचे गांव रघुनाथपंत यांस वंशपरंपरेनें देण्यांत येत आहेत. त्यांनीं मर्जीप्रमाणें पसंत करावे म्हणजे सनदा पाठवूं. (१८) एकमेकांचे हद्दींतील चोर वगैरे गुन्हेगार दुसरे हद्दींत गेल्यास ते एकमेकांनीं एकमेकांचे स्वाधीन करण्यास हरकत सांगूं नये. हें एक्स्ट्रॅडिशन कायद्याचें कलम ध्यानांत ठेवण्यासारखें आहे. ( १९ ) शहाजी राजे यांचे छत्रीची नेमणूक व्यंकोजीनें उत्तम प्रकारें चालवावी.

'एकूण ऐकोणीस कलमें लिहिलीं. तुम्हांस ( रघुनाथपंतास ) पसंत असल्यास, चिरंजीवांचे पत्रासोबत त्यांस पावती करून, समजूत द्यावी.' असा मजकूर या पत्रांत आहे. हें एकोणीस कलमी पत्र फारच महत्त्वाचें आहे. त्यावरून शिवाजीचा खरा उद्देश व्यक्त होतो. व्यंकोजीस विजापुरकरांचे ताब्यांतून सोडवून हिंदुपदपादशाहीखालीं आणणें, अर्थात् हिंदु पादशाही पूर्णपणें अस्तित्वांत आली, असें परकीयांस व स्वकीयांस भास-

विणें हाच कर्नाटकच्या स्वारीचा मूळ हेतु होय. प्रत्यक्ष भाऊ विजापुरकरांची सरदारी करीत असतांना, हिंदुपादशाहीचें स्वातंत्र्य लोकांच्या नजरेस कसें यावें ? विजापुरकरांची चाकरी हे शब्द शिवाजीच्या मनास झोंबत होते. बाकी दोघां भावांचा सल्ला झाल्यावर शिवाजीनें व्यंकोजीचा बंदोबस्त फारच उदार अंतःकरणानें केला, हें उघड दिसतच आहे. ह्या दोन बंधूंचा तह स. १६७९ त तडीस गेला; म्हणजे तंजावरचें हें प्रकरण दोन तीन वर्षें सारखें चाललें होतें. अशा प्रकारें शिवाजीनें आपला उद्देश तडीस नेला. या स्वारींत हंबीरराव मोहिते हा सरदार प्रसिद्धीस आला; व त्याजवर शिवाजीचा पूर्ण भरंवसा बसला. तो व्यंकोजीच्या मातुल घराण्यापैकींच असावा असें वाटतें. कर्नाटक प्रांताच्या बंदोबस्ताचें काम शिवाजीनें हंबीररावावरच मुख्यतः सोंपविलेलें होतें.

रघुनाथपंताचे पत्राबरोबर व्यंकोजीस शिवाजीनें पत्र पाठविलें. त्याप्रमाणें रघुनाथपंतानें व्यंकोजीस सर्व प्रकार समजावून त्याचें समाधान केलें. उभयतांकडील लोकांस आनंद झाला. चंदीचंजाऊर प्रांतीं व्यंकोजी राजांचे तहांत दोन अडीच कोटी उत्पन्नाचे महाल राहिले ( शिवदिग्विजय ). याप्रमाणें दोघां भावांचा तंटा कायमचा मिटला खरा; पण व्यंकोजीचें स्वातंत्र्य गेल्यामुळें तो फार उदास झाला. शिवाजीच्या कामगारांनीं सर्व प्रांतांत बंदोबस्त केला, तेथें व्यंकोजीचा अधिकार जाऊन त्यास मनस्वी दुःख झालें. त्यानें खाणेंपिणें सुद्धां सोडिलें. तें वर्तमान कळल्यावर शिवाजीनें पुनरपि समाधानीचें प्रेमपत्र लिहून भावाची उदासीनता घालविली. हें पत्र बाळाजी आवजीच्या हातचें असून शिवाजीनें आपल्या मृत्यूपूर्वी थोडेच दिवस लिहिलें, म्हणून त्याच्या हयातींतलें हेंच शेवटचें पत्र होय. ( इतिहास संग्रह, तंजावर ). तें येणंप्रमाणें.

'श्रियासह चिरंजीव अखंडित लक्ष्मीअलंकृत राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री महाराज व्यंकोजीराजे प्रती राजश्री शिवाजी राजे आशीर्वाद. येथील क्षेम जाणोन स्वकीय कुशललेखन करणें. विशेष. कित्येक दिवस झाले, तुमचें पत्र येत नाहीं. याकरितां समाधान वाटत नाहीं. सांप्रत राजश्री रघुनाथपंतीं लिहिलें कीं, तुम्ही आपले ठायीं उदास वृत्ति धरून पहिलेसारखें आपलें शरीरसंरक्षण करीत नाहीं. सणवार उत्सवादिक हेंही कांहीं करीत नाहीं. सेना बहुत आहे, परंतु उद्योग करून

कार्यप्रयोजन करवावें, हेंही कांहीं करीत नाहीं. वैराग्य धरिलें आहे. एखादे तीर्थीचे जागीं बसून कालक्रमणा करूं ऐशा गोष्टी सांगतां, म्हणोन विस्तारें लिहिलें होतें. तरी या गोष्टी आम्हांस बहुत अपूर्व वाटल्या कीं, कैलासवासी स्वामींनीं कसे कसे प्रसंग पडले ते निर्वाह करून यवनांच्या सेवा करून, आपल्या पुरुषार्थे बाजी संवारून, उत्कर्ष करून घेतला. शेवट बरा निर्वाह केला. तें सर्व तुम्ही जाणतां.त्यांच्या साह्यतेस त्यांच्या बुद्धियुक्ति सर्वही तुम्हांस उपतिष्ठोन त्यापासून शहाणे जाले आहां. त्याउपरी आम्हींही जे जे प्रसंग पडले ते निर्वाह करून कोणे तऱ्हेनें राज्य मिळविलें, हें जाणतां व देखत आहां. असें असोन तुम्हांला ऐसा कोणता प्रसंग पडला जे इतक्याच मध्यें आपल्या संसाराची कृतकृत्यता मानून,नसतें वैराग्य मनावरी आणून, कार्यप्रयोजनाचा उद्योग सोडोन, लोकांहातीं रिकामेपणीं द्रव्य खाऊन नाश करवणें,व आपल्या शरीराची उपेक्षा करणें हें कोण शहाणपण व कोणती नीति ? व आम्हीं तुम्हांस वडील मस्तकीं असतां चिंता कोणे गोष्टीची आहे ? या उपरी सहसा वैराग्य न धरतां मनांतून विषण्णता ( काढून ) कालक्रमण करीत जाणें. सणवार उत्साह पूर्ववत् करीत जाऊन तुम्ही आपलें शरीरसंरक्षण बरें करीत जाणें. जमेती सेवक लोकांना रिकामें न ठेवून, कार्यप्रयोजनाचा उद्योग करून, त्यांपासून सेवा करून पुरुषार्थ व कीर्ति अर्जणें. तुम्ही त्या प्रांतें पुरुषार्थ करून संतोषरूप असलिया, आम्हांस, समाधान व श्लाघ्य आहे कीं कनिष्ठ बंधु असे पुरुषार्थी आहेती. रा. रघुनाथ पंडित त्या प्रांतें आहेती. ते कांहीं इतर नव्हेती, आपले पुरातन तुम्हासीं कोणे रीतीनें वर्तावें हें निपुण जाणितात. आम्हांस मानितात तसे तुम्हांस मानितात. आम्हीं त्यांचे ठायीं विश्वास ठेविला आहे, तैसा विश्वास तुम्हींही ठेवून, कार्यप्रयोजनास परस्परें अनुकूल व साह्य होऊन वर्तत जाणें. पुरुषार्थ व कीर्ति अर्जणें. रिकामें बैसोन, लोकांहातीं नाचीज खाववून, काल व्यर्थ न गमावणें. कार्यप्रयोजनाचे दिवस हे आहेती. वैराग्य उत्तरवयीं कराल तें थोडें. आज उद्योग करून आम्हांसही तमासे दाखविणें. बहुत काय लिहिणे, तुम्ही सुज्ञ असा. '

७. **कर्नाटक स्वारीचा फलितार्थ.**—या कर्नाटक प्रकरणांतील बंधूंच्या तंट्याचा भाग येथें संपला. त्यांत पुष्कळ गोष्टी विचार करण्यासारख्या आहेत. प्रथमतः रघुनाथपंताची कर्तबगारी यांत दिसून येते.

'आधींच पंडित, त्यांत कारभारी, विशेष विद्वजनांचा समागम, न्याय-नीतिपर निष्ठ होते,' असे त्याजविषयीं बखरकाराचे उल्लेख आहेत. शिवाजीचें धोरण पूर्णपणें ओळखून राष्ट्रहित संपादण्याच्या कामीं रघुनाथरावांची त्यास चांगली मदत झाली. 'दोनही कामें रघुनाथपंतांनीं आटोपलीं. व्यंकोजी राजाचें काम करून महाराजांचे मुलखाचें व फौजेचें काम बोभाट न पडे असें चालविलें.' प्रत्यक्ष शिवाजीनें रघुनाथपंता-विषयीं असे उद्गार काढिले आहेत. 'वरकड मनुष्यें आमचे संपादि-त्याचीं; परंतु तुम्ही वडिलोपार्जित सेवक. आम्ही चुकलों असतां शासन करून सन्मार्गास लावणार. अशी योग्यता व उपमा दुसरियास येणें नाहीं. आपण आम्हांस महाराजांचे ठायीं म्हणोन आमचे कल्याणाची इच्छा ठेवितां. वरकडांस हे इच्छा ठेवणें कारण काय! आपणासारिखे आपण एक. इत्यादि.' हणमंते कुटुंबाचा विशेष बडेजाव शिवाजीचे हातून होण्यास मुख्य कारण रघुनाथपंत होय. त्याचा भाऊ जनार्दनपंत हाही त्याचे सारखाच असल्यामुळें शिवाजीनें त्यास डबिराचें म्हणजे पर-राज्यांशीं व्यवहार ठेवण्याचें काम सांगितलें. जनार्दनपंताचा वडील मुलगा गंगाधरपंत याजकडे खासगी महाल बागबगीचे वगैरेचें काम होतें. दुसरा मुलगा श्रीनिवासपंत याची नेमणूक रघुनाथपंताचे हाताखालीं व्यंकोजीचे तैनातीस होती. व्यंकोजीनें त्याजला आपल्या मुजमीची कामगिरी दिली. याप्रमाणें शिवाजी व व्यंकोजी यांचा कारभार एकोप्यानें चालूं लागला. व्यंकोजीही शिवाजीची आज्ञा मोडून चालेनासा झाला. उभयतांचें एक-चित्त अशा चालींनीं चाललें.

दुसरी गोष्ट अशी, कीं शिवाजीच्या सार्वभौम हिंदु पादशाहीच्या कल्प-नेची खरी सांगता या स्वारीनें झाली. आणखी दहापांच वर्षें शिवाजी जगता तर, त्यानें आपल्या राज्याची मर्यादा उत्तरेस वाढवून वरील कल्पनेस प्रत्यक्ष कृतीचें स्वरूप आणिलें असतें, यांत संशय नाहीं. वरील १९ कलमांच्या तहांत शिवाजीनें अरणीकर वेदो भास्कर व रघुनाथपंत यांस मोठ्या जहागिरी तोडून दिल्या, हें कृत्य शिवाजीच्या नेहमींच्या पद्धतीस विरुद्ध आहे. तरी ह्या दोघांच्या कर्तबगारीनें शिवाजीस एवढा मोठा प्रदेश स्वराज्याखालीं आणितां आला, तेव्हां अशा सायकर्त्यांस कांहीं

मोबदला देणें जरूर होतें. ह्यावरूनच शिवाजीच्या ह्या स्वारींतील अचाट उद्योगाची कल्पना करितां येते.

शिवाजी व व्यंकोजी यांजमधील तहाचीं कलमें शिवाजीनें लिहून पाठविलीं, तीं शिवदिग्विजय बखरींतून मतलबापुरतीं वर दिलीं आहेत. या प्रकरणांत इतका पाल्हाळ कदाचित् अयोग्य वाटेल, व कित्येकांस त्याच्या सत्यतेविषयीं संशयही येईल. याजबद्दल इतकेंच सांगितलें पाहिजे, कीं त्या कलमवारींत तत्कालीन राज्यकारभाराच्या कल्पना उत्तम प्रकारें व्यक्त होतात. बखरकारांचे लेख किती सत्य मानावे हा प्रश्न वेगळा आहे; परंतु तत्कालीं प्रचलित असलेल्या कल्पना त्या लेखांत व्यक्त झाल्या आहेत, ही गोष्ट निर्विवाद होय. शिवाजीचीं राज्यकारभाराचीं धोरणें काय होतीं, राज्यरथ हाकणाराच्या अंगीं कोणते गुण पाहिजेत, दोन भिन्न राजांमधील व्यवहार कोणत्या तत्त्वांवर नियमित केलेले असावेत, इत्यादि अनेक विषयांवर शिवाजीचीं मतें काय होतीं त्याची आपणास चांगली कल्पना करितां येते. ह्या कलमांवरून दोघां भावांमधील तंट्याचें स्वरूप स्पष्ट दिसून येतें. शिवाय त्यावरून शिवाजीच्या राज्याचें एकंदर धोरण स्पष्ट होतें; आणि त्यानें स्वतःच हे नियम घालून दिलेले असल्यामुळें स्वतः शिवाजीची राज्य चालविण्याची कल्पना कशी होती, हें त्यावरून आपणांस चांगलें कळतें. अंमलदारांकडून कामें घ्यावीं, स्वतः मन मानेल तसें वर्तन करूं नये, असा नियम शिवाजीनें व्यंकोजीस घालून दिला, यावरून अधिकारी नेमून त्यांजला कामें वांटून देणें, त्यांच्या सल्ल्यानें चालणें, त्यांच्या कामांत मध्यें दखल न करणें इत्यादि प्रकारचे निर्बंध आपणांला लावून घेण्यास शिवाजी तयार होता, असें यावरून दिसतें. शिवाजीच्या राज्यकारभाराचें खरें स्वरूप समजण्यास वर दिलेल्या कलमांची अत्यंत आवश्यकता आहे, एवढेंच नव्हे, तर इतिहासाध्ययन करणाऱ्या विद्यार्थ्यानें त्या कलमांतील प्रत्येक तत्त्व ध्यानांत ठेवण्यालायक आहे. यांतील प्रत्येक तत्त्वाचें विवरण करूं लागल्यास पुष्कळ विस्तार होईल. इंग्रज व इतर युरोपीय राष्ट्रें यांच्या सांप्रतच्या राजनीतितत्त्वांशीं शिवाजीच्या वर दिलेल्या तत्त्वांची तुलना करून पाहिली असतां, त्यांत शिवाजीची बाजू न्यून दिसत नाहीं. बखरींवर भरंवसा कितपत ठेवावा याजविषयीं आज पुष्कळ चर्चा चालू आहे. पण बखरींतील

मजकूर अक्षरशः खरा नसला, तरी एकाद्या विशिष्ट काळांतील प्रचलित कल्पना समजून घेण्यास बखरींचा उपयोग चांगला होईल. अस्सल कागदपत्रांवरून इतिहासाचा मुख्य सांगाडा तयार झाला, तरी त्या सांगाड्यास देहाचें स्वरूप आणण्यास बखरींची जरूर अतिशय आहे. कारण सगळाच इतिहास तयार करण्यास जरूर लागणारे एकंदर अस्सल कागद उपलब्ध होणें अशक्य आहे. शिवाय शिवदिग्विजयकाराची तंजावर स्वारीची हकीकत अस्सल कागदांवरून तयार केलेली असल्यामुळें, ती विश्वसनीय मानणें चुकीचें होणार नाहीं. तारिखी शिवाजीवरून असें दिसतें कीं, रघुनाथपंत हणमंते व्यंकोजीशीं शिरजोरपणा करून आपणच सर्व कारभार करूं पाहत होता, हें दोघांचें तंट्याचें मूळ, पण शिवाजीनें रघुनाथपंतास दरडावून व व्यंकाजीची समजूत घालून शांतता केली.

या भाऊबंदकीच्या तंट्याचें वर्णन वाचून शिवाजीची तत्कालीन शक्ति, व भोंवतालच्या राज्यासंबंधानें त्याचें धोरणे ह्यांची चांगली माहिती होते. आदिलशाहीस तर शिवाजीनें अगदींच ग्रासून टाकिलें होतें. सभोंवार पाश टाकून त्या राज्याचे अवयव तो जखडीत चालला होता. व्यंकोजीसारख्या आपल्या एकनिष्ठ सेवकास नुसतें शब्दानें पाठबळ देण्याचेंही तींत त्राण उरलें नव्हतें. दक्षिण व पश्चिम बाजूचा सर्व प्रदेश शिवाजीच्या सत्तेखालीं आलाच होता. विजापुर व त्याच्या आजूबाजूचा थोडा मुलूख मात्र राहिला होता. तोही अशाच रीतीनें शिवाजीनें काबीज केला असता. आपला बाणा परापहरणाचा नसून स्वसंरक्षणाचा आहे, हें होईल तितकें व्यक्त करणें शिवाजीस श्रेयस्कर असल्यामुळें मुद्दाम विजापुरावर फौज पाठवून तो प्रांत त्यानें उघडपणें जिंकिला नाहीं. अप्रत्यक्षपणें सर्व बाजूंनीं तें राज्य शिवाजीनें कसें आंखडीत आणिलें, हें समजण्यास ही कर्नाटकची मोहीम फार उपयोगाची आहे.

व्यंकोजीचा जन्म सन १६३१ त झाला, आणि तो शके १६०४—म्हणजे सन १६८२ या सालीं अर्थात् शिवाजीनंतर दोन वर्षांनीं मरण पावला. शहाजीच्या मानानें त्याचे हे दोघेही मुलगे अल्पायुषीच झाले. व्यंकोजी शूर व मानी होता. परंतु शिवाजीचें राज्यस्वातंत्र्य त्याचे मनांत बिंबलेलें नव्हतें. त्याचे सल्लागारही बहुतेक मुसलमानच होते. शहाजीराजाचे मृत्यूपासून शिवाजीशीं संगनमत करून त्यानेंही कर्नाटक प्रांतांत

शिवाजीचा उद्योग चालू केला असता, तर या दोघां भावांनीं मिळून सर्व दक्षिण हिंदुस्थानांत मराठशाहीची सत्ता स्थापन केली असती. सन १६७४ पर्यंत शिवाजी दिल्लीच्या कारस्थानांत गुंतलेला होता, आणि त्याचा यथाविधि राज्यारोहणसमारंभ होईपर्यंत मराठ्यांचें स्वतंत्र राज्य आहे किंवा असावें ही कल्पना सुद्धां व्यंकोजीच्या मनांत आलेली नाहीं. परंतु शिवाजीच्या तालमेंत लहानपणापासून तयार झालेले मुत्सद्दी व योद्धे देशांत संचार करून शिवाजीच्या कल्पना सिद्धीस नेण्याच्या उद्योगास लागले, तेव्हां हणमंते वगैरे मंडळींनीं शिवाजीच्या उद्योगाचें खरें स्वरूप व्यंकोजीस कळविलें. परंतु तें त्याच्या मनानें ग्रहण केलें नाहीं. परावलंबी राहून आपली गुजराण करण्यापलीकडे व्यंकोजीची कल्पना गेली नाहीं. एवढा एक मुद्दा सोडला म्हणजे इतर बाबतींत व्यंकोजी फार चांगला होता. तंजावरचें राज्य त्यानें व्यवस्थित केलें; द्रव्यसंचय केला, त्या प्रांतांतील मंडळींमध्यें लौकिक व वर्चस्व मिळविलें. त्याची बायको दीपाबाई ही इंगळ्यांची मुलगी. ही फार शहाणी व चतुर होती. इच्या पोटीं शहाजी, सरफोजी व तुकोजी असे तीन मुलगे व्यंकोजीस झाले. या तिघांनींही पुढें तंजावरास एकेकामागून राज्य केलें. ते सर्व विद्वान् व प्रजापालनदक्ष होते. तंजावरास संस्कृत, मराठी व इतर विद्यांचा जो उत्कर्ष झाला, तो या तिघां भावांच्या श्रमाचें फल होय.

**८. औरंगजेबाशीं त्रिंशद्वार्षिक युद्ध.—(स. १६७७-१७०७).** मोगलांबरोबरचें पहिलें युद्ध स. १६७२ त संपलें. कारण औरंगजेबानें कबूल केलेला तह त्या सालीं कायम होऊन, शिवाजीस कांहीं वेळपर्यंत म्हणजे सुमारें चार वर्षे स्वास्थ्य मिळालें. ह्या चार वर्षांत मोगलांनीं विजापुर जिंकण्याचे प्रयत्न नेटानें चालू ठेविले होते. परंतु मध्यंतरीं शिवाजीनें राजरोस राज्यस्थापना केली. विजापुर व गोवळकोंड्यास आटोक्यांत आणून, कर्नाटकपर्यंत मजल मारिली. तेव्हां शिवाजीची उपेक्षा करणें बादशहास योग्य वाटलें नाहीं. म्हणून विजापुरचा नाद तूर्त सोडून मराठ्यांचेंच पारिपत्य करावें, अशी बादशहाची आपल्या सरदारांस ताकीद आली. पुढें सन १६७७ त दुसऱ्या युद्धास सुरवात झाली. शिवाजीनें राज्याभिषेक करून स्वतंत्र राज्य स्थापिलें, ही गोष्ट ऐकून बादशहा फारच चिडला, आणि त्यानें सन १६७६ च्या एप्रिलांत बहादुरखानास

सक्तीचा हुकूम फर्माविला कीं, शिवाजीशीं एकदम युद्ध सुरू करावें. ( मनूची ). शिवाजीच्या मरणानें हें युद्ध संपलें व संभाजीचे कारकिर्दींत नवीन युद्ध सुरू झालें, असा बखरकारांचा कल आहे. परंतु शिवाजी मरण पावल्यामुळें हें युद्ध बंद न पडतां, उलट ज्यास्तच जोरानें चाललें. मराठ्यांस पुरतेपणीं जिंकण्यासाठीं बादशहा दक्षिणेंत आला, त्यामुळें पूर्वी चाललेलें युद्ध विशेष जोरावलें. संभाजीला मारल्यावर मोगलांस आणखी चेव आला, व त्यापुढील अनेक संग्रामांत मराठ्यांचें खरें वीर्यतेज कसास लागलें. अखेरीस त्यांनीं बादशहावर सरशी करून, आपलें स्वातंत्र्य परत मिळविलें. एवढ्यावरून ह्या युद्धाच्या उत्तरभागास स्वातंत्र्यप्राप्तीचें युद्ध असें नांव देतां येईल. सारांश, १६७७ त सुरू झालेल्या ह्या वैरकालाची समाप्ति औरंगजेबाच्या मृत्यूनंतर शाहूच्या सुटकेनें झाली. हें युद्ध तीस वर्षे चाललें; आणि त्यांत लहान मोठ्या अनेक मोहिमी झाल्या. त्यांतील पहिली मोहीम शिवाजीच्या हयातींत झाली. तिचेंच विवेचन येथें कर्तव्य आहे. ह्या युद्धाचीं कारणें:—

( १ ) सन १६७२ नंतर शिवाजीनें आपल्या राज्याचें स्वरूप अगदींच बदलिलें. त्यानें विजापुरकरांचा पाडाव केला; स्वतःस राज्याभिषेक करून घेऊन, यथाविधि मराठी राज्याची स्थापना प्रसिद्धपणें भारतीय पौराणिक पद्धतीवर केली; दक्षिणदिग्विजय करून, आपल्या राज्याची मर्यादा विस्तृत केली, इतकेंच नाहीं, तर आपल्या नांवाचा वचक सर्वत्र बसविला. ह्या गोष्टी पाहून औरंगजेब बादशहास साहजिक दहशत पडली. इकडून त्यास जीं वर्तमानें पोहोंचत, त्यांत 'सैतानासही मंत्राचा उपाय असतो. तें मृत सैतान व हें जिवंत सैतान, नेत्रपातें स्थिरतेंत आलें पाहवें, झांकतांच येऊन लुटून मारून गेलें. धुंडावें तरी ठिकाण लागत नाहीं. राहतात कोठें, खातात काय, विसावा केव्हां घेतात, ह्याचा शोध लागत नाहीं, यामुळें दिक्क आहों.' अशा प्रकारचे मजकूर इकडून दिल्लीस लिहून गेल्यावरून बादशहास मोठी हुरहुर लागली, आणि तो शिवाजीचें पारिपत्य करण्याचे खटपटीस लागला.

( २ ) शिवाजीनें गोवळकोंडेकरांशीं तह केला ह्या बातमीनें मोगल सरदारांस विलक्षण संताप आला. आपल्याच जातभाईच्या मदतीनें शिवाजी आपणावर उठतो, हें त्यांस कसें सहन व्हावें ? तेव्हां गोवळ-

कोंडेकर व शिवाजी ह्या दोघांचाही समाचार घेण्यासाठीं मोगलांनी तयारी केली.

( ३ ) सन १६७२ त शिवाजीशीं तह झाल्यावर औरंगजेबाचा सरदार दिलीरखान हा विजापुरवाल्यांशीं सख्य करून, शिवाजीस जिंकण्याच्या बेतांत होता. परंतु ह्या व्यवस्थेमुळें विजापुरचें महत्त्व वाढणार होतें, तें बादशहास न आवडून त्यानें दिलीरखानाचा अधिकार काढून घेऊन, तो आपल्या मुलास दिला; आणि विजापुरकर व शिवाजी ह्या दोघांस एकदमच जिंकण्याविषयीं त्यानें हुकूम पाठविला. ह्या कारणास्तव मोगल व शिवाजी ह्यांचें युद्ध जुंपलें, व शिवाजीचा मुलगा संभाजी यास दिलीरखानानें फितवून आपणाकडे घेतल्यामुळें शिवाजीलाही आपली खरी शक्ति मोगलांस दाखविण्याची जरूर पडली.

(क) पहिली मोहीम सन (१६७६–८०). दक्षिणचा कारभार बहादुरखानाकडे होता, आणि कच्चें काम दिलीरखानच पाहत होता. त्यानें शिवाजीच्या मुलखांत धामधूम केल्यामुळें मोरोपंत पेशवा उत्तरकडे त्याजबरोबर लढण्यासाठीं गेला. खानानें औंढा व पट्टा हे किल्ले काबीज करून शिवनेरी काबीज करण्याचा प्रयत्न केला, परंतु तो सफल झाला नाहीं. हंबीररावानें दुसरीकडून सुरतेपर्यंत जाऊन, आणि नर्मदानदी प्रथमच उतरून भडोच परगण्यांतून खंडणी वसूल केली. तेथून पूर्वेकडे वळून बऱ्हाणपुरापर्यंत मुलूख त्यानें लुटला. याबद्दल दिलीरखानानें शिवाजीचा कल्याण प्रांत लुटला.

अशा तऱ्हेनें कांहीं दिवस धामधूम चालली होती. परंतु शिवाजीचा नवीन दोस्त गोवळकोंडेकर याजला जिंकला म्हणजे शिवाजीस चांगली तंबी मिळेल, अशा हेतूनें दिलीरखानानें विजापुरास संधान राखून तेथची फौज मदतीस घेऊन गोवळकोंड्यावर स्वारी केली. या वेळीं शिवाजी कर्नाटकांत होता. परंतु मादण्णापंताच्या उत्कृष्ट तयारीमुळें, दिलीरखान व विजापुरकर या दोघांचीही या स्वारींत पुरी खोड मोडली, याचा उल्लेख पूर्वी आलाच आहे. या स्वारींत विजापुरचें मात्र नुकसान झालें. त्यांजला दिलीरखान सांगेल त्या अटी कबूल कराव्या लागल्या. आदिलशहानें आपली मुलगी बादशहाचे मुलास देऊन, मोगलांचें मांडलिकत्व पत्करावें, अशा अटी दिलीरखानानें बादशहाकडे लिहून पाठविल्या. परंतु

बादशहास हा ठराव पसंत पडला नाहीं. सर्वच राज्य एकदम हातीं यावें, अशी बादशहाची इच्छा होती. बादशहाची आज्ञा ऐकून दिलीरखानानें विजापुरकरांवर स्वारी केली, तेव्हां विजापुरकरांनी शिवाजीची मदत मागितली. शिवाजीनें लागलीच मोगलांच्या प्रांतावर स्वारी केली व जालना शहर लुटलें.

( ख ) संगमनेरची लढाई ( सन १६७८ ).—शिवाजीस जालना येथील लूट पचूं द्यावयाची नाहीं, या हेतूनें त्याजला अडविण्याकरितां शहाजादा फौज घेऊन आला. त्याजबरोबर रणमस्तखान, आसदखान वगैरे मोठमोठे सरदार होते. दोनही फौजांची गांठ संगमनेराजवळ पडली. प्रथमतः मराठ्यांस अपयश येतेंसें दिसूं लागलें. शिधोजी निंबाळकर पडला; आणि संताजी घोरपडे पराभव पावून परत फिरला. तेव्हां शिवाजीनें कांहीं निवडक स्वारांनिशीं जोरानें असा एक हल्ला केला कीं, मोगलांचे सैन्यांत फूट होऊन तें चहूंकडे फांकलें. केवळ शिवाजीच्या स्वपराक्रमामुळें ह्या लढाईंत मराठ्यांस जय आला. येणेंप्रमाणें मारून आणिलेली लूट शिवाजीनें पट्टयास पावती केली; आणि आडवाटेनें ती रायगडास पोंचविली. पुढें मोरोपंत पेशव्यानें उत्तरेकडील बहुतेक किल्ले काबीज केले.

शिवाजीच्या ह्या कृत्यामुळें दिलीरखानानें विजापुर सोडिलें नाहीं; तेव्हां विजापुराहून शिवाजीस निकडीचा निरोप आला कीं, तावडतोब येऊन आदिलशाहीचा बचाव करावा. त्याप्रमाणें विजापुराकडे त्वरेनें जात असतां, वाटेंत त्यास अशी बातमी लागली कीं, आपला मुलगा संभाजी हा फितूर होऊन दिलीरखानास जाऊन मिळाला. तेव्हां प्रथमत: हें नवीन अरिष्ट टाळण्याच्या खटपटीस शिवाजी लागला.

( ग ) संभाजीची फितुरी ( सन १६७८ ? ).—राज्य स्थापणारा पुरुष जसा पराक्रमी असतो, तसे त्याचे वंशज नेहमींच निपजतात असें नाहीं. शिवाजीचा पुत्र संभाजी दुर्वृत्त निपजला, ही गोष्ट मोठ्या राष्ट्रीय आपातास कारण झाली. मोगल बादशहाप्रमाणें मुलगा बापावर उठल्याचें मराठशाहींत हें एकच उदाहरण आहे. संभाजीला ही रीत कोणी शिकविली असेल ती असो. औरंगजेबाचा पितृद्रोही मुलगा अकबर हा पुढें बापाविरुद्ध बंड करून संभाजीकडे आला, त्याचें व संभाजीचें अगोदर-

पासून सूत असेल; अथवा वाईट गोष्ट शिकण्यास शाळेची जरूर कोठें असते? कांहीं असलें तरी मराठशाहीच्या प्राणप्रतिष्ठेच्या समयीं असला आपात झाला, तेणेंकरून राष्ट्राची शक्ति कसास लागली.

शिवाजीला सईबाईच्या पोटीं सन १६५७ त संभाजी मुलगा झाला; सोयराबाईच्या पोटीं सन १६६१त राजाराम झाला. त्या वेळच्या समजुतीप्रमाणें त्यांस योग्य शिक्षण देण्यांत शिवाजीनें कसूर केली नाहीं. तथापि संभाजी दुर्वृत्त निघाला. रामदासस्वामीच्या संगतीस ठेवूनही तो सुधारला नाहीं. पुढें कांहीं बोलाचाली झाल्यावरून तो रुसून घर सोडून निघाला, आणि थेट मोगलांच्या छावणींत जाऊन दिलीरखानास भेटला. खानास ही गोष्ट फार फायद्याची वाटून, त्यानें संभाजीस नेमणूक देऊन आपलेपाशीं ठेविलें, आणि ही आनंदाची बातमी बादशहास लिहून कळविली. मराठ्यांचा पाडाव करण्यास हें उत्तम साधन मिळालें असें खानास वाटून बादशहाच्या हुकमाची वाट न पाहतां, त्यानें संभाजीबरोबर एक टोळी देऊन त्यास भूपाळगड घेण्यास पाठविलें. किल्ल्यास मोर्चे लावून संभाजी किल्ल्यासमोर उभा राहिला. किल्ल्यावर हवालदार फिरंगोजी नरसाळा, १६६२त चाकण किल्ल्यावर ज्यानें शाएस्तेखानाशीं टक्कर दिली तो होता. समोर संभाजीस पाहून त्याच्या फौजेवर गोळा टाकण्याचें धाडस फिरंगोजीस होईना. किल्ला स्वाधीन करण्याविषयीं संभाजीनें सक्तीचा निरोप पाठवितांच, वरील बहुतेक लोक रात्रीं पळून गेले. बाकी राहिले त्यांजला किल्ला हातीं आल्यावर संभाजीनें फार क्रूरतेनें वागविलें.

संभाजीस आश्रय देण्याविषयीं दिलीरखानाची शिफारस बादशहास पसंत पडली नाहीं. मराठ्यांच्या वर्तणुकीविषयीं त्या संशयी बादशहास कधींच खरेपणा वाटत नसे. आपणाकडील बातमी काढून घेण्याकरितांच शिवाजीनें हेर म्हणून संभाजीस पाठविलें असेल असें त्यास वाटलें. विजापुर व गोवळकोंडा येथील दिलीरखानाचीं कारस्थानें फसलीं आणि दक्षिणेंत मोगलांचें प्राबल्य उत्तरोत्तर कमी झालें. ह्या सर्व नुकसानीचें खापर बादशहानें दिलीरखानाच्या माथीं फोडिलें; त्याचा व आपल्या मुलाचा अधिकार काढून घेऊन, खानजहान बहादूर यास पुनरपि दक्षिणेंत पाठविलें, आणि संभाजीस कैद करून दिल्लीस पाठविण्याविषयीं लिहिलें. ह्याच संधीस संभाजीची समजूत पाडण्याकरितां त्याजकडेस कांहीं माणसें शिवा-

जीनें रवाना केली होती. एकदां आश्वासन दिल्यावर विश्वासघात करून संभाजीस कैद करण्याचें धाडस दिलीरखानाचे अंगीं नसल्यामुळें, त्यानें शिवाजीचीं माणसें व संभाजी यांची भेट करून दिली; आणि त्यास आपले छावणींतून पळून जाण्यास भर दिली. ह्याप्रमाणें तो परत बापाकडे आला.

ह्या भानगडींत संभाजीला मात्र पक्की अद्दल घडली. केवळ दिलीरखानाच्या चांगुलपणामुळें आपला बचाव झाला, असें त्यास पक्कें कळून आलें. बापाकडे जाण्यास तोंड राहिलें नाहीं. शिवाजीनें आपल्या पश्चात्तप्त मुलाचें मन ज्यास्त दुखविलें नाहीं. त्यास चार बोधाच्या गोष्टी सांगून त्यानें त्याची समजूत केली. तथापि त्याचें अंत:करण चांगलें निवळेपर्यंत त्यास पन्हाळगडावर, विठ्ठल त्रिंबक कारभारी, बाजी मुरार देशपांडे याचा नातू, हिरोजी फर्जंद, सोमाजी नाईक बंकी, सूर्याजी कंक वगैरे कांहीं मंडळीच्या देखरेखीखालीं ठेवून दिलें; आणि जनार्दनपंत हणमंते यासही कोल्हापुरप्रांतीं राहून संभाजीवर नजर ठेवण्याचा हुकूम केला. पुढें शिवाजीच्या मरणापर्यंत संभाजी पन्हाळ्यासच होता.

ह्यापुढें शिवाजीचे मोगलांशीं म्हणण्यासारखे झगडे झाले नाहींत. सुरत अहमदाबादपर्यंत गुजराथ प्रांतावर आपला अंमल बसविण्याची शिवाजीस फार उत्कंठा होती. परंतु तें काम चांगलेंसें तडीस गेलें नाहीं. ठाणें जिल्ह्याच्या पश्चिमेकडील प्रांतांतील जव्हार वगैरे ठिकाणच्या, बादशहाचे अंकित म्हणविणाऱ्या कित्येक मंडळींनीं मोरोपंत पेशवे यास पुष्कळ त्रास दिला. त्यांत जव्हारकर विक्रमशहा, विरा नाईकवाडी, घारराव वगैरे लोकांनीं मराठी फौजेस पुनः पुनः त्रास देऊन, गुजराथेंत मराठ्यांचा अंमल बसूं दिला नाहीं.

९. अखेर (चैत्र शुद्ध १५, शनिवार, ता. ३ एप्रिल, स. १६८०).—येथपावेतों शिवाजीच्या मोहीमा वर्णिल्या, त्यांशिवाय आणखी पुष्कळ मोहिमा त्यानें केल्या असतील, पण त्यांजबद्दल खात्रीलायक माहिती अद्यापि उपलब्ध नाहीं. पोर्तुगीझ लोकांशीं वगैरे त्याचे व्यवहार घडले, त्यांचें वर्णन अन्यत्र यावयाचें आहे. असो. आतां अवतार समाप्त होण्याची वेळ आली. जन्मापासून श्रमानें व काळजीनें शिवाजीचें शरीर झिजून गेलेलें होतें. त्यास चैनीसाठीं तर नाहींच, परंतु विश्रांतीसाठीं सुद्धां एक दिवसाचीही फुरसत मिळाली नव्हती. राज्याभिषेकानंतर पंधरा एक

दिवसांनीं त्याची आई जिजाबाई रायगडाचे खालीं पांचाड येथें वारली. ज्येष्ठ वा. ९ श. १५९६ तेव्हांपासून शिवाजी अगदीं उदास होऊन, त्यास पाठिंबा राहिला नाहीं. त्याचा स्वभावच असा कांहीं चमत्कारिक होता, कीं देवी अगर मातुःश्री यांची आज्ञा म्हणून कोणतीही गोष्ट तो तेव्हांच बिनदिक्कत करून टाकीत असे. परंतु कोणत्या तरी पाठिंब्याच्या आधारावर पराक्रम करण्याची त्यास संवयच पडून गेल्यामुळें, मातुःश्री वारल्यापासून तो उदास होऊन संभाजीच्या दुर्वर्तनानें तर त्याचें स्वास्थ्य अगदींच नाहींसें झालें. राज्याच्या अडचणी तर नेहमींच्याच होत्या. अशा स्थितींत रायगडावर असतां त्यास गुडघीचा विकार होऊन सात दिवस ज्वर आला; आणि त्यांतच शके १६०२ चैत्र शुद्ध १५, ता. ३ एप्रिल स. १६८० शनिवारीं दोन प्रहरीं ह्या महाराष्ट्रराज्यसंस्थापक महापुरुषाचा अंत झाला. त्या वेळीं त्याचें वय ५३ वर्षांचें होतें. पुतळाबाई सती गेली. साबाजी भोसले शिंगणापुरकर यानें राजारामासमक्ष त्याची उत्तरक्रिया केली. वास्तविक पाहिलें तर हा मृत्यु अकालींच होय; परंतु साधारणपणें महाराष्ट्रांतील कर्ती माणसें पन्नास साठ वर्षांपेक्षां ज्यास्त जगल्याचीं उदाहरणें फारच थोडीं आहेत. नेपोलियन बोनापार्टाचें मरणसमयीं वय शिवाजीच्या इतकेंच होतें. एकंदरींत शिवाजीनें सार्वजनिक काम एकसारखें छत्तीस वर्षें केलें. ( भा. इ. मं. श. १८३६-७४ )

शिवाजी एकाएकीं मरण पावला. इतक्या लवकर आपला अंत होईल असें त्यास वाटलें नव्हतें; म्हणूनच राज्याची पुढील व्यवस्था वगैरे करण्याचें काम त्याच्या हातून झालें नाहीं. मरणकाळचे त्याच्या तोंडचे कित्येक उद्गार चिटणिसांनीं दिले आहेत, ते कितपत खरे आहेत तें सांगवत नाहीं. राज्य चालविण्यास आपले मागें लायक पुरुष नसल्यामुळें त्याची अगदीं निराशा झाली होती, तेव्हां कोणतीच कायमची व्यवस्था न सांगतां मोघम शब्दांनीं जवळच्या मंडळीस उपदेश करून व सर्वांनीं एकविचारें चालून राज्याचें व धर्माचें संरक्षण करण्याविषयीं त्यांस ताकीद देऊन, त्यानें आपला देह ठेविला. मरणसमयीं त्याजवळ मोठी मंडळी फारशी नव्हती. पेशवे मोरोपंत यांचें नांव सभासद देत नाहीं, चित्रगुप्त देतो. परंतु तो जवळ नसावा असा तर्क आहे. सेनापति हंबीरराव मोहिते जवळ नव्हताच. तो कर्नाटकांत असावा. चिटणीस

बाळाजी आवजी मात्र जवळ होता. तसेंच निराजीपंताचा मुलगा प्रल्हाद-पंत व रामचंद्र नीळकंठ अमात्य हे दोघे जवळ होते. राजारामाच्या वेळेस पुढें विशेष उपयोगी पडलेले हेच दोन पुरुष होत. बाकी दुसरीं साधारण लहान माणसें पुष्कळ होतीं. परंतु शिवाजीचे हेतु तडीस नेणारे ह्या दोघांशिवाय जवळ कोणी नव्हते. चिटणीस होता, पण तो पुढें लवकरच मारला गेला. सारांश, शिवाजीला अकालीं मृत्यु आला; आणि त्या समयीं समजूतदार माणसें जवळ नव्हतीं, ह्या गोष्टी राष्ट्रास थोड्याशा विघातक झाल्या. शिवाजी इतका दूरदृष्टि असतां व संभाजीची योग्यता त्यास अगोदर ठाऊक असतां, राज्याभिषेकाच्या वेळेसच, मनुष्यदेहाची अशाश्वती मनांत आणून, शिवाजीनें राज्याची पुढील व्यवस्था कायमची बांधिली नाहीं; आणि तशी व्यवस्था ठरविणें बहुधा शक्य नसतें.

शिवदिग्विजय बखरींत शिवाजी सोयराबाईच्या हातून विषप्रयोगानें मरण पावला, असें लिहिलें आहे. या अपवादाचा विचार केला पाहिजे. शिवाजीस तीन बायका होत्या. वडील सईबाई ही निंबाळकरांची कन्या, तिचें लग्न १६३९त झालें. हिचा मुलगा संभाजी. संभाजीचा जन्म ज्येष्ठ शुद्ध द्वादशी, शके १५७९, म्हणजे सन १६५७ च्या जून महिन्यांत झाला. नंतर सुमारें दोन वर्षांनीं म्हणजे इ. सन १६५९ च्या सुमारास सईबाई वारली. दुसरी बायको सोयराबाई ही शिर्के यांची कन्या; हिचा मुलगा राजाराम. ह्याचा जन्म शके १५८३च्या राम-नवमीस म्हणजे सन १६६१च्या एप्रिलांत झाला. मोहित्यांची कन्या पुतळाबाई, ही शिवाजीची तिसरी बायको. ती शिवाजीबरोबर सती गेली. एवंच शिवाजीचे पश्चात् सोयराबाई मात्र जिवंत होती. स्वभाव ताडून पाहिले, तर सोयराबाईपेक्षां सईबाईच चांगली होती, असें दिसतें. परंतु मुलांचे स्वभाव मात्र आयांच्या उलट होते. संभाजीपेक्षां राजाराम शांत वृत्तीचा होता. शिवाजीची भिस्त राजारामावर होती असें दिसतें. तेव्हां शिवाजीचे पश्चात् आपल्या मुलास राज्य मिळावें अशाबद्दल सोयराबाईची खटपट चालू असेल, हें संभवनीय आहे. ह्या खटपटीचा सारांश येणेंप्रमाणें दिलेला आढळतो. मातुःश्री वगैरे वारल्यावर शिवाजी बरेच दिवस उदास होता. तेव्हां त्याचे चित्ताचें रंजन करून त्याचा उदासपणा घाल-वून, त्यानें आपल्याकडे लक्ष द्यावें अशा हेतूनें, सोयराबाईनें कांहीं

मंडळीच्या मार्फत खटपट चालविली; आणि त्या कामीं ती जवळच्या लोकांस वश करून घेऊं लागली. शिवाजीपाशींही तिनें आपल्या मुलाच्या नांवें राज्य करून देण्याविषयीं गोष्ट काढिली. तें शिवाजीस रुचलें नाहीं, आणि त्या घरभेद्या बायकोविषयीं त्याचें मन विटलें. तेव्हांपासून शिवाजीस मारण्याविषयीं सोयराबाईनें खटपट चालविली असें शिवदिग्विजयकार म्हणतो. शिवाजीलाही पुढील अडचणीची थोडथोडी कुणकुण लागली; आणि सर्वांनीं बंदोबस्तानें राहण्याविषयीं चिटणिसाच्या हस्तें किल्लोकिल्लीं लिहून पाठविलें. पन्हाळ्यावर संभाजीसही रायगडचे बेत थोडेबहुत कळत असत. बखरकार म्हणतो 'बाईसाहेबांच्याठाईं अविचार बुद्धि उत्पन्न झाली आणि विषप्रयोग करून महाराजांस व्यथित केलें. महाराजांस जहराचे झेंडू येऊन, एकाएकीं घाबरे झाले, बोलणें चालणें राहिलें. वैद्याची उपाजर्ना करितां विषापासून विकृति झाली असा त्यांनीं निश्चय केला. विषहरण करण्यास नाना उपाय केला, परंतु पोटांत रस उतरेना. रामदास स्वामींस बोलावूं पाठविलें. ते संनिध परळीस नव्हते. ईश्वरी नियमच भरला. उपाय खुंटला. यत्न हरला. बुद्धि कुंठित झाली. तेव्हांच नाश झाला.' शिवाजी वारल्यावर सोयराबाईच्या पक्षपाती मंडळीनें प्रसंग जाणून राजारामास राज्याचा धनी करून अंत्यविधि उरकले. ह्या कटांत बाळाजी आवजी सामील झाला नाहीं. संभाजीस कैदेंत ठेवण्याबद्दल व राजारामाच्या नांवानें जिकडे तिकडे राज्याचा बंदोबस्त करण्याबद्दल पत्रें लिहिण्याविषयीं त्यास मंडळी आग्रह करीत असतां, त्यानें कशींवशी वेळ मारून नेली. मरणसमयीं शिवाजीचें वय बावन्न वर्षें दहा महिने दोन दिवस इतकें होतें.

ही हकीकत दिग्विजयकाराची म्हणजे चिटणिसांच्या तर्फेची आहे. शिवाजीच्या चिटणिसाचा मुलगा खंडो बल्लाळ यानेंच ही बखर लिहिलेली असावी. वरील उल्लेख इतर बखरींत नाहीं. मरणापूर्वी बरेच दिवस शिवाजी उदास असल्यामुळें, सोयराबाईची व त्याची भेट होत नसे. ह्यावरून त्यास मरण एकाएकीं आलें व विषप्रयोगाची कल्पना पुढें उत्पन्न झाली असावी. असे प्रकार वारंवार घडतात. मुळीं विषप्रयोग इत्यादिकांशिवाय अवचित मरण येणें अशक्य आहे अशी इकडे साधारण समजूत असल्यामुळें, अवचित मरणाचा कार्यकारणभाव अज्ञाच

गोष्टींशीं जुळविल्याशिवाय लोकांस चैन पडत नाहीं. प्रसिद्ध पुरुषांविषयीं असे अपवाद नेहमींच उठतात. शिवाजी मरण पावला ही गोष्ट हिंदुस्थानांतील परकीय राष्ट्रांस पुढें पुष्कळ दिवसपर्यंत खरी सुद्धां वाटली नाहीं. शिवाजी सैतान आहे, तो वाटेल तेव्हां मरतो, व वाटेल तेव्हां जिवंत होतो, अशी कल्पना त्या वेळीं प्रचलित होती. सारांश, शिवाजीस विषप्रयोग कांहीं झाला नाहीं. तो लहानशा दुखण्यानें एकाएकीं मरण पावला, आणि त्यास मारल्याचें बालंट त्याच्या राज्याभिलाषी परंतु निरपराधी बायकोवर आलें.

---

## प्रकरण अकरावें.

## शिवाजीची योग्यता.

१. शिवाजीचें स्वरूप व स्वभाव. २. शिवाजीचें प्रधानमंडळ.
३. शिवाजीची मुलकी व्यवस्था. ४. शिवाजीचे किल्ले.
५. शिवाजीचें लष्कर. ६. समाजशिक्षणाची स्थिति.
७. बजाजी निंबाळकराची शुद्धि. ८. शिवाजीचे साह्यकारी.
९. शिवाजी आणि रामदास. १०. शिवाजीच्या लुटीचा अर्थ.
११. जहागिरीविषयीं शिवाजीचा कटाक्ष. १२. शिवाजीची तुलना.
१३. शिवाजीविषयीं परकीयांचें मत.

**१. शिवाजीचें स्वरूप व स्वभाव.**—मालवणचा किल्ला सिंधुदुर्ग शिवाजीनें बांधिला, त्यांत शिवाजीचें मंदिर आहे. हें मंदिर छत्रपति राजारामानें बांधिलें; आणि त्याला अलीकडे कोल्हापुरकरांनीं सभामंडप जोडिला. ह्या मंदिरांत शिवाजीची मूर्ति गाभाऱ्यांत असून बाहेर मौनीस्वामीची मूर्ति आहे. ह्या मूर्ति काळ्या शिळेच्या कोरीव आहेत. मौनीस्वामी पद्मासनांत व शिवाजी वीरासनांत आहे. शिवाजीची हुबेहूब प्रतिमा हीच होय, असें रा. राजवाडे म्हणतात. शिवाजीच्या दुसऱ्या दोन तसबिरी एक घोड्यावरची व दुसरी ऊर्ध्वांगाची अशा प्रचलित असून, त्यांतली पहिली एका फ्रेंच गृहस्थानें स. १७२० च्या सुमारास पैदा करून एका फ्रेंच पुस्तकांत प्रसिद्ध केली. दुसरी तसबीर ऑर्मच्या पुस्तकांतील आहे. ह्या

दोन तसबिरींत पुष्कळ साम्य आहे. परंतु कागदी तसबिरी व सिंधुदुर्ग किल्ल्यांतील प्रतिमा ह्यांच्यांत मात्र बिलकुल साम्य दिसत नाहीं. सिंधुदुर्ग किल्ल्यांतील प्रतिमा आरमारी बाण्याची आहे. पायांत तुमान व तोडे, कमरेस कटिभूषण, हातांत कडीतोडे व दंडावर भुजबंद आहेत. डोकीला नावाड्याची गोंडेदार तुर्की टोपी आहे. मूर्तींतील आकार ठेंगणा, धष्टपुष्ट व मध्यम वयाचा आहे. नाक मात्र ऑर्मच्या तसबिरीप्रमाणें बांकदार नाहीं. कोरींव मिशी आहे. दाढी नाहीं. ह्या प्रतिमेचें चित्र इतिहाससंग्रहांत दिलेलें आहे. प्रत्यक्ष शिवाजीच्या पुत्रानें ही प्रतिमा तयार केली असल्यानें, ती खरी असण्याचा विशेष संभव आहे.

शिवाजीचें स्वभाववर्णन करतां येईल असे अस्सल कागद फारसे नाहींत. आजपर्यंत शिवाजीनें लिहिलेलीं अशीं १०० पत्रें बाहेर आलीं आहेत. २० व्या खंडांत ५०–६० पत्रें छापलीं आहेत. ह्याप्रमाणें उद्योग केल्यास शिवाजीचीं आणखीं बरींच पत्रें सांपडतील. शिवाजीच्या वेळचे कागद फारसे सांपडत नाहींत, याचें कारण, एक तर जितकें जितकें मागें जावें तितके कागद थोडेच सांपडणार. शिवाय त्या वेळीं कागद फारसा उपलब्ध नव्हता. तेव्हां तशीच जरूर असल्याशिवाय हल्लींप्रमाणें सामान्य व्यवहार लिहून ठेवण्याची प्रवृत्ति नव्हती. कागद येथें उत्पन्न होत नसे. तो परदेशांतून मोठ्या कष्टानें पैदा करून आणावा लागे. त्यांतही कापडा-प्रमाणेंच उंची व सामान्य असे प्रकार होते. शिवाजीच्या वेळचे कागद प्राय: अगदीं लहान असत. तीनचार बोटें रुंदीचीं खडबडीत चिटोरीं वापरीत. मोठ्या आकाराचे भारी कागद मोटया वशिल्यानें बादशाहींतून वगैरे मागवीत असत. बाजूला जागा सोडण्याचा प्रचार तर नव्हताच. रुंद व मोठे कागद वापरण्याचा प्रघात बहुधा उत्तर पेशवाईच्या वेळचा आहे. शिवाजीच्या अस्सल कागदांचा उपयोग मागें ठिकठिकाणीं केलाच आहे.

शिवाजीचें स्वरूपवर्णनही फारसें उपलब्ध नाहीं. तो साधारण गोरा, सडपातळ, बारीक काठीचा होता. मालवण येथील सिंधुदुर्ग किल्ल्यांत त्याच्या पादुका व हस्तप्रतिमा आहेत, त्या फार लहान आहेत इतकेंच; बाकी आकारानें हुबेहुब दिसतात. शिवाजीचा आकार लहान होता असें वर्णन आहे; आणि त्याचें वजन वयाच्या ४७ वे वर्षी १४० रत्तल होतें. त्यावरून तो ठेंगू, सुमारें साडेपांच फुटांच्या आंतच, आणि सड-

पातळ पण घटीव होता. त्याचें नाक फारच बांकदार दाखविलेलें आहे. शिवाजीची भरंवसेलायक प्रतिमा उपलब्ध नसल्यामुळें, अशा गोष्टीविषयीं निष्कारण तर्क करीत बसण्यांत कांहीं अर्थ नाहीं. इंग्रजांचा वकील हेन्री ऑक्झेंडन् राज्याभिषेकसमयीं रायगडास गेला होता, त्याची शिवाजीनें दरबारांत भेट घेतली. त्यानें शिवाजीचें वर्णन लिहून ठेविलें आहे, तें असें शिवाजीचा चेहेरा सुंदर व पाणीदार दिसतो. इतर मराठ्यांचे मानानें त्याचा वर्ण गोरा आहे. डोळे तीक्ष्ण, नाक लांब, बांकदार व जरासें खालीं आलेलें दिसतें. दाढी कापून हनुवटीचे खालीं टोंकदार केलेली होती. मिशी बारीक असून, मुद्रेंत त्वरा, निश्चय, कठोरपणा व जागरुकता हे गुण स्पष्ट दिसत होते. '

शिवाजीच्या योग्यतेसंबंधानें स्वतंत्र चर्चा करण्याचें कारण नाहीं. वर त्याचें चरित्र वर्णन करितांना,त्यानें केलेल्या कृत्यांची हकीकत दिली आहे, त्यावरून शिवाजी कशा प्रकारचा होता हें दिसून येईल. शिवाय त्यासंबंधानें ज्यानें त्यानें आपला अजमास आपणच बांधावा, हें योग्य आहे. असें आहे तरी, थोर पुरुषांच्या गुणावगुणांसंबंधीं नेहमींच चर्चा व मतभेद असतो. अशा चर्चेस मदत व्हावी या हेतूनें पुढील विवेचन करावयाचें आहे. शिवाजीची योग्यता ठरविणें हें काम अत्यंत कठीण आहे. ज्यानें त्यानें आपआपल्या मतप्रमाणें त्याची योग्यता ठरविली आहे आणि त्यांत कांहीं वावगेंही नाहीं. कोणत्याही व्यक्तीचा ज्यास जसा अनुभव आला असेल, त्यावरून त्या व्यक्तीची किंमत त्यास करितां येते. शिवाजीनें स्वराज्य स्थापन केलें म्हणजे काय ? तर जें राज्य पूर्वी मुसलमानांच्या ताब्यांत होतें, तेंच मराठ्यांचें म्हणून त्यानें त्यांजपासून आपल्या कबजांत घेतलें. अर्थात् मुसलमानांचें या गोष्टीनें नुकसान झालें. तेव्हां ते शिवाजीस कधींही चांगला म्हणणार नाहींत. इंग्रज लोकांच्या वखारी शिवाजीनें कित्येक वेळां लुटल्या,आजूबाजूच्या लुटीमुळें शिवाजीची इंग्रजांस सदैव धास्ती असे, म्हणून चांगला गुण शिवाजीचे ठिकाणीं इंग्रजांस दिसला नाहीं. शिवाजीनें आपल्या लोकांचें कल्याण केल्यामुळें ते लोक त्याच्या भजनीं लागले आणि अजूनही त्यांच्यांत शिवाजीविषयीं अत्यंत पूज्यभाव वसत आहे; यांतही कांहीं नवल नाहीं. तथापि आज २०० वर्षे होऊन गेल्यावर शिवाजीच्या योग्यतेचा शांतपणें व निष्पक्ष-

पातानें विचार करून वरील भिन्न भिन्न मतांची एकवाक्यता करणें शक्य झालें आहे.

जगांतील इतर मोठमोठ्या माणसांची गोष्टही अशीच आहे. नेपोलियनच्या कर्तबगारीविषयीं यूरोपच्या निरनिराळ्या राष्ट्रांचा निरनिराळा ग्रह आहे. फ्रेंच लोक त्यास अतिशय मान देतात. इंग्रज लोक आपला शत्रु समजून त्याची निंदा करितात. वास्तविकपणें यांत खोडसाळपणा कांहीं नाहीं. हा इतिहास आहे. इतिहासानें शहाणपण यावयाचें. एकाच व्यक्तीविषयीं भिन्न दृष्टींनीं अंदाजलेलीं भिन्न मतें समजून घेणें यानेंच इतिहास बनतो. शिवाजीलाही तोच नियम लागू केला पाहिजे; आणि त्यांत विशेषेंकरून, ज्या त्या राष्ट्रानें आपल्या लोकांचा इतिहास प्रथमत: स्वत:च्या दृष्टीनें पाहणें, हेंच विशेष अगत्याचें आहे.

कोणत्याही दृष्टीनें विचार केला, तरी शिवाजी हा लोकोत्तर पुरुष होता, अशी साक्ष त्याचें एकंदर चरित्र देतें. इतका वेळ सांगितलेल्या त्याच्या कृत्यांवरून व त्यानें घालून दिलेल्या राज्यपद्धतीवरून त्याची योग्यता कळते. साधारणत: थोर पुरुषाच्या अंगीं जे गुण अवश्य पाहिजेत ते सर्व त्याजमध्यें वसत होते. एकंदर गुणांची यादी केली असतां अमुक एक गुण त्याजमध्यें नव्हता, असें स्पष्टपणें सांगतां येत नाहीं. त्याचें आयुष्य सर्व प्रकारच्या संकटांत व सर्व प्रकारच्या स्थितींत गेल्यामुळें, त्यास जगाचा अनुभव विशेष आला होता; आणि त्या अनुभवाचा क्षणोक्षणीं उपयोग करण्याइतकी त्याची बुद्धि तीव्र होती. बोलण्यांत तो इतका कुशल असे, कीं पाहिजे त्या इसमावर तो आपली छाप तेव्हांच बसवी. स्वत: थोडक्यांत संतुष्ट असल्यामुळें, इतरांस तसें राहण्यास तो आपल्या वर्तनानें भाग पाडी. प्रत्येक गोष्ट स्वत: करितां येत असल्यामुळें, लोकांच्या अडचणी त्यास चांगल्या समजत; आणि उगाच भपकेबाज लोकांकडून तो फसला जात नसे. तो बुद्ध्या साहसप्रिय नव्हता, तरी साहसाशिवाय काम तडीस जाण्याजोगें नाहीं अशी खात्री झाल्यावर, कसल्याही संकटांत उडी घालण्यास तो कचरत नसे. लोकांस हाताखालीं वागविण्यास इच्छिणाऱ्यानें स्वत: तसें वागण्यास तयार असलें पाहिजे, हें तो जाणून होता. जे नियम तो घालून देई व जे हुकूम तो दुसऱ्यांस सांगत असे, ते स्वत: पाळण्यास तो कधीं चुकत नसे. तो

जातीचा क्रूर नव्हता, तरी चुकीबद्दल योग्य शासन करण्यास तो कधीं मागें पुढें पाहत नसे. आईच्या आज्ञेबाहेर त्यानें कधींही पाऊल टाकिलें नाहीं, इतकेंच नव्हे, तर आई वारल्यावर त्यास इहलोकची जीवनयात्रा कष्टप्रद वाटली, आणि आपला पाठिंबा गेल्याप्रमाणें त्याची स्थिति होऊन तो निराधार झाला. मित्रांची किंमत त्यास अतिशय वाटत असे, व जिवास जीव देणारे अनेक मित्र त्यानें जोडिले होते. तानाजी मालुसरे पडल्यावर त्याला अनावर शोक झाला, आणि त्यानें अत्यंत हृदयद्रावक विलाप केला. भूक तहान सोसण्यास तो फार कंटक होता, आणि या कामीं अगदीं हलक्या शिपायाच्यानेंही त्याची बरोबरी करवत नसे.

राज्याची जोखीम सांभाळणें हें काम मोठें कठिण आहे. त्यास अत्यंत कठोरपणा धारण करावा लागतो. भीडमुर्वत, सखासोयरा बिलकूल ओळखतां येत नाहीं. शिवाजी स्वभावानें असाच अत्यंत कडक होता. तो जबरदस्त शिक्षा करी. कित्येक वेळां त्यास हरामखोरांचीं डोचकीं उडवावीं लागत. सर्व अंमलदार लोक त्यास चळचळां कांपत असत. मागें त्याचीं कित्येक पत्रें ठिकठिकाणीं दिलेलीं आहेत, त्यांवरून त्याचा कडक बंदोबस्त उघड दिसून येतो. कठोरपणाबरोबर त्याचे मनांत दयाही ओतप्रोत होती. म्हणून सर्व लोक त्याची नोकरी करण्यांत भूषण मानीत.

शिवाजी दयाळू व पापभीरु होता कीं नाहीं, याचा पुष्कळांस संशय वाटतो. परकीयांस तर तो क्रूर आणि पैसा व सत्ता यांच्या लोभानें अंध झालेला असा दिसतो. परंतु या प्रश्नावर मत देतांना खोल विचार केला पाहिजे. शिवाजीनें अनेक शहरें व गांवें लुटलीं, परंतु केवळ लुटीसाठीं कोणाचा जीव घेतला किंवा नुसती मारहाण केली, असें एकही उदाहरण नाहीं. उलट पक्षीं गोरगरीब अगर निराश्रित स्त्रिया यांचें त्याजकडून काळजीपूर्वक संगोपन झाल्याचीं शेंकडों उदाहरणें आहेत. या कामीं तो मगरूर लोकांचा काळ व गरिबांचा मायबाप होता. विनाकारण त्याजशीं तेढ ठेवणारास त्याजकडून चांगलीच अद्दल घडत असे. तो क्रूर व दुष्ट होता असा प्रवाद श्रीमंत व गर्विष्ठ लोकांकडून निघालेला आहे. त्या प्रवादाचा विचार करितांना गरीब लोक त्यास देवाप्रमाणें भजत असत, हें ध्यानांत ठेविलें पाहिजे. त्याचप्रमाणें तो सहसा लढाई न करितां युक्तीनें वेळ मारून नेई, याजबद्दल कित्येक त्यास भित्रा समजतात. परंतु भ्रम, खर्चे

व रक्तपात यांशिवाय एकादी गोष्ट सिद्धीस जात असेल, तर बुद्ध्या हे प्रकार करावे ह्यांत शहाणपणा कोणता ? मागें ज्या मोहिमा आल्या आहेत, त्यांत प्रत्यक्ष शिवाजीनें स्वपराक्रमानें अनेक प्रसंगीं समरांगणावर जय मिळवून आपल्या पक्षाची बाजू बचाविलेली आहे. तसेंच अफझलखानास मारण्यास तो एकटा गेला. असल्या अनेक प्रसंगीं जाणून बुजून त्यानें संकटांत उडी घातली आहे. ह्या गोष्टी भित्रेपणाच्या खचीत नव्हत. ह्याप्रमाणें शिवाजीच्या अंगचे गुण असून शिवाय तो आचरणानें पवित्र, व नीतीनें खंबीर होता. त्यास कोणतेंही व्यसन असल्याचें लिहिलेलें नाहीं. आबाजीपंतानें एक सुंदर स्त्री पकडून त्यास नजर केल्याबद्दल त्याचा त्यानें अत्यंत निषेध केला हें सुप्रसिद्ध आहे. तो कपटी, लबाड व अप्रामाणिक होता, असाही कित्येकांचा आक्षेप आहे. पण कपट शब्दाचा अर्थ काय तो ठरविला पाहिजे. कांहीं तरी युक्ति लढवून राष्ट्राचें कल्याण साधणें हें साधुत्वाचें लक्षण नसेल, परंतु संसारांत व विशेषत: अलीकडील राजनीतींत ह्याच कपटास 'डिप्लोमसी' किंवा मुत्सद्दीगिरी हें नांव प्राप्त होतें. ह्याच चातुर्याच्या जोरावर युरोपियन राष्ट्रें वृद्धि पावलीं आहेत; आणि याच चातुर्याच्या जोरावर युरोप व आशिया खंडांतील भावी राज्यस्थितीचा निकाल व्हावयाचा आहे. राज्यांच्या घडामोडी होत असतां असे प्रकार अपरिहार्य असतात. अशा स्थितींत व्यावहारिक दृष्टीनें शिवाजी लबाड ठरत नाहीं, उलट चतुर ठरतो. निरनिराळ्या इसमास निरनिराळीं कामें वांटून दिल्यामुळें प्रत्येक इसम आपलें काम हुशारीनें करण्यास झटूं लागला. एकादें बिकट प्रकरण उपस्थित झालें तर शिवाजीचे प्रधान तें एकांतीं त्याच्या कानावर घालीत. एकांतीं त्याजबद्दल खलबत झाल्यावर जरूरीप्रमाणें त्याचा खल प्रधानमंडळांत किंवा ठरीव इसमांशीं करण्यांत येई. राज्याच्या हितसंबंधाच्या बाबतींची वाटाघाट प्रधानमंडळांत होऊन सर्वानुमतें शहानिशा होत असे. प्रत्येकावर विश्वास व जबाबदारी टाकलेली असल्यामुळें आणि त्यांच्या मसलतीस योग्य मान मिळाल्यामुळें, जो तो आपली कामगिरी हुशारीनें करण्यांत दक्ष असे. शिवाजीची धर्मावर श्रद्धा परिपूर्ण होती. धर्म ही नुसती नांवाची सबब त्यानें पुढें आणिलेली नव्हती, तर धर्मोन्नतीवरच राष्ट्रोन्नति अवलंबून आहे, ही त्याची समजूत हरएक कागदांत व प्रसंगांत व्यक्त झालेली आहे.कथापुराणें ऐकण्याची त्यास

अतिशय आवड होती, व ती आवड पूर्ण करण्याकरितां तो कोणत्याही अड-चणीस जुमानीत नसे. रामदासस्वामीचा वरद हस्त त्याजवर होता. शिवाजीची राहणी अगदीं साधी असे, तरी त्याचा खर्च कमी नव्हता. तो अंतःकरणाचा उदार असून, आपल्या लोकांस बक्षिसें व वेतनें देऊन नेहमीं खुष ठेवीत असे. त्याची कामगिरी बजावितांना सर्वांस अशी खात्री असे, कीं शिवाजी आपल्या मुलांबाळांस कधीं कमी पडूं देणार नाहीं. या खात्रीमुळें शिवाजीची कामगिरी बजावण्यास लोक आपल्या जिवाकडे पाहत नसत. इतकें करूनही शिवाजीनें पैसा पुष्कळ शिल्लक टाकिला. तो कोणास मुलूख तोडून देत नसे; आणि थोड्या खर्चांत पुष्कळ काम भागवी. त्याचा बहुतेक पैसा फौज व किल्ले यांत खर्च होत असे. मावळे लोकांच्या हातून त्यानें जबरदस्त पराक्रम करविले, यावरून त्याची योग्यता व योजकबुद्धि व्यक्त होते. त्याची मसलत नेहमीं अत्यंत दूरदृष्टीची असे. एखादे वेळेस त्याची कल्पना लोकांस आवडली नाहीं, तर देवीचा कौल घेऊन तो ती युक्ति सिद्धीस नेई,—म्हणजे वादविवादानें समाधान झालें नाहीं, तर देवीची आज्ञा तो घेई. पुस्तकी विद्या विशेष येत नसतांही राज्यकारभाराचे बिकट प्रश्न तो मोठ्या खुबीनें सोडवीत असे. प्रत्यक्ष अनुभवानें मनुष्य स्वभावाचें ज्ञान त्यास उत्कृष्ट झालें होतें. औरंगजेब बादशहानेंही त्याच्या कर्तृत्वाची तारीफ केली आहे. शिवाजी सर्वांशीं प्रसन्नतेनें वागत असे, आणि दुसऱ्यांवर आपली छाप एकदम बसवी. प्रत्येकास असें वाटावें कीं, राजाचें मन आपणावर आहे व आपणाशींच तो मन मोकळें करून बोलतो. सर्वांचीं चित्तें त्यानें आपणाकडे आकर्षून घेतलीं होतीं. अशा कांहीं प्रसिद्ध व्यक्ति असतात कीं, त्यांचा समागम अल्प काल झाला असतांही ते श्रोत्यांना तात्काल आपल्या भजनीं लावितात. अशांपैकीं शिवाजी होता. जयसिंग व जशवंतसिंग यांचीं मनें त्यानें अल्पावकाशांत आकर्षून घेतलीं. औरंगजेबाची व त्याची भेट स्वस्थपणें झाली नाहीं. ती होती तर त्या दोघांमधील पुढील व्यवहारांस बहुधा निराळें वळण लागलें असतें.

समाजास जिवंतपणा आणून राष्ट्रास शिस्त लावणारा शिवाजी एवढा दुसरा पुरुष आपल्या इकडे झाला नाहीं. या शिस्तीचें महत्त्व पुढें राष्ट्राच्या आपत्प्रसंगी कळून आलें. ज्यांनीं ज्यांनीं नवीन राज्य स्थापन केलें, त्यांस

राज्याच्या बचावाची कांहीं तरी विशिष्ट पद्धत अमलांत आणावी लागली. मुसलमानांनीं देश जिंकण्यास सुरुवात केली, तेव्हां जिंकलेल्या लोकांवर जिझिया कर बसवून त्यांतून फौजेचा खर्च भागविण्याची शक्कल त्यांनीं काढिली. इंग्रजांनीं सब्सिडियरी सिस्टिम काढून आपली तैनाती फौज जिंकलेल्या प्रदेशाच्या बचावार्थ ठेवून दिली. शिवाजीनें जिंकलेल्या मुलखावर चौथाई म्हणून नवीन कर बसविला. या कराच्या उत्पन्नांतून फौज ठेवून जिंकलेल्या प्रदेशांचें संरक्षण करावयाचें, अशी त्याची योजना होती. पेशव्यांनीं वगैरे पुढें शिवाजीचें थोडे बहुत अनुकरण करून मराठ्यांचें राज्य कांहीं दिवस चालविलें. सारांश, शिवाजीनें समाजास जिवंतपणा आणिला हें निर्विवाद सिद्ध होतें.

२. शिवाजीचें प्रधानमंडळ.-राष्ट्रेतिहासांत शिवाजीसारख्या पुरुषाचें महत्त्व विशेष असतें. टिपु सुलतान, वेलिंग्टन यांजप्रमाणें समरांगणावर पराक्रम गाजविणारे पुरुष पुष्कळ सांपडतील. तसेंच पिट्ट अगर वेलस्ली यांजप्रमाणें केवळ मुत्सद्दी म्हणून नांवाजलेले पुरुषही अनेक आहेत. परंतु ह्या दोनही बाबतींत शिवाजीनें प्रवीणता मिळविली, हें त्या पुरुषाच्या महान् योग्यतेचें दर्शक होय. कांहीं तरी पूर्वीचा आधार, निदान तशी अनुकूल परिस्थिति ह्यांपैकीं कांहींच साह्य शिवाजीस नव्हतें. असें असतांही शिवाजीनें नवीन राज्य स्थापन करून, तें चिरकाल व मजबूद राहवें अशी योजना करून ठेविली. ती योजना देशकालाच्या मानानें इतकी योग्य, मजबुदीच्या मानानें इतकी भक्कम, व उपयुक्ततेच्या मानानें इतका सर्वव्यापी होती, कीं शिवाजीचे पश्चात् अनेक वर्षें मोडून काढण्याविषयीं एकसारखे अनेकांचे प्रयत्न चालू असतांही, मराठी राज्याचे कित्येक अवशेष हल्लींच्या स्थित्यंतरांत सुद्धां हयात आहेत. शिवाजीचें अष्टप्रधानमंडळ ही एक अशा प्रकारची प्रधान संस्था होय. इतर संस्था इच्या अंगभूत आहेत. या संस्थेंतील दूरदृष्टीच्या धोरणामुळें स्वसंरक्षण व राज्यसंवर्धन हीं दोन प्रधान कामें पुढें महाराष्ट्रीयांस करितां आलीं. औरंगजेबाच्या प्रचंड शक्तीशीं झगडा करून विजय पावण्यास ही संस्था फार उपयोगी पडली. कामांची वांटणी करण्याच्या हेतूनें शिवाजीनें अष्टप्रधान नेमिले. शेवटचे दोन प्रधान खेरीजकरून इतरांस नेहमीं लढाईच्या बाण्यानें राहवें लागे. आज तशा प्रकारची स्थिति नाहीं. पण शिवाजीच्या वेळेस प्रत्येकानें लढ-

ण्यास तयार असणें अत्यंत अवश्य होतें. तो काळ इतका शस्त्रभूमीचा होता, कीं शस्त्राच्या जोरावांचून कोणीं कोणास मोजलें नसतें. ईस्ट इंडिया कंपनीच्या व्यापाऱ्यांचा व तत्कालीन इतर राष्ट्रांचा प्रघात अशाच प्रकारचा होता. तेव्हां गव्हर्नर जनरल किंवा गव्हर्नर यांच्या कौन्सिलाशीं शिवाजीच्या प्रधानमंडळाची तुलना करितांना हल्लींचे इंग्रज प्रधान लढाऊ बाण्याचे नाहींत, हा मोठा फरक आहे. तत्कालीन मोगल बादशहांचे सुभेदार युद्धकलेंतील कर्तबगारीवरच नेमले जात असत.

शिवाजीच्या ह्या मंडळाची तुलना हिंदुस्थान सरकारच्या कौन्सिलाशीं करण्यांत येते, ती एका अर्थानें वावगी नाहीं. कामाचे विभाग पाडून त्या विभागांबद्दल निरनिराळ्या इसमांस जबाबदार धरणें यांतच राज्यपद्धति घालून देणाराच्या अंगचें कसब दिसून येतें. ही वांटणी कोणत्याही तत्त्वावर केलेली असो; पण वांटणी पाहिजे ह्याविषयां वाद नाहीं. हिंदुस्थानचा अगर विलायतचा राज्यकारभार चालविणारें प्रधानमंडळ शिवाजीच्या सारखेंच आहे. स्थितिवैचित्र्यामुळें व कालांतरामुळें काय फरक पडला असेल तेवढाच. पेशवा हा गव्हर्नर किंवा गव्हर्नर जनरल सारखा होता. त्याच्या खालोखाल सेनापति, त्याच्याखालीं मुलकी प्रधान म्हणजे शिवाजीचा अमात्य; त्याच्या खालीं परराज्यसंबंधीं प्रधान म्हणजे शिवाजीचा सुमंत; हिंदुस्थानच्या प्रधानमंडळांत मंत्री, पंडितराव व न्यायाधीश हे तीन प्रधान नाहींत. हिंदुस्थानच्या धर्माचें खातें इंग्रजसरकारानें आपल्या ताब्यांत घेतलेलें नाहीं. मंत्री हा थोडासा होममेंबर सारखा आहे. शिवाजीचा खासगी चिटणीस वेगळा होता, तो हल्लींच्या प्रायव्हेट सेक्रेटरीसारखा असून, त्यास प्रधानमंडळांत जागा नव्हती व हल्लींही नाहीं. मंत्री हा त्याहून श्रेष्ठ असून तो प्रधानमंडळांत होता. हल्लीं न्यायखात्यासंबंधीं प्रधान कौन्सिलांत असतो, त्याच्या ऐवजीं शिवाजीच्या वेळेस मुख्य न्यायाधीशच प्रधानमंडळांत बसे. ही केवळ सोयीची गोष्ट आहे. याशिवाय इंग्रजांच्या मंडळांत आणखी प्रधान आहेत, त्यांचा येथें विचार करण्याची जरूर नाहीं. वस्तुस्थिति भिन्न झाल्यामुळें तसा प्रकार झाला आहे. वास्तविक अष्टप्रधान याचा अर्थ आठच प्रधान असा नव्हे. कामाच्या सोयीप्रमाणें आठ, किंवा त्याहून कमी किंवा ज्यास्ती प्रधान असणें साहजिक आहे. अष्टप्रधान हा सामान्य शब्द आहे;

आणि त्याचा अर्थ राजास मदत करणारें प्रधानमंडळ इतकाच समजावयाचा आहे. मराठी राज्यांतच प्रतिनिधि नांवाचा एक प्रधान पुढें वाढला, त्याचें कारण राजा अल्पवयी असल्यामुळें, त्याची जागा भरून काढण्यास नवीन इसमाची जरूर पडली.

ही अष्टप्रधानांची पद्धति शिवाजीनें कोठून घेतली, हा एक महत्त्वाचा प्रश्न आहे. मुसलमानी सत्ता मोडून टाकून हिंदुपदपादशाही स्थापन करणारा शिवाजी मुसलमानांचें अनुकरण करणार नाहीं; म्हणून ही पद्धति त्यानें नवीनच उत्पन्न केली, आणि फारशी नांवें बदलून त्यानें संस्कृत नांवें चालू केलीं, असें कित्येकांचें म्हणणें आहे. उलट पक्षीं कित्येकांचें म्हणणें असें आहे, कीं शिवाजीनें ह्या पद्धतींत मुसलमानांचेंच अनुकरण केलें आणि त्यास हिंदुत्व आणण्याकरितां संस्कृत नांवांची योजना केली. बाकी अनुकरण करण्यास मुसलमान राज्यपद्धतीशिवाय त्याजपुढें दुसरा नमुना नव्हता. प्रत्यक्ष पुराव्याच्या अभावीं या वादाचा निश्चयात्मक निकाल लावणें अशक्य आहे; आणि प्रत्यक्ष पुरावा मिळणें शक्य नाहीं. तथापि या प्रश्नाचा थोडाबहुत खुलासा करणें शक्य आहे. शिवाजीनें ही पद्धति नवीनच उत्पन्न केली, किंवा सर्वस्वी दुसरीकडून स्वीकारली, अशीं दोन प्रमेयें वरील वादांतील दोन पक्ष गृहीत धरितात; परंतु थोडेंबहुत अनुकरण व थोडीबहुत स्वतःची कल्पना या दोहोंचेंही मिश्रण त्यांत असणें संभवनीय आहे. एका पक्षीं मुसलमानी पद्धतींत गुण दिसले, तर ते न स्वीकारण्याइतका शिवाजी हट्टी नव्हता; इतकेंच नव्हे, तर मुसलमानांस न दुखवितां कार्यसिद्धि होईल, तर तसें करणें शिवाजीस नेहमींच इष्ट वाटत होतें. तेव्हां प्रथमतः मुसलमानांत ही पद्धति होती कीं काय हें पाहिलें पाहिजे. मुसलमानी राज्यपद्धतीचें जें स्वरूप साधारणतः ग्रंथकारांनीं दिलें आहे, त्यावरून शिवाजीच्या सारखें प्रधानमंडळ मुसलमानी पद्धतींत नव्हतें, असेंच म्हणणें भाग येतें. अशा प्रधानमंडळाची योजना केवळ प्रजेच्या कल्याणासाठींच उत्पन्न होत असते. मुसलमानांच्या अनेक राजघराण्यांत प्रजेच्या सुखाची परवा करणारें राजघराणें फक्त मोगलांचें झालें. त्यांतही अकबर व शहाजहान, ह्या दोनच कारकिर्दी नांवाजलेल्या आहेत. परंतु ह्या बादशाहीचें स्वरूप बहुतेक लष्करी बाण्याचें होतें, म्हणजे केवळ लष्करी जोरावर देश जिंकून त्याचें संरक्षण करावयाचें, यापलीकडे राज्य-

व्यवस्थेची मजल फारशी गेली नव्हती. अतां खरमरीत लष्करी बाण्यांतूनही अंतःकरणाच्या स्वाभाविक सौजन्याचा थोडासा पाझर निघून त्याचा फायदा प्रजेस मिळे; परंतु तो राज्यव्यवस्थेचा प्रधान हेतु नव्हता. प्रधान-मंडळ स्थापन केल्याबरोबर त्याच्या वागणुकीसाठीं नियम बांधावे लागतात. अर्थात् राजानें स्वतःच्या अधिकारांपैकीं कांहीं विशिष्ट अधिकार पृथक्पणें व एकवटून त्या प्रधानमंडळास द्यावे लागतात. त्यामुळें तितक्यापुरती राजाची सत्ता अवश्य कमी होऊन त्याच्या अनियंत्रित वर्तनावर प्रधान-मंडळाच्या जुटीचा दाब बसतो. असा दाब आपणांवर बसवून घेण्याइतके उदार राजकर्ते मुसलमानांत क्वचित् झाले.

उलट पक्षीं शिवाजीचे राज्याची मजबुदी मोगलांप्रमाणें लष्करी जोरावर रचलेली नसून, ५८ सालच्या राणीच्या जाहीरनाम्यांत नमूद केल्याप्रमाणें, लोकसुखवृद्धीवर स्थापिलेली होती. शिवाजीचें मूळपासून धोरणच तशा प्रकारचें होतें. केवळ स्वतःच्या अभिवृद्ध्यर्थ त्यानें हे काम केलेलें नाहीं. त्याचें प्रत्येक कृत्य सार्वजनिक हिताचें आहे. लोक दांडगाई करूं लागले, तर पुष्कळशी फौज जमवून मोगलांप्रमाणें केवळ तलवारीच्या धारेखालीं त्यांस दाबांत ठेवणें शिवाजीस सहन झालें नसतें. तो आपल्या देशाकरितां, राष्ट्राकरितां, म्हणजे राष्ट्रांतील प्रत्येक व्यक्तीकरितां उद्योग करीत होता. शिवाजी व मोगल बादशहा यांजमधील हा महत्त्वाचा फरक होय. मोगलांच्या सुभ्यावर करडा लष्करी अंमल गाजविणारा एक सुभेदार, व त्या जोरावर प्रांताचा वसूल वाढविणारा एक दिवाण, असे दोन कामगार असत. प्रांतांत बंडावे न होऊं देतां राज्याचा वसूल जो वाढवील त्यासच हीं कामें बादशहाकडून देण्यांत येत. राजधानीच्या ठिकाणीं मुख्य प्रधान व उमराव वगैरे असत, परंतु बादशहाची मर्जी संभाळून त्याचे बरे वाईट हुकूम अमलांत आणण्यापलीकडे ज्यास्त सत्ता त्यांच्या हातांत दिलेली नसे. तथापि मुसलमान कारकिर्दींत मुज्मु, सुरनिसी, डबिरी वगैरे कामें होतीं; आणि त्यांवरूनच शिवाजीनें पहिले फारशी शब्द घेतले. कांहीं काळानें आपल्या राज्याचें पूर्ण हिंदी स्वरूप दाखविण्याकरितां, त्यानें संस्कृत नांवें प्रचारांत आणिलीं. शिवाजीस कथापुराणें ऐकण्याचा नाद फार असल्यामुळें राज्यव्यवस्थेसाठीं कांहीं तरी कायमची व्यवस्था करण्याची कल्पना एकवार मनांत आल्यावर ती महाभारत, स्मृति वगैरे ग्रंथांतून

पूर्वप्रघात पाहून त्यानें निश्चित केली. राज्यव्यवस्थेचे विभाग पाहिजेत, प्रत्येक विभागाबद्दल निराळा इसम जबाबदार धरला पाहिजे, लोकसुखवृद्धीची योजना राज्यव्यवस्थेंत सदैव पाहिजे, हे विचार शिवाजीच्या मनांत आरंभापासून एकसारखे घोळत होते. शिवाय महाभारतांत व मनुस्मृति वगैरे ग्रथांत या विषयांचा ऊहापोह अनेक ठिकाणीं खुलासेवार केलेला आहे. ' अष्टप्रधानांचीं नावें फारशी भाषेंत होतीं तीं शिवाजीनें शास्त्रोक्त केलीं ' असें बखरींत वारंवार लिहिलेलें आढळतें. याचा अर्थ इतकाच कीं दरबारची भाषा पूर्वींपासून फारशी होती, ती शिवाजीनें बदलली; आणि हिंदुधर्मशास्त्रांत सांगितलेली राज्यव्यवस्था त्यानें स्वीकारिली. सर्व महाभारत शिवाजीनें अनेक वेळां लक्षपूर्वक ऐकिलेलें होतें. शिवाय महाभारतांत राज्यव्यवस्था कोणत्या प्रकारची सांगितली आहे, हेंही विद्वान् गृहस्थांकरवीं शिवाजीनें समजून घेतलें असावें. महाभारत व दासबोध यांत सांगितलेल्या उपदेशाशीं शिवाजीची व्यवस्था पुष्कळ मिळती आहे. चिटणिसांनीं राजनीति लिहिली आहे, तींत प्राचीन राज्यपद्धति वर्णिलेली असून ती वाचली म्हणजे शिवाजीची पद्धति तिच्याशीं अगदीं मिळती आहे, हें तेव्हांच लक्षांत येतें. मुसलमानांत अशी व्यवस्था नव्हती. मुसलमानांत ती असती तर शिवाजीनें घेतली नसती असें नाहीं. सारांश, ही व्यवस्था त्यानें प्राचीन हिंदु कल्पनांवर बसवून, तींत स्वतःच्या अकलेनें व जवळच्या मंडळीच्या सल्लयानें कालदेशवर्तमानास जरूर ते फेरफार करून अंमलांत आणिली, असें स्पष्ट दिसतें.

कसेंही असलें तरी ही संस्था उत्पन्न करून शिवाजीनें राज्याचें पुष्कळ हित केलें. तिच्या योगानें राजाचें अनियंत्रित्व बरेंच कमी झालें; आणि एकमेकांचा एकमेकांवर दाब राहून राज्यकारभार सुरळीत चालण्याची सोय झाली. हें आपलें राज्य एक प्रकारचें अल्पजनसत्तात्मक होऊन बसलें; आणि ती सत्ता त्या प्रधानमंडळांतील पुरुषांच्या वंशजांनीं पुढें पुष्कळ दिवस उपभोगिली. ह्या संस्थेस कोणतीही हरकत येऊं नये अशा प्रकारच्या कित्येक योजना शिवाजीनें केल्या होत्या, त्या अनेक कारणांमुळें पुढें नीटपणें पाळल्या गेल्या नाहींत. त्यामुळें राज्याचें नुकसान झालें. तथापि शिवाजीनें आपलेकडून त्याच्या कायमपणाची होईल तितकी काळजी घेतली होती. एक तर प्रधानमंडळांतील लोकांस त्यानें

स्वतंत्र जहागिरी तोडून दिल्या नाहींत; तसेंच त्यांची कामें वंशपरंपरा चालावीं अशीही त्याची योजना नव्हती. त्यानें आपले प्रधान अनेक वेळां बदलिले. अंगची योग्यता हेंच अधिकार मिळविण्याचें उत्तम साधन असा प्रघात त्यानें घातला. त्याचे सर्व प्रधान अनेक बिकट प्रसंगांत नांवाजलेले होते; व ते शिवाजीच्या धोरणांत वाकबगार होते. तोच कित्ता त्यांच्या मुलांबाळांसही मिळणें साहजिक होतें. ह्यावरून शिवाजीचें राज्य खरोखर लोकनायक, रणधुरंधर व सर्वप्रकारें योग्य अशा पुरुषांच्या हातांत होतें. अनेक ठिकाणीं लष्कराच्या हातांत सर्व सत्ता जाते, तसा प्रकार न व्हावा एतदर्थ शिवाजीचे सर्व प्रधान लढण्यांत वाकबगार असून, त्यांत एकट्या सेनापतीचें महत्त्व विशेष नव्हतें. मोगलशाहींत सेनापतिच बहुतेक मुख्य असे, म्हणून सेनेच्या जोरावर शहाजाद्यांनीं बंडें करून बापांस कैदेंत टाकल्याचे प्रसंग उद्भवले. शिवाजीच्या व्यवस्थेंत असा प्रकार होणें शक्य नव्हतें. संभाजी फितूर झाला, पण त्यास मराठ्यांचें साह्य मुळींच नव्हतें, आणि तो राज्यावर आल्यावर शिवाजीची व्यवस्था त्यानें काळजीनें चालविली नाहीं, तरी ती न मोडतां उलट तिच्याच योगानें राज्याचे आधारस्तंभ असे निरानिराळे प्रधान पुढें आपत्प्रसंगीं राज्य राखण्यास समर्थ झाले.

शिवाजीच्या या प्रधानमंडळांतील दुसरा एक विशिष्ट गुण ध्यानांत ठेवण्याजोगा आहे. शिवाजीचे किल्ले, त्याचें लष्कर, त्याचें प्रधानमंडळ व त्याचे इतर उद्योग यांचे प्रधान उपयोग दोन होते. पहिला परशत्रूंपासून स्वराष्ट्रसंरक्षण, व दुसरा राज्यसंवर्धन. इतर राज्यांत स्वजातीय शत्रूंपासून स्वसंरक्षण करणें हा तिसरा एक राज्यकारभाराचा हेतु नेहमीं असतो, तो शिवाजीच्या व्यवस्थेंत नव्हता. कारण शिवाजीस स्वशत्रु असणेंच शक्य नव्हतें. त्यानें मुलखाच्या बंदोबस्ताकरितां किल्ले स्थापिले; पण मुलखाचा बंदोबस्त याचा अर्थ परशत्रूंपासून बचाव असा करावयाचा. मुसलमानांचें अनुकरण शिवाजीनें केलें नाहीं, असें म्हणण्यास हें आणखी एक कारण आहे. मुसलमानांच्या इतिहासांत पावलोपावलीं, व कित्येक वेळां इंग्लंडच्या इतिहासांत सुद्धां, सजातीय बंडखोर लोकांकडून राजांस व प्रजांस फार उपद्रव पोंचलेला आहे. तसा प्रकार महाराष्ट्रांत झाला नाहीं, ही एक समाधानाची गोष्ट आहेच, पण मराठे लोकांत त्या वेळेस ऐक्य उत्पन्न होत होतें याचीहि खूण त्यावरून पटते. या परिणामाचें कारण अंशतः

शिवाजीचें हें प्रधानमंडळ होय. कांहीं संकुचित व विशिष्ट अर्थानें मराठ्यांचें राज्य लोकसत्तात्मक होतें असें म्हणण्यास हरकत नाहीं. प्रत्येकास देशसेवा करण्यास त्यांत सवड होती. ज्यानें त्यानें स्वतःचें कल्याण करण्यास झटणें म्हणजे एकंदर राज्यांत भर घालणें असा प्रकार होता. अर्थात् आपण सर्व एक आहों, ही भावना उत्पन्न होण्यास शिवाजीच्या पद्धतींत सवड होती. पेशवा हें नांव पाहिजे त्यास मिळो, परंतु पेशव्याप्रमाणेंच पराक्रम करून नांव गाजविण्यास इतर प्रधानांस व बाहेरच्या लोकांस वाटेल तितकी सवड होती. म्हणूनच अधिकाराकरितां भांडणें होत नसत स्वशत्रूची भीति नसल्यामुळें राज्याचें सर्व सामर्थ्य परशत्रूवर खर्च करण्यास सांपडत असे. शिवाजीची सर्व फौज सदा शत्रूंच्या मुखांत फांकलेली असे. त्याच्या ताब्यांत मुसलमान प्रजा पुष्कळ होती, आणि प्रत्यक्ष मुसलमानी राज्यें शिवाजी पायांखालीं तुडवीत होता, तरी मुसलमान प्रजा शिवाजीवर उठल्याचें एकही उदाहरण नाहीं. इतकेंच नव्हे तर त्या मुसलमानांसही शिवाजीचे राज्यांत स्वत्व वाटूं लागलें होतें. हा त्याचे राज्यव्यवस्थेचा विशिष्ट गुण होय. मुसलमानांनीं लिहिलेले मुसलमानी राज्यांचे व शिवाजीचे इतिहास, तसेंच शिवाजीच्या उपलब्ध बखरी ह्यांची वाचकांनीं सूक्ष्म रीतीनें तुलना करून पाहवी. मोगल बादशाही, आदिलशाही, निजामशाही, कुत्बूशाही इत्यादिकांच्या मुसलमानी इतिहासांत सरासरी निम्में वर्णन हिंदूंनीं केलेल्या बंडांविषयीं आहे. उलट पक्षीं शिवाजीच्या मुलखांतील अगर फौजेंतील मुसलमान शिवाजीवर उठल्याचें एकही उदाहरण बखरींत अगर मुसलमानांच्या हकीकतींत लिहिलेलें नाहीं. परंतु शत्रूंच्या फौजेंतील अनेक मुसलमान लोक आपल्या धन्यांस सोडून शिवाजीच्या नोकरींत आले व त्यांस शिवाजीनें मोठ्या सन्मानानें वागविलें अशीं उदाहरणें आहेत. शत्रु हातांत सांपडला असतां, त्याचें पारिपत्य करण्याऐवजीं, त्यास सन्मानानें व इमानानें वागवून त्याजपासून आपला फायदा करून घ्यावा, असा शिवाजीचा प्रघात होता. सामान्य रयतेच्या बंदोबस्ताकरितां 'म्युनिटिव्ह पोलिस' प्रमाणें मुलखांत फौज ठेवण्याचें शिवाजीस प्रयोजन पडलें नाहीं.

शिवाजीच्या स्वभावांत नैसर्गिक उदारपण असल्यामुळें राज्यास आणखी एका प्रकारची मजबुदी आली होती. हें उदारपण समजण्यास जरा खोल

विचार केला पाहिजे. प्रधानमंडळ स्थापन करून त्याचे ताब्यांत विशिष्ट सत्ता राजानें दिली कीं त्याची सत्ता तितकी कमी झाली. प्रधानमंडळ एकमतानें अमुक एक गोष्ट करण्यास तयार झालें, कीं त्याजविरुद्ध जाण्यास राजाची छाति होत नव्हती. असा स्वत:वर आपले आपण दाब ठेवून घेणें मनाचें विशिष्ट औदार्य असल्याशिवाय होत नाहीं. असें औदार्य एकाही मुसलमान बादशहांत नव्हतें. इंग्लंडच्या राजांतही तें बेताचेंच होतें.

शिवाजीच्या पद्धतीवरून त्याचे मनांतील विचारांची आपणांस थोडी-बहुत कल्पना करितां येते. आपल्या पेशव्यानें आपणापेक्षां दसपट पराक्रमी व्हावें, व तोच कित्ता इतरांनीं चालवावा, हें त्यास प्रिय वाटे. त्याजबद्दल इतर कोणाचा त्यास मत्सर वाटत नसे. जितके आपले कामगार पराक्रमी तितकें आपलें राज्य ज्यास्त बळकट, असें त्यास सदैव वाटे. बखरकारांच्या हकीकतींत हें म्हणणें पदोपदीं व्यक्त होतें. राजे लोक आपल्या कामगारांविषयीं किती मत्सरी असतात, व त्या मत्सरामुळें कामगारांस दाबांत ठेवण्यासाठीं नानातऱ्हेच्या युक्त्या योजून ते स्वत:स नेहमीं दु:खी व आपले राज्यास नि:सत्त्व कसे करून घेतात, याचीं उदाहरणें मुसलमानी रियासतींत मुबलक सांपडतील. जगांतील कोणत्याही देशाचा इतिहास धुंडाळला तरी हा अनुभव येतोच. शिवाजीच्या व्यवस्थेंतील ह्या गुणाचा विचार महाराष्ट्रीयांनीं अवश्य करण्याजोगा आहे.

अशा व्यवस्थेंत देशसेवा करण्याची प्रत्येकास हुरूप येत असे. आपला धनी जाणता आहे, त्याजकडून आपल्या नोकरीचें चीज झाल्याशिवाय राहवयाचें नाहीं, अशी प्रत्येकास खात्री वाटत असे. बापाच्या मागें त्याचेंच काम जरी आपणास मिळालें नाहीं, तरी आपण काम केलें तर आपली उपेक्षा व्हावयाची नाहीं, असें प्रत्येक सरदाराच्या मुलास वाटे. जमिनीचीं उत्पन्नें तोडून दिलीं नसतांही व नोकरी वंशपरंपरा नसतांही, लोक नोकरी करण्यास इतके संतुष्ट व तत्पर असत, याचें कारण शिवाजीचा गोड स्वभाव व आपल्या लोकांत राष्ट्रसेवेची आवड उत्पन्न करण्याचें त्याचें शहाणपण होय.

सामान्यत: कोणत्याही देशाच्या राज्यकारभारांत लष्करी व दिवाणी अशीं दोन अंगें मुख्य असतात. प्रथमत: अंतर्बाह्य शांतता राखण्यासाठीं लष्करी अंगाची जरूर असते. पण हें अंग प्रधान नव्हे. लोकसुखाचें

साधन दिवाणी कारभारावर अवलंबून असतें. ज्या राज्यांत लष्करी सत्ता दिवाणी सत्तेच्या ताब्यांत असते, त्या राज्यांत लोकसुखाची मर्यादा अत्यंत वाढलेली असते. हल्लीं इंग्लंडचें पार्लमेंट ह्या स्वरूपाचें आहे. वीस असामींच्या प्रधान मंडळांत लष्करी सत्तेचे पुरस्कर्ते अवघे दोन म्हणजे युद्ध व आरमार खात्यांचे मुख्य आहेत. रोमन बादशाही व मोगल बादशाही यांचा कारभार बहुतेक लष्करी स्वरूपाचा होता. प्रांतांवरचे सुभे हे लष्करी योग्यतेवर नेमले जात; आणि लष्करी जोरावर लोकांकडून पैसे वसूल करणें हें त्यांचें मुख्य काम असे. लष्करी जरूर भागल्यानंतर मग लोकसुखाचा विचार बऱ्याच अंशीं ऐच्छिक होता. अकबरासारखे राज्यकर्ते प्रजापालनासंबंधानें मोठे नामांकित झाले, परंतु त्यांचें मूळ स्वरूप लष्करी बाण्याचें होतें. इंग्लंडच्या कारभारांत ज्याप्रमाणें लोक-सुखाला जरूर तितकेंच लष्कर ठेवावयाचें आणि तितकेच कर बसवावयाचे असा नियम ठरलेला आहे, तसा प्रकार अकबराचा नव्हता. शिवाजीच्या राज्याचें पहिलें स्वरूपही असेंच लष्करी बाण्याचें होतें. राज्यसंस्थापकाला लष्करी स्वरूप प्रथम धारण करणें भाग असतें. परंतु शिवाजीनें राज्य-कारभाराची व्यवस्था ठरविली तेव्हां त्यानें लष्करी धोरणास अगदींच मागें टेविलें. आठ प्रधानांपैकीं एकच प्रधान सेनापति ठेविला, आणि त्या वेळच्या स्थितीप्रमाणें सद्दा प्रधानांस जरी लष्करी काम करावें लागत होतें, तरी त्या प्रधानांचा मूळ उगम दिवाणी कारभार व्यवस्थित चालविण्याचा असून तेंच शिवाजी आपलें मुख्य कर्तव्य समजत असे. शिवाजीनंतरही ह्या दृष्टीनें मराठी राज्याचें धोरण तपासून पाहणें बोधप्रद होईल. शाहूच्या आगमनापर्यंत लष्करी धोरण प्रमुख होतें. बाजीरावानें राज्य कार-भारांत बरेंच लक्ष घातलें, तरी त्याचा बहुतेक काळ लष्करी कारस्थानांत गेला. दिवाणी कारभारांत त्यानें ज्यास्त लक्ष दिलें पाहिजे होतें. त्याचा मुलगा बाळाजीराव यानें दिवाणी कारभाराचें धोरण बरेंच पूर्णतेस आणिलें. मराठशाहीच्या अखेरीस महादजी शिंदे व नानाफडणीस यांची चुरसही दिवाणी व लष्करी स्वरूपांपैकीं वरचढ कोणतें असावें, ह्या प्रश्नाबद्दलच होती. हा प्रकार पुढें यथावकाश विशद होईल.

स्वसंरक्षणांतच राज्याची वृद्धि होत असते, आणि पुष्कळदां स्वसं-रक्षण करीत असतां राज्यवृद्धीसाठीं अनिवार हांव धरल्याचा आरोप

राज्यकर्त्यांवर येतो. वास्तविक शिवाजीला महाराष्ट्राचें राज्य पुरे वाटलें असतें. परंतु तेवढेंच राज्य करून त्यास कोणी स्वस्थ बसूं दिलें नसतें. शेजारच्या लोकांनीं व सत्ताधीशांनीं शिवाजीला मान दिला पाहिजे, त्याचा वचक बाहेर पूर्ण असला पाहिजे, नाहीं तर स्वतःचे राज्यांतही त्याचा टिकाव लागणें शक्य नसतें. कुल्यांचे प्रांतांतून हबशानें ब्राह्मण पकडून ठार मारिले कीं, हबशावर दहशत बसविणें भाग पडे. शिवाजीचा भाऊ व्यंकोजी जोंपर्यंत विजापुरचा ताबेदार आहे तोंपर्यंत, शिवाजीचें राज्य स्वतंत्र झालें असें कोण मानणार! अर्थात् शिवाजीस तंजावरपर्यंत जाऊन व्यंकोजीस कबजांत आणणें भाग पडलें. महाराष्ट्रांतच अंतर्भूत असलेलीं विजापुरगोवळकोंड्यांचीं राज्यें औरंगजेब आज नाहीं उद्यां जिंकणारच, मग तीं आपणच कां न जिंकावीं; शिवाय जोंपर्यंत शेजारीं हीं राज्यें आहेत, तोंपर्यंत रोज कटकटी व बंडाळी होणार. यासाठीं त्या राज्यांवरही आपला शह बसविणें शिवाजीस जरूर पडलें. इंग्रजींत ह्या धोरणास 'व्हिगरस पॉलिसी' म्हणजे ठोकून काढण्याचें राज्यधोरण असें म्हणतात. स्वसंरक्षणाची मर्यादा सोडून हें धोरण पुष्कळदां महत्त्वाकांक्षेच्या मर्यादेंत शिरतें; आणि ह्या मर्यादा ठरविणें सोपें नाहीं. कोणत्याही राज्यकारभाराचें धोरण समजून घेतांना तत्कालीन परिस्थित्यनुरूप ह्या मर्यादा ठरविल्या पाहिजेत. हिंदुस्थानांतील इंग्रजी राज्याचें धोरणही ह्या दृष्टीनें पाहणें उपयुक्त होईल.

फ्रेंच प्रवासी बर्नियर औरंगजेबापाशीं होता. सन १६६७ त त्यानें असें लिहून ठेविलें आहे, कीं, मोगलांचें राज्य अंतर्यामीं सर्वस्वी बिघडलें आहे. लहानशी युरोपियन फौज मोगलांवर चालून येईल तर ती तेव्हांच हें राज्य जिंकून घेईल. स. १६६७ त शिवाजीचा ग्रहही सर्वस्वी असाच झाला; आणि थोड्या अवधींत महाराष्ट्रापुरता त्यानें तो अंमलांतही आणिला. नुकताच शिवाजी बादशहास भेटून आला होता, आणि त्या सालीं मोगल बादशाहीच्या सत्तेचा कळस झाला होता. स. १७०० तले मनूचीचे उद्गार येणेंप्रमाणें आहेत. 'तीस हजार युरोपियन फौज मोगलांवर चालून येईल तर ती हें अफाट राज्य क्षणमात्रांत जिंकील अशी माझी बालंबाल खात्री आहे.' औरंगजेबावर झाडलेला हा ताशेरा सर्वथा योग्य आहे. अविश्वासामुळें तो आपले कामगार वारंवार बदली.

त्यांची आपसांत चुरस असे. शत्रुपक्षांकडून पैसे खाऊन ते धन्याचें नुकसान करीत. हा सर्व औरंगजेबाच्या दुष्ट राजनीतीचा परिणाम होय. हा प्रकार शिवाजीनें पूर्णपणें ओळखिला होता. संभाजीच्या हातून शिवाजीच्या कामाची पूर्तता झाली नाहीं; आणि राजारामाचे कारकीर्दीत मराठ्यांस यश आलें तरी मोगलांच्या पद्धतींतील दोष मराठ्यांत शिरले. नाहीं तर त्यांनीं सर्व मोगलबादशाही त्याच वेळीं आक्रमिली असती. निरनिराळे सरदार आपसांतील वैमनस्यामुळें राज्याचें नुकसान करूं लागले; कित्येक शत्रूंकडून पैसे खाऊन कर्तव्य करीनातसे झाले. हा प्रकार शिवाजीच्या वेळेस शक्य नव्हता.

शिवाजीच्या प्रधानमंडळाची मीमांसा येथवर झाली. त्यानें घातलेले नियम बरोबर पाळले गेले नाहींत, यामुळें ती व इतर संस्था कशा लयास गेल्या ह्याचा विचार पुढें क्रमानें यावयाचा आहे. शाहूछत्रपतीच्या कारकिर्दींत पेशवेपद वंशपरंपरागत चालू झालें. सरदार लोक नवीन मुलूख जिंकीत ते तो आपल्याच हातांत दाबूं लागले. म्हणजे स्वतंत्र जहागिरींची पद्धत, जी शिवाजीनें कधीं उत्पन्न केली नाहीं, ती पुढें सुरू झाली.

शिवाजीच्या राज्यकारभाराचीं मुख्य तत्त्वें खालीं लिहिल्याप्रमाणें थोडक्यांत सांगतां येतील. ( १ ) डोंगरी किल्ल्यांच्या साहाय्यानें देशाचा बंदोबस्त ठेवणें, ( २ ) सरकारी नोकरी वंशपरंपरेनें न देतां लायक इसमास देणें, ( ३ ) लष्करी किंवा इतर नोकरीबद्दल स्वतंत्र जहागीर किंवा नेमणूक तोडून न देणें, ( ४ ) लोकांकडील वसूल जमीनदारांचे मार्फत न घेतां तो सरकारी नोकरांकडून जमविणें, ( ५ ) सरकारी महाल इजाऱ्यानें किंवा लिलांवानें वहिवाटीस न देणें, ( ६ ) निरनिराळ्या खात्यांवर स्वतंत्र प्रधान नेमून त्यांजकडून ज्या त्या खात्याचें काम घेणें, ( ७ ) राज्यकारभारांत लष्कराचें माहात्म्य वाढूं न देणें, ( ८ ) ब्राह्मण, प्रभू आणि मराठे यांस नोकरींत घेऊन एकमेकांच्या दाबांत ठेवणें, ( ९ ) सर्व खर्च भागून नियमित शिल्लक नेहमीं टाकणें. हीं धोरणें शिवाजीच्या पूर्वी किंवा त्याच्यानंतर राज्यकर्त्यांनीं ध्यानांत ठेविलेलीं दिसत नाहींत. अर्थात् त्यांवरून शिवाजीची योग्यता कळून येते.

३. शिवाजीची मुलकी व्यवस्था.—रयतेस सुख देऊन आपला वसूल कसा वाढवावा, हें शिवाजी मूळ दादाजी कोंडदेवापाशीं शिकला,

त्याचा उल्लेख मागें आलाच आहे. पुढें राज्याचा विस्तार होऊन, त्याची स्थीरस्थावर होत गेली, त्या मानानें शिवाजीच्या मुलकी व्यवस्थेस कायमपणा येत गेला. पूर्वी जमिनीचा वसूल उत्पन्न झालेल्या धान्यानें भागविण्यांत येई व तो जमीनदार अगर धारेकरी यांचेमार्फत सरकारांत भरला जाई. शिवाजीनें हे दोनही प्रकार आपल्या व्यवस्थेत बंद केले. जमिनीची मोजणी करून, तिचा सारा एकदां कायमचा ठरवून देण्यांत आला, आणि तो गोळा करण्याकरितां शिवाजीनें सरकारी अंमलदार नेमिले. पूर्वी गांवोगांवीं जमीनदार लोक रयतेकडील वसूल गोळा करीत, त्यामुळें सरकारी जमिनी एक प्रकारें इजाऱ्यानें दिल्यासारख्या होऊन, हे जमीनदार रयतेस त्रास देऊन सरकारासही जुमानीत नसत. रयतेपासून फाजील वसूल घेऊन सरकारांत तो सर्व भरीत नसत. हा दोष काढून टाकण्याकरितां शिवाजीनें कमाविसदार, महालकरी, सुभेदार वगैरे पगारी अंमलदार नेमिले. जमिनीची मोजणी करून ती खातेदारांचे नांवावर चढवावयाची, व सरकारी साऱ्याबद्दल कबुलायत लिहून घेऊन जमीन खातेदाराचे हवालीं करावयाची, असा प्रघात शिवाजीनें घातला. सारा ठरवितांना उत्पन्नाचे दोनपंचमांशापेक्षां ज्यास्त वसूल केव्हांही घेऊं नये, अशी शिस्त होती. म्हणजे जमिनीचे मालकास तीनपंचमांश राही. आपत्काली लोकांस तगाई वगैरेची मदत देऊन सरकारी घेणें हप्त्याहप्त्यानें वसूल करण्यांत येई. अशा हप्त्यांची मुदत चारचार पांचपांच वर्षेपर्यंत चाले.

वरील मुलकी अंमलदारांकडे फौजदारी कामेंही सोंपविलेलीं असत. दिवाणी कामांकरितां विशेष व्यवस्था नव्हती. गांवपंचायतीची संस्था कायम असल्यामुळें लोकांच्या सर्व तंट्यांचा निकाल पंचायतींचे मार्फत जागचे जागींच होई. विशेष प्रसंगीं आसपासच्या गांवांतील प्रमुख मंडळींतून पंच निवडण्यांत येत, व पंचांचे निकाल अमलांत आणण्यास सरकारी अंमलदारांस मदत करीत. त्या वेळचा न्याय शास्त्रास अनुसरून करण्यांत येत असे. कित्येक ठिकाणीं मुसलमानी रूढ प्रचारांचा स्वीकार केलेला होता.

मुख्य प्रधानमंडळांतील पंतअमात्य व पंतसचिव ह्या दोन कामगारांकडे राज्यांतील जमीनमहसूलसंबंधीं हरएक व्यवस्था असे. पंत अमात्यानें वसूल

जमा झाला की नाहीं हें पाहणें, व सचिवानें सर्व दप्तरावर देखरेख ठेवणें, अशी व्यवस्था होती. गव्हर्नरच्या हल्लींचे कौन्सिलांतील रेव्हेन्यु मेंबर व फिनन्स किंवा हिशेबी मेंबर म्हणून जे मुख्य दोन कामगार आहेत, त्याच प्रकारचे हे शिवाजीचे दोन कामगार होते. रयतेच्या एकंदर हिताहिताशीं ह्या दोन कामगारांचा विशेष संबंध असे.

शिवाजीच्या राज्यव्यवस्थेचे अस्सल कागद प्रसिद्ध नाहींत, म्हणून त्याची खरी कामगिरी स्पष्ट सांगतां येत नाहीं. पण राज्यकारभाराचें कौशल्य आयव्ययावर योग्य दाब ठेवण्यांत असतें. त्यासंबंधानें शिवाजीचें कौशल्य अप्रतिम होतें. स. १६७१ चा एक कागद खंड ८ ले० २१ चा आहे, त्यांत असा मजकूर आहे:-' जो आपला वतन मुलूख आहे, त्यापैकीं महालोमहालींहून खजाना करावयास पैसे आणावे. त्याचा खजानाच करून ठेवावा, (म्ह० या शिलकेस कधीं हात लावूं नये). जे वक्तीं मोगलांशीं झगडा सुरू होईल आणि मोगल येऊन गडास वेढा घालतील, त्याचे मदतीस जरूर. आणिकी करून ऐवज जुडेना तरीच खजानाचे पैके खर्च करावे. नाहीं तरी एऱ्हवीं राज्यभागास सर्वही खर्च न करावा. ऐसा साहेबीं तह केला असे.' यापुढें नांवनिशीवार महाल देऊन प्रत्येकांतून किती शिल्लक टाकावी तें ठरवून एकंदर शिल्लक एक लक्ष पंचवीस हजार होन करावी असा ठराव शिवाजीनें केला. त्याचप्रमाणें खर्चाबद्दलही आगाऊ मंजुरीचा ठराव करून मग खर्च करीत जावा, असें त्याच पुस्तकांतील लेखांक २२ वरून दिसतें.

शिवाजीच्या मुलखाचे स्वराज्य व मोगलाई असे दोन विभाग केलेले होते. स्वराज्य म्हणजे स्वतःच्या ताब्यांत संपूर्णपणें आलेला प्रदेश. मोगलाई म्हणजे परकीयांचे ताब्यांत राहून खंडणी वगैरे देणारा प्रदेश. स्वराज्याचें संरक्षण करण्यासाठींच शिवाजीनें प्रधानमंडळादि संस्था उत्पन्न केल्या. शिवाजीच्या ताब्यांतील एकंदर मुलखाची नांवनिशी येथें देणें जरूर आहे. (१) त्याची वडिलोपार्जित पुण्याचे आसपासची जहागीर. (२) मावळप्रांत. ह्यांत हल्लींचे मावळ, सासवड, जुन्नर आणि खेड हे तालुके येतात. यांत अठरा डोंगरी किल्ले होते. (३) वाई, सातारा आणि कऱ्हाड प्रांत, हल्लींच्या सातारा जिल्ह्याचा पश्चिम भाग, यांत पंधरा किल्ले होते. (४) पन्हाळाप्रांत, म्ह० कोल्हापुरचा पश्चिम

भाग. यांत किल्ले तेरा. ( ५ ) दक्षिणकोंकण, म्ह० हल्लींचा रत्नागिरि जिल्हा. यांत जलदुर्गांचा समावेश झाल्यामुळें ५८ किल्ले होते. (६) उत्तर-कोंकण,–म्ह० ठाणें, यांत किल्ले बारा. (७) बागलाण त्रिंबक, म्हणजे नाशीक जिल्ह्याचा पश्चिम भाग, यांत डोंगरी किल्ले ६२. (८) प्रांत वनगड, म्हणजे हल्लींच्या धारवाड जिल्ह्याचा दक्षिण भाग. यांत २२ किल्ले असून संरक्षणासाठीं स्वतंत्र फौज ठेवावी लागत होती. (९) बेदनूर, कोलार व श्रीरंगपट्टण, म्ह० म्हैसूर संस्थान यांत किल्ले अठरा. ( १० ) प्रांत कर्नाटक म्ह० कृष्णेच्या दक्षिण तीराचा नवीन जिंकिलेला प्रदेश. यांत किल्ले अठरा. (११) प्रांत वेलूर, म्हणजे हल्लींचा अर्काट जिल्हा. यांत किल्ले पंचवीस. (१२) प्रांत तंजावर यांत किल्ले ६. हे जे प्रांत सांगितले, ते स्वराज्याखालीं मोडत. याशिवाय परराज्यांतून खंडणी देणारा मुलूख बराच होता. वरील प्रांतांस मोगल व्यवस्थेप्रमाणें सुभे असेंही म्हणतां येईल. प्रत्येक प्रांतावर अगर सुभ्यावर सुभेदार म्हणून एक मुख्य अंमलदार हल्लींच्या कलेक्टरासारखा असे. तसेंच प्रांताचे दोन किंवा तीन पोटविभाग असून त्यांस महाल अशी संज्ञा होती. प्रत्येक महालाचें सरासरीनें उत्पन्न पाऊणलाख ते सव्वालाख होन पर्यंत असे. म्हणजे शिवाजीच्या स्वराज्याचा नक्त वसूल पन्नास लाख होन असावा असा अदमास करितां येतो. त्याशिवाय खंडणी व लूट वगैरेचें उत्पन्न येई तें वेगळें. सुभेदाराचा वार्षिकी तनखा ४०० होन म्हणजे दरमहा शंभर रुपये असे. त्या वेळच्या मानानें ही रक्कम लहान नव्हे.

जमीन महसुलाशिवाय इतर बाबतींसंबंधानें शिवाजीनें कोणते कर बसविले होते, तें समजत नाहीं. नारळ व सपारीसंबंधानें खालील उल्लेख आहे. ( खं. ८, ले. २६ ). शिवाजीचें हें पत्र प्रभावळीच्या सुभ्यास आहेः— ‘ मामले दाभोळ विलायतीस नारळ दर सद्दे लारी ४ व रोंठा देखील जकात दर खंडीस लारी १२५ प्रमाणें विकत आहे. कमनिरखें नारळसुपारी विकते ऐशी खबर कळों आली. पेस्तर ऐसें न व्हावें. कमनिरखें विकलीया इकडे धक्का बसतो, त्याची बदनामी तुम्हांस. ऐसें जाणून खरी खबर घेऊन, चौकशी करून ऐनजिन्नस ठरावाप्रमाणें दिवाणांतून विकीत जाणें.’ मिठाच्या खरेदीविक्रीसंबंधानेंही शिवाजीचे नियम होते आणि किती एक ठिकाणीं त्यानें बाहेरून येणाऱ्या मिठावर जबर जकात बसविली होती.

' संगमेश्वरीहून बारदेशीच्या मिठास जबर निरख पडे ती गोष्ट करणें. ये गोष्टीचा जरा उजूर न करणें. ये गोष्टींत साहेबाचा बहुत फायदा आहे. ' इत्यादि मजकूर खं. ८ ले. २७ त आहे.

सन १६७८ त अनाजी दत्तो सचिवाच्या मार्फत जमीन महसुलाची शिवाजीनें व्यवस्था केली. त्यांतलि उतारा. ' धान्याचा तह बसवून आकार करावा. अखेर कामास एक ब्राह्मण अगर परभु कारकून ठेवावा. जमिनीचे पोटफोडी गावीं पीक काय पिकलें व काय धारा घ्यावा हें त्या गरीबास काय ठाऊक. ह्याबद्दल तुमच्या महालचे मक्तेदार तुम्ही. आजपासून आपले महालाचा आकार करणें. ह्याबद्दल खासा देशमुख व देशकुळकर्णी व मुकादम व मोख्तसर ( वजनदार ) चार रयता अशा मिळवून एक विचारानें गांवचा गांव फिरून, ऐसें करणें - कीं, अमका गांव, त्यासी रक्कम अमकी, त्याची जमीन अमकी, त्यासि अवलदुम सीमा अमक्या, ऐसी जाती निवडून, त्यास पिकाचा अजमास करून, कष्ट केल्यानें काय पिकेल, तें चौकस करून, ती रक्कम त्या शेताच्या शिरीं बसवून, समक्ष पाहून आकार करणें. ऐसें कीं, एक ठिकाण, मालिकंबरी रक्कम अमकी झाली, त्यामध्यें खरीफ एक पीक अमकी, रब्बी दुपीक अमकी, ऐसी जात निवडून त्यामध्यें अमके बिघे, अमका गल्ला, ऐसा पिकाचा आकार करून ठिकाणचे ठिकाणांत पांच सात कुळें असलीं तरी असोत. त्या शेतावरहुकूम गांवखंडणी सारा आकार करणें. सर्व तपाचा आकार तुम्हास करावयास आजपासून फुरसत पुढील साल पावेतों दिली आहे. इतक्यामध्यें कुलतपा फिरून गांवचें गांव व शेताचें शेत आकार करणें; आणि आकार चौकसीनें आम्हांस लिहिणें. आम्ही येऊन तयामध्यें तीन गांव तीन प्रतीचे पाहून, आणि चौघांचे समक्ष समजाऊन खरें करून, एके गांवचा आकार असेल त्यावरी रुजू घालून बजिन्नस सवाई, दिढी, दुणी बेरीज झाली, तरी तुम्ही त्याप्रमाणें उत्पन्न करणें. येणें प्रमाणें कबूल करून कीर्द महालीं देणें ' . ( खं. १५ ले. ३४० ).

स्वराज्यांत लूट, खंडणी, दरोडे, वगैरेचा उपद्रव रयतेस सहसा होत नसे. तेथील रयतेवर जमिनीच्या साऱ्याशिवाय दुसरा कोणताही कर नव्हता.

पाऊस पडला नाहीं तर पुढील वसुलाची माफी आगाऊ देत असत (इ. सं.). मुलकी व्यवस्थेंत लष्करी अंमलदारांस कांहींच अधिकार नव्हता. प्रत्येक गांवास एक पाटील व एक कुळकर्णी व दोन तीन गांव मिळून एक कमावीसदार असे अधिकारी नेमलेले असून, त्यांवर एक तरफदार किंवा तालुकदार किंवा महालकरी म्हणून ब्राह्मण किंवा प्रभु जातीचा एक अंमलदार असे, आणि त्याचे जोडीस एक मराठा हवालदार असे. तालुकदारावरचा अधिकारी सुभेदार. शेखदार, दरखदार, कमाविसदार, सुभेदार व सरसुभेदार असे पांच मुलखी अधिकारी मराठशाहींत पुढें हळूहळू कायम झाले. प्रत्येक महालाचा वसूल किल्लोकिल्लीं नेऊन ठेवण्याचा ठराव होता. या व्यवस्थेंत मोगल पद्धतीप्रमाणें देशमुख, देशपांडे वगैरे पिढीजाद वतनदार लोकांकडे कांहींच अधिकार शिवाजीनें ठेविलेला नव्हता. शिवाय कोणत्याही खात्यांतील नोकरांस जहागिरी अगर उत्पन्नें तोडून दिलेलीं नव्हतीं. सर्वांस त्यांचे कामगिरीबद्दल दरमहाचे दरमहा रोख वेतनें सरकारी खजिन्यांतून देण्यांत येत. या व्यवस्थेमुळें अंमलदार बळावून सरकाराविरुद्ध उठण्याची भीति कधींच नव्हती. मुसलमानी अमलांत अगर इंग्लंडांतील प्राचीन फ्यूडल पद्धतींत हाताखालचे लोक जबरदस्त होऊन राजास जुमानीतनासे झाले, तो प्रकार शिवाजीनें काढून टाकिला. देशमुख, देशपांडे इत्यादि पिढीजाद नोकरांस सुद्धां आपले हक्क रयतेपासून परभारें वसूल करण्याची सक्त मनाई होती. तसेंच शिवाजीनें गांवोगांवचे जुने तट पाडून टाकिले आणि नवीन कोणासही करूं दिले नाहींत. या व्यवस्थेवरून शिवाजीचें धोरण हल्लींचे सरकाराच्या धोरणाशीं किती मिळतें आहे हें तेव्हांच व्यक्त होतें. किल्ल्यांतील संरक्षकांस, देवस्थानांस व लढाईंत विशेष पराक्रम करणारांस मात्र तो केव्हां केव्हां इनाम जमिनी देत असे. मुसलमान अगर हिंदु देवस्थानांचीं पूर्वीं चालू असलेलीं उत्पन्नें त्यानें बंद केलीं नाहींत. ( ओवेन, पृ. १३७ ).

इतर व्यवस्थेबरोबर शिवाजीनें खासगीकडील कारभाराची व्यवस्था ठरवून दिली. त्यांतच मातुःश्रीच्या संबंधाची व्यवस्थाही ठरविली होती. तिच्या सेवेस हुशार माणसें व बायका नेमून दिल्या होत्या. पहाऱ्याचे शिपाई, पुजारी, पुराणिक वगैरे नेमून देवतार्चनाची व दानधर्माची स्वतंत्र व्यवस्था लावून दिलेली होती. एक दिवाण, एक चिटणीस, एक फडणीस

व एक पोतनीस इतके कामगार व कारकून मंडळी तिच्या तैनातीस असत. तिच्या व्यवस्थेंत यत्किंचित् कमी पडूं न देण्याविषयीं शिवाजी अत्यंत काळजी बाळगीत असे.

मराठशाहींतील न्यायाची पद्धत विशेष प्रशंसनीय होती. त्वरित, थोड्या खर्चाचा व सुलभ न्याय लोकांस मिळण्यासंबंधानें ह्यापेक्षां अन्य पद्धत संभवत नाहीं. ह्या पद्धतीचें वर्णन पुढें स्वतंत्र येणार आहे.

त्या वेळीं रस्ते फारसे नसून, अवघड जागांतून चोरांचें भय विशेष होतें. पण शिवाजीनें चोरांचा चांगलाच बंदोबस्त केला. अशा लोकांस पकडून आणून कित्येकांचे शिरच्छेद केले. कित्येकांस किल्ल्यांवर व इतर ठिकाणीं बंदोबस्तासाठीं नोकरींत ठेवून, त्यांस लागवडीसाठीं जमिनी दिल्या; आणि त्यांनीं गडकऱ्याकडे हजिरी देण्याचा ठराव केला. गांवांत चोरी झाली असतां ती ह्या रखवालदारांनीं भरून द्यावी, असा रिवाज होता. अशा व्यवस्थेनें मुलखांत चांगला बंदोबस्त झाला.

४. शिवाजीचे किल्ले.—शिवाजी केवळ शूर योद्धा नव्हता. राज्य-संस्थापकाच्या अंगीं कित्येक विशेष गुण असावे लागतात, त्या गुणांशिवाय राज्य नांवारूपास येत नाहीं. मागें ज्या शिवाजीच्या मोहिमा वर्णिल्या आहेत, त्यांच्या योगानें त्याच्या योग्यतेचें खरें स्वरूप चांगलेंसें स्पष्ट होत नाहीं. त्यांवरून फार तर तो शूर लढवय्या असावा इतकाच बोध होतो. पण त्याची कीर्ति चिरस्मरणीय होण्यास त्याच्या अंगची दुसरी कर्तबगारी कारण झाली आहे. त्यानें राज्याच्या चिरस्थायिकतेकरितां अनेक महत्त्वाच्या तजविजी नवीन करून ठेविल्या. ह्या तजविजी त्याच्या दूरदृष्टीची व मुत्सद्दीपणाची साक्ष देतात. त्याच्या लष्कराची व्यवस्था व किल्ल्यांच्या योगानें राज्य ताब्यांत राखण्याची युक्ति, किनारा ताब्यांत ठेवणारें आरमार व शिपायांस उत्तेजन देण्याची त्याची हातोटी, इत्यादि व्यवस्था त्यानें नवीन केल्या. त्यांचें वर्णन आतां करावयाचें आहे.

महाराष्ट्रदेशभर, कोंकणांत, समुद्रकांठीं, घांटमाथ्यावर व इतर प्रदेशीं मोडकळीस आलेले असे पुष्कळ किल्ले आज आपण पाहतों, व पुष्कळांची माहिती आपण कानांनीं ऐकिली आहे. हे बहुतेक किल्ले शिवाजीच्या वेळचे आहेत. म्हणजे त्यांची उपयुक्तता पाहून कित्येक मुसलमानी अंमलांतील किंवा कित्येक तत्पूर्वकालचे किल्ले, शिवाजीनें दुरुस्त करून

मजबूद केले; व रायगड, प्रतापगड, सिंधुदुर्ग वगैरे पुष्कळ किल्ले त्यानें नवीन बांधिले. ह्या किल्लयांच्या समांतर अशा तीन चार रांगा आपल्या दृष्टीस पडतात. एक पश्चिमेस समुद्रकांठावर, दुसरी सह्याद्रीच्या घाटमाथ्यावर, तसेंच सह्याद्रीला छेदणारे जे पूर्वपश्चिम, डोंगरांचे अनेक फांटे आहेत, त्यांवर पश्चिमेस व पूर्वेस अशा दोन पोट रांगा आहेत. यांशिवाय पूर्वेकडील सपाट प्रदेशांत जीं मोठमोठीं शहरें आहेत त्यांचे कोट हेही एकप्रकारचे किल्लेच होत. पण शिवाजीची विशेष भिस्त अशांवर नव्हती, आणि त्यांची निराळी रांग म्हणून बनलेली नव्हती.

परिस्थितीच्या संबंधानें किल्ल्यांचे तीन प्रकार आहेत. पाण्यांत बेटावर अगर भूशिरावर बांधिलेला असतो, त्यास जंजिरा अगर दुर्ग असें म्हणतात. डोंगराळ किल्ल्यास गड व मैदानांतील शहर अगर अन्य स्थळ यांच्या सभोंवार असलेल्या किल्ल्यास भुईकोट अगर नुसता कोट अशा संज्ञा आहेत. रायगड, प्रतापगड, पन्हाळगड हे डोंगरी किल्ले होत. सिंधुदुर्ग, सुवर्णदुर्ग वगैरे जंजिरे होत. विजापुर, सोलापुर, बदामी, इत्यादि ठिकाणचे किल्ले भुईकोट होत. भुईकोटांची मातब्बरी शिवाजीस विशेष वाटली नाहीं. गड व दुर्ग यांजवरच शिवाजीची भिस्त होती. बखरींत सुमारें दोनशें किल्लयांची नांवें दिलेलीं आहेत. त्यांत भुईकोटांचीं नांवे फारशीं नाहींत. ह्या किल्ल्यांच्या ज्या चार रांगा वर सांगितल्या, त्यांच्या योगानें सर्व देश ताब्यांत ठेवण्याची शिवाजीची योजना होती. किल्ला अवघड डोंगरावर बांधिलेला असे; आणि वर जाण्यास एखाद दुसरीच वाट असल्यामुळें, तेवढी वाट बंद केल्यावर शत्रूंचा प्रवेश किल्लयांत होण्यास मुष्कील पडे. किल्लयांवर थोडीशी शिबंदी ठेवून, तिच्या योगानें किल्ला व त्याच्या सभोंवारचा बराच टापू यांचा अल्पायासानें बंदोबस्त ठवितां येई. किल्ल्यावर दाणागोटा, दारूगोळा, मीठ, तंबाखू, शस्त्रसामान, खजिना वगैरे सर्व प्रकारचें मुबलक साहित्य ठेविलें असल्यामुळें, व लोकांस राहण्याच्या सर्व सोयी आंत उत्कृष्ट असल्यामुळें, वर्ष दोन वर्षे जरी शत्रूचा वेढा पडला, तरी आंतील थोडीशी शिबंदी शत्रूच्या अवाढव्य फौजेसही दाद देत नसे. अशा किल्ल्यांच्या योगानें साधलेली लष्कराची व लढाईची तयारी इतर देशांत फारशी प्रचारांत नाहीं. हिंदुस्थानांतही महाराष्ट्रांतल्याप्रमाणें इतरत्र ची आढळत नाहीं, याचें कारण महाराष्ट्राची सृष्ट रचना त्या व्यवस्थेस

सोयकर अशीच आहे. रचना चाणाक्षपणें ओळखून शिवाजीनें तिचा स्वकार्याकडे उपयोग करून घेतला.

शिवाजीचे एकंदर किल्ले जवळजवळ तीनशें होते. मुख्य हवालदार नेमतांना तो चांगला इमानी व कर्तृत्ववान् असा पाहून नेमण्यांत येत असे. तटाच्या खालीं माचीमाचीला रखवालदार नेमून दिलेले असत. या रखवालदारांनीं आसपास शत्रूवर नजर ठेवून सभोंवारचें रान राखावें असा हुकूम होता. किल्ल्याच्या पायथ्याशीं नाक्यानाक्यावर रामोशी, मांग, बेरड वगैरे लोकांच्या चौक्या असत. त्यांनीं शत्रूची बातमी ठेवून किल्ल्यावर तात्काळ पोंचवावी, अशी ताकीद होती. संध्याकाळीं किल्ल्याचा दरवाजा लावून त्यास कुलूप लावीत. हवालदारानें दररात्रीं स्वत: एक दोन वेळां येऊन बंदोबस्त पाहवा, असा नियम होता. दिवसापेक्षां रात्रीचा बंदोबस्त विशेष कडक होता. यत्किंचित् ढिलाई केल्यास शिवाजीकडून अत्यंत कडक शासन होत असे. किल्ल्यावर येण्याचे चढाव सोपे होते ते सर्व तासून सुरुंग लावून बेलाग करविले होते. किल्ल्यांवर ठिकठिकाणीं तोफा लावून ठेविलेल्या होत्या. लष्करांतील तोफखान्याचे नियम अत्यंत काळजीनें ठरविलेले असून, तोफखान्याकडील बैल, हत्ती, सुतार, लोहार, गोलंदाज वगैरेंची व्यवस्था यथायोग्य ठेविलेली होती.

प्रत्येक किल्ला व तन्मर्यादापरिविष्ट प्रदेश हा शिवाजीच्या राज्यमालिकेतील एक एक मणि होय. या बहुमोल मालिकेनें शिवाजीनें आपलें राज्य एकत्र ग्रथित केलें होतें. शिवाजीचीं बहुतेक अचाट कृत्यें ह्या किल्ल्यांच्या योगानें तडीस गेलीं. ह्या किल्ल्यांच्या योगानें नाना ठिकाणची लूट सुरक्षितपणें त्यास घरीं आणतां आली. सुरत व खानदेश येथील लूट रायगडीं आणतांना बागलाण व नाशीक या प्रांतांतील किल्ल्यांचा त्यास अतिशय उपयोग झाला. शिवाजीनें मिळविलेला बहुतेक पैसा या किल्ल्यांची बांधणी करून ते सुरक्षित ठेवण्यांत खर्च झालेला आहे. किल्ल्यांवर तो पाण्याप्रमाणें पैसा खर्च करी. अनेक आणीबाणींचे प्रसंग शिवाजीवर आले असतां, त्यांतून निभावून जाण्यास हेच किल्ले त्यास उपयोगी पडले. कित्येक किल्ले स्वसंरक्षणाच्या सोयीचे, तर कित्येक शत्रूवर छापा घालून त्याचा पाडाव करण्याच्या सोयीचे, असे

नांवाजलेले असून त्यांच्याच योगानें मराठ्यांच्या तत्कालीन पराक्रमांस एक-प्रकारची विलक्षण रसाळता उत्पन्न झाली आहे. रायगड किल्ल्यावर शिवाजीनें आपली राजधानी केली. उगाच आपली बडेजाव लोकांत मिरविण्याकरितां मैदानांतील एखादें शहर त्यानें राज्याची मुख्य जागा केली नाहीं. शिवाजीस पोकळ मिरवणुकीचा तिटकारा असे. कर्नाटक प्रांत जिंकून जिंजी किल्ला ताब्यांत ठेवण्यांत त्यानें अतिशय श्रम व खटपट केली, यावरून भावी संकटप्रसंगीं तो जिंजी किल्ला आपल्या अनुयायांस अत्यंत उपयोगी पडेल, असें, जणूं काय, त्यास स्वप्नच पडलें होतें. साताऱ्याची मजबुदीही अशाच प्रकारची होती. म्हणूनच तेथें पुढें मराठ्यांची राजधानी झाली. याच किल्ल्यावर प्रतिनिधीच्या पूर्वजांनीं आपला पहिला पराक्रम गाजविला. तसेंच दुसऱ्या अनेक मोठमोठ्या किल्ल्यांच्या संबंधानें अत्यंत रसाळ, स्वाभिमानसंवर्धक व कविगुणपरीक्षक असे अनेक प्रसंग महाराष्ट्रेतिहासांत घडले आहेत. त्यांचें वर्णन करण्यास स्वित्झर्लंडांतील ' शिलोनचा कैदी ' नांवाचें काव्य रचणाऱ्या बायरन कवीसारखे कवी मात्र आपणास पाहिजेत. सिंहगडानें तानाजी मालुसऱ्याचें नांव आबालवृद्धांच्या तोंडीं आणून दिलें आहे. जिंजीवासानें तर मराठ्यांचा खरा स्वाभिमान कसासच लाविला. प्रतापगडाचें नांव निघाल्याबरोबर अफझलखानावर शिवाजीनें मिळविलेल्या विजयाची आठवण कोणास होणार नाहीं! बागलाणांतील सालेर व पट्टा ह्या किल्ल्यांनीं मराठ्यांस धनप्राप्तीस किती हातभर लाविला! सन १६७१च्या धुळवडीच्या रात्रीं राजपुरीच्या जंजिऱ्यावर सीदीनें उडवून दिलेल्या कल्लोळानें रायगडावर शिवाजी दचकून उठला, त्या प्रसंगाचें वर्णन करणारा बायरन अगर मूर आपल्यांत कोठें आहे? थर्मापिलीची साम्यता पावलेला खेळणा व तेथें आपले प्राण खर्चीं घालून शिवाजीस वांचविणारा स्वामिभक्त बाजी प्रभु यांची आठवण बुजणें शक्य आहे काय? दिलीरखानास ' दे माय धरणी ठाय ' करण्यास लावणारा ' मुरारबाजी ' व ' पुरंदर ' हीं नांवें महाराष्ट्रविद्यार्थ्यांच्या मुखीं घोळत असलीं पाहिजेत. पन्हाळा व खेळणा ऊ० विशाळगड हे तर प्राचीन काळापासून राष्ट्राचें रक्षण करण्यांत सदैव निमग्न आहेत. विशाळगडावर नेहमीं जनानखाना असे. अलीबाग व मालवण येथील जंजिरे शिवाजीच्या आरमाराचें केवळ आदिस्थान होत. तसेंच जेथें शिवाजीचा

जन्म झाला तो शिवनेरी किल्ला त्या प्रभूच्या नांवाची आठवण लोकांस नेहमीं करून देईल यांत संशय नाहीं. सारांश, अशा नामांकित किल्ल्यांच्या योगानें महाराष्ट्रेतिहासास एक विलक्षण रमणीय स्वरूप प्राप्त झालें आहे. प्रत्यक्ष शिवाजीस ह्या किल्ल्यांचें महत्त्व इतकें वाटत होतें, कीं 'किल्ले बहुत झाले. विनाकारण पैका खर्च होतो, ' असा जवळच्या मंडळींनीं शिवाजीस अर्ज केला असतां तो म्हणाला, 'जैसा कुळंबी शेतास माळा घालून शेत राखितो, तसे किल्ले राज्यास रक्षण आहेत. तारवांस खिळे मारून बळकट करितात, तशी राज्यास बळकटी किल्ल्यांची आहे. किल्ल्यांच्या योगानें औरंगशहासारख्याची उमर गुजरून जाईल.' (म. सा. छो. बखर, पृ. ३९.) 'आपणांस धर्मस्थापना व राज्यसंपादन करणें. सर्वांस अन्न लावून, शत्रुप्रवेश न होय, तें किल्ल्यामुळें होतें. सर्वांचा निर्वाह आणि दिल्लींद्रासारखा शत्रु उरावर आहे. तो आला तरी नवे जुने तीनशें साठ किल्ले हजरतीस आहेत. एक एक किल्ला वर्ष वर्ष लढला, तरी तीनशें साठ वर्षें पाहिजेत.' (शिवदिग्विय पृ. १९०).

प्रत्येक गडावर एका मराठे हवालदाराच्या किंवा गडकऱ्याच्या हाताखालीं त्याच्याच जातीचे दुसरे मदतनीस असून त्यांजकडे निरनिराळ्या बुरुजांची व्यवस्था सोंपलेली असे. किल्ल्यावर दुसरा मोठा कामगार ब्राह्मण जातीचा सबनीस म्हणून असे, व तिसरा प्रभु जातीचा कारखाननीस असे. मुख्य हवालदाराचें काम किल्ल्याचे रखवालीचें व बंदोबस्ताचें. ब्राह्मण सुभेदाराकडे मुल्की जमाबंदीचें काम सोंपलेलें असून, किल्ल्याच्या टापूंतील प्रदेशावर त्याची देखरेख असे. तसेंच घासदाणा, दारूगोळा, डागडुजी इत्यादि कामें प्रभु कारखाननिसाकडे सोंपविलेलीं असत. प्रत्येक किल्ल्याच्या व्यवस्थेंत हींच कामें मुख्य असत; व तीं तीन भिन्न वर्गीयांकडे पृथक्पणें सोंपलेलीं असल्यामुळें एकमेकांचा दाब एकमेकांवर राहून कामें सुरळीतपणें पार पडत. किल्ल्याच्या बंदोबस्ताकरितां निवडक रखवालदार नेमलेले असून, खालील प्रदेशांत बंदोबस्तासाठीं रामोशी ठेविलेले असत. चौकीदार, नाकेदार वगैरे रक्षक लोकांनीं रात्रीं दिवसा कसकशीं कामें करावयाचीं त्याजबद्दल नियम बांधलेले होते. शिबंदीची संख्या किल्ल्याच्या महत्त्वाच्या मानानें कमजियास्त असे. शिवाय किल्ल्यावर कायमची वस्ती असून, सर्व लोकांचा फायदा किल्ल्याच्या संरक्षणापासूनच व्हावा, अशी व्यवस्था अस-

त्यामुळें, एक किल्ला म्हणजे एका अर्थानें एक लहानसें स्वतंत्र राज्यच, किंवा एकंदर राज्यव्यवस्थेचा एक स्वतंत्र भाग, असा मानला जाई. फौज लढण्यास बाहेर गेली असतां, ब्राह्मण, सुभेदार व प्रभु कारखाननीस हे किल्ल्याची डागडुजी व सामानसुमान व पैशाचा पुरवठा करण्यांत गुंतलेले असत. कारण बाहेरच्या फौजेस सामान पुरविण्याची पाळी केव्हां कोणत्या किल्ल्यावर येईल याचा नेम सांगतां येत नसे. ग्रँट डफ म्हणतो 'किल्ल्यांतून आंत बाहेर कोणी केव्हा जाणें, गस्त फिरणें, पहारे, चौक्या सांभाळणें, व त्यांजवर देखरेख ठेवणें; पाणी, धान्यसामुग्री, युद्धसामुग्री इत्यादि तयार ठेवणें, या गोष्टींविषयीं अगदीं सक्तीचे व सूक्ष्म नियम शिवाजीनें केलेले असून, प्रत्येक शाखेवरील मुख्य अधिकाऱ्याचीं बारीक बारीक कामें सुद्धां ठरविलेलीं होतीं; आणि ते नियम मोडण्यास तिळभर जागा नव्हती. इतकें असूनही त्याचा ह्या सर्व बाबींचा खर्च फारच काटकसरीनें बांधिलेला होता.' आबाजीपंत व अनाजी दत्तो ह्या दोघां इसमांकडून शिवाजीनें सर्व किल्ल्यांची तपासणी केली, आणि दारूगोळा, अन्नसामुग्री बरोबर आहे कीं नाहीं, हें पाहून, त्याप्रमाणें किल्ल्यांची तर्तूद केली. ( तारिखी-शिवाजी ).

शिवाजीच्या वेळीं मोगलाईत वगैरे राजधानीची व्यवस्था ठरवितांना मुलकी व लष्करी अशीं दोन ठाणीं जवळ जवळ असत. किल्ल्याच्या आश्रयानें मजबूद जागीं फौज ठेवीत आणि मुलकी कारभारासाठीं जवळच खालीं मैदानांत सुभ्याचें ठाणें असे. सुभ्याकडे मुलकी व लष्करी असे दोन्ही अधिकार असत. बऱ्हाणपुर-अशीरगड, औरंगाबाद-दौलताबाद, अशी बहुधा जोडराजधानी मोगलांची असे. अहंमदनगरसारख्या ठिकाणीं किल्ला व सुभा एकास एक लागूनच होते. शिवाजीचें पहिलें ठाणें पुणें निराश्रय होतें. त्यास जवळ किल्ले कोंडाणें व पुरंदर हे जवळ जवळ वीस मैल अंतरावर होते. मोगलांशीं जेव्हां शिवाजीचे सामने जोरानें सुरू झाले तेव्हां पुणें शहर शिवाजीस गैरसोईचें वाटलें. म्हणून सिंहगडच्या आश्रयास शिवापुरची स्थापना झाली. सिंहगडसुद्धां मोगलांनीं काबीज केला आणि मुलकी अमलापेक्षां लष्करी बंदोबस्ताचीच जरूर भासूं लागली, तेव्हां मुलकी ठाण्यास फांटा देऊन शिवाजीनें किल्ल्यावरच राज्याचा सर्व कारभार चालविण्याचा निश्चय केला. त्या-

अन्वयें प्रथम राजगड व पुढें रायगड येथें मुलकी व लष्करी कारभाराच्या सर्व सोयी शिवाजीनें ठरविल्या. शत्रु पाठीवर आहे तोंपर्यंत खालीं मैदानांत राज्यकारभाराचें ठाणें ठेवावयाचें नाहीं, हा शिवाजीचा निश्चय योग्य होता. राजधानी मजबूद व शाबूद असणें हें राज्याच्या अस्तित्वाची मोठी खूण आहे. शाएस्तेखान, जशवंतसिंग, जयसिंग वगैरे सरदार औरंगबादेवरून अचानक पुण्यावर येऊन उतरत आणि शिवाजीच्या वाड्यांत वस्ती करीत, तेणेंकरून शिवाजीचें राज्य संपलें, असा जो लोकांत समज व्हावयाचा, तो बंद करण्यासाठीं शिवाजीनें आपली राजधानी डोंगरांत केली. मोगलांशीं झालेल्या पत्रव्यवहारांत हा त्याचा विचार स्पष्ट दिसतो.

शिवाजीनें रायगड किल्ला बांधिला. सर्व व्यवस्था लागल्यावर शंभर होन व एक सोन्याचें कडें बक्षीस लावून त्यानें असें जाहीर केलें कीं, किल्ल्यावर येण्यास एक मार्ग ठेविलेला आहे तो सोडून, दुसऱ्या वाटेनें जो कोणी हातांत निशाण घेऊन वर चढून तें निशाण किल्ल्यावर लावील, त्यास हें बक्षीस देण्यांत येईल. त्याप्रमाणें एका धेडानें एका कठिण वाटेनें चढून किल्ल्यावर निशाण लाविलें. शिवाजीनें तें बक्षीस त्या धेडास दिलें, त्याचे पाय तोडून टाकिले; आणि ती नवीन वाट बुजवून टाकिली, ( खाफीखान ). अशा रीतीनें त्या वेळीं किल्ल्यांची मजबुदी करीत असत.

किल्ले बांधण्यास शिवाजीस किती श्रम पडत, व काय खर्च येई, याची थोडी बहुत कल्पना यावी, म्हणून मालवणच्या सिंधुदुर्ग किल्ल्याची बखरकारांनीं हकीकत दिली आहे, तींतील एक उतारा येथें देतों. त्यावरून अतिशयोक्तीचा संभव वजा जातांही शिवाजीच्या प्रचंड उद्योगाची खात्री तेव्हांच पटेल.

सिंधुदुर्ग जंजिरा, जगीं अस्मानी तारा, जैसें मंदिराचें मंडन श्रीतुलसी वृंदावन, तैसा महाराजांचे राज्याचा भूषणप्रद अलंकार, चतुर्दश महारत्नांपैकींच पंधरावें रत्न महाराजांस प्राप्त झालें. राजापुर प्रांतीं स्वारी झाली, त्या वेळीं संपूर्ण जंजिरे समुद्रांतील पाहिले, तों मालवणी जागा मनास आली. कोळ्यांस पाचारून त्यांजकडून मार्गाचा ठिकाण पाहिला. मार्ग कठिण, सर्पाकार, तरांडी होडी मात्र चालते. सभोंवते सारे खडक. दुसरी तरांडी तीन कोसपर्यंत यावयास गति नाहीं. कोळी मजकुरावर

मेहेरबान होऊन, त्यांस गांव वगैरे बक्षीस दिले, आणि तांडेलकर्माची सेवा सांगितली. तदनंतर उत्तम मुहूर्त पाहून, पाथरवट असामी पांचशें व लोहार असामी दोनशें आणून लोखंड दोनशें खंडी खरीद करून, टांक्या, हातोडे, पहारा, अडू वगैरे तयार करविले. पायाचे व इमारतीचे धोंडे काढवून तयार करविले. कांहीं आरपार छिद्रें पाडून कायम केले, व पांच खंडी शिसें आणून जंजिरेचा पाया शोधून घातला. श्रीगणेश व समुद्रपूजन करून तरांडियांतून धोंडे व सामान नेऊन काम चालीस लाविलें. शर्करा वांटल्या. ब्राह्मणभोजनें घातलीं. समुद्रास दक्षणा १०० सुवर्ण होन अर्पिले. वाद्यें लाविलीं. सुवर्ण, श्रीफळ, वस्त्रें, मंदील, चादर वाहिलीं. तदनंतर महाराजांनीं हुन्नरवंत पाथरवट चुना मुस्तेद करावयास कोळी, कामाठी व बाजे लोक मिळून तीन हजार माणूस, व वरकड जंजिऱ्याचें सामान आणवून, पाण्यांत गांव दोन गांवचे तफावतीनें ठेविले. तडीस पांच हजार मावळे लोकांची चौकी नेमिली. गोवेंकर फिरंगी यास ताकीद करून तेथील फिरंगी हुन्नरवंत, काबील जंजिऱ्याचे कामकाजांत, म्हणोन शंभर आणविले. दिवसेंदिवस जंजिरा मुस्तेद करावयासाठीं कोटि होनांचें उदक ( बजेट ) महाराजांनीं सोडिलें. धोंडयांत शिसेबंदी आरपार घालून पक्कें काम पाण्यास भीति न खाय ऐसें बांधिलें. बांधावयासी सारी युक्ति महाराजांनीं सांगितली. त्या कामावर गोविंद विश्वनाथ प्रभु सुभेदार कुंभारजुवें यांतील वतनदार शहाणे मनुष्य, यांस ठेवून, स्वारी रायगडास आली. तिसरे वर्षी जंजिरा पुरा झाल्यावर स्वारी पाहवयास गेली, सुमुहूर्ते पाहून आंत प्रवेश केला. तोफा झाल्या; शर्करा वांटली; गोवेंकर वगैरे हुन्नरवंतांस बक्षिसें दिलीं; वास्तु केली; सिंधुदुर्ग नांव ठेवून बंदोबस्त केला. ( चित्रगुप्त पृ. १३२–१३४. )

५. **शिवाजीचें लष्कर.**—किल्ल्यांच्या व्यवस्थेवरून शिवाजीनें केलेल्या लष्कराच्या व्यवस्थेची कल्पना करितां येते. तें लष्कर दोन प्रकारचें, घोडेस्वार व पायदळ. स्वारांहून पायदळाचा भरणा मोठा असे. दहा पायदळ शिपायांवर एक नाईक; असल्या पांच तुकडयांवर म्हणजे पन्नास शिपायांवर एक हवालदार, दोन हवालदारांवर म्हणजे शंभर शिपायांवर एक जुमलेदार, व दहा जुमल्यांवर किंवा एक हजार शिपायांवर 'एक-हजारी' नांवाचा कामगार असे. अशा पांच हजार फौजेवर सरनोबत

म्हणून मुख्य कामगार असे. पायदळांतील शिपाई मावळे व हेटकरी या दोन जातींचे असत. मावळे हे घाटमाथ्यावर राहणारे व हेटकरी कोंकणांत राहणारे. दोघेही अवघड जागीं चढून जाण्यांत मोठे पटाईत असत. ढाल, तरवार, बरची, तीरकमठा हीं त्यांचीं हत्यारें असून, तीं त्यांस आपल्या खर्चानें घ्यावीं लागत. दारूगोळा मात्र सरकारांतून मिळे. प्रथमतः नोकरींत ठेवितांना नुसतें धान्य देऊन ठेवीत; परंतु पुढें हुशारी दिसून येई त्याप्रमाणें त्यांस एकपासून तीन होनपर्यंत दरमहा पगार मिळे. जुमलेदारास सालीना शंभर होन, एकहजारी यास सालीना पांचशें होन, व पंचहजारी यास अडीच हजार होन असे पगार असत. शिवाय पंचहजाऱ्यास सरकारांतून पालखी, अबदागीर वगैरेच्या नेमणुका असत.

घोडेस्वारांची व्यवस्था बहुतेक पायदळाप्रमाणेंच होती. पंचवीस स्वारावर एक हवालदार, पांच हवालयांवर एक जुमलेदार, दहा जुमल्यांवर एक सुभेदार, व दहा सुभ्यांवर पंचहजारी असे अंमलदार असत. दर पंचवीस घोड्यांत एक नालबंद व एक भिस्ती असे. प्रत्येक मराठा अंमलदाराचे हाताखालीं एक ब्राह्मण सबनीस व एक प्रभु कारखाननीस, अथवा ब्राह्मण मुज्मुदार व एक प्रभु जामिनीस अशी व्यवस्था असे. घोडेस्वारांत शिलेदार व बारगीर असे दोन वर्ग असत. शिलेदार हे बरेच उच्च प्रतीचे असून घोडीं, हत्यारें, दारूगोळा वगैरे सामान त्यांचें स्वतःचें असे. त्यांस सरकारांतून उक्त्या नेमणुका असत; आणि कित्येक शिलेदार हाताखालीं हजार पांचशें स्वार बाळगून असत. बारगीर हे सरकारचे प्रत्यक्ष नोकर असून त्यांस बसण्यास घोडीं व वापरण्यास हत्यारें सरकारांतून मिळत. त्यांस सरकारी पागेचे लोक असें म्हणत असून, त्यांजवर शिवाजीचा विशेष भरंवसा असे. शिवाजीजवळ स्वतःचे असे दहा बारा हजार उत्कृष्ट कच्छी व आरबी घोडे नेहमीं तयार असत, असें खाफीखान म्हणतो. शिलेदार डोईजड होऊं नयेत, म्हणून त्यांच्या टोळ्यांत कित्येक बारगीर मिसळून ठेवीत. दोघांचींही हत्यारें ढाल, तरवार, भाला व कित्येकांपाशीं बंदुकी अशीं असत. शिलेदारांचा पगार दरमहा सहा होनांपासून बारा होनांपर्यंत व बारगिरांचा दोन पासून पांच होनांपर्यंत असे. जुमलेदारास अडीचशें व सुभेदारास सहाशें होन सालीना पगार असे. सरनोबत यास अडीच हजार होन पगार असून शिवाय पालखी अबदागीर वगैरेच्या

नेमणुका असत. जुमलेदारापासून वरच्या सर्व अधिकाऱ्यांबरोबर बातमी आणणारे हेर व लिहिणारे कारकून असत. बहीरजी नाईक म्हणून कोणी एक मराठा गृहस्थ सर्व हेरांवर मुख्य असून, तो आपल्या कामांत अत्यंत निपुण असल्यामुळें त्याजवर शिवाजीचा विशेष लोभ होता.

शिवाजीची अत्यंत कडक शिस्त दाखविणारें एक पत्र ता० १९ मे सन १६७३ चें खंड ८ ले० २८ त प्रसिद्ध झालेलें वाचण्यालायक आहे:—

'मशरूल अनाम राजश्री. जुमलेदारांनी, व हवालदारांनी, व कारकुनांनी मु. मौजे हलवर्ण, तर्फ चिपळूण, मामले दाभोळ, प्रति राजश्री शिवाजी राजे. कसबे चिपळुणीं साहेबीं लष्कराची विल्हे केली, आणि याउपरी घाटावरी कटक ( फौज ) जावें ऐसा मान नाहीं, म्हणून एन्हां छावणीस रवाना केलें. ऐसीयास, चिपळुणीं कटकाचा मुक्काम होता, याकारितां दाभोळच्या सुभ्यांत पावसाळ्याकारणें पागेस सामान व दाणा व वरकड केला होता, तो कित्येक खर्च होऊन गेला, व चिपळुणा आसपास विलातींत लष्कराची तसवोस व गवताची व वरकड दरएक बाब लागली. त्याकरितां हाल कांहीं उरला नाहीं. ऐसें असतां वैशाखाचे वीस दिवस उन्हाळा, हे ही पागेस अधिक बैठी पडली. परंतु जरूर झालें, त्याकरितां कारकुनाकडून व गडोगडीं गल्ला असेल तो देववून जैशीतैशी पागेची बेगमी केली आहे. त्यास तुम्ही मनास मानेल ऐसा दाणा, रातीब व गवत मागाल, असेल तोंवरी धुंदी करून चाराल, नाहींसें झालें म्हणजे मग कांहीं पडत्या पावसांत मिळणार नाहीं, उपास पडतील, घोडीं मरायास लागतील. म्हणजे घोडीं तुम्हींच मारिलीं ऐसें होईल, व विलातीस तसवीस देऊं लागाल. ऐशास लोक जातील, कोणी कुणब्याचेथील दाणे आणील, कोणी भाकर, कोणी गवत, कोणी फाटें, कोणी भाजी, कोणी पाले, ऐसें करूं लागलेत, म्हणजे जे कुणबी घर धरून जीव मात्र घेऊन राहिले आहेत, तेही जाऊं लागतील, कित्येक उपाशीं मराया लागतील, म्हणजे त्यांला ऐसें होईल कीं मोगल मुलकांत आले त्याहूनही अधिक तुम्ही, ऐसा तळतळाट होईल! तेव्हां रयतेची व घोड्यांची सारी बदनामी तुम्हांवर येईल. हें तुम्हीं बरें जाणून, शिपाई हो, अगर पावखलक हो, बहुत यादी धरून वर्तणूक करणें. कोणी पागेस अगर मुलकांत गांवोगांव राहिले असाल, त्यांनीं रयतेस काडीचा आजार द्यावया गरज नाहीं. आपल्या राहीला जागाहून बाहीर पाय

घालाया गरज नाहीं. साहेबी खजानांतून वांटण्या पदरीं घातल्या आहेती. ज्याला जें पाहिजे, दाणा हो, अगर गुरें ढोरें बागवीत असाल त्यांस गवत हो, अगर फाटें, भाजीपाले व वरकड विकावया येईल तें, रास घ्यावें, बाजारास जावें, रास विकत आणावें. कोणावरही जुलूम अगर ज्यास्ती, अगर कोणासही कलागती करावयाची, गरज नाहीं. व पागेस सामा केला आहे, तो पावसाळा पुरला पाहिजे ऐसे तजविजीनें दाणा रातीब कारकून देत जातील, तेणें प्रमाणेंच घेत जाणें, कीं उपास न पडतां रोजबरोज खायाला सांपडे, आणि होत होत घोडीं तवाना होत ऐसें करणें. नसतीच कारकुनाशीं धसपस कराया, अगर अमकेंच द्या तमकेंच द्या, असें म्हणाया धुंदी करून खावदारकोठींत कोठारांत शिरून लुटाया गरज नाहीं. व हल्लीं उन्हाळयाला आहे तैसे खलक पागेचे आहेत, खण धरून राहिले असतील व राहतील, कोणी आगट्या करतील, कोणी भलतेच जागा चुली रंधनाला करतील, कोणी तंबाकूला आगी घेतील, गवत पडलें आहे, अगर वारें लागलें आहे तैसें मनास न आणिता, म्हणजे अविस्ताच एखादा दगा होईल. एका खणास आगी लागली म्हणजे सारे खण जळोन जातील. गवताच्या लहळयांस कोणीकडून तरी विस्तव जाऊन पडला म्हणजे सारें गवत व लहळया आहेत तितक्या एकेक जळोन जातील. तेव्हां मग कांहीं कुणब्यांच्या गर्दना मारल्या अगर कारकुनास ताकीद करावी तैशी केली, तरी कांहीं खण कराया एक लांकूड मिळणार नाहीं. एक खण होणार नाहीं. हें तो अवघ्यांला कळतें. या कारणें, बरी ताकीद करून, खासे खासे असाल ते हमेशा फिरत जाऊन, रंधनें करितां, आगट्या जाळितां, अगर रात्रीस दिवा घरांत असेल, अविस्ताच उंदीर वात नेईल, ते गोष्टी नहो. आगीचा दगा नहो. खण गवत वांचेल तें करणें. म्हणजे पावसाळा घोडीं वांचलीं. नाहीं तर मग घोडीं बांधावीं नलगेत, खायास घालावें नलगे, पागाच बुडाली, तुम्ही निसूर जालेत, ऐसें होईल. या कारणें तपशिलें तुम्हास लिहिलें असे. जितके खासे खासे जुमलेदार, हवालदार, कारकून आहां, तितके हा रोखा तपशिलें ऐकणें, आणि हुशार राहणें. वरचेवरी, रोजाचारोज, खबर घेऊन, ताकीद करून, येणेंप्रमाणें वर्तणूक करितां, ज्यापासून अंतर पडेल, ज्याचा गुन्हा होईल, बदनामी ज्यावर येईल त्यास, मराठ्याची तो इज्जत वांचणार नाहीं,

मग रोजगार कैसा ! खळक समजों जास्ती केल्यावेगळ सोडणार नाहीं. हें बरें म्हणून वर्तणूक करणें.' ( १९ मे सन १६७३ ).

हें पत्र खुद्द शिवाजीनें आवेशांत व रागारागानें सांगून, चिटणीस बाळाजी आवजीनें लिहिलेलें आहे. ह्यावरून शिवाजीची दक्षता व्यक्त होते, आणि हरएक बाबतीबद्दल त्यानें किती पत्रें व हुकूम सोडले असले पाहिजेत, त्याची कल्पना होते. हल्लीं त्याचे कागद उपलब्ध नसल्यानें अशा एखाद्या पत्रावरूनच कल्पना करणें प्राप्त आहे. विशेषतः पूर्वींची तोंडोतोंडीं हुकमाची पद्धत मोडून, हरएक बाबत लिहून नक्की करण्याचा प्रघात शिवाजीनें घातला.

शिवाजीनें लोकसंग्रह कसा केला, हें दाखविणारा त्याचा कौलनामा शके १५७३ तला उपलब्ध आहे, तो बिरवाडीसंबंधाचा आहे. बिरवाडीच्या पाटलाचें चंद्रराय मोऱ्यांशीं भांडण होतें. पाटलाची तक्रार अशी होती कीं, 'आमची मिरासदारी मोऱ्यांनीं घेतली आहे; ती त्यांजकडून आमची आम्हांस परत देववावी. म्हणजे जसे मावळे देशमुख आपले मसलतीस येतात, तसे आम्ही येऊं. दररोज दहा माणसें साहेबांचे सेवेस आणून त्यांची अडीसरी घेऊन साहेबांचें काम करूं; रजा देतील तेव्हां जाऊं.' याप्रमाणें तुम्ही चाकरी करणें, बलुतें वगैरे सर्व हक्क खाणें. मसलतीचे कामांत चाकरीस येत जाणें.' शिवाजीनें कांगोरी किल्ला सन १६४८ त घेतला, त्या प्रांतावर चंद्रराव मोरे आपला हक्क सांगत असे, त्या धालमेलींत हा कागद लिहून दिलेला आहे. (भा. इ. सं. मं.).

ह्या कौलनाम्यावरून उघड होतें कीं, ( १ ) शिवाजी प्रमुख माणसांस हाताशीं धरी, म्हणजे त्याचे अनुयायी आपोआप त्यास येऊन मिळत; ( २ ) मसलतीचे वेळीं कोणी किती माणसें आणावीं हें ठरवी, आणि ( ३ ) शिवछत्रपतीकडे दाद मागण्यास गेलें म्हणजे तो दाद घेतो, असा लोकांत भरंवसा उत्पन्न करी.

फौजेस पगार वेळच्या वेळीं देण्यासंबंधीं शिवाजीचा सक्त नियम होता. लोकांकडे येणें राहिलेली बाकी वसूल करून फौजेनें आपला पगार भागवून घ्यावा, असा प्रकार शिवाजी कधीं होऊं देत नसे. लष्करांत बटीक, बायको, कलाल वगैरे नेण्यास सक्त मनाई असे. कर्ज काढण्याची मनाई असे. लग्नकार्यादि विशेष प्रसंगीं लोकांस सरकारांतून मदत देण्याची

व्यवस्था होती. नवीन शिपाई नोकरींत ठेवितांना जुन्या मंडळींतून त्याचे योग्य वर्तणूकीबद्दल जामीन घेतल्याशिवाय त्यास नोकरी मिळत नसे. तसेंच वरचे अंमलदारही जातवान व भरंवशाचे असे पाहूनच शिवाजी नेमीत असे.

शत्रूचे मुलखांत मोहिमा व लूट करण्यासंबंधानें शिवाजीचे नियम सक्त होते. दसऱ्याचे दिवशीं मोठा दरबार भरवून, फौजेची व सामानसुमानाची झडती होई. ब्राह्मण, स्त्री, शेतकरी किंवा गाय यांस कोणत्याही प्रकारचा उपद्रव न देण्याबद्दल ताकीद असे. लुटीचा ऐवज झाडून सारा सरकारांत भरावा लागे. तथापि लूट आणणारे इसमास लुटीच्या मानानें कांहीं बक्षीस मिळे. लुटीचा ऐवज लपविल्याबद्दल कडक शिक्षा होत्या. मोहिमांत पराक्रम केल्याबद्दल दरबारांत गौरव करून वर्षे, किताब व इतर देणग्या देण्याचा परिपाठ होता. जे लढाईंत पडले असतील त्यांच्या भावामुलांस नोकरींत घेऊन त्यांच्या योग्यतेप्रमाणें शिवाजी त्यांचा परामर्ष घेई. लुटीच्या उद्देशानें आपली फौज घेऊन शिवाजी एखाद्या शहरावर गेला, म्हणजे तेथील संपत्ति हुडकून काढण्यांत त्याचा हातखंडा होता असें विल्क्सनें लिहिलें आहे, (पु. १, पृ. ८३). प्रत्येक गोष्टीविषयीं गुप्त माहिती मिळविण्यांत शिवाजीची अगदीं हद्द होती. संपत्ति पुरून ठेवण्याचीं ठिकाणें तो अचानक दाखवून देत असे. मोठ्या युक्तीनें लपविलेली संपत्ति तो स्वानुभवानें व गुप्त बातमीनें बाहेर काढीत असे. ह्यामुळें त्यास देवीची मदत असून ती त्यास सर्व गुप्त गोष्टी सांगून देते, असा सार्वत्रिक समज होता. यामुळेंच त्याच्या सैन्यापैकीं कोणाही इसमास एक सुतळीचा तोडाही लपवून ठेवतां येत नव्हता. घोडे, हत्ती, उंट, बैल, गाई वगैरे जनावरांची व्यवस्था शिवाजीनें चांगली ठेविलेली होती. घोड्याची अवलाद चांगली ठेवणें, जनावरांस दाणा घांस वगैरे वेळच्या वेळेस देणें, अशा सर्व बाबतींविषयीं बंदोबस्ताचे नियम होते. शिवाजीच्या पीलखान्यांत तीन साडेतीन शें हत्ती व हजार दीडहजार उंट होते. तसेंच तोफा वगैरे सामान वाहण्याकरितां बैलांचा कारखाना होता.

शिवाजीच्या वेळेस फौजेंत नोकरी करण्याबद्दल जमीन अगर उत्पन्न तोडून देण्याची वहिवाट नव्हती. इतकीं निबंधनें असूनही फौजेंत नवीन शिपायांची भरती होण्यास मुळींच अडचण पडत नसे. उलट पक्षीं मावळे

व हेटकरी संग्रामांत उडी घालण्यास जितके तयार असत, तितके दुसरे कोणतेही नोकर कर्तव्यदक्ष नसतील.

शिवाजीच्या आरमाराची माहिती पूर्वी दिलीच आहे. दर्यासारंग, इब्राहीमखान व मायनाक भंडारी हे आरमाराचे मुख्य सरदार होते. समुद्रावर जहाजें ठेवून आपली सत्ता वाढविण्याची शिवाजीस अनिवार इच्छा होती. इंग्रज म्हणत, ' तो स्वतः खलाशी नव्हता म्हणून बरें, नाहीं तर त्यानें जमिनीचा पृष्ठभाग साफ करून टाकिला, त्याप्रमाणेंच समुद्राचाही टाकिला असता.' त्याला समुद्रस्नानाची अतिशय आवड असल्यामुळें तो लहान असतां मुद्दाम महाड येथें बाणकोटच्या खाडीवर येऊन राहिला होता. त्याचप्रमाणें सिंधुदुर्ग किल्ला बांधण्यांत तो स्वतः खपत होता. त्याचे समुद्रावरील पराक्रम कमी योग्यतेचे नाहींत. त्यानें दाभोळ बंदर व त्याच्या टापूंतील अनेक ठिकाणें बादशहा औरंगजेबापासून हिसकावून घेतलीं. पश्चिम किनाऱ्यावर अनेक किल्ले ताब्यांत ठेवून त्यांच्या योगानें समुद्रावर आपला ताबा चालविण्याची तजवीज केली. जंजिऱ्याच्या सीदीशीं सतत झुंज चालविलें. रायरी, मालवण, सुवर्णदुर्ग, विजयदुर्ग इत्यादि मजबूद किल्ले बांधून, त्या त्या ठिकाणीं त्यानें आरमार ठेवून दिलें. मुंबईपासून वीस मैलांवर अलीबागचा किल्ला कुलाबा येथें आपल्या आरमाराचें मुख्य ठिकाण करून, तेथें दारूगोळ्याची उत्तम तजवीज ठेविली, तिचा पुढें प्रसंगीं उपयोग झाला. त्याच्या आरमारांत आरंभीं, म्हणजे बार्सिलोरवर हल्ला करण्याच्या वेळेस ( १६६५ ), ३० पासून १५० टन आकाराचीं लहान मोठीं ८५ जहाजें असून, त्यांत ३ मोठ्या डोलकाठ्यांचीं होतीं. परंतु पुढें सहा वर्षांनीं त्याचे आरमारांत १६० जहाजें झालीं. इंग्रजांस आपली शक्ति दाखविण्याकरितां त्यानें हें सर्व आरमार एकदां मुंबईच्या बॅक बे बंदरांत आणिलें होतें. त्यानें दमणनजीक पोर्तुगीझ लोकांचें एक मोठें लढाऊ जहाज पकडून घेतलें; कारवार काबीज केलें; किनाऱ्यावर लागलेल्या निवारसी मालावरील आपला हक्क त्यानें कधीं जाऊं दिला नाहीं; आणि मरणापूर्वीं थोडा वेळ त्यानें दर्यावर्दी कामांत कधीं काळीं आपणास इंग्रजांचें आरमार वरचढ होईल ह्या भीतीनें, त्यांजवर दाब ठेवण्याकरितां खांदेरी बेट काबीज करून तेथें मजबूद आरमाराची जागा केली. पुढें प्रसिद्धीस आलेला नामांकित दर्यावर्दी

सरदार कान्होजी आंगरे शिवाजीच्या आरमारांत तयार झालेला होता. ( Douglas' Bombay and Western India. )

६. **समाजशिक्षणाची स्थिति.**—शिवाजी कोणास जहागिरी तोडून देत नसे ही गोष्ट खरी, तरी देवस्थानांस व विद्योत्तेजनाकडे उत्पन्नें तोडून देऊन बराच खर्च करण्याची शिवाजीची वहिवाट होती. अन्नसत्रांचे, देवस्थानांचे वगैरे धर्मादाय त्यानें चालविले व नवीनही सुरू केले; आणि त्या पैशाची अफरातफर न होतां, ज्या त्या कार्याकडे त्याचा योग्य विनियोग व्हावा, अशी हिशेबाची सक्त तपासणी त्यानें ठेविली. दक्षिणा म्हणून जी संस्था पुढें पेशवाईच्या वेळेस प्रसिद्धीस आली, आणि जी अजूनही रूपांतरानें थोडीबहुत अस्तित्वांत आहे, तिचा जनक शिवाजी होय. परीक्षा घेऊन द्रव्यद्वारा पंडितांस बक्षिसें देणें हें या संस्थेचें काम होतें. तथापि विद्येचें महत्त्व शिवाजीस अगर त्यानंतरच्या राज्यकर्त्यांस यथायोग्य कळलें होतें, असें दिसत नाहीं. जुन्या पद्धतीनें शिकलेले शास्त्री व पंडित ठिकठिकाणीं होते. अशा पंडितांची यादी भा. इ. सं. मं. अ. १८३५ ले. ८१ मध्यें दिलेली मोठी मनोरंजक असून, हे पंडित धर्मशास्त्राचा निर्णय करीत. परंतु विद्या म्हणजे काय, तिची वृद्धि करण्याकरितां कोणत्या प्रकारच्या संस्था पाहिजेत, सर्व लोकांस विद्या देऊन राष्ट्रोद्धार कसा करावा, याचा व्यापक दृष्टीनें विचार त्या वेळच्या मानानेंही कोणीं केलेला दिसत नाहीं. राष्ट्रोद्धाराचा पाया विद्येवर आहे, ही कल्पनाच त्या वेळीं नव्हती. लोकांस सुशिक्षण देऊन, त्यांस आपली जबाबदारी ओळखण्यास पात्र करणें, हें राजाचें व लोकनायकाचें एक मुख्य कर्तव्य आहे. कोणतीही राष्ट्रीय गोष्ट एकट्याच्या हातून तडीस जात नाहीं. राजाचे सद्धेतु समजून घेऊन तडीस नेण्याची पात्रता लोकांत नसेल तर त्याचे प्रयत्न विफल होतील. अर्थात् समाजशिक्षणाचा विषय नेहमींच फार महत्त्वाचा आहे. ह्या विषयाकडे प्रत्यक्ष शिवाजीचें बरेंच लक्ष होतें; पण तत्कालीन इतर प्रमुख मंडळींचें त्यास पाठबळ नव्हतें. शिवाय शिवाजीच्या अनुयायांनीं तर ह्या विषयाकडे फारसें लक्ष दिलेंच नाहीं. ह्या विधानाची सत्यता तत्कालीन पाश्चात्य स्थितीशीं तुलना केल्यानें थोडीबहुत दिसून येते. शिवाजीच्या पूर्वी शंभर वर्षे युरोपांतील सामान्य लोकशिक्षण आपणापेक्षां फारच पुढें होतें. युरोपांत

अनेक ठिकाणीं मोठमोठीं विद्यापीठें होतीं, तेथें जाऊन अभ्यास केल्याशिवाय विद्वान् म्हणवून घेण्यास मनुष्य लायक होत नसे. भाषा, गणितशास्त्र, भूगोल, नौकाशास्त्र व दुसरे अनेक व्यावहारिक विषय यांचा त्यांस अभ्यास करावा लागे. हें शिक्षण लोकांत बरेंच पसरलेलें होतें; म्हणजे आपल्या इकडच्यासारखें एकाच वर्गांत प्रचलित नव्हतें. इकडे शिवाजीच्या वेळेस सामान्य शिक्षण फारसें नव्हतेंच, आणि जें होतें त्यास विविधज्ञानाची जोड नव्हती. शिक्षणाचा बहुतेक उद्योग ब्राह्मणांच्या हातांत होता. त्यांतही नुसतें वेदपठन प्रधान मानलें जात असे. वैदिक व शास्त्री यांच्याशिवाय इतर मंडळीस शिक्षणाची फारशी आवश्यकता वाटत नसे. वेदपठन, गणितविषय व थोडेसें लिहिणें वाचणें ह्यांपलीकडे ज्यास्त विद्या फारच थोड्यांस येत असे. प्रत्यक्ष व्यवहाराच्या अनुभवानें बुद्धि कितीही तरतरीत झाली, तरी ती विद्येनें सुसंस्कृत होत नसे. इतिहासांत शिवाजीच्या वेळचीं जीं नांवें प्रसिद्ध आहेत, त्यांत विद्वान् हें पद ज्यांस योग्यपणें लावितां येईल अशी मंडळी फारच थोडी, रामदासासारखे साधुवर्गांतील फार तर चार दोन, असें सामान्य अनुमान करण्यास हरकत नाहीं. चिटणीस वगैरे घराण्यांचा लिहिण्याचाच धंदा असल्यामुळें, त्यांस लिहिणें वाचणें चांगलें येत असे; पण त्या विषयांस सोडून इतर विषयांत त्यांचा अभ्यास फारसा झालेला नसे. जो तो आपल्या धंद्यापुरतें पाही. पुराणिकांस व वैदिकांस वाचतां येई खरें; पण लिहिण्याचे नांवानें सहीसुद्धां करितां येत असे कीं नाहीं, याचा वानवा आहे.

शिवाजीच्या पूर्वी शंभर वर्षें सर टॉमस मोर नांवाचा विद्वान् गृहस्थ इंग्लंडांत झाला. त्यानें योग्य शिक्षणाची दिशा दाखवून राष्ट्रास सज्ञान करण्याचा मार्ग दाखवून दिला. त्याच्या पूर्वी थोडे दिवस कोलंबस वगैरे मंडळींनीं गणित, भूगोल इत्यादि शास्त्रांचा व्यावहारिक रीत्या अभ्यास करून अनेक शोध लाविले; आणि बाहेर जग केवढें विस्तृत आहे याची ओळख आपल्या राष्ट्रास करून दिली. शिवाजीच्या जन्माच्या आधीं थोडे दिवस लॉर्ड बेकन यानें शास्त्रीय ज्ञानाचें व शिक्षणाचें महत्त्व लोकांस दाखविलें. या योगानें पाश्चात्य लोक जागे झाले; त्यांचे डोळे उघडले; विद्या मिळवून त्यांनीं शास्त्रज्ञानाची प्रगती केली. धर्मांत व व्यवहारांत चालत आलेले जुने प्रघात व आग्रह नाहींसे होऊन त्यांचीं मनें सुसंस्कृत व शक्तिमान्

झाली. अशा प्रकारें शास्त्रीय ज्ञानाची व विद्येची माहिती सर्व लोकांस देण्याची कल्पनाच इकडे कोणाच्या मनांत आली नाहीं; म्हणून बुद्धीनें व कल्पकतेनें इकडील लोक कमी नसतांही, त्यास शास्त्रीय व्यावहारिक शिक्षण न मिळाल्यामुळें ते सर्वथैव पंगु राहिले; आणि हें पंगुत्व उत्तरोत्तर वृद्धिंगत होत गेलें. पूर्वीं अमुक एक काळपर्यंत आपल्याकडे व्यवहारांत योग्य वाढ होत गेली. पण मध्यंतरीं ती वाढ केव्हां तरी एकदम खुंटली. म्हणूनच समाजाला पंगुत्व आलें. शिवाजीच्या स्वराज्यांत प्रत्यक्ष अनुभव राष्ट्रास मिळूं लागला खरा; परंतु त्यास विद्येची जोड नसल्यामुळें राष्ट्राचें पंगुत्व कायम राहिलें. प्रत्यक्ष अनुभवानें राष्ट्राची एक बाजू जोरांत आली. अगदीं अप्रसिद्ध व हीन स्थितींत असलेले लोक भराभर पराक्रम गाजवूं लागले. भिक्षुकांचे मुत्सद्दी झाले, शेतकऱ्यांचे सेनापती झाले, कारकुनांचे अंमलदार बनले. त्यांस शास्त्रीय विद्येची जोड असती तर राष्ट्राचा निभाव लागला असता.

सारांश, बुद्धीस संस्कार देऊन सर्व राष्ट्राच्या अंगांत शक्ति व जोम उत्पन्न करणारें सर्वसाधारण लोकशिक्षण त्या वेळीं आपल्या राष्ट्रांत नव्हतें. असें शिक्षण असणें हें राज्य सुरळीत चालण्यास जरूर असून मराठशाहीचा हा एक मुख्य पाय नेहमींच लंगडा होता असें म्हणावें लागतें. शिवाजीच्या पूर्वीं शंभर वर्षें डच लोक स्पेनचा जुलमी ताबा झुगारून देऊन स्वतंत्र झाले, तेव्हां व त्यापूर्वीं तेथच्या सामान्य लोकांस आपले हक्क काय आहेत, हें चांगलें समजत होतें. कायदेशीर रीतीनें ते राजांशीं भांडत असत. हरएक गोष्टींत ते राजांस अडवीत. निरनिराळ्या मंडळ्या व सभा जमवून ते कारस्थानें करीत; आणि कितीही जुलूम झाला तरी स्वत्व न सोडतां बाण्यानें वागत. असा प्रकार आपणांकडे कां झाला नाहीं ह्या प्रश्नाचा जिज्ञासु मंडळींनीं तपास करावा.

शिवाजीचा सर्व काळ धामधुमींत गेल्यामुळें, केवळ शांततेच्या वेळीं उदय पावणाऱ्या विद्येच्या विषयाकडे विशेष लक्ष देण्यास त्यास फुरसत मिळाली नाहीं. अशा कामीं राज्यकर्त्यांस दिशा दाखवून देण्याचें काम विद्वानांचें व विचारवंतांचें असतें. प्रथम विद्वान् लोक नवीन दिशा दाखवितात आणि मग त्या कामास राजाश्रय मिळतो. सबब या विषयाची जबाबदारी एकट्या शिवाजीपेक्षां समाजांतील विद्वानांवरच विशेष आहे.

तथापि शिवाजीनें लोकशिक्षणाबद्दलची आपली जबाबदारी थोडी तरी ओळखली होती, हें त्यास भूषणावह आहे. संभाजी व राजाराम यांच्या कारकिर्दीही धामधुमींतच गेल्या, आणि स्वसंरक्षणापलीकडे दृष्टि देण्यास त्यांस अवकाश नव्हता. पण शाहूच्या कारकिर्दीत देशांत शांतता झाली. पराक्रमी, हुशार व कालदेशवर्तमान जाणणारे पेशवे राज्यकारभार करीत होते. कलाकौशल्य, विद्या, व्यापार इत्यादि विषयांत पाश्चात्य राष्ट्रांची ओळख शिवाजीच्या वेळेपेक्षां शाहूच्या वेळेस लोकांस ज्यास्त असली पाहिजे. असें असून विद्येच्या विषयांकडे कोणीं लक्ष दिलें नाहीं; समाज म्हणजे काय, राष्ट्र म्हणजे काय, समाज व राष्ट्र यांस अनेक दिशांनीं उन्नतावस्था कशी आणावी, इत्यादि विषय कोणींच मनांत आणिले नाहींत. आपणांस ऐहिकसुखपराङ्मुख म्हणविणाऱ्या आमच्या लोकनायकांनीं, सर्व देशभर आपल्या विजयाचा झेंडा मिरवीत नेण्याचा जो अत्यंत ऐहिक विषय, तेवढ्याच्याच पाठीस लागून, अशोकादि अनेक राज्यकर्त्यांनीं घालून दिलेला कित्ता अजीबात विसरून जावा, हें जितकें राष्ट्राचें दुर्भाग्य, तितकेंच त्या लोकनायकांच्या योग्यतेस कमीपणा आणणारें आहे. संस्कृतविद्येचें पुनरुज्जीवन करण्याच्या कळकळीबद्दल जर कोणास शाबासकी देणें योग्य असेल, तर ती थोडीबहुत शिवाजीसच देतां येईल. विद्या संपादन करून काशी वगैरे ठिकाणीं परीक्षा देऊन आलेल्या विद्वानांस बक्षिसें देण्याची वहिवाट शिवाजीनें घातली. ह्या दक्षिणेकडे पांच लाखपर्यंत खर्च होत असे. तिची ज्यास्त हकीकत पुढें यावयाची आहे. अकबर वगैरे मुसलमान बादशहांनीं स्वजातीयांस विद्या देण्याकरितां मोठमोठ्या ठिकाणीं सार्वजनिक विद्यालयें स्थापिलीं होतीं, त्यांत आरबी, फारशी वगैरे भाषा व दुसरे कित्येक विषय शिकविले जात असत. मराठ्यांचे रियासतींत सार्वजनिक विद्यालयें नव्हतीं; आणि वर सांगितलेली दक्षिणेची संस्था सुद्धां पुष्कळ अंशीं संकुचित व एकदेशीय होती. काशी, कुंभकोण, द्वारका इत्यादि ठिकाणीं पूर्वापार चालत आलेल्या पद्धतीस अनुसरून संस्कृत भाषेचा व वेदविद्येचा अभ्यास होत असे, आणि त्यास दक्षिणेच्या संस्थेनें थोडेंबहुत चलन मिळालें, एवढेंच कायतें. शिवाजीनें संस्कृत व महाराष्ट्र ह्या भाषांबद्दल स्वतः पुष्कळ कळकळ दाखविली. दरबारचे सर्व लेख मराठी भाषेंत होऊं लागले. राजव्यवहारकोश नामक

दरबारी शब्दांचा कोश तयार करवून फारशी शब्दांचा उपयोग करूं नये, अशी तजवीज त्यानें केली. बखरकारांची भाषा पाहून त्या वेळच्या या शिवाजीच्या प्रयत्नांचें थोडेंबहुत अनुमान करितां येतें. मराठी भाषा त्या वेळेस बरीच प्रौढ होती. व्यवहारांतील बहुतेक विषय साध्या, चटकदार व जोरदार रीतीनें नमूद करण्यास ती योग्य होती. हल्लीं निरनिराळ्या अनेक भाषांशीं मराठीचा संसर्ग घडल्यानें तीस जास्त व्यापक व जास्त प्रौढ असें स्वरूप येत चाललें आहे. ह्या कामीं व्यक्ति व भाषा यांचें एका अर्थानें बरेंच साम्य आहे. एखादा मनुष्य कितीही विद्वान् असला, तरी जोंपर्यंत तो एका लहानशा जागेंत कोंडलेला राहतो, स्वस्थानापलीकडे आणखी जग आहे, ह्याची त्यास कल्पना नसते, तोंपर्यंत त्याची बुद्धि कोती राहते. तीच स्थिति भाषेची. बाहेरच्या परिस्थितीशीं ओळख वहून टकेटोणपे खाल्लयावर भाषेसही एक प्रकारचें बहुश्रुतपणाचें, जगाच्या अनुभवाचें, विस्तृत दृष्टीचें, उदार मनोवृत्तींचें व अनुपम सहिष्णुतेचें स्वरूप येत जातें. नैसर्गीक कोतेपणा लयास जातो. तशी स्थिति महाराष्ट्र-भाषेस हल्लीं येऊं लागली आहे. मराठशाहींत ती आली नाहीं.

तरी एका अर्थीं मराठी भाषेवर शिवाजीचा चिरंतन उपकार आहे. शिवाजीच्या मृत्यूनंतर मराठी भाषेचा फैलाव फार जोरानें झाला. फारशी भाषेचा रिवाज बंद करून संस्कृताचा प्रचार शिवाजानें चालू करतांच मराठी भाषेस स्फुरण चढलें; आणि राज्याबरोबर भाषेचीही वाढ झाली. राज्याच्या समा वाढत गेल्या तसतशा मराठी भाषेच्याही सीमा वाढल्या. त्याबरोबर हिंदुस्थानांतील इतर भाषांशीं मराठीचा सहवास घडून तिचें स्वरूप पुष्कळ बदलून गेलें. राजकारणांत, दळणवळणांत, बखरी वगैरे निरनिराळ्या प्रकारच्या लेखनांत मराठीचा उपयोग होऊं लागल्याबरोबर, अनेक विषयांची चर्चा करण्याचें सामर्थ्य भाषेला प्राप्त झालें. स्वराज्याच्या अभिमानानें ग्रंथकर्ते व कवी यांनीं मराठीला बरेंचसें संस्कृतमय पण स्वकीय असें स्वरूप आणून दिलें. लहान मोठ्या अनेक लेखकांचें साह्य भाषेला मिळालें. हा सगळा परिणाम एकट्या शिवाजीच्या प्रयत्नांचा आहे. कारण शिवाजीच्या पुढें अशा विविध विषयांकडे दुसऱ्या कोणीं लक्ष दिलें नाहीं. मराठी राज्यकर्त्यांस लढाईतून अगोदर फुरसतच मिळत नव्हती, हें खरें आहे; तरी शिवाजीला म्हणजे विशेष फुरसत होती अशांतला

भाग नव्हे. परंतु शिवाजीचें अष्टपैलू धोरण पुढें कोणास साधलेंच नाहीं. यास्तव शिवछत्रपतीची आरंभाची खटपट त्यास किती भूषणावह आहे आणि त्यास स्वदेशप्रीति व स्वभाषाभिरुचि किती होती, हें त्यावरून व्यक्त होतें. असा सार्वत्रिक बुद्धिमत्तेचा पुरुष सबंध मराठी राज्यांत दुसरा झाला नाहीं. छत्रपतींच्या घराण्यांत किंवा पेशव्यांचे घराण्यांत विद्याव्यासंगी पुरुष कोणीच नव्हता; आणि तशा व्यासंगाला लागणारी फुरसतही नव्हती. पेशवाईत विद्येकडे लक्ष केवळ धार्मिक दृष्टीनें थोडेंसें होतें. मराठी भाषेला पेशव्यांचा आश्रय असेल तर थोडासा कवी, कथेकरी, गोंधळी वगैरेंच्या पारितोषिकरूपानें होता. एकंदरींत १७ व्या व १८ व्या शतकांत मराठी भाषेचा उत्कर्ष झाला, त्याचें श्रेय शिवाजीसच दिलें पाहिजे.

शिवाजीनें स्वराज्य स्थापन केलें यावरून महाराष्ट्रांत राष्ट्रीय भावना उत्कृष्ट वाढली होती असें पुष्कळांस वाटतें, आणि त्या काळाची पुष्कळशी प्रशंसाही प्रसंगानुसार केली जाते. राष्ट्रीयत्वाचा खरा अंदाज करण्याचें साधन कांहींच नाहीं. बऱ्याच गोष्टी केवळ अनुमानांवर अवलंबून असल्या पाहिजेत. त्या वेळचे पुष्कळसे कागद वाचावे, सामाजिक, औद्योगिक वगैरे स्थिति समजून घ्यावी, स्वकीयांचे व परकीयांचे अभिप्राय एकसमयावच्छेदें अवलोकनांत घ्यावे, आणि निष्पक्षपातानें ज्यानें त्यानें आपलें मत बनवावें. या पद्धतीनें विचार करितां असें दिसतें कीं, ज्या प्रकारची राष्ट्रीय भावना पाश्चात्य देशांत आहे, तशी खरी भावना शिवाजीच्या पूर्वी, शिवाजीच्या वेळीं, किंवा शिवाजीनंतरही महाराष्ट्रांत उत्पन्न झालेली नाहीं. राष्ट्रीयभावना म्हणजे देशभक्ति; म्हणजे आपण सर्व लोक एका समाजाचे घटक आहों, हा देश आपला आहे, आणि त्याचें संरक्षण करणें हें आपलें प्रत्येकाचें कर्तव्य आहे, असा समज महाराष्ट्रांत पूर्वी नव्हता; व अद्यापिही बहुधा नाहीं. शिवाजीच्या ठिकाणीं ही भावना अत्युत्कट होती. या भावनेच्या जोरावर तो कशाही अडचणींत सर्वांच्या पुढें होऊन उडी टाकी. खऱ्या देशभक्तास स्वतःच्या सुखाची पर्वा नसते. आपल्या हातून कांहीं तरी राष्ट्रसेवा घडावी, यांतच नेल्सनप्रमाणें तो स्वर्गसुख अनुभवितो. अशा पुरुषास संकट किंवा भीति स्पर्श करीत नाहीं. असा पुरुष एक शिवाजी मात्र होता. त्याच्या अनुषंगानें बरीचशीं माणसें त्याच्या वेळेस तयार झालीं. शिवाजीचें देशप्रेम पाहून राम-

दासाला प्रेमाचें भरतें येई. कारण अशा देशप्रीतीची खरी पारख रामदासाला होती. त्याची जागृति सर्व राष्ट्रांत करण्याविषयीं रामदासानें अतिशय श्रम केले; पण शिवाजी व रामदास यांच्या प्रयत्नांचा परिणाम फार काळ टिकला नाहीं. मोठमोठे मराठे सरदार किंवा कामगार मुसलमानांची नोकरी करून, वतनें संपादण्याविषयीं जसे शिवाजीच्या पूर्वी आतुर होते, तसाच शिवाजीनंतरही हजारों लोकांनीं औरंगजेबाकडे जाऊन स्वहित साधण्याचा प्रयत्न केलेला आहे. उत्तर मराठशाहीची गोष्ट तर बोलावयास नकोच. शिवाजीची तालीम फार फार तर पंधरा वीस वर्षे टिकली. राजारामाचे कारकीर्दीत सुद्धां आपल्या लोकांस आपल्या पक्षांत राखण्यास त्या वेळच्या मुत्सद्यांस नाहीं नाहीं तीं आमिषें दाखवावीं लागलीं. खरें म्हटलें तर स्वार्थ व मतलब हा महाराष्ट्रीयांचे वर्तनाचा हल्लींप्रमाणेंच त्या वेळीं-ही मुख्य हेतु होता. ज्यांत मतलब साधेल ती गोष्ट करावयाची, मग त्यांत राष्ट्राचें, लोकाचें वाटेल तितकें नुकसान होवो. शिवाजीच्या उद्यो-गांत सामील झाल्यानें आपला मतलब चांगला साधतो, असें लोकांस वाटतांच ते एकदम शिवाजीकडे वळले. याच मतलबाच्या इच्छेनें राजा-रामास साह्य होऊन मराठे वीरांनीं औरंगजेबाशीं झुंज केलें. पेशवाईचा विस्तार होण्यास हा मतलबच कारण झाला. इंग्रज वगैरे परकी लेखकांनीं मराठ्यांचा हा मतलबी स्वभाव उत्कृष्ट ओळखला होता, आणि त्याचें सरस वर्णनही परकीयांनींच केलें आहे. असा वास्तविक प्रकार असतां, दादो नरसो काळे, दियानतराव, गंगू बहामनी, वगैरे लोकांस कुधारक म्हणून रा० राजवाडे दूषण देतात, तें योग्य नाहीं. ‘ फारशी पेहेराव, फारशी शब्द, फारशी पीर, फारशी कल्पना यांचा महाराष्ट्रांत प्रादुर्भाव होण्यास या कुधारकांची बरीच मदत झाली. त्यांच्या मेहनतीनें देश वर यावयाचा तो खालींच जाऊं लागला. त्यांचा हा कुविचार महाराष्ट्रांतील सुधारकांनीं, साधूनीं व ग्रंथकारांनी हाणून पाडिला,’ असें रा० राजवाडे लिहितात. ( खं. ८, प्रस्तावना पृ. ६८ ). कुधारक व सुधारक यांचा निर्देश इतक्या सोप्या रीतीनें करणें शक्य नाहीं. स्वदेशाभिमानाच्या मानानें पाहिलें तर कांहीं थोड्या शिवकालीन व्यक्ती खेरीज करून बाकी सर्वांना कुधारकच म्हटलें पाहिजे. बाकी गंगू बहामनी, दियानतराव वगैरे मंडळींनीं प्राप्त झालेल्या स्थितींत होईल तितकी आपल्या लोकांची बाजू सांभाळली याबद्दल त्यांचें अभिनंदनच केलें पाहिजे.

तथापि शिवाजीच्या वेळेस विद्योपार्जनाचें एक अंग चांगल्या स्थितींत होतें, तसें तें आजही नाहीं. प्रत्यक्ष अनुभवाची भर जर पुस्तकी विद्येस नसली, तर ती विद्या कधीं फळास यावयाची नाहीं. इतकेंच नव्हे, तर पुस्तकी विद्येपेक्षां अनुभवाचीच महती ज्यास्त आहे. हल्लींच्या बांधकामांचें आयुष्य किती क्षणभंगुर आहे, हें आपण पाहतोंच. परंतु नुसत्या पाहण्यानें आपणास थक्क करून सोडणारीं शिवाजीच्या वेळचीं किल्ले वगैरेंचीं बांधकामें आज दोनशें वर्षें सृष्टींतील आघात सहन करीत आहेत, इतकेंच नव्हे, तर तीं कामें मोडून टाकण्यास निसर्गाचा व इतरांचा प्रयत्न चालला असतांही, त्यांस भंग होत नाहीं! या कामीं पूर्वजांच्या कामागिरीची ओळख करून घेण्याकरितां महाराष्ट्रांतील कांहीं किल्ले प्रत्येकानें मुद्दाम जाऊन पाहवे. युद्धकला व तीस लागणारें साहित्य तयार करून त्याचा उपयोग करणें, हरएक प्रकारचें दगडी व इतर जातींचें बांधकाम, वसुलाची व्यवस्था, राज्याचा बंदोबस्त, हुन्नर व कलाकौशल्य, तसेंच अध्यात्मविद्या इत्यादि नानाप्रकारच्या विषयांत केवळ प्रत्यक्षानुभवाच्या जोरावर शिवाजीच्या वेळचा समाज अनेक विषय हातीं घेण्यास तयार होता. त्या अनुभवास शास्त्रीय शोधांचें पाठबळ असतें इतर विद्यासंपन्न राष्ट्रांशीं आपल्या राष्ट्रास टिकाव धरतां आला असता. सारांश, शिवाजीप्रमाणेंच त्याच्या प्रधानांस व साह्यकर्त्यांस विशिष्ट शिक्षण मिळालें नसतांही, ते आपापलीं कामें करण्यास लायक व समर्थ होते, याचें कारण ते जगाच्या प्रत्यक्षानुभवांत तरबेज होऊन तावून सुलाखून बाहेर पडले होते.

७. बजाजी निंबाळकराची शुद्धि.—निंबाळकरांची हकीकत मागें पृष्ठ १३४वर आली आहे. फलटणचा बजाजी नाईक निंबाळकर यास आदिलशहानें पकडून नेऊन विजापुरास अटकेंत ठेविलें; आणि 'बजाजी मुसलमान होईल तर त्यास सोडून देऊन शिवाय मोठी जहागीरही देतों,' असें शहानें

मालोजी नाईक निंबाळकर
| |
जगपाळराव  दीपाबाई—ल. मालोजी भोसले
| |
मुधोजी  शहाजी भोसले
| |
बजाजी  शिवाजी
| |
महादाजी——ल. सखूबाई.

बोलणें लाविलें. बजाजीस ही गोष्ट आवडली नाहीं; परंतु चारशें वर्षे उपभोग घेतलेलें आपलें वतन सर्व जप्त झालें, आणि सर्व वंश बुडण्यास आपण कारण होणार असें पाहून, कालदेशाकडे दृष्टि देऊन त्यानें मुसलमानी धर्म स्वीकारण्याचें कबूल केलें. मात्र तसें केल्यानें आपला फायदा तरी पुष्कळसा व्हावा, अशा हेतूनें त्यानें आपणाकरितां शहाच्या मुलीची मागणी केली. ही मागणी शहास पसंत पडली. आंतून मुलीनेंही ह्या कामीं खटपट केली असावी असें दिसतें. निंबाळकर वगैरे सरदार राज्याचे केवळ आधारस्तंभ होते. भोसल्यांचे घराण्यांशीं निंबाळकरांचा ऋणानुबंध विशेष होता, तेव्हां निंबाळकरांस मुसलमान केल्यानें आपली शक्ति वाढेल, आणि तेणेंकरून शिवाजीस निंबाळकरांची मदत होणार नाहीं, असा आदिलशहाचा हेतु असावा. पुढें बजाजीनें मुसलमानी धर्म स्वीकारून आदिलशहाच्या मुलीशीं लग्न केलें. बजाजीस पूर्वीची जहागीर व आणखी नवीन ज्यास्त मिळून त्याबद्दल नवी सनद शहानें त्यास करून दिली.

येणेंप्रमाणें बजाजी निंबाळकर मुसलमान बनला. तथापि त्यास आपलें कृत्य प्रशस्त वाटलें नाहीं. तो विजापुराहून स्वदेशीं आला, तेव्हां त्यास फारच अडचण पडूं लागली. सिंगणापुरास श्रीशंभुमहादेवाचें दर्शन घेऊन, बजाजीनें आपली सर्व हकीकत शिवाजीची आई जिजाबाई इला कळविली. निंबाळकरासारखा सरदार मुसलमान झालेला पाहून जिजाबाईला फारच वाईट वाटलें होतें. एक तर निंबाळकरांच्या घराण्याशीं भोसल्यांचा पिढीजाद संबंध; दुसरें, आजपर्यंत शहाजी व शिवाजी योग्यतेस चढण्यास आरंभीं हेंच घराणें कारण झालें होतें. तेव्हां एवढा बलिष्ठ सरदार मराठमंडळांतून गेल्यामुळें शिवाजीच्या नूतन प्रयत्नांस मोठाच धक्का बसल्यासारखा झाला. परंतु इच्छा असली म्हणजे रस्ता सांपडतो, ह्या म्हणीप्रमाणें बजाजीनें स्वधर्मांत परत येण्याची उत्कंठा दर्शवितांच जिजाबाईनें पुढाकार घेऊन त्या कामीं तोड काढिली. ‘ तिनें समस्त मराठमंडळ मिळवून, आपत्प्रसंगामुळें नाइकाकडे कांहीं एक दोष नाहीं असें जाणवून, शास्त्राधारें त्यास शुद्ध करून गोतांत घेतलें; इतकेंच नाहीं, तर पुढें निंबाळकरांविषयीं कोणींही मनांत किंतु आणूं नये, एवढ्याकरितां शिवाजीची मुलगी संभाजीची बहीण सखूबाई ही जिजाबाईनें बजा-

जीचा थोरला मुलगा महादाजी यास दिली. सिंगणापुरच्या बडव्यांस २०० रुपयांचें इनाम त्या वेळेस दिलेलें हल्लीं चालू आहे. हा प्रकार सन १६५७ चे सुमारास घडला. बजाजीची मुसलमान बायको विजापुरींच राहिली असें दिसतें. तिच्यापासून बजाजीस मूल झाल्याचा उल्लेख नाहीं. ही हकीकत फलटणच्या दप्तरांतील आहे.

ह्या एकंदर प्रकारांत विचार करण्यासारख्या गोष्टी अनेक आहेत. निंबाळकरासारखा प्रमुख सरदार मुसलमान झाला असतां, त्यास त्याच्या जातभाईनीं स्वधर्मांत परत घेतलें; आणि त्या वेळचीं असलीं आणखी- ही उदाहरणें आहेत. यावरून अडीचशें वर्षांपूर्वीचा आपला समाज आजच्या इतका अनुदार नव्हता. जिजाबाईसारखी बाई त्या कामीं पुढें झाली, हेंही लक्षांत ठेवण्यासारखें आहे. धर्मांतर केल्यानें राष्ट्राचें नुकसान होतें, आपत्प्रसंगीं एखाद्यास परधर्मस्वीकार करावा लागला, तरी त्यास स्वधर्मांत परत घेण्यास हरकत नाहीं, हें सतराव्या शतकांतील जिजाबाईस चांगलें कळत होतें. निंबाळकरास परभारें प्रायश्चित्त देऊन जिजाबाई स्वस्थ बसली नाहीं, तर आपली नात निंबाळकराचे मुलास देऊन सर्व लोकांनीं अनुकरण करण्यासारखें उदाहरण तिनें घालून दिलें. अशा प्रकारें बायकासुद्धां ज्या वेळेस राष्ट्रोन्नतीकरितां झटूं लागतात, त्या वेळेस राष्ट्राचा भाग्योदय होतो. स्वराष्ट्र ऊर्जितावस्थेस आणणें हा जिजा- बाई व शिवाजी यांचा मूळपासून उद्योग होता. त्या कामीं महाराष्ट्रांतील प्रमुख मंडळीचें त्यांस साह्य पाहिजे होतें. निंबाळकराचें घराणें म्हणजे भोस- ल्यांचे तोडीचें, किंबहुना मानानें ज्यास्तच होतें. तेव्हां असें घराणें कमी झाल्यासून महाराष्ट्राचें नुकसान बहुत झालें असतें. तें न व्हावें एतदर्थ जिजाबाईची खटपट होती. निंबाळकर व शिवाजी यांच्या घराण्यांचे संबंध पूर्वीही घडले असून पुढेंही ते मराठशाहीच्या अखेरपर्यंत चालले. शिवा- जीची पहिली बायको सईबाई ही निंबाळकरांकडलीच. शिवाजीची मुलगी सखूबाई ही महादाजी निंबाळकरास दिलेली होती. हा महादाजी निंबाळकर शिवाजीच्या लष्करांत प्रमुख सरदार असून तो भागानगराकडे असे. संभाजीला त्याची मदत चांगली झाली. संभाजीचा वध केल्या- वर औरंगजेबानें महादाजी निंबाळकर व सखूबाई यांस कैद करून ग्वाल्हे- रच्या किल्ल्यावर ठेविलें. तेथेंच तीं दोघें कांहीं काळानें मरण पावलीं.

शिवाजीनें आपली मुलगी सखुबाई महादाजी निंबाळकरास दिली, तेव्हां त्यानें मौजे वाल्हें, ता. पुरंदर, प्रां. पुणें, ह्या गांवची पाटिलकी जांवयास इनाम करून दिली, त्या वेळचें शिवाजीचें ताकीदपत्र उपलब्ध आहे तें येणेंप्रमाणें:—

"ठाणेदार हजरतखान यांस रा. शिवाजी राजेसाहेब यांची ताकीद, सुमासमान–खमसैन–आलफ ( म्ह. अरबी सन १०५८=इ. स. १६५७) ची हानापैलत हुताषकजमा व बलुते, मौजे वाल्हें, प्रांत पुणें,–बेदानतके (=कळावें कीं ):–मौजे मजकूरची मोकदमी वाल्हेकर करीत असतां, बाळजोशी कुळकर्णी मौजे मजकूर यास बरवोजी पाटलानें कैनी(?) जिवें मारिलें; हा समाचार मशारनिल्हे त्रिंबकराव हवालदार, प्रगणे शिरवळ यास कळल्यावरून, त्रिंबकराव धावणी करून बरवोजी पाटील यास धरून नेलें. यास नागवण त्याचा खंड (=दंड) होन बाराशें केले. या पैक्याचे उगवणीबद्दल म्हाकुजी भापकर मोकदम, मौजे लोणी हा प्रांत, यास जमान दिले. या उपरी बरवोजी पाटील मौजे मजकूर याच्यानें पैक्याचा वसूल न होय, म्हणून म्हाकुजी भापकरास पाटिलकी बरवोजीनें मौजे वाल्ह्याची दिली. म्हाकुजी पाटिलकी करीत होता, तो मयत झाला. त्याचा लेक खंडूजी भापकर पाटिलकी करीत ( असतां ), बरवोजीनें कांहीं कसूर केला, म्हणून हरदूजपणें हुजूर बोलावून अवघी हकीकत मनास आणून, हरदूजणांचें समाधान करून, पाटिलकीची किंमत होन १२००, पैकीं हुजुरानें हरदूजणांशीं वांटून दिले. होन १२०० (चा) बितपशील:–

९०० खंडुजी बिन म्हाकुजी भापकर होन.

३०० बरवोजी वाल्हेकर घोडा १ एकूण होन.

येणेंप्रमाणें पैकीं ( वांटणीनें ) देऊन, पाटिलकी विकत घेऊन, राजश्री महादाजी निंबाळकर, आमचे जांवाई, यांस मौजे मजकूरची पाटिलकी करतील. तुम्ही त्यास राजी होऊन असणें. तालीक (=नक्कल) लेहून घेऊन, अस्सल नाईक मशारनिल्हे यांस फिरून देणें. शके १५७९ हेमलंबी नाम संवत्सरे, कार्तिक शु॥ १, मोर्तबसूद.

ह्या प्रकारासंबंधाचे आणखी अनेक उल्लेख निंबाळकरांचे दप्तरांत आहेत. वरील पत्र सन १६५७ तील आहे. त्यावरून शिवाजीची सत्ता त्या वेळीं किती होती ह्याचा थोडासा अंदाज करितां येतो.

८. शिवाजीचे साह्यकारी.—शिवाजीस मदत करणाऱ्या पुरुषांची हकीकत वर ठिकठिकाणीं येऊन गेली आहे. प्रकरण ९ कलम ५ च्या अष्टप्रधानांच्या हकीकतींतही बरीच माहिती आलेली आहे. तत्राप या राष्ट्रघटनेच्या कामांत आणखी किती तरी मंडळी उपयोगीं पडली असतील, त्यांचा नुसता नामनिर्देशही ठाऊक नसणें ही मोठ्या खेदाची गोष्ट होय. ब्राम्हण, मराठे, प्रभु व इतर सर्व जातींचे लोक या कामांत खपले आहेत. ज्यांचे उल्लेख पूर्वीं येऊन गेले नाहींत तेवढ्यांचीच माहिती येथें द्यावयाची आहे.

बाळाजी आवजी.–शिवाजीच्या राज्यस्थापनेंत पेशवा मोरोतंप किंवा सेनापति प्रतापराव गुजर याजप्रमाणें, किंबहुना यांच्याहून ज्यास्त, बाळाजी आवजी चिटणीस याचा उपयोग झाला आहे. बत्तीस वर्षें शिवाजीचा हा विश्वासू लेखक असल्यामुळें तो त्याचें केवळ द्वितीय अंतःकरणच होता, असें म्हटलें तरी चालेल. शिवाजी त्यास अष्टप्रधानांत पद देत असतां तें त्यानें न स्वीकारतां त्यानें चिटणिशीचा दरख कायमचा मागून घेतला. या संबंधाचें एक पत्र राज्याभिषेकानंतर चार दिवसांनीं लिहिलेलें वाचण्यालायक आहे.

‘ स्वस्तिश्री राज्याभिषेक १ आनंदनाम संवत्सरे, ज्येष्ठवद्य प्रतिपदा भानुवासरे, क्षत्रियकुलावतंस श्री राजा शिवछत्रपति स्वामी यांणीं, राजकार्यधुरंधर विश्वासनिधि राजमान्य राजश्री बाळाजी आवजी प्रभु चिटणीस यांसी आज्ञा केली ऐसीजेः—तुम्ही स्वामीसेवा बहुत निष्ठेनीं करून, श्रमसाहस फार केले. राज्यवृद्धीचे कामीं आलां. यावरून तुम्हांवर कृपाळु होऊन अष्टप्रधानांतील पद द्यावें असें मनीं आणिलें असतां, तुम्हीं विनंति केली कीं, आपणांकडे चिटणिसीचा दरख चालत आहे, हा अक्षयी वतनीं वंशपरंपरेनें सन्निध व सर्व राज्यांतील चालवावा, व कारखानिसी आणि जमेनिसी दोन धंदे राज्यांतील आपले निसबतीस दिल्हे, ते अक्षयी असावे. याजवरून कृपा करून चिटणिसी सन्निधानची व सर्व राज्यांतील वतनी करार करून दिल्ही. कारखानी व जमेनिसी राज्यांतील तुम्हांकडे दिल्ही असे. स्वामीचे वंशींचा कोण्ही अन्यथा करणार नाहीं. तरी लिहिलेप्रमाणें सदरहू प्रयोजनाचे व्यापाराची सेवा तुम्ही व तुमचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरे

करून सुखरूप अनभवणें. जाणिजे. छ० बहुत काय लिहिणें ? शके १५९६, ज्येष्ठ वद्य १, ( खं. ६-२ ).

निरनिराळ्या जातींमध्यें शिवाजीच्या वेळेस थोडें बहुत वैमनस्य होतें, हें तारीखी-शिवाजींतील खालील लेखावरून दिसून येतें.

' गंगा ( गागा ? ) भट बनारसहून आला होता, त्याजकडून शिवाजीनें वेदमंत्र शिकून ब्राह्मणासारखें आचरण करण्यास सुरुवात केली. त्यावरून सर्व ब्राह्मणांनीं गागाभट्टावर बहिष्कार घातला. त्यावर शिवाजीनें असा हुकूम काढिला कीं ' ब्राह्मण हे धर्मगुरू असून वंद्य आहेत; परंतु राज्यांत त्यांस नोकरींत ठेवणें हा धर्माचार नाहीं. सबब देवार्चनापलीकडे दुसऱ्या कोणत्याही सरकारी कामांत त्यांस नेमण्यांत येऊं नये. ह्या हुकुमानुसार ब्राह्मणांस नोकरीवरून काढून त्यांच्या जागा प्रभूंस देण्यांत आल्या. तेव्हां ब्राह्मणांबद्दल मोरोपंतानें पुष्कळ रदबदली केली. तो ह्मणाला, ' महाराज, आपण म्हणतां हाच खरा मार्ग, परंतु आपल्या खास नोकरींत एकट्या प्रभूंवर विश्वास ठेवणें वाजवी नाहीं. त्यामुळें राज्यास हानि, धोका अगर संकट येईल. शिवाजी बोलला, ' प्रभूंची जात सर्वथैव विश्वासपात्र आहे. सीदीसारख्या नरकयांनीं सुद्धां राजपुरीच्या रक्षणास प्रभु ठेविले आहेत. ते ती नोकरी विश्वासानें बजावीत असून प्रसंगीं आपले प्राण खर्ची घालण्यासही ते कमी करीत नाहींत. तेव्हां मोरोपंत निरुत्तर झाला. '

" मौनीस्वामी.—'कोंकणांत शिवाजीचा अंमल बसविण्यास मौनीस्वामी पाटगांवकर व बाबा याकुब रत्नागिरीकर हे दोन पुरुष कारण झाले. ह्या दोघांचेंही शिवाजीवर अत्यंत प्रेम होतें. त्यांच्या सांगण्यावरून कोंकणांतील लोक शिवाजीराजाच्या अंमलाला राजी व रुजू झाले. मौनीस्वामींचें वजन गोव्यापासून राजापुरपर्यंत व बाबा याकूबचें वजन राजापुरपासून दाभोळपर्यंत होतें. ह्या दोघांचाही उल्लेख बखरींत असून, त्यांच्या वंशाकडे अद्याप इनामें चालू आहेत. ( इ. सं. ). मौनीस्वामीचा मठ कुडाळप्रांतीं कोल्हापुर, वेंगुर्ले रस्त्यावर पेठ पाटगांव येथें आहे. या सत्पुरुषाविषयीं शिवाजीचा मोठा पूज्यभाव होता असें खंड २० लें० २८०—आहेत. वरून दिसून येतें. पहिल्या लेखांत पाटगांव मुक्कामीं तंबाकूच्या त्या वेळीं दुकानाचें स्वामित्व स्वामीला देवविलें असून, दुसऱ्यांत त्याचे

पालखीला भोई व वाजंत्री ठेवण्याकरितां सालीना १२५ होन देत जाण्याविषयीं छत्रपति संभाजीनें आज्ञा केली आहे.

शिवाजीच्या साह्यकारी मंडळींत त्याचे बालपणचे सोबती येसजी कंक, तानाजी मालुसरे व बाजी पासलकर या मावळे सरदारांचीं नांवें प्रसिद्ध असून, त्यांतही तानाजीचा सिंहगडावरील पराक्रम महाराष्ट्रेतिहासांत चिरस्मरणीय झाला आहे. येसजी कंक स. १६८६ त पायदळाचा सरनोबत होता. त्यानें व मुलगा कृष्णाजी यांनीं फोंड्याचे स्वारींत विशेष पराक्रम केल्यावरून छत्रपति संभाजीनें त्यांस दोन हजार होन बक्षीस दिले, असा उल्लेख खं. १५ ३६५ यांत आहे.

मराठे सरदारांत तर असंख्य पुरुष उदयास आले. शिवाजीच्या कारस्थानांत पूर्णपणें वाकब असल्यामुळें, त्यांच्या हातून शिवाजीच्या पश्चात् देशसेवेची मोठीच कामगिरी पार पडली. एकंदर मराठशाहींत जीं मराठ्यांचीं घराणीं पुढें उदयास आलीं, त्यांचें मूळ बहुतकरून शिवाजीच्या वेळेस सांपडतें. अशा घराण्यांच्या हकीकती आज उपलब्ध नाहींत ही मोठ्या खेदाची गोष्ट होय. कंक, मालुसरे, पासलकर इत्यादि मावळे सरदारांचीं घराणीं आजही हयात असतील, पण वरील पूर्वजांच्या नांवांपलीकडे त्यांजविषयीं ज्यास्त माहिती आज उपलब्ध नाहीं. चाकणचा किल्लेदार फिरंगोजी नरसाळा, जावळी सर करण्यांत मदत करणारा संभाजी कावजी, आगींत उडी घालणारा घोडेस्वारांचा पहिला अधिपति नेताजी पालकर, मोगल व विजापुरकर यांस चांगलाच शह देण्यांत जिवाकडे न पाहणारा प्रतापराव गुजर, इत्यादि इतिहासप्रसिद्ध मंडळी आज केवळ नामशेष होऊन गेली आहे.

शिवाजीपाशीं नवीन होतकरू असे पुष्कळ लोक होते. त्यांतील कित्येक पुढें फार प्रसिद्धीस आले. तुकोजी व त्याचा मुलगा कान्होजी आंगरे, संताजी घोरपडे, धनाजी जाधव, खंडेराव दाभाडे, नागपुरकर भोसल्यांचा पूर्वज परसोजी भोसले, ही मंडळी शिवाजीचे शिस्तींत वाकब असून त्याचे पश्चात् प्रसिद्धीस आली. शहाजीच्या भावाचा मुलगा परसोजी पुष्कळदां शिवाजीबरोबर असे.

मराठी बखरींतून सुमारें शंभर मंडळींचीं नांवें प्रसिद्ध आहेत. पैकीं निंमे ब्राह्मण आणि प्रभु व बाकीचे मराठे व मावळे आहेत. हे सर्व लोक शिवाजीच्या राज्याचे खरे आधारस्तंभ होते. अशा शूर व कर्तबगार लोकांचें शिवाजीस साह्य होतें, म्हणूनच राज्यस्थापनेचें अचाट काम त्याला तडीस नेतां आलें. त्यांतही विशेषेंकरून शिवाजीच्या अनुयायांमध्यें एक मोठा गुण दृष्टीस पडतो, तो असा कीं, इतक्या असंख्य लोकांमध्यें एकही मनुष्य कर्तव्यपराङ्मुख झाला नाहीं; एकानेंही धन्याशीं बेइमान केलें नाहीं; आणि धन्यानें वाग्बाणांनीं ताडन केलें असतां, प्रतापराव गुजराप्रमाणें, एकही कर्तव्य बजावण्यांत प्राण खर्चीं घालण्यास चुकला नाहीं. ज्यानें त्यानें नेमून दिलेली कामगिरी उत्कृष्ट बजाविली. त्यांची शिवाजीवर भक्ति असून, शिवाजीचा त्यांजवर लोभ हाच आपल्या श्रमांचा मोबदला असें ते समजत असत. शिवाजीचे पश्चात् मोगलांनीं मराठ्यांचे बहुतेक प्रांत हिसकावून घेतले. परंतु मराठ्यांच्या अंगचा हुरूप, त्यांची वीरश्री व त्यांची एकी हीं मोगलांस नाहींशीं करितां आलीं नाहींत. यामुळें आपत्काळीं महाराष्ट्राचा बचाव झाला. शिवाजीच्या वेळेस राज्यकारभाराचें शिक्षण त्यांस मिळालें म्हणूनच मोगलांच्या हातून मराटशाहीचा निःपात झाला नाहीं. अशा प्रकारचे अनेक लोक शिवाजीनें शिकवून तयार केले, यांतच शिवाजीची दूरदृष्टि व्यक्त होते. खऱ्या देशभक्ताचें कर्तव्य असेंच आहे. केवळ अमुक एक कृत्य तडीस गेलें म्हणजे त्याचें काम भागत नाहीं, तर त्या कृत्याचें साफल्य कायम राखण्यासाठीं योग्य माणसें तयार करणें व हरएक बाबतींत पुढची तरतूद करून ठेवणें, ह्यांतच त्याचा खरा मोठेपणा आहे. शिवाजीसारख्या स्वामी व त्याच्याच योग्यतेचे त्याचे अनुयायी यांच्या चरित्रक्रमाची आठवण आज त्यांच्या वंशजांस झाली असतां, आपल्या पूर्वजांच्या अंगच्या गुणांची थोरवी त्यांस केवढी वाटत असेल बरें! शिवाजी आपल्या थोर गुणांच्या योगानें अनुयायांच्या ठिकाणीं सप्रेम उत्साह उत्पन्न करीत असे. शिवाजीच्या जन्माची साफल्यता यांतच होती.

पूर्वीं मोठमोठ्या राजांजवळ कवी किंवा भाट असत, त्याप्रमाणें शिवाजीपाशींही अनेक विद्वान् पुरुष होते, त्यांत भूषण कवीचें नांव प्रसिद्ध आहे. तो प्रथम छत्रसाल राजाजे पदरीं होता. तेथून सन १६६४ त

तो शिवाजीपाशीं येऊन राहिला. यवनांची नोकरी करण्याचा त्यास मोठा तिटकारा वाटत असे. शिवाजीला हा त्याचा अभिमान विशेष आवडला असावा असें दिसतें. हिंदुस्थानांतील निरनिराळ्या राज्यांतलि स्थिति व व्यवस्था भूषण कवीकडून शिवाजीला चांगली कळली असली पाहिजे. 'शिवराज-भूषण-काव्य' या ग्रंथांत त्यानें शिवाजीच्या प्रतापाचें सुरस वर्णन केलें आहे. हें काव्य राज्याभिषेकाच्या आदल्या वर्षी पुरें झालें. शिवाजीनें भूषण कवीस पुष्कळ द्रव्य देऊन स्वदेशीं पाठविलें. शिवाजीच्या कामगिरींत हजारों लोकांनीं आपले प्राण स्वदेशसेवेस अर्पिले, त्यांपैकीं इतिहासांत आज आपणास फार तर थोडींशीच नांवें माहीत आहेत, पण ज्यांचीं नांवें माहीत नाहींत अशा शेंकडों लोकांचे प्राण देशकार्यास बळी पडले आहेत. त्यांचें मागें नांवसुद्धां राहिलेलें नाहीं. कोणी धनाकरितां तर कोणी कीर्तीकरितां, मिळून कोणत्या ना कोणत्या तरी हेतूनें कामगिरी करणारे लोक पुष्कळ असतात. पण केवळ देशकार्य हाच हेतु धरून स्वतः झीज सोसणारे क्वचित्. अशाच निरिच्छ पण स्वदेशाभिमानी लोकांची संख्या जसजशी एखाद्या राष्ट्रांत वाढत जाते, तसतसा त्याचा उद्धार होत जातो. शिवाजीनें जें महत्कार्य केलें, तें त्यानें एका दिवसांत किंवा एकट्यानें तडीस नेलें नाहीं. त्यासाठीं शिवाजीस व त्याच्या अनुयायांस पुष्कळ दिवस अनेक संकटें भोगावीं लागलीं. शिवाजीचा उत्सव जसा शिवाजीबद्दल आहे, तसाच तो स्वराज्यस्थापनेच्या कामीं त्यास साह्य करणाऱ्या व देशकार्यासाठीं आपले प्राण खर्ची घालणाऱ्या हजारों लोकांचाही आहे. दुसऱ्या एका दृष्टीनें पाहिलें असतां हा उत्सव महाराष्ट्रीयांच्या अंगच्या सद्गुणांचें व शौर्याचें स्मारक आहे.

देश जिंकण्याचें श्रेय शिवाजीच्या सरदारांत विभागून द्यावयाचें असेल तर राघो बल्लाळानें कोंकणप्रांत, अनाजी दत्तोनें पन्हाळा व दक्षिणप्रांत, मोरोपंत पिंगळे व प्रतापराव गुजर यांनीं उत्तरप्रांत, व रघुनाथराव हणमंते व हंबीरराव मोहिते यांनीं कर्नाटकप्रांत, असे प्रदेश जिंकिले असें ठोकळ मानानें म्हणतां येईल.

**९. शिवाजी आणि रामदास.**—शिवाजीच्या साह्यकर्त्यांत रामदासाची गणना प्रामुख्यानें केली पाहिजे. रामदास शिवाजीचा गुरु होता, अर्थात्, त्याच्या मनाचा व आत्म्याचा संरक्षक होता. म्हणून वर प्रत्यक्ष

साह्य करणारी मंडळी सांगितली त्यांच्याहून एका दृष्टीनें रामदासाचें साह्य ज्यास्त किंमतीचें होतें. ह्या बाबतीचें सामान्य विवेचन पूर्वी प्रकरण १ कलमें ७–८–९ ह्यांत केलें आहे. त्यानंतर शिवाजीनें रामदासी मठांस उत्पन्नें करून दिलेली, बाळाजी आवजीच्या हातची, एक अस्सल सनद रा. ब. पारसनीस ह्यांनीं मेहेरबानी करून दिली, तींत शिवाजी व रामदास ह्यांचा संबंध चांगल्या प्रकारें व्यक्त झालेला आहे. ही सनद स. १६७९ च्या विजयादशमीस लिहिलेली असून, ती इनाम कमिशनच्या दप्तरांत नोंदलेली आहे आणि त्याप्रमाणें उत्पन्नें हल्लीं चालू आहेत. तेव्हां या कागदाच्या अस्सलपणाविषयीं शंका घेण्याचें कारण नाहीं. ती सनद येणेंप्रमाणें:—

श्री.

श्रीसद्गुरुवर्य श्रीसकलतीर्थरूप श्रीकैवल्यधाम श्रीमहाराज श्रीस्वामी. स्वामींचे सेवेसीं:—

चरणरज शिवाजीराजे यांणीं चरणांवर मस्तक ठेवून विज्ञापना जे. मजवर कृपा करून सनाथ केलें. आज्ञा केली कीं, तुमचा मुख्य धर्म, राज्य स्थापन करून, धर्मस्थापना, देवब्राह्मणांची सेवा, प्रजेची पीडा दूर करून, पाळण रक्षण करावें. हें व्रत संपादून त्यांत परमार्थ करावा. तुम्ही जें मनीं धराल तें श्री सिद्धीस पाववील. त्याजवरून जो जो उद्योग केला, व दुष्ट तुरुख लोकांचा नाश करावा, विपुल द्रव्येंकरून राज्यपरंपरा अक्षयीं चाले ऐशीं स्थळें दुर्घट करावीं, ऐसें जें जें मनीं धरिलें, तें तें स्वामींनीं आशीर्वादप्रतापें मनोरथ पूर्ण केले. याउपरी राज्य संपादिलें तें चरणीं अर्पण करून, सर्व काळ सेवा घडावी, ऐसा विचार मनीं आणिला. तेव्हां आज्ञा जाली कीं, पूर्वी धर्म सांगितले तेच करावे, तीच सेवा होय, असें आज्ञापिलें. यावरून निकट वास घडून वारंवार दर्शन घडावें, श्रीची स्थापना कोठें तरी होऊन सांप्रदाय शिष्य व भक्ति दिगंत विस्तीर्ण घडावी, अशी प्रार्थना केली, तेही असमंतात् गिरिगव्हरीं वास करून, चाफळीं श्रीची स्थापना करून सांप्रदाय शिष्य दिगंत विस्तीर्णता घडली. त्यास, चाफळीं श्रीची पूजा, महोत्सव, ब्राह्मणभोजन, अतिथी, इमारत सर्व यथासांग घडावें, जेथें जेथें श्रीच्या मूर्ति स्थापन जाली तेथें उत्सव पूजा घडावी. यास राज्य संपादिलें यांतील ग्रामभूमि कोठें काय नेमावी, ती आज्ञा

व्हावी. तेव्हां आज्ञा जाली कीं, विशेष उपाधीचें कारण काय ? तथापि तुमचे मनीं श्रीची सेवा घडावी हा निश्चय जाहला, त्यास यथावकाशें जेथें जेथें जें जें नेमावेंसें वाटेल तें नेमावें, व पुढें जसा सांप्रदायाचा, व राज्याचा, व वंशाचा विस्तार होईल तसें करीत जावें. याप्रकारें आज्ञा जाली. याजवरून देशांतरीं सांप्रदाय व श्रीच्या स्थापना जाल्या, त्यास ग्रामभूमीचीं पत्रें करून पाठविलीं. श्रीसन्निध चाफळीं एकशें एकवीस गांव सर्वमान्य व एकशें एकवीस गांवीं अकरा बिघे प्रमाणें भूमि, व अकरा* स्थलीं श्रीची स्थापना जाली, तेथें नैवेद्यपूजेस भूमि अकरा बिघे प्रमाणें नेमिले आहेती. असा संकल्प केला आहे, तो सिद्धीस नेण्याविशीं विनंति केली तेव्हां, संकल्प केला तो परंपरेनें शेवटास न्यावा अशी आज्ञा जाली. त्यावरून सांप्रत गांव व भूमि नेमिल्या:—

१ मौजे चाफळ तर्फ नाणेघोल प्रांत कऱ्हाड कसबे नाणेघोलपैकीं देहे २ असे एकंदर ३२ देहे;

१ मौजे दहीफल बुद्रुक परगणे ढवेली श्रीश्रेष्ठांचे समाधीकडे देह १.

धान्य गल्ला हरजिनशी खंडी १२१ एकशेंएकवीस.

एकूण दरोबस्त सर्वमान्य गांव तेहेतीस व जमीन बिघे गांवगन्ना चारशें-एकोणीस आणि कुरण एक श्रीचे पूजाउत्सवाबद्दल संकल्पांतील सांप्रत नेमिलं, व उत्साहाचे दिवसास आणि इमारतीस नक्त ऐवज व धान्य समयाचे समयास प्रविष्ट करीन. एणेंकरून अक्षयीं उत्साह चालविण्या-विशीं आज्ञा असावी. राज्याभिषेक शके ५ कालयुक्तानाम संवत्सरे. आश्विन शुद्ध १०, बहुत काय लिहिणें हे विज्ञापना.’

ह्या पत्रांत बऱ्याच गोष्टींचा उलगडा आहे. तो समजून घेण्या-साठीं त्या दोन व्यक्तींची मनोरचना ध्यानांत ठेविली पाहिजे. शिवाजी अत्यंत धार्मिक होता. सत्पुरुषांवर त्याची मोठी श्रद्धा असे. संकटाच्या व विवंचनेच्या प्रसंगीं त्याचें चित्त व्यग्र होत असे. पुष्कळदां उपरति होऊन हें राज्य व ही दगदग नको असें त्यास वाटे. त्याला देवीचे दृष्टांत होत. बागलाणांत, कर्नाटकांत वगैरे त्यास सत्पुरुष भेटल्याचे

*रुद्र ११, आणि मारुती हा रुद्राचा अवतार, म्हणून ११ चें प्राधान्य असावें

### चाफळचा रामदासी मठ.

( सत्कार्यो० सं. ५ ले. ३६८ ).

मूळ पुरुष कृष्णाजीपंत ठोसर. इ. स. १०२

सूर्याजीपंत

- गंगाधर=रामीरामदास १६०५–१६७७
  - रामचंद्र मृ. १७०५
    - गंगाधर मृ. १७३४
      - लक्ष्मण दत्तक
        - हनुमंत बावा १७६७–१८१८
          - महारुद्र बावा १८१७–१८४८
            - लक्ष्मणस्वामी.
  - श्यामजी मृ. १६९३
    - श्यामजी मृ. १७६२
      - लक्ष्मणबावा मृ. १७८३
      - रामचंद्र मृ. १७७१
- नारायण=रामदास १६०८–८२

उल्लेख आहेत. ज्या ज्या ठिकाणीं तो जाई तेथें कोणी कोणत्याही प्रकारचा अलौकिक पुरुष त्यास आढळल्यास तो मुद्दाम तपास करी; आणि अशा पुरुषांपासून माहिती, उपदेश वगैरे मोठ्या आस्थेनें मिळवी. मनूची म्हणतो कीं, जयसिंगाच्या मुक्कामावर असतां युरोपियन राष्ट्रांची माहिती विचारून शिवाजीनें मला पुरे पुरे केलें. श्रीशैलमल्लिकार्जुन येथें गेला असतां देहभान विसरून शिवाजी एका सत्पुरुषाच्या भजनीं लागला होता. सारांश, मनास विवंचना लागली असतां, शांति व समाधान मिळविण्यासाठीं शिवाजी सत्पुरुषांचा सहवास धरीत असे.

रामदास सत्पुरुष होता. तो अत्यंत निरिच्छ असे. पारमार्थिक मार्गापासून त्यानें लोकांची प्रवृत्ति संसारमार्गाकडे कशी केली हें मागें सांगितलेंच आहे. स्वतःचे ठिकाणीं तेज उत्पन्न करून सर्व जगाला शहाणें करण्याची रामदासाची खटपट असून, इतर साधुसंतांच्या भक्तिमार्गापासून रामदासाचा उपदेश अत्यंत भिन्न होता. तो संतमंडळीस आवडला नाहीं. रामदासाचा अभंगदेखील श्रीपांडुरंगासमोर म्हणण्याची पंढरपुरास संतानुयायी वारकऱ्यांनीं बंदी ठेविली आहे. अशा निरिच्छ,

चतुरस्त्र व देशकालज्ञ सत्पुरुषाची संगति शिवाजीनें बरीच केली असली पाहिजे; आणि त्यापासून अडचणींच्या प्रसंगीं शिवाजीच्या मनास शांति व समाधान झालें असेल, ह्यांत संशय नाहीं. मात्र अशा सत्संगापलीकडे शिवाजीच्या प्रत्यक्ष राजकारणांत रामदासानें कोणताही भाग घेतला नाहीं. कोणत्याही बखरींत अगर कागदपत्रांत असा एकही उल्लेख सांपडत नाहीं, कीं ज्यांत रामदासानें स्वतः एखाद्या राजकारणांत अगर राज्यकारभाराच्या बाबतींत यत्किंचित् हात घातला. 'चालला आहे हाच उद्योग पुढें चालवा. तुमच्यासारख्या क्षत्रियानें राज्यच चालविलें पाहिजे, राज्य सोडून आमच्यासारख्या जोग्यांच्या नादीं लागणें तुम्हाला योग्य नाहीं', असें वारंवार रामदास शिवाजीस सांगे. म्हणजे रामदासानें शिवाजीच्या मनाचें रक्षण केलें; त्याचा हुरूप कायम राखिला, आणि त्यास कर्तव्यापासून विमुख होऊं दिलें नाहीं. 'Ramdas was the keeper of Shivaji's mind and spirit.' हें मार्मिक विधान सर्वथैव योग्य दिसतें.

ह्या गोष्टी ध्यानांत ठेवून शिवाजीचें वरील पत्र वाचलें असतां पुष्कळ गोष्टी कळतात. 'मजवर कृपा करून सनाथ केलें,' म्हणजे शिवाजी कांहीं तरी अत्यंत अडचणींत असून, त्या निराधार दुःखद स्थितींतून रामदासानें त्यास सोडविलें. 'तुमचा मुख्य धर्म राज्य स्थापन करून,' वगैरे जो मजकूर पुढें आहे त्यावरून असें दिसतें कीं, शिवाजीला उपरति होऊन राज्याची दगदग नकोशी झाली होती. ही त्याची विषण्णता रामदासानें दूर करून त्यास धीर दिला; आणि सांगितलें 'तुम्ही उद्योग करा, परमेश्वर सिद्धीस नेईल.' त्याप्रमाणें आचरण केल्यावर शिवाजीचा उद्योग सफळ झाला. पुढें तें सर्व राज्य स्वामीस अर्पण करून, आपण मोकळें व्हावें अशी इच्छा शिवाजीस झाली असतां, रामदासानें पुनः त्यास कर्तव्य करण्यास लाविलें. 'निकटवास घडून वारंवार दर्शन घडावें' ह्या शब्दांवरून शिवाजीनें रामदासास सज्जनगडावर आणून ठेविलें; आणि तेथील उत्सवांत अष्टप्रधान वगैरे सरकारी कामगारांनीं कोणी काय कामें करावीं व कोणाचे काय हक्क हें ठरवून दिलें. हे प्रघात मराठी राज्यांत अखेरपर्यंत यथासांग चालू होते; आणि कांहीं स्थितिभेदानें अजूनही चालले आहेत. सज्जनगड या नांवावरूनच रामदासाबद्दल शिवाजीची भावना

व्यक्त होते. रामदासानें स्थापन केलेल्या मठांचे खर्च चालण्यासाठीं उत्पन्नें बांधून देण्याची इच्छा शिवाजीनें दर्शविली असतां, ' यथावकाशें जेथें जें जें नेमावेंसें वाटेल तें नेमावें, व पुढें जसा संप्रदायाचा, आणि राज्याचा व वंशाचा विस्तार होईल तसें करीत जावें ' असें रामदासानें उत्तर दिलें. रामदास म्हणाला 'उत्पन्नें बांधून देण्याची घाई करण्याचें कारण नाहीं. जसजसा रामदासी संप्रदाय वाढेल, जसें तुमचें राज्य व वंश वाढेल, त्याप्रमाणें तुम्ही परामर्ष घेत जा. रामदासी संप्रदाय पुढें चालला नाहीं, किंवा तुमचें राज्य पुढें विस्तार पावलें नाहीं तर आज निरर्थक उत्पन्नें बांधून देण्यांत तरी फायदा काय ?' अशा प्रकारचा ह्या उभयतांमध्यें घडलेला व्यवहार शिवाजीच्या ह्या पत्रावरून उत्कृष्ट व्यक्त होतो. राज्यस्थापन, धर्मस्थापन, देवब्राह्मणांची सेवा व प्रजापालन, हें शिवाजीचें रामदासानें शिकविलेलें कर्तव्य पत्राच्या आरंभींच स्पष्ट आहे.

चंद्रराव मोऱ्यास मारल्यावर शिवाजीच्या मनास उद्वेग होऊन राजकीय संकटेंही त्याजवर ज्यास्त निकरानें येऊं लागलीं. तेव्हां स. १६५६च्या सुमारास महाबळेश्वरच्या भागांत रामदास हिंडत असतां त्याची व शिवाजीची प्रथम भेट झाली, असे उल्लेख कित्येक ठिकाणीं असल्याचें कळतें. जिजाबाईचा कोणी गुरु महाबळेश्वरीं होता, त्याला भेटण्यास शिवाजी गेला असतां रामदासाची गांठ पडली; त्याच्या उपदेशापासून शिवाजीच्या मनास समाधान वाटूं लागलें, आणि पुढें प्रसंगानुसार उभयतांच्या गांठी पडत गेल्या. जावळी काबीज केल्यावर प्रतापगड बांधिला, त्याच्या वास्तुशांतीस महाबळेश्वरचे ब्राह्मण शिवाजीनें आणिले, त्यांत रामदासस्वामी हजर असल्याचा उल्लेख एक ठिकाणीं आहे. हा प्रकार खरा असूं शकेल. रामदास स्वतः अत्यंत निस्पृह असल्यामुळें आपण होऊन शिवाजीची गांठ घेण्याचा प्रयत्न त्यानें केला नाहीं; आणि प्रत्यक्ष राजकारणांत त्याचा हात नसल्यामुळें कोणताही कागदपत्रांचा पुरावा मिळणें शक्य नाहीं.

सर्व देशांत व सर्व काळ नीति शिकविणाऱ्या सत्पुरुषांचा राष्ट्रास मोठाच उपयोग घडत असतो; आणि राष्ट्रोद्धार करणारे पुरुष ज्या वेळेस उत्पन्न होतात, त्या वेळेस त्यांस अशा नीतिशिक्षकांचें साह्य असलेलें इतिहासांत सर्वत्र दिसतें. असे पुरुष केवळ लोकहिताकरितां झटत असतात; स्वतःची बडेजाव ते बिलकूल इच्छित नाहींत. मोठ्या लोकांनीं सत्पुरुषांस गुरु कर-

ण्याचा प्रघात ह्या देशांतच नव्हे तर युरोपांतही आढळून येतो. हिंदुस्थानांत प्राचीन व अर्वाचीन काळीं सर्व राजांनीं गुरु केले आहेत. तशा प्रकारची गुरुभक्ति शिवाजीची रामदासाच्या ठिकाणीं होती. रामदासस्वामीनें नीतिमत्तेचा, देशाभिमानाचा, परस्परविश्वासाचा व राजनिष्ठेचा धडा राष्ट्रास घालून दिला. परस्परविश्वास, देशाभिमान, वगैरे राष्ट्रीय नीतिमत्तेचे घटक गुण त्यानें उत्पन्न केले. रामदासानें महाराष्ट्रधर्माचा म्हणजे मराठ्यांच्या कर्तव्याचा उपदेश लोकांस करून, तें कसें करावें हें लोकांस शिकविलें. दरएक गांवाच्या बाहेर मारुतीचें देवालय बांधवून तेथें शारीरिक व मानसिक संपत्ति तयार करण्याची योजना निर्माण केली. जे अकरा मठ रामदासानें स्थापिले ते क्षत्रियांचे व मराठ्यांचे भरवस्तीचे गांव असून, तेथें सर्व वर्णांच्या लोकांनीं जमून आपल्या कर्तव्याचा खल करावा अशी योजना होती. या कारणास्तव रामदासाचा उद्योग शिवाजीच्या घटनेस पोषक झाला. एक दुसऱ्या शिवाय लंगडा पडला असता. ह्या उद्योगासंबंधानें लोकांपुढें आपलें नांव यावें अशी रामदासाची इच्छा असती तर, रामदासाचाही पुष्कळसा पत्रव्यवहार आज सांपडला असता. परंतु राजकारणाच्या निरर्थक पत्रव्यवहारांत रामदासानें मन घातलें नाहीं. सर्व लोकांच्या हिताचा बोध लिहिण्यांतच त्यानें आपली लेखणी व जिव्हा झिजविली. राष्ट्रांतील लहान थोर मंडळीस राष्ट्रकार्य करण्याचा उपदेश करून त्यानें त्यास शिवाजीच्या कामास मदत करण्यास पाठविलें. वाटेल तें काम पडो, जिवाची परवा न करितां व स्वतःचें हित न पाहतां, तें काम तडीस न्यावयाचें, अशा प्रकारची मनोभावना शिवाजीच्या वेळेस पुढारी पुरुषांची तयार होती, तिचा उत्पादक रामदास होय. रामाच्या नांवानें काम करावें, रामाला तें अर्पण करावें, अशा बुद्धीनेंच शिवाजी, संभाजी, व राजाराम यांच्या वेळीं राष्ट्रभक्तांनीं कामें केलीं. संभाजीनें अतिशय जाच केला असतांही त्याच्या लोकांनीं आपलीं कामें टाकलीं नाहींत किंवा ते रुसून निघून गेले नाहींत. म्हणूनच अनेक संकटांतून महाराष्ट्राचा त्या वेळीं बचाव झाला. उत्तरकालीन मराठशाहींत ही मनोभावना नाहींशी झाली आणि राष्ट्राचा अधःपात सुरू झाला.

कागदपत्रांच्या पुराव्यावरून रामदासाची ही कामगिरी सिद्ध करून दाखवितां येत नाहीं, हाच त्या कामगिरीचा एक पुरावा आहे. राम-

दासी खंडांत पुष्कळ कागद छापलेले आहेत, त्यांत मठांत उत्पन्न झालेले तंटे वगैरे नेहमींचे प्रकार आढळतात. प्रत्यक्ष रामदासाचें असें त्यांत एकच पत्र आहे, आणि तेंही म्हणजे ऐतिहासिक दृष्ट्या महत्त्वाचें आहे असें नाहीं. सबब रामदासाची कामगिरी दासबोधावरूनच समजून घेतली पाहिजे. ' ईश्वरें तुम्हास प्रेरणा केली, ' असें रामदास शिवाजीस म्हणतो, ' मीं तुम्हांस अमुक शिकविलें ' असें म्हणत नाहीं. सारांश, रामदासाचें काम नैतिक स्वरूपाचें होतें. शिवाजीस रामदासाची योग्यता उत्कृष्ट कळली होती. परंतु रामदास अत्यंत निरिच्छ असल्यामुळें आपण होऊन त्यानें शिवाजीस भेटण्याची उत्कंठा दाखविली नाहीं. शिवाजीची भेटीविषयीं उत्कंठा वाढली तेव्हां शिवाजीनें अनेक प्रयास करून रामदासास गांठिलें. ह्या दोघांच्या भेटीचे अस्पष्ट उल्लेख रामदासी पत्रव्यवहारांत कित्येक आहेत. शिवाजीला उपरति झाली तेव्हां रामदासानें त्यास परावृत्त करून पुनः आपलें कर्तव्य करण्यास लाविलें. चाफळच्या मठास धान्याची मोईन शिवाजीनें करून दिली असतां पुष्कळ दिवस त्याचा स्वीकार रामदासानें केला नाहीं; उलट आलेलें सामान परत पाठविलें ( लेखांक १७,२६ ). परळी येथें स्वामीची व्यवस्था शिवाजीनें यथास्थित करून तेथील किल्ल्याचें नांव सज्जनगड असें नवीन ठेविलें. जिजोजी काटकर यास सज्जनगडावर हवालदार नेमून स्वामीच्या इच्छेप्रमाणें सर्व व्यवस्था ठेवण्याचा त्यास हुकूम दिला. कर्नाटकांतील गांवें इनाम मागून रामदासानें शिवाजीस कर्नाटक प्रांत जिंकण्याची भर दिली. रामदासी पंथाचा विस्तार कर्नाटकांतही विशेष झाला. मराठ्यांचा भगवा झेंडा रामदासाच्या गुरुत्वाचा व निरिच्छ राष्ट्रसेवेचा निदर्शक आहे. ह्या सर्व गोष्टी ध्यानांत घेतल्या म्हणजे रामदासानें केवढें नैतिक काम केलें हें दिसून येतें. समर्थ हें विशेषण त्यास शिवाजीच्या वेळीं लावण्यांत येत नव्हतें. उपकृत महाराष्ट्रानें त्या सत्पुरुषाची आठवण म्हणून मागाहून हें विशेषण त्यास दिलें. शिवाजी त्यास ' गोसावी ' व ' स्वामी ' ह्याच नांवानें संबोधीत असे. सत्पुरुषांच्या कृपेशिवाय कोणतेंच काम यशस्वी होत नाहीं, हें समजून शिवाजीनें रामदासाची कृपा संपादिली.

शिवदिग्विजयांत रामदासस्वामी व शिवाजी ह्यांच्या समागमाचें वर्णन मोठें रसभरित केलेलें आहे. रामदास शिवाजीस म्हणतो. ' या भूमंडळाचे

ठायीं, धर्मरक्षी ऐसा नाहीं; महाराष्ट्र धर्म उरला कांहीं, तुम्हाकारणें. कितेक धर्मकृत्यें होती, संतमहंत वागती, धन्य धन्य तुमची स्थिति, विश्वीं विस्तारिली. दुष्ट दुर्मद संहारिले, बहुतेकांसी धाक सुटले, तुमच्या आश्रया लागले, जीवनोपायीं. धर्मस्थापनेची स्थिति, संभाळिली पाहिजे. राजा मंत्री एकविचार, तरी पावाल पैल पार, अमर्यादा होतां बाजार, कार्य नासे. मनुष्य राजी राखावे, व्यवधान ठेवावें, सर्व शोधूनि पाहवें, बरें वाईट. न्याय नीति असावी, लालुची पोटीं नसावी, खरीं खोटीं लक्षावीं निर्भीडपणें. आमचें बोलणें स्पष्ट, म्हणोनि न व्हावें कोपिष्ट, उचित प्रकारें ऐकावें नीट. सांगितलें कांहीं. मनापासून चालणें वागणें असेल, तरी आमचा मार्ग स्वीकारावा, राम कृपा करील, तुमचीं कार्यें होतील, मनेच्छा सिद्धीस जाईल, येविशीं मनांत मळ बाळगूं नका.' अशा पर्यायांनीं बोलून महाराजांपासून 'आपण सांगाल त्याप्रमाणें चालेन, अन्यथा वर्तणार नाहीं,' असें कित्येक खात्री करून बोलले. स्वामी संतोष झाले.' रामदासस्वामीबद्दल शिवाजीची अत्यंत पूज्यबुद्धि असूनही राज्याच्या प्रत्यक्ष व्यवहारांत स्वामींचें अंग नव्हतें, हें रा. राजवाड्यांच्या खालील उद्गारांवरून उघट आहे.

'गुरूपेक्षां शिष्य सवाई असावा लागतो, व तसे महाराज होते, म्हणूनच समर्थांच्या मनांत ज्या ज्या गोष्टी घडवून आणावयाच्या होत्या त्या त्या घडून आल्या. समर्थ हे ध्येयाची ओळख करून देणारे होते. राजकीय, सामाजिक, नैतिक वगैरे बाबींचा विचार करून ध्येयाच्या प्राप्तीकरितां इष्ट ती दिशा दाखवून देणारे समर्थ होते. स्वतः तलवार हातांत घेऊन किंवा कायदे करून लोकांचें धुरीणत्व समर्थांनीं स्वीकारिलें नाहीं. युक्ति, बुद्धि, शक्ति यांचा योग्य उपयोग कसा करावा एवढेंच फक्त समर्थांनीं शिकविलें. शिवाजीमहाराज व त्यांच्याजवळचे पिंगळे वगैरे कारभारी कर्ते मुत्सद्दी असल्यामुळें, कोणत्या मोहिमी कराव्या, किंवा कोश किती तयार ठेवावा, वगैरे गोष्टी ते कोणाला विचारीत बसले नाहींत.' (शिवजयंती व्याख्यान, १९१५).

शिवाजीच्या पश्चात् जवळ जवळ दोन वर्षांनीं रामदासाचें निधन झालें. संभाजीच्या राज्यारोहणाची गडबड व त्याच्या रागीट स्वभावाचा परिणाम यांची वार्ता स्वामीस कळून त्यानें संभाजीस एक उपदेशपर पत्र लिहिलें, तें

प्रसिद्ध असून त्यांत शिवाजीची आठवण ठेवा, असा उपदेश वारंवार केलेला आहे. सचिव, चिटणीस इत्यादिकांचे वध रामदासाच्या मृत्यूनंतर झाले असावे. संभाजीच्या राजकारणांत रामदासानें प्रत्यक्ष हात घातला नाहीं, हें रामदासाच्या वृत्तीस व बाण्यास सर्वथैव अनुरूपच होतें.

महाबळेश्वरचा राहणारा दिवाकर भट्ट म्हणून एक विद्वान्, निस्पृह व कर्तव्यदक्ष गृहस्थ होता, त्याजकडे रामदासानें संस्थानाचा सर्व कारभार व पारिपत्याधिकार सोंपविला होता. हा गृहस्थ रामदासाचा प्रत्यक्ष उपाध्या नव्हता. परंतु तो धोरणी, राजकारणकुशल व निष्ठावंत असल्यामुळें, राजद्वारीं जाऊन अनेक कामें तडीस नेण्यास रामदासानें दिवाकर गोसावी याचीच योजना केली होती. दिवाकरानें संभाजीच्या व राजारामाच्या वेळेस संस्थानाचा कारभार मोठ्या दक्षतेनें करून रामदासी मठाची कीर्ति बरीच कायम राखिली. तथापि रामदासाचें तेज मठांतून नाहींसें होतांच त्यांचें राष्ट्रीय स्वरूप सर्वस्वी लोपलें आणि उत्पन्नें सांभाळण्याकडे मठांचें लक्ष लागलें. कांहीं दिवस उद्धव, गोसावी व भानजी यांजशीं दिवाकर भट्टाचा मठाच्या अधिकारासंबंधानें तंटा चालला. अखेरीस दिवाकर भट्टाचे हयातींतच रामदासाच्या वडील बंधूचा नातू गंगाधर स्वामी यास जांबेहून चाफळास आणण्यांत आलें, तेव्हांपासून त्यांच्या वंशाकडे रामदासी मठाचा अधिकार चालत आहे. दिवाकर भट्ट स. १७११ चे सुमारें वारला.

१०. **शिवाजीच्या लुटीचा अर्थ.**—शिवाजी लुटारू होता, या आरोपावर त्याची योग्यता परकीयांनीं बरीच कमी केली आहे. मराठ्यांच्या लुटारूपणाचा विचार अन्यत्र करावयाचा आहे. प्रस्तुत 'शिवाजी लुटारू होता,' या विधानाचा अर्थ समजून घेतला पाहिजे. 'लुटारू' ह्या शब्दाचे दोन अगदीं भिन्न अर्थ आहेत. एक लोक बेसावध असतां त्यांच्यावर अचानक जाऊन घाला घालणें, बायकापोरांस मारहाण करून त्यांस लुबाडणें, जाळपोळ व उच्छेद करून स्वतःची तुंबडी भरणें; दुसरा, एकंदर राष्ट्राच्या कल्याणाप्रीत्यर्थ राज्यसंस्थापनेच्या कामास लागणारा खर्च भरून काढण्यासाठीं राजरोसपणें मुलखांत फिरून, प्रत्येकाच्या ऐपतीप्रमाणें लोकांवर एक प्रकारचा कर बसविणें व सौम्योपचारांनीं तो वसूल करणें. ही एक प्रकारची राज्यसंस्थापनेची झोळीच होय. ही झोळी शिवाजी स्वराज्यांत चहूंकडे फिरवीत होता. ह्या झोळींत प्रत्येकानें

भिक्षा घालणें अवश्य होतें. झोळी विन्मुख परत पाठविणारास शिवाजीचा धाक वाटे. लूट शब्दाचा दुसरा अर्थ हल्लीं प्रचारांत नाहीं; तरी पण शिवाजी-च्या झोळीस हा शब्द लावण्याचा आग्रहच असेल, तर तो ह्या अर्थानेंच लावतां येईल. पैसा घेणें हें पर्यवसान दोनही प्रकारांत आहे, फरक काय तो घेण्याच्या पद्धतींत आहे. यशवंतराव होळकर, हैदर पेंढारी वगैरे मंडळी पहिल्या कोटींत येतील. खाफीखान म्हणतो, ' शिवाजी पुष्कळ संपत्ति लुटून आणी; परंतु त्याचा असा नियम होता कीं, मशिदीला व कुराणाला हात लावूं नये, किंवा कोणा बायकापुरुषांची अब्रू घेऊं नये. कुराणाचें पुस्तक लुटींत त्याचे हातीं आल्यास तें तो मोठ्या सन्मानानें आपल्या हाताखालील मुसलमानांस देऊन टाकी. लुटीकरितां कोणीहो इसम पकडलेला असल्यास, मग तो हिंदु असो वा मुसलमान असो, त्याची यथायोग्य काळजी घेण्यांत येऊन, त्यास कोणताही त्रास देण्यांत येत नसे. लुटी-संबंधाचे त्याचे नियम असे सक्त होते कीं, कोणतीही लूट लोकांनीं पैदा करून आणिली तर ती सरकारांत भरावी लागे. ' एखाद्या शहरीं गेल्यावर तेथील धनसंपन्न लोकांजवळून ज्याच्या त्याच्या लायकी-प्रमाणें तो रकमा मागे व वसूल करी. हा स्वराज्याप्रीत्यर्थ एक प्रकारचा कर होता. पण राज्यस्थापन झालें नव्हतें, तोंपर्यंत त्या करास न्यायाचें स्वरूप आलें नव्हतें. राज्यस्थापन झाल्यावर असले कर बंद करून शिवाजीनें दुसरे कर बसविले, आणि लुटीचा मार्ग बंद केला, हें त्याच्या उत्तरचरित्रावरून दिसून येतें. कोणाही राज्यसंस्थापकास असले प्रसंग आल्याशिवाय राहत नाहींत. राज्यस्थापन करितांना युद्ध करावें लागतें, युद्धास खर्च लागतो, व अर्थात् तो खर्च कोणत्या तरी रूपानें लोकांवरच बसतो. मग त्या रूपास झोळी लूट, कर, दंड, शिक्षा म्हणून लोकांवर बसविलेला खर्च, अगर दुसरें वाटेल तें नांव द्या. सीझर व शिकंदर यांनीं जिंकलेल्या देशांतून अपार संपत्ति स्वदेशास आणिली हें महशूर आहेच. दरोडेखोर व लुटारू हे शब्द शिवाजीस मूळ मुसलमान तवारीखकारांनीं लाविले, आणि इंग्रज ग्रंथकारांनीं त्या शब्दांचा केवळ वाच्यार्थ तेवढा घेतला. वास्तविक मुसलमानांच्या ताब्यांतून शिवाजीनें स्वदेश निर्मुक्त केला, तेव्हां मुसलमान लोकांनीं त्यास बंडखोर दरोडेखोर, लुटारू इत्यादि अपशब्द लाविले ह्यांत नवल नाहीं. शिवाजीचें राज्य व्यवस्थि-

तपणें स्थापिलें जाईपर्यंत त्यास बंडखोर हीच संज्ञा मिळणें रास्त; व राज्यक्रांति होतांना केव्हांही असाच प्रकार व्हावयाचा.

शिवाजीच्या लुटीसंबंधानें दुसरा एक महत्त्वाचा मुद्दा सामान्यतः कोणी ध्यानांत ठेवीत नाहींत. शिवाजी लूट करी, ती नेहमीं शत्रूच्या मुलखांत युद्ध चालू असतांना करी. सुरत, हुबळी, जालना, जुन्नर इत्यादि शहरांची लूट मोगल व विजापुरकर यांजबरोबर युद्ध चालू असतां शिवाजीनें केलेली आहे. त्यांतही शत्रूच्या मुलखांतील शेतकरी पेशाचीं गांवें लुटून शिवाजीनें सामान्य रयतेस त्रास दिलेला नाहीं. शत्रूचीं धनाढ्य शहरें, तेथील पैसेवाले सावकार, शत्रूचे ठिकठिकाणचे खजिने व लष्करास लागणारा पैसा व सामान हीं लुटून किंवा पाडाव करून आणलेलीं आहेत. स्वराज्यांत शिवाजीनें कधींही लूट केलेली नाहीं. एवढेंच नव्हे तर स्वराज्यांत शत्रूंनीं लूट केली असतां ती भरून देण्यास तो जबाबदार असे. युद्ध चालू असतां शत्रूच्या मुलखाची लूट करणें पाश्चात्य राजनीतीलाही मान्य आहे. शत्रूला कमजोर करण्याचें तें एक साधन आहे. पेंढारी किंवा हैदरअली यांप्रमाणें शिवाजी दरोडेखोर नव्हता. दरोडेखोर व राज्यसंस्थापक यांचे हेतु भिन्न असतात; पहिल्याचा नीच व दुसऱ्याचा उदात्त असतो. लूट करितांना स्त्रियांस स्पर्श करावयाचा नाहीं, लहान मुलास, म्हाताऱ्यांस किंवा शरण आलेल्यांस मारावयाचें नाहीं, कोणासही निष्कारण दुखापत करावयाची नाहीं; देवस्थानें, साधुसंत, फकीर वगैरे लोकांस लुटावयाचें नाहीं, हे हल्लींचे नियम शिवाजीनेंही तंतोतंत पाळिले. लुटींत गाई पकडीत नसत. बैल घेणें असतील तर ओझ्यांस हवे असतील तेवढेच घेत. शेतकऱ्यांस कधींही लुटीत नसत. लुटीचे नियम शिवाजी मोठ्या सक्तीनें अमलांत आणीत असे. शहरांत किंवा सावकाराजवळ कोठें किती पैसा आहे, याची इत्थंभूत बातमी हेरांकडून शिवाजीस व त्याच्या सेनापतींस आगाऊ कळत असे. त्याप्रमाणें शहराबाहेर येऊन मराठी फौजेचा तळ पडे. त्या ठिकाणीं शहरांतील मोठमोठे सावकार व महाजन बोलावून आणीत. नंतर शहराच्या ऐपतीची वाटाघाट होऊन, अमुक एक रक्कम सर्वांनीं मिळून द्यावी, अशी त्यांजकडे मागणी करीत. त्याप्रमाणें पैसा पोंचला, तर लगेच मराठी लष्कर दुसरीकडे निघून जाई. ठरल्याप्रमाणें पैसा न पोंचला तर मोठमोठ्या सावकारांस व प्रमुख मंडळींस पकडून ठेवीत. कित्येक सावकार मोठे बिलंदर असून आपल्या

संपत्तीचा थांग लागूं देत नसत. अशा लोकांना कित्येक प्रसंगीं दुस्सह जाच सोसावा लागे. मुलुखगिरी करून आल्याबरोबर लुटीची संपूर्ण यादी तयार करून, सरनोबत सगळी लूट घेऊन राजदर्शनास येई. तेथें लुटीचा सगळा हिशेब देऊन त्यास ती सरकारांत जमा करावी लागे. त्या प्रसंगीं चांगल्या कामगिरीबद्दल सरनोबतानें व्यक्तिशः शिफारस करावी म्हणजे सरकारांतून त्या लोकांस बक्षिसें देण्यांत येत. कामगिरीवर जातांना प्रत्येकाचा झाडा घेऊन त्याजवळील सामानाची यादी करून ठेवण्यांत येई; आणि मुलुखगिरींतून परत आल्यावर त्या यादीबरहुकूम पुनः सर्वांचा झाडा घेण्यांत येऊन फाजील सामान किंवा दागदागिना सांपडल्यास तो सरकारजमा करण्यांत येई. कामगिरीवर कोणी मेल्यास किंवा जखमा वगैरे लागून घायाळ झाल्यास त्याजला सरकारांतून वेतन करून देण्यांत येत असे. लुटीचा हा प्रकार तरी शिवाजीनें राज्य स्थापन होण्याच्या अगोदर केला. एकदां व्यवस्थित रीतीनें राज्य स्थापन झाल्यावर त्यानें लूट करण्याचें सोडून दिलें; आणि पर मुलखांतून चौथाई व सरदेशमुखी हे हक्क वसूल करण्याचा प्रघात घातला. हे हक्क वसूल करून लोकांस पावत्या देण्यांत येत, म्हणजे दुसऱ्या कोणीं लुटलें असतां, त्यांचें नुकसान भरून देण्याची जबाबदारी शिवाजीनें आपणावर घेतली होती. सारांश, शिवाजीच्या लुटीचा बंदोबस्त इतका कडक होता कीं, त्यावरून त्यास दोष देण्यास जागा राहत नाहीं.

संभाजी गादीवर बसला तेव्हां सरकारच्या तमाम कोठरांतून एकंदर ऐवज, जवाहीर, कापड व सामान काय शिल्लक आहे, त्याची यादी त्यानें स्वतःच्या देखरेखीखालीं मुद्दाम तयार करविली. इंडिया ऑफिस लायब्ररींतील एका हस्तलिखित प्रतींत ही याद सांपडली; ती मॉडर्न् रिव्ह्यूच्या जानेवारी १९१० चे अंकांत छापलेली आहे. ती सर्व यादी येथें देण्याचें प्रयोजन नाहीं. शिवाजीनें दरएक किल्ल्यावर खजिना व सामान संपूर्ण भरून ठेविलेलें होतें, त्या सर्वांचा समावेश ह्या यादींत झाला आहे असें दिसत नाहीं. मुख्य खजिन्यांत रोकड शिल्लक पांच लाख होन व ठिकठिकाणच्या किल्ल्यांवरील शिल्लक तीस लाख होन मिळून एकंदर रोख शिल्लक एक कोटि रुपयांहून ज्यास्त या यादींत नाहीं. शिवाजीपाशीं एक कोटीहून ज्यास्त रोकड शिल्लक असावी असा तर्क

होतो. कदाचित् त्याला खर्चेही भारी करावे लागल्यामुळें शिल्लक फारशी राहिली नसेल. त्याशिवाय जवाहीर म्हणून वेगळें होतें त्याची यादी आहे, त्यांत हिरे, माणकें, मोतीं वगैरे अनेक जिनसांचीं व दागिन्यांचीं नांवें आहेत. पण नुसत्या नांवांवरून त्यांची किंमत करितां येत नाहीं. तांबें, लोखंड, शिसें वगैरे धातू व तरवारी, चिलखतें वगैरे हत्यारें यादींत आहेत. बंदुकीची दारू दोन लाख खंडी आहे, पण बंदुका किंवा तोफा दाखविलेल्या नाहींत. कापडी भांडारांत निरनिराळ्या जातींचा उंची व हलका कपडा व नानातऱ्हेचे लिहिण्याचे कागद यांची यादी आहे. सुगंधी तेलें, अरगजा, औषधिवस्तू, तसेंच केशर, जायफळ, खारीक, खजूर, बदाम इत्यादि सामान दहा पांच खंडींच्या मापानें दाखविलेलें आहे. धान्याचे कोठारांत सर्व प्रकारचें धान्य मुबलक दिलेलें आहे. ओंवा, मध हिंगूळ, अभ्रक, हरताल अशा प्रकारचे अनेक जिन्नस दाखल असून सामान्यतः संसारांत उपयोगीं पडणारी कोणतीही जिन्नस नाहीं अशी नाहीं. कापूस सात हजार खंडी, छत्र्या बारा हजार, पालख्या तीन हजार, निरनिराळ्या जातींचे घोडे तीस हजार दाखल आहेत. घोड्यांची गाडी शिवाजीपाशीं होती असें दिसत नाहीं. हत्ती पांचशें, उंट तीन हजार, गाईबैल सहा हजार, अशीं आणखी कित्येक जनावरें दाखल आहेत. गुलाम या संज्ञेखालीं एक हजार पुरुष व सहाशें स्त्रिया दाखल आहेत, ही गोष्ट ध्यानांत ठेवण्यासारखी आहे. अडीचशें वर्षांपूर्वी हिंदुस्थानांतील एका सामान्य गृहस्थानें आपल्या राष्ट्राचें स्वतंत्र राज्य स्थापन करितांना एकंदर कमाई किती केली हें समजण्यास त्याच्या पुत्रानें केलेली ही याद उपयोगीं पडेल. हा फारशी ग्रंथकार फक्त ऐहिक संपत्तीची यादी देतो, परंतु शिवाजीची अत्यंत मौल्यवान् कमाई ग्रांटडफनें दाखविली आहे, ती अशी.—'शिवाजीनें जिंकिलेला प्रदेश व मिळविलेली संपत्ति मुसलमानांना इतकी जाचक झाली नाहीं. परंतु त्यानें राज्याची व्यवस्था बांधून आपल्या लोकांना जो कित्ता घालून दिला आणि मराठे लोकांचे ठिकाणीं जो नवीन हुरूप त्यानें उत्पन्न केला, तोच मुसलमानांस खरोखर जाचक झाला.'

११. जहागिरींविषयीं शिवाजीचा कटाक्ष.—युरोपांत पूर्वी असा एक काळ होता कीं, देशांतील सर्व जमिनी मोठमोठ्या लोकांस वांटून दिलेल्या असत. त्याचे मोबदला त्यांनीं आपणांपाशीं लढाऊ लोक ठेवून

राजाला जरूर लागेल तेव्हां प्रत्येक जमीनदारानें आपाआपल्या लोकांस घेऊन लढाईस जावें, असा करार असे. या पद्धतीच्या योगानें जमीनदार लोक बलाढ्य व डोईजड झाले; आणि त्यांनीं किल्ले वगैरे बांधून मजबुदी केली. ही जहागिरीची पद्धत मोडून टाकण्यासाठीं युरोपीय राजांचे फार वर्षे प्रयत्न चालू होते. या पद्धतीस ' फ्यूडल सिस्टिम् ' असें म्हणत. तशाच स्वरूपाची पद्धत कांहीं अंशानें पूर्वी हिंदुस्थानांत चालू होती. मोगल बादशाहींत पांच हजारी, दहा हजारी असे मनसबदार असत; आणि त्यांच्या खर्चासाठीं मोठमोठ्या जहागिरी तोडून दिलेल्या होत्या. हाताखालीं फौज ठेवण्याची आयतीच सोय झाल्यामुळें हे लोक बंडावे करीत आणि दूर दूरच्या प्रांतांतील अमलदार बादशहास पुष्कळदां मुळींच मोजीत नसत. मोगल शहाजादे अशा स्वतंत्र सत्तेच्या जोरावर बादशहांविरुद्ध उठत. शिवाजीला हा जहागिरींचा प्रकार आरंभापासूनच ठाऊक होता. तो स्वत: अशा जहागीरदाराचा मुलगा असून जहागिरीच्याच जोरावर त्याच्या बापानें सर्व उद्योग केले होते. विजापुरकरांचे व मोगलांचे जहागीरदार कसे बंडखोर बनत हें लहानपणापासून त्यानें पाहिलें होतें. मोरे वगैरे कित्येक जहागीरदारांचा पाडाव त्यानेंच केला होता. किल्ल्यांच्या आश्रयानें हे जहागीरदार सहज बंडें करीत. मावळे देशमुखही अशाच प्रकारचे बंडखोर जहागीरदार होते. जमीनमहसूल, लष्कर व किल्ले यांचा संबंध या जहागिरीच्या पद्धतीशीं निकट येतो. राज्याचे उगम व संरक्षणाचे मार्ग शिवाजीनें लहानपणापासून बारकाईनें तपासलेले होते. तेव्हां आरंभींच त्याची अशी खात्री झाली कीं, राज्य जर सुरळीत चालवावयाचें असेल तर कोणासही जमीन तोडून देणें अत्यंत अपायकारक आहे. हा आपला अनुभव त्यानें आपल्या सर्व राज्यव्यवस्थेंत अमलांत आणिला. कोणासही जमीन म्हणून त्यानें तोडून दिली नाहीं. ज्यांना जमिनी तोडून दिलेल्या होत्या त्या त्यानें खालसा केल्या. दरएक इसमाला नोकरीचे मानानें रोख पगार ठरवून दिले; आणि ते त्यांस वेळच्या वेळीं पोंचण्याची तजवीज ठेविली. ब्राह्मणांचे अग्रहारसुद्धां त्यानें बंद केले. ब्राह्मण हे धर्मगुरु असून, त्यांनीं राजाचें अभीष्ट चिंतन करून राहवें, यासाठीं त्यांच्या योगक्षेमास कांहीं गांव किंवा उत्पन्नें तोडून देण्याची वहिवाट पूर्वापार होती. त्यांस अग्रहार असें म्हणत. हीं उत्पन्नें बंद करणें म्हणजे एक प्रकारें धर्माच्या बाबतींत

हात घालण्यासारखेंच होतें. गोब्राह्मणप्रतिपालक असें शिवाजीचें ब्रीद होतें. त्यावरून उत्पन्नें तोडून न देण्याविषयीं शिवाजीचा केवढा कटाक्ष होता हें दिसून येईल. शिवाजीच्या राज्यांत पूर्वीच्या जहागीरदारांनीं मजबूद वाडे, हुडे, कोट, किल्ले वगैरे बांधलेले होते, ते शिवाजीनें पाडून टाकिले. तसेंच पाटील, कुळकर्णी, देशपांडे वगैरे लोकांना नगदी नेमणुका बांधून दिल्या. शिवाजीच्या हाताखालीं इतके लोक तयार होऊन प्रसिद्धीस आले, परंतु त्यांपैकीं एकाचीही जहागीर वगैरे आज आपणांस पाहवयास सांपडत नाहीं, हें ध्यानांत ठेवण्याजोगें आहे.

हा जो प्रघात शिवाजीनें घातला, तो वास्तविक फार शहाणपणाचा होता. अपरिहार्य कारणांमुळें तो प्रघात राजारामाचे वेळेस मोडला गेला, तथापि पुनः राज्याची स्थिरस्थावर होतांच शिवाजीची पद्धति पुनः स्वीकारली पाहिजे होती. रा. राजवाडे या बाबतींत शिवाजीस दोष देऊन म्हणतात:–' अलीकडे सांपडलेल्या कागदपत्रांवरून महाराजांच्या कारकिर्दीतील पुष्कळ गोष्टी कळण्यास मार्ग झाला आहे. स्वराज्य–संस्थापनेच्या कामांत महाराजांनीं स्वीकारलेलीं कोणतीं धोरणें यशस्वी झालीं; व कोणतीं राज्यास अपायकारक झालीं, याचीहि या कागदपत्रांवरून चांगली समजूत पटते. धार्मिक, सामाजिक, राजकीय बाबतींत महाराजांनीं स्वीकारलेलीं कांहीं धोरणें यशस्वी झालीं आहेत; पण राज्यास बळकटी यावी या हेतूनें वतनदारांचीं वतनें बंद करण्याचें महाराजांचें धोरण मराठी राज्याला जाचक झालें. या वतनदारांपैकीं कुळकर्णी लोकांच्या वतनाला महाराजांनीं धक्का लावला नाहीं; पण पाटील–देशपांडेपणाचीं व अग्रहारांचीं वतनें महाराजांनीं खालसा केलीं. यादव, राष्ट्रकूट किंवा मोगल–कोणीही राजे असोत, त्यांचें अभीष्ट चिंतन करून राहवयाचें एवढेंच हे अग्रहार घेऊन उदरनिर्वाह करणाऱ्या ब्राह्मणांचें काम असे. स्वकीय असो वा परकीय असो, कोणाचेही अभीष्ट चिंतन करून पोट भरणाऱ्या ब्राह्मणांचे अग्रहार बंद करण्याची सल्ला महाराजांच्या मुत्सद्यांनीं त्यांस दिली. कऱ्हाडाजवळ असलेल्या सैदापूर गांवांतील अशाच एका ब्राह्मणाचा अग्रहार काढून घेतला, व पोट भरण्याची पंचाईत पडूं लागली तेव्हां बसंतगडच्या किल्लेदाराकडून वर्षाचे तांदूळ मागून घेऊन जावें, अशी महाराजांनीं त्यास सनद दिली, ती

सांपडली आहे. तीवरून व अशाच प्रकारच्या दुसऱ्या अनेक सनदांवरून ही गोष्ट सिद्ध झाली आहे. महाराज गोब्राह्मणप्रतिपालक खरे. तथापि ज्या ब्राह्मणांना आपल्या पोटापुढें दुसरें कांहीं दिसत नसे, ते पोटाकरितां महाराजांना सोडून मुसलमानांना जाऊन मिळत. अग्रहार काढून घेतल्यामुळें उघडे पडलेले भाऊ भाऊ असले तर त्यांपैकीं एक महाराजांकडे व एक मुसलमानांकडे जाऊन दोघांपैकीं कोणालाही प्रसन्न करून आपलें वतन कायम ठेवण्याची खटपट करीत. महाराजांच्या पश्चात् गादीवर कर्तृत्ववान् पुरुष न आल्यामुळें या धोरणाचे वाईट परिणाम दिसूं लागून, मराठी राज्याच्या प्रगतीस जबरदस्त अडथला आला. संभाजी बेहोष, अत्यंत क्रूरकर्मा, औरंगजेब दक्षिणेंत आलेला, व देशांतील स्वाभिमानशून्य पोटभरू वतनदार शत्रुपक्षास मिळण्यास तयार असलेले, अशा बिकट परिस्थितींत मराठी राज्याचा हा गाडा मोडावयाचाच प्रसंग आला होता; पण औरंगजेब जातीचा कडवा व धर्मवेडा असल्यामुळें त्याच्या या वृत्तीचा मराठ्यांस एका प्रकारें फायदाच झाला. मराठी राज्यावर आलेल्या या संकटाचे वेळीं शिवाजी महाराजांच्या वेळीं काढून घेतलेलीं वतनें परत देण्यांत आलीं, आणि संताजी व धनाजीसारख्या स्वामिभक्त वीरांनीं औरंगजेबाचें दक्षिणेंत कांहीं चालूं न दिल्यामुळें, या वतनदारांनाही राजाराम महाराजांच्याकडूनच सनदा घेणें फायदेशीर वाटलें; व तेवढ्याकरितां पुष्कळ लोक चंदीस राजाराम महाराजांकडे गेले. अशाप्रकारें ही चूक सुधारली गेली, असें त्या वेळच्या कागदपत्रांवरून कळून येण्यासारखें आहे. आतां शिवाजीसारखाच कर्तबगार पुरुष आणखी बरींच वर्षें जगला असता तर, त्यानें या पोटभरू लोकांचा समूळ उच्छेद केला असता कीं नाहीं, अगर या समाजास न दुखवितां, हळू हळू क्रमाक्रमानें त्यांचीं वतनें त्यास काढून घेतां आलीं असतीं कीं नाहीं, हा प्रश्न अलाहिदा आहे. परंतु जी घडून आलेली स्थिति कागदपत्रांवरून दिसून येते ती अशी आहे. हे वतनदार स्वार्थसाधु होते हें कबूल आहे; पण त्या समाजाच्या संघशक्तीपुढें शिवाजीस अगर त्याच्या वंशजांस नमावें लागलें. अशा रीतीनें शिवाजीच्या राज्यधोरणापेक्षांही ही समाजशक्ति प्रबळ ठरली.' [केसरी. २९–६–१५]. शिवाजीस ही सल्ला दुसऱ्या कोणीं दिलेली नाहीं. तो प्रकार त्यानेंच स्वतः अनुभवानें ठरविला. या

प्रश्नाचें विवेचन पुन: प्रसंगोपात्त येणार आहे. शिवाजीची पद्धत सुटली म्हणूनच मराठशाहीची बळकटी नाहींशी झाली, हा प्रकार केव्हांही उघड दिसणारा आहे.

वतनांच्या घालमेली मराठशाहींत अतोनात झाल्या. रा० राजवाडे यांच्या पंधराव्या खंडांत सहा घराण्यांचे कागद छापले असून, त्यांतल्या तीन हकीकती धार्मिक बाबतींच्या ब्राह्मण घराण्यांच्या आहेत:— निंबच्या सदानंद मठाची, सातारच्या राजोपाध्यांची, व चाकणचे जोशी ब्रह्मे यांची. मठांस, ब्राह्मणांस व त्यांच्या देवळांस निरनिराळ्या वेळीं इनामें व उत्पन्नें करून देण्यांत आलीं, त्या संबंधाचे बहुतेक कागद आहेत. दक्षिणेंत पूर्वी मुसलमानांचा अंमल असतांच हीं उत्पन्नें मिळालेलीं होतीं. मुसलमान राज्यकर्त्यांनीं हिंदुदेवतांचीं व जमीनदारांचीं वगैरे उत्पन्नें बंद केलीं नाहींत. लोकांस संतुष्ट ठेवल्याशिवाय राज्य निर्भय होत नसल्यामुळें, मुसलमानांनीं लोकांचीं असलेलीं उत्पन्नें पुढें चालविलीं व नवीनही पुष्कळ करून दिलीं. उत्तर हिंदुस्थानांत मोगल बादशाहीबद्दल सर्व लोकांचे मनांत जसा पूज्यभाव उत्पन्न झाला होता, तसाच बहामनी राज्यासंबंधानें महाराष्ट्रांतही झाला होता. हा भाव इतका दृढ झाला होता कीं, शिवाजीनें व पेशव्यांनीं राज्य स्थापिलें ही गोष्ट कोंकणासारख्या दूरदूरच्या कोनाकोपऱ्यांत लोकांस खरी न वाटून, ते आपणांस मुसलमानांची प्रजा समजत, आणि वतनासंबंधानें तक्रार करणें झाल्यास आपलीं वतनें पूर्वापार मुसलमान अंमलापासून चाललीं आहेत असा पुरावा करण्यांत भूषण मानीत. लोकांच्या मनावरील मुसलमानांचा हा धाक शिवाजीला मोडून काढावयाचा होता, आणि वतनी जमीन तोडून देण्याची पद्धत त्यास सर्वस्वी नापसंत होती. ह्या कारणांस्तव मुसलमानी अमदानींतील वतनें शिवाजीनें पुढें चालू ठेविलीं नाहींत. शिवाजीच्या मृत्यूनंतर देशांत धामधूम उडाली आणि नवीन नवीन अंमलदार पुढें येऊं लागले, त्या सर्वांस खुष ठेवून आपलीं वतनें राखण्यांत लोकांची मोठी त्रेधा उडत असे. प्रसंग पडेल तशी तक्रार व पुरावा करून ते आपला बचाव करीत. आज विजापुरचा अंमल तर उद्यां शिवाजीचा, आज संभाजीचा, तर उद्यां प्रतिनिधींचा, आज सचिवांचा तर उद्यां आंगऱ्यांचा, प्रत्येकाचे व्यवस्थेंत व कारभारात थोडाबहुत फरक हा असेच. आणि प्रत्येक नवीन अंमलदार पाठीमागच्यास थोडासा दोषी ठरवून,

कांहीं अंतस्थ हेतु साधण्याकरितां, आपलाच हेका चालवी. अशा स्थितींत लोकांस मोठी पंचाईत पडे. कित्येक प्रसंगीं भलत्यालाच वसूल दिल्याबद्दल अगर भलत्याचेच हुकूम मानल्याबद्दल लोकांस मुख्य सरकारांतून ठपके येत. कोणत्याही एका विशिष्ट घराण्याचे संपूर्ण कागदपत्र तपासून पाहिले म्हणजे लोकांची त्रेधा कशी उडे हें चांगलें दिसून येतें.

त्यांतल्या त्यांत ब्राह्मणांचीं, देवस्थानांचीं किंवा मठांचीं उत्पन्नें बहुधा अविच्छिन्न चालत. तीं काढून घेण्याचें धैर्य सहसा कोणास होत नसे. ह्या एकाच पुस्तकांत रोहिडखोऱ्यांतील गुप्ते व जेधे देशमुख, तसेंच मसूरचे जगदाळे यांच्या वतनाबद्दल भानगडी चालल्या. आपलीं वतनें गेलेलीं पाहून ते जो कंठरव करीत तो हृदयद्रावक आहे. मात्र तसा प्रकार मठांचा वगैरे होत नसे. निंबच्या मठाधिपतींनीं तर सर्वांसच खूष ठेवून आणि सर्व अंमलदारांची प्रीति आर्जवानें संपादून, आपलीं उत्पन्नें वाढवून घेण्यांत अगदीं कमाल केलेली दिसते. मठाचेंच काम व देवकार्य म्हणून हें साधलें. देशपांड्यांना हा प्रकार साध्य नव्हता. मठाधिपतींबद्दल लोकांच्या मनांत अत्यंत पूज्यबुद्धि वसत होती. त्यांस दुखविणें म्हणजे भयंकर पाप असें मोठमोठ्यांस वाटे. स. १६९७ त राजारामानें रामचंद्रपंत अमात्यास खालील पत्र लिहिलेलें आहे. 'भवानगीर गोसावी हे बहुत थोर अनुष्ठानी, यांच्या मठीं अतीत अभ्यागतास अन्नउदक पडतें, धर्म होतो. म्हणून स्वामींनीं धर्मार्थ मौजे इरमडे, पेटा वाई, हा गांव मठास इनाम दिला. तो त्यांच्या स्वाधीन झाला. त्यांनीं रयतेस कौलबाब देऊन गांवचा वसूल उत्पन्न केला. त्यास परशुराम त्र्यंबक यांनीं उपद्रव करून वतनदारांचा ऐवज दोनशें रुपये पावेतों घतला. हें वर्तमान गोसाव्यांस कळून गोसावी बहुत दिलगीर झाले, आणि स्वामींस विदित केलें. तरी तो गांव गोसावी यास कुलबाब इनाम दिला असतां वतनें घ्यावयास गरज काय ? हे गोसावी महंत लोक, यांचें सर्व प्रकारें समाधान रक्षिल्यानें राज्यास कल्याण आहे, ऐसें जाणून स्वामींनीं, देशमुखी, सरदेशमुखी, सरदेश कुलकर्ण, व बाजे वतनें कुल मना केलें आहे. तरी तुम्ही सदरहू वतनदारांस ताकीद करून मौजे इरमडें गांवास कोणाचा उपद्रव लागों न देणें. परशुरामपंतीं जो वसूल वतन्यांचा घेतला असेल तो परतोन देवविणें. येविशीं अनमान न करणें. मागती याचा बोभाटा नये. इनामाचा

गांव गोसावी सुरक्षित अनुभवून राहेत तें करणें. जाणिजे'. त्याच वेळेस असेंच पत्र शंकराजी नारायण सचिवासही लिहिलेलें आहे. हा सदानंद मठ मोठा मातबर होता. मठाधिपती मोठे धोरणी, वेळ पडेल तसे वागणारे होते. अन्नछत्रें, ब्राह्मणभोजनें वगैरे त्यांनीं चालविलीं. त्यांच्या उद्योगाचा राष्ट्रकार्यास काय व किती उपयोग झाला ह्याजबद्दल पुष्कळ मतभेद होईल. ह्या मठाचे कागद स. १५४० पासूनचे छापले असून त्यांस मुसलमान शाहीपासून अनेक सरकारी व खासगी व्यक्तींनीं, छत्रपति, प्रतिनिधि, सखाराम बापू बोकील वगैरे अनेकांनीं इनाम व उत्पन्नें करून दिलीं. आज चारशें वर्षें हा मठ अविच्छिन्न चालला आहे. त्यापूर्वी किती दिवस होता तें कळत नाहीं. तसेंच खं. १५ ले. ३ याच्या अखेरीस जगदाळे लिहितो, 'पैके नाहींत. पैके असते तरी अवघेंच बरें होतें. गनीम असतां कऱ्हाडमध्यें देशमुखी करीत आहेत. त्यांजपाशीं पैके आहेत, व जें लागेल तें धनाजी जाधव पुरावा करीत आहे. ऐसा अंधेर कारभार पादशाहीमध्यें, कोणी मनास आणीत नाहींत. पैके पावले म्हणजे एकाचें वतन एकास देतील. आतां माझी देशमुखी घेऊन धनाजीस देणार आहेत. कऱ्हाडचा देशपांडे यास धनाजी जाधवानें पंधरा हजार रुपये देऊन मजशीं भांडावयास लाविला आहे. माझी कोणी दाही देईल तरी इतकें खरें करून देईन.' रा. राजवाडे म्हणतात, यादवच मूळचे वतनदार खरे; त्यांस पुढें आणण्याचा योग्य प्रयत्न धनाजीनें केला, त्याबद्दल त्यास दोष देणें योग्य नाहीं. अशा वतनांच्या घालमेली फार झाल्या आहेत; व खरें खोटें ठरविणें कठिण आहे.

सातारकर छत्रपतींचे राजोपाध्ये हे मूळचे आरवीमुद्गल, प्रांत पुणें, येथील राहणारे असून ते भोसल्यांचे कुलगुरु. सन १५९२ पासून भोसल्यांनीं त्यांस इनामें करून दिल्याचा उल्लेख ह्या पत्रव्यवहारांत आहे. मालोजी व विठोजी भोसले, मलिकंबर, विठोजीचे मुलगे संभाजी व दसोजी, तसेंच खेळोजी, शहाजी, खेळोजीचा मुलगा जिवाजी, तसेंच कृष्णाजी गंगाधर भोसले ( ? ), स. १६८९, इत्यादिकांनीं ह्या उपाध्यांस इनामें करून दिलीं, किंवा पूर्वी असलेलीं पुढें चालविलीं. शिवाजीनें मात्र इनाम दिल्याचें एकही पत्र नाहीं ! हे उपाध्ये भोसल्यांच्या पुष्कळ उपयोगी पडले असावे असें दिसतें. ह्या उपाध्यांपासून भोसले कर्ज वगैरे

वारंवार घेत असत. त्यांचे कर्जरोखे लिहिलेले पाहतां त्यांची सावकारीही मोठी होती असें दिसतें.

चाकणच्या ब्रह्मयांचाही पत्रव्यवहार छापला आहे. हे ब्रह्मे चाकण-प्रांताचे जोशी व अष्टाधिकारी असून, मोठे वजनदार होते. त्यांनीही पुष्कळ उत्पन्न संपादन केलें. शिवाजीनें त्यांस इनामें व उत्पन्नें करून दिलीं, तीं पुढें मराठशाहींत चालू होतीं. कवेश्वरकवि ह्या ब्रह्मे घराण्यांतील होय.

आळंदी येथील श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या समाधीस शिवाजीनें इनाम जमीन एक खंडी अडीच मण उत्पन्नाची करून दिली. त्याची सनद भा. इ. सं. मं. अ. १८३५ अंक ९ चा छापलेली आहे.

सामाजिक व इतर बाबतींत शिवाजीपेक्षांही लोकांचा परामर्ष घेण्याची जिजाबाईची दक्षता विशेष होती. विठोजी हैबतराव देशमुख सिलीमकर याची कन्या खंडेराव गोमाजी नाईक पानसंबळ याचे मुलास देण्याचें ठरलें. "लग्नविधि करावयाकारणें तुम्हांस व तुमचे मातेस हुजूर बोलाविलें. त्यावरून तुम्ही येऊन अर्ज केलाजे, सांप्रत आपणास रोजीचें खावयास नाहीं; आणि लग्नविधि कैसी होईल. त्यावरून तुम्हांवरी मेहरबानी करून लुगड्याबद्दल होन पंचवीस व ऐन जिन्नस सामान पांचशें माणसांचा, ऐसें बक्षीस दिधलें असे. सुखें घेऊन अलबत्ता लग्न सिद्ध करणें.' असें विठोजी देशमुखास जिजाबाईनें पत्र लिहिलें (खंड १७ ले. १६).

कोंडभट सनकाडे नांवाचा एक ब्राह्मण शिवाजीच्या मुदपाकखान्यांत पाणक्या होता, त्याची हकीकत भा. इ. अ. १८३२ त आहे.

वतनांसंबंधानें मराठे लोकांची आसक्ति व त्यावरून राष्ट्रावर घडलेले परिणाम, यांचा विचार पुढें प्रसंगोपात्त येईल.

१२. शिवाजीची तुलना.—शिवाजीच्या कर्तबगारीचें येथवर वर्णन केलें, यावरून त्याच्या अंगची खरी योग्यता दिसून येईल. ही योग्यता कळण्याकरितां त्याची अनेक ऐतिहासिक पुरुषांशीं तुलना करण्याचा प्रघात आहे. वास्तविक अशी तुलना केल्यानेंच म्हणजे ती योग्यता जास्त समजते असें नाहीं; पण ज्यांना ह्या पुरुषांची ओळख नाहीं, त्यांस त्यांच्या माहितींतल्या एकाद्या पुरुषाचें उदाहरण घेऊन दोघांचें सादृश्य उघड

करून दाखविलें, तर त्याची योग्यता ज्यास्त स्पष्ट होते, हें एक; व पृथ्वीच्या पाठीवर आजपर्यंत होऊन गेलेल्या अनेक महान् पुरुषांस व शिवाजीस एका मापानें एक ठिकाणीं तोलून, सर्वांची एक मालिका एकदम पुढें मांडिली, म्हणजे त्यांतील प्रत्येक व्यक्तीचे विशिष्ट गुणभेद सुलभ रीतीनें मनांत भरतात, हें दुसरें. तथापि ह्या तुलनेंत एक गोष्ट ध्यानांत ठेविली पाहिजे, ती अशी, कीं ज्याप्रमाणें पृथ्वीवरील कोणत्याही दोन व्यक्ति सर्वथैव सारख्या नाहींत, तसेंच दोन महान् पुरुषही सारखे नाहींत. केवळ तुलनेच्या योगानें एकाचे गुणदोष दुसऱ्यावर लादले जाण्याचा संभव आहे. त्याजबद्दल खबरदार राहिलें पाहिजे.

साधारणत: शिवाजीची तुलना हैदर, यशवंत होळकर, किंवा शंभर वर्षांपूर्वीचे पेंढारी सरदार, अशा सारख्यांशीं पाश्चात्य ग्रंथकारांनीं केलेली आहे. किंवा उलट पक्षीं वरील उपमान पुरुष म्हणून त्यांस जेव्हां तेव्हां शिवाजीचा दाखला देण्यांत येतो. सराष्ट्रीयत्व अंगीं नसल्यास शिवाजीची खरी योग्यता कळावयाची नाहीं. सराष्ट्रीयत्व नसलें तरी शिवाजी व दुसरे पुरुष यांच्यामध्यें एक अगदीं ढोबळ भेद आहे, तो सहसा कोणी लक्षांत घेत नाहीं. हे सर्व पुरुष लुटारू होते; शिवाजीही लुटारू होता; असें सांगण्यांत येतें. शिवाजीच्या लुटारूपणाचा विचार वर केलाच आहे. त्याच्या कृतीस लूट म्हटलें, तरी त्यानें लुटीच्या योगानें आपल्या लोकांचें स्वतंत्र राज्य स्थापिलें, म्हणजे आपल्या लोकांना परचक्रांतून सोडवून स्वातंत्र्य मिळवून दिलें. हैदरानें परकीय लोकांचें स्वातंत्र्य नष्ट करून केवळ लष्करी जोरावर लोकांस त्रासवून सोडलें. शिवाजीचा उपक्रम प्रजेस सुख देण्याचा होता; हैदराची दृष्टि केवळ आपलपोटेपणाची होती. लोकांचें सुख व निष्ठा हे शिवाजीच्या राज्याचे आधारस्तंभ. तलवारीचा दरारा हेंच हैदराचें राज्य करण्याचें मुख्य साधन. हैदर व टिपू ह्यांनीं धर्मसंबंधांत लोकांवर जुलूम केला. शिवाजीनें धर्माच्या बाबतींत मुसलमानांसही संतोषच दिला. तेव्हां शिवाजी व हैदर यांची तुलना कधींही योग्य होणार नाहीं.

त्याचप्रमाणें शिवाजी व पेंढारी याचेंही साम्य जुळत नाहीं. पेंढारी हे केवळ भाडोत्री शिपाई. त्यांस आपपर माहीत नव्हतें. म्हणून त्यांचा उपद्रव सर्वांसच होत असे. हे अमुक एका उद्देशानें वागत नसत.

स्वराष्ट्र व स्वराज्य ह्यांचें त्यांस वारेंही नव्हतें. परंतु शिवाजी लूट करितांना गरिबांस त्रास देत नसे. धनिकांस सुद्धां त्रास देण्याचा त्याचा इरादा कधींच नव्हता. आपण आरंभिलेलें काम सर्व राष्ट्राचें आहे; त्यास सर्वांनीं यथाशक्ति मदत केली पाहिजे; ती यथाशक्ति सोयीनें केल्यास शिवाजी विनाकारण लोकांस जाच करीत नसे. शिवाय लुटीच्या संबंधानें शिवाजीनें अनेक बारीक नियम करून, लोकांना त्रास न होण्याची विशेष तजवीज ठेविली होती, तशी हैदर किंवा पेंढारी सरदारांनीं ठेविलेली नव्हती. गैरशिस्त वर्तन करणारास शिवाजी कडक शासन करी, कोणाची बेकैद चालूं देत नसे. अंगांत गुण असला म्हणजे जातीचा कोणीही असो, त्यास शिवाजीच्या पदरीं मोटेपणास चढण्यास वेळ लागत नसे. सर्व जातींच्या लोकांस महाराष्ट्र देश आपलासा वाटून त्यांनीं यथाशक्ति प्रसंगीं झटून काम करावें, व राष्ट्राचें हित होत असल्यास प्राणव्यय करण्यासही चुकूं नये, असे विलक्षण स्फुरण शिवाजीनें सर्व लोकांच्या ठिकाणीं उत्पन्न केला होता.

कित्येकांनीं शिवाजीची तुलना ग्रीसचा बादशहा शिकंदर याच्याशा केली आहे, पण तीही समर्पक दिसत नाहीं. कारण दोघांचे काळ, कर्तव्य व फलप्राप्ति यांमध्यें जमीनअस्मानचा फरक आहे. शिवाजी जगज्जेतृत्वासाठीं अगर कीर्तीच्या दिगंतवृद्धीसाठीं हपापलेला नव्हता. स्वराष्ट्रास स्वातंत्र्य मिळवून देण्यापलीकडे त्याची इतिकर्तव्यता नव्हती. शिकंदरास सर्व जग जिंकावयाचें होतें. जिंकलेल्या प्रदेशाची राज्यव्यवस्था ठरविण्यांत शिकंदरानें फारसें लक्ष घातलें नाहीं. परंतु शिवाजीची पद्धति निराळी होती. ज्या मुलखांत राज्यव्यवस्था उत्पन्न करितां यावयाची नाहीं, असा मुलूख जिंकण्याच्या नादास तो कधीं लागला नाहीं. म्हणून शिकंदराचें नांव जगज्जेता म्हणून कितीही मोठें असलें, तरी शिवाजीची व त्याची तुलना करण्याजोगें साम्य दोघांत नाहीं. शिवाय शिकंदराच्या बापानें अगोदरच मोठें राज्य कमावून ठेविलेलें होतें. तशी गोष्ट शिवाजीची नव्हती. तसेंच शहर काबीज केल्यावर तेथच्या लोकांची नाहक कत्तल करणें, अमोलिक ग्रंथसंग्रह जाळून टाकणें, शरण आलेल्या बंदिवानांस यमसदनीं पोंचविणें, व सुरादेवीच्या भक्तींत बेफाम होणें, असलीं घोर पापें शिवाजीस कधींही शिवलीं नाहींत. उलट पक्षीं या

दोषांचे विरोधी सर्व गुण शिवाजीच्या ठायीं वसत होते. प्रसिद्ध रोमन सरदार जूलिअस सीझर ( केसर ) व शिवाजी यांच्यांत वरच्याहून ज्यास्त साम्य आहे. दोघेही धोरणी, राजकारणकुशल व व्यवस्थित होते. पण सीझरही जगजेतृत्वाच्या हांवेपासून अलिप्त नव्हता. रोमन राष्ट्राच्या विस्तृत व संपन्न पायावर सीझरानें पराक्रम गाजविणें व मुळांत कांहींच नसतां शिवाजीनें आपल्या राष्ट्रास स्वातंत्र्य प्राप्त करून देणें, यांत पुष्कळ फरक आहे.

युरोपच्या इतिहासांतील तिसरा मोठा पुरुष नेपोलियन बोनापार्ट होय. शिवाजी व बोनापार्ट यांजमध्यें जरी अनेक गोष्टींत पुष्कळ विरोध आहे, तरी दोघांमध्यें साम्यही बरेंच आहे. विद्या व कल्पकबुद्धि, लोकांवर छाप बसविण्याची विलक्षण हातोटी, राष्ट्र ऊर्जितावस्थेस आणण्याची अनावर उत्कंठा, इत्यादि महान् पुरुषांस अवश्य लागणारे गुण दोघांच्याही ठिकाणीं वसत होते. पण देशकालपरत्वामुळें दोघांच्या कर्तबगारींत विलक्षण फरक पडला. अठराव्या व एकुणिसाव्या शतकांत युरोपीय राष्ट्रांमध्यें विलक्षण स्पर्धा उत्पन्न झाली होती. त्यांचें शिक्षणही निराळ्या तऱ्हेचें होतें. ह्यामुळें हरएक विषयांत नांव गाजविण्यास बुद्धिमान् पुरुषास युरोपांत जसा अवकाश होता, तसा हिंदुस्थानांत नव्हता. अर्थात् मोठमोठे विजय मिळवून दिगंत कीर्ति मिळविण्याची सवड बोनापार्टास युरोपांत मिळाली, तशी शिवाजीस हिंदुस्थानांत मिळाली नाहीं. नेपोलियनची विद्वत्ता जबर होती. तो विद्वान् लेखक, व हुशार कायदेपंडित होता. त्या वेळीं तशा प्रकारचें शिक्षण युरोपांत प्रचलित होतें. शिवाजी तसा विशेष विद्वान् नव्हता. नैसर्गिक बुद्धिमत्ता, व जगाचा विस्तृत अनुभव हे दोघांमध्यें समान होते. तरी फ्रान्ससारख्या संपन्न देशांत विद्या, कला, लोकोपयोगी कामें इत्यादि विषयांत नवीनच सुधारणा करून देशास ऊर्जितावस्था प्राप्त करून देणें व सभोंवारच्या इतर राष्ट्रांस भावी उन्नतीचा मार्ग दाखविणें ह्यांत बोनापार्टास जी सवड मिळाली, ती हिंदुस्थानच्या तत्कालीन परिस्थितींत शिवाजीस शक्यच नव्हती. ऑस्ट्रिया, रशिया, प्रशिया, इंग्लंड इत्यादि रणशूर राष्ट्रांशीं घनघोर संग्राम करण्याचे अनेक प्रसंग बोनापार्टास आल्यामुळें, त्याच्याकडून युद्धकलेस जसें नवीनच स्वरूप प्राप्त झालें, तसें शिवाजीच्या हातून झालें नाहीं. म्हणून या विषयांत शिवाजी

बोनापार्टाहून कमी दिसतो. तथापि दुसऱ्या कित्येक गोष्टींत शिवाजी बोनापार्टाची बरोबरी करूं शकेल. इतकेंच नाहीं, तर कांहीं बाबतींत तो महत्तर दिसतो. नेपोलियनची इच्छा जरी बुध्या प्राणहानि करण्याची नव्हती, तरी परिणामीं त्याच्या संग्रामांनीं भयंकर प्राणहानि झालेली आहे. शिवाजीच्या हातून प्राणहानि मुळींच झाली नाहीं, असें म्हटलें तरी चालेल. स्वतःविषयीं अनावर महत्त्वाकांक्षा नेपोलियनच्या ठिकाणीं होती, परंतु राष्ट्रहितापुढें स्वतःची महती शिवाजी मुळींच समजत नसे. नवीन फौज तयार करणें, किल्ले वगैरे प्रचंड कामें तयार करून देशाचा बंदोबस्त करणें,देशांत सुरळीत राज्यव्यवस्था व आबादानी करणें, ह्या बाबतींत शिवाजी नेपोलियन इतकाच कल्पक व दूरदृष्टि दिसतो. नेपोलियनच्या पराक्रमाचा पाया फ्रान्ससारख्या संपन्न देशावर बसविलेला होता. शिवाजीपाशीं मुळांत कांहींच नव्हतें. सर्व देश परचक्राखालीं दडपून गेलेला होता. अशा स्थितींत शिवाजीनें परचक्रांतून स्वराष्ट्रास सोडवून त्यास भाग्योदय प्राप्त करून दिला; आणि मूळचाच स्वतंत्र असलेला फ्रान्ससारखा सुशिक्षित व सुसंपन्न देश नेपोलियननें महत्पदास चढविला; ह्यांत कांहीं अंशीं शिवाजीचीच कर्तबगारी ज्यास्त आहे, असें म्हणावें लागतें. शिवाजीचें खासगी वर्तन अत्यंत निर्मळ व पवित्र होतें, तसें नेपोलियनचें नव्हतें. अनावर महत्त्वाकांक्षा व जबरदस्त बुद्धिमत्ता ह्यांच्या योगानें बोनापार्टानें युरोपीय राष्ट्रांचें प्रखर वैर मात्र संपादिलें; पण भलतीच महत्त्वाकांक्षा धारण न केल्यामुळें, शिवाजीचे शत्रु सुद्धां निर्वीर्य होऊन, त्याचा स्नेह संपादून राहूं लागले, हा त्याच्या सौजन्याचा प्रभाव होय.

स्वराष्ट्र व स्वधर्म यांच्या संरक्षणास लागणाऱ्या उद्योगापलीकडे दुसऱ्यास नाहक बुडविण्याचीं कामें शिवाजीनें कधींच हातीं घेतलीं नाहींत. म्हणूनच सीझराप्रमाणें शिवाजीचा खून झाला नाहीं, बोनापार्टाप्रमाणें शत्रूंचे हातून त्याची हालअपेष्टा झाली नाहीं; किंवा शिकंदराप्रमाणें लोकांचे शिव्याशाप त्यास सहन करावे लागले नाहींत. याच कारणांस्तव वरील तिघां जगजेत्यांस जो मान मिळत नाहीं, तो शिवाजीस मिळाला पाहिजे. महाराष्ट्रांतले लोक शिवाजीस परमपुरुषाचा अगर शिवाचा अवतार समजतात व देवाप्रमाणें त्याची भक्ति करितात, ह्याचें कारण लोकांचा वेडे-

पणा नव्हे, तर शिवाजीचें थोरपण होय. स्वराष्ट्रीयांकडून तसा मान मिळण्यास तो सर्वथैव पात्र आहे.

वास्तविक शिवाजीशीं तुलना करण्यास सर्व बाजूंनीं साजेल असा पुरुष सांपडणें कठीण आहे. कांहीं अंशीं मोगल बादशाहीचा संस्थापक बाबर बादशहा याशीं शिवाजीचें साम्य आहे. बाबराचें वडिलोपार्जित राज्य लयास गेलें होतें. शिवाजीप्रमाणेंच त्याचें आयुष्य विपत्तींत गेलें असून, केवळ अप्रतिम साहस, बुद्धिमत्ता व सोशिकपणा ह्या गुणांच्या जोरावर त्यानें उत्तरहिंदुस्थानची बादशाही कमाविली. शिवाजीप्रमाणेंच बाबरही आईच्या अर्ध्या वचनांत असे. बाबर शूर असून राज्यकारभारांतही कांहीं कमी नव्हता. शिवाजीसारखाच तोही अल्पायुषी झाला; व तो ज्यास्त दिवस जगता, तर कदाचित् त्याचाही लौकिक मोठा झाला असता. तथापि बाबरही परदेश जिंकण्याच्या दोषापासून मुक्त नाहीं. बाबराप्रमाणें शूर व सोशिक, अकबराप्रमाणें सर्वांवर समदृष्टि ठेवून राज्यकारभाराची व्यवस्था करण्यांत कुशल, शहाजहान प्रमाणें काटकसर करून प्रजेच्या सौख्यांत दंग असणारा असा शिवाजी, प्रतापी मोगल बादशहांच्या अनेक गुणांचा निष्कर्ष होता. बाबर व अकबर यांप्रमाणें शिवाजीनें स्वतः संकटें भोगिलीं असल्यामुळें, गरीबांचे हाल कसे असतात, हें तो चांगलें समजत असे. जहांगीर किंवा शहाजहानप्रमाणें शिवाजी ऐषआरामी नव्हता; आणि ऐषआराम करण्यास वाडिलांनीं केलेली कमाई शिवाजीपाशीं नव्हती. औरंगजेबाची जबरदस्त उद्योगशीलता शिवाजीच्या ठिकाणीं असूनही कपट व विश्वासघात यांच्या योगानें औरंगजेबाचा नाश झाला, ते दुर्गुण शिवाजीस शिवले नाहींत. सारांश, शिवाजीशीं तुलना करण्यास साजेल असा एकच पुरुष इतिहासांत सांपडणें कठीण आहे. इतक्यावरूनच तो लोकोत्तर पुरुष होता असें म्हटलें पाहिजे.

इंग्लंडचे इतिहासांतही शिवाजीसारखा पुरुष झाला नाहीं. कांहीं अंशीं आल्फ्रेड त्याच्या जवळ जवळ येईल. इंग्लंडांत स्वराष्ट्रास स्वातंत्र्य मिळवून देण्याचें कृत्य नवव्या शतकाचे अखेरीस आल्फ्रेड राजानें केलें. त्या वेळीं डेन्स लोकांनीं सर्व इंग्लंड देश आक्रमून टाकिला होता; त्यांजपासून थोडासा प्रदेश परत मिळवून आल्फ्रेडनें स्वदेशाची बाजू राखिली, आणि कित्येक लोकोपयोगी कामें केलीं. त्याबद्दल त्यास 'थोर'

ही पदवी देण्यांत आली आहे. त्या मानानें पाहतां शिवाजीची कामगिरी आल्फ्रेडपेक्षां पुष्कलच ज्यास्त योग्यतेची असल्यामुळें थोर अगर त्याहून श्रेष्ठ असें पद त्यास सर्वथैव योग्य आहे. आल्फ्रेडनंतर इंग्लंडवर परचक्र आलें नाहीं असें नाहीं. डेन्स लोकांनींच तो देश पुनरपि जिंकिला, आणि पुढें फ्रान्सांतून नार्मन लोकांनीं येऊन तो देश संपूर्णपणें काबीज केला. तेव्हां इंग्रज लोकांस कांहींच उपाय न राहिल्यामुळें शेवटीं ते नार्मन लोकांत मिसळून गेले, आणि तसें संमेलन होण्यास त्यांस साधनेंही विपुल होतीं. आपल्या इकडे मुसलमान व हिंदु यांचें संमेलन शक्य नसल्यामुळें शिवाजीसारख्या पुरुषांकडूनच राष्ट्रोद्धार होण्याची जरूर पडली. अमेरिकेंतील संयुक्त राज्याचा संस्थापक वॉशिंग्टन याजशीं थोड्याबहुत अंशानें शिवाजीची तुलना करतां येईल. तसेंच युरोपच्या इतिहासांत हॉलंड देशास स्वातंत्र्य मिळवून देणारा ऑरेंजचा सरदार, पहिला वुइल्यम, याजशीं शिवाजीची तुलना बऱ्याच अंशीं शोभण्यासारखी आहे.

सोळाव्या शतकांत युरोपांत स्पेनची सत्ता अतोनात वाढली होती. हॉलंड, इटली वगैरे देश स्पेनच्या ताब्यांत होते. त्याच वेळेस ख्रिस्ती धर्मांत सुधारणा करण्याकरितां अनेक नवीन पंथ उत्पन्न झाले, व युरोपच्या कित्येक लोकांस बहुतांशीं नवीन मतें मान्य झालीं. त्यामुळें जुन्या व नव्या मतांचा शंभर दोनशें वर्षेपर्यंत कडाक्याचा झगडा सर्व युरोपभर माजला होता. अशा वेळीं धर्माच्या बाबतींत नानातऱ्हेचे अनन्वित जुलूम स्पॅनिश राज्यकर्त्यांनीं हॉलंडच्या प्रजाजनांवर केल्यामुळें, तेथील लोकांचीं मनें राज्यकर्त्यांविरुद्ध अत्यंत क्षुब्ध झालीं. हॉलंडच्या लोकांस नवीन धर्म स्वीकारूं न देणें व त्यांजवर आपलें राज्य कायम ठेवणें, हे दोन प्रधान हेतु स्पेनचा प्रबळ राजा फिलिप याचे होते. शिवाजीचा प्रतिस्पर्धी औरंगजेब बादशहा ह्याच हेतूंकरीतां हिंदुस्थानांत झगडत होता. बुद्धिमत्ता, दारिद्र्य, स्वराष्ट्राभिमान इत्यादि गुणांत हॉलंडर्स लोकांशीं महाराष्ट्रीयांचें साम्य पुष्कळ आहे. अशा परिस्थितींत जसा महाराष्ट्रांत शिवाजी निपजला, तसाच हॉलंड देशांत ऑरेंजचा सरदार वुइल्यम हा स्वदेशत्राता निर्माण झाला. मनुष्यबळ नाहीं, द्रव्यबळ नाहीं, स्वदेशाची विपन्नावस्था, शत्रूंच्या मी मी म्हणणाऱ्या पराक्रमी सरदारांचा देशभर धुडगूस, इत्यादि बहुतेक गोष्टींत वुइल्यम व

शिवाजी यांचें साम्य निकट आहे. ऐतिहासिक दृष्ट्या हॉलंडच्या त्या वेळच्या पन्नास वर्षांचा इतिहास महाराष्ट्राइतकाच मनोरम व बोधप्रद आहे. मात्र हॉलंडचा हा प्रकार शिवाजीच्या पूर्वी शंभर वर्षें घडला. शिवाय धर्माच्या बाबतींत स्पॅनिश लोकांचें आचरण जितकें भयंकर व क्रूर होतें, तितकें शिवाजीच्या वेळेस महाराष्ट्रांत तरी मुसलमानांचें नव्हतें. धर्मसंबंध सोडला म्हणजे शिवाजी, संभाजी, राजाराम व ताराबाई या चौघांच्या कारकिर्दी एकदम घेतल्या तर हॉलंडच्या परिस्थितीची भरती होते. अंगच्या गुणांमध्येंही वुइल्यम व शिवाजी यांचें साम्य बरेंच निकट आहे. दोघेही धोरणी, दीर्घप्रयत्नी, स्वतःविषयीं अत्यंत निरिच्छ, केवळ स्वदेशकार्यार्थ सर्वस्व खर्च करणारे असे होते. दोघांच्याही प्रयत्नास सारखेंच यश आलें. दोघांनींही स्वराज्यास स्वातंत्र्य मिळवून दिलें. त्या स्वातंत्र्याचे परिणाम दोनही राष्ट्रांवर सारखेच झाले. मराठ्यांचा प्रभाव उत्तरोत्तर वाढत जाऊन ते जसे कांहीं काळानें हिंदुस्थानचे अधिपति बनले, तद्वतच हॉलंडचे डच लोक सर्व युरोपांत प्रमुख झाले. दोघांचाही उगम लहान व विस्तार मोठा असा प्रकार झाला. इतकें निकट साम्य ह्या दोन इतिहासांत असून डच लोकांचा इतिहास युरोपिन इतिहासांत बोधप्रद असा मानला जात आहे. सर्व युरोपियन राष्ट्रांत स्वातंत्र्याची स्फूर्ति उत्पन्न करण्याचें मोठें काम प्रथमतः डच लोकांनीं केलें; आणि त्यांचाच कित्ता इतर राष्ट्रांनीं पुढें हळूहळू गिरविल्यामुळें युरोपची भरभराट झाली. मॉट्लसारखे इतिहासकार आपणांस नाहींत एवढीच कायती उणीव आहे. आमच्यांतील विद्वानांनीं ह्या विषयांत लक्ष घालून, आपल्या ह्या अप्रतिम ऐतिहासिक काळाचें खरें महत्त्व डच इतिहासाच्या तोडीस नेऊन बसविलें पाहिजे.*

* डच लोकांच्या इतिहासाचें महाराष्ट्रेतिहासाशीं असणारें निकट साम्य प्रथम नजरेस आलें होतें, पण त्यांतलें खरें रहस्य उघडें करणारें एक उपयुक्त पुस्तक याच वेळेस मराठींत प्रसिद्ध झाल्यामुळें पहिला समज दृढ झाला. तें पुस्तक साताराचे रा. द्रविड यांनीं लिहिलेला नेदर्लंदांतील बंडाचा इतिहास हें होय. द्रविड यांनीं एका अत्युत्तम ऐतिहासिक भागाची महाराष्ट्रवाचकांस ओळख दिली आहे. मराठ्यांचा साठ वर्षांचा इतिहास वाचतांना डच लोकांचा हा इतिहास अवश्य वाचण्यालायक आहे. त्यायोगें भिन्न ठिकाणी घडलेल्या समसमान राज्यक्रांतींनीं चित्तास चमत्कृति होऊन, इतिहासशास्त्राच्या अध्ययनास मदत होणार आहे. [ स. १९०२ ].

मनुष्याचें कर्तृत्व पुष्कळ अंशीं परिस्थितीवर अवलंबून असतें. स्वत: अत्यंत कष्ट सोसून स्वजातीचें पराकाष्ठेचें सुख वाढविण्यांत जीं मनुष्यें आपले देह झिजवितात, त्यांसच थोर ही पदवी मिळते. या थोरपणाचा अंदाज केवळ परिणामांवरून करावयाचा नाहीं. लूथर, कोलंबस इत्यादि पुरुषांस महात्मे ही संज्ञा अशाच अर्थानें प्राप्त झाली आहे. हिंदुस्थानच्या व्हाइसरॉय मंडळींत लॉर्डमेयोचें नांव श्रेष्ठ प्रतीत गणलें जातें, याचें कारण तरी हेंच. केवळ परिणामांवरून पाहवयाचें, तर वॉरन हेस्टिंग्स् अगर डलहौसी यांच्या शतांशही मेयोनें कामें केलीं नाहींत. सारांश, कोणाच्या अंगीं गुण ज्यास्त होते;व त्या गुणांच्या योगानें सदाचार व लोकसुख यांची वृद्धि करण्यांत पराकाष्ठा कोणीं केली, हें एखाद्याची योग्यता ठरवितांना प्रथम पाहवें लागतें. मग त्या पराकाष्ठेचा परिणाम व्हावा तसा होवो अगर न होवो. मनुष्याच्या वर्तनांत सद्धेतु कितपत होता हें मुख्यत: पाहावयाचें. आल्फ्रेड, नेल्सन, इत्यादि थोर पुरुषांची थोरवी याच दृष्टीनें ठरविलेली आहे. शिकंदर, सीझर, बोनापार्ट यांप्रमाणें रणभूमीवर पराक्रम करून शिवाजीनें आपलें नांव पृथ्वीवर एका टोकापासून दुसऱ्या टोकापर्यंत प्रसिद्ध केलें नाहीं, म्हणून शिवाजी कमी ठरत नाहीं. आल्फ्रेडासही असे दिगंत पराक्रम केल्यावांचून थोर ही पदवी मिळाली आहे. शिकंदराप्रमाणें आपल्या नांवाचा दरारा जगभर पसरविण्याची शिवाजीची हाव नव्हती. तशी इच्छा शिवाजीनें धारण केली नाहीं, व ठरविलेल्या मर्यादेंत राहून आपल्या बुद्धीचा व्यय स्वदेशसेवेकडे केला, हेंच शिवाजीच्या मोठेपणाचें मुख्य कारण होय. स्वजातीयांवर शिवाजीचे जे चिरंतन उपकार झाले आहेत, ते शिकंदर व सीझर यांच्या हातून झाले नाहींत. अनावर महत्वाकांक्षा व अप्रतिम रणशौर्य या गुणांनीं ते योद्धे सर्व जगास ठाऊक झाले. परंतु लूथर, आल्फ्रेड अगर ऑरेंजचा वुइल्यम ह्यांप्रमाणें, शिवाजीनें आपल्या मर्यादेंत राहून शांतपणें स्वराष्ट्रसेवा बजाविण्यांत आपली इतिकर्तव्यता मानिली, हें पुण्य कांहीं लहान नव्हे. ह्या उच्चतर हेतूमुळेंच शिवाजीस ' थोर ' हें पद मिळालें पाहिजे.

परंतु ही योग्यता ठरवितांना अंत:करणांत सहृदयता असावी लागते. इंग्रज लोक नेल्सनला भजतात, स्कॉट लोक वॉलेस यास भजतात, किंवा फ्रेंच लोक बोनापार्टास भजतात, यांत त्या त्या लोकांच्या अंगची सहृद-

यताच व्यक्त होते. तोच न्याय शिवाजीस लाविला पाहिजे. आपल्या राष्ट्राची दैना उडाली आहे, आपणास जिकडे तिकडे हालअपेष्टा सहन करावी लागत आहे, इतर माणसांसारखेच आपण मनुष्य असतां परकीय लोक आपणांस पशूंप्रमाणें वागवितात, ही स्थिति शिवाजी व वरील दुसरे थोर पुरुष यांच्या मनावर इतकी बाणली, कीं त्यांनीं स्वदेशस्वातंत्र्यासाठीं आपली कंबर बांधिली; आणि कितीही घोर संकटें आलीं तरी त्यांस न जुमानतां, व आपलें कर्तव्य चुकूं न देतां, इष्ट कार्य तडीस नेलें. ह्या कामगिरीची खरी योग्यता जाणण्यास सहृदयताच अंगीं पाहिजे. अशी कामगिरी सीझर व शिकंदर यांच्या हातून घडली नाहीं, स्वार्थ व स्वमहती यांपलीकडे त्यांची दृष्टि गेली नाहीं. म्हणूनच शिवाजीची योग्यता त्यांच्यापेक्षां ज्यास्त वाटते. शिवाजीनें आपले हेतु तडीस नेण्यांत असंख्य लोकांचे प्राण घेतले नाहींत, रक्तपात करण्याची त्यास कधींही हौस वाटली नाहीं, शत्रूंस दंड करण्या ऐवजीं, होतां होई तों, त्यांस त्यानें आपले मित्र बनविलें, आणि एकंदर कार्य अत्यंत सामोपचारानें, दयार्द्र अंतःकरणानें व दूरदृष्टीनें तडीस नेलें, हा शिवाजी व वरील दुसरे पुरुष यांजमधील मुख्य फरक आहे. सारांश, शिवाजीचें थोरपण सहृदयत्वाशिवाय दिसणार नाहीं. कोणत्याही राष्ट्राचा इतिहास सजातीयानें लिहिलेला असेल तरच तो त्या राष्ट्रास मान्य होतो, कारण त्यांत सहृदयत्व प्रकट होतें. ज्या त्या राष्ट्रानें आपल्यांतील थोर पुरुषांस भजणें व त्यांस मान देणें हें त्याचें पवित्र कर्तव्य आहे.

शिवाजी व त्याचें प्रधानमंडळ यांची तुलना इंग्लंडच्या तत्कालीन राजपुरुषांशीं करणें अयोग्य नाहीं. शिवाजीच्या समकालीन इंग्लंडांतील राज्यकर्ते क्रॉम्वेल व दुसरा चार्ल्स हे होत. क्रॉम्वेल युद्धकलेंत निपुण होता, तितका कदाचित् शिवाजी नसेल. परंतु राज्यकर्ता ह्या नात्यानें पाहिलें असतां क्रॉम्वेल शिवाजीच्या तोडीस पोंचणार नाहीं. क्राम्वेलनें लष्करी जोरावर मिळविलेलें राज्य त्याच्या हयातींतच मोडूं लागलें होतें, आणि त्याच्या मृत्यूनंतर पुनः पहिली राज्यव्यवस्था सुरू झाली. दुसरा चार्ल्स व शिवाजी यांचीही तुलना करितां यावयाची नाहीं. एक पडला विलासी व निरुद्योगी व दुसरा त्याचे अगदीं उलट. चार्ल्सचे प्रधान म्हटले म्हणजे क्लॅरेंडन, केबल पंचायतन, डॅन्बी, व सरवुल्यम टेंपल हे

होत. यांपैकीं सर वुल्यम टेंपल हा त्या वेळच्या मानानें अपवादकारक होता. कारण इतका चांगला प्रधान पुढेंही पुष्कळ दिवस निपजला नाहीं. परंतु तो फार दिवस टिकला नाहीं. ह्या प्रधानमंडळींशीं ताडून पाहतां शिवाजीचे पिंगळे, हणमंते, मोहिते, हे लोक एकापेक्षां एक हुशार असे असून राज्याचे खरे आधारस्तंभ होते. इंग्लंडच्या तत्कालीन प्रधानांनीं स्वदेशाचें म्हणण्यासारखें कल्याण केलें नाहीं. वालपोल, न्युकासल वगैरे पुढें झालेल्या प्रधानांपेक्षां मराठशाहींतील लोक ज्यास्त पराक्रमी व अकलेनें पिट्टपेक्षां कमी नव्हते; परंतु येथेंही वस्तुस्थिति भिन्न असल्यामुळें यथातथ्य तुलना करणें शक्य नाहीं. त्या वेळीं पृथ्वीवर सर्वत्र राजांची सत्ता अनियंत्रित होती. हिंदुस्थानचा औरंगजेब व त्याचा समकालीन फ्रान्सचा चौदावा लुई हे दोघेही बादशाही सत्तेच्या मदानें धुंद झाले होते. त्यांच्यांशीं ताडून पाहता, शिवाजी फारच उच्च दिसतो. शिवाजीच्या वेळेस मुंबई-बेट इंग्रजांस मिळालें; आणि तेथें पाश्चात्य आरमाराची स्थापना झाली. ह्या बाबतींत शिवाजी सावध होता, परंतु त्याच्या पश्चात् आरमाराची सत्ता मराठ्यांस वाढवितां आली नाहीं. धार्मिक, नैतिक व औद्योगिक बाबतींतही शिवकालीन स्थिति पाश्चात्यांच्या मानानें हीन नव्हती. पुढील शतकांत पाश्चात्यांनीं आघाडी मारिली, आणि पौर्वात्य मागें पडले. मोगल बादशाहीची राज्यव्यवस्था, कायदेकानू, बंदोबस्त ह्या गोष्टी शंभर वर्षांवर रूढ झालेल्या होत्या, त्यांचा उपयोग शिवाजीनें केला; आणि मोगलपद्धतींत जरूर ते योग्य फेरफार करून आपली राज्यपद्धति त्यानें बनविली.

शिवाजीच्या गुणांची मीमांसा रा. राजवाडे यांनीं फार बारकाईनें केली आहे, त्यांतील कांहीं उतारे येथें देणें इष्ट दिसतें. 'शिवाजी ही विभूति महाराष्ट्रांत कोणतें कार्य साधण्याकरितां अवतीर्ण झाली ? लोकांचें स्वातंत्र्य हरण करून, दिग्विजय करण्याकरितां शिवाजी उत्पन्न झाला; कीं स्वराज्य व स्वधर्म यांचें संरक्षण करण्याकरितां त्याचा अवतार होता ? स्वराज्य आणि स्वधर्म यांचें संरक्षण करण्याचा उच्च, उदात्त व पवित्र हेतु मनांत धरून शिवाजीचे प्रयत्न चालले होते, हें सर्वत्र मान्य आहे; तेव्हां परकीय लोकांचें स्वातंत्र्य हरण करणाऱ्या, अर्थात् एका नीच, दुष्ट व अपवित्र हेतूनें प्रोत्साहित झालेल्या अलेक्झांडर, सीझर किंवा नेपोलियन ह्या दिग्विजयी पुरुषांशीं शिवाजीची तुलना करणें अयोग्य आहे. धैर्य, शौर्य, परा-

क्रम, कर्तृत्वशक्ति इत्यादि गुणांसंबंधानें शिवाजीशीं ह्या पुरुषाची तुलना केली असतां चालेल; परंतु हेतूच्या पवित्रतेसंबंधीं जेथें विचार करावयाचा असेल, तेथें ह्या दिग्विजयी व दुष्ट पुरुषांशीं तुलना काय कामाची? अशा ठिकाणीं स्वातंत्र्यार्थ खटपट करणाऱ्या पवित्र महापुरुषांचाच तेवढा प्रवेश होणें अवश्य आहे. वास्तविक पाश्चात्य महापुरुषांशीं तुलना केल्यानेंच म्हणजे शिवाजीच्या महत्त्वाची इयत्ता ठरणार आहे, असा प्रकार बिलकुल नाहीं. शिवाजीची योग्यता स्वयंसिद्ध आहे; अलेक्झांडराप्रमाणें शिवाजीनें आपल्या स्नेह्यासोबत्यांस ठार मारिलेलें नाहीं; सीझराप्रमाणें आपल्या बायकोस सोडून दिलेलें नाहीं; बोनापार्टाप्रमाणें परराष्ट्रांचें स्वातंत्र्य पायाखालीं तुडविलें नाहीं; क्रॉम्वेलप्रमाणें कोण्या प्रांतांतील लोकांची कत्तल उडविली नाहीं. फ्रेडरिक धि ग्रेटप्रमाणें नीच दुर्गुण शिवाजीच्या अंगीं नव्हते. शिवाजीचें वर्तन न्यायाचें, नीतीचें, पराक्रमाचें, स्वधर्मपरायणतेचें व परधर्मसहिष्णुतेचें होतें. अनेक लढायांत विजय संपादन करणें; मैदानांत, समुद्रतीरावर, किंवा डोंगरावर तीनचारशें किल्ले बांधणें; नवीन सैन्य तयार करणें, नवीन आरमार निर्मिणें; नवे कायदे करणें; स्वभाषेला उत्तेजन देणें; कवींना आश्रय देणें; नवीं शहरें बसविणें; स्वधर्म स्थापन करून त्याचें ऐश्वर्य वाढविणें; सारांश, स्वराष्ट्राचा उद्धार करून स्वदेशाला स्वतंत्र व सुखी करणें; ह्या लोकोत्तर कृत्यांनीं जर कोण्या पुरुषानें ह्या भूमंडळाला अक्षय ऋणी करून ठेविलें असेल, तर तें शिवाजीनेंच होय. शिवाजीची खासगी वर्तणूक व सार्वजनिक पराक्रम इतके लोकोत्तर होते, कीं त्याच्याशीं तुलना करावयास जी जी म्हणून व्यक्ति घ्यावी ती ती ह्या नाहीं त्या गुणानें शिवाजीहून कमतरच दिसेल. ह्या अवतारी पुरुषाविषयीं लिहितां लिहितां समर्थ म्हणतात, ‘ तयाचे गुणमहत्त्वासी ! तुलना कैंची ? ’ ‘ यशवंत, कीर्तिवंत, सामर्थ्यवंत, वरदवंत, नीतिवंत, जाणता, आचारशील, विचारशील, दानशील, कर्मशील, सर्वज्ञ, सुशील, धर्ममूर्ति, निश्चयाचा महामेरु, अखंडनिर्धारी, राजयोगी, ’ अशीं नाना प्रकारचीं विशेषणें शिवाजीला रामदासांनीं लाविलीं आहेत. निस्पृही व स्पष्टवक्त्या अशा समकालीन ग्रंथकारानें हें गुणवर्णन केलेलें आहे, हें लक्ष्यांत घेतलें असतां, शिवाजीच्या अंगीं असलेल्या जाज्वल्य गुणांच्या इयत्तेचा अंदाज सहजासहजीं करतां

येतो; व कित्येक इंग्रज व मुसलमान बखरकारांनीं ह्या महापुरुषाची निंदा केलेली पाहून त्यांच्या मनांतील कुत्सितपणाचा ठाव घेण्यास संधि मिळते. अपशब्द योजिणाऱ्या मुसलमान तवारिखकारांचे लेख प्रस्तुत कोणी फारसे वाचीत नाहींत. १६३८ पासून १६४६ पर्यंत कोंकणांत कांहीं ठिकाणीं यवनांच्या विरुद्ध लहानसान बंडें झालीं, व यवनांच्या बाजूच्या लोकांचीं घरेंदारें लुटलीं गेलीं. ह्या लहानसान बंडांना मुसलमान तवारिखकार दरोडे म्हणून संज्ञा देतात. दरोडे हा शब्द मूळ कोणत्या अर्थी योजिलेला आहे, हें इंग्रज लेखकांना न कळल्यामुळें, या शब्दाचा वाच्यार्थ खरा धरून इंग्रज लेखक समाधान मानितात. सतराव्या शतकांत मुसलमान लोक मराठ्यांना चोर, दरोडेखोर हे अपशब्द द्वेषानें चरफडून लावीत ते शब्दशः खरे धरून चालणें इतिहासाच्या खरेपणास योग्य ना[illegible]

१२. परकीयांचें शिवाजीविषयीं मत.—इंग्रज ग्रंथका[illegible] विषयीं फारसे अभिमानानें बोलत नाहींत, हें खरें. परंतु जे इंग्रज प्रवासी शिवाजीच्याच वेळेस इकडे होते त्यांचे अभि[illegible] खरे आहेत; आणि त्यांत शिवाजीसंबंधानें त्यांच्या मनांत आ[illegible] दिसून येतो. परंतु १८ व्या शतकांत पेशव्यांच्या वेळीं व १९[illegible] काच्या आरंभीं इंग्रजांचे हातांत मराठ्यांचें राज्य गेलें त्या वेळेस व त्या[illegible] जे लेख निपजले त्यांत शिवाजीविषयीं व एकंदर मराठ्यांविषयीं पुष्कळ अनादर दिसून येतो. हे लेख वाचतांना दोन गोष्टी ध्यानांत ठेविल्या पाहिजेत. एक अशी कीं, शिवाजीच्या वेळेस पेशवाईचे आरंभी म्हणजे १८ व्या शतकाच्या मध्यापर्यंत माराठशाहीचा राज्यकारभार लोककल्याणाचे दृष्टीनें हांकला जात होता. परंतु त्यापुढें पेशवाईत गृहकलह सुरू झाले तेव्हां, व शिंदे होळकरादि मराठे सरदारांनीं हिंदुस्थानच्या निरनिराळ्या भागांत लष्करी जोरावर संचार चालविले तेव्हां, राज्याची शिस्त बिघडली आणि लोकांस मराठ्यांचा कहर वाटूं लागला. त्यानंतर लवकरच इंग्रजांचें राज्य झालें. नवीन राज्य सुरू होतें, तेव्हां मागच्याचे दोष ठळक दिसूं लागतात; आणि ते दाखविणें हा मनुष्यस्वभाव आहे. अशा स्थितींत इंग्रजांचे लेख लिहिले गेले. एक तर बाजीरावशाहीच्या मानानें इंग्रजांचें राज्य त्या वेळीं लोकांस ज्यास्त आवडलें; आणि दुसरें पाठीमागच्यांस नांवें ठेवण्याची हौस, या भावनेनें लिहिलेले लेख अव्वल मराठाशाहीस लागू करणें योग्य नाहीं.

ओवेन यानें आपल्या ग्रंथांत शिवाजीविषयीं बरेंच वर्णन दिलें आहे, आणि सहृदयत्व नसल्यामुळें शिवाजीच्या वागणुकींत जो विलक्षण विरोध ओवेन यास दिसला, तो पाहून चांगले विचारवान पुरुषही पूर्वग्रहाच्या योगानें कसे बुचकळ्यांत पडतात, तें दिसून येतें. ओवेन म्हणतो, 'धामधूम व अव्यवस्था मोडून त्यांचे जागीं नियमित व्यवस्था उत्पन्न करणें हें मोठ्या मुत्सद्याचें खरें काम. शिवाजीनें याहीपेक्षां ज्यास्त मोठें काम केलें असें प्रथम दर्शनीं दिसतें. चालू असलेल्या धामधुमीचा व अव्यवस्थेचा फायदा घेऊन त्यानें आपल्या मनांतील कार्यभाग उरकून घेतला; व त्या साधनांचा प्रवाह आपले ताब्यांत ठेवून तो इष्ट सिद्धीकडे जोरानें वाहूं दिला. लोटिंग रूपी महापुराचे दरवाजे खोलून, लटालूट व लष्करी स्वेच्छाचार त्यानें जोरानें आंत घेतली. परंतु त्या लाटेंत तो स्वत: बुडून किंवा घाबरला नाहीं; उलट ह्या स्वेच्छाचारी व सर्वाहारी ानें आटोपसर राज्यव्यवस्था व मर्यादित राष्ट्रीय स्वातंत्र्य केलीं. महाराष्ट्रीय वीरांच्या ठिकाणीं असलेल्या महत्त्वाकां- वारा घालून ती त्यानें प्रदीप्त केली; परंतु त्या ज्वाळेंत स्वत: याची, अगर इतक्या लुचेगिरीनें व बेपर्वाईनें मिळविलेलें राज्य- नाहींसें होण्याची, त्यास कधीं भीति वाटली नाहीं. लुचेगिरी आणि बेइमान यांच्या जोरावर त्याचा उत्कर्ष झाला, तथापि त्याचा विश्वासघात कधीं कोणीं केला नाहीं. बंडखोरपणा हा त्याचा व त्याच्या लोकांचा केवळ जीवनहेतु असतांही, त्याचे कायदे कडक होते; त्यांचें उल्लंघन कधीं होत नसे; व क्वचित् झालेंच तर शिक्षा झाल्याशिवाय राहत नसे. सारांश, जंगी तुफानावर आरोहण करूनही त्या तुफानास आपल्या ताब्यांत ठेवणारा असा विलक्षण पुरुष हा शिवाजी होता. शिवाजीचें चरित्र वाचल्यापासून अशा विलक्षण विरोधाचा ठसा मनावर उठतो. परंतु त्यानें ज्या संस्था अस्तित्वांत आणिल्या, त्यांचें अवलोकन केलें म्हणजे हा विरोध निघून जातो.' यापुढें शिवाजीचा उद्योग लयास जाण्यास कोण-कोणतीं कारणें झालीं, याचें विवेचन ओवेननें केलेलें आहे. वरील हकी-कतींत एक गोष्ट दिसून येते. शिवाजीला दूषणें देतांना सुद्धां त्याच्या लोकोत्तर गुणांवर व कृत्यांवर ह्या ग्रंथकारास पांघरूण घालतां आलें नाहीं. ओवेनचें विवेचन वाचण्यालायक आहे. त्याच्या योगानें हल्लींची

इंग्रज लोकांची राज्यपद्धति व शिवाजीची पद्धति यांचा एकसमयावच्छेदें-करून मनांत बोध होऊन शिवाजीच्या कर्तृत्वाची महती वाटल्यावांचून राहत नाहीं.

बर्नियर नांवाचा एक फ्रेंच प्रवासी सन १६५६ पासून १६६७ पर्यंत हिंदुस्थानांत होता, त्यानें आपल्या प्रवासाच्या हकीकतींत शिवाजी-चा बराच उल्लेख केला आहे. 'शिवाजी नांवाचा एक शूर व साहसी पुरुष विजापुरचे राज्यांत गडबड करीत होता. तो सदा जागरूक, साहसी व स्वसंरक्षणाविषयीं अत्यंत बेफिकीर असा होता. त्याचें व मोगल सरदार जशवंतसिंह याचें सूत असल्यामुळें, शिवाजीनें शाएस्तेखानावर छापा घातला; व सुरत शहर लुटून अपार संपत्ति नेली.' या प्रसंगाची एक चम-त्कारिक हकीकत बर्नियरनें दिली आहे. सुरतेस रे० फादर अंब्रोस नांवाचा एक ख्रिस्ती पाद्री होता, त्याजला शिवाजीनें मोठ्या सन्मानानें वागविलें. शिवाजी म्हणे, ' हे फिरंगी पाद्री फार सज्जन आहेत, तर त्यांचे वाटेस आपण जाऊं नये.' तसेंच डिलेल नांवाचा एक डच व्यापारी सुरतेस होता, तो मोठा दानधर्मशील असल्याबद्दल ख्याति होती. तें ऐकून शिवाजी त्याचे वाटेस गेला नाहीं. त्याचप्रमाणें डच व इंग्रज व्यापाऱ्यांसही शिवा-जीनें त्रास दिला नाहीं. इंग्रजांनीं आपले खलाशी बोलावून मोठ्या धीट-पणानें आपला बचाव केला. सुरतेस एक यहुदी ( ज्यू ) व्यापारी होता. बादशहास विकत देण्यासाठीं त्यानें पुष्कळ मौल्यवान् रत्नें जमविलीं होतीं. शिवाजीस त्याची खबर लागली. तीन वेळ मानेवर तरवार ठेवून आतां डोकें तोडणार अशी स्थिति शिवाजीनें आणिली, तरी त्या पाश्चात्य मार-वाड्यानें आपली दौलत बाहेर दाखविली नाहीं. बर्नियर म्हणतो, ' जिवा-पेक्षां पैसास ज्यास्त भजण्याचा ज्यूलोकांचा स्वभावच आहे. ' बर्नियरच्या ह्या लिहिण्यावरून शिवाजीच्या लुटीविषयीं एक दोन गोष्टी परकीयांच्या पुराव्यानेंच ठरून गेल्या आहेत. ज्यू व्यापाऱ्याजवळ पैसा आहे, असें समजल्यावरही त्यास ठार न मारितां शिवाजीनें सोडून दिलें. ह्यावरून झोळीची भिक्षा वसूल करण्यांत थोड्याशा धमकावणीपलीकडे शिवाजी कधीं जात नसे. तसेंच उदार व परोपकारी लोकांस शिवाजी छळीत तर नसेच, उलट त्यांस अतिशय मान देई. इंग्रजांनीं शिवाजीशीं संग्राम कसा केला, या प्रश्नाचा विचार मागें केला आहे.

दुसरा फ्रेंच प्रवासी टॅव्हर्नेयर सन १६५६ त लिहितो.—' शहाजीच्या बंडामुळें विजापुरचे राज्यांत घोटाळे माजले आहेत. अयोग्य वर्तन केल्यामुळें शहानें त्यांस कैदेंत टाकिलें, आणि मरेपर्यंत तो तुरुंगांत होता. त्याचा मुलगा शिवाजी ह्यास त्या कृत्याचा फारच राग आला. शिवाजी हा स्वभावानें उदार व ममताळू असल्यामुळें त्याला पाहिजे तितके अनुयायी मिळाले. त्यायोगें त्यानें स्वार व पायदळ जमविलें. थोड्याच वेळांत त्याजपाशीं पुष्कळ फौज जमली. इतक्यांत विजापुरचा राजा मरण पावला. त्यास अपत्य नव्हतें. तेव्हां अर्थातच शिवाजीचें साधलें, व दक्षिण किनाऱ्यावरील पुष्कळ प्रदेश त्यास मिळाला. तो आपल्या फौजेस चांगलें वेतन देई, म्हणून ते त्याची नोकरी भक्तीनें करीत.

थिवेनॉट, डिग्राफ्, डिलन, डिलाव्हेल इत्यादि फ्रेंच प्रवासी सन १६५५ पासून १६५८ च्या दरम्यान हिंदुस्थानांत होते. त्यांनीं व डॉ. फ्रायर, मि० अलेक्झांडर डो, मि० अलेक्झांडर कर इत्यादि इंग्रज गृहस्थांनीं शिवाजीसंबंधानें बरीच हकीकत दिली आहे. क्यारे नांवाचा दुसरा एक फ्रेंच प्रवासी हिंदुस्थानांत सन १६६८ पासून १६७३ पर्यंत होता. त्यानें शिवाजीविषयीं बरीच खात्रीलायक माहिती प्रसिद्ध केली. तो शिवाजीच्या योग्यतेची तारीफ मोठ्या उल्हासानें करतो. जूलियस सीझर व गस्टेव्हस अडॉलफस ह्या महान पुरुषांशीं शिवाजीची तुलना करून ' तो सर्वगुणसंपन्न योद्धा व चक्रवर्ती राजा होता,' असें त्यानें शिवाजीविषयीं म्हटलें आहे. रॉबर्ट ऑर्मच्या विस्तृत हकीकतींत शिवाजीच्या मोठेपणाविषयीं उत्कृष्ट अभिप्राय दिलेला आहे. परंतु पुनरुक्ति टाळण्यासाठीं याचा उतारा येथें घेत नाहीं.

विजापुरच्या मुसल्मानी इतिहासांत शिवाजीविषयीं खालील अभिप्राय दिलेला आहे. (प्रो० मोडककृत, पृ. २५८). 'शिवाजीसारखा व्रात्य, चपळ, कावेबाज, धोरणी, ठग, कोणीच कधीं जन्मला नाहीं, असें म्हटलें तरी चालेल. तो मोठा पराक्रमी, शूर, विचारी आणि जंगेगुरजी होता. नाना प्रकारच्या ठकविद्या व बहाणे शिवाजींत केवळ ओतप्रोत भरले होते. मारेकरीपणाचे व दांडगेपणाचे कामांत तो इतका प्रवीण होता, कीं त्यास उपमाच देतां येत नाहीं. शहाजी जिवंत असतांच शिवाजीनें ह्या सर्व कामांत कीर्ति मिळविली होती. तो आपल्या बाहुबलानें व अकलेनें

मोठमोठ्या राजधान्या बुडवीत होता, व मोठमोठीं संस्थानें व घरें लुटून समूळ पाडून टाकीत असे. दिल्लीपति व विजापुरवाले यांजमध्यें वैर उत्पन्न होण्यास हाच कारण झाला. याचें दैव इतकें बलवत्तर होतें, कीं या दोन महान् बलवान् बादशाही राजधान्यांच्या मध्यभागीं राहून, दोघांच्याही प्रांतांस तो एकसारखा उपद्रव देत असून, हीं दोनही राज्यें बुडविण्याचा त्याचा दृढ संकल्प होता. दोनही बादशहा त्याचा निर्मूल फडशा उडविण्यास डोळ्यांत तेल घालून तत्पर असतां त्यांचें कांहीं चाललें नाहीं. शिवाजीनें हातीं धरलेल्या कामांत त्यास क्वचितच अपयश येत असे. याप्रमाणें त्यानें आपल्या प्रारब्धबलेंकरून पस्तीस वर्षें बरोबर उद्योग केला, व बहुत मुलूख संपादन करून मराठी राज्याचा पाया घालून, हिजरी सन १०९१ (इ. स. १६८०) त मरण पावला, आणि दिल्ली व विजापुर येथील बादशहांस आपल्या त्रासापासून मुक्त केलें. त्याच्या मागून त्याचा बदफैली पुत्र संभाजी बापाच्या स्थानीं विराजमान झाला; आणि हाही आपल्या बापाच्या कित्याचें वळण उचलून त्यास तजेला आणूं लागला.' शिवाजीच्या प्रत्यक्ष शत्रूंनीं लिहिलेला हा अभिप्राय फारच महत्त्वाचा असून शिवाजीच्या योग्येतेस बाधक नाहीं, हें दिसून येईल.

ता. १२ माहे ऑगस्ट सन १८९६ च्या पुण्यांतील 'जगद्धितेच्छु' वर्तमानपत्राच्या अंकांत रा. राजाराम रामकृष्ण भागवत यांनीं मुसलमानांविषयीं शिवाजीची बुद्धि वैरभावाची नव्हती, अशा आशयाचा मजकुर प्रसिद्ध केलेला आहे. आरंभींच खाफीखानाचे लेखांतील एक उतारा दिलेला आहे तो असाः—'शिवाजीनें मशिदींस उपद्रव केला नाहीं. कुराणाची एकादी प्रत हातांत आल्यास, तिचा सन्मान करून ती आपल्या मंडळींतील एखाद्या मुसलमानास तो सोंपून देई.' खाफीखान हा कडवा मुसलमान हिंदूंस शिव्या देणारा व शिवाजीस कुत्रा, दुष्ट, पाजी असें म्हणणारा. त्यानें जर शिवाजीविषयीं वरील मत दिलेलें आहे, तर त्यावरून मुसलमानांचा शिवाजीविषयीं काय समज होता, तो तेव्हांच व्यक्त होतो. शिवाजीच्या एकंदर वर्तनावरून वरील अभिप्रायच खरा ठरतो. मुसलमान म्हणजे परधर्मी एवढ्यामुळें तो त्यांचा द्वेष करीत नसे. स्वधर्म स्थापितांना परधर्मीचा उच्छेद करण्याचा त्याचा मुळींच हेतु नव्हता. तो सर्वांस सारखा

वागविणारा होता. म्हणून शिवाजी मुसलमानांचा शत्रु होता हें म्हणणें याथातथ्य नाहीं.

खाफीखान शिवाजीविषयीं म्हणतो, ' आपले राज्यांतील लोकांचा मान कायम राखण्याविषयीं शिवाजीचे प्रयत्न एकसारखे चालू होते. देशांत बंडाळी करावी, लंमाणें लुटावीं, येणेंकरून लोकांस त्रास होई खरा; परंतु ह्यांपलीकडे कोणतेंही नीच कृत्य त्याचे हातून घडत नसे; त्याचे हातांत सांपडलेल्या मुसलमान जातींच्या बायकांमुलांच्या अब्रूस त्यानें कधींही धक्का लागूं दिला नाहीं. ह्या बाबतींत त्याचे हुकूम इतके सक्त होते, कीं ते मोडणारास तो शिक्षा दिल्याशिवाय राहत नसे. ' हा अभिप्राय फारच महत्त्वाचा आहे.

शिवाजीविषयीं औरंगजेबाचे उद्गार (डग्लस–बुक ऑफ् बॉम्बे, भाग १, पृ. २४६.) ' शिवाजी मोठा लढवय्या होता. हिंदुस्थानांतील प्राचीन राज्यें बुडविण्याचा उद्योग मी सतत चालविला असतां, नवीन राज्यस्थापन करण्याचें महात्कार्य शिवाजीशिवाय दुसऱ्या कोणाकडून झालेलें नाहीं. सारखीं एकुणीस वर्षें माझी फौज त्याबरोबर झगडत आहे; तरी त्याचे राज्याची दिवसेंदिवस भरभराटच आहे.'

येथवर परकीयांचे अभिप्राय दिले. ह्यांशिवाय आणखी पुष्कळ लेख आहेत, ते येथें देण्याचें प्रयोजन नाहीं. वरील उताऱ्यांवरून परकीय मताचा अंदाज करितां येण्याजोगा आहे. हे परकीयांचे उद्गार वाचले म्हणजे, परकेपणामुळें त्यांचे अभिप्राय कसकसे भिन्न झाले हें कळून येतें. म्हणून निरनिराळ्या अभिप्रायांचा वस्तुस्थितीशीं मेळ बसविण्यास वेळ लागत नाहीं. येथपर्यंत दिलेलें शिवाजीचें चरित्र लक्षपूर्वक व सहृदयत्वानें वाचलें, म्हणजे शिवाजीचीं धोरणें काय होतीं; त्याचें वर्तन कोणत्या हेतूंवर चाललें होतें, व त्याचें खरें पर्यवसान कसें झालें, हें कळून येईल. हीं धोरणें व हें वर्तन परकीयांस बरोबर रीतीनें कळणें शक्य नव्हतें आणि नाहीं; म्हणून परकीयांचे शिवाजीविषयीं अभिप्राय अनुकूळ नसणें साहजिक आहे. तथापि एकंदरींत शिवाजीविषयीं परकीयांचे उद्गार सर्वथैव विरुद्ध नाहींत; व मुसलमानांनीं सुद्धां त्याची तारीफ केलेली आहे, ही गोष्ट ध्यानांत ठेविली पाहिजे. मात्र यासंबंधांत परकीयांपेक्षां स्वजातीयांच्या अक्षम्य अज्ञानाचें, व विरोधाचें आश्चर्य वाटल्याशिवाय राहत नाहीं.

त्यांनीं शिवाजीचें चरित्र ऐतिहासिक दृष्टीनें वाचून, आपलें अज्ञान दूर करावें हें योग्य आहे.

१३. उपसंहार व पुढील संदर्भ.—येथपर्यंत शिवाजीच्या योग्यतेचें व राज्यव्यवस्थेचें वर्णन केलें, त्यावरून शिवाजी कोणत्या प्रकारचा मनुष्य होता हें कळून येईल. हिंदुस्थानच्या अर्वाचीन इतिहासांत मराठ्यांच्या स्वतंत्र राज्याच्या स्थापनेइतकी महत्त्वाची, इतकी विलक्षण; व इतकी बोध-पर, दुसरी गोष्ट नाहीं. तिचें स्वरूप, तिचीं कारणें, व तिचे परिणाम चांगले समजून देणें हें इतिहासाचें काम आहे. तें तडीस नेण्यासाठीं अगदीं आरंभापासून घडत आलेल्या अनेक गोष्टींचें वर विवेचन केलें आहे. शिवाजीच्या खऱ्या कर्तबगारीचा बरोबर अंदाज करण्यासाठीं ह्या स्वतंत्र प्रकरणांत बरेंच विवेचन करावें लागलें. त्यावरून एक गोष्ट अशी निष्पन्न होतें कीं, महाराष्ट्राचा उदय होण्याचीं मुख्य कारणें दोन, एक अनुकूल परिस्थिति, व दुसरें त्या परिस्थितीचा स्वकार्याकडे उपयोग करून घेण्याची शिवाजीची विलक्षण बुद्धिमत्ता. या दोन कारणांच्या मिलाफानें स्वराज्याची स्थापना झाली. हल्लींच्याप्रमाणें प्रत्येक गोष्ट कागदावर नमूद करण्याचा परिपाठ शिवाजीचे वेळीं असता, तर त्यानें स्वराज्याच्या हिताच्या किती अनंत गोष्टी केल्या, त्यांत त्यास अडचणी कशा आल्या, त्यांतून तो कसा निभावून गेला, इत्यादि प्रकार आपणास बरोबर कळले असते. तथापि आहे एवढ्यावरून सुद्धां त्याच्या कर्तबगारीविषयीं आदर वाटल्याशिवाय राहत नाहीं.

नेहमीं सावध व साशंक राहून सदुक्तीनें आपलीं कामें शिवाजी तडीस नेई. खून वगैरे क्रूर प्रकार त्यास मनापासून आवडत नसत. त्यानें आपल्या सौजन्यानें, दक्षतेनें व ममतेनें सर्व लोकांचीं मनें आपणाकडे आकर्षून घेतलीं. शत्रूला पकडून त्याजला जेरीस आणण्यांत जो फायदा शिवाजीस वाटे, तो शत्रूस ठार मारण्यांत त्यास वाटत नसे. मराठ्यांच्या राज्यस्थापनेस अडथळा आणणारी अशी जी कांहीं मंडळी होती, त्यांस त्यानें नाहींसें केलें. त्यानें आपलें राज्य फार सावधागिरीनें हळू हळू वाढवीत नेलें. एक काम पक्कें झाल्यावर दुसरें हातांत घेतलें. म्हणून झालेलें काम पुनः कधीं बिघडलें नाहीं, किंवा एकदम भलत्याच कामास हात घालून त्याच्या जिवाची धांदल उडाली नाहीं.

शिवाजीच्या राज्यस्थापनेचें स्वरूप अनेक दृष्टींनीं ध्यानांत ठेवण्यासारखें आहे. महाराष्ट्रीयांचें एक राष्ट्र बनून त्यांस स्वतंत्रता प्राप्त झाली, आणि जगाच्या इतिहासांत मराठ्यांचें नांव इतर अनेक लोकांप्रमाणें लुप्त न राहतां प्रसिद्धीस आलें. त्या नांवाचा दरारा अद्यापि वाटत आहे. तसेंच महाराष्ट्रीय लोकांच्या अंगीं असलेले अनेक गुण प्रसिद्ध होण्याची संधि या राज्यस्थापनेनें मिळाली. अंगीं कसब आहे, पण प्रसंग नाहीं तर तें निरुपयोगी होतें. प्रसंग येऊन अंगांत कसब नाहीं, तर तो प्रसंग व्यर्थ जातो. हा सुयोग शिवाजीच्या वेळेस जुळून आला. तिसरी गोष्ट अशी कीं महाराष्ट्रीयांत ज्या निरनिराळ्या जाती आहेत, त्यांचें एकवार ऐक्य व संमेलन होऊन तें ऐक्य पुनरपि बिघडलें. शिवाजीचे पूर्वी सर्व लोक विसकळीत होते. शिवाजीनें त्यांच्या ठिकाणीं ऐक्य उत्पन्न केलें, म्हणजे प्रत्येक इसमाचें स्वतःचे संबंधानें व समाजाचे संबंधानें असें दोन प्रकारचें कर्तव्य असून ह्या दोन कर्तव्यांचा विरोध टाळून, दोनही कशीं साधावीं, हें शिवाजीनें लोकांस शिकविलें. ब्राह्मण, मराठे, प्रभु, वैश्य, शूद्र इत्यादि सर्व जातींच्या लोकांनीं, आपली जात पाहिजे तर आपल्या घरच्या उंबरठ्याच्या आंत खुशाल पाळावी, परंतु बाहेर आल्यावर कोणत्याही सार्वजनिक कामांत सर्व लोक सारखे, सर्वांनीं एक दिलानें राष्ट्रहित, समाजहित, सार्वजनिक हित साधलेंच पाहिजे. हें कर्तव्य करण्यास जो चुकेल तो प्राणास मुकला, त्यास मोक्ष नाहीं, त्यास इहपर लोकीं सुख नाहीं. अशा प्रकारें स्वकर्तव्य बजावण्याची अपरिहार्य जबाबदारी शिवाजीनें प्रत्येक इसमाच्या मागें लावून दिली. ह्या जबाबदारीचा पगडा महाराष्ट्रीयांच्या मनावर कसकसा कमी जास्त होत गेला, ह्या प्रश्नाचा सूक्ष्म दृष्टीनें विचार करणें, म्हणजे महाराष्ट्रेतिहासाचें अध्ययन करणें होय. पुढील इतिहासाचें अध्ययन करितांना असें आढळून येईल कीं, राष्ट्रांतील कित्येक इसम कांहीं प्रसंगीं स्वहिताच्या उंबरठ्याच्या आंत समाजहितास ओढीत होते; कित्येक वेळां समाजहिताचे पुरस्कर्ते त्या आपमतलबी लोकांस त्यांच्या उंबरठ्याच्या बाहेर खेंचून नेत होते. अशा प्रकारचा झगडा सुमारें दीडशें वर्षांवर चालला होता. एका जातीचें महत्त्व जास्ती, कीं एकंदर समाजाचें महत्त्व ज्यास्ती, ह्या प्रश्नाच्या निकालाचा प्रत्यक्ष प्रयोग शेंकडों वर्षें चालला होता, आणि अजूनही

भिन्न रूपानें तो चालूच आहे. सारांश, अशा ह्या सर्वव्यापी झगड्याचें स्वरूप निरंतर ध्यानांत ठेवून राष्ट्रेतिहासाचें अध्ययन करणें, व तदनुसार वर्तनक्रम ठेवण्याची क्षमता अंगीं आणणें, ही तिसरी गोष्ट होय.

शिवाजीची खरी योग्यता ठरविण्याचा काळ अजून आलेला नाहीं. जगांतील थोर विभूतींचा प्रकार बहुधा असाच आहे. अशा विभूतींचें थोरपणच त्यांस नडतें. त्यांच्या कृत्यांनीं रागलोभ प्रज्वलित होऊन ते दृष्टीस अंधत्व आणितात. अशा मनोवृत्ति मावळल्याशिवाय सत्यांश दिसूं लागत नाहीं. शिवाय तत्कालीन कागदपत्र पुष्कळसे प्रसिद्ध व्हावयाचे असल्यामुळें अशा व्यक्तींविषयीं बरेंचसें अज्ञान माजलेलें असतें. मराठ्यांच्या इतिहासास अलीकडे कोठें थोडेसें चलन मिळत असून त्याजविषयीं आस्था उत्पन्न होत आहे. तेव्हां शिवकालीन घडामोडींचें हळूहळू सर्व बाजूंनीं अध्ययन होऊन शिवाजीची खरी योग्यता दिवसेंदिवस ज्यास्त कळूं लागेल असा काळ येत चालला आहे.

ज्या पुरुषास कधीं कोणतेंही दुर्व्यसन शिवलें नाहीं, ज्यानें परस्त्रीस मातेसमान मानिलें, ज्यानें स्वधर्मांप्रमाणेंच परधर्मास आदर दाखविला, ज्यानें युद्धांत पाडाव केलेल्या शत्रूंचे लोकांस त्यांच्या जखमा बऱ्या करून स्वगृहीं पोंचविलें, ज्यानें फाज, किल्ले, आरमार इत्यादि योजनांनीं स्वदेशसंरक्षणाची योग्य तजवीज करून ठेविली, ज्यानें सर्वांचे आधीं स्वतः संकटांत उडी घालून आपल्या लोकांस स्वदेशाची सेवा करण्यास शिकविलें, ज्यानें अनेक जिवावरच्या प्रसंगीं केवळ आपल्या बुद्धिसामर्थ्यानें स्वतःचा बचाव केला, ज्यानें औरंगजेबासारख्या प्रतापी बादशहाचे भगीरथ प्रयत्न सतत तीस वर्षें पावेतों यत्किंचित् चालूं दिले नाहींत, इतकेंच नव्हे, तर तीन राज्यांचा पाडाव करून अखिल भरतखंडांत अपूर्व असें स्वराष्ट्राचें स्वतंत्र राज्य स्थापन करून, त्याची कीर्ति पृथ्वीवर अजरामर करून ठेविली; त्या प्रतापी व पुण्यशील पुरुषाची योग्यता पूर्णपणें वर्णन करण्यास कोण समर्थ आहे ! पुण्यास प्रत्यक्ष त्याच्या राहत्या वाड्यांत पांच वर्षेंपावेतों औरंगजेबाचे सुभेदार तळ देऊन बसले; तेव्हां त्यांची ती मगरमिठी सुरतेचें नाक दाबून, मोठ्या युक्तीनें शिवाजीनें सोडविली, ह्या त्याच्या युद्धकौशल्याची इतिहास सदैव तारीफच करीत राहील. कोणास कधीं जहागिरी अगर जमिनी तोडून न देणारा, न्यायाचे कामांत कोणाची भीडमुर्वत न धरणारा, दुष्टांचा

काळ पण गरिबांचा कनवाळू, एकंदर रयतेस पोटच्या मुलांप्रमाणें वागविणारा, सदैव सावध व उद्योगी, नेहमीं मातेच्या अर्ध्या वचनांत राहून, अहर्निश राष्ट्राची चिंता वाहणारा, स्वदेश, स्वभाषा, व स्वधर्म या त्रिविध संपत्तीचें योग्य संगोपन करणारा, पापभीरु परंतु रणशूर, असा हा आधुनिक काळचा अद्वितीय राज्यसंस्थापक, छत्रपति शिवाजी, प्राचीन पुण्यश्लोकांचे पंक्तीस बसण्यास सर्वथैव पात्र आहे.

## प्रकरण बारावें.

## छत्रपति संभाजी.*

१. राज्यारोहण व तत्संबंधीं कलह. २. कर्त्यापुरुषांचे वध.
३. संभाजीची परिस्थिति,—औरंगजेब, व कलुशा. ४. संभाजी, सीदी व इंग्रज.
५. पोर्तुगीझांना तंबी.
६. मोगलांशीं सामना, संभाजीचें क्षात्रतेज. ७. विजापुरगोवळकोंड्यांचा पाडाव.
८. संभाजीचे युद्धप्रसंग, हंबीररावाचा मृत्यु. ९. संभाजीचा वध.
१०. संभाजीची योग्यता.

**१. राज्यारोहण व तत्संबंधीं कलह.**—साधारणतः असें आढळून येतें, कीं राज्यस्थापन करणारा पुरुष बुद्धिमान् व पराक्रमी असतो. तसा तो असल्याशिवाय त्याच्या हातून राज्य संपादन व्हावयाचेंच नाहीं. परंतु त्याच्या नंतर झालेले पुरुष कर्तृत्ववान् निपजत नाहींत. ह्या सामान्य अनुभवास मराठ्यांचें राज्य अपवादक झालें नाहीं. त्यांतही संभाजी वाईट निपजावा अशी परिस्थिति नव्हती; म्हणजे जन्मापासून तो केवळ सुखांत व चैनींत वाढला होता असें नाहीं. मातृसुख तर त्यास नव्हतेंच. शिवाजीसारख्या सर्व प्रकारें थोर पुरुषाच्या सहवासांत त्याचें आयुष्य गेलें होतें. शिवाजीचे कष्ट व विपत्ति, आणि राष्ट्रहिताकरितां त्यानें सोसलेली झीज, संभाजी आपल्या डोळ्यांनीं रात्रंदिवस प्रत्यक्ष पाहत होता.

* **आधार**—प्रसिद्ध झालेल्या बखरी व इतर ऐतिहासिक ग्रंथ, निबंध वगैरे, मनूची, ऑर्म्, ग्रँटडफ्, व्हीलर, ओवेन, गॅझेटियर्स, इ.इ.

ह्या प्रत्यक्षानुभवापेक्षां अधिक महत्त्वाचें दुसरें कोणतें शिक्षण बापानें मुलास द्यावयाचें ? परंतु ह्या अप्रतिम शिक्षणाचा संभाजीचे मनावर विपरीत परिणाम झाला. शिवाजी आपल्या मुलास ओळखून नव्हता असें नाहीं. म्हणूनच त्यानें त्यास पन्हाळ्यावर अडकवून ठेविलें होतें. शिवाजीला मरण एकाएकीं आलें. राज्याची सर्व व्यवस्था ठरवून देण्यास त्यास अवकाश मिळाला होता असें दिसत नाहीं. आपण इतक्या लवकर मरूं असें त्यास वाटलें नसावें. संभाजीला आणखी कांहीं दिवस असाच ठेवून तो ताळ्यावर न आल्यास, राज्य सुरळीत चालण्याची दुसरी हितावह योजना त्यानें केली असती. दुसरे असें, कीं संभाजी सुधारणेच्या पलीकडे गेला होता असें नाहीं. बावीस तेवीस वर्षांचे वयांत असतां, एक प्रकारचा हूडपणा व दांडगाई अंगांत असतेच; परंतु शिरावर जबाबदारी येऊन पडली नाहीं, तोंवर दुर्गुण राहतात. एकदां जबाबदारी येऊन पडल्यावर वाईट मनुष्य निवळून सदाचारी झाल्याचीं उदाहरणें इतिहासांत थोडीं नाहींत. सलीम व शहाजहान ह्यांनीं युवराज असतां आपल्या पित्यांस कधीं संतोष दिला नाहीं. परंतु राज्यस्थानीं आल्यावर त्यांचें वर्तन साफ बदललें. शहाजहानच्या सारखी लोकसुखाची कारकीर्द मोगल बादशहांत दुसरी कोणाचीच झाली नाहीं. इंग्लंडचा पांचवा हेन्री युवराज असतां वेडेचार करी. तो गादीवर येण्याच्या वेळेस सर्व लोक भिऊन गेले होते. परंतु राज्याधिष्ठित झाल्यावर त्यानें जे उद्योग केले त्यांवरून त्याची गणना इंग्लंडच्या उत्तम राजांमध्येंच होत आहे. प्रत्यक्ष शिवाजीची लहानपणची वृत्ति पाहिली, तर त्याच्या हातून मोठीं कृत्यें पुढें घडतील असें वाटण्याचें कारण नव्हतें. शहाजीसही तो पुढें चांगला निघेल कीं नाहीं, याबद्दल पुष्कळ दिवस भ्रांतिच होती. बापाच्या मृत्यूनंतर संभाजी ताळ्यावर आला नाहीं. शिवाजीच्या मागें राज्याची व्यवस्था सुयंत्रित चालण्यास दोन वैकल्पिक उपायांची आवश्यकता होती. एक उपाय असा, कीं राज्यांतील सर्व प्रमुख मुत्सद्यांची संमति घेतल्याशिवाय संभाजीच्या विरुद्ध कट तरी करावयाचा नव्हता, किंवा एकदां कट केल्यावर, संभाजीस कोणाचीही मदत मिळावयाची नाहीं, अशी तजवीज तरी ठेविली पाहिजे होती. शिवाजीच्या मरणाची बातमी फार दिवस गुप्त राहणें शक्य नव्हतें; म्हणून कट करितांना सर्वांनीं एक मतानें वागणें जरूर होतें. ही तजवीज होणें शक्य नव्हती, तर

विनाकारण संभाजीस चिडवावयाचें म्हणजे आगींत तेल ओतल्यासारखें होतें. निदान तसा प्रसंग येईपर्यंत, तरी सर्व गोष्टी संभाजीच्याच कलानें घ्यावयास पाहिजे होत्या. संभाजीचा स्वभाव विश्वासघातकी नव्हता. तो शूर, दीलदार, उदार व थोर मनाचा होता; परंतु हूड, हेकड, उतावळा व तामसी असा असल्यामुळें, केवळ आपल्या लहरीप्रमाणें वागणारा होता. असल्या माणसांस खूष ठेवून त्यांची लहर सत्कृत्यांकडे वळविणें शक्य असतें. औरंगजेबासारखा तो आंतल्या गांठीचा व केसानें गळा कापणारा असता, तर त्यानें चांगल्या माणसांचा नाश अशा उतावळेपणानें केला नसता. शिवाजीनें हजारों भिन्न प्रकृतीच्या माणसांच्या लहरी संभाळून त्यांचा इष्ट कार्यांकडे उपयोग करून घेतला, तीच गोष्ट आतां प्रधानमंडळानें संभाजीचे संबंधानें करावयास पाहिजे होती. शिवाजी मरण पावल्याचें वृत्त संभाजीस कळवून, आपण होऊन मंडळीनें त्यास रायगडीं बोलावून त्याचें साह्य केलें असतें, तर तो चवताळून बेफाम न होतां कदाचित् थोडा बहुत त्यांचें तंत्रानें राहिला असता. ह्या दोनही उपायांत चुका झाल्यामुळें संभाजीची लहर भलतीकडेच वळली. संभाजीच्या स्वभावाची खोंच त्याच्या मुद्रेतील वाक्यावरून स्पष्ट होते. 'श्रीशंभोः शिवजातस्य मुद्रा द्यौरिव राजते। यदंकसेविनो लेखा वर्तते कस्य नोपरि।' संभाजीचा जो आश्रय करील त्याचा पगडा कोणावर चालणार नाहीं ! असली ही घमेंडखोर व अविवेकी उक्ति त्यानें आपल्या उद्देशाची मर्यादा ठरविली.

ह्या वेळच्या प्रकारावरून दुसरी एक गोष्ट उघड होते. एकंदरींत महाराष्ट्रांत स्वदेशाभिमान फारसा उत्पन्न झाला नव्हता, जो तो केवळ स्वार्थदृष्टीनें वागत होता, असें मागें ठिकठिकाणीं सांगितलें आहे. शिवाजी मरणपावतांच गादीबद्दल तंटे सुरू व्हावे, आणि त्या तंट्यांचें निराकरण करण्याचें सामर्थ्य राष्ट्राच्या पुढारी मंडळींत असूं नये, हा प्रकार शोचनीय होय. आमची कर्तबगारी किती आकुंचित आहे, हें त्यावरून व्यक्त होतें.

शिवाजीच्या अंतकाळीं प्रधानमंडळींपैकीं कोणीही जवळ नव्हतें. हणमंते कोल्हापुर प्रांतीं, अण्णाजी दत्तो कोंकणांत, मोरोपंत पेशवे उत्तरेकडे, हंबीरराव मोहिते कऱ्हाडाजवळ, अशी ही मंडळी फांकलेली होती. शिवा-

जीची उत्तरक्रिया साबाजी भोसले नांवाच्या इसमाकडून राजारामास जवळ ठेवून करविण्यांत आली. राजारामाचा जन्म शके १५८३, प्लवनामसंवत्सर, रविवार, रामनवमी रोजीं ( १६६१ ) झाला, तेव्हां तो शिवाजीचे मरण काळीं १९ वर्षांचा होता. आपले पश्चात् संभाजीचे हातून राज्याचा बंदोबस्त होणार नाहीं, असे उद्गार शिवाजीनें वारंवार काढिले होते. तेच जमेस धरून, व संभाजी जवळ नाहीं ह्याचा फायदा घेऊन, सोयराबाईनें, इतर मंडळीच्या सल्ल्यानें पुढील बेत रचिला. साबाजी भोसले शिंगणापुरकर याजकडून क्रिया झाली, असें चिटणीस म्हणतात. सभासद म्हणतो राजारामानें केली. राजेरजवाड्यांचा प्रघात ध्यानांत घेतला म्हणजे वरील दोनही गोष्टींचा मेळ बसतो. गादीस मालक नेमल्याशिवाय मृत राजाचें शव बाहेर काढावयाचें नाहीं; आणि उत्तरक्रिया, श्राद्धें वगैरे मृतांचे विधि गादीवरील राजानें करूं नयेत, असा प्रघात असल्यामुळें, ते विधि करण्याकरितां आपल्या कुळापैकीं एखाद्या कुटुंबाची नेमणूक कायमची करीत असतात; ती क्रिया करणारास मंत्री असें म्हणतात. राजघराण्यांतील ही चाल शिवाजीचे वेळीं आस्तित्वांत असून त्याकरितां नागपुरकर भोसल्यांपैकीं एका कुटुंबाची नेमणूक झाली असून साबाजी त्यापैकीं असावा असें वाटतें. तथापि ही क्रिया राजारामाचे देखरेखीखालीं झाली यांत संशय नाहीं.

शिवाजीचे मरणाची बातमी संभाजीस तावडतोब कळविण्यांत आली नाहीं. ती कळविली असती, तर तिसरे चौथे दिवशीं संभाजी रायगडास येऊन पोंचला असता. अण्णाजी दत्तो, पिंगळे वगैरे मंडळी दोन चार दिवसांत येऊन पोंचली. नंतर राजारामास गादीवर बसविण्याविषयीं सोयराबाईनें त्यांजपाशीं कारस्थान चालविलें. संभाजीवर शिवाजीची प्रीति नव्हतीच. इतरांसही तो आवडत नव्हता. हा सर्वांचा नाश करून आपणही नाश पावेल; मोगल टपून बसले आहेत; नुकतेंच स्थापन झालेलें राज्य सुरळीतपणें पुढें चालणें अत्यंत अवश्य. तेव्हां अण्णाजी दत्तो, मोरोपंत पिंगळे, प्रल्हाद निराजी, रामचंद्रपंत अमात्य, इत्यादि मंडळीस राजारामास गादीवर बसविण्याची सोयराबाईची मसलत पसंत पडली. ह्या मसलतींत अण्णाजी दत्तो हा प्रमुख होता. त्यांनीं प्रथमतः रायगडचा बंदोबस्त चांगला केला. नंतर दुसरें काम संभाजीचा बंदोबस्त कर-

ण्याचें. जनार्दनपंत सुमंत संभाजीच्या बंदोबस्तास होता, त्यास तें काम लिहून पाठवावयाचें होतें. त्या कामीं बाळ प्रभु चिटणिसाची फार जरूर होती. कारण जे हुकूम चिटणिसाचे हातचे लिहिलेले नसत, ते निश्चयानें पाळले जात नव्हते. निदान बाळाजी प्रभूचे हस्ताक्षराशिवाय आजपर्यंत कोणताही महत्वाचा लेख बाहेर पडलेला नव्हता. त्यामुळें ह्या प्रसंगाचे हुकूमही त्याजकडूनच जाणें अवश्य होतें. परंतु बाळाजीचा ओढा संभाजीकडे होता. सोयराबाईविषयीं त्याचे मनांत म्हणण्यासारखी आदरबुद्धि नव्हती; आणि हा कट सिद्धीस जाईल, अशी त्याची खात्री नव्हती. शिवाजी असतांनाच, पुढें राज्य संभाजीस न मिळतां आपल्या मुलासच मिळावें, अशी सोयराबाईची थोडी बहुत खटपट चालली होती, ती बाळाजीस पसंत नव्हती. ह्या कारणास्तव पन्हाळ्यास पत्र लिहिण्यासंबंधानें अत्याग्रह केला असतांही तो स्वदस्तूरचें पत्र लिहीना. फार आग्रह पडला, तेव्हां 'घरीं मुलगा आवजी आहे, त्याच्या हातून पाहिजे तें काम घ्या,' असें तो बोलला; तेव्हां आवजीच्या हातून पत्रें लिहवून, कारभारी मंडळानें पन्हाळ्यास रवाना केलीं. जासुदांचा नाईक खंडोजी नाईक व गणोजी कावळा यांजबरोबर पत्रें हिरोजी फर्जंद आणि सोनाजी नाईक बंकी यांचे नांवचीं आलीं, कीं 'महाराजांचे मृत्यूचें वर्तमान फुटूं देऊं नये. संभाजीस कैद करून सावध असावें.' संभाजीसही पत्र दिलेलें होतें. पन्हाळ्यास जासूद येतांच, हीं पत्रें प्रथम संभाजीनें पकडलीं, असें ग्रँटडफ् म्हणतो. पत्रें ज्याचीं त्यास पोंचलीं, परंतु संभाजीचा बंदोबस्त होण्यापूर्वींच बातमी बाहेर फुटून, ती संभाजीस समजली. त्यानें पत्र घेऊन येणाऱ्या नायकांस आणून, समक्ष हकीकत विचारिली; तेव्हां त्यांस धैर्य न होऊन त्यांनीं खरा प्रकार सांगून दिला, असें चिटणीसही म्हणतो. चिटणिसाचें म्हणणें सयुक्तिक दिसतें; कारण बंकी व सूर्याजी कंक मावळा, यांस संभाजीनें एकदम ठार मारून टाकिलें. हिरोजी फर्जंद चिपळुणाकडे पळाला, म्हणून त्या वेळेस सुटला. ह्या मंडळीस संभाजीनें अशा कडक शिक्षा दिल्या, याचें कारण ते पत्रांअन्वयें त्यास कैद करण्यास गेले असावेत; आणि इतक्या अवकाशांत खरी बातमीही संभाजीस कळली असावी. जनार्दनपंत हणमंते कोल्हापुरानजीक होता, त्यासही वरप्रमाणें पत्रें आलीं होतीं. संभाजीनें प्रथमतः पन्हाळा किल्ला आपल्या ताब्यांत घेऊन, तेथील बंदोबस्त केला.

इकडे सोयराबाईच्या पक्षानें स्थिरस्थावर करून, वैशाख वद्य ३ स, म्हणजे शिवाजीच्या मृत्यूनंतर एक महिना तीन दिवसांनीं, राजारामास गादीवर बसवून, त्याचे नांवानें कारभार चालविला. इतके दिवस कां गेले तें समजत नाहीं. कदाचित् १३ दिवस होईपर्यंत कटाला सुरुवात झाली नसेल परंतु संभाजीचा बंदोबस्त नीट झाला नाहीं, ही गोष्ट ताबडतोब रायगडीं कळावयास पाहिजे होती. कदाचित् संभाजीनेंच ती कळूं दिली नसेल. मावळ्यांचा सरदार मालसावंत यास रायगडाखालीं पांचाड येथें बंदोबस्तास ठेविलें होतें; आणि तसाच बंदोबस्त ठेवण्याविषयीं सेनापति हंबीरराव मोहिते यास कऱ्हाडास पत्रें गेलीं होतीं. यापलीकडे कारभारी मंडळानें एकदम बाहेर पडून मुलखाचा बंदोबस्त करून सर्व लोकांस आपणाकडे वळविलें पाहिजे होतें, ती गोष्ट केली नाहीं, ही मोठी चूक होय. विनाकारण सर्व मंडळी जागचे जागीं रायगडावर स्वस्थ बसली. तशांत मोरोपंत पेशवे व अण्णाजी दत्तो यांचें अंतर्यामीं वांकडें होतें. इतर कित्येकांच्या मनांतून अमुकच पक्षास मिळावें, असा निश्चय झालेला नव्हता. सारांश सोयराबाईचा पक्ष असावा तितका मजबूद नव्हता. तोंडावर तिच्या विरुद्ध बोलण्याची कोणास छाती झाली नाहीं.

संभाजीनें पन्हाळ्याचा बंदोबस्त केला; पण त्याजपाशीं फौज नव्हती, म्हणून जनार्दनपंत सुमंताचे हाताखालील कित्येक मंडळीस त्यानें फितूर केलें; आणि एके दिवशीं रात्रीं कोल्हापुरनजीक सुमंताचे छावणींत जाऊन त्यास त्यानें पकडून आणून पन्हाळा किल्ल्यावर कैदेंत ठेविलें. हीच संभाजीच्या विजयाची पहिली मोठी गोष्ट. सुमंताची बातमी ऐकून सेनापति मोहिते याचा विचार डळमळूं लागला. हंबीरराव जात्याच धूर्त व मुत्सद्दी नव्हता. धन्याचे हुकूम इमानानें बजाविण्यापलीकडे दुसरें कांहीं तो जाणत नसे. तशांत संभाजीनें स्वतः त्याजला आपल्या मदतीस बोलावल्यावर, त्याजविरुद्ध वागण्याची त्याची छाती झाली नाहीं. शिवाय सुमंतास कैद केल्यानें संभाजीचे अंगीं बापाचे शौर्य, धाडस वगैरे गुण आहेत, अशी हंबीररावाची खात्री झाली, आणि तो संभाजीस मिळाला. इतकी तयारी झाल्यावर संभाजी फौज घेऊन रायगडावर आला. रस्त्यांत मोरोपंत पिंगळे हा जनार्दनपंत कैद झाल्याची बातमी ऐकून फौज घेऊन पन्हाळ्याकडे चालला होता, तोही संभाजीस मिळाला.

ह्या गोष्टी पाहून सोयराबाईच्या पक्षांतील बहुतेक लोक संभाजीकडे आले. रायगड किल्ल्याचे खालीं पाचाड येथें असलेल्या मालसांवताचे लोकही त्यास मिळाले. फितवा झाल्यामुळें किल्ल्यावरील दरवाज्याची दिंडीही कोणीं लाविली नाहीं. तेव्हां संभाजीचा किल्ल्यांत प्रवेश सहज झाला, ( आषाढ शु. २ ). तेथें गेल्याबरोबर मोरोपंत, आण्णाजी दत्तो, इत्यादि मंडळीचे घरीं जप्ति पाठवून त्यांस व राजारामास कैद केलें; आणि मालसावंत वगैरे पंधरा असामीस एकदम ठार मारिलें. लगेच सोयराबाईकडे जाऊन, 'तुम्हीं राज्यलोभास्तव महाराजांस विषप्रयोग करून मारिलें,' असा आरोपशब्द बोलून, भिंतीच्या कोनाड्यांत चिनून टाकिलें. तेथें अन्नपाणी न मिळून तिसरे दिवशीं तिचा प्राण गेला. नंतर राजारामाकडून तिची क्रिया करविली. आणखी सुमारें दोनशें मोठमोठ्या सरदारांस जबरदस्त शिक्षा केल्या. ह्या क्रूर आचरणानें संभाजीविषयीं जी थोडीशी पूज्यबुद्धि लोकांचे मनांत उत्पन्न झाली होती, ती सर्व नाहींशी झाली. सोयराबाईचे आप्त शिर्के सरदार त्याचे शत्रु बनले. 'मोरोपंतास कैद करून बेडी घातली. घर लुटलें. मोरोपंताचें पद बहिरोपंत उधो योगदेव याजला सांगितलें. शिक्का त्यांचा चालला. संभाजीराजे यास राज्याभिषेक झाला, तेव्हां बेडी तोडिली. मोरोपंत घरींच होते.' ( भा. इ. सं. १८३४–ले ६० ). संभाजीनें नागपंचमीचे दिवशीं, म्हणजे शिवाजीचे मृत्यूनंतर साडेतीन महिन्यांनीं, सिंहासनारोहण करून, माघ शु० दशमीस म्हणजे सन १६८१ च्या फेब्रुवारींत यथाविधि राज्याभिषेक करून घेतला, आणि प्रधानमंडळाकडे पूर्ववत् कामें चालू केलीं. परंतु तीं कामें त्या लोकांकडून प्रत्यक्ष न घेतां, त्यांच्या मुतालिकांकडून घेण्याचा त्यानें क्रम चालविला.

संभाजीनें सोयराबाईवर भर्तृहत्येचा आरोप कोणत्या आधारानें केला, हें समजत नाहीं. प्रभुरत्नमालाकारानें हा आरोप शाबीद धरला आहे. या ठिकाणीं एक गोष्ट उघड दिसते, कीं चिटणीस बाळाजी आवजी सोयराबाईच्या विरुद्ध खटपट करीत होता. तथापि संभाजी पन्हाळ्यास असल्यामुळें सोयराबाईच्या कटाविरुद्ध उघड खटपट करण्यास त्यास शक्ति नव्हती. तेव्हां संभाजी येऊन पोंचेपर्यंत तो कशी तरी वेळ मारून नेत होता. शिवाय रायगडावरील हकीकत अंतस्थ रीतीनें त्यानें संभाजीस कळविली

असेल असाही संभव आहे. आपला मुलगा आवजी यानें लिहिलेल्या पत्राबद्दल संभाजीनें सूड घेऊं नये, म्हणून सोयराबाईवरील भर्तृहत्येचा प्रवाद कदाचित् त्यानें संभाजीचे कानावर घातला असेल. सारांश, ह्या आरोपाचा परिस्फोट बाळाजीच्या मार्फत झाला, असें बहुतांशीं दिसतें. खरा प्रकार समजणें शक्य नाहीं.

२ कर्त्या पुरुषांचे वध.—रायगडचा बंदोबस्त करून संभाजी पन्हाळ्याकडे गेला. इतक्यांत पाठीमागें औरंगजेब बादशहाचा पुत्र शहाजादा अकबर हा बापाशीं तंटा करून संभाजीकडे आश्रय मागण्याकरितां म्हणून रायगडास आला. (मे ता. २५, १६८१). ह्या बंडाची हकीकत मुसलमानी रियासतींत आली आहे. पूर्वी औरंगजेबानें आपल्या बापाविरुद्ध जो प्रयोग केला, तोच या वेळीं अकबर करीत होता. जोधपुरचा शूर सरदार दुर्गादास अकबराबरोबर इकडे होता. संभाजी गडावर नव्हता, तरी शहाजाद्याची तजवीज चांगली लागली. शहाजादा आपल्या भेटीस आल्याची बातमी संभाजीस कळतांच त्यानें आपले कारभारी त्याच्या स्वागताकरितां पुढें पाठवून दिले; आणि आपणही कांहीं दिवसांनीं रायगडास आला. शहाजाद्याची तजवीज धोंडसें गांवीं ठेविलेली होती. त्या गांवास पुढें संभाजीनें पादशहापूर* असें नांव दिलें.

थोडे दिवस शहाजादा रायगडाचेजवळ एकटा होता. तेवढ्या अवधींत अण्णाजी दत्तोच्या पक्षानें त्याजपाशीं संभाजीविरुद्ध व राजारामाचे तर्फेनें बोलणें लाविलें. परंतु त्यांत कांहीं निष्पन्न न होतां उगाच त्या मंडळीनें संभाजीचा राग मात्र आपणांवर ओढून घेतला. आपणाविरुद्ध खटपट चालली आहे, ही बातमी संभाजीस कळली. कशी कळली याविषयीं वाद आहे. कोणी म्हणतात शहाजाद्यानेंच सांगितली. दादजी प्रभूची जी हकीकत

* टीपः—कुलाबा जिल्ह्यांत रेवदंड्याच्या पूर्वेस पालीपासून एक मैलावर धोंडसें गांव आहे; आणि धोंडशाच्या दक्षिणेस पादशहापुर असून तेथें कांहीं त्या वेळच्या खाणाखुणा अद्यापि दिसतात. जवळच मोरप ऊर्फ सुधागड हा किल्ला आहे हीं ठिकाणें रायगडाच्या नजीक नाहींत.

पुढें येणार आहे, तीवरून असें वाटतें कीं, त्यानेंच ती बातमी संभाजीस कळविली आणि त्याचा पुरावा मागाहून शहाजाद्यानेंही केला असावा. अण्णाजी दत्तोनें त्या बाबतींत अकबरास एक पत्र लिहिलें. तें पत्र, मनूची म्हणतो, अकबरानें स्वत: संभाजीच्या हातीं दिलें. त्यावरून संभाजी सर्वस्वी चिडून गेला. कसेंही असलें तरी अनाजी दत्तोसारख्या अनुभवशीर व शिवाजीचें धोरण जाणणाऱ्या पुरुषाच्या हातून ही दुसरी चूक झाली. आपले शत्रु कोण आहेत, परिस्थिति काय आहे, धरलेल्या उद्योगांत सिद्धि येण्याचा किती संभव आहे, या गोष्टींचा पूर्ण विचार केल्याशिवाय सर्पाच्या शेपटीवर पाय देणें फारच जोखमेचें होतें. त्या चुकीबद्दल त्यास अत्यंत कडक प्रायश्चित्त मिळालें. ही चुक झाली नसती, तर कदाचित् संभाजी प्रधानमंडळीच्या वाटेस फारसा गेला नसता. आरंभीं केलेल्या शिक्षेवरच तो थांबला असता. परंतु ह्या वेळेपासून संभाजीचे मनानें असें घेतलें कीं, अंणाजी दत्तो व सोयराबाईचे आप्त, शिर्के मंडळ, इतकेच आपल्या विरुद्ध आहेत असें नाहीं, तर शिवाजीचे वेळची सर्व प्रमुख मंडळी आपल्या वाइटावर आहेत; आणि त्या सर्वांचा नाश केल्याशिवाय आपण निर्भय व निश्चित होणार नाहीं. ही जवळची मंडळी आपला गळा केव्हां कापतील ह्याचा नेम नाहीं; तेव्हां त्यांवर कधींही विश्वास टाकूं नये, व होईल तेवढ्या प्रयत्नानें एकेकास दूर करावें. संभाजीचा हा ग्रह मरेपर्यंत कायम होता. यानंतर दुसरे अनेक प्रकार घडून आले, व त्यावर अनेक संकटेंही आलीं. तरी त्याचा हा दुराग्रह कधीं नाहींसा झाला नाहीं. प्रत्यक्ष त्याच्या कल्याणाची एखादी सूचना पुढें येऊन, तींत ह्या मंडळीचें कांहीं अंग आहे, असा संशय संभाजीस आला कीं पुरे, म्हणजे स्वत:चें अतिशय नुकसान होत असतांही, तो त्या सूचनेचा विचार करीत नसे. संभाजीचा स्वभाव नीट लक्षांत आणिला म्हणजे त्याच्या या दुराग्रहाविषयीं खात्री झाल्याशिवाय राहत नाहीं. तो औरंगजेबासारखा कपटी नव्हता. राज्यकर्त्या पुरुषांच्या अंगीं उतावळेपणा बिलकुल उपयोगी नाहीं. सावध राहून आपला उद्देश दुसऱ्यांस कळूं न देणें, आपले खरे विकार दाबून ठेवून बाहेरून निराळा प्रकार दाखविणें, शत्रूचें कपट ओळखून मित्राप्रमाणें त्याच्या गळ्यांत गळा घालून त्यास आपल्या कबजांत आणणें, ही औरंगजेबी, विश्वासघातकी, व दीर्घद्वेषी पद्धति बिचाऱ्या संभाजीस मुळींच ठाऊक नव्हती.

त्याच्या मनांतील ह्या एका जबरदस्त संशयाची निवृत्ति यावज्जन्म झाली नाहीं. संभाजीचें पुढील सर्व चरित्र ह्या संशयावर रचलेलें आहे. हा संशय दूर ठेवून चालणारास तें समजावयाचें नाहीं. औरंगजेबाची फौज त्यास पकडण्यास आली असतांही, ह्यांत कांहीं तरी घरच्याच मंडळीचा कावा आहे, असें त्यास वाटून, त्यानें संरक्षणाचे इलाज केले नाहींत. प्रस्तुत प्रसंगीं त्यानें अनेकांस क्रूरपणानें ठार मारिलें; तरी मागून विचार केल्यावर, ह्या क्रूर शिक्षांनीं आपले शत्रु कमी न होतां उलट वाढले आहेत असेंच त्यास दिसून आलें. म्हणून चांगली गोष्ट सांगितली असतांही विपरीत भासून, तिचा तो अव्हेर करी. कलुशाच्या हातीं सर्व सत्ता देण्यास त्यास हाच संशय कारण झाला. सर्व गोष्टींस औषध आहे, परंतु स्वभावास औषध नाहीं, असें म्हणतात तें किती खरें आहे, हें संभाजीचे चरित्रांत उत्तम व्यक्त होतें. परिस्थितीप्रमाणें आपला स्वभाव बनविणें हें केवळ एकटा शिवाजी जाणत होता. संभाजीस तें कांहीं समजत नव्हतें. म्हणून संभाजीवर राज्य बुडविल्याचा दोषारोप करून त्यास शिक्षा ठरवितांना, वर निर्दिष्ट केलेला त्याचा स्वभाव व त्याच्या मनांतील संशय ह्यांचा अगोदर विचार केला पाहिजे.

वरील कटाच्या प्रकरणांत अनेक बहुमोल नररत्नें बळी पडलीं. तींत प्रमुख अंणाजी दत्तो; त्याचे पक्षपाती व सोयराबाईचे आप्त शिर्के सरदार; चिटणीस बाळाजी आवजी, त्याचा भाऊ श्यामजी आवजी व मुलगा आवजी बल्लाळ; व हिरोजी फर्जंद, हे अंणाजी दत्तोचे साह्यकारी समजून, त्यांस संभाजीनें हत्तीचे पायांखालीं देऊन ठार मारिलें. अंणाजी दत्तोच्या मृत्यूनें सर्व लोक हळहळले. कारण देशसेवेस वाहिलेल्या अग्रेसर मंडळींत तो मूळपासून होता. शिर्के सरदारांचा तर संभाजीनें समूळ उच्छेद केला, तो इतका कीं, त्यावरून शिरकाण म्हणजे शिर्के सांपडतील तेथें त्यांचीं डोकीं मारणें हा शब्द तेव्हांपासून प्रचारांत आला आहे. चिटणिसांवर संभाजीचा राग कां झाला हा एक गूढ प्रश्न आहे. दादजी रघुनाथ देशपांडे व बाळाजी आवजी या दोघांची अत्यंत द्वेष होता, असें तज्जातीय बखरकार म्हणतात. त्या द्वेषाचा सूड घेण्याकरितां, बाळाजी हा संभाजीविरुद्ध चाललेल्या खटपटींत

सामील झाला आहे, अशी चहाडी दादजीनें संभाजीकडे केली, आणि संभाजीनें विशेष विचार न करितां बाळाजीचा जीव घेतला. या प्रकरणांत दोन मुद्दे विचार करण्यासारखे आहेत. एक, बाळाजी व दादजी यांचा द्वेष होता कीं काय ? व दुसरा, बाळाजीच्या हातून संभाजीचा कांहीं अपराध घडला होता किंवा नाहीं ? पहिल्या मुद्याविषयीं बखरकारांचें एकमत आहे. परंतु प्रभुरत्नमालेंत या विरुद्ध प्रतिपादन केलेलें आहे. ( पृ. १८५ ). दादजी व बाळाजी यांचा स्नेह होता, असें त्यांत लिहिलेलें आहे, परंतु त्या लिहिण्यास आधार दाखविलेला नाहीं. दादजी हा येनकेनप्रकारेण प्रसिद्धीस येण्याची खटपट करीत होता, हें त्याच्या अनेक कृतींवरून उघड दिसतें. कलुशा हा दादजीचा पुरस्कर्ता होता, आणि राज्यकारभारांत कलुशाचा नुकताच प्रवेश झाला होता. शिवाजीच्या वेळची मंडळी दूर करणें हाच कलुशाचा पहिला कार्योपक्रम होय. कलुशा कारभारांत नसावा, अशी बाळाजीचीही खटपट होतीच. बाळाजीकडील चिटणिशी काढून दादजीला द्यावी, ही कलुशाची शिफारस संभाजीनें मुळींच मनावर घेतली नाहीं. यावरून इतकें उघड होतें, कीं दादजी चिटणिशी मिळविण्यास उद्युक्त झाला होता. अर्थात् ही गोष्ट त्याचा व बाळाजीचा स्नेह असल्यास संभवत नाहीं. कलुशा गैरहजर असतां बाळाजीनें त्याजविरुद्ध संभाजीकडे खटपट केली. तें पुढें कलुशास कळलें. नंतर कलुशानें संभाजीस मद्यानें बेशुद्ध करून, त्याजकडून चिटणिसास मारविण्याविषयीं रुकार घेतला, आणि तो त्यानें विलंब न लावितां अमलांत आणिला, असें प्रभुरत्नमालेंत लिहिलेलें आहे. बाळाजीच्या मरणास कलुशाही कारण झाला असेलच. परंतु त्यामुळें दादजीवरचा आरोप कमी होत नाहीं. यावरून कलुशा व दादजी हे दोघेही चिटणिसाच्या नाशास कारण झाले असें दिसतें. या प्रकरणांत दादजीस पुढें येऊं न देण्यास ब्राह्मणांची चांडाळचौकडी कारण झाली, असें विधान प्रभुरत्नमालाकारानें केलें आहे, ती निव्वळ गप्प होय. या वेळीं एकही ब्राह्मण संभाजीच्या मर्जींत नव्हता, तर मग चौकडी कोठून असणार ?

दुसऱ्या मुद्याविषयीं विचार करितां, बाळाजी नाइक प्राणांस मुकला असेंच म्हणावें लागतें. अण्णाजी दत्तोच्या पक्षांत तो नव्हताच. शिवाजीच्या मृत्यूची बातमी लपविण्याकरितां पन्हाळ्यास गेलेल्या पत्रांत बाळाजीचें अंग नव्हतें, अशी संभाजीची खात्री त्याच वेळीं बाळाजीनें केली होती. तेव्हां तो पहिला आरोप उकरून काढण्याचें संभाजीस प्रयोजन नव्हतें. बाळाजीस ठार मारण्याची शिक्षा संभाजीनें शुद्धीवर असतांना दिली नाहीं, असें म्हणावें लागतें; कारण ह्या कृत्याबद्दल त्यास पाठीमागून येसूबाई पुष्कळ बोलली, तेव्हां त्यास फार पस्तावा झाला; आणि आपण त्यास कैद करण्याचा हुकूम दिला, मारण्याचा दिला नाहीं; 'त्यांस मारावयाचें नव्हतें.' वगैरे प्रकारें काकुलतीस येऊन संभाजीनें येसूबाईची मनधरणी केली. यावरून रागाच्या आवेशांत तोंडांतून निघालेल्या अपुऱ्या व अस्पष्ट शब्दांचा कलुशानें फायदा घेतला. म्हणून चिटणिसास मारण्याचें पाप संभाजीच्या माथीं येतें, त्याप्रमाणें कलुशाचेही माथीं येतें. संभाजीला कृतकर्माचा पश्चात्ताप होऊन, त्यानें चिटणिशीचें काम बाळाजीचे वंशांतच ठेविलें.

**चिटणिसांचें घराणें.**

[ आंकडे मृत्युकालांचे आहेत. ]




एकंदरींत बाळाजीच्या मृत्यूनें राष्ट्राचें मोठेंच नुकसान झालें. सोयराबाईच्या पक्षास जरी तो मिळाला नाहीं, तरी संभाजीच्या वेडेचारांतही त्याचें अंग नव्हतें. कोणत्याही स्थितींत असतां स्वामिभक्तींत अंतर पडूं

द्यावयाचें नाहीं, हा जो प्रभूंच्या अंगचा मोठा गुण, तो बाळाजीच्या अंगीं परिपूर्ण असल्यामुळें, संभाजीची मर्जी राखून राष्ट्रहिताचें होईल तेवढें कल्याण करावें, असाच बाळाजीचा हेतु होता. ह्या चिटणीस घराण्याचे महाराष्ट्रावर फारच उपकार आहेत. आज जे राष्ट्रेतिहास उपलब्ध आहेत, ते सर्व चिटणीस घराण्यानें लिहिलेले आहेत. स्वराष्ट्रेतिहास लिहून ठेवण्याची महत्त्वाची कामगिरी दुसऱ्या कोणीं बजाविलेली नाहीं, हें ध्यानांत ठेविलें म्हणजे सर्वांनीं प्रभुजातीचे हे उपकार स्मरले पाहिजेत.

बाळप्रभूची हकीकत पूर्वी पृ. २०४ व ४९४ वर दिली आहे. एकदां औरंगजेबाचा व शिवाजीचा तह बाळाजीनें घडवून आणिला. तो तह औरंगजेबाचे दोन कामगार भावसिंग व लालजीप्रभु या दोघांच्या मदतीनें बाळाजीनें सिद्धीस नेला. बाळाजीवर रामदासस्वामीचाही विशेष लोभ होता. राज्याभिषेकाच्या कामांत बाळाजी शिवाजीच्या पुष्कळ उपयोगीं पडला, आणि शिवाजीबरोबरच आपल्याही कुलाचें क्षत्रियत्व स्थापन करून, त्या वेळीं माजलेल्या ग्रामण्याचा त्यानें निकाल केला. रघुनाथपंत हणमंते याच्या कर्नाटकांतील कारस्थानांस बाळाजीनें शिवाजीजवळ पुष्कळ पुष्टि दिली. म्हणून हणमंत्याचा बाळाजीवर विशेष लोभ होता. बाळाजी व शिवाजीचे ब्राह्मण मुत्सद्दी यांचा द्वेष होता म्हणून 'शिवदिग्विजय' बखरींत (पृ. ३६३-३६९) पुष्कळ मजकूर आहे, त्यांत तथ्य काय असेल तें असो. ग्रामण्यासंबंधानें मात्र मोठा वाद माजला होता. शिवाजीच्या वतीनें एकवार मुंबईच्या इंग्रजांकडे जाऊन बाळाजीनें इंग्रजांचा चांगला बंदोबस्त केला. प्रभु इतिहासकार म्हणतो, कीं उमाजी नांवाचा एक इसम संभाजीच्या जवळ होता, त्याच्या मार्फत संभाजीस विपर्यांध करून, 'शिवाजीनें राजारामास गादी द्यावी,' अशी सोयराबाईनें केलेली खटपट बाळाजीनें शिवाजीचे निदर्शनास आणून दिली. तेव्हां उमाजीपंतास दूर करून बाजीप्रभूचा मुलगा, त्रिंबक बाजी नाडकर, यास शिवाजीनें संभाजीजवळ पन्हाळ्यास ठेवून दिलें. सोयराबाईविषयीं शिवाजीचें मन विटण्यास बाळाजीच कारण झाला असें दिसतें. संभाजी रायगडास आल्यावर, 'राजारामास गादी द्यावी, असें ईश्वराचे मनांत असतें, तर त्याजकडे वडीलपणा ईश्वरानें कां बरें दिला नाहीं?' अशी विलक्षण कोटी काढून, बाळाजीनें संभाजीची मर्जी सुप्रसन्न करून घेतली. शेवटीं

बाळाजीचा अंत कलुशाच्या नीच कारस्थानांत झाला. त्यामुळें राज्याचें पुष्कळ नुकसान झालें.

संभाजीनें गुन्हेगार मंडळीस हत्तीच्या पायांखालीं देऊन आपल्या क्रूरपणाची शिकस्त केली, असें वारंवार लिहिण्यांत येतें. मरण हेंच अगोदर क्रूर असतें, परंतु वरील शिक्षेचा क्रूरपणा विसाव्या शतकांतील ताजव्यानें ठरवितां नये. हत्तीच्या पायाखालीं देणें, सुळावर चढविणें, कडेलोट करणें इत्यादि शिक्षा संभाजीचे वेळीं व अगदां अलीकडे अठराव्या शतकाच्या अखेरीपर्यंत जिकडे तिकडे प्रचलीत होत्या. गुन्हा व शिक्षा यांच्या महत्त्वाचें प्रमाण त्या वेळीं आजच्यापेक्षां भिन्न होतें. एकोणिसाव्या शतकाचा बराच भाग निघून जाईपर्यंत ( सन १८३२ ) इंग्लंडांत, दुकानांतील एखादा लहानसा जिन्नस चोरल्याबद्दल, किंवा रस्त्यावर सांपडलेला यःकश्चित् ऐवज लपविल्याबद्दल देहान्त शिक्षा देत असत. अगदीं अलीकडच्या काळापर्यंत जगांतील कोणत्याही देशांत महान् अपराधांस नुसती मरणाची शिक्षा पुरेशी समजली जात नसे; म्हणून कोणत्या तरी क्रूर प्रकारानें मरण आणण्याची त्या वेळीं वहिवाट होती. संभाजीचे वेळीं इंग्लंडांत अनेक क्रूर प्रकार चालत असत. संभाजीनंतर शंभर वर्षांनीं फ्रान्सांत राज्यक्रान्ति झाली, त्या वेळचे क्रूर प्रकार किंवा नेदर्लंडांतील राज्यक्रान्तीच्या प्रसंगीं स्पेनच्या अमदानींत घडलेले प्रकार, कानांनीं ऐकवत नाहींत. ह्या गोष्टी संभाजीवर क्रूरतेचा दोषारोप करणारे विसरतात. ह्यावरून संभाजीचा अपराध क्षम्य अगर हलका होता, असें नाहीं. प्रत्येक गोष्ट तत्कालीन परिस्थित्यनुरूप विचारांत घेतली पाहिजे इतकेंच.

संभाजीची बायको येसूबाई इच्याविषयीं येथेंच उल्लेख करणें इष्ट दिसतें. ह्या शहाण्या बाईचें नांव पुढें अनेक वेळां येणार आहे. ही पिलाजी शिर्के याची मुलगी जिऊबाई. हिचें लग्न संभाजी दिल्लीहून परत आल्यावर सन १६६७ च्या सुमारास झालें. शके १६०२ मार्गशीर्ष शु० १० म्हणजे (डिसेंबर सन १६८०) या वर्षीं तीस मुलगा झाला. त्याचें नांव शिवाजी. हाच पुढें प्रसिद्धीस आलेला शाहू छत्रपति होय. संभाजीनें शिरकाण करून छळिलें असतां, शांतपणें नवऱ्यास चार गोष्टी समजावून सांगून, होईल तितकें राष्ट्रहित साधण्याची येसूबाईनें केलेली खटपट फारच प्रशंसनीय आहे. संभाजीचे मरणानंतर औरंगजेबाचे ताब्यांत असतांना येसूबाईनें

ठेवलेलें धोरण अप्रतिम होतें. बाळाजी आवजीस मारल्यावर, त्याचे धाकटे मुलगे, खंडोबा व निळोबा, यांचें संरक्षण करून यांजला पूर्वपद मिळवून देण्यास हिचीच खटपट कारण झाली. संभाजीचें चित्त ठिकाणावर नाहीं असें पाहून, त्याजकडून तिनें शिक्के मोर्तब आपल्या हातीं घेतलें, आणि दरबारांतून सुटणाऱ्या सर्व हुकुमांवर शिक्के करणें ते ती खंडोबाकडून आपले समक्ष करवूं लागली.

सन १६८२ सालच्या फेब्रुवारी महिन्यांत रामदास मरण पावला. ह्या मृत्यूनें राज्याची फार हानी झाली. संभाजीवर दाब बसवील असा दुसरा वजनदार पुरुष त्या वेळीं नव्हता. रामदासानें आपल्या मरणापूर्वी संभाजीस लिहिलेलें एक पत्र प्रसिद्ध आहे. त्यावरून मराठी राज्याविषयीं रामदासाची कळकळ दिसून येते. ब्रह्मेंद्रस्वामीप्रमाणें चालू राजकारणांत हात घालण्याचा रामदासाचा बाणा नव्हता. म्हणून शिवाजीच्या वेळीं अनेक प्रश्नांसंबंधानें व संभाजीच्या गैरवर्तणुकीसंबंधानें रामदासानें उदासीन वृत्ति धारण केली. यावरूनच तो खरा सत्पुरुष होता ही प्रतीति येते.

महाराष्ट्राची दुसरी एक हानि याच वेळेस झाली. कर्नाटक प्रांतांतील कर्ता पुरुष हणमंते हा सन १६८२ तच मरण पावला. शिवाजीच्या मरणानंतर संभाजी गादीवर बसल्याची बातमी ऐकून, त्यास दोन उपदेशाच्या गोष्टी सांगून पुढील राज्यकारभाराचें धोरण ठरविण्याकरितां, रघुनाथपंत कर्नाटकांतून बरीच मोठी फौज व तीस चाळीस हजार होन संपत्ति बरोबर घेऊन रायगडीं येऊन संभाजीस भेटला. संभाजीनें त्याच्या इतमामास योग्य अशा थाटानें, बिरवाडीस नदीकांठीं भव्य मंडपांत दरबार भरवून त्याची भेट घेतली. पंतानें संभाजीस मेजवानी केली, आणि इतर मंडळीचा बहुमान केला. संभाजीनेंही पंताचा सत्कार केला. ह्या सर्व गोष्टी इतक्या थाटानें घडविण्यांत पंताचा एक स्तुत्य हेतु दिसून येतो. संभाजीच्या दुर्वर्तनाबद्दल एकांतीं जाऊन त्यास पंतानें उपदेश केला असता, तर संभाजीनें तो झिडकारिला असता. परंतु प्रसिद्धपणें दरबार भरवून पंतानें सर्व जुने मुत्सद्दी एकत्र केले, व तेणेंकरून, संभाजी आपलें काम योग्य बजावूं लागेल, तर आपण सर्व त्याच्या हाताखालीं काम करण्यास तयार आहों, असें पंतानें संभाजीस भासविलें. समोर बसलेल्या प्रतिष्ठित व पराक्रमी व्यक्तींचें पुढारीपण आपणाकडे आहे, त्या

पुढारीपणांत विलक्षण जोखीम व जबाबदारी भरलेली आहे, व ती जबाबदारी मोठ्या शहाणपणानें तडीस नेली पाहिजे. असें अप्रत्यक्ष रीतीनें संभाजीस वाटून, त्यानें सन्मार्गास लागावें, अशी ही धूर्त योजना होती. ह्याला अनुसरूनच पंतानें एके दिवशीं दरबारांत सर्व मंडळी बसली असतां, 'पुढील विचार काय?' म्हणून संभाजीस प्रश्न केला. 'राज्याची दिवसेंदिवस वृद्धि व्हावी तें कमीच होत चाललें ह्याचें कारण काय? लोक बेदील; कित्येक ब्राह्मण वगैरे सरदार लोक अन्यायी होते, तरी त्यांस बेड्या घालून किल्ल्यावर नेऊन ठेवावें, ते शिरच्छेद करून कर्ते मारिले. असो. पुढें उबळ शत्रु औरंगजेब येऊन भिडला याचा विचार काय केला आहे? महाराज कैलासवासी झाले नाहींत तोंच हा प्रकार. महाराज कांहीं घेऊन गेले नाहींत.' हें बोलणें संभाजीस रुचलें नाहीं. त्यानें कशी तरी वेळ मारून नेली, आणि पुढें पुढें कलुशाचें प्राबल्य वाढून संभाजी पंताकडे दुर्लक्ष करूं लागला. असें पाहून व आतां येथें राहण्यांत आपली शोभा नाहीं, असा विचार मनांत येऊन, निदान चंदी प्रांताचा तरी बंदोबस्त राहवा म्हणून, एके दिवशीं निरोप घेऊन, रघुनाथपंत चंदीस निघून गेला. तिकडे तो लवकरच मरण पावला. त्रिमल व तिमाजी वगैरे कित्येक मुलगे रघुनाथपंतास होते. पुणें तालुक्यांतील बाणेरी गांव ह्या कुटुंबास शिवाजीपासून इनाम आहे. रघुनाथपंताचे पश्चात् चंदीचा कारभार हरजीराजे महाडीक, व निळो मोरेश्वर पिंगळे यांजला सोंपण्यांत आला; आणि त्याजबरोबर निळो बल्लाळ चिटणीस यासही संभाजीनें दिलें.

**३. संभाजीची परिस्थिति, औरंगजेब व कलुशा.**—संभाजीचा येथपर्यंचा वेळ राज्यारोहण व तत्संबंधीं योजना करण्यांतच गेला. म्हणून त्याच्या खऱ्या कारकिर्दीस आतां या पुढें आरंभ व्हावयाचा. वास्तविक त्याची कारकीर्द एका मोठ्या गोष्टीनें व्यापून गेली आहे, ती मोगलांबरोबरचें युद्ध ही होय. ह्या युद्धास तीस वर्षांचें युद्ध असें नांव मागेंच देण्यांत आलें आहे. तें सन १६७७ मध्यें शिवाजीचे कारकिर्दींत सुरू झालें; आणि शिवाजी व संभाजी यांचे मृत्यूंनीं तें बंद न पडतां तसेंच जोरांत चालून, औरंगजेबाचे मृत्यूनंतर शाहूच्या सुटकेनें सन १७०७त त्याचा शेवट झाला. शिवाजीचे हयातींत तें युद्ध निकरानें चालूं शकलें नाहीं. कारण

शिवाजी स्वतः जिवंत असून औरंगजेब उत्तरेकडील भानगडींत गुंतलेला होता. शिवाजीच्या मरणानें औरंगजेबास आपले हेतु तडीस जाण्याची आशा वाटूं लागली. तशांत त्याच्या मुलगा शहाजादा अकबर हा संभाजीस येऊन मिळाल्यामुळें, मराठ्यांविषयीं बादशहाचा द्वेष फारच वाढला. औरंगजेबाचे हेतु व राजनीति ह्यांचें विवेचन मागें वेळोवेळीं केलेलेंच आहे. अकबर बादशहाचे वेळेपासून सर्व हिंदुस्थानभर एकछत्री मोगल बादशाहीची स्थापना करणें हें मोगलांच्या राज्यकारभाराचें मुख्य धोरण होतें. तें धोरण तडीस जाण्यापूर्वींच अकबर, सलीम व शहाजहान ह्या पराक्रमी पुरुषांचे अंत झाले. तें काम आपण शेवटास नेऊन, फार दिवसांचा हेतु पार पाडावा, अशी औरंगजेबाची उत्कट इच्छा होती. दक्षिणदेश जिंकावयाचा, म्हणजे काबूलपासून कन्याकुमारीपर्यंत स्वतःचा एकछत्री अंमल स्थापन करावयाचा, हीच औरंगजेबानें आपली इतिकर्तव्यता मानिली. आपल्या अवाढव्य लष्कराच्या शक्तीस कपटजालाची योग्य मदत असली, म्हणजे हें काम तडीस जाण्यास विलंब लागणार नाहीं, असें तो समजत होता. सर्व हिंदुस्थान जिंकण्याच्या ह्या इच्छेच्या विरुद्ध जे जे येतील, ते सर्व आपले शत्रू असें औरंगजेब समजे. गोवळकोंडा व विजापुरचीं राज्यें जिंकण्यास औरंगजेब काय काय यत्न करीत होता, हेंही मागें सांगितलेंच आहे. म्हणून आदिलशाही, कुतबशाही व मराठशाही, ह्या तिहींवर त्यानें सारखेंच शस्त्र धरिलें. इतकेंच नव्हे, तर ह्यांशीं लढत असतांच बादशहाची कांहीं फौज म्हैसूर वगैरे प्रांताकडील लहान लहान राज्यें काबीज करीत होती. सारांश, सर्व दक्षिण प्रांतावर अंमल बसवून, आपल्या विजयाचा एकछत्री झेंडा सर्वत्र उभारावा, व फार दिवस लांबलेलें काम स्वतः आपण येऊन लगेच तडीस न्यावें, म्हणून बादशहा राज्यांतील सर्व लष्कर, संपत्ति व साधनें बरोबर घेऊन स्वतः दक्षिणेंत येण्यास अजमिराहून निघाला, (सेप्टेंबर १५, स. १६८१). बरोबर त्याचे तीन मुलगे मुअजम, अज्जम व कामबक्ष व सर्व नातू होते. स्त्रिया व संतति पुष्कळ असल्यामुळें मोगल बादशहांस शहाजाद्यांची नेहमींच मोठी भीति असे. त्यांस दूर ठेवले तर ते बंडें करीत, म्हणून स्वतःच्याच जवळ ठेवून त्यांजकडून कामें घेण्याची युक्ति औरंगजेबानें केली. ह्या शहाजाद्यांस कैदेची किंवा मरणाची भीति नेहमींच असे. असें सर्व लटांबर बरोबर घेऊन औरंगजेब

मार्च १६८२ त औरंगाबादेस व तेथून नोव्हेंबर १६८३ त अहंमदनगरास येऊन राहिला. ह्या ठिकाणीं राहून फौजेची व पैशाची व्यवस्था व परराज्यांशीं वगैरे कारस्थानें स्वत: करून दक्षिणदेश सर्वस्वी पादाक्रान्त करण्याचा उद्योग त्यानें झपाट्यानें सुरू केला. बंडखोर मुलाचा बंदोबस्त, शिवाजीच्या मरणानें नि:सत्त्व झालेल्या मराठशाहीचा विध्वंस, व फार दिवस चाललेला दोन मुसलमानी राज्यांचा अंत, ह्या गोष्टी साधून आसेतुहिमाचलपर्यंत सर्व देशावर निष्कंटक विजयध्वज फडकावीत वर्ष दोन वर्षांत आपण परत जाऊं, अशी औरंगजेबास पुरी खात्री होती. अकबर बादशहाची तडफ व त्याचें कर्तृत्व आपल्या अंगांत असून, शिवाय अकबराच्या अंगीं नसणारें कपटजाल आपल्या ठिकाणीं भरपूर आहे, अशा समजावर बादशहा मोठ्या घमेंडींत होता. परंतु एवढ्या लष्कराच्या साह्यानें जो उद्योग अकबरानें थोड्या अवधींत तडीस नेला असता, तो औरंगजेबाच्या हातून विफल झाला, एवढेंच नाहीं, तर ह्या मृगजलाच्या पाठीस लागण्यांत त्याचा स्वत:चाच सर्वस्वी घात झाला. अशा विपरीत परिणाम होण्यास मुख्य कारण मराठे. मराठ्यांशिवाय पूर्वपश्चिम समुद्रापर्यंतचे इतर सर्व शत्रु औरंगजेबानें पाडाव केले. संभाजीस मारून आपण आपल्या मनोरथमेरूच्या शिखरास पोंचलों असें क्षणमात्र त्यास वाटलें; परंतु लगेच त्याचा भ्रम त्यास कळून येऊन आपले शत्रु सामान्य नव्हत, असें त्यास समजून आलें.

बादशहाचे दुसरे आणखी बेत होते. सुरत मुंबईकर इंग्रज, गोव्याचे पोर्तुगीझ, जंजिऱ्याचे सीदी हे सर्व दर्यावर्दी असून, त्यांची गणना बादशहानें केली नव्हती असें नाहीं. सीदी यास त्यानें आपले ताब्यांत घेऊन, आपल्या हाताखालचा अंमलदार केलें; व ह्या त्रिंशद्वार्षिक युद्धांत त्याची मदत घेतली. इंग्रज व पोर्तुगीझ ह्यांसही त्यानें आपल्या धाकांत ठेविलें होतें. पोर्तुगीझ तर ह्या वेळेस अगदींच खालावले होते. इंग्रज प्रसंग पाहून वागत, आणि मराठे व मोगल या दोघांसही खूष ठेवून स्वत:चा बचाव करीत. परंतु एका प्रसंगीं बादशहास वहीम येऊन दहा वर्षेपर्यंत त्यानें इंग्रजांची अगदीं त्रेधा उडवून दिली होती.

ह्यावरून संभाजीला अडचणी कशा प्रकारच्या होत्या हें व्यक्त होईल. बादशहाच्या जिवावर उड्या मारून स्वत:चें वर्चस्व स्थापन करूं पाह-

गारा सीदी, हा दंडाराजपुरीनजीक जंजिरा येथें संभाजीच्या राजधानीस आपल्या पायाचा टेंका देऊन बसला होता. उत्तरेकडून बादशहानें मराठ्यांस सर्वस्वी गिळून टाकण्याचा खटाटोप चालविला होता. इंग्रज व पोर्तुगीझ स्वार्थावर नजर देऊन दोघांच्यामध्यें आपला लाग साधीत होते. स्वतः संभाजीच्या कुटुंबांत कलह असून, विश्वासघात, गुप्त कट, बेइमान यांच्या दूषित वातावरणानें आपणास पूर्णपणें व्यापिलें आहे, असें संभाजीस वाटत होतें. अशा सर्व विवंचना इंगळ्याप्रमाणें क्षणोक्षणीं त्यास दंश करीत असतां, त्या वेदना सहन करून त्यास आपला मार्ग सुधारावयाचा होता. संभाजीची जी हकीकत ठिकठिकाणीं दिलेली आहे, तीवरून त्याच्या कर्तृत्वाबद्दल बरीचशी पूज्यबुद्धि व त्याच्या दुर्दैवाबद्दल पुष्कळशी कींव वाटल्याशिवाय राहत नाहीं. सामान्यतः संभाजीविषयीं कोणतेंही मत ठरवितांना आपण त्याच्या परिस्थितीकडे अगदीं दुर्लक्ष करितों. शिवाजीनें कमावून ठेवलेलें राज्य आपल्या व्यसनानें व मूर्खपणानें संभाजीनें घालविलें, असा एकतर्फी निकाल देऊन आपण त्यास दोषी ठरवितों. परंतु सर्व परिस्थिति कळल्यावर हा समज चुकीचा ठरूं लागतो. शिवाजीच्या मरणानंतर मराठशाहीवर केवढें अरिष्ट कोसळलें ह्याची कल्पना सामान्य वाचकांस होण्यासारखी नाहीं. संभाजीनें हें अरिष्ट निवारण्यासाठीं आटोकाट प्रयत्न केले. तो व्यसनाधीन नव्हता असें नाहीं, परंतु शिवाजीचा मुलगा म्हणवून घेण्यास तो अगदींच नालायक नव्हता. त्याच्या नऊ वर्षांच्या कारकिर्दींत शिवाजीप्रमाणें त्यासही एक दिवस देखील स्वस्थपणें झोप घेण्यास फुरसत मिळाली नाहीं. सर्व शत्रूंशीं एकसमयावच्छेदेंकरून तो सारखा लढत होता; सर्वांवर त्यानें आपली छाप बसविली होती. विजापुर व गोवळकोंडा येथील राज्यांचा पाडाव होईपर्यंत संभाजीस म्हणण्यासारखें अपयश आलें नाहीं; पण तीं राज्यें खालसा केल्यावर बादशहाला आपल्या प्रचंड शक्तीचा उपयोग एकट्या संभाजीवर करितां आला. शिवाजीच्या वेळेस चहूंकडून इतकीं तीव्र संकटें एकदम आलीं नाहींत, किंवा आपल्या अकलेनें तीं त्यानें येऊंही दिलीं नाहींत. हिकमत, कावा, वेळअवेळ हीं संभाजीस ठाऊक नव्हतीं. म्हणून दोन शत्रु एकदम अंगावर चालून आले असतां, एकाची तात्पुरती समजूत करून दुसऱ्याच्याच अंगावर सर्व बाजूंनीं धसरून त्याचा चकाचूर उडविण्याची जी शिवाजीची युक्ति, ती संभाजीनें कधींच अव-

लेखिली नाहीं. सर्व शत्रूंस एकदम अंगावर आणून न घेतां, युक्तियुक्तीनें एकएकाचा निकाल लावण्याची शिवाजीची हातोटी संभाजीस साधली नाहीं, ही त्याची मोठी चूक होय. शत्रु म्हटला कीं त्यास हार म्हणून जावयाचें नाहीं; त्याजबरोबर लढतांना प्राण गेला तरी बेहत्तर, पण युद्धच करावयाचें, हा संभाजीचा स्वभाव व बाणा. तो स्वभावाचा उतावळा व साधाभोळा, जितका वीर्यशाली व शूर, तितकाच हट्टी व रागीट; प्रत्यक्ष मृत्यूचा त्यानें स्वीकार केला, पण आपला मानी स्वभाव सोडिला नाहीं. ह्या अशा स्वभावामुळें त्याचें नुकसान झालें खरें; पण आपण सामान्यत: मानितों तसें निंद्य अगर तिरस्करणीय असें त्याच्यांत कांहीं नव्हतें. एकदां अशा स्वभावाच्या पुरुषास विश्वासघात व गुप्त कट यांच्या भावनेनें पछाडलें, कीं मग त्यास दुसरें कांहींच दिसत नाहीं. त्याच्या अत्यंत फायद्याची एखादी गोष्ट त्यास सांगितली असतांही, ती त्यास खरी वाटत नाहीं. तिचा फायदा त्याच्या मनावर ठसविण्यास जितके ज्यास्त प्रयत्न करावे तितका त्यांचा उलट परिणाम होतो. अशा मनुष्यास सुख व शांति ह्यांचा लवलेशही मिळत नाहीं. त्याच्या जिवाची तळमळ कधींही कमी होत नाहीं. एक भरंवसा नसल्यानें संभाजीची अशी अवस्था झाली. औरंगजेबाचा स्वभाव अविश्वासाचे संबंधानें याच मासल्याचा होता; पण पोटांतील भाव बाहेर न दाखवितां विपरीत भावाचें पांघरूण घेण्याची कला त्यास उत्तम साधली असल्यानें, त्याचा नाश तितक्या लवकर झाला नाहीं. परंतु अविचाराचा व असत्याचा परिणाम दोघांसही अंतीं सारखाच भोंवला.

परकीय इतिहासकार ऑर्म् यानें संभाजीच्या मोहिमांची सविस्तर, रसाळ व मुद्देसूद अशी हकीकत दिली आहे, ती वाचली म्हणजे शौर्य, धाडस, कंटकपणा इत्यादि संभाजीचे गुण पाहून मन अगदीं थक्क होऊन जातें, आणि अशा पुरुषास शेवटीं अपयश आलेलें पाहून उद्वेग होतो. इंग्रज, पोर्तुगीझ, सीदी व मोगल ह्या चार शत्रूंबरोबर तो सतत नऊ वर्षें झगडत होता. तितक्यांसही त्यानें दाद दिली नाहीं; तितक्यांचाही त्यानें अनेक वेळां खरपूस समाचार घेतला. ऑर्म् व मनूची यांच्या लेखावरून दिसतें कीं, संभाजीच्या तरवारीस एक दिवसाची देखील विश्रांति मिळाली नाहीं. प्रत्यक्ष शिवाजीचे हातूनही असे श्रम

व इतकी मेहनत कधीं दिसून आली नसेल. यावरूनच संभाजीची योग्यता कळून येण्याजोगी आहे. व्यसनासक्त असतांही आपली व्यसनी मनीषा तृप्त करून घेण्यास त्यास अवधिच मिळाली नाहीं. गृहकलह व प्रधानमंडळांतील दुफळी कायम असून, संभाजीचे ठिकाणीं राजाराम गादीवर असता, तर राज्याचें संरक्षण याहून चांगलें झालें असतें, असें ऑर्मच्या इतिहास वाचून वाटत नाहीं. संभाजी कैदेंत असून, राजाराम गादीवर असता, तरी संभाजीबद्दल खटपट करणारा पक्ष कायम राहताच; आणि शत्रूंस हार जाण्यापेक्षां अन्य उपाय प्रधानमंडळास राहिला नसता. मात्र संभाजीचे हुकूम उठविण्यास त्याच्या विक्षिप्त स्वभावामुळें कोणी धजत नसे, तसा प्रकार राजारामाचे वेळेस कदाचित् न होता, आणि सर्व लोकांनीं मनोभावेंकरून त्यास साह्य केलें असते. परंतु निःसहाय व निराधार संभाजीस स्वतःच्याच अकलेनें राज्यकारभाराचें गलबत तत्कालीन परिस्थितीच्या खवळलेल्या भयंकर समुद्रांतून हाकारून न्यावें लागलें, तें त्यास साधलें नाहीं.

निकोलो मनूची नांवाचा एक व्हेनिसचा प्रवासी स. १६५६ पासून स. १७१७ पावेतों हिंदुस्थानांत निरनिराळ्या ठिकाणीं फिरत होता. त्याचा जन्म स. १६३९ त होऊन लहानपणींच तो स्वदेश सोडून फिरत फिरत इकडे आला. शिवाजीची व जयसिंगाची भेट झाली तेव्हां तो जयसिंगाजवळ तोफखानाकामदार असून, संभाजी पोर्तुगीझांशीं लढत असतां, त्याकडून वकील म्हणून तो संभाजीकडे गेला होता. तो सर्व लोकांत मिसळणारा असून त्याचे बहुतेक आयुष्य मोगलांचे दरबारीं गेलें; आणि त्यास नानाप्रकारचा अनुभव होता. औरंगजेबाचा वडील पुत्र शहाआलम (मुअज्जम) याजपाशीं मनूची डॉक्टर म्हणून पुष्कळ वर्षें राहिला, आणि स. १७१७त मद्रास येथें मरण पावला, तेव्हां त्याजपाशीं दीड लाख संपत्ति होती. ह्या मनूचीनें मोगल बादशाहीचा तत्कालीन वृत्तान्त विस्तृत व खुलासेवार लिहिलेला पुष्कळ दिवस सांपडला नव्हता, तो अलीकडे बाहेर येऊन त्याचें सुंदर व सटीप भाषांतर हिंदुस्थानसरकाराच्या तर्फेनें वुल्यम अर्व्हिन यांनीं स. १९०७ सालीं चार भागांत प्रसिद्ध केलें. बादशहा, त्याचें कुटुंब, तत्कालीन सरदार व घडामोडी मनूचीनें प्रत्यक्ष पाहिलेल्या असल्यामुळें, ह्या वृत्तान्ताची किंमत विशेष आहे. ह्या वृत्तान्तांत संभाजी-

संबंधानें सुमारें शेंपन्नास पानें मजकूर आहे. तो वाचला असतां संभाजीविषयीं वर नमूद केलेला ग्रह अत्यंत दृढ होतो, त्याच्या पराक्रमाविषयीं आदर वाटूं लागतो, आणि पोर्तुगीझ, इंग्रज व मोगल बादशहा यांजला त्याची कवढी दहशत पडली होती हें स्पष्ट कळून येतें. बापाची मुत्सद्देगिरी अगर समयज्ञता त्यास नव्हती, म्हणून त्यास यश आलें नाहीं. थोड्या शा व्यसनासक्ततेमुळें त्याच्या सर्व पराक्रमावर पाणी पडलें. सबब केवळ परिणामावरून संभाजीची योग्यता ठरविणें रास्त नाहीं. मरणापूर्वी कांहीं थोडे महिने मात्र तो नादांत होता. हा सर्व प्रकार मनूचीवरून उघड होतो. मनूचीनें त्यास प्रत्यक्ष पाहिलें होतें.

साह्यकर्ते संभाजीच्या कार्किर्दीचे कागदपत्रही फारसे उपलब्ध नाहींत. याचें कारण असें दिसतें कीं, त्याची सर्व कारकीर्द लढण्यांत गेल्यामुळें राज्यकारभार असा कांहीं चाललाच नाहीं. शिवाय राज्याची व्यवस्था पाहण्यांत शिवाजीचें लक्ष होतें तसें संभाजीचें नव्हतें, सबब लिहिण्याचें काम फारसें झालें नाहीं. प्रधान व सरदार यांविषयीं अविश्वास, सर्व शत्रूंशीं एकाच काळीं चाललेले युद्धप्रसंग, व विषयान्धता ह्या तीन बाबतींनीं संभाजीचें चरित्र भरलेलें आहे. तथापि कांहीं थोडे कागद शिवकालीन पत्रव्यवहारांत अलीकडे बाहेर आले आहेत. ( खं. ८,१५,१६,१७,१८,२० ) त्यांवरून असें दिसतें कीं, अष्टप्रधानांस दूर करून, त्यांच्या सर्व जागा संभाजीनें एकट्या कलुशास दिल्या, हा जो आरोप त्याजवर आहे तो सर्वथैव निराधार आहे. अष्टप्रधानांपैकीं एकही पद त्यानें कलुशास दिलें नाहीं. निळोपंत पिंगळे पेशवेगिरीवर होता. अमात्याचें काम रामचंद्रपंत करीत होता. दादजी रघुनाथास अमात्यपद देण्याचा विचार चालला होता, पण तो अमलांत आला नाहीं. आरंभीं रामचंद्रपंतावर संभाजीचा रोष होता, तो हळूहळू कमी झाला, आणि दक्षिण महाराष्ट्रांतील प्रदेश संभाळण्याचें काम त्यानें केलें, आणि जेमतेम आपला बोज राखून वेळ काढिला. अमात्याचें पद त्र्यंबक (?) रघुनाथ हणमंते याजकडे कांहीं दिवस होतें. हा त्र्यंबक पंडित विद्वान् व ग्रंथकर्ता होता. ( भा. इ. सं. १८३६–१५ ). कलुशाच्या संगतीमुळें रामचंद्रपंताचा उपयोग संभाजीनें चांगला करून घेतला नाहीं, ह्यांत राज्याचें नुकसान झालें. सचिवाचें पदही अण्णाजी दत्तोनंतर कांहीं काळ रामचंद्रपंताकडे होतें. खं. ८ ले. ४० चें १६

मार्च स. १६८६ चें एक शुद्धिपत्र छापलेलें आहे. गंगाधर रंगनाथ नांवाचा औरंगजेबाकडील एक ब्राह्मण मोगलांच्या जुलमानें जातिभ्रष्ट होऊन मुसलमान झाला होता. त्यास कविकुलेशानें संभाजीच्या परवानगीनें प्रायश्चित्त देऊन शुद्ध करून घेतलें. या पत्रावर पुष्कळांच्या सह्या आहेत, त्यांत मोरेश्वर पंडितराय ह्याची सही पहिली आहे. कविकुलेशाची सही 'छंदोगामात्य' एवढीच आहे. संभाजीचा कवि महेशदास याची सही आहे. ह्यावरून उघड होतें कीं 'पंडितराय' हें पद सुद्धां संभाजीनें कलुशास दिलें नव्हतें. मोरेश्वर पंडितरायाचीं आज्ञापत्रें पुष्कळ आहेत. सत्कार्योत्तेजक सभेच्या ९ व्या खंडांत संभाजीच्या वेळचीं कांहीं पत्रें आहेत. त्यांत रामदासी मठांचीं पूर्वीचीं उत्पन्नें पुढें चालविलीं. सारांश अष्टप्रधानांत संभाजीनें फिरवाफिरव केली नाहीं. मात्र संभाजीपुढें जाण्यास कलुशाशिवाय दुसरा कोणी धजत नसे. त्यामुळें बहुतेक कामें कलुशाच्याच तंत्रानें चालत. कलुशाला महाराष्ट्राचा अभिमान नव्हता.

कलुशा म्ह० 'कविकुलेश' हा कनोजा ब्राह्मण अलाहाबादजवळचा राहणारा असून काशी क्षेत्रांतील भोसल्यांचा कुलोपाध्या म्ह. पंडा होता. शिवाजी आग्र्यांतून सुटून गेल्यावर परत येतांना त्यानें संभाजीस ह्या कविकुलेशाच्या स्वाधीन केलें.तेथून पुढें संभाजीस घेऊन तो दक्षिणेंत आला, तेव्हापासून संभाजीपाशींच राहत होता. (Mod. Review.) 'कुलेश' ह्याचा अपभ्रंश मराठींत कलुशा असा झाला. ह्यासंबंधांत 'कलश' शब्दावरून रा. राजवाड्यांनीं ठरविलेली व्युत्पत्ति खरी नाहीं. कवि या उपनांवावरून त्यास कविजी ऊर्फ कबजी म्हणत. शिवाजीच्या कारभाराचें रहस्य त्यास कळणें शक्य नव्हतें. मंत्रविद्येची त्यास घमेंड होती. त्यापुरतें थोडेसें संस्कृत त्यास येत होतें. तो बोलणार मिठ्ठा व सहज दुसऱ्यावर छाप बसविणारा होता. परदेशीय असल्यामुळें आपणाविरुद्ध कारस्थानांत सामील होणें त्यास शक्य नाहीं, अशा समजुतीनें त्याजवर संभाजीनें सर्व भरंवसा टाकिला. उत्तर हिंदुस्थानांत व विशेषतः तीर्थांच्या ठिकाणीं नानातऱ्हेचीं व्यसनें प्रचलित होतीं. भांग, गांजा वगैरे प्रकार अगदीं नेहमीचे होते. अशा बाबतींत कलुशा परिपूर्ण असावा. संभाजी दोन तीन वर्षें तरी काशी प्रयागकडे कलुशाच्या संगतींत राहिला होता, आणि दक्षिणेंत आल्यावरही कलुशा बहुतेक संभाजीजवळच असे. संभाजीचा व्यसन-

प्रवेश बहुधा त्याच्याच मार्फत झाला असावा. शिवाजीच्या तालमेंत त्या वेळीं दुसरा कोणीही मनुष्य व्यसनासक्त होता असें दिसत नाहीं. म्हणून व्यसनांची जबाबदारी कलुशावर येते. अशा मनुष्यानें आपली छाप संभाजीवर संपूर्ण बसवावी, हें अगदीं स्वभावानुरूप आहे. महादाजी निंबाळकर व हरजी राजे महाडिक हे संभाजीचे मेहुणे व म्हालोजी घोरपडे वगैरे अनेक सरदार नेहमीं संभाजीजवळ असत, आणि होईल तितकी त्याची सेवा एकनिष्ठेनें करीत. परंतु कोणाचेंही त्याजवर वजन म्हणून पडलें नाहीं. तिसरा मेहुणा गणोजी शिर्के, संभाजीच्या रागांतून जीव बचावून, उघडपणें औरंगजेबास मिळाला. पुढें झालेला शंकराजी नारायण संभाजीच्या लढायांत नेहमीं पुढें होता. वाकेनीस म्हणजे मंत्री ह्या पदावर दत्ताजी त्रिमळ शिवाजीच्या वेळेपासून होता, तें काम त्यानें शाहूच्या आगमनापर्यंत केलें. संभाजीनें त्याचें पद काढिलें नव्हतें. रामदासी खंड ९ यांत दत्ताजीपंताचीं आज्ञापत्रें पुष्कळ आहेत, ( ले. १७–२६ ). महेशदास नांवाचा संभाजीचा भाट अगर कवि होता.

बखरकारांच्या हकीकती एकदेशीय आहेत, हें वारंवार सांगण्यांत आलेंच आहे. परंतु ऑर्म् व मनूची ह्यांच्या हकीकती वाचल्या म्हणजे संभाजीच्या कर्तबगारीवर चांगला प्रकाश पडतो; आणि त्याची खरी बाजू डोळ्यांपुढें दिसूं लागते. बखराकरांच्या लिहिण्याशीं मेळ कसा बसवावयाचा हा एक प्रश्न आहे. 'मद्य, वेश्या, मृगया इत्यादिकांच्या नादांत सदा निमग्न राहिल्यानें बाहेर काय गोष्टी घडत आहेत, सर्व राज्यभर शत्रु कसे संचार करीत आहेत, याची संभाजीस कल्पना देखील नव्हती. पन्हाळा व विशाळगड यांच्या दरम्यान एकांत स्थळीं विलासमग्न राहून तो आपल्या सुखांत किमपि व्यत्यय येऊं देत नसे.' असे उद्गार बखरींत पदोपदीं आहेत. संभाजी जर विलास करीत होता, तर शत्रूंशीं त्यानें अव्याहत झगडा चालाविला, ह्या ऑर्मूच्या लेखांत सत्यता किती समजावयाची ? ह्या प्रश्नाचा विचार करितांना बखरींच्या लेखांचा खरा झोंक कोणत्या दिशेस असतो, हें सांगितलें पाहिजे. स्वराष्ट्राचे इतिहास म्हणून बखरींची किंमत अतोनात आहे, परंतु कित्येक प्रसंगीं त्यांतील वर्णनें शब्दशः खरीं मानून चालणें धोक्याचें होईल. एकादी गोष्ट घडून आल्यानंतर ती जरा फुगवून सांगावी, तिच्यांतील

वैचित्र्य वाढवून तिचें अघटितत्व स्थापन करावें, क्षणभर विस्मयपूर्ण वर्णनानें वाचकांचे मनांत तल्लीनता वाढवून व त्यांच्या चित्तवृत्ति तटस्थ करून नाटकी रस आणावा, अशी कित्येक ठिकाणीं बखरींची रचना आहे. परंतु अशा रचनेच्या योगानें इतिहासास अत्यंत आवश्यक जो कार्यकारणभावाचा परिस्फोट त्याचा लोप होऊन जातो. त्यामुळें एखाद्या बनावाचीं खरीं कारणें लुप्त होऊन, तो कांहीं विलक्षण दिव्य चमत्कारानें घडून आला, अशी वाचकांची समजूत होते. उदाहरणार्थ, शिवाजीच्या वेळेस द्रव्य पुरून ठेवण्याची चाल सार्वत्रिक होती. शिवाय त्या वेळीं लोक आपली खरी सधनता लुप्त ठेवीत असत. मनुष्यस्वभाव ओळखण्यांत व सर्व ठिकाणची व लोकांची गुप्त बातमी काढण्यांत शिवाजीचा हात खंडा होता, व त्यास लोकसाहाय्यही पुष्कळ होतें. त्यामुळें अनेक ठिकाणचे गुप्त ठेवे तो अचानक बाहेर काढीत असे. पण ही वस्तुस्थिति वर्णन करणें बखरकारांस न आवडून गुप्त ठेवे बाहेर आणण्यांत शिवाजीला देवीची मदत होती, असें त्यांनीं पदोपदीं लिहिलें आहे. प्रत्यक्ष शिवाजीचा महाभारताशीं संबंध जोडून तो शंकराचा अवतार होता, असें त्यांनीं स्थापन केलें आहे. बखरकारांचा हा कल ध्यानांत ठेवून बखरी वाचल्या म्हणजे त्यांतील विपर्यास वजा करून खरा कार्यकारणभाव दाखविण्याचें काम फारसें कठीण नाहीं. संभाजीनें फार क्रूरपणा केला. त्याचीं व्यसनें सर्वश्रुत होतींच. शिवाजीच्या प्रधानांस दूर ठेवून एका अप्रबुद्ध मनुष्यावर त्यानें सर्व भरंवसा टाकला, व शेवटीं अत्यंत हाल अपेष्टांनीं तो आपल्या राज्यास व प्राणांसही मुकला. असला मनोविकारविक्षोभक प्रकार वर्णन करण्याची बखरकारांस संधि मिळाल्यावर ते फुकट कां घालवितील? संभाजीच्या मरणानंतर ते बखरी लिहूं लागले. संभाजीचा भयंकर शेवट त्यांच्या डोळ्यांपुढें होता. शिवाजीचें दिव्य स्वरूप ते विसरले नव्हते. तेव्हां शिवाजी व संभाजी यांच्या चरित्रांतील विरोध स्पष्ट करून, संभाजीच्या परिणामाचा कार्यकारणभाव न दाखवितां, उलट त्यांनीं तो बाजूस सारिला व सर्व अपयशाचें खापर संभाजीच्या विलासमग्नतेवर फोडलें, यांत नवल नाहीं. परंतु संभाजीनें नऊ वर्षांत ज्या हालचाली व उलाढाली केल्या, त्यांची इंग्रजी पुस्तकांतील हकीकत वाचली, म्हणजे संभाजीला चैन भोगण्यास आठ चार दिवसांचीही फुरसत मिळाली असेल, असें वाटत

नाहीं. मात्र शेवटीं शेवटीं दिवसेंदिवस ज्यास्तच संकटें येत गेल्यामुळें तो थोडासा हताश झाला असावा, आणि अशा स्थितींत यातना विसरून जाण्याचें एक साधन जी व्यसनासक्ति तिचा त्यानें बराचसा अंगीकार केला असावा. निदान औरंगजेबाचे फौजेनें त्यास पकडिलें, त्यापूर्वीं थोडे दिवस तो गाफील होता यांत संशय नाहीं. परंतु शेवटच्या थोड्या महिन्यांच्या आचरणावरून एकंदर कारकीर्दीचें अनुमान करणें योग्य होणार नाहीं.

वर जें संभाजीच्या आचरणाचें थोडेसें समर्थन केलें आहे, त्यावरून संभाजीनें जुन्या प्रधानमंडळाचा त्याग करून एका अप्रयोजक माणसास कां हातीं धरिलें, ह्याचाही बराच उलगडा होतो. हा मनुष्य कविकुलेश होय. संभाजीस राज्याभिषेक होण्यापूर्वीं तो त्याजकडे आला. खाफीखान म्हणतो, कीं शिवाजी दिल्लीहून पळून आला, तेव्हां त्यानें संभाजीस मागें अलाहाबादेस ठेविलें. अलाहाबादेहून संभाजी दक्षणेंत आला, तेव्हां हा कलुशा त्याजबरोबर इकडे आला. ( इलियट पु. ७, पृ. ३०५ ). गोड गोड बोलून व नानातऱ्हेच्या मांत्रिक सामर्थ्याच्या वगैरे फुशारक्या मारून, त्यानें संभाजीची मर्जी सुप्रसन्न करून घेतली. सभोंवार गुप्त कटाचा जबरदस्त संशय संभाजीस येत असतां, गुप्त चहाडीच्या जोरावर कलुशानें संभाजीच्या मनांत स्वतःविषयीं अत्यंत प्रेम व इतरांविषयीं अत्यंत द्वेष उत्पन्न केला. पुढें कांहीं काळानें शहाजादा अकबर याचे मार्फत अण्णाजी दत्तोचें कारस्थान उघडकीस येऊन, बाळप्रभूसारख्या इमानी माणसाविषयींही त्याच्या मनांत अत्यंत वहीम उत्पन्न झाला. आरंभीं संभाजीनें कलुशाचा राज्यकारभारांत थोडासा प्रवेश करून शेवटीं सर्व कामें तो त्याच्याच संमतीनें करूं लागला. कलुशानें सांगितलेल्या युक्त्या संभाजीस पटत गेल्या; आणि नाइलाजास्तव कोणा तरी अशा मनुष्यावर विश्वास टाकणें संभाजीस भाग पडलें. कलुशाच्या मांत्रिक शक्तीचाही आपणास पुष्कळ उपयोग होईल, असें संभाजीस वाटलें असावें. अनुष्ठानें वगैरे बसवून एकादी दुःसाध्य गोष्ट साध्य करून घेण्याची शकल आपल्या चांगली कामास येईल, असा संभाजीस भरंवसा होता. कलुशाच्या साह्यानें इतर कोणास न विचारतां शत्रूंचा पाडाव करण्याची हिंमत संभाजीनें धरिली. संभाजीनें कलुशास फक्त 'छंदोगामात्य'

(म्हं० मंत्रविद्याप्रयोजक ?) हें पद दिलें. पेशवे, सचिव, सेनापति वगैरे सर्व अष्टप्रधान आपापल्या जागांवर होते. मात्र त्यांचें फारसें चालत नसे.

औरंगजेबाचा मुलगा अकबर दुर्गादास यास बरोबर घेऊन पळून दक्षिणेंत आला. ९ मे १६८१ रोजीं नर्मदा पार होऊन बऱ्हाणपुर, तालनेर, बागलाण येथून संभाजीच्या मुलखांत तो आला. संभाजीनें त्यास कशा रीतीनें वागविलें याजबद्दल निरनिराळ्या लेखकांचा मतभेद आहे. खाफीखान म्हणतो, 'प्रथम संभाजीनें त्याचा सत्कार उत्कृष्ट केला. रायगडापासून सहा मैलांवर एका वाड्यांत त्यास ठेविलें. परंतु पुढें संभाजीची मर्जी त्याजवरून उतरली, आणि त्याच्या खर्चास वगैरे तो पुरेसें देईनासा झाला.' भीमसेन म्हणतो, 'संभाजीनें अकबरास मोठ्या सन्मानानें व औदार्यानें वागविलें.' एक गोष्ट उघड आहे कीं, आपण बादशहा आहों असें अकबरानें संभाजीस भासविलें. पण संभाजी फसला नाहीं. हा बादशहाचा मुलगा पळून येऊन आपला पाहुणचार खात आहे, ही गोष्ट संभाजी विसरला नाहीं, आणि आपला मान राखून तो त्या शहाजाद्याशीं वागला. शिवाय अकबरास नेहमींच अशी एक भीति होती कीं, बादशहाशीं सख्य करून संभाजी व त्याचे लोक आपणास पकडून त्याच्या हवालीं करितील. पुढें पुढें त्यास संभाजीकडे राहणें सुरक्षित न वाटून तो कांहीं दिवसांनीं पश्चिम किनाऱ्यावर गलबतांत बसून इराणांत गेला. अकबर व संभाजी यांचा जो पत्रव्यवहार झाला, तो ग्रँट डफ् यास पाहण्यास मिळाला होता. त्यांच्या नकलांचें भाषांतर प्रो० सरकार यांनीं मॉडर्न रिव्ह्युमध्यें प्रसिद्ध केलें त्याचा मतलब येणें प्रमाणें:—

महंमद अकबराचें संभाजीस पत्र.—'राज्य करूं लागल्यापासून हिंदूंस बुडवावें, असा औरंगजेबाचा निश्चय आहे. रजपुतांशीं युद्ध करण्याचें कारण हेंच. सर्व लोक ईश्वराचीं लेंकरें असून राजा हा त्यांचा संरक्षक आहे; म्हणून लोकांचा नाश करणें बादशहास योग्य नाहीं. औरंगजेबाचीं कृत्यें मर्यादेबाहेर गेलीं, आणि माझी खात्री झाली कीं, लोकांचा आपण अशा रीतीनें नाश केला तर हा देश आपल्या हातचा जाईल. अशा स्थितींत तुमचें राज्य बादशहाचे मुक्कामापासून दूर आहे असें पाहून, मी तुमचेकडे येण्याचा निश्चय केला. दुर्गादास राठोर मजबरोबर आहे. मजबद्दल आपलें मन निःशंक असूं द्या. परमेश्वरकृपें मला राज्य मिळालें तर

मी फक्त नांवाचा धनी,राज्य सर्व तुमचें असें समजा. आपण दोघांनीं मिळून बादशहाचा पाडाव करूं. सुज्ञांस विस्तारें काय लिहावें.' ता.११ मे १६८१.

या पहिल्या पत्राचा जबाब आला नाहीं तो पाठवावा असा मजकूर पुढच्या पत्रांत आहे. त्या पुढचें पत्र २० फेब्रुवारी १६८२ चें आहे. त्यांतील मजकूरः—' कविकुलेश हे तुमचे फार उत्कृष्ट व विश्वासू नोकर आहेत. त्यांजद्दल तुमच्या इतर प्रधानांस वैषम्य न वाटो म्हणजे झालें. कांहीं झालें तरी तुम्हीं त्यांचें संरक्षण केलें पाहिजे. तुमच्या लिहिण्यावरून तुम्ही हल्लीं खेळणा किल्ल्याकडे गेलां आहां, असें मी समजतों. तुमची इच्छा असेल तर मीही तुह्मांस येऊन मिळतों.' महंमद अकबराचें कविकुलेश यास पत्रः—तुमचीं दोन पत्रें पोंचलीं. २ जानेवारी १६८३ रोजीं तुम्ही माझ्या भेटीस येणार म्हणून लिहिलें तें कळलें. आमच्या शास्त्राप्रमाणें हे दिवस ' अशूरा ' असून भेटीस योग्य नाहींत. पुढें कोणता तरी दिवस नेमून लिहून पाठवा, म्हणजे त्या दिवशीं मी साखरप्याहून निघून मलकापुरास येतों. पत्रोत्तर तावडतोब पाठवावें.'

त्यानंतरचें कविकुलेश यास पत्रः—' तुमचें पत्र पोंचून मजकूर कळला. पांचाड येथें तुम्ही आल्याचें समजलें. मोगलांशीं तह करण्यास माझी हरकत नाहीं. परंतु तह करावा, असें मला वाटत नाहीं. तुमच्या भेटीची जरूर आहे. पुष्कळ राजकारणें ठरवितां येतील. हीं राजकारणें पावसाळ्यांतच केलीं पाहिजेत. तह होत आहे असें समजून स्वस्थ मात्र बसू नका. पावसाळा संपल्यावर भीमगडचें काम हातीं घ्यावें. नीट विचार करून काय करणें तें करा.' ता. १८ ऑगस्ट १६८२.

त्यापुढचें पत्रः—'कविकुलेश यास १३ मार्च १६८२ रोजीं मी जैतापुरास पोहोंचलों. पत्र पावतांच तुम्ही येऊन मला भेटा. शत्रू नजीक येत आहेत. कोणे वेळेस काय होईल याचा नेम नाहीं.'

त्यापुढचें पत्रः—' तुमची प्रकृति बरी नाहीं हें कळलें. तह करणें किंवा न करणें हें केवळ संभाजीच्या व तुमच्या मर्जीवर आहे. परंतु तहाच्या बोलण्यावर विश्वास ठेवून स्वस्थ बसणें मात्र योग्य नाहीं. विजापुरच्या कामाचें काय झालें तें कळवावें. ११ सेपटेंबर १६८२.'

त्यानंतरचें पत्रः—' तुमचें पत्र पोचलें. १ जानेवारीस ग्रहणाचे स्नानासाठीं तुम्ही कोल्हापुरास जाणार असून १६।१७ तारखेला मलकापुरांत

येऊन मला भेटा म्हणून लिहिलें तें समजलें. मीही साखरप्याहून निघून त्यासुमारास तेथें येतों. तुम्ही तेथें येऊन भेटण्यास चुकूं नये. नंतर तेथून तुम्हास कोल्हापुरास जातां येईल. कळावें.'

संभाजीस वश करून आपल्या ताब्यांत आणून देण्याकरितां, कलुशास औरंगजेबानें नानातऱ्हेनें भारून आपला हेर म्हणून बुध्या संभाजीकडे पाठविलें, असा एक प्रवाद आहे. बखरकारांचा जो कल वर सांगितला आहे, त्याचेंच हें एक उदाहरण होय. त्यांत कांहीं खरेपणा आहे असें वाटत नाहीं. कलुशा प्रथम औरंगजेबाकडून आला नव्हता. त्याच्याच तंत्रानें संभाजी सर्वस्वी वागतो असें स्वतः औरंगजेबानें पाहिल्यावर, संभाजीच्या मरणापूर्वी थोडे दिवस त्या दीर्घसूत्री बादशहानें कलुशाशीं फितुरी चालविली. कलुशानें संभाजीस पकडून बादशहाच्या स्वाधीन करावें, असा घाट होता; पण तो तडीस गेला नाहीं. संभाजीवर कलुशाचें अनन्यसामान्य वजन, दूरदूरचे देश ताब्यांत ठेवण्यास कठीण म्हणून ते सोडून द्यावे असा कलुशाचा त्यास उपदेश, मंत्रविद्येचे केलेले प्रयोग, व अखेरीस चाललेली फितुरी, इत्यादि गोष्टींचा उलगडा करण्याच्या नादीं बखरकार पडले नाहींत. कलुशाचें व औरंगजेबाचें सूत होतें, असें सांगून संभाजीच्या चरित्रामध्यें कल्पित कादंबरीचा थाट त्यांनीं होईल तितका उठवून दिला आहे.

पुढें ज्या युद्धाचें वर्णन करावयाचें तें संभाजीनें एकाच वेळेस अनेकांशीं एकसारखें चालू ठेविलें. त्यांतील मोहिमांस बरसातीनंतर सुरुवात होऊन, त्या वर्षाकालारंभीं बंद पडत. म्हणून त्या मोहिमा पृथक्पणें दाखविण्याची जरूर नाहीं.

४. संभाजी, सीदी व इंग्रज.—शिवाजी मरण पावला, त्या वेळेस खांदेरी बेट त्याच्या ताब्यांत असून, उंदेरी बेट सीदीच्या ताब्यांत होतें. सीदी मजगांव बंदरांत येऊन, शिवाजीच्या मुलखास उपद्रव देतच होता. याच वेळेस औरंगजेबानें हिंदु लोकांपासून, जिझिया कर वसूल करण्यास सुरुवात केली होती. त्याचप्रमाणें इंग्रज वगैरे परकीय लोकांनीं आणलेल्या मालावरील जकात वाढवून, त्यांजपासूनही हा कर पर्यायानें वसूल करण्याविषयीं बादशहानें सुरतच्या सुभ्यास निकराचा हुकूम पाठविला. एवढी फूस सीदीस पुरेशी झाली. मुंबईच्या बंदरांत येऊन सीदीनें

आपलें कायमचें ठाणें दिलें. तेथून शिवाजीच्या मुलखांतील पुष्कळ लोकांस पकडून गुलाम म्हणून विकण्यास त्यानें मुंबईस आणिलें. हें इंग्रजांस समजल्याबरोबर त्यांनीं २१ असामींस सोडवून परत घरीं पाठविलें, ( ता. २८ एप्रिल १६८० ). त्यांची व सीदीची लहानशी चकमक उडाली, आणि इत:पर शिवाजीच्या मुलखास त्रास देणार नाहीं, असें इंग्रजांनीं त्याजपासून कबूल करून घेतलें. ऑगस्ट महिन्यांत २०० मराठे लोक खांदेरीस जात असतां त्यांपैकीं ८० असामींचीं डोकीं कापून घेऊन सीदी कासम मुंबईस गेला. ह्या गोष्टीस इंग्रजांची फूस आहे, असें संभाजीस वाटल्यावरून संभाजीनें आवजी पंडीत ( बाळाजी आवजी चिटणीस ? ) थास बोलाचाली करण्यासाठीं इंग्रजांकडे मुंबईस पाठविलें. त्यानें सीदीच्या स्थितीविषयीं खडानखडा बातमी आणून संभाजीस दिली. १६८१ च्या उन्हाळ्यांत संभाजीचा आरमारावरील सरदार दौलतखान व सीदी कासम यांच्या अनेक चकमकी झडून, पावसाळा लागण्याच्या सुमारास सीदी सुरतेस गेला व मराठे रायगडीं परत आले.

पुढील वर्षी म्ह० स. १६८२ त स्वत: औरंगजेबानें संभाजीला जिंकण्याची तयारी जोरानें चालविली. सीदीच्या हाताखालचें आरमार वाढविलें. इकडे संभाजी स्वस्थ नव्हता. त्याचा सरदार दौलतखान हा नागोठणें येथें लढाईच्या तयारीनें होता. सीदी मिसरी म्हणून संबूलचा एक नातेवाईक सीदीचा पक्ष सोडून संभाजीस येऊन मिळाला होता. शिवाय संभाजीनें दादजी रघुनाथ देशपांडे यास आरमाराचें आधिपत्य देउन, 'सीदीचा पराजय केल्यास तुमची अष्टप्रधानांत नेमणूक करण्यांत येईल,' असें आश्वासन दिलें. एवढ्यानेंच संभाजी स्वस्थ राहिला नाहीं. सीदीचे लोकांत फितुर करण्याकरितां खंडोजी फर्जंद नांवाच्या आपल्या मर्जीतील एका इसमास त्यानें जंजिऱ्यास पाठविलें. संभाजीशीं आपलें वैर आहे, असा बहाणा करून खंडोजीनें सीदीची नौकरी पत्करिली. परंतु खंडोजीचा कावा एका दासीच्या मार्फत सीदीस कळला. त्याबरोबर सीदीनें खंडोजी* व त्याचे दुसरे

---

* **टीप:**—कोंडाजी ( खंडूजी ) फर्जंद व कुमाजी जान प्रभु यांच्या कटाची हकीकत रुद्राजीच्या वंशजांचे दप्तरांत 'रा. यशवंत' यांस उपलब्ध झाली. ती इ. संग्रहांत दिली आहे. ( जुन्या ऐ. गोष्टी ).

साथीदार यांस ठार मारिलें. तेव्हां संभाजी शहाजादा अकबर यास बरोबर घेऊन, जंजिऱ्याची खाडी भरून काढून मग किल्ल्यावर हल्ला सुरू करावा, अशा विचारानें स्वत: दंडाराजपुरीस गेला; परंतु पूर्वेकडून औरंगजेबाची फौज त्याचे राज्यावर आल्यामुळें सीदीच्या झगड्यांत त्यास स्वत: हजर राहतां आलें नाहीं. दादजीनें जंजिऱ्यास वेढा घातलाच होता. परंतु ऑगस्ट महिन्यांतलि पाऊस व लाटा यांच्या योगानें दादजीचा पराभव होऊन दोनशें लोक सीदीच्या हातीं लागले. सीदीनें महाडपर्यंत मराठ्यांच्या मुलखांत शिरून दादजी रघुनाथाची बायको सुद्धां पळवून नेली. तरी संभाजीची हिंमत खचली नाहीं. त्यानें ऑक्टोबर महिन्यांत मजगांव येथील सीदीच्या आरमारावर हल्ला केला. त्या वेळीं सीदी मिसरी संभाजीकडे होता. परंतु ह्याही प्रसंगीं मराठ्यांचाच पराभव झाला.

सीदी मिसरी यास याकुतखानानें कैद केलें. मराठ्यांच्या आरमारानें अवर्णनीय पराक्रम केला; आणि शेवटीं निरुपाय झाल्यावर त्यांनीं आपलीं कित्येक जहाजें शत्रूचे हातीं न लागावीं म्हणून पाण्यांत बुडविलीं. ह्या पराजयानें इंग्रज व पोर्तुगीझ ह्यांजवर संभाजी अगदीं चिडून गेला; कारण सीदीच्या विरुद्ध हे लोक संभाजीस मदत करीत नसत. पोर्तुगीझ लोकांचा त्यानें चांगलाच समाचार घेतला; आणि इंग्रजांशीं लढाईची तयारी करणार, इतक्यांत स्वत: औरंगजेब दक्षिणेंत येत आहे, असें कळल्यावरून इंग्रजांशीं आपला स्नेहभाव दृढ करण्याचे हेतूनें त्यानें आपला वकील त्यांजकडे मुंबईस पाठविला. संभाजीनें इंग्रजांस असें कळविलें, कीं ‘ मुंबई, वसई, दमण वगैरे ठिकाणें काबीज करण्याचा बादशहानें निश्चय केला आहे; तो तडीस गेला, तर आमच्या मुलखांत बहुत उपद्रव होईल; तेव्हां आपापल्या बचावापुरता आपला आमचा स्नेहसंबंध असणें इष्ट आहे. तुम्ही सीदी यास अगर मोगलांच्या आरमारास मुंबई बंदरात येऊं देऊं नये. या कामीं आमचें आरमार तुम्हांस मदत करील, आणि या गोष्टी तुम्हांस कबूल असतील तर कबुली दर्शविण्यास आमच्या वकिलाबरोबर तुमचा एक वकील इकडेस पाठवा.’

याच वेळेस कर्नाटकांत जिंजीनजीक शिवाजीनें जिंकिलेल्या प्रदेशांत मद्रासच्या इंग्रजांस कित्येक वखारी घालावयाच्या होत्या. त्याबद्दलची परवानगी संभाजीकडून मिळविण्याविषयीं मद्रासकरांनीं मुंबईकरांस लिहिलें

होतें. तेव्हां हीं दोनही कामें साधून घेण्याकरितां तारीख २० डिसेंबर, १६८२ रोजीं इंग्रजांचा वकील संभाजीच्या वकिलाबरोबर रायगडाकडे येण्यास निघाला. ह्या वकिलांच्या गलबतावर मोगल जहाजांनीं हल्ला करून त्यांस लुटलें. परंतु तो येऊन संभाजीस भेटला. जिंजी प्रांतांतील इंग्रजांची मागणी संभाजीनें कबूल केली; पण इंग्रज वकिलाच्या वेडेपणामुळें हा तह तडीस गेला नाहीं. कागद तयार होत असतांच तो एकदम निघून मुंबईस गेला.*

इतउत्तर इंग्रज व संभाजी यांचा सांगण्यासारखा संबंध आला नाहीं. इंग्रज या वेळेस स्वत:च्या भानगडींत गुंतले होते, आणि पुढें लवकरच त्यांचा व औरंगजेबाचा कलह सुरू झाला.

५. पोर्तुगीझांना तंबी (स. १६८३).—सोळाव्या शतकाचे आरंभीं वास्को ड गामा व आल्बुकर्क यांनीं पोर्तुगीझ लोकांची सत्ता हिंदुस्थानांत स्थापन केल्यापासून, सुमारें शंभर वर्षेपर्यंत त्या लोकांची चांगली भरभराट होती. पुढें डच व इंग्रज लोकांनीं इकडे प्रवेश करून पोर्तुगीझ लोकांस मागें टाकिलें. शिवाजीच्या वेळेस तर पोर्तुगीझांचा जोरानें ऱ्हास होत चालला होता. शिवाजी व पोर्तुगीझ यांचा संबंध दोन ठिकाणीं आला. एक गोव्याचे आसपास पांचपन्नास मैलांत फोंडें,‡ रांगणा, सांवतवाडी इत्यादि ठिकाणीं; व दुसरा कल्याणचे आसपास दमण, वसई, ठाणें, चौल इत्यादि ठिकाणीं. मूळपासून पोर्तुगीझ लोक मराठ्यांस त्रास देण्यास तयार असत; कारण सांपडतील तितके हिंदु लोक पकडून त्यांस खिस्ती करावें, हा त्यांचा उद्योग होता. परंतु शिवाजीचे वेळेस त्यांची शक्ति पुष्कळ क्षीण झाली

---

* ह्या वकिलातीची हकीगत ऑर्मेचे पुस्तकांत (पृ. ११५-१२१) दिलेली आहे. ग्रँट डफनेंही ती ऑर्मेचे पुस्तकांतूनच घेतली. संभाजीनें इंग्रजांस फसविल्याबद्दल एकही अक्षर ऑर्मेचे पुस्तकांत नसतां, डफनें आपले ग्रंथांत एक दोन खोडसाळ शब्द मध्येंच मोठ्या नाजूकपणानें घुसडून दिले आहेत.

‡ फोंडें अ. फोंडा हें गोव्यांतील एका प्रांताचें ठिकाण आहे. कोल्हापुरच्या पश्चिमेस असणाऱ्या फोंडा घांटाशीं ह्याचा कांहीं संबंध नाहीं. दोहोंचा उच्चारही वेगळाच आहे.

असल्यामुळें, व प्रत्यक्ष शिवाजीच्या धाकामुळें त्यांनी फारशी गडबड केली नाहीं. विजापुरशीं शिवाजीचें युद्ध चालू असतां, पोर्तुगीझ लोकांनीं शिवाजीस पुष्कळच त्रास दिला. ते शत्रूंस दारूगोळा पुरवीत; निरपराधी रयतेस उठून कत्तल करीत; हिंदूंचीं देवळें फोडून, लोकांस बळजबरीनें पकडून आणून, ख्रिस्ती धर्माची दीक्षा देत. [ ग्रँटडफ् ]. शिवाजीच्या राज्यास लागून पोर्तुगीझांचा मुलूख असल्यामुळें, वरील अनन्वित प्रकार चालू देणें व त्यांचा बंदोबस्त न करणें हें शिवाजीच्या ब्रीदास मोठेंच लांछन होतें; ह्यासाठीं शिवाजीनें त्या लोकांवर शस्त्र धरिलें. स. १६७५ त गोवा, कारवार, ह्या भागांत त्यानें स्वारी केली; आणि गोव्यानजीक पूर्वेस फोंडा प्रांत होता तो जिंकून, फोंड्याचा किल्ला ताब्यांत घेतला. नंतर दक्षिणेस जाऊन कारवारचा किल्ला, सदाशिवगड व पूर्वेकडचा सुंदा प्रांत हस्तगत केले. ह्याप्रमाणें पोर्तुगीझ लोकांवर चांगला शह दबवून, त्यांच्या मुलखांतून चौथाईची खंडणी वसूल करण्याचा रिवाज शिवाजीनें घातला. त्या बाजूचा मुख्य सुभा शिवाजीनें फोंडें येथें ठेवून, धर्माजी नागनाथ यास त्या प्रांताचा सुभेदार नेमिलें. धर्माजी नागनाथाचा पत्रव्यवहार 'गोमंतकाच्या इ० साधनें' या प्रकरणांत इतिहाससंग्रहांत छापलेला आहे. संभाजीला पोर्तुगीझ लोकांकडून पुष्कळ त्रास पोंचला. सीदीचा पाडाव करण्यास त्यास पोर्तुगीझ लोकांचा पुष्कळ अडथळा होई. चौल, दंमण, वसई इत्यादि ठिकाणांतून सीदीवर जाणें झाल्यास, संभाजीस जातां येत नसे. शिवाय पोर्तुगीझ लोक औरंगजेबाकडे संधान बांधून मराठ्यांचे मुलखास उपद्रव देत. या कारणांस्तव त्यांची चांगली खोड मोडण्याचा संभाजीनें निश्चय केला.

गोव्याचे लगत्यास समुद्रांत कांहीं बेटें आहेत, तीं काबीज करण्याचा संभाजीने विचार केला. तेव्हां उभयतांमध्यें झटापट सुरू झाली. पोर्तुगीझ लोकांची खोड मोडण्याकरितां संभाजीनें सन १६८३ च्या पावसाळ्यांत त्यांच्या चौल बंदरास वेढा घातला. पावसाळ्यांत संभाजी आपलें आरमार बाहेर काढील असें कोणास वाटलें नव्हतें. परंतु संभाजीस यापासून कांहीं फलप्राप्ति झाली नाहीं. गोवेकरांनीं पावसाळा संपतांच युद्ध सुरू करून संभाजीच्या मुलखांत उपद्रव सुरू केला.

औरंगजेबानें दक्षिणेंत आल्याबरोबर पोर्तुगीझांशीं कारस्थानें चालू केलीं. 'संभाजीचा मुलूख तुम्ही खुशाल जिंका, तो तुम्हांस बहाल करण्यांत येईल, त्यांस आपल्या मुलखांतून रस्ता देऊं नका, दारूगोळा वगैरे मदत करूं नका. जर तुम्ही त्यास कोणत्याही युक्तीनें पकडाल किंवा ठार माराल तर आमचें मोठेंच काम तुम्हीं केलेसें होईल.' असें बादशहानें वकिलामार्फत पोर्तुगीझांस कळविलें. ह्या वकिलाची हकीकत मुसलमानी रियासतींत दिली आहे. (पृ. ७२३). इकडून मुलगा शहाआलम ह्यास त्यानें गोव्याच्या बाजूनें संभाजीच्या मुलखावर पाठवून, सुरतेचीं जहाजेंही तिकडे बोलाविलीं, (स. १६८३). मनूची शहाआलमजवळ डॉक्टरगिरी व तोफखान्याचें काम करून होता, त्यास दररोज दहारुपये पगार व खर्च मिळत असे. परंतु मुसलमानांत राहणें मनूचीस न आवडून त्यानें सुरतेस जाण्याचें निमित्त काढून शहाआलमास सोडिलें. सुरतेस जाऊन फ्रेंच गलबतांतून तो दंमणास गेला; आणि दंमणच्या पोर्तुगीझ जहाजांतून गोव्यास आला. गोव्याच्या अधिकाऱ्यास औरंगजेबाचें पत्र आलें, त्याचें भाषांतर मनूचीनें करून दिलें. 'बादशहाच्या बोलण्यावर बिलकुल भरंवसा ठेवूं नका, संभाजीचा पाडाव केल्यावर तो तुमचाही थारा करणार नाहीं,' अशी सल्ला मनूचीनें गोवेकरांस दिली. ती न ऐकिल्यामुळें गोवेंसुद्धां हातचें जाण्याचा प्रसंग लवकरच आला.

संभाजीला हे सर्व प्रकार कळले होते. शहाजादा अकबर त्याजवळ असून इराणांत निघून जाण्याच्या बेतांत होता. त्यासाठीं एक जहाज गोव्याच्या खाडींत बांधण्याची परवानगी अकबरानें मागितली; आणि थोडथोडे लोक गोव्यांत पाठविले. गलबत बांधण्याच्या निमित्तानें संभाजीचे बरेचसे लोक गोव्यांत शिरले, तेव्हां गोव्याचा अधिकारी घाबरून गेला. कसेंबसें गलबत तयार होऊन तें वेंगुर्ल्यास गेलें.

संभाजीनें आपले हेर गोव्यांत पाठवून पोर्तुगीझांस फसविण्याचा उद्योग चालविला. फोंड्याच्या किल्ल्यांत संभाजीनें पुष्कळ द्रव्य ठेविलें आहे, असें हेरांनीं पोर्तुगीझांस कळविलें. तें काबीज करण्यासाठीं पोर्तुगीझ फौज बाहेर पडली म्हणजे इकडून गोव्यांत शिरकाव करावा असा संभाजीचा घाट होता. हा संभाजीचा बेत राजापुरच्या फ्रेंच व्यापाऱ्यांकडून मनूचीस कळला. फोंड्यावर हल्ला करूं नको, असें मनूचीनें

बजाविलें असतांही गोव्याच्या अधिकाऱ्यानें हल्ला केला. त्याजबरोबर पांच तोफा, आठशें युरोपियन व आठ हजार एतद्देशीय शिपाई होते. त्यांनीं फोंड्याच्या किल्ल्यास वेढा घातला, हें ऐकतांच संभाजी चौलचा वेढा न उठवितां अकबरास बरोबर घेऊन फोंड्यावर आला. किल्ल्यांतील लोकांनीं निकरानें लढून आपला बचाव केला. पुढें संभाजीनें मागून येऊन पोर्तुगीझांची पुरी खोड मोडली. त्यांचे बहुतेक लोक मराठ्यांनीं कापिले. पावसाळा असल्यामुळें बंदुका चालेनात. प्रत्यक्ष सेनापतीलाही तलवारीची जखम लागली. युरोपियनांशीं उघड सामना करण्याचा मराठ्यांस हा पहिलाच प्रसंग होय. ह्या प्रसंगावरून युद्धकलेंत मराठ्यांचें नांव प्रसिद्ध झालें. वरील लढाई सेप्टेंबर स. १६८३त झाली. पोर्तुगीझांनीं मोठ्या शिकस्तीनें खाडी उतरून गोवें गांठलें. पुढें औरंगजेबाकडून पत्रें आलीं कीं संभाजीशीं अशीच लढाई चालू ठेवावी. आम्ही मदत पाठवितों. ह्या वेळीं मनूची गोव्यास होता. पाठलाग केला असता तर गोवा सहज त्याच्या हस्तगत झालें असतें, परंतु त्यानें प्रयत्न सोडिला नाहीं. साष्टी व बारडी हे परगणे काबीज करून त्यानें गोव्यांत आपलीं माणसें उतरविलीं, तेव्हां पोर्तुगीझांनीं संभाजीशीं तह करण्याकरितां मनूचीस त्याजकडे पाठविलें. संभाजीजवळ दुर्गादास त्यास भेटला. संभाजी म्हणाला, 'पोर्तुगालच्या राजाचा हुकूम नसतां गोव्याच्या अधिकाऱ्यानें आमच्यावर शस्त्र धरिलें याचा आम्हास अत्यंत राग आला आहे.' आपल्या रागाची परीक्षा म्हणून संभाजीनें मनूचीस आपली भवानी तलवार दाखविली, आणि बोलला, 'ही पहा माझी तलवार. हिनेंच मी आपल्या बंडखोर सरदारांचीं डोकीं कापलीं. हा माझा विश्वासू मनुष्य घेऊन गोव्यांत जा, आणि तह ठरवा.' ह्या वकिलाबरोबर संभाजीचे एक हजार लोक गोव्यांत येणार होते, परंतु मनूचीनें लोक येऊं दिले नाहींत. मात्र संभाजीच्या वकिलाची व गोव्याच्या अधिकाऱ्याची भेट झाली. पण तह कांहीं ठरला नाहीं. पोर्तुगीझांनीं चौथाईचा हक्क मराठ्यांस नेहेमीं देत जावा, ही संभाजीची मागणी त्यांनीं कबूल केली नाहीं. वेंगुर्ल्याच्या बंदरांत मोगलांचें आरमार होतें, त्यास पोर्तुगीझांनीं आपल्या मदतीसाठीं गोव्यास बोलाविलें. इकडे गोव्याच्या ईशान्येकडील दोन मैलांवरचा एक मजबूद किल्ला संभाजीनें काबीज केला. ह्या प्रसंगीं गोव्याचा मुख्य अधिकारी मारला जात होता. गोव्याचें

बेट संभाजीच्या अगदीं हातांत पडल्यासारखें झालें होतें. तेव्हां पुन: तहाचें बोलणें करण्यासाठीं मनूचीस संभाजीकडे पाठविण्याचें ठरलें. संभाजी आपल्या शत्रूंशीं झगडण्यांत गुंतलेला असून, त्याच्या हातून आपणांस मदत होईल असा भरंवसा न वाटल्यामुळें, शहाजादा अकबर संभाजीस सोडून दुसरे कोठें जाण्याच्या हेतूनें वेंगुर्ल्यास गेला. आणि पुढें लवकरच तो मक्केस जाऊन तेथून इराणांत गेला. ( स. १६८३ अखेर ). संभाजीनें फोंड्यास नवीन किल्ला बांधून तो फार मजबूद केला, आणि गोव्याच्या उत्तरेकडील मुलूख जाळून लुटून फस्त केला. तेव्हां पोर्तुगीझांनीं नाइलाजास्तव तहाचें बोलणें लाविलें. संभाजीनें पन्नास लाख रुपये दंड मागितला. तो त्यांनीं दिला नाहीं. म्हणून तह तसाच राहिला. संभाजीनें उत्तरेकडील पोर्तुगीझांचा सर्व मुलूख काबीज केला. इतक्यांत राजपुत्र शहाआलम मोठी फौज घेऊन संभाजीवर चालून आला, तेणेंकरून संभाजीस गोवा सोडून जावें लागलें. मनूचीस मात्र शहाआलमनें पकडून आपल्या नोकरींत पुन: ठेविलें. तो स. १६८६ त गोवळकोंड्यास शहाजाद्याबरोबर असतां तेथून मद्रासच्या इंग्रजांकडे पळून गेला, तो पुढें तिकडेच राहिला. सन १६८५ च्या फेब्रुवारी महिन्यांत पोर्तुगीझांनीं संभाजीशीं लढण्याचा पुन: उठाव केला. संभाजी या वेळेस मोगलांशीं लढण्यांत गुंतल्यामुळें त्याला पोर्तुगीझांकडे लक्ष देतां आलें नाहीं. तरी पोर्तुगीझांनींही म्हणण्यासारखें कांहीं केलें नाहीं. संभाजीनें भलत्याच अटी सांगून पोर्तुगीझांचा वर सांगितलेला तह कबूल केला नाहीं म्हणून डफ वगैरे त्यास दोष देतात, ते वस्तुस्थितीचा विचार करीत नाहींत. औरंगजेब पाठीवर नसता, तर पोर्तुगीझ लोकांस समूळ काढून लावण्याची पाळी संभाजीनें आणिली होती. यापुढची संभाजी व पोर्तुगीझ यांची हकीकत उपलब्ध नाहीं.

**६. मोगलांशीं सामना, संभाजीचें क्षात्रतेज, अजीमची बागलाणांत स्वारी ( स. १६८२–८५ ).**—औरंगजेबास असा संशय आला होता कीं, आपले अधिकारी मराठ्यांशीं मनापासून लढत नाहींत; लांच वगैरे घेऊन स्वस्थ बसतात. म्हणून स्वत:च जाऊन अल्पावधींत युद्ध संपवावें, अशा तयारीनें तो ता. ८ सेप्टेंबर स. १६८१ रोजीं अजमीर

सोडून निघाला, तो पुनः परत गेला नाहीं. ता. २२ मार्च स. १६८२ रोजीं तो औरंगाबादेस पोंचला; तेथून त्यानें आपले दोन मुलगे मुअज्जम व अजीम यांस संभाजीवर पाठविलें. ता. १३ नोव्हेंबर स. १६८३ रोजीं बादशहा अहमदनगरास आला. ह्यासंबंधीं मुसलमानी रियासत प्र० २६–७, औरंगजेबाची दक्षिणची स्वारी, हें कलम वाचण्यालायक आहे. अहमदनगराहूनच बादशहा सर्व कारभार करी. ता. ७ मे १६८५ रोजीं नगर सोडून, औरंगजेब जून ता. ४ रोजीं विजापुरास गेला. तेथून पुढें गोवळकोंड्यास पोंचल्यावर,¹ ऑक्टोबर ता. १ स. १६८७ त गोवळकोंड्याचा पाडाव झाला.स.१६८८च्या आरंभीं त्यानें पुढें संभाजीवर मोहीम स्वतःकेली. मुअज्जम ह्यानें दक्षिणेकडचा व अजीम ह्यानें उत्तरेकडचा मुलूख घ्यावा असा त्यांस हुकूम होता. बागलाणांत सालेरचा किल्ला हा सुरत व खानदेश ह्या दोनही जिल्ह्यांचें नाकें असून तो ताब्यांत ठेवण्याकरितां शिवाजीनें अति परिश्रम केले होते. तो किल्ला अजीम येण्यापूर्वींच फितुरीच्या योगानें मोगलांस मिळाला. सन १६८२ च्या फेब्रुवारी महिन्यांत अजीम हा बहादूरखानास बरोबर घेऊन नासीकत्र्यंबकच्या बाजूस आला.येतांच त्यांनीं मराठ्यांचे कित्येक किल्ले काबीज केले. सालेरचा किल्ला प्रयासाशिवाय हस्तगत झाला व मुल्हेर तर त्यांजकडेच होता. पुढें मोगल फौज रामसेज किल्ला घेण्यास आली. इकडे अजीमच्या स्वारीची वार्ता ऐकून सेनापति हंबीरराव मोहित्ते बागलाणांत गेला. रामसेज किल्ल्यानजीक लढाई होऊन, हंबीरराव पराभव पावून परत दक्षिणेकडे वळला. मोगल त्याचा पाठलाग करीत सातारा मिरजपर्यंत आले. पण असें करण्यांत ते पक्के मराठ्यांच्या तावडींत सांपडले. मराठ्यांनीं जंगलांतून चहूंकडून येऊन मोगलांस अत्यंत हैराण करून सोडिलें. आपणास अजीमानें अशा अडचणींत आणून टाकल्याबद्दल मोगल फौज त्याजवर चडफडूं लागली. हें वर्तमान औरंगजेबास सन १६८३ च्या फेब्रुवारींत कळतांच, त्यानें अजीमास विजापुरास धाडण्याच्या मिषानें आपणाकडे बोलावून घेतलें. (ऑर्म्)

**रामसेजचा संग्राम.**— बागलाणांतील किल्ले गेल्याचें वर्तमान ऐकून संभाजीचें तेज ज्यास्तच चमकूं लागलें. सीदी व पोर्तुगीझ यांजबरोबरील युद्ध दुसऱ्यांवर सोंपून त्यानें आपला मोर्चा मोगलांकडे फिरविला. नाशीकच्या उत्तरेस थोड्या मैलांवरचा रामसेज किल्ला अजून मोगलांस मिळाला

नव्हता. तो घेण्यास बादशहानें शहाबुद्दीनखान यास पाठविलें. हा शहाबुद्दीन पुढें प्रसिद्धीस आलेल्या निजामुल्मुल्कचा बाप होय. रामसेजच्या किल्ल्यावर मारा पोंचण्यासाठीं मोगलांनीं किल्ल्यासमोर एक अति उंच सजा तयार केला. परंतु त्याचा उपयोग न होतां मराठ्यांनीं अनेक वेळां मोगलांचा अगदीं मोड केला. ह्या प्रसंगांत रामसेजच्या हवालदारानें अद्वितीय पराक्रम केला. ह्या वीर्यशाली हवालदाराचें नांव व मोगलांस फितूर झालेल्या साल्हेरच्या किल्लेदाराचें नांव हीं दोनही उपलब्ध होतील तर फार चांगलें होईल. शहाबुद्दीनचा पराजय झालेला ऐकून बादशहानें त्यास परत बोलावून खानजहान यास रामसेजवर पाठविलें. खानजहानबरोबर बुंदेला सरदार दलपतराय हाही होता. सर्वांनीं मिळून अनेक वेळां मोठ्या निकराचे हल्ले मराठ्यांवर केले, पण मोगलांस अपयश येऊन परत फिरावें लागलें.

**मुअज्जमच्या फौजेची दुर्दशा.**—सन १६८२ च्या फेब्रुवारींत मुअज्जम हा जुन्नर येथून मोठी फौज घेऊन कल्याण प्रांतांत उतरला. हुसेनअली नांवाचा एक हुशार सरदार त्याचे मदतीस होता. कल्याणास छावणी देऊन त्यांनीं संभाजीचा पुष्कळ मुलूख उद्ध्वस्त केला; पण त्यामुळें पुढें त्यांचीच फार दुर्दशा झाली. सीदीनें मोगल फौजेस कांहीं सामान पुरविलें. मराठे कंटक व पहाडांत राहणारे असल्यामुळें माळजमिनीच्या नाशानें ते डगमगत नसत. ह्या प्रसंगीं मोगलांशीं लढण्याची निराळीच युक्ति संभाजीनें योजिली. आपल्या फौजेनें मोगलांच्या समोर लढण्यास न जातां किल्ल्याकिल्ल्यांनीं राहून आपला बचाव करावा व रसद वगैरे मारून त्यांस हैराण करावें. ही युक्ति चांगलीच सफळ झाली. कल्याण प्रांतांत कांहीं दिवस राहून मुअज्जम दक्षिण कोंकणांत शिरून वेंगुर्ल्यापर्यंत सर्व प्रदेश उद्ध्वस्त करीत गेला. संभाजीची फौज राजापुरास राहिली. संभाजी या वेळेस गोवें खचित काबीज करणार असें मोगलांस वाटलें असून, त्या कामीं त्यास अडथळा करण्याकरितांच मुअज्जम गोव्यानजीक छावणी देऊन राहिला. ह्या प्रसंगीं मोगल फौजेनें हिंदु रयतेचा पुष्कळ छळ केला. परंतु धान्याच्या महर्गतेनें मोगल फौज टेंकीस आली. औरंगजेबानें मुलाची दुर्दशा ऐकून शहाबुद्दीनखानास रस्ता मोकळा करण्याकरितां पाठविलें; व सुरतेहून जहाजांतून रसद पाठविली. शहाबुद्दीनखानानें रायगडनजीक निजामपुर येथें संभाजीच्या एका टोळीचा पराभव केला; आणि त्याबद्दल

बादशहानें त्यास 'गाजीउद्दीन' हा किताब दिला (स. १६८२). संभाजीचा आणखी एक किल्ला हस्तगत केल्याबद्दल बादशहानें शहाबुद्दीनखानास 'फिरोजजंग' असा दुसरा किताब दिला. (स. १६८३. Bilgrami's History of the Nizam's Dom.) सुरतेहून आलेली रसद संभाजीच्या जहाजांनीं बरीच लुटून घेतली. कांहीं जहाजें सामानानें भरून आलीं, परंतु तीं गोव्याचे बंदरांत पोर्तुगीझ लोकांनीं येऊं दिलीं नाहींत. कारण मोगलांबद्दल पोर्तुगीझांचे मनांतही द्वेषबुद्धि होतीच; तेव्हां दुसऱ्या वाटेनें जहाजें येऊन कांहीं अन्न फौजेस मिळालें. मुअज्जमचें दीड वर्ष फुकट जाऊन कांहीं प्राप्ति झाली नाहीं व तो अडचणींत सांपडला. तेव्हां मराठ्यांस दुसरीकडून पेंचांत आणण्यासाठीं बादशहानें रणमस्तखान व रुहुल्लाखान यांस कल्याण प्रांतांत पाठविलें. परंतु संभाजी विलक्षण तडाक्यानें त्यांजवर आला आणि त्यांची रसद व खजिना मारून रायगडास परत गेला. तेव्हां वरील दोघां सरदारांस बादशहानें परत बोलाविलें. इकडे मुअज्जमच्या लष्करांत रोगाची सांथ येऊन पुष्कळ लोक मेले. खाण्यास अन्न नाहीं अशी त्यांची दुर्दशा झाली. तेव्हां रुहुल्लाखानास लष्कर बरोबर देऊन शहाजाद्यास परत आणण्यासाठीं बादशहानें पाठविलें; आणि खानजहान यास औरंगाबादेस ठेवून आपण स्वत: अहंमदनगरास आला. मोगल फौज कोंकणांतून परत जातांना रोग फैलावला होता व मराठ्यांच्या छाप्यांनीं त्यांचा आकांत केला. शेवटीं अंबाघांटानें वर चढून मोठ्या संकटानें मुअज्जम कृष्णाकांठीं वाळवें येथें छावणी देऊन राहिला. (सन १६८४).

इकडे संभाजीनें सभोंवार शत्रु फिरत असतां विलक्षण साहस करून भडोचवर स्वारी केली, (ऑक्टोबर १६८५), व तें मातबर शहर लुटून पुष्कळ संपत्ति रायगडास आणिली. इतर ठिकाणांहूनही मराठी फौज या वेळेस पुष्कळ लूट स्वदेशीं आणित होती. भडोचहून नाशीकच्या रस्त्यानें परत येत असतां, संभाजीच्या हाताखालील एक टोळी गंगास्नानाचे निमित्तानें दूर जाऊन मोगलांस मिळणार होती. संभाजीनें त्यांचा उद्देश समजून दुसरी एक टोळी गंगास्नानाचेच निमित्तानें पहिलीवर पाठविली. दुसऱ्या टोळीनें प्रथमत: स्नेह दाखवून नंतर एकदम भयंकर स्वरूप धारण केलें, आणि लबाड लोकांचा फडशा उडाविला.

स. १६८५च्या आरंभींच चार हुशार सरदारांचे हाताखालीं दहा हजार मराठ्यांची एक टोळी रायगडाहून अशा तडफीनें उत्तरेकडे गेली, कीं कोणासही त्यांचा मागमूस लागण्यापूर्वी बऱ्हाणपुरापर्यंत सर्व मुलूख त्यांनीं जाळून लुटून फस्त केला. औरंगजेबानें अहंमदनगराहून बहादुरखानास सहा हजार फौज देऊन त्यांचे पाठलागास पाठविलें; परंतु बहादूरखान व मराठे यांच्या मधलें अंतर सहा दिवसांहून कधीं कमी पडलें नाहीं. शेवटीं बऱ्हाणपुरचे संरक्षणाकरितां बादशहानें आपला चवथा मुलगा कामबक्ष यास बाराहजार फौजेसह पाठविलें. मनूची म्हणतो, 'अशा रीतीनें संभाजीस जिंकणें तर बाजूसच राहिलें; पण उलट संभाजीनेंच बादशहास पुरेपुरे केलें. बादशहाच्या फौजेस जाणारें धान्य व सामान लुटावें; उंट, घोडे, खेचरें वगैरे जनावरें पकडून न्यावीं; जो कोणी पुढें येईल त्यास कापून काढावें; आपल्या उपयोगी असेल तें ठेवून, बाकीच्याचा नाश करावा. एखादा मोठासा सरदार कबजांत आला, तर त्याजकडून भला मोठा दंड उकळून मग त्यास सोडावें. अशा रीतीनें त्यांजवळ इतकें सामान जमे कीं, तें घेऊन जाण्यास अडचण पडे; म्हणून ठिकाठिकाणीं मोठमोठे बाजार भरून तें सामान विकीत. अशा बाजारांत मूळचे मालक किंमत भरून आपला माल सोडवून घेत.'

येणेंप्रमाणें तीन वर्षांची सक्त मेहनत फुकट जाऊन ही मोहीम संपली. बादशहाची पहिली हिंमत पुष्कळच खचली. त्याची बरीच निराशा झाली. शिवाजीच्या मरणाबरोबर मराठ्यांचें तेज लयास गेलें नाहीं, त्याचा मुलगा पाणीदार आहे, युद्ध करून तो आपल्या हातीं लागावयाचा नाहीं, अशी बादशहाची खात्री झाली. तेव्हां नाइलाजास्तव मराठ्यांचा नाद त्यानें सोडून दिला. त्याचा मुलगा अकबर संभाजीजवळ राहत होता, तो त्याचे कबजांत आला नाहीं. सारांश, बादशहानें आपला मोर्चा संभाजीवरून काढून तूर्त विजापुराकडे फिरविला. तेव्हां नजीक असलेल्या मोगल फौजेवर दाब ठेवण्याकरितां संभाजी पन्हाळा व विशाळगड यांचे दरम्यान राहूं लागला. त्या वेळीं बारद्वारी नांवाची एक जागा संभाजीनें आपणासाठीं किल्ल्यावर तयार केली, ती संभाजीची खूण म्हणून अद्यापि तेथें दाखविली जाते.

लोकांनीं राजनिष्ठेनें लढण्यांत शिकस्त करावी, म्हणून संभाजी लोकांस कसें उत्तेजन देत होता, हें खालील पत्रांत दिसतें. हें पत्र फेब्रुवारी १६८६त नीळकंठ मोरेश्वर प्रधानानें बाजी सर्जेराव जेधे देशमुखास लिहिलेलें आहे.

'तुम्ही गनीमाकडे जाऊन सेवा करितां. कोण्या भरास भरून गेलेत ! बरें झालें तें झालें. तें फिरोन न ये. परंतु मुसलमानांची सेवा करितां तुम्हांस कष्ट होतात. सांप्रत स्वामीचे सेवेशीं येऊन कार्यभाग करावा; कष्टाची मुजरा होईल. सर्फराजी करून घ्यावी, म्हणन कळून आलें. तरी तुम्ही कदीम लोक. तुमचा भरंवसा. राजेश्री स्वामींचें बहुत अन्न भाक्षिलें आहे. क्रिया धरून यावयाचें केलें तरी बहुत उत्तम केलें. कदाचित् गनीमांकडे गेलां होतां या गोष्टीकरितां यावयाचा अनमान कराल तर सर्वस्वी न धरणें. बेशक येणें. तुमचें बरें करणें. तुम्याहून सर्फराजी करून बहुत चालऊं. अंतर न पडे. समाधान असों देणें आणि येणें. दरीं बाब कबूल असे. आज्ञा प्रमाण मोर्तब.' ( खं० १५–२८१ ).

संभाजीची युद्धाच्या कामांतील दक्षता खालील पत्रावरून कळून येते. ( खं० १५–२८० ). हें पत्र स. १६८५ किंवा १६८६ च्या जून महिन्यांत शंकराजी नारायण सचिव ह्यानें कृष्णाजी दादाजी प्रभु देशपांडे, रोहिडखोरें, यास लिहिलेलें आहे.

'मावळप्रांतीं गनिमांनीं चाल केली आहे म्हणोंन समजलें. त्यास कोरळखिंड व ढवळाघाट व मांडरदेवचा सडा, येथें जागोजागीं चौक्या घालून गनिमाची खबर ठेवून कमकसूर खासबातमी पावती करणें. राजगडीं कळवितांच तुमची कुमक रोहिडा वगैरे जागांहून होईल. तुम्हीं सिरवलीं मर्दुमकी चांगली केली हे खबर येथें समजली. या वेळीं गनीम नामोहरम सर्वांनीं करावा. तुम्ही जमेदार व सरचाकर महाराजांचे वेळचे. मर्दुमी करोन दाखवितील हा भरंवसा आहे. बहुत काय लिहिणें.'

संभाजीनें सचिवपद कलुशास दिलें नव्हतें, हें ह्या पत्रावरून सिद्ध आहे. संभाजी किती करडा होता हें खालील पत्रावरून दिसतें. (ख.१५–३४२).

'स्वस्ति श्री राज्याभिषेक शक १२ आश्विन बहुल तृतीया ( सेप्टेंबर १६८६ ) क्षत्रियकुलावतंस सिंहासनाधीश्वर श्री राजा शंभु छत्रपती स्वामी यांणीं बाजी सर्जेराव जेधे ( देशमुख–रोहिडखोरें ) यांसीं आज्ञा केली ऐसी जे.......त्यावरून हें आज्ञापत्र तुम्हांस लिहिलें आहे. तरी आधीं

तुम्हीच सरासरी हरामखोरी केली कीं, वतनदार होऊन इमानें इतबारें वर्तावें ती गोष्ट न करितां, स्वामीचें अन्न बहुत दिवस भक्षिलें त्याचें सार्थक केलेंत कीं, स्वामीच्या पायाशीं दुर्बुद्धि धरून दोन दिवसांचे मोगल त्यांकडे जाऊन राहिलेत. तुमचा भाऊ शिवजी गनीमांकडे गेला तो तुम्हांस बरें पाहीना. असें होतें तर तुम्ही स्वामीसन्निध हुजुर यावें होतें. म्हणजे तुमचें इतबारपण एकनिष्ठा कळों येती. तें केलें नाहीं तरी बरीच गोष्ट झाली. याउपरीही गनिमांकडे राहणेंच असेल तरी सुखें राहणें. तुमचा हिसाब तो काय आहे ? या क्षणीं स्वामी आज्ञा करतील तर गनीमांसुद्धां तुम्हांस कापून काढतील, हें बरें समजणें. दुसरी गोष्ट कीं, तेथें राहणेंच नाहीं, एकनिष्ठेनें स्वामीचे पायांशीं वर्तावें असें असेल, तरी तुम्ही परभारें मुद्दे सांगून गडकिल्यांकडे रावते काय म्हणून करतां ? हे गोष्ट स्वामीस मानत नाहीं. जो रावता करणें तो स्वामीकडेच करून हुजूर वर्तमान लिहून पाठवावें. स्वामी तुमचा मुद्दा मनास आणून आज्ञा करावयाची ती करतील. तरी अशी गोष्ट करावयास प्रयोजन नव्हतें. उजरातीखेरीज दुसऱ्यांकडे एकंदर रावता न करणें. जें वर्तमान लिहिणें तें स्वामीस कळल्यावर जी आज्ञा करणें ती करून आज्ञापत्र सादर होईल तेणेंप्रमाणें वर्तणूक करणें.'

स्वामिकार्य करणारास संभाजी बक्षिस देण्यांत किती तत्पर असे, हें स. १६८६ चे खालील पत्रावरून दिसून येतें. ( खं० १५-३६५ ).

'पत्र नियत पारितोषिक मा। येसजी कंक सरनोबत व कृष्णाजी येसजी कंक पदातिनायक. मशारनिल्हेनीं व मानिलेचे पुत्र कृष्णाजी कंक या दोघांनीं फोड्याचे स्वारीस फिरंग्यांसी गांठी पडली, तेव्हां बहुत कस्त केली, आणि गनीम मारून काढिला. ते वख्तीं दोघांलाही जखमा लागोन चकचूर झाले. कठीण जखमा राजश्री स्वामींनीं दृष्टीनें पाहिल्या आणि घरासि जावया आज्ञा दिली. त्यावरी कृष्णाजी कंक याच्या जखमा फुटून घरीं मयत झाला. हल्लीं येसजी कंक हे हुजूर येऊन आपलें वर्तमान विदित केलें, त्यावरून स्वामी कृपाळु होऊन, हे कामाचे मर्दाने, स्वामिकार्यावरि तत्पर आणि याचा पुत्रही स्वामिकार्यावरी मयत झाला. फोड्याचें बक्षीस द्यावयाचें होतें म्हणून पारितोषिक होन पादशाही प्रत्येकास एकसहस्र मिळून दोनसहस्र होन रास, येणेंप्रमाणें एकसाला ये वर्षी पारितोषिक द्यावयाचा

नियत केला असे.' ह्यांतील संस्कृत शब्दांचा भरणा लक्षांत ठेवण्याजोगा आहे. वरील सर्व पत्रांवरून संभाजीच्या कर्तव्यदक्षतेची साक्ष पटते. असलीं किती तरी पत्रें काळाचे भक्ष्यस्थानीं पडलीं असतील!

७. **विजापुरगोवळकोंड्यांचा पाडाव, संभाजीची अव्यवस्था.**— मोगलांबरोबरील युद्धाच्या सुरवातीस संभाजीजवळ बरीच फौज होती. मुंबईचे आसपास नागोठण्यापासून चौलचे दरम्यान १५ हजार लोक व दंडाराजपुरीस १० हजार होते. त्याचे आरमारांत १२० मोठीं लढाऊ गलबतें व पंधरा लहान गलबतें होतीं. घांटावर सातारा व फोंडें यांचे दरम्यान वीस हजार घोडेस्वार होते. याशिवाय दुसऱ्या लहान लहान टोळ्या पुष्कळ होत्या. संभाजी वरप्रमाणें मोहिमांत गुंतला असतां, राज्यव्यवस्थेकडे लक्ष देण्यास त्यास फुरसत मिळाली नाहीं. एका बाजूस हा जबरदस्त झगडा चालू असून, दुसरे बाजूस राज्याची सुव्यवस्था ठेवणें हीं दोन कामें एकसमयावच्छेदेंकरून तडीस नेण्याची शिवाजीची कुशलता संभाजीच्या अंगीं नव्हती. अवकाश मिळाला असता, तरी तें काम करण्यास संभाजी लायक नव्हता. शौर्याशिवाय दुसरा उपयुक्त गुण त्याचे अंगीं नव्हता. लढाईशिवाय दुसरें राज्यकारभाराचें काम पाहण्यास त्यास हौस वाटत नसे. तशांत राज्यव्यवस्थेस उतरती कळा लागण्यास आणखी एक कारण झालें. लायक माणसें कोणीच कारभारांत नव्हतीं. संभाजीच्या क्रूर स्वभावामुळें नेहमींच त्याचा लोक द्वेष करीत. जुन्या मंडळीपैकीं कोणावरही त्याचा भरंवसा बसला नाहीं. सर्वांबद्दल त्याचे मनांत वहीम असे. हंबीरराव मोहिते मात्र सेनापतीचे कामावर होता, तेथपर्यंत लष्कराची बाजू कमी पडली नाहीं. पेशवे मोरोपंत पिंगळे कारागृहांत होता, तो सन १६८१ च्या एप्रिलपूर्वी वारला. अर्थात् मोरोपंत वारल्यावर पेशवेपद संभाजीनें त्याचा मुलगा निळो मोरेश्वर यास दिलें, त्याचे शिक्के ता. १६८१ एप्रिलपासून सांपडतात. निळोपंत पुढें राजारामाबरोबर चंदीस होता. अगोदरच कलुशाचा प्रवेश राज्यकारभारांत झाला होता. मोरोपंताचे मृत्यूनंतर तो सर्वस्वी मुखत्यार झाला. कलुशावर संभाजीचा पूर्ण भरंवसा व बहाल मर्जी असे. त्याचेशिवाय राज्यांत पानही हालेनासें झालें. कलुशा हा बोलून चालून परकी; तेव्हां राज्याचें अगर लोकांचें कल्याण करण्याची बुद्धि त्यास नव्हती. हातीं आलेला अधिकार

स्वार्थाकडे वापरण्यापलीकडे त्यास कांहीं दिसत नव्हतें. याप्रमाणें सर्व कारभारावर दक्षता ठेवणारें प्रधानमंडळ नाहींसें होतांच राज्यांत अव्यवस्था पसरली. शिवाजीचे नियम व शिस्त मोडून गेली. लष्करचा बंदोबस्त अगदीं बिघडला. मिळवून आणिलेली लूट लोक छपवूं लागले. जो तो लष्कराबरोबर आपल्या बायका घेऊन जाऊं लागला. एकाद्या ठिकाणीं लूट करितांना संभाजीचे लोक बायकाही पकडून आणूं लागले. शिवाजीचा भरलेला खजिना लवकरच खलास झाला. नवीन भर येण्याची बंद होऊन खर्चाचीं द्वारें मात्र आतोनात वाढलीं. लष्करास पगार वेळेवर पोंचेना, तेव्हां मुलुख लुटून ज्यानें त्यानें आपला पगार भागवून घ्यावा, अशी परवानगी लष्करास राजरोस देणें भाग पडलें. त्याशिवाय गत्यंतर नव्हतें. शिवाजीनें अतोनात पैसा मिळवून ठेविला आहे, तो कधींही संपावयाचा नाहीं, अशी संभाजीची समज होती. कलुशास पैशाची अडचण पडूं लागली, तरी यजमानास राग येईल म्हणून त्यानें खरा प्रकार त्यास कळूं दिला नाहीं. रघुनाथपंत मरण पावल्यावर कर्नाटकांतून वसूल येण्याचा बंद झाला. पैसा मिळावा म्हणून कलुशानें जमिनीचा सारा वाढविला, परंतु शिवाजीच्या इतकाही सारा वसूल होण्याची मारामार पडूं लागली. तेव्हां प्रांतांतिल कामगार पैसेखाऊ आहेत, असें कलुशास वाटून त्यानें त्यांस कामावरून दूर केलें; व तो प्रांतचे प्रांत इजाऱ्यानें म्हणजे मक्त्यानें लोकांस वहिवाटीस देऊं लागला. जे कोणी ज्यास्त वसूल देतील, त्यांलाच इजारा मिळावयाचा. त्यामुळें रयत त्रासून मुलूख सोडून जाऊं लागली. सारांश, लष्कराची बाजू संभाजीनें उणी पडूं दिली नाहीं, तरी राज्यपद्धति नीट चालली नाहीं, म्हणून नुकसान फार झालें.

वास्तविक संभाजीला खरी हकीकत कळतच नव्हती. कलुशाशिवाय इतरांस त्याजसमोर जाण्याची बंदी असे. कोणी हिय्या करून गेलाच, तर त्यास संभाजी शिक्षा तरी करी, नाहीं तर कलुशाकडे जाण्यास सांगे. कलुशानें तरी संभाजीला खरी हकीकत कळवून आलेल्या अरिष्टाचा विचार करावयाचा, तोही केला नाहीं. कारण तसें केल्यानें त्याचाच घात झाला असता. तेव्हां आला दिवस कसा तरी लोटण्यापलीकडे या वेळेस ज्यास्त कोणीं कांहीं केलें नाहीं.

सन १६८६ त संभाजीच्या हालचाली काय होत्या त्या स्पष्टपणें कळत नाहींत. ऑर्म् फारशी माहिती देत नाहीं. वास्तविकपणें संभाजीच्या एकंदर कारकीर्दीचा इतिहास हाच फार अपुरा व अप्रसिद्ध आहे. सन १६८५ च्या ऑक्टोबरांत त्यानें भडोचवर स्वारी केली, व त्याच सालीं त्याच्या फौजेनें बऱ्हाणपुरापर्यंत मोगलांचा मुलूख साफ बुडविला. औरंगजेब दक्षिणेंत आल्यापासून विजापुरच्या मुलखांत त्याची फौज उद्योग करीत होतीच. दिलीरखान त्या कामगिरीवर होता. शहाआलमचें व त्याचें वांकडे होतें. कारण स. १६६८ त शिवाजीशीं शहाजाद्यानें कारस्थान चालविलें त्यांत दिलीरखान सामील झाला नाहीं. उलट त्यानें हीं सर्व कारस्थानें बादशहास कळविलीं. हल्लींच्या प्रसंगीं शहाजाद्यानें विषप्रयोग करून दिलीरखानास ठार मारिलें. ( डिसेंबर १६८३ ). त्यानंतर औरंगजेबाची फौज विजापुरावर गेल्यामुळें, विजापुराकडील आपल्या प्रदेशाच्या संरक्षणाकरितां संभाजी पन्हाळा व त्याचे आसपास राहूं लागला. औरंगजेबानें निराश होऊन संभाजीचा नाद सोडून दिला होता. औरंगजेब जितका परधर्मी हिंदूंचा द्वेष करी, तितकाच तो शियापंथाचा द्वेष करी. त्याच्या हाताखालचे मोठमोठे कामगार व सेनापति शियापंथी होते, तथापि त्या पंथाचा द्वेष त्याच्या मनांत अत्यंत होता. 'शियांना मारणारी' असें कित्येक कट्यारींचें त्यानें नांव ठेविलें होतें. पत्रव्यवहारांत शियांचा उल्लेख आला तर त्यांस शिवी दिल्याशिवाय तो कधीं राहत नसे. त्याच्या हाताखालचे शियापंथी कामदार कसे तरी त्यास फसवून वेळ मारून नेत. विजापुर व गोवळकोंडा येथील सुलतान शियापंथी होते, तेव्हां त्यांचा नाश करावयाचा हा धार्मिक मतलब त्यानें धारण केला. खरें म्हटलें असतां पोटांत राज्यवृद्धीचाच हेतु होता. शेख-उल्-इस्लाम नांवाचा एक विद्वान् व थोर पुरुष त्याजपाशीं होता, त्यानें हीं राज्यें जिंकूं नयेत म्हणून औरंगजेबाची पुष्कळ विनवणी केली. तें औरंगजेबानें ऐकिलें नाहीं. तेव्हां तो शेख बादशहास सोडून चालता झाला. बादशहानें विनवणी करून बोलाविलें असतांही बादशहाचें पुनः तोंड बघण्यास तो आला नाहीं. हीं दोन राज्यें जिंकण्याचा संकल्प तीस, चाळीस वर्षांचा होता. तो त्यानें आतां सिद्धीस नेला. २७ मार्च १६८५ रोजीं शहाजादा अजम व खानजहान बहादूर यांनीं विजापुरास वेढा घातला. २३ मे रोजीं

स्वतः बादशहा विजापुरास गेला. विजापुरी लोक अगदीं शेवटच्या निकरानें लढले. १२ सेप्टेंबर स. १६८६ रोजीं शिकंदर आदिलशहा शरण आला; आणि विजापुरचें राज्य संपलें. ह्या वेळच्या कारस्थानांची हकीकत मनूचीनें दिलेली वाचण्यालायक आहे.

ता. २८ जून १६८५ रोजीं शहाजादा मुअज्जम दुसरी फौज घेऊन गोवळकोंड्यावर गेला. ऑक्टोबरांत हैदराबाद काबीज करून त्यानें अतिशय लूट मिळविली. अबूहसन कुतुबशहा व्यसनासक्त होऊन गोवळकोंड्याचे किल्ल्यांत कोंडून बसला. त्याचे मुसलमान अधिकारी अगोदरच फितूर होऊन मोगलांस वश झाले होते. दिवाण मादण्णापंत यास कोणाची मदत नव्हती. औरंगजेबानें कुतबशहास अशा अटी कळविल्या कीं, 'ब्राह्मण अधिकाऱ्यांचीं डोकीं कापून आमचेकडे पाठवावीं आणि त्यांबरोबर जवाहीर, हत्ती, रोख पैसे, व युद्धसामुग्री पाठवावी; आणि विजापुरास इतःपर मदत करणार नाहीं असें वचन द्यावें.' शहानें सर्व अटी कबूल केल्या. मादण्णापंताचें डोकें कापून त्यानें बादशहाकडे पाठविलें; आणि कित्येक किल्ल्याच्या तटावरून ब्राह्मणांचा कडेलोट केला. इतकें करूनही राज्याचा बचाव झाला नाहीं. शहाजाद्याच्या मनांत गोवळकोंड्याचें राज्य घ्यावयाचें नव्हतें; आणि तसें वचन त्यानें कुत्बशहास दिलें. पुढें तें वचन मोडून गोवळकोंडा जिंकण्याचा हुकूम औरंगजेबानें मुअज्जम यास पाठविला. तो त्यानें मानिला नाहीं. तेव्हां हा मुलगा असा डोईजड झालेला पाहून, त्यास मोठ्या युक्तीनें बादशहानें आपणाजवळ बोलवून घेतलें. त्याजबरोबर मुअज्जमचा मुलगा सुलतान अजीमुद्दीन, म्हणजे औरंगजेबाचा नातू, वीस वर्षांचा तरुण बांड पराक्रमी होता, त्यासही कांहीं बक्षीस देण्याची फुसलावणी दाखवून आपणाकडे बोलाविलें. ते दोघे आल्यावर त्यांची निरनिराळी भेट घेऊन त्यांस बादशहानें कैद केलें. या प्रसंगीं अजीमुद्दीन बादशहास ठार मारण्याची परवानगी आपल्या बापाजवळ मागत असतां, ती मुअज्जमनें दिली नाहीं, आणि शांततेनें बंदीवास पत्करिला. (मार्च ता. २, १६८७). ह्याप्रमाणें मुलाचा व नातवाचा बंदोबस्त औरंगजेबानें केला. इकडे मोगल फौज गोवळकोंड्यावर होतीच. पावसानें व अन्नावांचून फौजेचे हाल फार झाले. औरंगजेब कलबुर्ग्यास दर्शनास जाण्याचे मिषानें विजापुराहून निघाला, तो ता. २८ जानेवारी १६८७ रोजीं

गोवळकोंड्यापुढें आला. गोवळकोंड्याच्या लोकांचे सर्व प्रयत्न हरले. एका फितुरी अधिकाऱ्यानें ता. २१ सेप्टेंबर स. १६८७ रोजीं मध्यरात्रीं किल्ल्याचे दरवाजे उघडून मोगलांस आंत घेतलें. बादशहानें आपला दुसरा मुलगा अजीमतारा याजकडून गोवळकोंड्याच्या शहास कैद करून आणविलें, ( ता. १ ऑक्टोबर, स. १६८७ ). लगेच औरंगजेब तेथून परत विजापुरास आला. याप्रमाणें गोवळकोंड्याच्या कुत्बशाहीचाही अंत झाला.

ह्या दोन राज्यांचा पाडाव केल्यावर बादशहाच्या फौजा खालीं दक्षिण देश जिंकण्यास गेल्या. बादशहा विजापुरीं राहून जिंकलेल्या प्रदेशाची व्यवस्था लावण्यांत गुंतला होता. कर्नाटकांत त्यास मराठे आडवे आले. कितीही खटपट केली तरी संभाजी त्याच्या हातीं येईना; व समोरासमोर लढाई करीना. सर्व मुलखांत तो लूट करी. मराठ्यांच्या चपळ घोड्यांपुढें मोगल घोडेस्वार थकून गेले. पुढें राजारामाच्या वेळेस सुरू झालेली दंगल संभाजीनेंच या वेळेस सुरू केली, ( मनूची ). संभाजीस जिंकण्याची बादशहास फारशी आशा नव्हती, म्हणून इतर विषयांकडे त्याचें लक्ष लागलें होतें. विजापुर पडल्यावर तेथच्या तैनातीस डफळे, घाटगे, माने, निंबाळकर वगैरे पुष्कळ मराठे जहागीरदार होते, त्यांस औरंगजेबानें काढून लाविलें. ते आयतेच येऊन संभाजीस मिळाले. संभाजीनें त्या सर्वांस मोगलांच्या प्रदेशांत लूट करण्याची पूर्ण मोकळीक दिली. त्याबरोबर हे मराठे सरदार मोगलांच्या राज्यांत स्वाऱ्या करून पैसा मिळविण्याच्या उद्योगास लागले. संभाजीच्या मृत्यूनंतर मराठ्यांचा फैलाव बाहेर जिकडे तिकडे झाला, त्याची ही सुरुवात होय. संभाजीच्या हलगर्जीपणामुळेंही मराठ्यांच्या ह्या धंद्यास बरीच तेजी येत चालली. शिवाय राज्यव्यवस्थेच्या अभावीं रयत लोक त्रासून जाऊन नाइलाजास्तव लुटालूट करूं लागले. मोगलांची फौज विजापुरावर गेल्याबरोबर संभाजीनें खानदेशावर स्वारी केली; आणि बऱ्हाणपुर काबीज करून ' सातमाता ' डोंगरांच्या पायथ्याचा प्रदेश लुटला. ह्या स्वारींत त्यानें सतरा मोठमोठीं शहरें लुटलीं. ( एलयट पु. २–३०७ ).

शहाजादा अकबर इराणास कधीं गेला तें नक्की नाहीं. स. १६८३ त तो गेला असण्याचा संभव नाहीं. संभाजीकडे आल्यामुळें मोगलांच्या युद्धास

एक विशिष्ट स्वरूप प्राप्त झालें होतें. प्रथमतः दोन वर्षे संभाजीबरोबर राहून अकबराची बरीच खात्री झाली होती, कीं संभाजीच्या अंगीं आपणास मदत करण्याचें सामर्थ्य नाहीं. पोर्तुगीझ लोकांशीं संभाजी लढत असतां अकबर इराणास जाण्याचा बेत करून, संभाजीस सोडून वेंगुर्ल्यास गेला. शहाजादा मुअज्जम याचे हातीं सांपडण्याची त्यास भीति होती. मुअज्जम यास त्रस्त करण्यांत अकबराचा उपयोग संभाजीस पुष्कळ झाला. भडोचची मोहीम करण्यांत तर अकबरास मदत करण्याचाच संभाजीचा हेतु होता. त्या स्वारींत त्यांनीं प्रांतोप्रांतीं अकबराच्या नांवानें वसूल घेतला. विजापुर पडल्याची बातमी अकबरास पोंचली, तेव्हां तो अगदींच हताश झाला. आतां आपणास संभाजी तारूं शकत नाहीं, असें त्यास खचित वाटलें. बापाकडे जाऊन क्षमा मागणें त्यास नको होतें, व बापानें दिलेल्या वचनांत तथ्य नाहीं, हेंही तो जाणून होता. तेव्हां इराणास निघून जाण्याचा त्यानें पुनरपि निश्चय केला. संभाजीनेंही त्यास आपली संमति दिली. राजापुरास जाऊन त्यांनीं वेंडाल नामक एका इंग्रज व्यापाऱ्याचें जहाज भाड्यानें केलें; व पावसाळा संपून हवा साफ होतांच, थोडे लोक बरोबर घेऊन, अकबर नोव्हेंबर महिन्यांत मस्कत येथें येऊन उतरला. तेथून दुसरें जहाज घेऊन तो बुशायर येथें व बुशायरहून इराणची राजधानी इस्पहान येथें गेला. तेथें गेल्यावर इराणच्या राजानें त्याची चांगली बरदास्त ठेविली.

अकबराचे जाण्यानें संभाजीविषयीं बादशहाची काळजी बरीच कमी झाली. गोवळकोंड्याशीं तह झालेला असल्यामुळें प्रथमतः संभाजीस जिंकावें, अशी सल्ला मुअजमनें बादशहास दिली. कामबक्ष व त्याची आई उदेपुरी यांचा मनोदय गोवळकोंड्याचें राज्य प्रथम जिंकावें असा होता. अजीमनें बापास असें कळविलें, कीं अगोदर संभाजीस जिंकणेंच योग्य, परंतु त्या कामीं मुअज्जमची योजना न करितां बादशहानें स्वतः जावें. ह्या भानगडींत बापाची व मुलांची पुष्कळ भांडाभांडी झाली. आपल्या उद्देशाची दाद कोणास लागूं नये व मुलांच्या उद्देशांची परीक्षा करावी, म्हणून आपण एकदम दिल्लीस परत जाणार, असा पुकारा बादशहानें केला, आणि आंतून गोवळकोंडा, दक्षिणप्रांत व संभाजी ह्या सर्वांस जिंकण्याची तयारी चालविली.

८. संभाजीचे युद्धप्रसंग, हंबीररावाचा मृत्यु ( १६८७ ).— विजापुर जिंकलें, तेव्हां तेथील मुख्य सरदार सर्जेखान बादशहाचे तैनातीस आला होता, त्यास बादशहानें सन १६८७ त संभाजीचा मुलुख सर करण्यास पाठविलें. मराठे मनसबदारांनींही सर्जेखानाचें साह्य करावें असा बादशहाचा हुकूम होता. त्याप्रमाणें कोणी आले कीं नाहींत हें समजत नाहीं. सर्जेखान वाईपर्यंत आला, तेथें हंबीरराव तळ देऊन होता. मोगल व मराठ्यांची विशेष निकराची लढाई झाली. मोगलांचा पराभव झाला. मराठ्यांस जय मिळून शत्रूचे घोडे वगैरे लूटही त्यांस पुष्कळ मिळाली.पण लढाईचे गर्दीत हंबीररावास गोळा लागून तो ठार झाला. हंबीरराव शिवाजीच्या वेळेपासून अनुभवलेला सेनापति. संग्रामामध्यें पराजय असा त्यास ठाऊक नाहीं. ह्या शेवटच्या लढाईत सुद्धां त्यास जयच प्राप्त झाला. त्याचे अंगीं इमान व अनन्यभाव स्वामिसेवा हे गुण लोकोत्तर होते. लुटीचा ऐवज तो नेहमीं अफरातफर केल्याशिवाय धन्याचे पायांजवळ आणून ठेवीत असे. तलवारबहादुरीशिवाय राज्यकारभारांत त्यास कांहीं कळत नव्हतें, आणि त्या भानगडींत तो कधीं पडलाही नाहीं. आपलें काम बरें, कीं आपण बरा, असें त्याचें वर्तन असे. शिवाजी, मोरोपंत पेशवे, अण्णाजी दत्तो इत्यादि राज्य कमावणाऱ्या पुरुषमालेपैकीं हंबीरराव हा शेवटचा होय. हंबीरराव हयात असतां संभाजीस कांहीं उणें पडलें नाहीं, आणि संभाजीही त्याची लायकी ओळखून निर्धास्त होता. हंबीरराव पडल्यावर त्यास हताश झाल्यासारखें वाटूं लागलें. ह्या पुरुषाच्या मरणानें महाराष्ट्राची मोठी हानि झाली. त्याचें जीवनचरित्र उपलब्ध होईल तर राष्ट्रेतिहासांत पुष्कळ भर पडेल. वाईच्या लढाईनंतर संभाजी व औरंगजेब यांजमध्यें तात्पुरता तह ( ट्रूस ) झाला असें ऑर्म् म्हणतो, पण त्यांत काय बाबी ठरल्या तें लिहिलेलें नाहीं.

कर्नाटकचा कारभार शिवाजीचा जांवई हरजीराजे महाडीक याचेकडे होता. औरंगजेबानें विजापुर जिंकल्यावर आपली फौज गोवळकोंड्यावर आणिली, आणि पुढें कर्नाटक जिंकण्याचाही त्याचा इरादा होता. तेव्हां तिकडच्या आपल्या प्रदेशाचें संरक्षण करण्याकरितां संभाजीनें मोरोपंताचा भाऊ केशवपंत पिंगळे व संताजी घोरपडे यांचे हाताखालीं दहा हजार फौज देऊन त्यांस जिंजीकडे पाठविलें (जून, १६८७ ). स्वतःचा बंदोबस्त

करण्याचें सोडून संभाजी कर्नाटकचे नादास लागला, याजबद्दल त्यास कित्येकांनीं दोष दिला आहे. परंतु ह्या वेळचे संभाजीचे हेतु काय होते हें पाहिलें पाहिजे. बादशहानें ह्या वेळेस आपली सर्व फौज लांबलांबचे ठिकाणीं पाठविली होती. म्हणून महाराष्ट्रांत मोगल फौजेची संभाजीस तूर्त भीति नव्हती. सन १६८७ च्या जानेवारींत बादशहानें गोवळकोंड्यास वेढा घातला. त्याबरोबर संभाजी व त्याचे लोक सातारा, पन्हाळा, फोंडें इत्यादि ठिकाणांतून चवताळलेल्या वाघाप्रमाणें बाहेर पडले, व जून महिना येई तों त्यानीं विजापुरच्या पश्चिम हद्दींतला सर्व मुलूख काबीज केला. ह्या कामीं त्यांस अव्याहत विजयच मिळत गेले. (ऑर्म् पृ. १५६.) ह्यामुळें कर्नाटकचे बचावास फौज पाठविण्यास संभाजीस दिक्कत वाटली नाहीं. शिवाय तो स्वतः आपला बचाव करण्यास तयार होता. कर्नाटकावर फौज पाठविण्याचे दुसरे एक दोन उद्देश होते. शिवाजी मरण पावल्यापासून व्यंकोजीनें व नंतर त्याचा मुलगा शहाजी यानें आपला करार पाळला नव्हता. तिकडील मुलखाचा वसूल वगैरे त्यानें संभाजीस कांहीं एक पाठविला नव्हता. तो आपणास अद्यापि विजापुरचा ताबेदार समजे. विजापुर खालसा झाल्यावर शहाजीस स्वतंत्र होण्याची संधि साहजिकच प्राप्त झाली. व्यंकोजीनें स्वतंत्र न होतां स्वतः मराठशाहीची वृद्धि करावी, हा शिवाजीचा हेतु संभाजी जाणून होता, आणि तो तडीस नेण्यासाठीं त्यानें तिकडे फौज पाठविली. शिवाय मोगलांनीं दक्षिणेकडील प्रांत काबीज करण्यापूर्वीं, ते आपण होऊनच हस्तगत करून घ्यावे अशीही संभाजीची इच्छा होती. सारांश, संभाजीचे हेतु कांहीं वाईट नव्हते, व त्याचे अंगांत व्यसन नसतें, तर ते त्यानें तडीस नेऊन शिवजीनें घातलेल्या पायाची वृद्धि केली असती. पण तो सुयोग जुळून आला नाहीं.

ह्या तयारींत अंतस्थ कलहाची भर पडली असावी, असें मानण्यास आधार आहे. केशवपंत व निळोपंत पिंगळे ह्या चुलतेपुतण्यांचें बरें नव्हतें. केशवपंतानें पुतण्या व हरजी राजे या दोघांबद्दलही कपटभाव संभाजीचे मनांत भरवून दिला असावा. कारण हरजी राजे कदाचित् मोगलांस सामील होईल, म्हणून त्यास पकडून कैद करण्याबद्दल केशवपंतास संभाजीची गुप्त ताकीद होती. संभाजीची फौज जुलै महिन्यांत कर्नाटकांत दाखल झाली. तेव्हां औरंगजेबास आपल्या हातची शिकार

गेली असें वाटून, त्यानें एकदम कांहीं फौज म्हैसूर वगैरे प्रांत काबीज करण्यास गोवळकोंड्याहून ताबडतोब रवाना केली. मराठे येण्यापूर्वींच मोगलांनीं बंगलोर शहर काबीज केलें. इकडे संभाजीचा उद्देश ओळखून हरजी राजानें जिंजीचा बंदोबस्त चांगला केला. हरजीपुढें आपलें कांहीं चालणार नाहीं असें जाणून, केशवपंत त्याजबरोबर स्नेहानें वागूं लागला; आणि दोघांनीं आपल्या फौजा एकत्र करून बंगलोरकडे कूच केलें. रस्त्यांत बंगलोर मोगलांचे हस्तगत झाल्याचें त्यांस कळलें (ऑगस्ट १६८७). त्याच वेळेस बादशहा गोवळकोंडा काबीज न करतां दिल्लीस निघून जाणार, अशी वार्ता आल्यामुळें, हरजी महाडीक व संताजी भोसले यांनीं सर्व फौजा केशवपंताचे हाताखालीं दिल्या. त्या घेऊन केशवपंत म्हैसूर प्रांतीं गेला, आणि तिकडे दोन तीन महिने मोगलांशीं लढून तो कर्नाटकाकडे परतला ( नोव्हेंबर ). एकाएकीं त्याला परत येण्याचें कारण काय झालें तें समजत नाहीं. पण परत आल्यावर हरजीचें व केशवपंताचें उघड वैर होऊन भांडण जुंपलें. इकडे औरंगजेबानें दुसरी फौज पाठवून मच्छलीपट्टणपासून पूर्व किनाऱ्यावरचा सर्व प्रदेश काबीज केला. त्या प्रांतांत जे गोवळकोंड्याचे ताबेदार होते, त्या सर्वांशीं तह करून, त्यांस बादशहानें आपले ताब्यांत घेतलें. ह्या मोगल फौजेशीं टक्कर देऊन पूर्व किनाऱ्याकडचा प्रदेश आपण घ्यावा, अशी मसलत हरजीनें केशवपंतास दिली. परंतु केशवपंत हरजीचें ऐकेना. शेवटीं हरजीनेंच आपली कांहीं फौज मोगलांवर पाठविली. ह्या फौजेनें अर्काट, कांचीवरं, पुनामाली वगैरे ठिकाणें व त्या सभोंवारचा प्रदेश अल्प काळांत काबीज केला (१६८७); आणि ते दिवस शेतकापणीचे असल्यामुळें मराठ्यांनीं ह्या नवीन जिंकलेल्या प्रांतांतील वसूलही घेतला. हरजीचा पराक्रम पाहून केशवपंत व संताजी हेही त्याच्या मदतीस गेले, आणि त्यांनीं आणखी पुष्कळ ठिकाणें काबीज केलीं.

इतक्या अवधींत इकडे महाराष्ट्रांत संभाजीनें पन्हाळ्याच्या दक्षिणेकडील सर्व प्रदेश जिंकिला. एकशें वीस महत्त्वाचीं स्थळें संभाजीच्या हस्तगत झालीं, असा दाखला ऑर्म् यास मिळाला होता. वास्तविक संभाजीला या वेळीं फार चांगली संधि आलेली होती. औरंगजेबानें त्यास सर्व बाजूंनीं घेरण्याकरितां प्रथम विजापुर गोवळकोंड्याचीं राज्यें जिंकिलीं,

पण संभाजी व मराठे ज्यास्तच जोरानें उसळून त्याजवर आले. विचार व धूर्तता संभाजीचे ठिकाणीं असती तर प्रत्यक्ष बादशहाच्या फौजेची त्यानें चंदी उडवून दिली असती. देशांत बादशहाच्या कृत्यांनीं सर्वत्र असंतोष पसरला असून, त्याचे सरदार व मुलगे सुद्धां त्यास कंटाळून गेले होते. यामुळें जो योग शिवाजीस आला नाहीं, तो या वेळीं संभाजीस आला होता. कोणीही मोगल सरदार त्याजपुढें जाण्यास धजेना. पण त्याच्या व्यसनानें ह्या वेळीं घात केला. सन १६८८ त व्यसनाचा अतिरेक झाला होता असें दिसतें. इकडे संभाजीचा सर्वत्र विजय होत चाललेला पाहून औरंगजेबाच्या पायांची आग मस्तकास गेली. त्यानें प्रथम मराठ्यांस कर्नाटकांतून मागें हटविण्याकरितां महंमद सादीक याचे हाताखालीं मोटी फौज रवाना केली, ती सन १६८८ च्या फेब्रुवारींत कर्नाटकांत दाखल झाली.

ह्या मोगल फौजेनें पुनामाली व वांदिवाश काबीज करून तेथें आपला तळ दिला. त्यांजबरोबर झुंजण्यासाठीं मराठी फौजाही परत आल्या. परंतु बरेच दिवस दोघांचा सामना न होतां ते आसपासच्या प्रांतास उपद्रव देत राहिले. अनेक वेळां ते थेट मद्रासेवरही आले. ह्या झगड्यामुळें इंग्रजांची तर पांचांवर धारण बसली होती. कारण त्या प्रांतांत ठिकठिकाणीं त्यांच्या वखारी असून, त्यांत त्यांचा पुष्कळ ऐवज पसरलेला होता. परंतु ह्या प्रसंगीं कर्नाटकांत महत्त्वाचें असें कांहींच घडलें नाहीं. मोगल व मराठे यांचा उघड व जोराचा सामना झालाच नाहीं. प्रांतांत फिरणाऱ्या टोळ्यांच्या क्वचित् चकमकी झडत. ह्याप्रमाणें सन १६८८ हें वर्ष निघून गेलें. पुढें लवकरच सन १६८९ त संभाजीचा अंत झाला, व कर्नाटकांत कमावलेलें राज्य राजारामाचे फार उपयोगी पडलें. निळोपंत यानें तिकडे राजारामाची कामगिरी चांगली केली. केशवपंताचें नांव पुढें आढळत नाहीं. हरजीराजे जिंजीचा बंदोबस्त करून होता. त्यानें कर्नाटकचा बंदोबस्त उत्तम केला; आणि कपटभावानें स्वतःवर चालून आलेल्या केशवपंताकडून राष्ट्राची कामगिरी करवून राज्यवृद्धि केली, यांत शिवाजीचे उद्देश त्याच्या डोळ्यांपुढें एकसारखे होते. त्यानें तिकडील प्रदेशांत मोगलांचें कांहीं एक चालूं दिलें नाहीं.

व्यंकोजीचा मुलगा शहाजी यानें मात्र शहाणपणाची वर्तणूक केली नाहीं. ऊसकोट नांवाचा त्याचा एक परगणा याच वेळेस म्हैसूरच्या राजानें जिंकून घेतला असतां, हरजी राजाशीं तो मदत मागता, तर त्याचा परगणा गेला नसता. परंतु हरजीकडे मदत मागून आपली दुर्बलता व्यक्त करणें शहाजीस आवडलें नाहीं, म्हणून नाहक त्यानें आपलें नुकसान करून घेतलें.

९. **संभाजीचा वध ( स. १६८८–८९ ).**—सन १६८८ मध्यें बादशहा विजापुरास राहून संभाजीबरोबर मोठया दक्षतेनें लढत होता. विजापुरपैकीं संभाजीनें जिंकिलेलीं मैदानांतील बहुतेक ठिकाणें त्यानें परत घेतलीं. परंतु डोंगरांतील प्रदेशावर त्याचा इलाज चालेना. तेव्हां कित्येक डोंगरी किल्ल्यांचे आसपास मैदानांत आपली फौज बसवून वर जाण्याच्या वाटा त्यानें अडवून धरिल्या. परंतु पाठीमागच्या दुसऱ्या अवघड वाटांनीं मराठ्यांचें दळणवळण किल्ल्यांशीं चालू होतें. संभाजी पन्हाळ्यास राहत होता, त्यासही कित्येक वेळां बादशहानें वेढा घातला. परंतु किल्ला हस्तगत होण्याचें चिन्ह कांहींच दिसेना. शिवाजीनें प्रत्येक किल्ल्याची व्यवस्था फारच शहाणपणानें केलेली होती; आणि दर एक किल्ला चार दोन वर्षें शत्रूंशीं टक्कर देण्यास समर्थ होता. विजापुरास बादशहाचे फौजेंत सांथ उठून पुष्कळ लोक मेले, तेव्हां त्यानें विजापुर सोडून आपली छावणी नीरेच्या कांठीं आकलूज ( ता. माळशिरस, जि. सोलापुर ) येथें नेली. इकडे मराठी फौजांनीं नाशीक वगैरेकडे धामधूम चालविली होती, ती बंद करण्याकरितां बादशहानें शहाजादा अजीम यास तिकडे पाठवून ईतिकदखान यास कोंकणांत पाठविलें. तरी संभाजीशीं उघड लढून त्यास काबीज करण्याची बादशहाची बहुतेक निराशाच झाली होती.

संभाजीस कोणीं, कोठें, केव्हां व कसें पकडलें हे चार प्रश्न महत्त्वाचे आहेत. ते संशोधकांच्या मेहनतीनें बहुतेक सुटले असून, भा. इ. सं. मं. इ. वृ. १८३६ ले. ९१ व ऑर्मचे मदतीनें खालील मजकूर लिहिला आहे.

ऑर्म म्हणतो, युद्धानें संभाजी ताब्यांत येत नाहीं, असें पाहून बादशहानें आपल्या नेहमींच्या कपटविद्येचें अवलंबन केलें. संभाजी स्त्रीलंपट होता, आणि त्याची ही विषयवासना तृप्त करण्यास कलुशानें साह्य

केल्यामुळें, त्याजवर संभाजीची अतिशय मर्जी बसली होती. बादशहास ह्या गोष्टी कळल्या व कलुशासारख्या हलकट मनुष्यास वश करण्यास त्यास प्रयास पडले नाहींत. संभाजीला विषप्रयोग किंवा शस्त्रप्रयोग करून मारण्यापेक्षां कोणत्या तरी युक्तीनें पकडून आपल्या स्वाधीन करावें, हा बादशाहाचा बेत कलुशास पसंत पडला. एके दिवशीं रात्रीं एका सुस्वरूप हिंदु बाईची मिरवणूक निघाली असतां, तिला पकडून आणण्याविषयीं कलुशानें संभाजीस सल्ला दिली. तेव्हां कलुशास पाठीमागें फौजबंद राहण्यास सांगून, स्वतः संभाजीनें त्या लोकांवर हल्ला केला. ह्या वेळेस पूर्वसंकेतानुरूप मोगल फौज संभाजीच्या पाळतीवर होतीच. संभाजी त्या स्त्रीस पकडून परत आणीत असतां मोगलांनीं एकदम हल्ला करून त्यास पकडिलें. कलुशाही थोडी कपटाची दांडगाई करून उगेच स्वाधीन झाला. हा प्रकार पन्हाळ्यावर घडला असावा.

दोघांसही बादशहापुढें आणिल्यावर, कलुशानें आपल्या धन्यास वाईट मार्गास लाविलें म्हणून बादशहानें त्याची निर्भर्त्सना करून, स्वामिद्रोहाच्या आरोपावर प्रथमतः त्यासच ठार मारविलें. पुढें संभाजीस मुसलमान होण्याविषयीं त्यानें आग्रह केला असतां, त्यानें पैगंबराची निंदा केली. तेव्हां बादशहानें उंटावर बसवून त्याची धिंड काढविली, आणि पुनरपि त्यास मुसलमान होण्याविषयीं आग्रह केला. तेव्हां ‘ आपली मुलगी मला द्याल, तर मी मुसलमान होतों, ’ असें संभाजीनें म्हटल्यावर, बादशहानें प्रथम पैगंबरास निंदणाऱ्या त्याच्या जिव्हेचा छेद व त्याच्या शरीराचे तुकडे तुकडे करवून ते कुत्र्यांकडून खावविले. अशाप्रकारें संभाजीचा अंत झाला. येणेंप्रमाणें ऑर्मची हकीकत आहे.

ग्रँट डफनें आपली हकीकत बखरींवरून घेतलेली दिसते. तींत व खऱ्या लिहिण्यांत पुष्कळ तफावत आहे. गोवळकोंड्याच्या तैनातीस तकरीबखान म्हणून एक सरदार होता. तो तें राज्य संपल्यावर औरंगजेबाचे नोकरींत आला. त्यास कोल्हापुरची फौजदारी देऊन बादशहानें संभाजीच्या पाळतीवर पाठविलें. मोगल लोक पन्हाळ्याचे आजूबाजूस फिरत होते. परंतु तो किल्ला त्यांचे हातीं लागला नव्हता. संभाजी संगमेश्वर येथें विलास करीत होता, त्याची कची बातमी तकरीबखानानें मोठ्या युक्तीनें काढिली. संगमेश्वर कोंकणांत विशाळगडच्या

घाटाखालीं उत्तरेस वीस एक मैल दूर आहे. विशाळगडानजीकच्या घांटास अंबाघांट म्हणतात. त्या वेळेस संगमेश्वरची ही वाट फार फार अवघड होती. परंतु वाटाडे घेऊन व सर्व माहिती मिळवून, तकरीबखानाचा मुलगा इखलासखान हा संभाजीस पकडण्याच्या हेतूनें कोल्हापुराहून टोळी घेऊन निघाला. अगदीं नजीक येईपर्यंत त्याच्या येण्याची वार्ता सुद्धां कोणास कळली नव्हती. जवळ आल्यावर संभाजीच्या जासुदांनीं त्यास ही बातमी कळविली. त्या वेळीं ‘ कबजीबावास बोलवा व त्यांस पुढें जावयास सांगा, मला त्रास देऊं नका, ’ असें संभाजी म्हणाला. मोगल आल्याचें पाहून संभाजीचे बहुतेक लोक त्यास सोडून गेले. थोडेसे राहिले होते, त्यांस घेऊन कलुशानें मोगलांशीं सामना केला, परंतु तीर लागून तो हतवीर्य झाला, तेव्हां समोर आलेल्या लोकांस कापीत मोगल शिपाई संभाजी होता तेथें आले. संभाजी वेष पालटून पळून जाण्याच्या तयारींत होता. परंतु त्याच्या अंगावरील मौल्यवान् दागिन्यांवरून मोगलांनीं त्यास ओळखिलें; आणि कलुशासह त्यास व दुसऱ्या चोवीस असामींस पकडून ते परत कोल्हापुराकडे चालते झाले. तकरीबखानानें बादशहास हें वर्तमान कळविलें. बादशहा त्या वेळीं आकलूज सोडून, पुण्याच्या ईशान्येस भीमेच्या कांठीं तुळापुरास येऊन राहिला होता. संभाजीस आपले समोर आणण्याविषयीं त्यानें तकरीबखानास हुकूम पाठविला. बादशहाच्या छावणीनजीक येतांच खानानें संभाजीस उंटावर बसवून धिंड काढीत बादशहासमोर आणिलें. मग संभाजीस ठार मारावें कीं नाहीं, याचा विचार चालला. वजीर वगैरे मंडळींनीं, अशी सल्ला दिली, कीं संभाजीस मारूं नये. कारण त्यास मारण्याचा धाक दाखविल्यानें मराठ्यांचे किल्ले वगैरे घेण्यास सुलभ पडेल. बादशहाचाही विचार असाच होता असें दिसतें. परंतु संभाजीला मात्र आपल्या हीन स्थितीचा अत्यंत वीट येऊन, आयुष्याचा एक एक क्षण दुःसह झाला होता. अशा स्थितींत बादशहाकडून त्याला निरोप आला, कीं ‘ तूं मुसलमान होशील, तर जीवदान देतों. ’ त्याजवर संभाजीनें पैगंबराची निंदा करून जबाब पाठविला, कीं ‘ तुम्ही आपली मुलगी मला देत असाल तर मी मुसलमान होतों. ’ ह्या उत्तरानें बादशहाला संताप आला, व लगेच त्यानें संभाजीचे डोळे काढून जीभ कापविली, व लष्करच्या बाजारांत

त्याचा व कलुशाचा शिरश्छेद करविला ( ऑगस्ट १६८९ ). ग्रँट् डफ् म्हणतो, बिचाऱ्या कलुशावर स्वामिद्रोह केल्याचा आरोप करण्यांत येतो तो खरा नाहीं.

अशा प्रकारचे दोन भिन्न लेख उपलब्ध आहेत, आणि त्यांची एकवाक्यता करणें कठीण आहे. वरील दोघांशिवाय औरंगजेबाबरोबर असलेल्या बुंदेले सरदारानें संभाजीची हकीकत लिहिली आहे. परंतु तिच्यावरूनही खऱ्या प्रकाराचा निर्णय होत नाहीं. तथापि वर सांगितलेल्या चार प्रश्नांचीं पृथक्पणें उत्तरें देणें शक्य आहे.

पहिला प्रश्न.—संभाजीस कोणीं पकडिलें ? ऑर्म कोणाचेंच नांव देत नाहीं. बुंदेले म्हणतो खानजमान नामक मोंगलांच्या सरदारानें संभाजीस पकडिलें. चिटणीस आपल्या बखरींत ईलाचीबेग यानें संभाजीस पकडल्याचें लिहितो. डफनें तकरीबखान व त्याचा मुलगा इख्लासखान अशीं नांवें दिलीं आहेत. रत्नागिरि गॅझेटियरमध्यें मुकर्रबखानानें संभाजीस पकडिलें असें लिहिलेलें आहे.

ह्या सर्व नावांची एकवाक्यता खाफीखानाच्या लेखावरून करितां येते. ( एल्यट भाग ६, पृष्ठ ३३७-३४० ). शेख निजाम हैदराबादी नांवाचा एक शूर सरदार कुत्बशाहींत होता. गोवळकोंड्यास औरंगजेबानें वेढा घातला, तेव्हां कुत्बशहाचे कित्येक सरदार धन्यास सोडून औरंगजेबाकडे आले, त्यांत हा प्रमुख होता. औरंगजेबानें लगेच त्या सरदारास तकरीबखान हा किताब व पंचहजारी मनसब दिली. ह्यानें चांगला पराक्रम केल्यावरून त्यास पुढें मुकर्रबखान हें दुसरें नांव व कोल्हापुर प्रांताचा कारभार देऊन बादशहानें संभाजीवर नजर ठेवण्यास पाठविलें. त्यानें पन्हाळ्यास वेढा घातला, आणि संभाजीची खबर आणण्यासाठीं जिकडे तिकडे गुप्त हेर रवाना केले. संभाजी कोठें आहे, ही खबर लागतांच, मुकर्रबखान, त्याचा मुलगा इखलासखान व दुसरे मुलगे आणि पुतण्ये, दहाबारा खास नोकर, व दोन तीनशें घोडेस्वार, अशा मंडळींनीं एकाएकीं संभाजीवर येऊन त्यास पकडिलें. ह्या पराक्रमाबद्दल बादशहानें खूष होऊन मुकर्रबखानाची मनसब एक हजार वाढविली, आणि त्यास खानजमान फत्तेजंग असा किताब व मौल्यवान बक्षिसें दिलीं. त्याचा मुलगा इख्लासखान संभाजीस पकडण्याचे कामीं उपयोगी

पडला, म्हणून त्याचीही मनसब वाढवून त्यास बादशहानें खान-इ-आलम हा किताब दिला. ह्यावरून वर सांगितलेलीं सर्व नांवें एकच होत. मात्र चिटणिसांचा ईलाचीवेग हा इखलासखान शब्दाचा मोडींतील अपभ्रंश असावा. डफचा तक्रीबखान, बुंदेल्याचा खानजमान, गॅमेटियरचा मुकर्रबखान हीं सर्व एकाच इसमाचीं नांवें आहेत. बखरकारांचा ईतिकदखान हा पुढें रायगड काबीज करणारा झुल्फिकारखान होय.

दुसरा प्रश्न.–कोठें पकडिलें ? डफ् व चिटणीस संगमेश्वर देतात. ऑर्म् पन्हाळा असेल असा तर्क करितो. बुंदेले विशाळगड म्हणतो. विविधज्ञानविस्तारांतील मराठेशाहीच्या लेखकानें विशाळगड पसंत केला आहे. खाफीखान बाणगंगेच्या कांठचें, समुद्रापासून एक दिवसाचे टप्यांतलें, व कोल्हापुराहून ४५ कोसांवरचें संगमेश्वर असें सांगतो. पन्हाळगड व विशाळगड यांचे दरम्यान संभाजी राहत होता, हें निर्विवाद आहे. विशाळगडाहून संगमेश्वर सुमारें पंचवीस व कोल्हापुराहून सुमारें साठ मैल आहे. राजापुराप्रमाणेंच घांटापासून पश्चिमेस कांहीं मैलांवर जयगडच्या खाडीच्याकांठीं समुद्रापासून वीस एक मैलांवर संगमेश्वर आहे. प्राचीन काळीं संगमेश्वर प्रसिद्ध होतें, पण अलीकडे दोनशें वर्षे तें जीर्णावस्थेंत आहे. मराठशाहीच्या एकंदर इतिहासांत ह्या प्रसंगाशिवाय त्याचा कोठेंही उल्लेख नाहीं. अशा अपरिचित ठिकाणीं संभाजी पूर्वी कधीं आला नव्हता, आणि या वेळेसही येण्याचा विशेष संभव नव्हता. आपल्या विलासांत कोणत्याही प्रकारचा व्यत्यय येऊं नये, व आपण कोठें आहों, ह्याचा आपल्या शत्रूस मागमूस लागूं नये, अशा उद्देशानें संभाजी संगमेश्वरीं* आला असावा. परंतु प्रत्यक्ष पन्हाळयास वेढा पडला असतां, व आजूबाजूस मोगल संचार करीत असतां, मोगलांस भिऊन अप्रसिद्ध ठिकाणीं लपून, आपणास

---

* संभाजीला संगमेश्वरीं पकडिलें यांत संशय नाहीं. संगमेश्वर हें गांव सरदेसाई घराण्याचें वतनी होतें. तेथें त्यांचा वाडा होता, तो त्यांनीं संभाजीस राहण्यास दिला. पुढें पेशवाईंत हा वाडा सरदेसाई दुरुस्त करूं लागले, त्यास पेशव्यांनीं मनाई केली, आणि छत्रपतींचा वाडा सरदेसाई बळकावून बसले आहेत, असा भलताच आरोप त्यांजवर आणिला. संगमेश्वरास छत्रपतींचा वाडा कधींच नव्हता. ही हकीकत खंड २० ले. २८९ वरून स्पष्ट आहे.

निर्धास्त मानण्याजोगें संभाजीचें आजपर्यंतचें ब्रीद नव्हतें. शत्रु अंगावर आला असतां शूरास अपमानकारक रीतीनें स्वतःचा बचाव संभाजीनें कधीं केलेला नाहीं, इतकेंच नव्हे, तर प्रसंग पडल्यास थोडासा मान बाजूस ठेवून एखाद्या कृतीचा अंगीकार करून वेळ मारून नेण्याचा शिवाजीचा गुण संभाजीचे अंगीं असता, तर त्याचा पुष्कळ फायदा होण्याचा संभव होता. निदान सन १६८८ च्या पावसाळ्यांतील चार दोन महिन्यांत स्वतःचा बाणा संपूर्णपणें बदलण्या इतक्या दीन दशेस संभाजीला त्याच्या व्यसनानें व संकटानें एकाएकीं आणून पोंचविलें होतें; आणि तो सर्वस्वाचा त्याग करून स्वतःस पूर्णपणें विसरून गेला होता असें दिसतें. कदाचित् मंत्रानें शत्रूचा नाश करण्याचें कबजीचें नैपुण्य मोगलांशीं सामना करण्यास पुरे आहे, अशा समजूतीनें, व कबजीनें भारल्यामुळें, एकाद्या स्त्रीच्या नादास लागून, संभाजी संगमेश्वरीं आला असेल, किंवा मोगलांस फितूर असलेल्या कबजीनें त्यास बुद्ध्या संगमेश्वरीं आणून, त्याजबद्दलची वर्दी आंतून मोगलांस दिली असेल, असेंही असण्याचा संभव आहे. मोगलांच्या हालचालींची वार्ता संभाजीच्या कानीं आली असावी; आणि दगदगीस वैतागून चार दिवस विश्रांति घेण्याकरितां तो पन्हाळगडाहून अगर विशाळगडाहून संगमेश्वरास आला असावा, मात्र ह्यामुळें कलुशाच्या स्वामिद्रोहास पुष्टि येते. सारांश, खाफीखानानें पूर्ण खाणाखुणा दिलेल्या ह्या संगमेश्वरींच संभाजी पकडला गेला ह्यांत संशय नाहीं.

तिसरा प्रश्न.–केव्हां पकडिलें ? चिटणिसानें संभाजीच्या मृत्यूचा शक १६१० दिला आहे. शके १६१० म्हणजे मार्च सन १६८९ होऊं शकेल. ग्रँट डफ् ऑगस्ट १६८९ देतो. ऑर्म् म्हणतो जून १६८९. ऑर्मनें आपल्या म्हणण्याचा खुलासा येणेंप्रमाणें केला आहे. मद्रासच्या इंग्रजांचें ता. २० जुलै, १६८९ चें पत्र विलायतेस गेलें. त्यांत संभाजीच्या मरणाचा उल्लेख नाहीं. त्यानंतर २७ ऑगस्टचें दुसरें पत्र गेलें त्यांत त्यांनीं संभाजीच्या वधाची बातमी कंपनीस कळविली आहे. संभाजीच्या वधाची बातमी तुळापुराहून अगर मुंबईहून मद्रासच्या इंग्रजांस कळण्यास सुमारें वीस दिवसांचा अवधि धरून ऑर्म् म्हणतो, हा वध ऑगस्टच्या आरंभीं झाला असवा; व तत्पूर्वीं सुमारें एक महिना तो धरला गेला असावा. ऑर्म्च्या या लिहिण्यावरून एक गोष्ट सिद्ध होते. ज्या राजाच्या

ताब्यांत मुंबईकर इंग्रजांचा सर्व व्यापार होता, त्याच्या वधाची बातमी एक वर्षपर्यंत त्यांनीं विलायतेस कळविली नसेल हें संभवत नाहीं. शिवाय सन १६८८ च्या अव्वलीपर्यंत संभाजी कसा गुंतलेला होता, हेंही मागें आलेंच आहे; म्हणून मार्च सन १६८९ हा काल बरोबर असला पाहिजे. त्याप्रमाणेंच संगमेश्वर, विशाळगड व कोल्हापुर यांचे दरम्यान मृगापासून म्हणजे तारीख ५ जून नंतर अतिशय पाऊस पडतो. अशा पावसांतून मोगल फौज अवघड घांटांतून बाहेर येणें विशेष संभवनीय नाहीं.

स. १६८८ च्या उन्हाळ्यांत व पावसाळ्यांत संभाजी संगमेश्वरास सरदेसाई यांच्या वाड्यांत होता असा उल्लेख खं. २० ले. २८९ यांत आहे. 'आमचा वाडा वतनी श्रीमंत कै. संभाजी महाराज किल्ले रायगडाहून, मोगलांचे अडचणी मुळें, कबजीचे बुद्धीनें, जरोर निघोन संगमेश्वरीं आले, ते उन्हाळां जमात वाड्यानजीक होते. पर्जन्यकाळ आला. चहूंकडे धामधूम ऐसी संधि पडली, त्यांत आमचा वाडा मोठा पाहून आमचे वडिलांजवळ जागा मागोन वाड्यांत येऊन अडीच महिनेपर्यंत राहिले. पुढें शेख निजाम सुभा मोगलांकडून येऊन त्यानें हस्तगत करून नेले. ते समयीं वाडा आमचा जाळिला व गांवांतील देवळें फोडिलीं; व देव बाटविले. या प्रो महार्णव झालें. मोगलानें प्रांत काबीज केला. कसब्यांत गढी बांधिली. प्रांतास कौल दिला.' यावरून उघड होतें कीं, संभाजीनें उन्हाळा व पावसाळा संगमेश्वरीं काढिला; आणि मनूची म्हणतो त्याप्रमाणें स.१६८८च्या डिसेंबरांत ता. २८ रोजीं संभाजी पकडला गेला. संगमेश्वराहून कोल्हापुरास व कोल्हापुराहून बादशहाच्या छावणीस जाऊन, फाल्गुन व॥ ३० श. १६१०, मार्च ता. ११ स. १६८९ रोजीं तुळापूर येथें मारला गेला.

चवथा प्रश्न.—कसें पकडिलें ? ग्रँट् डफ व ऑर्म् या दोघांमध्यें फारच विरोध आहे. ऑर्म् म्हणतो, कलुशाच्या फितुरीमुळें संभाजी मोगलांच्या हातीं सांपडला. डफ यास कलुशाची फितुरी संमत नाहीं. बखरकार फितुरीच्या आरोपास पुष्टी देतात. तेव्हां कलुशा फितुर नव्हता, असें म्हणण्यास ऑर्म् व बखरी यांच्याहून दुसरा आधार डफ यास खाफीखानाचा मिळाला असावा. ऑर्म् मिरवणुकीची गोष्ट देतो, तिला दुसरा आधार सांपडत नाहीं. संभाजी व्यसनासक्त होऊन विशाळगडीं बेहोष

राहिला होता. तेथें त्यास मोगलांनीं येऊन एकदम पकडिलें, असें विविधज्ञानविस्तारांत म्हणजे बुंदेल्याचे हकीकतींत आहे. असल्या महत्त्वाच्या विषयावर त्या वेळीं चहूंकडे निरनिराळ्या गप्पा पसरलेल्या होत्या, आणि ह्या गप्पाच पुढें अनेक ठिकाणीं नमूद केलेल्या आपणास आढळतात. इंग्रजांच्या पत्रांत किंवा बखरींत खरा प्रकारच नमुद झाला असेल, असें नाहीं. तथापि मुसलमानांची तरफदारी करणारा व ज्यास खरी हकीकत माहीत असण्याचा बराच संभव, त्या खाफीखानाची हकीकत बरीच विश्वसनीय दिसते ती अशी:—

संभाजी हा घांटाखालीं संगमेश्वर येथें राहत आहे, अशी बातमी मिळाल्यावर मुकर्रबखान दोन हजारांवर स्वार व एकहजार पायदळ अशी फौज बरोबर घेऊन संभाजीस पकडण्याकरितां कोल्हापुराहून निघाला. रस्ता फारच अवघड होता. मोगल फौज आल्याची बातमी संभाजीच्या हेरांनीं त्यास कळविली, पण ती संभाजीस खरी वाटली नाहीं. बरोबरची फौज कांहीं अंतरावर ठेवून, खान दोनतीनशें लोकांनिशीं पुढें गेला, तेव्हां कलुशा कांहीं लोक बरोबर घेऊन खानावर आला. सुरवातीसच कलुशाचे उजवे हातास तीर लागून तो घोड्यावरून पडला. इकडे संभाजी पळून जाण्याच्या बेतांत होता, तो घोड्याखालीं उतरून कलुशाचे साह्यास आला. इतक्यांत कलुशास मोगलांनीं पकडिलें; आणि संभाजी पळून एका देवळांत लपून बसला. पुढें मोगलांनीं वेढा घालून त्यास पकडिलें. या प्रसंगीं कित्येक मराठे सरदार व लोक मोगलांचे हातून कापले गेले. म्हालोजी घोरपडे पांचशें लोकांनिशीं पन्हाळ्याचे बंदोबस्तास असे, तो संगमेश्वर येथें फौजेसुद्धां लढून ठार झाला. (का. सं. पत्रें यादी ४०७). संभाजीचीं बायकामुलें व राजारामाच्या बायका तेथेंच होत्या, त्या मोगलांचे हातीं सांपडल्या. एकंदर सव्वीस माणसें मोगलांनीं पकडलीं. मुकर्रबखान संभाजीस हत्तीवर आपल्या पाठीमागें बसवून घेऊन गेला. बादशहाला ही बातमी कळल्यावर त्यानें मोठा उत्सव केला; आणि मुकर्रबखानाचा सन्मान करण्याकरितां लोक सामोरे पाठविले. रस्तोरस्तीं मोठा उत्सव करण्यांत आला. पुढें कांहीं दिवसांनीं संभाजी व कलुशा ह्यांचा शिरच्छेद करण्यांत आला. अशी हा हकीकत खाफीखानासच समजण्याचा संभव विशेष होता. कलुशाच्या

बेइमानाबद्दल खाफीखान कांहीं लिहीत नाहीं, यावरून तो आंतून बादशहास सामील होता असें दिसत नाहीं. मात्र संभाजी अगदीं त्याच्या मुठींत असल्यामुळें, व इतर मंडळीच्या बोलण्याकडे कलुशानें अगदींच दुर्लक्ष केल्यामुळें, महाराष्ट्र मंडळीस त्याचेंच हें कपट असें वाटलें असावें. बादशहानें कलुशास कपटानें वश करून घेतलें; आणि त्याच्या बेइमानामुळें संभाजी बादशहाच्या हातीं लागला, अशी हकीकत मनूचीनेंही यथास्थित वर्णिली आहे; पण मनूची या वेळीं मद्रासेस होता, तेव्हां लोकवार्तेपलीकडे ज्यास्त कांहीं त्यास ठाऊक असण्याचा संभव नाहीं. या एकंदर प्रकरणाची चर्चा भा. इ. मं. इतिवृत्त १८३६ ले. ९१त रा. पटवर्धन यांनीं केली आहे, त्यावरून बराच निर्णय होतो.

संभाजीस पकडल्यावर त्यास कोल्हापुराहून, तुळापुर येथें बादशहाचे छावणींत नेलें. अशा स्थितींतही संभाजीनें आपला बाणा कायम राखिला; तो बादशहास शरण गेला नाहीं. शरण गेला असता तरी बादशहाकडून जीवदान मिळेल, अशी त्यास खात्री नव्हती. संभाजीनें पैगंबराची केलेली निंदा सहन न होऊन, संतापाच्या आवेशांत बादशहानें संभाजीस ठार मारविलें, हें म्हणणें औरंगजेबाचे शीलास शोभत नाहीं. संतापानें देहभान विसरणारा औरंगजेब नव्हे. त्याचे बेत नेहमीं खोल असावयाचे. मराठ्यांचे पायीं आजपर्यंत आपली काय दुर्दशा झाली, हें तो जाणून होता. म्हणून संभाजीस ठार मारण्याचा त्याचा निश्चय अगोदरच झाला असेल. शत्रूस आपल्या ताब्यांत घेऊन, त्याजकडून आपली कामगिरी करविण्याची युक्ति अकबराची होय, औरंगजेबाची नव्हे. औरंगजेबानें आपल्या एकाही शत्रूस जीवदान दिल्याचें उदाहरण नाहीं. तेव्हां संभाजीस ठार मारण्याचा त्याचा पूर्व संकल्पच असला पाहिजे. जीभ कापणें व डोळे काढणें हें त्यानें मराठ्यांस धाक घालण्यासाठीं केलें असेल. त्याचा परिणाम मात्र उलट झाला. औरंगजेबाच्या मुलीचें प्रेम संभाजीवर कितपत होतें, ह्या प्रश्नाचा विचार पुढें करावयाचा आहे. असो. एकंदरींत संभाजीचा वध फार हृदयद्रावक रीतीनें झाला, आणि त्या योगें मराठशाहीवर दुसरा मोठा आपात आला, त्याचें वर्णन पुढें येईल. मरणकालीं संभाजीचें वय ३२ वर्षांचें होतें.

१०. संभाजीची योग्यता.—येथपर्यंत संभाजीची हकीकत दिली आहे, तिजवरून तो कोणत्या तऱ्हेचा पुरुष होता, हें सहज कळून येईल. शिवाय संभाजीच्या कर्तृत्वासंबंधानें ठिकठिकाणीं चर्चा केलेली असल्यामुळें, आतां कांहीं विशेष सांगावयाचें राहिलें नाहीं. संभाजीच्या अंगचे मोठे गुण म्हटले म्हणजे त्याचें अप्रतिम शौर्य, निरुपम धाडस, व मरण आलें तरी शत्रूस हार न जाण्याचा त्याचा बाणा, हे होत. तो चवताळून आलेल्या वाघाच्या अंगावर समोर चालून जात असे, असें सांगतात. हा गुण अलौकिक आहे यांत संशय नाहीं. मात्र ह्या गुणास विचार अगर विवेक यांची जोड मिळेल, तरच त्याचें चीज होत असतें. संभाजीचे ठिकाणीं विवेक नसल्यामुळें, त्याच्या ह्या धाडसाचा परिणाम विपरीत झाला.

शौर्याहून अन्य गुण संभाजीच्या अंगीं विशेष नव्हते. तो अंतःकरणाचा कोमल असावा, असा तर्क करण्यास जागा आहे. त्याच्या हातून क्रूरपणाचीं कित्येक कृत्यें घडलीं, एवढ्यावरून त्याचा स्वभावच क्रूर होता असें म्हणतां येणार नाहीं. ज्यांस तो आपले वैरी म्हणून एकवार समजला, त्यांजला त्यानें दया दाखविली नाहीं हें खरें, तथापि सामान्यतः विनाकारण त्यानें लोकांस छळल्याचें उदाहरण नाहीं. तसेंच रागाच्या आवेशांत हातून अन्याय घडल्यास, राग शांत झाल्यावर त्यास पश्चात्तापही होई. ह्यावरून असें दिसतें कीं, तो केवळ पाषाणहृदयी नव्हता. बाळाजी आवजीस ठार मारल्यावर त्यास अत्यंत अनुताप झाला. ह्या अन्यायाबद्दल त्याच्या बायकोनें त्याचे डोळ्यांत चांगलेंच अंजन घातलें. येसूबाई त्यास खरमरीत शब्दांनीं नानाप्रकारें बोलली असतां, त्यानें प्रत्युत्तरादाखल एक चकार शब्दही काढिला नाहीं; उलट तिचेंच म्हणणें त्यानें कबूल केलें. नाहीं तर बायकोच्या जाचानें वैतागून तिला झिडकारून टाकण्यास त्यास विलंब लागला नसता. परंतु बायकोचा थोरपणा तो जाणून होता. त्यानें तिला शब्दांनीं अगर वर्तणुकीनें दुखविल्याचें उदाहरण नाहीं. स्त्रीलंपट होऊन त्यानें तिच्याकडे दुर्लक्ष केलें असेल, तरी पण तिचा त्यानें अवमान असा कधीं केला नाहीं. उलट अनेक वेळां तो तिच्यापाशीं आपल्या चुका कबूल करी, परंतु व्यसनाचा नाद अतिशय लागल्यामुळें, त्याला आपल्या वर्तणुकीवर कोणत्याही प्रकारचा दाब ठेवतां येत नसे. यास्तव शिक्केमोर्तबाचा अधिकार त्यानें नेहमीं बायकोच्याच

हातीं ठेविला होता. गोव्याचे स्वारींत बाळाजी आवजीचा मुलगा खंडो-बल्लाळ याची स्वामिभक्ति पाहून, संभाजीनें त्याजवर कृपा केली, ती गोष्ट पुढें चिटणिसांच्या हकीकतींत दिली आहे. त्यावरून संभाजीच्या अंगची दयार्द्रता व गुणग्राहकता हे गुण व्यक्त होतात. मात्र अमुक एक मनुष्य वाईट असें त्याच्या मनानें एकदां घेतलें, म्हणजे मग त्याचा ग्रह कधीं बदलत नसे. येसुबाईवर संभाजीची भक्ति होती यावरून संभाजी मूळ अंतःकरणानें वाईट नव्हता असें दिसतें. संभाजीच्या आपत्तींत त्याची ही बायको आपल्या उज्ज्वल गुणांनीं विशेष शोभते. खंडो बल्लाळ वगैरे चांगल्या मंडळीस तिनें धीर देऊन कामास लाविलें. पुढें औरंगजेबाच्या हातांत पडल्यावरही तिच्या सौजन्यानें व सद्गुणानें तिची जीवनयात्रा सुखाची गेली. औरंगजेबाच्या जनानखान्यांत ती मोठ्या सावधगिरीनें पण प्रेमानें वागली. सगळयांशीं तिनें प्रेम संपादिलें. शाहूशिवाय आणखी मुलें-मुली तिला होत्या असें मनूची म्हणतो. शाहूचा जन्म स. १६८० तला. तेव्हां तिला आणखी मुलें असणें संभवनीय आहे. मात्र मराठी बखरींत त्यांचा उल्लेख नाहीं. ही शाहूच्या सुटकेनंतर दिल्लीसच अटकेंत होती. बाळाजी विश्वनाथ दिल्लीवर गेला, तेव्हां मातुश्रीस सोडवून आणा, असा त्यास शाहूचा हुकूम होता. त्याप्रमाणें ती दक्षिणेंत परत आली असावी.

स्त्रीविषयक आसक्ति व मद्यपान हीं दोन व्यसनें संभाजीला जबरदस्त होतीं. त्यामुळेंच त्याचा अंतीं नाश झाला. हीं दोन व्यसनें म्हणजे किती भयंकर आहेत, हें सांगावयास नकोच, आणि त्यामुळें संभाजीचा नाश झाला यांतही कांहीं आश्चर्य नाहीं. तथापि संभाजीच्या या व्यसनांपासून लोकांस साक्षात् उपद्रव किती होत असे, याचा विचार केला पाहिजे. म्हणजे सुरापानानें धुंद होऊन संभाजीचे चाळे बाहेरच्या लोकांस व प्रजाजनांस जाचक होत असत कीं काय, किंवा तो एकांतांत बसून आपली विषयवासना तृप्त करून घेई; तसेंच स्त्रीविषयक वासनेच्या नादीं लागल्यामुळें परदारापहरणासारखे भयंकर जाच लोकांस सोसावे लागले कीं काय ? या प्रश्नांचा विचार करितांना आपण नाटकांवर हवाला देऊन उपयोग नाहीं. नाटककार किंवा कादंबरीकार हव्या त्या पुरुषांचें नाटक किंवा कादंबरी लिहून, आपल्या लेखांत विशेष रस आणण्याकरितां हातांतील पात्रांची वाटेल तशी दुर्दशा करून सोडितात.

मराठ्यांच्या इतिहासांत तर असे प्रकार पदोपदीं घडले आहेत. त्यांतून दुर्दैवाची गोष्ट ही, कीं आपल्या भाषेंत इतिहासकारांपेक्षां नाटक व कादंबरीकारांनींच विशेष अघाडी मारली आहे. संभाजी, आनंदीबाई, पानिपत वगैरे विषयांची आपली आज कालची माहिती कादंबऱ्या अगर नाटकें यांवरूनच प्राप्त झाली आहे. संभाजीच्या संबंधानें तर हा प्रकार विशेष अनिष्ट झाला आहे. ह्या गोष्टींत बखरींवरही सर्वस्वी विश्वास ठेवितां येत नाहीं, हें मागें सांगण्यांत आलेंच आहे. मात्र अनाचारांचीं विशिष्ट उदाहरणें जेवढीं बखरींत दिलीं असतील, तेवढीं अवश्य जमेस धरलीं पाहिजेत. पण अशीं उदाहरणें संभाजीसंबंधानें फारशीं नाहींत, तेव्हां वर सांगितलेल्या प्रश्नांचा खुलासा होणें शक्य नाहीं. तथापि संभाजीच्या चरित्रक्रमावरून एक गोष्ट उघड होते, ती ही कीं संभाजी गादीवर आल्यापासून सन १६८५ च्या अखेरपर्यंत व्यसनामध्यें रममाण होण्यास त्यास फारसा अवधि मिळालेला नाहीं. सन १६८६ च्या सालांत तो कोठें व काय करीत होता तें समजत नाहीं; तरी त्या वेळीं शत्रू छातीवर पाय देऊन उभे असतां, वारयोषिता व मद्यपात्रें बरोबर घेऊन तो सर्व वर्षभर संगमेश्वरसारख्या एखाद्या अप्रसिद्ध ठिकाणीं दडी मारून बसला असेल हें संभवत नाहीं. १६८७ व ८८ सालांत, तो मोहिमा करीत होता. यावरून कार्यव्यापृतत्वामुळें तरी व्यसनाभिलाष सिद्धीस नेण्यास त्यास मनमुराद अवसर मिळाला नाहीं हें खचित. म्हणून विशिष्ट उदाहरणें पुढें येईपर्यंत महाराष्ट्र-राज्यसंस्थापकाच्या ह्या पूज्य पुत्रावर, कादंबरीकाराप्रमाणें यथेच्छ तोंडसुख घेणें निदान इतिहासकारास तरी प्रशस्त नाहीं. लहानपणीं संभाजी व्रात्यपणा करी; परंतु राज्याधिपति झाल्यावर अंगावर पडलेल्या जबाबदारीमुळें, त्याच्या व्यसनांतील व्रात्यपणा थोडाबहुत तरी कमी झाला असेलच. कदाचित् शेवटीं शेवटीं निराशा व उद्वेग यांचा जाच विसरण्याकरितां, मदिरेची भक्ति त्यानें विशेष चालविली असेल, असाही संभव आहे.

एकंदरींत संभाजीची योग्यता ठरवितांना फार सावधगिरी ठेविली पाहिजे. दुसरी एक गोष्ट संभाजीला बाधक झाली आहे. शिवाजीचाच मुलगा पडल्यामुळें शिवाजीच्या कर्तृत्वाशीं संभाजीची तुलना केली जाते. दोघेही पुरुष संनिकट आल्यामुळें एक अतिशय उच्च, तर त्याचे विरोधानें

दुसरा अतिशय नीच समजला जातो. शिवाजी लोकोत्तर पुरुष होऊन गेला, त्याचे हातून राज्यसंपादन झालें, तेव्हां अर्थात् त्यास देवाप्रमाणें मान मिळूं लागला. ह्या प्रकाराशीं संभाजीच्या आचरणाचा विरोध स्पष्ट होऊन, व्यसनामध्यें, पराक्रमशून्यतेमध्यें, व इतर हरएक दुर्गुणामध्यें संभाजी जितका दिसतो तितका हीन खचित नाहीं. चांगुलपणांत तो लोकोत्तर नव्हता, तसा हीनपणांतही तो लोकोत्तर नव्हता. त्याच्या ठिकाणीं असाधारण असें कांहीं नव्हतें. त्याचीं व्यसनें त्याच्या जबाबदारीच्या मानानें कितीही निंद्य दिसलीं, तरी तत्कालीन परिस्थितीच्या मानानें तीं असामान्य नव्हतीं. म्हणून शिवाजीस त्या टोंकास तर संभाजीस त्याच्या बिरुद्ध टोंकास उभें करणें वाजवी नाहीं. संभाजीच्या नाशाचीं मुख्य कारणें दोन आहेत, एक नव्हे. केवळ त्याच्या अंगच्या व्यसनांमुळें अगर दुर्गुणांमुळें एवढें मोठें अरिष्ट राष्ट्रावर आलें असें नाहीं. दुसरें एक जबरदस्त कारण आहे, तिकडे सहसा कोणाचें लक्ष जात नाहीं. प्रतापी मोगल बादशाहीच्या अखिल व प्रचंड शक्तीशीं संभाजीला निःसहाय झगडावें लागलें, तसें शिवाजीस लागलें नाहीं. संभाजीच्या सारखीं संकटें शिवाजीवर येतीं, तर त्याचीही त्रेधा उडाल्याशिवाय राहतीना. मात्र कांहीं तरी युक्ति योजून तशीं संकटें शिवाजी स्वतःवर एकदम येऊं देत नसे; आणि संभाजीस तर कावा असा मुळींच माहीत नव्हता. शिवाजी विजापुरकरांशीं लढला, तर संभाजीनें प्रत्यक्ष औरंगजेबाशीं मोठ्या जोरानें टक्कर मारिली; आणि अनेकवार त्या बलवान् बादशहास त्यानें सतावून अगदीं हताश केलें. यामुळेंच मरणाचे पूर्वीं मोगलांच्या भीतीनें तो संगमेश्वरीं जाऊन लपला असेल, हें संभवत नाहीं. सारांश, आज राजपुरास, तर उद्यां भडोचेस, आज हबसाणांत, तर उद्यां फोंड्यावर, असा जो एकसारखा विजेसारखा चमकत होता, ज्यानें अनेक मुलूख मारून मोगल बादशहास जर्जर केलें, ज्यानें गंगेच्या तीरीं सहा हजार विश्वासघातकी लोकांचा मोठ्या शिताफीनें समाचार घेतला, ज्यानें वाघाप्रमाणें शत्रूवर उडी घालण्यास कधींही जिवाची पर्वा केली नाहीं, त्यास औरंजेबासारख्या बलिष्ठ बादशहानें व्यसनाधीनतेच्या वन्य अवस्थेंत विश्वासघातानें पकडिलें, आणि नीचतेनें त्याचा शिरच्छेद केला, म्हणून आम्हीं तज्जातीयांनींही संभाजीचा तिरस्कारच केला पाहिजे असें नाहीं. वर सांगितलेल्या कर्तबगारीबद्दल थोडाबहुत

सन्मानाचा अंश त्यास आपणाकडून मिळणें रास्त आहे. निदान संभाजी-विषयींची नालस्ती पुराव्याशिवाय आपण खरी मानली नाहीं, म्हणजे पुष्कळ झालें. कारण संशयाचा फायदा आरोपितास देणें हें निष्पक्षपाताचें मर्म होय.

यावरून संभाजी म्हणजे चांगुलपणाचा पुतळा होता, असें म्हणण्याचा उद्देश नाहीं. परंतु नाटकांतून, कादंबऱ्यांतून, टालोपयुक्त पुस्तकांतून संभाजीची नालस्ती इतकी करण्यांत येते, कीं त्याबद्दल कींव वाटल्याशिवाय राहत नाहीं. औरंगजेबानें संभाजीचा क्रूरपणानें वध केला, ह्या अनिष्ट परिणामावरून संभाजीची खरी कर्तबगारी आपण विसरून जातों, आणि त्याची सर्वत्र इतकी निंदा करितों, कीं आम्हा तज्जातीयांस तीं शोभतच नाहीं. शाळांत जाणाऱ्या अल्पवयस्क मुलांस सुद्धां संभाजीविषयीं अनादरबुद्धि शिकविण्यांत येते. इतक्या अनादरास संभाजी खचित पात्र नाहीं. परिणामावरून निकाल देणें अन्यायाचें आहे. संभाजीच्या अडचणी असामान्य होत्या, त्याची परिस्थिति भयंकर होती, व त्यास कोणाचेंही साह्य नव्हतें; तरी त्यानें शत्रूंशीं टक्कर देण्यांत आपली शिकस्त केली. त्याच्या ठिकाणीं आपणांपैकीं एखादा सामान्य पुरुष असता, तर त्याच्यानें संभाजी इतकेंही काम झालें नसतें. या गोष्टी मनांत आणून, व स्वराज्याचे कामीं त्यानें यथाशक्ति आपली कामगिरी केली हें जाणून, त्यास मान देणें उचित आहे. राजा या नात्यानें संभाजी नालायक ठरतो, पण सामान्य मनुष्य ह्या नात्यानें त्याची कर्तबगारी हलकी नाहीं. आणि संभाजीची योग्यता जरी राजा ह्या नात्यानेंच ठरविली पाहिजे, तरी तो नालायक ठरण्यास त्याचा भोळा व तामसी स्वभाव कसा कारण झाला, हें वर दाखविलें आहे. निदान त्याच्या मानसिक दौर्बल्याविषयीं व दैवदुर्विपाकाविषयीं त्याची कींव करून, त्याजबद्दल आदरबुद्धि धारण करणें उचित नाहीं काय ? लहान लहान मुलांनीं सुद्धां शेलक्या दूषणांनीं त्याचा पिच्छा पुरवावा, इतका नीच संभाजी होता काय ? याचा विचार आपण आपणांशींच करावा.

मरणसमयीं संभाजीनें दाखविलेलें धैर्य अद्वितीय आहे. बादशहानें पकडण्यापूर्वी व तदुत्तरही त्यास शरण जाऊन, स्वतःचा थोडाबहुत बचाव व फायदा त्यास करितां आला असता. अशा संकटसमयीं शत्रूंस शरण

जाऊन स्वाभिमानास काळिमा लावलेलीं उदाहरणें इतिहासांत कांहीं थोडीं थोडकीं नाहींत. पण संभाजीस आपला देह बचवायचा नव्हता, तर राष्ट्र बचवायचें होतें. राष्ट्र जाऊन देह जगणें त्यास नको होतें; म्हणून देह जाऊन राष्ट्र बचविण्याचा उपाय त्यानें केला. हें धैर्य लहान नव्हे. हें शिवाजीच्या मुलाशिवाय दुसऱ्या कोणांत सांपडणार आहे ? जसा एखादा योगी एकदां आपल्या मनाचा निश्चय करितो, व मग इहलोकच्या यातना त्यास कळत सुद्धां नाहींत, तद्वत् संभाजीची शेवटची स्थिति दिसते. बादशहानें पकडिलें तेव्हांच आपण मेलों असें त्यास वाटलें. तदुत्तरच्या यातना त्यास कळल्यासुद्धां नाहींत. त्याच्या यातना त्याच्या लोष्ठमय देहास होत होत्या, पण त्या देहांतील आत्मा अगोदरच निघून गेला होता. ह्या दृष्टीनें संभाजीचा परिणाम पाहिला, म्हणजे तो महत्कार्यार्थ जिवाची पर्वा न करणाऱ्या साधूसारखा दिसतो. अधिकारावर असतां तो शत्रूंशीं अत्यंत निकरानें लढला. आपली जबाबदारी टाळण्याचा यत्किंचित्‌ही प्रयत्न त्यानें केला नाहीं. वरील कलमांतील हकीकती वाचून त्याच्या युद्धकौशल्याबद्दल आपण तारीफच केली पाहिजे. शिवाय संभाजीविषयींचा समग्र इतिहास परकीयांनीं लिहिलेला आहे; वास्तविक खरा इतिहास फारसा बाहेर आलेला नाहीं, हेंही ध्यानांत ठेविलें पाहिजे.

आतां तुलनाच करावयाची असेल, तर इंग्लंडचे इतिहासांत संभाजीचा समकालीन एक जोडीदार आहे. तो दुसरा जेम्स राजा होय. दोघांचाही स्वभाव विलक्षण दुराग्रही; वाटेल तें नुकसान झालें तरी बेहेत्तर, पण आपला दुराग्रह सोडावयाचा नाहीं, असा दोघांचाही निश्चय. तसेंच अमुक एक मनुष्य आपला शत्रु आहे अशी मनाची समजूत झाल्यावर, त्यास लंबे करण्यांत दोघांनींही आपल्या क्रूरपणाची शिकस्त केली. जज जेफ्रीसचीं कृत्यें व ' रक्तपाताचीं न्यायासनें ' ( ब्लडी असायझीस ) या गोष्टी वाचून संभाजीचा क्रूरपणा हलकाच वाटतो. मात्र इंग्लंडांतील राज्यपद्धति विशेष सुधारलेली व लोकमतावलंबी असल्यामुळें, जेम्स हद्दपार झाला, पण प्राणांस मुकला नाहीं. बाकी दोघांचा परिणाम सारखाच झाला. एका गोष्टींत मात्र ही तुलना शोभण्यासारखी नाहीं. पौरस्त्य व पाश्चात्य राजपद्धतींतच एक फरक आहे. पहिल्यांत लोकमतास थारा

नाहीं, दुसऱ्यांत लोकमतच प्रधान आहे. म्हणून ह्या दोन पुरुषांत दुसरें विशेष साम्य नाहीं. बाकी स्वभावानें दोघेही एकसारखे होते इतकें खरें.

व्यसनासक्तीमध्यें सलीम बादशहाशीं संभाजीची तुलना करतां येईल. त्यांतही संभाजीची येसूबाई व सलीमची नूरजहान यांनीं आपल्या नवऱ्याचें व्यसन होतां होईल तों मर्यादित करण्याचा व त्याचे अनिष्ट परिणाम होईल तितके टाळण्याचा प्रयत्न केलेला आहे. परंतु सलीम तामसी नव्हता. बापानें घातलेली राज्याची घडी त्यानें बिघडवली नाहीं, आणि शहाण्या लोकांचा त्यानें अव्हेर केला नाहीं, यावरून सलीमची योग्यता जास्त ठरते.

इतिहासास सर्व प्रकारच्या पात्राची जरूर आहे. चांगल्या व वाईट दोनही पुरुषांची विचक्षणा आपल्या उपयोगाची आहे. दोहोंतही बोधप्रचुर तत्त्वें भरलेलीं आहेत; म्हणून आज दोनशें वर्षें होऊन गेल्यावर संभाजीचा इतिहास लक्षपूर्वक वाचून प्रत्येकानें दिसेल तो बोध त्यापासून घ्यावा, हें योग्य आहे.

जोत्याजी केसरकर.—हा संभाजीचा एक स्वामिभक्त सेवक होता. हा करवीरप्रांतीं पुंजाळ गांवचा पाटील असून, नेहमीं संभाजीच्या निकट राहत असे. स्वारीशिकारींत व लढाईत त्यानें धन्याची पाठ कधीं सोडिली नाहीं. संभाजीच्या मत्यूनंतर येसूबाईजवळ भरंवशाचा मनुष्य हाच होता. ह्याची आणखी हकीकत शाहूच्या कारकिर्दींत येणार आहे.

संभाजीच्या कारकिर्दीविषयीं एकदोन गोष्टी आपण नेहमीं ध्यानांत ठेवण्याजोग्या आहेत. त्या कारभाराच्या दहा वर्षांत सर्व मोठमोठ्या घराण्यांचा, सरदारकामगारांचा व त्यांबरोबरच रयतेचाही विलक्षण छळ झाला, आणि नानातऱ्हेचीं दुःखें लोकांवर कोसळलीं. तथापि त्या वेळच्या सर्व लोकांचीं सहनशीलता व धारिष्ट हीं त्या अडचणींत जितकीं कसास लागलीं तितकीं पूर्वीं कधीं लागलीं नव्हतीं. ते संभाजीवर उठले नाहींत. त्याला त्यांनीं कैदेंत टाकिलें नाहीं, किंवा आपल्या हातून होईल तितकी त्यास मदत करण्यांत त्यांनीं कसूर केली नाहीं. ते त्यास अखेरपर्यंत एकनिष्ठपणें भजत होते. अशी आपल्या राजाविषयीं अतोनात भक्ति इतरत्र क्वचित् दिसून येते. अनुमान असें निघतें कीं, दुसऱ्याच्या चुकीची चिकित्सा करीत बसण्यापेक्षां निमूटपणें आपलें कर्तव्य बजावणें हेंच त्या वेळच्या लोकांस ज्यास्त श्रेयस्कर

वाटलें. कसेंही घरलें तरी एवढें खरें, कीं संभाजीनें तुरुंगांत टाकिलें तरी हरकत नाहीं, पण तुरुंगांतूनही आपण राज्याच्या हिताचा शक्य तो प्रयत्न करावयाचा, अशा प्रकारचा त्या वेळच्या प्रमुख मंडळींत व सामान्य लोकांत जो निग्रह दिसून आला, त्याची तारीफ केल्यावांचून राहवत नाहीं. अशा प्रकारें स्वार्थनिरपेक्षतेनें स्वकर्तव्य करण्याची बुद्धि राष्ट्राच्या अंगीं असणें हें त्याच्या ऊर्जितावस्थेचें लक्षण होय.

## प्रकरण तेरावें.

### छत्रपति राजाराम.

मार्च १६८९–मार्च १७००.

१. मराठशाहीवरील भयंकर आपात. २. रायगडाचा पाडाव व येसूबाई. ३. संताजी घोरपडे व धनाजी जाधव. ४. कित्येक प्रसिद्ध राष्ट्रसेवक. ५. महाराष्ट्रांतील युद्धप्रसंग. ६. संताजी कासमखानाचा संग्राम. ७. जिंजीस प्रयाण व राज्यव्यवस्था. ८. राजारामाचें प्रोत्साहन, व जहागिरींची पद्धत. ९. जिंजीचा वेढा, राजारामाची सुटका. १०. संताजीचा खून व त्याची मीमांसा. ११. सातार्‍यास मराठशाहीची स्थापना. १२. राजारामाची शेवटची स्वारी. १३. राजारामाची योग्यता.

**१. मराठशाहीवरील भयंकर आपात.**—मराठ्यांच्या नवीन राज्यस्थापनेंत अनेक विघ्नें आलीं. त्यांतही कित्येक प्रसंग अत्यंत आणीबाणीचे होते. अशा प्रसंगांस आपात हें नांव देण्यांत आलें आहे. शिवाजी दिल्लीस गेला, तेव्हां जो बिकट प्रसंग मराठमंडळावर आला, तो पहिला आपात होय. त्यानंतर मराठ्यांच्या राज्यस्थापनेचें काम कांहीं दिवस चांगलें चाललें. शिवाजीच्या मृत्यूनंतर संभाजी गादीवर आला; तरी मराठ्यांच्या सत्तेस विशेष धोका आलेला नव्हता. परंतु संभाजी राज्य करण्यास नालायक होता, व त्याच वेळेस शक्तिमान् मोगल बादशहा मराठ्यांचा समूळ उच्छेद करण्यासाठीं महाराष्ट्रांत येऊन राहिला. त्यामुळें मराठशाहीवर आणखी एक दुर्धर प्रसंग येऊन गुदरला.

संभाजीच्या वधानें या प्रसंगाची केवळ सुरुवात झाली; आणि तो दुर्धर प्रसंग निवारण्यासाठीं दहा वीस वर्षे मराठ्यांनीं विलक्षण सामर्थ्य प्रगट केलें, त्यामुळें हिंदुस्थानच्या, किंबहुना, जगाच्या इतिहासांत, मराठ्यांचें नांव अजरामर झालें आहे. अशा प्रकारचा हा प्रसंग म्हणजे मराठशाहीवरील दुसरा आपात होय. ह्या आपाताचें भयंकर स्वरूप व त्याचें अंतीं झालेलें निरसन ह्या कथानकानें पुढील दहा वीस वर्षांचा इतिहास भरलेला आहे. अशा प्रकारचे अनेक आपात मराठी राज्यावर कोसळले, त्यांचेंही वर्णन पुढें यथाक्रम येईल.

ह्या आपाताचें खरें स्वरूप समजण्यासाठीं त्या त्या भिन्नभिन्न दृष्टींनीं विचार केला पाहिजे. प्रथमतः असें दिसून येईल, कीं संभाजीच्या वधाच्या वेळेस मराठ्यांचें मोगलांबरोबर दुसरें युद्ध चालू होतें. ह्या युद्धाच्या कित्येक मोहिमा होऊन गेल्या होत्या; आणि यापुढें शेवटचा निकराचा घनघोर सामना व्हावयाचा होता. शिवाजीच्या मृत्यूनें अगर संभाजीच्या वधानें मोगलांबरोबरचें युद्ध बंद पडलें नाहीं. उलट पक्षीं उत्तरोत्तर तें अधिक जोरानें चाललें. संभाजीचे कारकिर्दींत या त्रिंशद्वार्षिक युद्धाच्या तीन मोहिमा झाल्या. पहिली, सन १६८२ पासून १६८५ पर्यंतची; दुसरी, सन १६८७ पासून १६८८ म्हणजे संभाजीच्या वधापर्यंतची; व तिसरी, कर्नाटकांतली सन १६८७–८८ ची. शिवाजीच्या मरणापूर्वी झालेली एक मोहीम धरली म्हणजे सन १६८९ पर्यंत एकंदर चार मोहिमा झाल्या. इतउत्तर स्वातंत्र्यप्राप्तीसाठीं मराठ्यांनीं मोगलांबरोबर जो सामना केला, त्यांत आणखी दोन तीन मोहिमा घडून आल्या. सारांश, आतां ह्या युद्धाच्या पांचव्या मोहिमेस सुरुवात झाली. इतकें निकराचें व चिकटपणाचें दुसरें युद्ध फारसें सांपडावयाचें नाहीं. त्यांत एका पक्षाचा जितका पाडाव होई, तितकी त्याची हिंमत ज्यास्त वाढे. दर खेपेस असें वाटे, कीं आतां हें युद्ध संपलेंच. शिवाजीच्या मृत्यूमुळें मराठे मोगलांशीं टिकाव धरतील, असें कोणास वाटलें नव्हतें. त्यांतून संभाजी राज्यपदारूढ झाल्यामुळें तर मराठ्यांचें राज्य तेव्हांच लयास जाणार असें पुष्कळांस वाटलें, व अंतीं संभाजीच्या क्रूर वधानें निराशेची केवळ कमाल झाली. शिवाजीचें सर्व घराणें समूळ नाहींसें करण्याचा बादशहाचा विचार होता. मोगलसैन्यरूपी खवळलेल्या महासागरांत मराठ्यांच्या राज्यरूपी

नौकेस यत्किंचित् आधार दिसेनासा झाला. आपण कृतकृत्य झालों; व आपली इतिकर्तव्यता संपली असें क्षणभर बादशहासही वाटलें. परंतु बाह्य स्वरूपावरून एखाद्या गोष्टीची परीक्षा करणें किती चुकीचें आहे, हें ह्या युद्धाच्या पुढील मोहीमांवरून कळून येणारें आहे. सन १७०७ त औरंगजेबाचा आयुष्यतंतु तुटून काळानेंच त्यास पदरांत घेतल्यामुळें, सूड घेण्याकरितां संतप्त झालेल्या महाराष्ट्रवीरांच्या हातून तो सुटला. त्याच्या मरणानें ह्या युद्धाचा व तदंतर्गामी मराठशाहीवरील आपाताचा एकक्षणीं अंत झाला. सबब या युद्धावरून ह्या आपाताची कल्पना करतां येईल.

ह्या आपाताचें दुसरें एक ज्यास्त उदात्त स्वरूप दृग्गोचर होतें. महाराष्ट्रीय अगर मराठा ह्या अभिधेची सार्थकता, मराठ्यांची स्वदेशप्रीति, त्यांच्या अंगचा राष्ट्रीय जोम व राष्ट्र असें अभिलषणीय नांव प्राप्त करून घेण्यास अवश्य लागणारे शौर्यवीर्यादि गुण, राजकुलाबद्दल अत्यंत अभिमान, स्वदेशसंरक्षणाकरितां सर्वस्वाचाही त्याग करण्याची क्षमता व जीविताची निरपेक्षता, इत्यादि मराठ्यांच्या अंगचे अनेक गुण एकसमयावच्छेदेंकरून ह्या आपातानें जगाच्या निदर्शनास आले. किंबहुना, ह्या आपातामुळेंच ‘ मराठा ’ शब्दाचा विलक्षण दरारा जिकडे तिकडे लोकांस वाटूं लागला. ह्या प्रसंगीं गुदरलेल्या भयंकर संकटांत एकंदर मराठे वीर एकमतानें व एक जुटीनें वागले. संकट जितकें जितकें भयंकर होत गेलें, तितके तितके तें नाहींसें करून टाकण्याची उमेद लोकांच्या अंगीं ज्यास्त येत गेली, आणि इतक्या पराक्रमाचा इष्ट परिणाम घडून आल्याशिवाय राहिला नाहीं. संभाजीच्या मृत्यूनें महाराष्ट्राचें नूतन संस्थापित स्वातंत्र्य लयास गेलें, असें क्षणभर लोकांस वाटलें, परंतु तेंच स्वातंत्र्य भक्कम पायावर स्थापलें जाण्यास हाच आपात कारण झाला. म्हणून स्वराष्ट्रस्वातंत्र्यसंस्थापनेचें बीज ह्या आपातांत आहे, हें ध्यानांत ठेविलें पाहिजे. राष्ट्र म्हणवून घेण्यास लागणारे मराठ्यांच्या अंगचे गुण ह्या प्रसंगीं निदर्शनास आले.

ह्या आपातप्रसंगीं महाराष्ट्राचा बचाव होण्यास कांहीं अंशीं संभाजीच्या कारकिर्दीतील दुर्व्यवस्था कारण झाली, असें ग्रँट्डफ्‌चें म्हणणें आहे. मराठ्यांच्या अंगीं एकप्रकारचा विलक्षण हूडपणा ह्या वेळीं संचरला होता. संभाजीनें लोकांस मन मानेल तसें वागण्याची मोकळीक न दिल्यामुळें त्याचा नाश झाला ही गोष्ट खरी; तथापि संभाजीच्या

क्रूर वधानें लोकांच्या अंगीं गुदमरून राहिलेली शत्रूचा सूड घेण्याची अनावर इच्छा एकदम जोरानें बाहेर पडली. शत्रूच्या मुलखांत लुटालूट, जाळपोळ इत्यादि प्रकार सुरू झाले. फौजेस पगार देण्यास तिजोरींत पैसा नसल्यामुळें, आपल्या लोकांस मन मानेल तसें वर्तन करूं देणें मराठ-मंडळास भाग पडलें. शिवाजीच्या कृतीबद्दल अभिमान, आपले किल्ले दुर्भेद्य आहेत असा समज, कित्येक प्रमुख मराठे सरदारांच्या अंगचें रणशौर्य व मुत्सद्दी शहाणपण, आणि धर्माचे बाबतींत औरंगजेबाचा जुलूम, इत्यादि गोष्टींनीं मराठ्यांच्या अंगचें मूळचें तीव्र तेज अधिकाधिक वृद्धिंगत होऊं लागलें. त्यास अडथळा करण्याची बादशहाची ताकद नव्हती. वस्तुस्थितीचा खरा अंदाजही त्यास करितां आला नाहीं. मराठ्यांच्या वाढत्या शक्तीस आळा घालण्यास बादशहाची चालू पद्धति निरुपयोगी होती. नवीन पद्धति अमलांत आणणें त्यास शक्य नव्हतें.

तेव्हां हा आपात म्हणजे बादशहाच्या चुकांचें उत्तम प्रदर्शन होय. तो स्वत. युद्धकलेंत निष्णात होता. त्यास पैशाचें व माणसांचें पाठबळ होतें. स्थानिक अनुभवही त्यास कांहीं कमी नव्हता. नवीन जहागिरी, मनसबी वगैरे देऊन लोकांचीं मनें संतुष्ट ठेवण्याची हातोटी त्याला होती. असें असूनही, पोकळ गर्व, निरर्थक वैर व अनिवार धर्मवेड ह्यांच्या योगानें त्याची दृष्टि अंध होऊन, वर सांगितलेल्या फायद्यांचा त्यास मुळींच उपयोग झाला नाहीं. विजापुर व गोवळकोंडा येथील फौजांस रजा देऊन, त्यानें आपल्या शत्रूंचें सामर्थ्य निष्कारण वाढविलें. स्वत:च्या शहाणपणाची त्यास फाजील घमेंड असल्यामुळें, आपल्या सरदारांच्या हातीं त्यानें काडीइतकी सत्ता ठेविली नाहीं. जिकडे तिकडे मुसलमानशाही करण्याच्या नादांत त्यानें वाकबगार हिंदु कामगार काढून टाकिले, आणि नवीन नेमलेल्या मुसलमान कामगारांस काय करावें हें समजेना. मराठे लोक बाह्य भपका पाहून घाबरत नसत. शत्रूंचें खरें सामर्थ्य त्यांनीं तेव्हांच ओळखिलें. सारांश, प्रस्तुतचा आपात म्हणजे युद्धकलेचा अभ्यास करणारांस एक उपयुक्त विषय आहे.

बादशहाच्या हालचालींवरून ह्या आपाताचे पोटभाग कल्पितां येतील. महाराष्ट्रांत बादशहा आपल्या लाखों लोकांनिशीं कसकसा भ्रमण करीत होता, हें पाहिलें म्हणजे मूठभर मराठमंडळाच्या वीर्यतेजाचें

कौतुक वाटल्याशिवाय राहत नाहीं. सन १६८२ च्या आरंभीं बादशहा बऱ्हाणपुरास येऊन दाखल झाला; तेथें चार महिने राहून तो औरंगाबादेस गेला, व तेथून थोडे दिवसांनीं अहंमदनगरास त्याचा तळ पडला. ह्या ठिकाणाहून मराठ्यांस जिंकण्याचे प्रयत्न करण्यांत, त्यानें दोन वर्षे व्यर्थ घालविलीं. तो प्रयत्न सफळ होत नाहीं असें वाटल्यावर, त्यानें सन १६८५ त आपली नजर विजापुर गोवळकोंड्यांकडे फिरविली; तेव्हांपासून दोन तीन वर्षे बादशहाची छावणी विजापुरावर होती. तितक्या मुदतींत तो कलबुर्गा, हैदराबाद, गोवळकोंडा इत्यादि ठिकाणीं फिरून आला. सन १६८८ त विजापुर येथें बादशाही फौजेंत प्लेगाची भयंकर सांथ आल्यामुळें, तो विजापुरचे आजूबाजूस आक्लूज, गूरगांव, तुळापुर, शिकारपुर, बीड व गुळका इत्यादि ठिकाणीं त्यानें आपली छावणी हालविली; आणि शेवटीं सोलापुरचे नैर्ऋत्येस ब्रह्मपुरी येथें ता. २० मे १६९५ रोजीं त्यानें आपला कायमचा तळ दिला. ब्रह्मपुरीचें नांव बदलून बेगमपुर हें नवीन नांव त्यानें ठेविलें. ह्या ठिकाणीं तो निदान चार वर्षे होता; येथून कर्नाटकांतील जिंजीची मोहीम त्यानें चालविली. पुढें लवकरच राजाराम मरण पावला; आणि आपले हेतु सफळ झाले, असें पुनरपि एक वेळ बादशहास वाटून त्यानें मोठा उत्सव केला. इतक्यांत ताराबाईस पुढें करून पूर्ववत् मराठे झुंजू लागले हें पाहून, बादशहा अत्यंत संतापला; आणि हें युद्ध आतां सरदारांवर न सोंपतां रागारागानें त्यानें मराठ्यांवर स्वत: चाल केली. तेथपावेतों ह्या युद्धाचा एकदम एक तुकडा पडतो. ह्यापुढें युद्धाचें स्वरूप अगदीं पालटलें. सन १६८३ पासून पाहिलें तर बादशहाच्या हालचालींचे भाग येणेंप्रमाणें पडतात. (१) सन १६८३–८५ पर्यंतचा अहंमदनगरचा मुक्काम व संभाजीशीं युद्ध. (२) सन १६८५–८७ पर्यंत विजापुरगोवळकोंड्यांवरील मोहीम. (३) सन १६८८ पासून ९५ पर्यंत विजापुर व नजीकच्या प्रांतांत मुक्काम आणि संभाजीचा वध व युद्ध. (४) सन १६९५–९९ पर्यंत ब्रह्मपुरीचा मुक्काम व कर्नाटकची मोहीम. (५) सन १६९९ पासून १७०५ पर्यंत सह्याद्रीचे लगत्यांतील किल्ल्यांवर मोहीम व हार खाऊन अहंमदनगराकडे प्रयाण. ह्या शेवटच्या भागांत बादशहा किल्लोकिल्लीं हिंडत होता, व त्याचा मुक्काम एक ठिकाणीं नव्हता. वसंतगड, मुर्तुजापुर ऊर्फ मिरज, सातारा (छावणी करंजें),

खवासपुर, चंदनवंदन, पन्हाळा, खेळणा ऊर्फ विशाळगड, बीरगांवनजीक माणनदीवरील बहादूरगड, सिंहगड, पुणें, राजगड, तोरणा, वाकिनखेडें, देवगांव, पुनरपि बहादूरगड व शेवटीं अहंमदनगर. ह्या ठिकाणीं बादशहानें हताश होऊन मोठ्या कष्टानें सन १७०६ चें वर्ष कंठिलें आणि १७०७ चे आरंभीं परलोकवास केला. अखिल हिंदुस्थानचा शक्तिमान् बादशहा सतत पंचवीस वर्षें मराठ्यांस जिंकण्यासाठीं कसकसे प्रयत्न करीत होता, व नवीन नवीन अडचणी येत गेल्यामुळें तो आपल्या युद्धाची टापटीप कशी बदलीत गेला, हें यावरून व्यक्त होतें. स्वराष्ट्राभिमानानें प्रदीप्त झालेले लोक थोडे जरी असले, तरी त्यांस जिंकण्यास किती प्रयास पडतात, हें प्राचीन काळच्या ग्रीक व इराण यांजमधील युद्धावरून, अथवा प्रस्तुतच्या औरंगजेब व मराठे यांजमधील युद्धावरून, चांगलें समजून येतें

महाराष्ट्रावरील ह्या भयंकर आघाताचें स्वरूप स्पष्ट करितांना महाराष्ट्रवीरांत चेव उत्पन्न होण्याचें एक विशेष कारण बादशहाच्या हातूनच घडलें हें ध्यानांत ठेविलें पाहिजे. औरंगजेबाच्या हातून ज्या अनेक चुका झाल्या, त्यांत संभाजीचा त्यानें क्रूरपणानें वध केला ही एक होय. या गोष्टीचा परिणाम विपरीत झाला. ती बादशहास जितकी हानिकारक तितकीच मराठ्यांस फायदेशीर झाली. संभाजीनें आपल्या लोकांस कितीही त्रास दिला असला, व त्याच्या हातून राष्ट्रानें कितीही नुकसान झालें असलें, तरी मोगलांसारख्या स्वराष्ट्राच्या पिढीजाद शत्रूंनीं त्यास कपटानें पकडून अत्यंत क्रूरतेनें जिवें मारिलें, हा केवळ सर्व राष्ट्राचा अपमान होय, असें लोकांस वाटलें. आपल्या राष्ट्रास महत्पदास चढविणाऱ्या शिवाजीचा जो प्रत्यक्ष मुलगा, जो आज नऊ वर्षें स्वराज्य संरक्षणार्थ हाडांचीं काडें करून लढत होता, ज्याच्या शौर्याबद्दल मोठमाठे वीर तोंडांत बोट घालीत, ज्यानें शत्रूच्या कबज्यांत सांपडल्यावरही वायशाला पुरुषास शोभणारें उदात्त आचरण करून, डोळ्यांपुढें दिसणाऱ्या प्रत्यक्ष मृत्यूसही दाद दिली नाहीं, त्याचा असा विलक्षण शेवट पाहून कोणास बरें चेव येणार नाहीं ? जी धन्यता संभाजीनें जिवंतपणीं आपल्या लोकांच्या तोंडून मिळविली नाहीं, ती त्यानें अंतकाळच्या एका धाडसी कृत्यानें मिळविली. ज्यास त्यास असें वाटूं लागलें कीं, संभाजीचा वध म्हणजे आपल्याच घरांतील एका पुरुषाचा वध झाला. त्या वधाचा सूड घेणें

हें पहिलें पवित्र काम, असें प्रत्येकास वाटूं लागलें. त्यामुळें सर्व खासगी द्वेष व भानगडी एका बाजूस ठेवून, सर्व महाराष्ट्रवीर एकदम शत्रूवर तुटून पडण्यास तयार झाले. पुढें दहा वर्षांनीं महाराष्ट्रांतील किल्ले काबीज करितांना जी बादशहाची दुर्दशा झाली, ती पाहून, संभाजीचा वध केला ही आपण मोठी चूक केली, असें प्रत्यक्ष बादशहासही वाटलें असेल. संभाजीचें काय करावें म्हणून औरंगजेबानें आपल्या प्रधानांस विचारिलें असतां, त्यांनीं संभाजीस आपल्या कह्यांत ठेवून, आपला कार्यभाग उरकून घ्यावा, अशीच सल्ला दिली होती; पण बादशहाचा धर्माभिमान जाज्वल्य होता. संभाजीनें केलेली मुसलमानी धर्माची निंदा त्यास सहन झाली नाहीं. म्हणून प्रधानांचें अगर प्रत्यक्ष मुलीचेंही न ऐकतां, त्यानें संभाजीचा वध करविला. ही बादशहाची करणी कितीही निंद्य असली, तरी मराठ्यांस त्या वेळेस ती चेव आणण्यास कारण झाली. त्यांना स्वराष्ट्राभिमान प्रदीप्त झाला. संभाजीप्रमाणेंच स्वजीविताविषयीं ते निरपेक्ष झाले; आणि राष्ट्राच्या बचावाकरितां त्यांनीं एकदिलानें झटून काम करण्याचा निश्चय केला. हा एकंदर प्रकार वीर व करुण ह्या रसांनीं भरलेला आहे. त्यानेंच महाराष्ट्रीयांच्या अंगचें खरें तेज कसास लागलें आहे; आणि मराठ्यांच्या इतिहासास उज्ज्वल स्वरूप येण्यासही तो बऱ्याच अंशीं कारण झाला आहे.

वर सांगितलेल्या आपाताच्या निवारणार्थ दूरदृष्टि शिवाजीनें सामग्रीही तयार ठेवली होती. औरंगजेबाचा अंतस्थ कावा शिवाजी ओळखून होता. महाराष्ट्र देश पादाक्रान्त करणें ही बादशहानें आपल्या आयुष्याची इतिकर्तव्यता मानिली होती, हें शिवाजीस ठाऊक होतें. यासाठीं विजापुर व गोवळकोंडा येथील राज्यांशीं शिवाजीनें स्नेहसंबंध जोडून ठेविले होते. परंतु शिवाजीचे पश्चात् ते टिकले नाहींत. मराठ्यांचा पाडाव झाल्यास, दुसरीकडे जाऊन आपले उद्योग सिद्धीस नेण्यास त्यांस सवड असावी, अशा धोरणानें कर्नाटकांत शिवाजीनें नवीन राज्यस्थापना करून मजबुदी केली होती. तसेंच स्वतःच्या तालमेंत कित्येक चांगलीं माणसें इतकीं सुरेख शिकवून तयार ठेविलीं होतीं, कीं ह्या आणीबाणीच्या प्रसंगीं त्यांचाच उपयोग विशेष झाला. कित्येक जुनीं माणसें मरून गेलीं, तरी शिवाजीचें वळण

व धोरणें हीं पुढील पिढीवर बरीच बिंबलीं होतीं. सह्याद्रीवरील डोंगरी किल्ले सुस्थितींत होते. संभाजीच्या कार्किर्दीत फारशी घडामोड झाली नाहीं.

'भालेराई' शब्दाची ऐतिहासिक उत्पत्ति खालीं लिहिल्याप्रमाणें केसरींत प्रसिद्ध झाली होती, ती ह्या वेळच्या स्थितीस अनुलक्षून आहे.–'त्या वेळीं मोगलांस हरकत करण्याकरितां दोन निस्सीम महाराष्ट्रभक्त अवतीर्ण झाले. त्यांचीं नांवें बाबाजी व रूपाजी. ह्यांचें मूळचें आडनांव भोसले. त्यांनीं शिवाजीच्या कारकिर्दीमध्यें भाल्यानें शत्रूशीं युद्ध केल्यामुळें, त्यांना 'भालेराव' अशी पदवी मिळाली होती. ह्या दोघां बंधूंनीं राजाराम चंदीस गेल्यानंतर महाराष्ट्रांत मोठी कामगिरी बजाविली. त्यांनीं पुष्कळ सैन्य जमा केलें व मोगलांची पिछेहाट करण्याचा क्रम चालविला. मोगलांनीं मराठ्यांचें ठाणें हस्तगत करून तेथें आपला अंमल बसविला, कीं लगेच भालेरावांनीं त्यावर हल्ला करून व तेथील लूट करून मोगलांस हांकलून द्यावें. तात्पर्य, मोगलांनीं व मराठ्यांनीं उभयतांनींही देश लुटून हैराण केला. भालेरावी सैन्यास लुटीवांचून दुसरें साधन नसल्यामुळें त्यांनीं मोगलांचा अगदीं फडशा पाडिला. हा दंगा 'भालेराई' ह्या नांवानें प्रसिद्ध आहे. ह्या दंग्यामुळें लोकांची हैराणगत झाली खरी, परंतु मुसलमानांचें ठाणें कायमचें कोठेंही बसलें नाहीं. इतक्या अवकाशांत खुद्द छत्रपति, प्रल्हाद निराजी व धनाजी जाधव वगैरे मंडळींनीं चंदीकडे जाऊन राज्याचा नवीन घाट बसविला, व महाराष्ट्रांत नामांकित प्रधान अमात्य यांनीं संताजी घोरपडे याची लष्करी मदत घेऊन व्यवस्था चालविली. त्या वेळीं हें भालेरावांचें बंड मोडून त्यांतील सर्व लोक संताजी घोरपड्याच्या कडक शिस्तीखालीं व रामचंद्रपंताच्या पक्क्या हुकमतीखालीं मराठ्यांस येऊन मिळाले. तात्पर्य, मराठ्यांची राज्यव्यवस्था जुळेपर्यंत मुसलमानांची तारांबळ उडवून, त्यांचा अंमल कोठेंही पक्का बसूं न देण्यास ही भालेराई उपयोगी पडली.

**२. रायगडाचा पाडाव व येसूबाई.–( सन १६९० अखेर ).–** ह्या प्रसंगीं राष्ट्रोन्नतीचें काम कित्येक तरुण स्वार्थत्यागी मंडळींनीं तडीस नेलें. ह्या मंडळींत शिवाजीचा द्वितीय पुत्र राजाराम याचें नांव प्रमुख आहे राजारामाचा जन्म सन १६६१ त झाला असल्यामुळें, संभाजीच्या मरणसमयीं त्याचें वय अठ्ठावीस वर्षांचें होतें. संभाजीनें त्यास रायगडावर नजरकैदेंत ठेविलें होतें. शिवाजीनें प्रतापराव गुजराच्या मुलीशीं त्याचें

ग्न केलें होतें. तिचें नांव जानकीबाई. तिला एक मुलगी होऊन तीं वारली. या मुलीचें नांव सोयराबाई. ही फलटणचा निंबाळकर बजाजी (दुसरा) यास दिलेली होती. जानकीबाई वारल्यावर संभाजीनें राजारामास आणखी दोन बायका केल्या. एक, हंबीरराव मोहिते याची मुलगी व रंगोजीराव मोहिते याची बहीण सीताबाई, ऊर्फ ताराबाई (जन्म सन १६७५); व दुसरी, कागलकर घाडग्यांची कन्या राजसबाई. राजाराम हा मूळपासून मनमिळाऊ व सालस होता. बापाच्या अंगचे कांहीं गुण त्याच्यांत उतरले होते. येसूबाईचें व त्याचें सख्य होतें. संभाजीचा मुलगा शिवाजी याजवर त्याची प्रीति होती. संभाजीच्या भयंकर वधाची बातमी ऐकून राजाराम व येसूबाई यांनीं कित्येक मुत्सद्दी मंडळीस एकत्र करून रायगडावर पुढील विचार सुरू केला. त्या विचारांत निराशेपेक्षां सूड घेण्याच्या तीव्र इच्छेचेंच प्राबल्य विशेष होतें. ह्या वेळेस एकत्र जमलेली मंडळी अल्पवयी परंतु धोरणी होती. ब्राह्मणांत प्रल्हाद निराजी हा शिवाजीचा न्यायाधीश निराजी रावजी याचा मुलगा. संभाजीच्या कारकिर्दींत तो स्वस्थ बसून होता. परंतु त्या वेळच्या मंडळींत तो अतिशय शहाणा म्हणून नांवाजलेला होता. शहाणपण व स्वार्थत्याग ह्या गुणांबद्दल ग्रँट् डफ्नें व बखरकारांनीं त्याची फार तारीफ केलेली आहे. त्यानें रायगडावर धान्याचा, द्रव्याचा, व शिबंदीचा बंदोबस्त चांगलाच करून ठेविला. शत्रूची बातमी राखून राजारामानें रायगडपासून विशाळगडपर्यंत फिरत राहवें, अशी तजवीज प्रल्हादपंतानें केली. जनार्दनपंत हणमंते व निळो मोरेश्वर पिंगळे हे कर्नाटकांत होते, त्यांनीं रायगडावर ठरलेल्या बेताप्रमाणें कर्नाटकांतील आपली कामागिरी उत्तम प्रकारें तडीस नेली. तसेंच निळो सोनदेवाचा मुलगा रामचंद्रपंत अमात्य, हा या वेळच्या पुढाऱ्यांत प्रमुख होता. शिवाजीच्या धोरणांत व राज्यकारभारांत पूर्ण निष्णात असा हा एकच इसम राहिला होता. सचिव शंकराजी मल्हार, किन्हईचा कुळकर्णी परशुराम त्रिंबक इत्यादि नावें ह्या वेळच्या ब्राम्हण पुढाऱ्यांत यावयाचीं आहेत. मराठे सरदारांमध्यें हंबीरराव मोहिते ह्याचे हाताखालीं तयार झालेले संताजी घोरपडे व धनाजी जाधव हे प्रमुख होते, आणि रायगडावर ठरलेला बेत तडीस नेण्याची सर्व भिस्त त्यांजवर होती. खंडोजी नाईक

पानसंबळ, खंडेराव दाभाडे, सिधोजी नाईक निंबाळकर, परसोजी भोसले, इत्यादि सरदारांचीं नांवेंही राष्ट्रेतिहासांत या वेळेस हळू हळू प्रसिद्ध होणार आहेत.

संभाजी पकडला गेला, त्या सुमारास राजगड किल्ला मोगलांचे हातीं पडला. बादशहानें अबूल खैरखान ह्यास तेथील किल्लेदार नेमिलें. इतक्यांत मराठ्यांनीं त्या किल्ल्यास पुनरपि वेढा घातला. संभाजीस पकडल्याची बातमी त्यांस लागली नव्हती. अबूल खैरची इतकी त्रेधा उडाली, की जीवदानाचें वचन घेऊन किल्ला सोडून जवळच फिरोज जंग नामक एक मोगल सरदार होता, त्याचे छावणींत तो रात्रीचा पळून जाऊं लागला. रस्त्यांत मराठ्यांनीं त्यास गांठून सर्वस्वी नागविलें. पुढें बादशहानें त्याची मनसब काढून त्यास मक्केस पाठविलें. ( खाफीखान ).

संभाजीच्या वधानंतर बादशहाची फौज रायगडावर रवाना झाली, हें वर्तमान समजल्यावर बहुत संकट प्राप्त होऊन सर्व मुत्सद्दी व सरदार जमा होऊन पुढील मसलत करूं लागले. खजिन्यांत शिल्लक नाहीं, पागा व फौज सर्व मोडलें, किल्ले बेसरंजाम झाले, पूर्वींचीं अनुभवी माणसें मरून गेलीं. मोगलांच्या निरनिराळ्या फौजा मराठी राज्यांत सर्वत्र घुसून नाश करूं लागल्या. कोणासही एक ठिकाणीं राहून स्वस्थपणा मिळेना. अशा स्थितींत राज्य राखण्यासंबंधानें मुत्सद्यांची बहुतेक निराशा होऊं लागली. शत्रूशीं उघड टक्कर देणें शक्य नव्हतें. राज्याचा मालक शिवाजी अप्रौढ असून, राजाराम प्रौढ व जाणता होता. म्हणून राजारामास पुढें करून राज्याचा बचाव करावा, असा विचार निघाला. त्यास येसूबाईचें अनुमत पडलें. तिनें सांगितलें कीं, 'तुम्हीं सर्व पराक्रमी सरदारांनीं एक विचारें चालून, राजारामास त्याचे बायकांसुद्धां घेऊन बाहेर पडावें. आम्हांस मुलास घेऊन राहण्यास योग्य जागा रायगडासारखी नाहीं. तुम्ही सर्व बाहेर पडल्यावर शत्रु तुमचे अंगावर जातील. तुमचा सर्वांचा जमाव एके ठिकाणीं पोक्त झाला; म्हणजे आम्हांस काढून तिकडे न्यावें.' ही बाईची पोक्त व स्वार्थनिरपेक्ष मसलत ऐकून सर्वांस धीर आला. परंतु येसूबाईस मागें एकटी टाकून निघून जाणें राजारामाचे जिवावर आलें. तथापि प्रसंगावर दृष्टि देऊन, सर्वांचें समाधान करून तो बोलला, 'राज्याचे अधिकारी शिवाजी राजे पूर्वींचे तेच हे ऐसें लक्ष ठेवून, आम्ही कारभारी,

आमचे आज्ञेंत राहून, पूर्वींहून विशेष पराक्रम करून, औरंगजेबास जिंकून राज्य रक्षावें. येविशीं सर्वांचीं शपथाप्रमाणें व्हावीं.' येणें प्रमाणें सर्वांची एकवाक्यता करून कर्तीं माणसें बरोबर घेऊन राजाराम बाहेर पडला. रामचंद्रपंतानें राज्यसंरक्षणाचें दुःसह ओझें संभाळण्याचें कबूल केलें. त्यानें किल्लोकिल्लीं फिरते राहून राज्य राखावें, मोगलांशीं लढावें, रायगडावरील माणसांची सुटका करावी, आणि विशाळगडावरील राजकुटुंबाचा बंदोबस्त ठेवावा, अशी राजारामाची ताकीद होती. येसूबाई मुलासुद्धां रायगडावर राहिली. राजारामानें डोंगरी किल्ल्यांच्या आश्रयानें मोगलांशीं झुंजावें व महाराष्ट्रांत निभाव न लागल्यास कर्नाटकांत जिंजीकडे जावें, असा विचार ठरला होता. खंड १५ ले. ३४७ चें पत्र एप्रिल १६९० चें असून, त्यांत राजाराम कर्नाटक प्रांतीं गेल्याचा उल्लेख आहे, त्यावरून वरील तारखेपूर्वींच राजाराम महाराष्ट्र सोडून गेला हें उघड आहे.

राष्ट्रांतील कर्त्या पुरुषांच्या अंगीं अवश्य लागणारे कित्येक गुण ह्या प्रसंगीं मराठ्यांचे अंगीं विशेष निदर्शनास आले. येसूबाई व राजाराम ह्यांचा स्वार्थत्याग अवर्णनीय होय. राष्ट्राच्या बचावासाठीं त्या शहाण्या बाईनें प्रत्यक्ष जिवाचीही आशा सोडिली. आपलें व आपल्या मुलाचें काय होईल ह्या शुष्क विचारांत ती पडली नाहीं. राजारामानें तरी आपणा-लाच राज्य मिळावें असा हेका न धरितां, संतोषानें राष्ट्रोद्योग आरंभिला. तात्पर्य ह्या वेळचें ह्या राज्यचालकांचें उदार वर्तन प्रत्येकानें ध्यानांत ठेवण्याजोगें आहे.

मुकर्रबखानाची रवानगी बादशहानें कोल्हापुराकडे केली, त्याच सुमा-रास वजीर आसदखान याचा मुलगा इतिकदखान ह्यास त्यानें कोंकणांत पाठविलें होतें, असें मागें सांगितलें आहे. सन १६८९ चा पावसाळा संपल्यावर नोव्हेंबरच्या सुमारास हा सरदार रायगडावर आला. त्यास जंजिऱ्याचे सीदीची मदत होती. किल्ला मजबूद असल्या कारणानें मोग-लांचें फार दिवस कांहीं चाललें नाहीं. प्रल्हाद निराजीनें किल्ल्यांत धान्य-सामग्रीची चांगलीच तर्तूद करून ठेविली होती. दहा महिने झाले तरी मराठे दाद देईनात. औरंगजेबानें वेढ्याचे कामीं चांगलीच मदत दिली. रायगडच्या ह्या वेढ्याची गणना इतिहासांतील नामांकित वेढ्यांमध्यें झाली पाहिजे. शेवटीं मोगल सरदारानें फितुरी करण्याचा यत्न चालविला.

सूर्याजी पिसाळ नांवाचा वाईचा मराठा देशमुख किल्ल्यावर सरदार होता. वाईची देशमुखी देण्याचें वचन खानाकडून घेऊन तो मोगलांस सामील झाला, आणि त्यानें किल्ल्याचे दरवाजे उघडून शत्रूंस आंत घेतलें. तेणेंकरून मोगलांनीं किल्ला काबीज केला, ( सन १६९० अखेर ). मुसलमानांचे स्वाधीन होणें येसूबाईच्या जिवावर आलें. तथापि जिवास धक्का लावणार नाहीं, अशी खानाकडून कुराणावर हात ठेवून शपथ घेववून, ती मुलासह त्याच्या स्वाधीन झाली. ' नवऱ्यानें आपणास सोडल्यावर दिरानेंही आतां त्याग केला ', अशी आपली दीन स्थिति खानास सांगून, पुढील तरणोपायाची सुरुवात तिनें येथेंच केली. खानानें किल्ला लुटला; आणि रायगडावरील शिवाजीचें सिंहासन फोडून, शिवाजीनें मोठ्या कष्टानें जमा केलेली मराटशाहींतील पुष्कळ संपत्ति नेऊन बादशहाचे हवाली केली. तसेंच येसूबाई व शिवाजी ह्यांस कैद करून औरंगजेबाकडे नेलें, आणि सूर्याजी पिसाळाची बादशहाशीं भेट करविली. बादशहा त्याजवर खूश झाला खरा, पण ' तूं मुसलमान हो, ' असा त्यानें पिसाळास आग्रह केला. शेवटीं मुसलमानी धर्म स्वीकारून सूर्याजीनें वाईची देशमुखी संपादिली. त्याच्या घराण्यांतील इतर माणसें हिंदूच राहिलीं. हल्लीं वाईजवळ ओझर्डे या गांवीं हिंदु व मुसलमान पिसाळ आहेत. ह्या कृत्याचा पुरा सूड पुढें शाहूनें घेतला. सूर्याजीच्या फितुरीमुळें शाहूस सत्रा वर्षे मुसलमानांच्या कैदेंत राहवें लागलें. शाहू कैदेंतून सुटून ताराबाईशीं लढत वाईजवळ आला असतां, त्यानें पिसाळाच्या कुळांतील लहान मुलें व बायका खेरीज करून, सर्व पुरुषांची कत्तल करविली, आणि सूर्याजीची नाना प्रकारें निर्भर्त्सना व हाल करून त्यास ठार मारविलें.

शिवाजीच्या एकंदर कुटुंबाचा समूळ नाश करण्याचा बादशहाचा निर्धार होता. संभाजीस ठार मारिलें. येसूबाई व शाहू यांस तरी त्यानें दया करून जिवंत ठेविलें असें मुळींच नाहीं. पुढें प्रसंगानुसार त्यांचा उपयोग करावयाचा त्याचा विचार होता. शेवटीं सर्व प्रयत्न हरले, तेव्हां मराठ्यांत दुफळी पाडण्याच्या कामीं त्यानें शाहूचा उपयोग केला; आणि मरतांना आपल्या मुलासही शाहूसंबंधानें तोच बेत सांगून ठेविला. शाहूला आणखी भावंडे होतीं, असें मनूचीचें म्हणणें आहे. संभाजीचा मेहुणा महादाजी

निंबाळकर व त्याची बायको सखूबाई यांस बादशहानें पकडून ग्वाल्हेरच्या किल्ल्यांत अटकेंत ठेविलें. तेथून त्यांची सुटका झाली नाहीं. संभाजीचा दुसरा मेहुणा हरजीराजे महाडिक जिंजीच्या वेढ्यांत मरण पावला, ( स. १६९४ ), ही गोष्ट पुढें येईल.

रायगडावर संभाजीचे आप्त सोयरे वगैरे पुष्कळ मंडळी होती, ती सर्व पकडली गेली. तींत प्रतापराव गुजराचा मुलगा खंडोजी गुजर व मुलें माणसें होतीं. कांहीं दिवसांनीं शाहू वगैरे सर्वांस मुसलमान करण्याचा बादशहाचा विचार होता, तो मुलीच्या आग्रहावरून त्यानें रहित केला, पण कोणा तरी एकास मुसलमान केल्याशिवाय राहणार नाहीं, असा बादशहाचा निग्रह पाहून, खंडोजीनें शाहूच्या बचावासाठीं मुसलमानी दीक्षा घेतली. पुढें शाहू राज्यावर आल्यावर, त्यानें परळी नजीक साठ गांवच्या देशमुखीचें वतन खंडोजीच्या वंशास करून दिलें त्यांजकडे अद्यापि चालत आहे. हें घराणें मुसलमान असूनही ते हिंदूंचेच रीतरिवाज व सण उत्सव पाळि-तात, ( इ. सं. ) वाई प्रांताचा देशमुख सूर्याजी फिरंगोजी नाईक पिसाळ व दत्ताजी केशवजी नाईक पिसाळ यांचा वतनासंबंधानें तंटा लागून अखेर वतन दोघांनीं निमेनिम वांटून घेतलें. या संबंधाचे कागद खंड ३ ले. ५६— ६४ चे प्रसिद्ध आहेत. त्यांवरून त्या धामधुमीच्या काळांत वतनदारांची तारांबळ कशी उडे हें कळून येतें. सूर्याजीनें कपट करून रायगड किल्ला मोगलांस मिळवून दिला, आणि मुसलमानी धर्म स्वीकारून जातिभ्रष्ट करून घेतला. परंतु पुढें लवकरच तो व त्याचा मुलगा पदमसिंग यांनीं राजारामास चांगली मदत केली; त्याबद्दल राजा-रामानें त्यास वाईची सबंध देशमुखी बहाल केली. ताराबाईनेंही आपल्या अंमदानींत पिसाळाच्या कामगिरीची स्तुति केली आहे. हे पिसाळ व दुसरे कित्येक लोक त्या वेळीं वेळ पडेल तसें वागून स्वार्थ साधीत होते. पूर्वी ते मुसलमानांकडे होते, पुढें शिवाजीस मिळाले. संभाजीच्या वधानंतर ते मोगलांकडे गेले. नंतर राजारामाचा अंमल झाल्यावर ते त्याजकडे आले. राजाराम वारल्यावर ते फिरून मोगलांकडे गेले आणि शाहू राज्यावर आल्यावर ते त्यास सामील झाले. रायगडावरील फितुरीमुळें मराठमंडळांत पिसाळांस मान नव्हता. पण अशी स्थिति पुष्कळांची होती. जो कोणी

बलवान् होऊन पुढें येई, त्याजला शरण जाऊन आपलें वतन वतनदारांस राखावें लागे. या घरसोडीची मीमांसा पुढें करावयाची आहे.

इतिकदखानाचा पराक्रम पाहून बादशहा त्याजवर फार खुश झाला. बादशहानें त्यास झुल्फिकारखान असा नवीन किताब दिला व याच नांवानें तो प्रसिद्ध आहे. यापुढें त्याची भरभराटच होत गेली; आणि पुढें सुमारें पंचवीस वर्षेंपर्यंत व विशेषत: औरंगजेबाच्या मृत्यूनंतर, मोगल बादशाहींत त्यानें पुष्कळच उलाढाली केल्या. पुढें झालेले बादशहा त्याच्याच तंत्रानें चालत. वाटेल त्यास बादशाही तख्तावर स्थापण्याची त्यास ताकद होती. जिंजीवरील मोहिमेंत बादशहाचे बाजूस हाच सरदार प्रमुख होता. त्याचा बाप आसदखान हा बादशहापाशीं फार दिवस वजीर असल्यामुळें दरबारांत झुल्फिकारखानाची बढतीच होत असे.

औरंगजेबाच्या मुलीनें येसूबाईचा परामर्ष घेतला. ह्या मुलीचा संबंध मराठ्यांच्या इतिहासाशीं बराच असल्यामुळें, तिची थोडी हकीकत येथें देणें अवश्य आहे. संभाजीची व हिची प्रीति कशी जमली हा एक गूढ प्रश्न आहे. तथापि उपलब्ध* झालेली हकीकत येथें सादर केली आहे. झिबुन्निसा बेगम, औरंगजेबाची वडील मुलगी, हिचा जन्म स. १६३९त झाला. ती चांगली शिकलेली होती. कुराण तिला मुखोद्गत होतें, इतकेंच नव्हे, तर त्या ग्रंथावर एक टीकाग्रंथ तिनें लिहिला असून शिवाय फारशी भाषेंत तिनें केलेलीं कित्येक कवनेंही प्रसिद्ध आहेत. ती यावज्जन्म अविवाहित राहिली. मोगल राज्यकन्यांस बरोबरीचा वर मिळणें शक्य नसल्यामुळें त्या बहुतेक अविवाहित राहत. सन १६६६ त शिवाजी दिल्लीस गेला, त्या वेळीं तिचें वय २७ वर्षांचें होतें. शिवाजीविषयीं तिनें बऱ्याच गोष्टी ऐकिल्या असल्यामुळें, त्याच्या लोकोत्तर गुणांबद्दल तिच्या मनांत चांगली आदरबुद्धि वसत होती. शिवाजीचा स्वराष्ट्राभिमान, त्याचें शौर्य व साहस, देव व मातापितरें यांजवरील त्याची निस्सीम भक्ति, आणि सर्वतोमुखीं झालेली त्याच्या नांवाची विलक्षण ख्याति, इत्यादिकांच्या योगानें त्या चतुर राजकन्येचें मन शिवाजीविषयीं फारच आतुर झालें, आणि शिवाजीच आपणास योग्य पति आहे, असें तीस वाटूं लागलें. तो दिल्लीस गेला,

---

* डग्लसकृत वेस्टर्न इंडिया आणि बॉम्बे, भाग १, पृ. १४७.

तेव्हां त्याजवर तिची प्रीति बसली. शिवाजी हा आपल्या बापाचा दोस्त व पाहुणा आहे, एवढी मात्र बाजू तिला दिसली. तो आपल्या बापाचा वैरी आहे हें, प्रीतीनें अंध झाल्यामुळें तिच्या लक्षांत आलें नाहीं. ह्या भेटीनें शिवाजीची व बादशहाची दोस्ती घडून येईल असा बराच संभव होता. शिवाजीनें मुसलमान व्हावें व आपल्या मुलीस वरावें, अशी बादशहानें बरीच खटपट केली. शिवाजीस नजरकैदेंत ठेवण्याचा हेतु थोडा बहुत असाच असेल. पण शिवाजीनें मुसलमानी धर्म स्वीकारणें म्हणजे शिवाजीत्व सोडणें असेंच असल्यामुळें, तो बेत जुळला नाहीं. शेवटीं शिवाजी बादशहाच्या बंदींतून सुटून स्वदेशीं आला, बादशहास फार राग आला, व बेगमेस त्याचें दर्शन पुनरपि झालें नाहीं.

पुढें शिवाजी मरण पावल्यावर बादशहानें दक्षिणेंत स्वारी केली. या वेळीं त्याचा सर्व जनानखाना व परिवार बरोबर होता. बेगमसाहेबही बरोबर होती. शिवाजीबद्दल तिचा जीव फार हुरहुरत असे; आणि त्याच्या मृत्यूनंतर संभाजीबद्दलही तिच्या मनांत पूज्यभाव वसत होता. प्रीति आंधळी आहे असें म्हणतात तें खोटें नाहीं. शिवाजीवर प्रीति, म्हणून शिवाजीच्या इतर सर्व आप्तांवरही तिची प्रीति जडली. गायन, कशीदा काढणें ह्या कामांत, आरबी व फारशी भाषांच्या व्यासंगांत, आणि कवि व विद्वान् लोक ह्यांच्या सहवासांत, ती आपली कालक्रमणा करीत असे. संभाजीस वांचविण्याचे तिनें प्रयत्न केले; पण ते सिद्धीस गेले नाहींत. रायगड पडल्यावर संभाजीची बायको येसूबाई व मुलगा शिवाजी ह्यांस स्वतःच्या देखरेखीखालीं देण्याविषयीं बादशहास तिनें विनंती केली. मुलीचा आग्रह, झुल्फिकारखानानें दिलेलें आश्वासन, व पुढें प्रसंगानुसार त्यांचा उपयोग करण्याचें हातचें साधन, अशा कारणांस्तव बादशहानें मुलीची विनंती मान्य केली. मुलाच्या लडिवाळपणानें बादशहा व बेगम दोघेंही मोहून गेलीं. त्यांनीं येसूबाईच्या मुलास व इतर मंडळीस चांगल्या रीतीनें वागविलें. बेगमेनें येसूबाईचें समाधान करून तीस धीर दिला; आपल्या डेऱ्यानजीक स्वतंत्र डेरा लावून, तीस मोठ्या आस्थेनें स्वतःजवळ ठेवून घेतलें; आणि चाकर माणसांची व सामानसुमानाची तजवीज करून दिली. शाहूवर तिचें प्रेम इतकें बसलें, कीं स्वतःच्या मुलाचेही तिनें इतके लाड केले नसते. दागदागिना, कपडालत्ता, मेवामिठाई इत्यादि

गोष्टींत बेगमसाहेब त्या मुलाची सर्व प्रकारची हौस पुरवीत असे. संभाजीच्या नाटकशाळांची व त्याचा दासीपुत्र मदनसिंग ह्यांचीही तिनें सुव्यवस्था ठेवून दिली. जोत्याजी केसरकर, उद्धव योगदेव वगैरे विश्वासू मंडळी येसूबाईजवळ होती. शाहूस लहानपणचें शिक्षण देऊन त्याजवर देखरेख ठेवण्याचें काम जोत्याजीचें होतें. त्याचें बादशहाकडेही जाणें येणें असे.

संभाजीचा मुलगा औरंगजेबानें पकडून आपल्या कैदेंत ठेविला, त्याचें खरें नांव काय, ह्या प्रश्नाची अलीकडे पुष्कळ चर्चा झाली आहे. ग्रँट्डफचें म्हणणें असें आहे कीं, याचें मूळचें नांव शिवाजी असें होतें. परंतु पुढें शाहू नांवानें तो प्रसिद्धीस आला, तें नांव त्यास औरंगजेबानें दिलें. त्या मुलाची व औरंगजेबाची भेट झाली, तेव्हां 'तुझें नांव काय?' म्हणून बादशहानें त्यास विचारिलें. तो म्हणाला, 'शिवाजी.' बादशहा विनोदानें म्हणाला, 'तुझा आजा शिवाजी चोर होता, पण तूं शिवाजी 'साव' आहेस.' ह्या 'साव' शब्दाचा अपभ्रंश होऊन 'शाहू' हें नांव बनलें. बहुतेक बखरकार हीच शाहू शब्दाची उत्पत्ति देतात.

हें ग्रँट डफ् व बखरकार यांचें म्हणणें खोटें असून शाहूचें मूळचें नांव शिवाजी असें मुळीं नव्हतें; त्याचें मूळचें नांव शहाजी असें असून त्याचेंच रूप शाहू असें झालें आहे, असें रा. राजवाडे यांचें म्हणणें आहे. पहिली आख्यायिका खरी धरिली, तर बादशहानें दिलेलें टोपणनांव मोठ्या संतोषानें स्वीकारल्याचा आरोप शाहूवर येतो; दुसऱ्या पक्षाचें म्हणणें खरें धरिलें तर ग्रँट् डफ् व सर्व बखरकार खोटे ठरतात. ऐतिहासिक दृष्टीनें पाहिलें असतां, या वादापासून फलनिष्पत्ति कांहींच नाहीं. शाहूचें मूळचें नांव शिवाजी असलें काय, किंवा शहाजी असलें काय, तो आपल्या वेळीं व अजूनही शाहू याच नांवानें प्रसिद्ध आहे, आणि तेंच नांव कायम ठेवणें भाग आहे. तथापि वादाच्या निराकरणार्थ इतकें सांगितलें पाहिजे, कीं 'शाहू' हें नांव, पहिल्या शाहूच्या पूर्वी प्रचलित नव्हतें. त्याच्या नंतर 'शाहू' व 'शहाजी' हीं दोनही नांवें भिन्न अशीं समजलीं जात आहेत. शाहूनें आपलें नांव बादशहाच्या विनोदापासून स्वीकारिलें नाहीं, असें जरी सिद्ध झालें, तरी शाहूच्या मनांत औरंगजेबाविषयीं व एकंदर मोंगल बादशाहीविषयीं द्वेषबुद्धि वसत नव्हती, ह्यास अनेक पुरावे आहेत. भाषाशास्त्रानुसार 'शाह' किंवा 'शाहजी' यांजपासून

शाहू हा शब्द निघूं शकतो, त्याचप्रमाणें तो 'साव' 'साहू' व शाहू या परंपरेनें निघण्यासही प्रत्यवाय नाहीं. शिवाय राजकीय कागदपत्रांवरील शाहूचे शिक्के रा. ब. पारसनीस यांनीं दिले आहेत, त्यांत शाहूचें मूळचें नांव 'शिवाजी' असें स्पष्ट दिलेलें आहे. ह्याशिवाय शाहू ह्या नांवाचे शिक्केही प्रसिद्ध आहेत. या सर्व कारणांवरून ग्रँट् डफच्या म्हणण्यास पुष्टि येते. रा. ब. साने यांनीं ह्याच मताचें समर्थन केलें आहे. तरी 'शाहू' हें नांव केवळ औरंगजेबाच्या विनोदानेंच अस्तित्वांत आलें ह्याविषयीं प्रत्यक्ष व सबळ पुरावा नाहीं. तसेंच उलट पुराव्याच्या अभावीं बखरकार व ग्रँट् डफ् यांस एकदम खोटें ठरविण्याचेंही प्रयोजन नाहीं. सन १७१० त महाबळेश्वरच्या गुरूस शाहूनें सनद करून दिली तिजवरील प्रधानाच्या शिक्क्यावर 'श्री शिवनरपति हर्षनिधान' असे शब्द असून, त्याच कागदावर प्रतिनिधीच्या शिक्क्यांत 'श्रीशाहू छत्रपति कृपानिधि' हे शब्द आहेत यावरून आरंभीं दोनही नांवें प्रचारांत होतीं, हें उघड आहे. शाहूचें मूळ नांव शिवाजी असतां, सन १६९१ त ताराबाईनें आपल्या मुलाचेंही नांव तेंच ठेविलें, यांतही कांहीं गैर नाहीं. त्यावरून शिवाजी या नांवाबद्दलचा आदर चांगला व्यक्त होतो. ह्या वादाच्या निकालापासून ऐतिहासिक विवेचनास बाध येत नाहीं. एकाच कागदावर शिवनरपति व शाहू हीं दोनही नावें असल्याचे कागद पाहिजे तितके आहेत. (खं. २०–१९४, सत्कार्योत्ते० खंड ९ ले. १९९–२०१).

येसूबाई बादशहाचे नजरकैदेंत असतां तिचे राजारामाशीं पत्रव्यवहार वगैरे चालू होते. भक्ताजी हुजरे व बंकी गायकवाड हे दोघे शिवाजीच्या वेळचे विश्वासू नोकर, येसूबाई व राजाराम यांस एकमेकांची बातमी पोंचवीत असत. ते वेष पालटून फिरत. कदाचित् ह्या गुप्त मसलतींची बातमी बादशहास लागली असेल, म्हणूनच शाहूस त्यानें नेहमीं पक्क्या बंदोबस्तानें ठेविलें होतें. शाहूच्या सुटकेविषयीं एक दोन प्रयत्न झाले त्यांचा उल्लेख यथाप्रसंग येईल. येसूबाई व शाहू यांनीं अत्यंत धोरणाचें वर्तन ठेवून बादशहास आपले हेतूंचा थांग लागूं दिला नाहीं.

६ बेगमसाहेब सन १७०२त ब्रह्मपुरीस मरण पावली. तिच्याच नांवावरून ब्रह्मपुरीचें नांव बेगमपुर असें ठेवण्यांत आलें. तिच्या प्रेतावर औरंगजेबानें एक सुरेख कबर बांधिली, ती अद्यापि आहे. ब्रह्मपुरी हें ठिकाण

पाहिलें असतां, बादशहा महाराष्ट्र देश जिंकण्याविषयीं केवढे भगीरथ-प्रयत्न करीत होता व त्याचें ऐश्वर्य केवढें होतें ह्याची तेथल्या खाणाखुणां-वरून कल्पना करितां येईल. ब्रह्मपुरी म्हणजे एक तटबंदीचें लष्करी ठाणें होतें. अद्यापि कित्येक वेळां त्या जागेवर पडलेलीं नाणीं, धातु, मोत्यें वगैरे सांपडतात. औरंगजेबानें सन १६९९ त ब्रह्मपुरी सोडून मराठ्यां-बरोबर लढण्यास स्वत: कंबर बांधिली, तेव्हां घरेंदारें करून सुखवस्तु राहिलेल्या त्याच्या मडळीस पराकाष्ठेचें दु:ख झालें. एकदां भीमा नदीला पूर येऊन बादशहाचे दहा हजार लोक वाहून गेले; आणि जनावरें व सामान किती गेलें याची गणतीच नाहीं. सन १७०१ त इंग्रज वकील सर व्युल्यम नॉरिस ह्यानें ब्रह्मपुरी येथें बादशहाची भेट घेतली होती.

३. संताजी घोरपडे व धनाजी जाधव.—जाधवांचें घराणें महा-




राष्ट्रांत प्रमुख व पुरातन आहे. लखूजी जाधवापर्यंत या घराण्याचा वृत्तान्त मागें पृ. १३७ वर आला आहे. लखूजी व त्याचा मुलगा अचलोजी यांस निजामशहानें ठार मारल्यावर, अचलोजीचा मुलगा संताजी याचें संगोपन जिजाबाईनें केलें. जिजाबाईचा मुलगा संभाजी व हा संताजी बहुतेक समवयस्क असून दोघेही शहाजी-जवळ असत; आणि दोघे-ही कनकगिरि काबीज करतांना मारले गेले. संता-जीला शंभुसिंग नांवाचा मुलगा होता. हा शिवाजीबरोबर असे. शंभुसिं-गाचा मुलगा धनाजी जाधव होय. धनाजीचा जन्म स. १६५०च्या सुमारास झाला. हा धनाजी प्रतापराव गुजराचे हाताखालीं काम करीत असे. उंबराणी

व जेऊरी येथील लढायांत धनाजीनें पराक्रम गाजविला होता. संभाजीच्या वेळीं धनाजी जाधवानें अनेक कामगिऱ्या केल्या. परंतु धनाजीच्या खऱ्या कर्तबगारीस संभाजीच्या वधानंतर सुरुवात झाली. संताजी घोरपडे बादशहाच्या छावणीवर छापा घालीत असतां, धनाजीनें फलटणच्या मैदानांत मोगल फौजेस गांठून तिचा बराच संहार केला. या पराक्रमाबद्दल राजारामानें त्यास 'जयसिंग' असा किताब दिला. पुढें राजाराम कर्नाटकांत निघून गेला, तेव्हां धनाजी त्याजबरोबर होता. जिंजीस वेढा पडला असतां, धनाजी व संताजी यांनीं सारखे फिरत राहून मोगलांचा फन्ना उडविला.

घोरपड्यांचीं मुख्य घराणीं मूळचीं दोन; एक मुधोळचें व दुसरें कापशीचें. मुधोळचा बाजी घोरपडे व त्याचा मुलगा मालोजी यांचा शिवाजीशीं कसा संबंध आला, तें मागें सांगितलेंच आहे. [पृ. ३७७] कापशीकरांचा पुरुष म्हाळोजी व त्याचे तीन मुलगे संताजी, बहीरजी व मालोजी हे शिवाजीजवळ नोकरी करून होते. स. १६७७–७८ सालीं संताजी व




टीप.—जाधवांची हकीगत रा. दळवी यांनीं लिहिलेल्या कैफियतीवरून घेतली आहे. या पुस्तकांतील मजकुरास आधार दाखविलेले नसल्यामुळें त्यांतील सत्यासत्य कळण्यास मार्ग नाहीं.

बहीरजी यांनीं कर्नाटकांत मोठा पराक्रम करून कोपल, गजेंद्रगड, बहादुर-बिंडा हीं ठिकाणें काबीज केलीं, त्या वेळीं गजेंद्रगड त्यांस जहागीर मिळालें. अशा प्रकारें कापशीकरांचा संबंध कर्नाटकाशीं जडला; आणि तिकडेच यांचा विस्तार झाला. संभाजीचा बचाव करीत असतां, मालोजी मारला गेला. त्यानंतर स. १७९१ त राजारामानें संताजीस सेनापतिपद दिलें. संताजीस 'ममलकतमदार' बहीरजीस 'हिंदुराव' व मालोजीस 'अमीरुलुमराव' असे किताब मिळाले; ते त्यांच्या वंशजांकडे चालतात. नारो महादेव जोशी नांवाचा एक कोंकणस्थ ब्राह्मण लहानपणापासून, संताजीजवळ नोकरी करून होता. तो पराक्रम करून उदयास आला; तोच हल्लींच्या इचलकरंजी संस्थानाचा मूळपुरुष होय. राजारामाचे वेळेस संताजीच्या सर्व लढायांत नारो महादेव हजर असे. संताजीची सर्व व्यवस्था तोच पाही. ( इचलकरंजी इतिहास ). संताजीनें या वेळीं कस-कसे पराक्रम केले, त्याचें वर्णन रामचंद्रपंतानेंच त्यास स. १६९२ च्या एका पत्रात लिहिलें आहे, ( का. सं. पत्रें यादी ले. ४३३ ), ते असें:—

राजश्री संताजी घोरपडे, गोसावी यांस,—

अखंडित लक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नेहांकित रामचंद्र नीलकंठ अमात्य आशीर्वाद. सुरुसन सल्लास तिस्सैन मय्या व अल्लफ. राजश्री छत्रपति स्वामी कर्नाटकांत जातेसमयीं तुह्मांस या प्रांतांत ठेवून गेले. त्या समयीं इकडे गलिमाची धामधूम बहुत होऊन, कुल देशदुर्ग हस्तगत केलीं होतीं, तीं गेलीं. राज्यामध्यें कांही अर्थ उरला नाहीं. कुल मराठे यांणीं इमान खत्ता करून गलिमाकडे गेले. परंतु तुह्मी इमान खत्ता न करितां, राजश्रींच्या पायांशीं बहुतच एकनिष्ठा धरून जमाव करून शेख निजाम व सर्जाखान व रणमस्तखान व जानसरखान असे उमदे वजीर बुडविले. जागोजाग गलीमास कोट घालून नेस्तनाबूद केलें आणि देश सोडविला. राज्यसंरक्षणाच्या प्रसंगास असाधारण श्रम केले, औरंगजेबास दहशत लाविली. पुढेंही कित्येक स्वामिकार्यांच्या ठायीं हिम्मत धरितां, याकरितां तुह्मावरी राजश्री स्वामी संतोष होऊन मामले मिरज कर्यांती २२ बेवीस एथील देशमुख होते ते नस्तनाबूद झाले, त्यांच्या वंशीं कोणी नाहीं; त्याचे मुतालिक होते, ते बळावून देशमुखी वतन खात होते, तेही दुर्बुद्धि धरून गलिमाशीं मिळून फिसालत केली, एकनिष्ठा धरून इकडे येऊन भेटले

नाहींत, ह्मणून त्यांची देशमुखी दूर करून तुह्मांस अजरामरामत देशमुखी मामले मजकूरची अवलाद अफलाद वतन करून दिली असे. पुत्रपौत्रीं चालवून देशमुखीचा हकलाजिमा व इनामत व इसाफतीचे गांव सालाबाद पहिले देशमुखास चालले असतील तेणें प्रमाणें खाऊन, वतनाचा मामला चालवून सुखरूप रहाणें. तुह्मांस देशमुखी नूतन करून अजरामरामत दिली, ह्मणून शेरणी तुमच्या माथां ह्नन्यातशाई ५००० पांच हजार करार केले असत. यांचा वसूल हुजूर घेतला. कळावें.'

रायगड सोडून राजाराम बाहेर पडला, तो किल्ल्यांचा बंदोबस्त पाहत प्रांतांतून फिरत चालला. प्रतापगडास भवानी देवीचें दर्शन घेऊन तो सातार्‍यावरून पन्हाळ्यास आला. रायगडचे खालोखाल ज्यावर मराठ्यांची सारी भिस्त असा किल्ला पन्हाळा होय. पन्हाळा व विशाळगड यांचे दरम्यान मराठे जमाव करूं लागले, हें पाहून बादशहानें त्यांजवर फौजा रवाना केल्या. रायगडचा वेढा कमकुवत व्हावा, म्हणून मराठ्यांनींही बादशहाचे फौजेवर चहूंकडून छापे घालण्यास सुरुवात केली. ह्या छाप्यांचें वर्णन खाफीखानानें उत्कृष्ट दिलें आहे, ( एल्यट भा. ७, पृ. ३४७ ). ' संताजी घोरपडे व धनाजी जाधव हे दोन विशेष अनुभविक योद्धे मराठ्यांकडे प्रमुख होते. प्रत्येकापाशीं पंधरा वीस हजारांचा जमाव असे. इतर मराठे सरदार त्यांच्या तंत्रानें वागत. येणेंकरून त्यांनीं बादशाही फौजेचें फार नुकसान केलें. संताजीनें मुलखाची नासाडी करून मोगल सरदारांस जेरीस आणिलें. त्यासमोर जो कोणी जाई, तो मरण पावे, अगर शत्रूच्या हातांत तरी पडे. एखादा कोणी निभावलाच, तर तो कफल्लक होऊन परत येई. मीमी म्हणणारे मुसलमान योद्धे त्याजपुढें जाण्यास चळचळां कांपत. त्याजशीं टिकाव धरणारा एकही योद्धा मोगलांकडे नव्हता. इस्मईलखान म्हणून एक नांवाजलेला मोगल सरदार दक्षिणेंत होता. पहिल्या गांठीसच संताजीनें पराभव करून त्यास कैद केलें; व त्याची सर्व फौज लुटली. कांहीं महिन्यांनीं मोठा दंड भरून तो कैदेंतून सुटला. तसाच रुस्तुमखान ऊर्फ सर्जाखान हा सिंहासारखा पराक्रमी म्हणून त्या वेळेस नांवाजलेला सरदार होता. सातारा प्रांतांत संताजीनें त्यास गांठून त्याचें सर्व सामानसुमान काबीज केलें; आणि मोठा दंड घेऊन त्यास सोडून दिलें. अलीमर्दानखान, हुसेनबेग हैदराबादी,

व दुसरे कितीएक सरदार यांचाही अशाच प्रकारें पाडाव झाला. ते मराठयांचे कबजांत सांपडले; आणि दोन लाख दंड भरून मोकळे झाले. कर्नाटकच्या सरहद्दीवर जान निसारखान व तुहव्वरखान ह्यांचा पराभव झाला. दोघांसही गोळ्या लागल्या; पण नशीबानें वांचले. दुसऱ्या मीमी म्हणणाऱ्या सरदारांचीही संताजीपुढें तीच गत झाली. ह्या बातम्या ऐकून औरंगजेबाची पांचांवर धारण बसली. तथापि बाह्यतः त्यानें आपला धीर सोडिला नाहीं.'

खाफीखान त्या वेळीं दक्षिणेंत होता. त्यानें वर्णिलेल्या लढायांत शेवटची शिवाय करून बाकीच्या सर्व राजाराम पन्हाळा प्रांतीं असतानांच झाल्या. त्या वेळीं राजारामाचे मुख्य साथीदार रामचंद्र नीळकंठ व संताजी घोरपडे हे होते. रायगडच्या वेढ्यांत कमतरता पाडावी, म्हणून प्रत्यक्ष बादशहाच्या छावणीवर छापा घालण्याची ह्या दोघांनीं मसलत केली. धनाजी जाधवाच्या फौजेंतील दोन हजार शिपाई व विठोजी चव्हाण ह्यांस बरोबर घेऊन संताजी आपले बंधु बहीरजी व मालोजी यांजसहवर्तमान पन्हाळ्याहून तुळापुरीं जावयास निघाला. मध्यरात्रीचे अंमलांत बादशहाचे छावणीपासून तीन कोशांवर छबिन्याचे स्वारांची गांठ पडली. त्यांस संताजीनें सांगितलें, कीं बादशहाचे सरदार शिर्के व मोहिते यांजकडून आम्ही छबिन्यास गेलों होतों, ते परत जात आहों. अशी पक्की खूण सांगितल्यामुळें त्यांस अडथळा झाला नाहीं. त्यांनीं बादशहाचे लष्करांत शिरून छापा घातला. बादशहाच्या डेऱ्याचे तणावे तिघे बंधु घोरपडे व चव्हाण यांनीं तोडिलें; आणि सोन्याचे कळस काढून घेतले. नंतर थोडीशी चकमक उडाली. त्यांतून निभावून ते सिंहगडच्या झाडींत आले. सिंहगडचा अधिकारी प्रतापराव गुजराचा पुत्र सिवोजी गुजर ह्यानें त्यांची बरदास्त ठेविली. संताजी लगट करून घाटाखालीं उतरला व रायगडाला वेढा घालणाऱ्या ईतिकदखानावर छापा घालून, त्याचे पांच हत्ती घेऊन ते त्यानें मोठ्या त्वरेनें पन्हाळ्यास राजारामापुढें आणून हजर केले. संताजीच्या ह्या पराक्रमानें राजाराम फारच संतुष्ट झाला. इकडे संभाजीचा वध होत असतां, त्याच ठिकाणीं मराठयांनीं बादशाही छावणीवर हा छापा घातला. संभाजीचा वध केला, तरी मराठयांचा जमाव आहे तसाच आहे, व त्यांजबरोबरील

युद्धाचा पुनः पहिलाच दिवस आहे, अशी बादशहाची बालंबाल खात्री झाली. आपातनिवारणांतील मराठ्यांच्या कृत्यांपैकीं संताजीचा हा पराक्रम पहिला प्रसंग होय. संताजीस ममलकत–मदार ( प्रांताचा अगर देशाचा मुख्य ) बहीरजीस हिंदुराव, मालोजीस अमीर उल्-उमराव, व विठोजी चव्हाण यास हिंमतबहादूर असे किताब राजारामानें दिले. ( का. सं. पत्रें-यादी, ले. ४०६–०७ ). ह्या वेळस खंडूजी नाईक पानसंबळ हा सेनापति होता ( ऑगस्ट १६९० ).

वरील ' पत्रेंयादींत ' विठोजी चव्हाणाची हकीकत अशी आहे. ( ले. ४२२ ). ' राणोजी चव्हाण पूर्वी शककर्ते महाराजांपाशीं चाकरीस होते. बहुत दिवस सरकारी चाकरी उमदीनें केली. म्हालोजी घोरपडे व चव्हाण असे. राणोजी गाल्हमोटावर सरदार कामास आले. त्याचा पुत्र विठोजी लहान. म्हालोजीनें अर्ज करून मुलाचा बंदोबस्त करून रायगडीं असामी ठेवविली. म्हालोजीबरोबर सेवा चाकरी संभाजीची केली. पुढें म्हालोजीचा काळ झाला, त्यास पुत्र तीन संताजी, बहीरजी, व मालोजी. संताजी घोरपडे व विठोजी चव्हाण एक विचारें चाकरी करीत. त्यांनीं तुळापुरच्या मुक्कामीं जाऊन बादशहाच्या फौजेवर छापा घातला.'

संताजी असे पराक्रम करीत असतां, धनाजी जाधव स्वस्थ बसला नव्हता. फलटणच्या मैदानांत रणमस्तखानाचा पाडाव करून त्यानें पांच तोफा काबीज केल्या. धनाजीच्या पराक्रमाबद्दल राजारामानें धनाजीस जयसिंगराव हा किताब दिला. इतक्यांत रायगड पडला व बादशहाची फौज पन्हाळ्याकडे वळली, अशी बातमी आली; तेव्हां राजाराम विशाळगड रांगण्याकडे गेला. इतक्यांत मिरज व पन्हाळा पडला. तेव्हां रामचंद्रपंत ह्यास महाराष्ट्रांत ठेवून, राजारामानें निघून जिंजीस जावें, व संताजी व धनाजी ह्यांनीं बादशाही फौजेस हुलकावण्या देत असावें, असा विचार सर्वांनुमतें ठरला, व तो लगेच अमलांत आला.

४. कित्येक प्रसिद्ध राष्ट्रसेवक.—संभाजीच्या व राजारामाच्या वेळीं मराटशाहींत अनेक माणसें उदयास आलीं, त्यांचे वृत्तान्त वर ठिकठिकाणीं आलेच आहेत. पुढें औरंगजेबाशीं लढून ज्यांनीं स्वातंत्र्य राखिलें, अशा अनेक महाराष्ट्र घराण्यांचा उदय संभाजीच्या वेळेस झाला; आणि

संभाजीच्याच वेळेस त्यांस राष्ट्रसेवेनें खरें शिक्षण मिळालें. कारण अड-चणीचा प्रसंग आल्याशिवाय अंगची योग्यता बाहेर पडत नाहीं. येसाजी कंक, बाजी पासलकर, सर्जेराव जेधे देशमुख, झुंजारराव मरळ देशमुख, मालुसरे, खंडो बल्लाळ चिटणीस, कान्होजी आंग्रे, हंबीरराव मोहिते, म्हाळोजी घोरपडे, रामचंद्र नीलकंठ, प्रल्हाद निराजी, पिंगळे, निंबाळ-कर, महाडिक, शंकराजी नारायण, बाजी प्रभु, आवाजी विश्वनाथ प्रभु, दादाजी नरस प्रभु, दादजी रघुनाथ वगैरे घराण्यांच्या घराणीं स्वपराक्रमानें उदयास आलीं; परंतु इतिहासात सर्वस्वी अज्ञात अशीं किती तरी घराणीं असलीं पाहिजेत कीं, ज्यांनीं केवळ कर्तव्य करण्यांत भूषण मानिलें; नांव मागें ठेवण्याची हांव धारण केली नाहीं. आज मराठी राष्ट्र जिवंत आहे, हें त्यांच्याच अज्ञात कामगिरीचें फळ होय.

राजा कर्ण व सुंदर तुकदेव. राजा कर्ण म्हणून राजारामाचा दासीपुत्र असून, तोही राज्याचे कामास चांगलें साह्य करीत होता. (खं. १५-२९-३१). सुंदर तुकदेव नांवाचा राजा कर्णाचा दिवाण बराच धाडसी व युक्तिबाज होता. रामचंद्रपंत व प्रल्हाद निराजी याजप्रमाणें सुंदर तुकदे-वाचा उपयोग राजारामास घडत होता. सचिवांनीं जशी गुप्त्यांचीं वतनें घेतलीं, तशींच मसूरच्या जगदाळ्यांचीं वतनें सुंदर तुकदेवानें घेतलीं. तीं वतनें परत द्यावीं म्हणून राजारामानें हुकूम केला असतां, तो सुंदर तुक-देवानें एकदम मानिला नाहीं. जगदाळे औरंगजेबास शरण गेले, म्हणून सुंदर तुकदेवानें त्यांचीं वतनें खालसा केलीं. राजाराम धोरणी होता. शासनापेक्षां क्षमेनें काम ज्यास्त चांगलें सिद्धीस जातें, हें तत्त्व जाणून जगदाळ्यांचें वतन त्यांस परत देण्याचा हुकूम राजारामानें केला. परंतु हा हुकूम अमलांत आला नाहीं. जगदाळ्यांनीं संताजी घोरपड्याचें साह्य घेतलें हें धनाजी जाधवास खपलें नाहीं. धनाजीनें त्यांचें वतन हिसका-वून यादवांस दिलें; त्याजबद्दल धनाजीची राजारामानें पुष्कळ कानउघा-डणी केली. धनाजी रुसूनही गेला; राजारामानें नानाप्रकारें त्याची समजूत केली. जगदाळ्यांच्या बाजूचा पत्रव्यवहार मोठा हृदयद्रावक असून, तो खं. १५ (ले. ३२१-३२३ व पृ. ११०-१११) यांत दिलेला वाचण्यालायक आहे. यादवांच्या बाजूचेही कागद कऱ्हाडच्या बाजूस हल्लीं उपलब्ध होत आहेत, त्यांवरून यादव हेच जगदाळ्यांच्या पूर्वीचे खरे

वतनदार असून, कदाचित् धनाजीचेच पूर्वजांपैकीं असतील. यादवांचीं वतनें जगदाळ्यांनीं हस्तगत केलीं, तीं यादवांस परत देवविण्याची धनाजीची खटपट होती. या तंट्यांत धनाजी व संताजी यांनीं विरुद्ध पक्षांचा कैवार घेतला, त्यामुळें राजारामास त्यांची समजूत काढणें जड पडलें. सुंदर तुकदेवास रामचंद्र नीलकंठ मोठ्या गौरवानें लिहितो.

सुंदर तुकदेव व त्याचें कुटुंब राज्याचे कामीं पुढें वावरत होतें. 'सुंदर-तुकदेव स्वामीचे कदीम सेवक. या राज्यांत कष्ट मेहनत बहुतच केली. याकरितां मौजे बाहे ता। वाळवें गांव इनाम करून दिला. त्याउपरी त्यांचे पुत्र यशवंतराव सुंदर होते, ते मृत्यु पावले. त्यांचे भाऊ त्र्यंबक सुंदर आहेत. त्यांचें वंशपरंपरेनें चालवणें स्वामीस अवश्य आहे.' असा धाकट्या शिवाजीचा उल्लेख खं. ३ ले. २३८-३९ त आहे.

या वतनांच्या बाबतींत जे कागदपत्र उपलब्ध होत आहेत, त्यांवरून कोणता पक्ष खरा व कोणता खोटा हें ठरवितां येणार नाहीं; कारण दोनही बाजूंचे संपूर्ण कागद सांपडले आहेत, अशांतला प्रकार नाहीं. विशिष्ट वतनाच्या मालकीसंबंधानें त्यांचें महत्त्व विशेष नाहीं. तत्कालीन स्थितीवर ऐतिहासिक प्रकाश पाडण्यापुरताच, त्यांचा उपयोग समजला पाहिजे.

मावळांतील तमाम देशमुख घराणीं या संकटसमयीं चांगलीं उपयोगी पडलीं. त्याचे कागदपत्र छापले आहेत, त्यांवरून त्यांच्या अज्ञात सेवेचें थोडेंबहुत अनुमान होतें. खालील पत्र कान्होजी झुंजारराव देशमुखास, रामचंद्र नीलकंठानें स. १६९० च्या जुलईत लिहिलें, त्यावरून मावळे देशमुखांच्या कामगिरीचा एक मासला दिसून येतो. 'आपण प्रचंडगडीचे बाबें खटपट करून, गड हस्तगत करून दिला. गनीम गडावरी आला होता तेसमयीं कस्त करावयाची ते केली. आपणास गनीमानें धरून नेलें होतें; परंतु हरइलाज करून प्रचंडगडास आलों. आपण एकनिष्ठ म्हणोन तपसिलें लिहिलें, तरी तुम्ही एकनिष्ठ ए गोष्टीचा भरंवसा आहे. पुढें कितेक कार्यप्रयोजनें होणें आहेत. राजगड, सिंहगड हे किल्ले हस्तगत झाले पाहिजेत. तरी येविशीं खटपट तर्तूद करून हस्तगत होत तें करणें. आणि आपले विशदकारें गोमटें व मुजरा होय तें करून दाखविणें. हरएकविशीं आपला दिलासा असों देणें.' कान्होजी

व बाबाजी झुंजारराव देशमुख यांचीं नांवें मागें पृ.१७७ वरील वंशावळींत दिलीं आहेत.

खंडो बल्लाळ चिटणीस.—मराठयांच्या अंगीं राष्ट्रीय भावना नसून ते केवळ स्वार्थानें उद्युक्त झालेले होते, असें वारंवार प्रतिपादन करण्यांत आलें आहे, परंतु ह्यास अपवादक अशीं जीं कांहीं उदाहरणें मिळतात, त्यांत खंडेराव आप्पा चिटणीस याचें नांव प्रमुख आहे. राष्ट्रकार्यासाठीं वतनें किंवा जीवित यांची यत्किंचित् परवा करावयाची नाहीं, हा बाणा कित्येक प्रभु मंडळींत उत्कृष्ट दिसतो. खंडो बल्लाळाचें चरित्र इतिहास-संग्रहात 'यशवंतांनीं' मोठें सुंदर दिलेलें आहे. (वर्ष २ अं ३). चिटणिसाच्या घराण्याची हकीकत पूर्वी आलेलीच आहेच. बाळाजी व त्याचा भाऊ श्यामजी, व मुलगा आवजी ह्या तिघांस संभाजीनें हत्तीच्या पायांखालीं मारविलें ह्या घराण्यावर कलुशाचा विशेष कटाक्ष होता. त्यानें बाळाजीची जिंदगी जप्त करून चिटणिसीचा दरख काढून घेतला, आणि खंडोबा व निळोबा ह्या दुसऱ्या दोघां मुलांस कैदेंत ठेविलें. संभाजीची बायको येसूबाई इची ह्या मुलांवर प्रीति असून वरील संकटसमयीं तिनेंच त्यांस साह्य केलें. संभाजीस चार गोष्टी सांगून त्याजकडून तिनें त्यांची सुटका करविली, आणि त्यांस दरबारांत येण्याची परवानगी देवविली. तरी त्यांचें उत्पन्न सुटलें नव्हतें, म्हणून तीच अंतस्थ रीतीनें त्यांस खर्चास पुरवीत असे. खंडोबाचा जन्म सन १६६८ त झाला. म्हणून बाप वारला त्या वेळेस तो तेरा चौदा वर्षांचा होता. तरी त्या अल्प वयांत त्यानें अवर्णनीय स्वामिनिष्ठा दाखविली. हरएक प्रसंगीं तो यजमानाबरोबर असे. अष्टौप्रहर जवळ हजर असावें. निळोबा ऊर्फ अण्णाजी, संभाजीसारख्या क्रूर महाराजाचें दर्शन नको असें वाटून, जिंजीस हरजीराजे महाडिक, वडिलांचे परम दोस्त, यांजवळ जाऊन राहिला. खंडेराव आप्पानें मिळेल तें अन्नवस्त्र संपादून दिवस घालविले. कांहीं काळानें संभाजीस त्याची दया आली. अन्नवस्त्राचा समाचार घेऊं लागले. फोंडें येथें पोर्तुगीझ लोकांशीं झालेल्या लढाईंत तो हजर होता. तेथें एके प्रसंगीं स्वारीबरोबर तो पायीं चालत असतां, संभाजीस कांहीं लिहिण्याचें प्रयोजन पडलें. खंडोबा आपल्या धंद्याचें साहित्य दउत, लेखणी, कागद, वगैरे घेऊन, नेहमीं स्वारीबरोबर हजर असे. खंडोबास पत्र लिहिण्यास सांगून स्वारी पुढें

चालली. पत्रें तयार होईपर्यंत कोस दोन कोस स्वारी गेली. तेव्हां पत्रें घेऊन खंडोजीनें पळत जाऊन स्वारीस गांठिलें, व पत्रें वाचून दाखवून रवाना केलीं. परंतु पळण्याच्या श्रमानें खंडोबास रक्ताची वांति झाली. त्याबरोबर संभाजीस त्याची दया येऊन त्यानें स्वहस्तानें त्यास पाणी देऊन लगेच त्यास बसावयास घोडा दिला; व एक तलवार बक्षीस दिली. त्याच स्वारींत संभाजी घोड्यावर बसून खाडी उतरत असतां, पाणी ज्यास्त होऊन त्याचा घोडा बुडूं लागला. तंग खेचलेला असल्यामुळें घोड्यास पोहतां येईना. त्या प्रसंगीं खंडोबा आपले घोड्याचे तंग कापून पाण्यांत शिरला, व तावडतोब संभाजीचे घोड्याचा तंग कापून त्यानें त्यास संकटमुक्त केलें. ह्या लढाईंत खंडोबानें लढण्यांतही कांहीं कमी केलें नाहीं. इतउत्तर खंडोबा संभाजीस अत्यंत आवडूं लागला. त्याचा त्यानें पुष्कळ गौरव करून अधिकारही वाढविला; आणि चिटणिसीचें काम त्यास दिलें. (शके १६०५. ऐ. जुने लेख, पु. १ लें ). संभाजीस पकडण्यांत आलें तेव्हा खंडो बल्लाळ त्याजपाशीं होता. त्यानें संभाजीस बचावण्याचे प्रयत्न केले पण ते निष्फळ झाले.

प्रभुरत्नमालेंत खंडोबाचें चरित्र दिलें आहे, त्यांत येसूबाईला मोगलांनीं पकडल्याची हकीकत आहे, ती कितपत खरी असेल हें सांगवत नाहीं. संभाजी संगमेश्वरीं राहत होता. तेथें येसूबाई लवाजम्यानिशीं जात असतां मोगलांच्या एका टोळीनें तीस पकडून औरंगाबादेकडे नेलें. हें वर्तमान खंडोबास कळतांच त्यानें आपल्या एका मावसबहिणीस मरण्यास तयार केलें, व तिला मोगलांचे पहाऱ्यांत दासीच्या वेशानें पाठवून, येसूबाईच्या पालखींत बसविलें आणि येसूबाईची सुटका केली. हा सगळा प्रकार कादंबरीथाटाचा दिसतो. येसूबाई रायगडावर पकडली गेली.

**दुसरा खेम सावंत.**—लखम सावंत व शिवाजी यांचे व्यवहार पूर्वी पृ. १३३ व २०३ वर येऊन गेले आहेत. सावंत हे भोसलेच असल्यामुळें, त्यांजबद्दल सक्तीचे उपाय शिवाजीनें घेतले नाहींत. लखमनें नवीन किल्ले बांधूं नयेत किंवा जुने दुरुस्त करूं नयेत; व विशेष फौज न बाळगितां कुडाळ येथें राहून कारभार करावा; असा करार शिवाजीनें करून घेतला. लखम सावंत सन १६६५ त मरण पावला. त्याचे पश्चात् त्याचा भाऊ फोंड सावंत यानें १६७५ पर्यंत वाडीचा कारभार केला. पुढें त्याचा

मुलगा खेम सावंत हा फार पराक्रमी निघाला. त्यानें आपली फौज वाढविली, व शिवाजीच्या विरुद्ध बादशहास साह्य करून, व गोवेकरावर हल्ले करून, आपल्या राज्याचा व सत्तेचा विस्तार केला. सन १७०७ त शाहू छत्रपति राज्याधिष्ठित होईपर्यंत मराठ्यास सावंतांकडे लक्ष देण्यास फुरसत मिळाली नाहीं. इतक्या काळांत सावंताची प्रतिष्ठा पुष्कळ वाढली. शाहूचें ताराबाईशीं भांडण चाललें, तेव्हां खेम सावंतानें शाहूचा पक्ष स्वीकारिला. खेम सावंत सन १७०९ त मारला. त्यास संतान नव्हतें; म्हणून त्याचा पुतण्या फोंड सावंत यास त्याचा अधिकार प्राप्त झाला. फोंड सावंतास कोल्हापुरकर, गोवेकर व आंगरे ह्या सर्वांशीं झगडावें लागलें. आंगऱ्याकडून त्यास फारच त्रास पोंचल्यामुळें, त्यानें इंग्रजांशीं दोस्तीचा तह केला, व एकमेकांनीं एकमेकांस हरएक प्रसंगीं साह्य करावें असें ठरलें. अशी थोडक्यांत वाडीकर सावंतांची हकीकत आहे.

**कान्होजी आंगरे.**—आंगऱ्यांचें आडनांव शकपाळ. हे अस्सल क्षत्रिय आहेत. शिवाजीच्या आरमारावर राहून कान्होजी प्रसिद्धीस आला. संभाजीच्या कारकिर्दींत त्याच्या खऱ्या पराक्रमास सुरवात झाली. संभाजीच्या वधानंतर स्वतःच्या कर्तबगारीनें ज्या अनेक मराठा सरदारांनीं शत्रूला तोंड दिलें, त्यांत पश्चिम किनाऱ्यावर कान्होजी प्रमुख आहे. कुलाबा, खांदेरी व उंदेरी येथें आपलें आरमार ठेवून मोगलांचे ताब्यांतून कोंकण प्रांत त्यानें हळूहळू सोडविला. सीदीला मोगल बादशहाचा आश्रय असल्यामुळें आंगऱ्याचे सीदीशीं युद्धप्रसंग सुरू झाले. स. १६९८ त सीदीचें व आंगऱ्याचें तुंबळ युद्ध झालें. शाहू सुटून आल्यावर आंगरे ताराबाईच्या पक्षास मिळाला.

**नागोजीराव माने.**—ह्याचे वडील रताजी बिन नरसिंगराव हे विजापुरच्या बादशहाचे मोठे नामांकित सरदार होते. विजापुर दरबारामध्यें त्याचें विशेष वर्चस्व असल्यामुळें, मोठमोठे मुसलमान सरदार त्याच्याशीं नम्रत्वानें वागत. त्याच्या शौर्याबद्दल मोठी कीर्ति होती. दिल्लीच्या बादशहाचे सरदार जयसिंग व दिलीरखान ह्यांनीं विजापुरावर सन १६६५ मध्यें स्वारी केली, त्या वेळीं माने यानें आपला पराक्रम गाजविल्यामुळें त्याची विशेष योग्यता वाढली. सर्जेखानासारखे प्रतिष्ठित वजीर त्याच्या शौर्यगुणाकडे पाहून थक्क होत. त्यांनीं हुजूर दरबारांत

रताजीरावाची फार तारीफ करून, त्यास अनेक किताबकती व इनामें देवविलीं होतीं. त्याच्या प्रमाणेंच त्याचा चिरंजीव नागोजीराव हाही शूर निघाला. बाप जिवंत असतांच त्यास सरदारी मिळाली. पुढें रताजीराव मेल्यानंतर विजापुर दरबारामध्यें नागोजीरावाचा बेबनाव झाला. तेव्हां त्यानें विजापुरकरांची नौकरी सोडून औरंगजेबाची सरदारी पत्करिली. औरंगजेब ह्या वेळीं दक्षिणेंत येऊन चोहोंकडे आपलीं ठाणीं बसविण्याचा प्रयत्न करीत होता. त्यास नागोजीरावाचें चांगले साहाय्य झालें. त्यामुळें त्याच्यावर बादशहाची मेहेरबानी होऊन त्यानें त्यास विशेष योग्यतेस चढविलें. अशा प्रकारें मोगलांच्या सेवेंत गौरव होत गेल्यामुळें, स्वदेशाभिमानाची ओळख बुजली. राजाराम चंदीस गेल्यानंतर मोगलांनीं जो वेढा घातला व जीं युद्धें केलीं, त्यांत मराठ्यांच्या विरुद्ध बाजूस हेच सरदार प्रमुखत्वेंकरून लढत होते. राजारामास व त्याच्या मित्रमंडळास ही स्थिति पाहून वाईट वाटलें. आपले देशबंधु स्वदेशकार्यास विघातक झाले आहेत, ह्याकरितां त्यांना ताळ्यावर आणण्याचा प्रयत्न करणें अवश्य आहे, असें समजून, त्यांनीं त्याच्या अंत:करणांत स्वधर्माभिमानाचा प्रकाश पाडिला. नागोजी राजे याजकडे संधान केलें जे, 'मराठी धर्म राखल्यास नीट; नाहीं तर आज बुडतो. तुम्ही मराठी धर्माचे अगत्यवादी, त्यापक्षीं तुम्हीं त्यांतून फुटून आम्हांकडे यावें. तुम्ही आम्ही एक झाल्यास, ही फौज मोडून हिंदुधर्म जतन करूं! यांच्याही मनांत धर्म राखावा, बुडूं नये; म्हणोन त्यांजकडे येतों म्हणोन वचन दिलें. नागोजी राजे यांजकडील मोर्चा शहरालगत दरवाज्यापाशीं होता, तोच मोर्चा उठवून रात्रौ निघून शहरांत पांच हजार फौजेनिशीं गेले. राजे यांची भेट घेतली......राजे माने यांनीं सांगितलें कीं, दोन चार रोजीं त्यांजकडील तोफखाना येणार; नंतर तुमचा आमचा उपाय चालणार नाहीं. तोफखाना आला नाहीं तों शहराबाहेर फौज घालून लढाई करावी. ती मसलत राजे भोसले यांस मानली; आणि रात्रौ विचार करून फौजेची तयारी करून दुसरे रोजीं निघाले. एकच गर्दी केली; इखलासखान वगैरे सरदार ठार मारिले; त्यांजकडे फौजेची तयारी नव्हती; एकाएकींच छापा घातला.... फौज ताणाताण होऊन पळून गेली; वेढा उठविला.' चंदीच्या वेढ्याची ही हकीकत वाचली म्हणजे झुल्फिकारखानाच्या कपटानें राजाराम सुटून

गेला, हें खोटें ठरतें. ह्या प्रसंगीं नागोजीराव ह्यानें स्वधर्माचा अभिमान बाळगून व बादशाही सरदारी झुगारून देऊन, स्वदेशकार्यास जी मदत केली ती प्रशंसनीय होय. नागोजी राजे माने ह्याच्या ह्या साह्याबद्दल, राजाराम महाराजानें त्याचा योग्य बहुमान केला; व त्याला म्हसवडची सरदेशमुखी वगैरे इनाम करून दिलें. माने यांस राजशक १७, प्रजापति-नाम संवत्सराचें छत्रपतीकडून जें अभयपत्र मिळालें आहे, त्यामध्यें 'तुम्ही पूर्वी तांब्रांकडे होतेत, ऐसीयासी स्वामीचें राज्य म्हणजे देवता-भूमि, या राज्यास तांब्राचा उपद्रव न व्हावा, महाराष्ट्रधर्म राहवा, व स्वामीच्या राज्याची अभिवृद्धि व्हावी', या उद्देशीं स्वामीच्या पायांपाशीं एकनिष्ठता धरून कर्नाटकांत चंदीचे मुक्कामीं स्वामीपाशीं आलेती, स्वामि-सेवेवर एकचित्तें वर्तत आहां.' इ० शब्दांनीं ह्या गोष्टीचा उल्लेख केला आहे. ( केसरी व इ. संग्रह ).

५. महाराष्ट्रांतील युद्धप्रसंग ( सन १६९२–९७ ).—राजाराम कर्नाटकांत निघून जात असतांच मोगलांनीं मिरज, पन्हाळा वगैरे ठिकाणें काबीज केलीं; आणि रांगणा व कोंकणांतील दुसरे किल्ले काबीज करण्या-करितां पन्हाळा येथेंच कायमची कांहीं फौज बादशहानें ठेवून दिली. राजारामाचे पाठीवर थोडी फौज त्यानें पाठविली, तरी महाराष्ट्र संपूर्ण काबीज झाल्याशिवाय कर्नाटकाकडे वळावयाचें नाहीं, असा बादशहाचा प्रथम विचार होता. हा बादशहाचा बेत रामचंद्रपंतानें तडीस जाऊं दिला नाहीं. त्यानें विशाळगड, रांगणा वगैरे किल्ल्यांचा बंदोबस्त उत्तम ठेविला. 'खालील प्रांतांत स्वाऱ्या करून मारून नेऊन बेगमी करावी; कोंकणप्रांत राखावा; शत्रूची वर्दी ठेवून जपून वागावें, असा प्रकार चालला. जे सर-दार पराक्रम करितील, व चौथाई सरदेशमुखी वगैरे वसूल करून आणितील, त्यांस किताब, जहागिरी वगैरेच्या सनदा देऊन तो खूश ठेवी. ते प्रांतांत जाऊन पाळेगारीनें मुलूख मारून राहूं लागले. पाळेगारीनें किल्ल्यांचा वगैरे आश्रय करून, झाडींत राहवें, तेथून मुलखांत अंमल बसवावा, घ्यावा, फिरून पळावें, फिरून येऊन प्रदेश काबीज करावा, पथकांतील लोकांची संख्या वाढवावी, या योगें राज्याची वृद्धि होऊं लागली.' मावळ प्रांतांतील सरदार बाजी सर्जेराव जेधे व पासलकर व देशपांडे, मुठेखोरे, वगैरे जमीन-दार आपापले जमावानिशीं रामचंद्रपंताचे लष्करांत सामील होऊन

मोगलांशीं झगडे लागले. ते शंकराजी नारायण याजबरोबर असत. शंकराजीनें ह्या मावळ सरदारांच्या साह्यानें मोगल फौजेचा नाश करून किल्ले, कोट व मुलूख काबीज केले.

राजारामाची बायको ताराबाई विशाळगडीं होती. तेथें ती सन १६९१ त ( शके १६१३ ) प्रसूत होऊन मुलगा झाला. त्याचें नाव शिवाजी ठेविलें. हें वर्तमान बादशहाचे छावणींत येसूबाईस व जिंजीस राजारामास कळलें. तेव्हां येसूबाईनें राजारामास निरोप पाठविला, कीं 'तुम्हीं आपलीं बायकामाणसें कर्नाटकांत घेऊन जावीं. आमची सुटका कधीं होईल ती होवो, परंतु तोंपर्यंत तुम्हीं वैताग करूं नये. राज्यचिह्नादि बाळगून पूर्वील चालीप्रमाणें सर्व व्यवहार करून, बाया विशाळगडीं आहेत त्या घेऊन जाव्यात.' असा निरोप आल्यावर ही बाया मंडळी शत्रूच्या तडाख्यांतून बचावून कशी आणावी हा राजारामास मोठा विचार पडला. शेवटीं राजापुराहून जलमार्गानें आणावी असें ठरून, खंडो बल्लाळ याचे मामा लिंगो शंकर व विसाजी शंकर राजापुरास सावकारी करून राहत होते, ( पृ. २०४ ), त्यांची तारवेंही होतीं. त्यांचे मार्फत मंडळी आणण्याचें ठरून कारकून व हुजरे पत्रे देऊन रवाना केले. ते राजापुरीं आले. तेथून रामचंद्रपंतास त्यांनीं ही व्यवस्था कळविल्यावर, ताराबाई, राजसबाई, व अंबिकाबाई ह्यांची त्यानें घाटाखालीं रवानगी करून दिली. पुढें यशवंतगडचे बंदरांतून जहाजांत बसून सर्व मंडळी निघाली. बरोबर लिंगो शंकरप्रभु* होता. जलमार्गानें पूर्वकिनाऱ्यावर जाऊन सर्व असामी जिंजीस सुखरूप पोंचले. राजारामानें विसाजीचा गौरव उत्तम प्रकारें केला व त्यास राजापुराजवळ गांव इनाम दिला. हा त्या वेळचा समुद्रप्रवास ध्यानांत ठेवण्याजोगा आहे. जिंजी येथें राजसबाईस मुलगा झाला, त्याचें नांव संभाजी असें ठेविलें. ( सन १६९३. )

रामचंद्रपंताकडे विशाळगडचा कारभार सन १६८९ त आला. तेव्हांपासून १६९८ पावेतों मराठ्यांची राजधानी विशाळगडास होती असें

---

* लिंगो शंकरचा मुलगा मुकुंदलिंगो हा पुष्कळ दिवस अक्कलकोटकर फत्तेसिंग भोसले याचा कारभारी होता. फत्तेसिंगानें त्याचा अक्कलकोटास वध केला.

म्हणण्यास हरकत नाहीं. त्यानें राजारामाचे कुटुंबाचा प्रतिपाळ उत्तम प्रकारें केला. अमात्यांचें कुलदैवत रामचंद्र, सबब किल्ल्यावर रामचंद्रजीचें देवालय व हौद बांधिले. सन १६९० त पन्हाळगड किल्ला बादशहानें काबीज केला, आणि पुढें विशाळगड किल्ला सर करण्यास बादशहाची फौज आली. किल्ल्यावर मारा फार दिवस मोठ्या निकरानें चालला. ह्या वेळेस परशुराम त्रिंबक नावाचा एक ब्राह्मण गृहस्थ रामचंद्रपंतापाशीं होता. तो पुढें विशेष प्रसिद्धीस आला. हा प्रतिनिधींच्या घराण्याचा मूळपुरुष होय. त्याची थोडी पूर्वपीठिका येथेंच दिली पाहिजे.

वाईप्रांतांत नांदगिरीजवळ किन्हई म्हणून एक गांव आहे. तेथें कृष्णाजीपंत नांवाचा एक ब्राह्मण कुळकर्णी होता. तो औंध येथील अंबाबाईचा उपासक असे. ह्या देवीची स्थापना पुढें नजीकच सातारगड येथील किल्ल्यावर झाली. कृष्णाजीपंताचा मुलगा त्रिंबकपंत हाही देवीचा भक्त होता. त्रिंबकपंतास पुत्र दोन, वडील माधवराव व दुसरा परशुरामपंत. हा परशुरामपंत १४–१५ वर्षांचा झाल्यावर नोकरीसाठीं फिरत फिरत रामचंद्रपंत हुकमत-पन्हा याजपाशीं विशाळगडास येऊन राहिला. तेथें रामचंद्रपंतानें त्यास जवळ कारकून म्हणून ठेविलें. तेथें लवकरच त्याची हुशारी दिसून आली. तेव्हां त्यानें परशुरामपंतास आपला मुतालिक नेमिलें. त्या वेळीं त्याचा पगार ५ होन बद्दलमुशाहिरा म्हणून खर्च पडला आहे. थोड्याच काळानें परशुरामपंत लढाईवर जाऊन पराक्रम गाजवूं लागला; तेव्हां त्यास 'सुभालष्कर' हें काम मिळून 'समशेरजंग' हा किताब मिळाला. कालांतरानें त्यास प्रतिनिधि, प्रधान व अमात्य अशीं पदें मिळत गेलीं. त्यांचा उल्लेख पुढें येईल. त्या धामधुमीच्या काळांत त्यानें अनेक पराक्रम केले; किल्ल्यांचा बंदोबस्त ठेवून लोकांचे ठिकाणीं आवेश उत्पन्न केला; आणि मिरजपासून रांगण्यापर्यंतचा बहुतेक प्रदेश मोगलांचे ताब्यांतून सोडवून, त्याचा कारभार तो स्वतः करूं लागला.

विशाळगडास वेढा पडला असतां तेथें राहून निभाव लागत नाहीं असें पाहून, रामचंद्रपंत व परशुरामपंत बाहेर पडले. किल्ल्याचा बंदोबस्त मावळे व गडकरी करीत होते. लढाई जबरदस्त झाली; दोहोंकडील पुष्कळ मनुष्यें खराब झालीं. मराठे लोकांच्या स्त्रिया सातशेंपर्यंत सती गेल्या. शेवटीं बादशहानें किल्ला काबीज केला, आणि तेथें आपल्या

तर्फेचे अधिकारी नेमिले. त्यांत राजापुर प्रांतांतील सरदेसाई, कृष्णाजी भास्कर पंडित, व श्यामजी रंगनाथ ओर्पे सर–पोतदार असे इसम होते. हीच मंडळी पुढें परशुरामपंत यास वश झाली, आणि त्याजकडून त्यांस इनामें वगैरे मिळालीं. त्या वेळेस धामापुर, मोरडें, वेरवली वगैरे गांव सरदेसाई यांस वतन मिळाले ते अद्यापि चालत आहेत. कृष्णाजी भास्करच्या कामाचा उल्लेख येणें प्रमाणें आहे ( का. सं. पत्रें यादी–ले. ४०९ ). ' तुम्ही स्वामीचे पुरातन सेवक. स्वामीच्या पायांशीं निष्ठा धरून अंत:करणपूर्वक सेवा केली. किल्ले विशाळगड औरंगजेबानें हस्तगत करून उदितसिंग रजपूत तेथें ठेवून मनसुबी केली. तें स्थळ स्वामींच्या शासनावश व्हावें या गोष्टीचा प्रयत्न तुम्हीं विशेष केला. उदितसिंगाशीं राजकारण करून त्याला खालीं उतरिलें. ते समयीं आपला भाऊ केशव भास्कर यास उदितसिंगाच्या समागमें त्याच्या देशास जावयास दिलें, आणि स्थळ स्वामींच्या शासनावश केलें. ते समयीं परशुराम त्रिंबक प्रतिनिधि यांसी विनंती करून स्वामींकडून मौजे कलबस्तें तर्फ संगमेश्वर हा गांव इनाम देवविला.' कृष्णाजी भास्कर, उपनांव पंडित, याचे वंशज विशाळगड संस्थानांत हल्लीं आहेत.

सिधोजी ( भिवजी ? ) गुजर यास सरखेल असा किताब देऊन त्यास आरमाराचें आधिपत्य देण्यांत आलें. त्याचे हाताखालीं तुकोजी आंगरे याचा मुलगा कान्होजी आंगरे हा पुढें लवकरच फार प्रसिद्धीस आला. सिधोजी गुजर सन १६९७ चे सुमारास मृत्यु पावला. तो व कान्होजी या दोघांनीं पश्चिमकिनारा मराठ्यांचे ताब्यांत ठेविला; आणि जंजिऱ्याचे सीदीचा अनेक वेळां पाडाव केला. सिधोजीनंतर मराठी आरमाराचें आधिपत्य व सरखेल किताब आंगऱ्याकडे आले.

राजाराम जिंजीस गेला असें समजतांच बादशहानें झुल्फिकारखान यास जिंजी काबीज करण्याकरितां पाठविलें. इकडे महाराष्ट्रांत फिरोजजंग गाजीउद्दीनखान नांवाचा बादशहाचा सरदार मराठ्यांचा मुलूख काबीज करीत होता. हाच सरदार प्रसिद्ध निजामुल्मुल्कचा बाप होय. विशाळगड सोडल्यावर परशुरामपंत कोंकणांत संगमेश्वरीं व रामचंद्रपंत साताऱ्यास राहूं लागला. शंकराजी नारायण कुळकर्णी गांडेकर नांवाचा दुसरा एक हुशार कारकून रामचंद्रपंतापाशीं होता. हें घराणें मूळ गांडा-

पुरचें राहणारें. नारो मुकुंदाचा उल्लेख पूर्वी आलाच आहे, त्याचा शंकराजी हा मुलगा. तो व परशुराम त्र्यंबक यांच्या मदतीनें रामचंद्रपंतानें महाराष्ट्रांतील किल्ल्यांचा बंदोबस्त ठेविला, आणि फौजेची व लढण्याची तयारी केली; इतकेंच नाहीं, तर प्रांतांत स्वस्थता करून सरकार सारा वसूल करण्याचा बंदोबस्त केला. त्यानें ठिकाठिकाणीं नवीन फौजा ठेविल्या व मोगलांचा उच्छेद आरंभिला. जिंजीस राजारामाची सुव्यवस्था करून धनाजी जाधव व संताजी घोरपडे परत माहाराष्ट्रांत आले. प्रल्हाद निराजी कर्नाटकांत राजारामाजवळ राहिला. रामचंद्रपंताचे शिरावर इकडे मोठा भार पडला असतांही, एकसारखा जागरूकपणा कायम ठेवून, आपल्या बुद्धिनेत्रांस तिळभरही विकार होऊं न देतां, त्यानें महाराष्ट्राचा बचाव केला.

शंकराजी नारायण आरंभीं मोरोपंत पिंगळे याजवळ कारकून असून हल्लींच्या प्रसंगीं रामचंद्रपंताजवळ होता. त्याची हिंमत व कामगिरी रामचंद्रपंताच्या नजरेस लगेच आली. पागेची नोकरी करीत असतां, औरंगजेबानें घेतलेले किल्ले परत जिंकण्याचा उद्योग शंकराजीनें आरंभिला. त्यानें मावळांतील लोकांची मोठी फौज तयार केली; आणि मावळ प्रांतांतच मोगलांचा उच्छेद आरंभिला. सन १६९२ त औरंगजेबानें राजगड, तोरणा व रोहिडा हे किल्ले काबीज केले. परंतु मोगल फौज बेसावध असतां, घोरपडीच्या साह्यानें रात्रीं एकाएकीं तटावर चढून शंकराजीनें राजगड किल्ला काबीज केला. या पराक्रमाबद्दल त्यास ' मदारुलमहाम ' हा किताब मिळाला. स. १६९३ त तोरणा व रोहिडा हे किल्ले व घांटमाथ्यावरील बहुतेक प्रदेश शंकराजीनें हस्तगत केला. रामचंद्रपंत साताऱ्यावर राहून कारभार पाहत होतां, म्हणून बादशहानें साताऱ्यास वेढा दिला. तेथील किल्लेदार प्रयागजी अनंत यानें मोठी शर्थ करून किल्ला लढविला. हातचा जाऊं दिला नाहीं. बादशहानें परळीस वेढा घातला. त्याचें संरक्षण परशुराम त्रिंबकानें केलें. शंकराजी नारायणानें बाहेरून छापे घालून बादशहाच्या फौजेस इतकें त्रासवून सोडिलें कीं, तूर्त बादशहानें महाराष्ट्रांतून पाय काढून सर्व मोर्चा जिंजीकडे फिरविला.

संताजी व धनाजी परत येतांच, रामचंद्रपंताचे लोकांस पुष्कळच हुरूप आला. प्रथमतः संताजी व रामचंद्रपंत ह्या दोघांनीं वांईचे मोगल सुभे-

दारास पकडून तेथें आपलें ठाणें बसविलें; व शंकराजी नारायण यास तेथील टाणेदार नेमिलें. पुढें संताजी व धनाजी हे चौथाई व सरदेशमुखी वसूल करण्याकरितां प्रांतोप्रांतीं फिरू लागले. तेव्हांपासून घासदाणा म्हणून तिसरी एक बाब वसूल करण्याचा मराठे सरदारांनीं प्रघात घातला. ह्या कामासाठीं एक नवीनच फौज तयार करण्यांत आली. तिजवर पवार, थोरात, व आटोळे हे सरदार मुख्य होते. त्यांच्या पराक्रमाबद्दल त्यांस अनुक्रमें विश्वासराव, दिनकरराव, समशेरबहादूर असे किताब देण्यात आले. रामचंद्रपंताचे व्यवस्थेंत धनगर लोकांसही विशेष उत्तेजन मिळालें. परशुरामपंतानें विलक्षण कावा करून पन्हाळा किल्ला व प्रांत काबीज केला. (स. १६९२). संताजीनें मिरजेवर छापा घालून वाईप्रमाणें तोही प्रांत हस्तगत केला. त्या प्रांताची देशमुखी रामचंद्रपंतानें संताजीस दिली. ह्याप्रमाणें महाराष्ट्रांतील ठिकाणें हळूहळू ताब्यांत येत चालल्यावर संताजी व धनाजी हे जिंजीचे रक्षणाच्या खटपटीस लागले. बादशहाची फौज जिंजीस पोंचूं द्यावयाची नाहीं, हें मुख्य काम त्यांनीं उत्तम प्रकारें बजाविलें. जिंजीस वेढा सन १६९१ त पडला, तो १६९८ पर्यंत सहासात वर्षें चालू होता. इतक्या मुदतींत मराठे बादशहाशीं कसे युद्ध खेळले, त्याचें वर्णन चिटणिसांनीं फारच चांगलें दिलें आहे. मराठे सरदार 'याप्रमाणें दौलत जमवून बादशहाचे फौजेशीं लढून, बागलाण, गुजराथ, गोंडवण, गंगातीर, स्वदेश, कर्नाटक, जिंजी वगैरे देश, दुर्ग व ठाणीं काबीज करीत चालले. बादशहास वाटलें, कीं मराठेशाही मोडत नाहीं; म्हणून तो वरचेवर कर्नाटकांत फौजा रवाना करीत गेला. इकडे मराठी फौज हिंडती फिरती राहून स्वदेशीं लढाई करून प्रांतांत खंडण्या घ्याव्या, बादशहाचीं ठाणीं उठवावीं, आपले नाके, जागा, किल्लेकोट यांस दीलभरंवसा देऊन बादशहाचा मुक्काम असेल तेथें जाऊन छापा घालावा, मुलूख मारावा, सामानसुमान लुटून हत्ती, घोडे, उंटें न्यावीं, अशी धांदल करीत चालली. मराठी फौज चहूंकडे फाकल्यामुळें ती किती आहे, ह्याचा अदमास लागत नसे. जिंजीकडे बादशाही फौज रवाना होई तीस ते अडवीत, लढाई करून लुटीत, छापा घालीत, मिळून पल्ला पोंचूं देत नसत. याप्रमाणें लढाया जागाजागीं चालल्या. मोंगली फौज मोठी, एक ठिकाणीं उभी राहून लढाई करणार; मराठे यांनीं आज एके ठिकाणीं तर दुसरे दिवशीं वीसपंचवीस

कोसांवर दूर जावें; पुनः एकाएकी येऊन छापा घालावा; लढाई देऊन लुटून पळावें. रात्रीं बेरड लोक घालून घोडीं चोरून न्यावीं. सारांश, मराठे लोकांनीं प्राण तृणप्राय करून राज्य रक्षावें, हें सर्वांचें मनोगत. सर्व हिंदु जातींनीं प्राणाची गरज न धरितां राज्याविषयीं झटावें. इकडील लोकांनीं कामेंकाजें केल्यानंतर महाराजांकडील सरदारांनीं त्यांची नांवाजणी करावी व सरंजामाच्या सनदा आणून द्याव्या. योग्य मनुष्यास उमेद चढून दुसऱ्यानें अरेतुरेनें कामें करीत असावें, अकस्मात् यावें, बक मत्स्य उचलून नेतो, तसा घाला घालावा, शिपाईगिरीची शर्थ करावी. प्रसंग पडल्यास माघारें पळून जावें, खाण्यापिण्याची दरकार बाळगूं नये; पाऊस, ऊन, थंडी व अंधारी कांहीं न पाहतां, घोड्यावरच हरभरे, भाकरी, चटणी, कांदे खाऊन धांवावें. 'त्यांस कसें जिंकावें ? एक्या मुलखांत फौज आली म्हणून त्यांजवर एकाची रवानगी करावी, तो दुसरीकडे जाऊन ठाणीं घेतात; मुलूख मारितात; हे आदमी नव्हत, भूतखाना आहे, अशी बादशहाची त्रेधा उडाली.'

गोंडवण, वऱ्हाड वगैरे उत्तरेकडील प्रांतांत मराठ्यांनीं धुमाकूळ उडवून दिला असतां, बादशहा औरंगजेबानें आपली छावणी सन १६९५ त भीमेच्या कांठीं ब्रह्मपुरी* ऊर्फ बेगमपुर येथें नेली. या वेळेस तो पुढें काय करावें, या विचारांत होता. शेवटीं त्यानें आपला पुत्र कामबक्ष व वजीर आसदखान यांस झुल्फिकारखानाचे मदतीस जिंजीस पाठविलें.

---

* ब्रह्मपुरी—सन १६९५ त कृष्णा कांठचें गलगलें सोडून, औरंगजेबानें आपली छावणी भीमेच्या कांठीं ब्रह्मपुरी येथें नेली. त्याची अगणित फौज म्हणजे एक ठिकाणाहून दुसरे ठिकाणीं फिरत जाणारें असें एक मोठें शहरच होतें म्हटलें तरी चालेल. ब्रह्मपुरी हें ठिकाण सोलापुरच्या नैर्ऋत्येस २३ मैल भीमेच्या एका मोठ्या वांकणांत आहे. तें वांकण सुमारें तीन चौरस मैलांचें एक द्वीपकल्पच आहे तेथें औरंगजेबानें छावणीचे बंगले वगैरे बांधिले. दरबारचें सर्व काम व सर्व मोगल बादशाहीचा कारभार तो ह्या ठिकाणीं राहून कित्येक वर्षेपर्यंत करीत होता. सोलापुराहून टांग्यांतून सात आठ तासांत ब्रह्मपुरीस जातां येतें. ह्याच ठिकाणीं औरंगजेबाची इतिहासप्रसिद्ध मुलगी झिबुन्निसा उर्फ बेगमसाहेब ही १७०२ त मरण पावली. तिच्या स्मरणार्थ ब्रह्मपुरीचें नांव बेगमपुर असें ठेण्यांत आलें, तेंच अद्यापि चालत आहे.

रस्त्यांत पुष्कळ त्रास होऊन, शेवटीं ही फौज एकदांची जिंजीस येऊन पोंचली. झुल्फिकारखानाचे हातचें आधिपत्य कामबक्षाचे हातांत गेल्यामुळें, खानास फार विषाद झाला. जिंजीचे वेढ्याचा निकाल लागेना; संताजी घोरपडे एकसारखा फिरत होता. परसोजी भोसले; व हैबतराव निंबाळकर, हे दोन शिवाजीच्या तालमेंतले सरदार; ह्यांस वऱ्हाड व गंगथडी येथें ठेवून, संताजी बादशहाच्या छावणीच्या धोरणानें साताऱ्यावरून थेट जिंजीकडे गेला (१६९६). त्या वेळीं आघाडीस असलेल्या धनाजीच्या हाताखालील एका टोळीनें वेढा घालणाऱ्या मोगलांस, अत्यंत दहशत बसविली. मागून संताजी घोरपडे मुख्य फौजेबरोबर आला. रस्त्यांत कुवरपाक ( Covrepauk ) येथें अलीमर्दानखान नांवाचा मोगल फौजदार त्यास आडवा आला, त्यास संताजीनें बेदम झोडून कैद केलें, व मोठा दंड घेऊन सोडून दिलें ह्याप्रमाणें विजयध्वज फडकावीत मराठे लोक मोगलांचीं ठाणीं घेत सर्व दिशांकडे चालले. जिंजीच्या मोगलांस त्यांनीं इतकें सतावून सोडिलें कीं, महाराष्ट्रांतील खबर त्यांस कळेना; व त्यांची इकडे कळेना. झुल्फिकारखान जिंजी येथें कंटाळून थेट दक्षिणेस त्रिचिनापल्ली, अर्काटकडे गेला व तिकडील कित्येक ठिकाणें त्यानें काबीज केलीं.

औरंगजेब दक्षिणेंत आला त्यापूर्वींच बंगलोर प्रांत व्यंकोजीनें जिंकून घेतला होता. व्यंकोजी स. १६८४ त मरण पावल्यावर त्याचा वडील मुलगा शहाजी गादीवर बसला. हा शहाणा व कर्तृत्ववान् होता. त्यानें स. १७११ पर्यंत राज्य केलें. त्याची आई दीपाबाई फार शहाणी होती. ती शहाजीस योग्य सल्ला देत असे. जिंजीस हरजीराजे महाडिक होता, त्याचा व शहाजीचा स्नेह होता; आणि दोघांनीं त्या बाजूस मराठ्यांची सत्ता चांगली राखिली. या वेळीं म्हैसूर येथें चिक्कदेव राजा राज्य करीत होता. विजापुर व गोवळकोंडा पडल्यावर बादशहाची फौज कर्नाटकांत म्हैसुराकडे संचार करूं लागली. त्यामुळें बंगलोरचें संरक्षण करण्याचें कठीण पडून, तो प्रांत चिक्कदेवास विकण्यास शहाजी तयार झाला, ( सन १६८७ ). ही बातमी जिंजीचा अधिकारी हरजी राजे व औरंगजेबाचा सरदार कासमखान यांस समजली, व दोघेही बंगलोरवर चाल करून गेले. कासमखान प्रथम येऊन पोंचला, आणि त्यानें एकदम बंगलोर काबीज केलें. तेव्हां हरजी राजे परत गेला. परंतु कासमखानास

ही जागा फायदेशीर न वाटून त्यानें ती चिक्कदेवास विकली (सन १६८७). चिक्कदेव व कासमखान यांचा स्नेह जमला. इकडे म्हैसूर प्रांत जिंकण्याची बादशहाची इच्छा होती. पण कासमनें बादशहास अशी सल्ला दिली, कीं म्हैसूरचें राज्य जिंकलें असतां मराठ्यांवरचा दाब नाहींसा होऊन ते प्रबळ होतील, सबब तें राज्य तूर्त तसेंच राहूं द्यावें. बादशहास हें म्हणणें पसंत पडून कांहीं वर्षें तो मराठ्यांच्याच पाठीस लागला. इकडे म्हैसूरच्या राजानें आपला प्रांत आसपास बराच वाढविला. सन १६९६ चे सुमारास जगदेव घाटगे व निंबाजी घाटगे हे दोन मराठे सरदार म्हैसुरावर आले, परंतु चिक्कदेवरावाच्या मुलानें त्यांचा पराजय करून त्यांस ठार मारिलें. त्यामुळें चिक्कदेवरावावर बादशहा खुष झाला. ( विल्क्सचा म्हैसूरचा इतिहास, भाग १, पृ. ९१. ) स्वतः औरंगजेबाचाही म्हैसुरावर चालून जाण्याचा विचार पुढें १७०५ त होता.

बंगलोर शहाजीच्या हातांतून गेलें, हें त्याचें मोठेंच नुकसान झालें. पुढें राजाराम जिंजीस आला, तेव्हां त्यास शहाजीची मदत होती. परंतु झुल्फिकारखानानें ती मिळूं दिली नाहीं. कर्नाटकांतील एकूण एक मराठ्यांचीं ठाणीं जिंकण्याचा खानानें सपाटा चालविला. त्यानें स. १६९१त तंजावरवर स्वारी केली; आणि तेथून जिंजीस मदत होऊं नये, असा बंदोबस्त केला.

६. संताजी कासमखानांचा दुडेरीस संग्राम, (सन १६९४).— इकडे संताजी घोरपडे विजापुरकर्नाटकांत मराठ्याचा अंमल बसवीत असतां, बादशहानें कर्नाटक प्रांताचा मुख्य अंमलदार कासमखान व दुसरे कित्येक सरदार यांस त्यांजवर पाठविलें. कासमखानाची कांहीं फौज अघाडीस होती, तिजवर मराठ्यांनीं छापा घातला व तिला लुटून फस्त केलें. तें ऐकून कासमखान जोरानें पुढें आला. पण त्याजलाही मराठ्यांनी घेरून जेर केलें. पहिल्या दिवशीं रात्र झाल्यामुळें लढाई थांबली; ती पुनः दुसरे दिवशीं सूर्योदयाबरोबर चालली. ह्याप्रमाणें तीन दिवसपर्यंत निकराचा झगडा झाला. शेवटीं कासमखानाचा नाइलाज होऊन तो दुडेरीच्या गढींत जाऊन तिच्या आश्रयानें लढूं लागला. त्या ठिकाणीं मुख्य लोकांस चास, दाणा वगैरे मिळाला, परंतु सर्व फौजेस सामग्रीचा तोटा पडला. गढी तर संताजीच्या ताब्यांत आली होती. तीन चार दिवस कासमनें हा कोंडमारा सहन केला. त्याचीं उंटें

व इतर जनावरें संताजीच्या हातांत पडलीं. चवथ्या पांचव्या दिवशीं संताजीस बातमी लागली, कीं हिंमतखान नांवाचा एक सरदार कासमखानाच्या मदतीस येत आहे. तें ऐकून अर्धी फौज दुडेरीस ठेवून व बाकीची बरोबर घेऊन संताजी हिंमतखानावर चालून गेला. रस्त्यांत जिंजीकडील दुसरी फौज हिंमतखानावर गेली असें ऐकून, संताजी परत दुडेरीस आला. तेव्हां कासमखान अगदीं निराश झाला होता. तेथील गढी रिकामी होती. तेव्हां थोड्या लोकांनिशीं गढींत शिरून आपला बचाव करावा, ह्या हेतूनें रात्रीं गुप्त रीतीनें खान आंत शिरला. परंतु त्याबरोबर दुसरे पुष्कळ लोक आंत गेले. रूहुल्लाखान, सफ्‌शिकनखान, मुरादखान व आणखी पुष्कळ मोठमोठे सरदारही आंत गेले. त्यामुळें तर मराठ्यांचा वेढा त्यांस जास्तच दुःसह झाला. घोडे फाडून खाण्याची वेळ आली. पुष्कळांनीं तटावरून उड्या मारून मराठ्यांपाशीं जीवदान मागितलें. बाहेरच्या लोकांनीं धान्य व फळफळावळ तटापाशीं आणून आंतील लोकास विकत देऊन अलोट संपत्ति मिळविली. लढाईत पराभव, छावणींत रोग, व दाण्यापाण्याची दुर्मिळता, यांच्या योगानें सर्वांस मरणप्राय वेदना होऊं लागल्या. कासमखानानें राग व निराशा ह्यांमुळें व्याकुळ होऊन आत्महत्या केली. कोणी म्हणतात अफू न मिळाल्यामुळें त्यास मरण आलें. ( खाफीखान,—एल्यट ७—३४७ ).

नंतर रूहुल्लाखान व दुसरे सरदार मराठ्यांचे स्वाधीन झाले. संताजीनें शत्रूंच्या ताब्यांतील सर्व मालमत्ता व एक लाख होन इतका दंड मागितला. हा दंड म्हणजे खरोखर कांहीं नाहीं, असें संताजीनें त्यांस कळविलें. शेवटीं एकंदर सात लाख रुपये दंड ठरला. त्यांत प्रत्येक सरदाराचा हिस्सा असून, तो हिस्सा फिटेपर्यंत प्रत्येकानें आपला एक मनुष्य संताजीजवळ ओलीस ठेविला. ह्या एकंदर संग्रामांत पन्नास साठ लाखांपर्यंत मराठ्यांस मिळकत झाली.

ह्याप्रमाणें मराठे विजयानंदानें परत जात असतां, हिंमतखान मोठ्या लगबगीनें कासमखानाचे मदतीस येतांना त्यांना भेटला. संताजी लगेच दोन टोळया करून त्याजवर चालून गेला. हिंमतखान मोठ्या हिंमतीनें लढला. संताजीची एक टोळी परत फिरली व हिंमतखान दुसरीवर चालून गेला. त्यास अडचण करण्यासाठीं मराठे लोक झाडींत शिरतांच एक गोळी सूं सूं

करीत त्याचे कपाळांत शिरली व एका निमिषांत खान गतप्राण झाला. मग मुसलमानांचें सर्व सामानसुमान संताजीचे हातांत पडलें हें सांगावयास नकोच. हे अशा प्रकारचे संग्राम ध्यानांत घेतले, म्हणजे संताजी अगर इतर मराठे सरदार केवळ वाऱ्याबरोबर फिरत जाणारी लुटारू लोकांची धांवपळ होती, कीं मर्दासारखे समोर उभे राहून लढणारे होते, ह्याची खात्री तेव्हांच होते. वरील हकीकत त्या वेळीं हयात असलेल्या मुसलमान इतिहासकारानेंच दिली आहे. दुडेरी हें चितळदुर्गच्या पश्चिमेस ३० मैल आहे. कोणी म्हणतात, हिंमतखानाचा पराभव दुडेरीस झाला; व कोणी म्हणतात बसवपट्टणास झाला. या संग्रामाचें साल खाफीखान सन १६९४ असें देतो. पण त्यांत तफावत असण्याचा संभव आहे.

दुडेरीच्या वेढ्यांत कासमखान मृत्यु पावला, ती हकीकत विल्क्सनें दिली आहे. कासमखान हा मोठा नामांकित सरदार होता. बादशहानें त्यास सर्व कर्नाटकची सुभेदारी दिली होती. सन १६९८ त दुडेरीवर मराठ्यांनीं हल्ला केला असतां, कासमखानाचा पराजय झाल्यामुळें त्यानें आत्महत्या केली; अगर त्याचा खून झाला. पुढें कासमखानाचा कर्नाट-कांतील अधिकार झुल्फिकारखानास मिळाला. झुल्फिकारखान हा फार पराक्रमी म्हणून नांवाजलेला होता. सतत १९ वर्षेपर्यंत तो बादशहाची कामगिरी बजावीत होता. अवघ्या सहा महिन्यांत त्यानें मोठमोठ्या १९ लढाया मारल्या, व तीन हजार मैलांचें कूच केलें, एवढ्यावरून त्याची तडफ व्यक्त होते. औरंगजेबाच्या हयातींत खानानें थेट दक्षिणेपर्यंत तीन जबरदस्त स्वाऱ्या केल्या, आणि त्रिचिनापल्ली व तंजावर येथून मोठमोठ्या खंडण्या वसूल करून आणिल्या.

७. जिंजीस प्रयाण व राज्यव्यवस्था (सन १६९१).—संभाजीनें पुष्कळ पैसा खर्च करून विशाळगड किल्ला मजबूद केला होता. त्या कामा-वर कृष्णाजी गौडा व रंगो नारायण हे दोन असामी त्यानें नेमिले होते. (भारतवर्ष, अं. ३, पृ.२८). प्रल्हाद निराजीनेंही ती जागा मजबूद करून पागा वगैरे राहण्याची सोय केली होती. सन १६८९त रायगड सोडल्यावर, राजाराम प्रतापगडास आला. तेथून परळी; परळीहून पन्हाळा, विशाळगड, रांगणा इकडे जाऊन, तेथून कर्नाटकांत निघून गेला (१६९०). त्यानें आपला जनानखाना, रामचंद्र नीलकंठ याचे ताब्यांत विशाळगडीं ठेविला.

निळोपंत पिंगळे व हरजी महाडीक यांस आगाऊ पत्रें जिंजीस पाठविलीं. संताजी घोरपडे, धनाजी जाधव, खंडेराव दाभाडे, प्रल्हाद निराजी, खंडो बल्लाल, आबाजी सोनदेव (खं. ८-४८), अशी मंडळी जंगम लिंगाईत कापड विकणारे वाण्यांचा वेष घेऊन निघाले. सर्व असामी एका जमावानें निघाले नाहींत, निरनिराळे पृथक् मार्गें गेले; कारण एकत्र गेल्यानें शत्रूंचे हातांत पडण्याची भीति विशेष होती. ह्याप्रमाणें प्रवास करीत बेंगरूळ येथें पोंचले. राजारामास पकडण्याकरितां बादशहानें विजापुरचा फौजदार कासमखान ह्याची रवानगी पाठोपाठ केली. बेंगलूर येथें राजाराम महाराजांचे पायांवर पाणी घालतांना, तेथच्या लोकांनीं पाहून म्हटलें, 'हे कापडी दिसतात; परंतु दुसऱ्याकडून पाय धुऊन घेतात, तर कोणी मातबर आहेत.' ही वार्ता कर्णोपकर्णीं तेथील मोगलांच्या ठाण्यांत कळली. इकडे त्या लोकांचे उद्गार ऐकून, मराठी मंडळी चपापली. आतां येथें राहणें धोक्याचें आहे असें समजून, खंडो बल्लाळ यानें सुचविलें, कीं जाधव, घोरपडे व दाभाडे यांनीं राजारामास घेऊन निघून जावें; प्रल्हाद निराजी यानें इतर कांहीं मंडळीसह दुसरे मार्गानें जावें, आणि स्वत: आपण आपल्या मंडळीसह येथेंच थोडा मुक्काम करून पाठीमागून येतों. याप्रमाणें ठरून फौजेचें धरणें येईल, तें चुकविण्याकरितां वरील बेत एकदम अमलांत आणिला. इतक्यांत चौकीवाले आले, त्यानीं खंडोबा व त्याचे मंडळीस पकडून नेलें. खंडोबानें सांगितलें, 'आम्ही कापडी यात्रेकरू, श्रीरामेश्वरीं जातों; दहापांच आणखी होते, ते जिकडे जाणार तिकडे गेले. आम्हांस दुसरीकडे जाणें, म्हणून राहिलों.' हें बोलणें खरें न वाटून मोगलांनीं त्यांस मारहाण केली. डोईवर दगड दिले, चाबूक मारिले; परंतु कापडीच म्हणून सांगितलें. शेवट राखेचा तोबरा दिला तरी तेंच. तेव्हां सर्वांनीं सांगितलें, यात्रेकरू हें खरेंच. यांस पीडा करणें ठीक नाहीं. तीन चार दिवस कैदेंत ठेविल्यामुळें उपोषणें घडलीं. तेव्हां त्यांची सुटका झाली. पुढें संकेताप्रमाणें ते प्रल्हाद निराजीचे मंडळीस जाऊन मिळाले, आणि कांहीं दिवसांनीं सर्व मंडळी जिंजीस सुखरूप पोंचली. चिटणिसाचा स्वार्थत्याग, आणि त्या लोकांचें विपत्कालचें धैर्य हे गुण ह्या प्रसंगीं चांगले दिसून आले. राजारामास जिंजीस पोंचल्याचें दक्षिणेंत समजतांच राज्यांतील इतर मंडळी ज्यास जसें कळलें, त्या रीतीनें जिंजीस जाऊन

पोंचली. राजारामानें सर्वांचा सत्कार केला. मराठ्यांचा जमाव जिंजीस जाऊन मिळाला. ' तेथें राजधानी जमली. सर्वांनीं सुख फार भोगिलें. घरें दारें संसार करून सुखी होते. निळो बल्लाळ चिटणिसाकडे राजाकर्णाची दिवाणगिरी होती. खंडो बल्लाळ नेहमीं राजारामाजवळ असे. त्याची स्त्री चंदींत निवर्तली. तेव्हां राजारामानें देशींहून दोन नवऱ्या कामी व काकाई नेल्या, लग्न करविलें. राजारामाची कृपा पूर्ण पाहून, विनंति केल्यावर, दाभोळ प्रांतीची सरदेशमुखी वतन वंशपरंपरा करून दिलें.' ( इ. सं. खंडो बल्लाळ ).

जिंजीस पोंचल्यावर पहिलें काम राज्यव्यवस्थेचें, तें राजारामानें हातीं घेतलें. स्वत: छत्रपति हें पद धारण करून तो गादीवर बसूं लागला. यथाविधि राज्याभिषेक झाल्याचें आढळत नाहीं. तथापि त्यानें राजचिन्हें धारण केलीं, ह्यांत संशय दिसत नाहीं. राजचिन्हें धारण केल्याशिवाय गत्यंतर नव्हतें. राज्याचा खरा मालक शाहू औरंगजेबाचे कैदेंत होता. तथापि त्याच्या कैदेनें मराठ्यांची सत्ता खालावली नाहीं, तर दुसरा धनी राज्यास होऊन सर्व व्यवस्था पूर्ववत्, किंबहुना ज्यास्तच जोरानें, चालू आहे, असें शत्रूस दाखविणें जरूर होतें. संभाजी किंवा शाहू यांजमुळें राज्य अडून राहत नाहीं, हें बादशहास कळल्यानें, त्याचा धीर खचला. जिंजीची राज्यव्यवस्था बरीचशी दिखाऊ व केवळ तात्पुरती होती. परंतु भपका दाखविल्याशिवाय दरारा बसत नाहीं, ही गोष्ट राज्यक्रान्ति व युद्धें ह्यांच्या इतिहासांत निदर्शनास येते. म्हणून राजाराम व त्याचे मसलतगार यांनीं जिंजीस सर्व राज्यकारभार केला. ह्याच कारणास्तव राजारामास राज्यपद स्वीकारणें भाग पडलें. मात्र त्याच्या अंत:करणांतला हेतु शाहूस दूर सारण्याचा नव्हता. राजारामानें राज्यपद स्वीकारल्यानें शाहूच्या हक्कांची पायमल्ली झाली, असा वाद वाढलेला आहे, त्याचा खुलासा वरप्रमाणें आहे. राजारामानें राज्यपद स्वीकारिलें तें केवळ शाहूकरितां व राज्याच्या बचावाकरितां होय. याजबद्दल प्रत्यक्ष राजारामाचे अनेक उल्लेख आहेत. ' चिरंजीव शाहू कालेंकरून तरी श्री देशीं आणील, तेव्हां संकटीं जीं माणसें उपयोगी पडलीं त्यांच्या तसनसी आम्हीं कराविल्या, याचा चित्तीं द्वेष यावा हें तरी अविचाराचें कलम. शाहू

सर्व राज्यास अधिकारी, आम्ही करितों तरी त्यांचेसाठींच आहे.' ( खं. १५-२८९ ).

राज्यपदाची व्यवस्था लागल्यावर दुसरा प्रश्न पेशवाईपदाचा. हें पद मूळपासून पिंगळे यांजकडे चालत आलें होतें. निळो मोरेश्वर पेशवेपदावर असून त्यानें जिंजीकडील व्यवस्था चांगली ठेविली. जिंजीमुळें राज्याचा बचाव झाला, आणि जिंजीप्रांत राखण्याचें जबरदस्त काम निळोपंतानें चांगलेंच बजाविलें. सबब पेशवेपद त्याजकडेच ठेविलें. ह्या व्यवस्थेमुळें प्रल्हादपंताची योजना काय करावी, हा मोठा विचार पडला. 'प्रल्हादपंत शहाणे व कर्ते, सर्व मसलतीचे मूळपासून आधारस्तंभ, अष्टप्रधानांतील पदें ज्यांचीं त्यांनीं येऊन स्वीकारल्यामुळें, ह्यांस देण्याजोगें शिल्लक नाहीं. तेव्हां हे केवळ आपली प्रतिमाच असें समजून, 'प्रतिनिधि' असें नवीन पद योजून त्याजवर प्रल्हादपंताची योजना केली.'(सन १६९२). प्रतिनिधि हें पद वास्तविक राजाचेच बरोबरीनें पराक्रमी अशा पुरुषास द्यावयाचें, ( चिटणीसकृत थोरले राजारामाचें चरित्र, पृ. ३२), परंतु तसा पुरुष हल्लीं कोणी नसल्यामुळें तें प्रल्हादपंतास देण्यांत आलें. ह्या प्रतिनिधीचा अधिकार सर्व प्रधानांवर चालावयाचा असून, त्याची नेमणूकही सर्वांत ज्यास्त म्ह. पंधराहजार होन होती. राजपत्रावर प्रधानाचे उजवे बाजूस प्रतिनिधीची मुद्रा व्हावी, असें ठरलें होतें. प्रतिनिधिपदाची ही पूर्वपीठिका पुढील संदर्भासाठीं ध्यानांत ठेविली पाहिजे.

दुसरें महत्त्वाचें पद सेनापतीचें. तें पन्हाळगड मुक्कामीं गोमाजी नायकाचा मुलगा महादजी नाईक पानसंबळ यास दिलेलें होतें. खंडेराव असेंही याचें नांव आढळतें. पानसंबळ हा पहिल्या महाराजांपासून अनुभवलेला व जिव्हाळ्याचा गृहस्थ होता; तो ह्याच सुमारास महाराष्ट्रांत मरण पावल्याचें वर्तमान आलें. तेव्हां सेनापतिपद संताजी घोरपडे यास राजारामानें जिंजी मुक्कामीं सन १६९१त दिलें. सन १६९५च्या ज्येष्ठांतलें म्हणजे जूनचें एक पत्र खं. १५ त छापलें आहे, ( ले. ४५ ), त्यांत 'संताजी घोरपडे सेनापति' असा उल्लेख आहे. त्यानंतर ले. ४७ चें पत्र सन १६९६ च्या ऑक्टोबरांतलें असून 'धनाजीजाधव सेनापति' असा त्याजवर शिक्का आहे. तेव्हां ह्या दोन काळांच्या दरम्यान संताजीचें सेनापति पद गेलें हें उघड आहे.

अमात्यपद प्रथम रामचंद्र नीलकंठ याजकडे होतें. जनार्दन रघुनाथ हणमंते हा सांप्रत कर्नाटकांत बहुत उपयोगी पडला होता. इकडे महाराष्ट्रांत सर्व कारभाराचें जोखीम एकट्या रामचंद्रपंतावर होतें. या दोघांची भीड अमात्यपदाविषयीं सारखीच पडली, तेव्हां राजारामानें जनार्दनपंतास अमात्य करून रामचंद्र नीलकंठ यास 'हुकुमतपन्हा' (हुकूम चालविणारा) असा नवीन किताब दिला. रामचंद्रपंताकडून जे हुकूम येतील, ते छत्रपतीनें मोडूं नयेत, अशी या पदाची योग्यता होती. अष्टप्रधानांप्रमाणें रामचंद्रपंतासही सरंजाम देऊन विशाळगड मुक्कामीं वस्त्रें पाठवून दिलीं.

शंकराजी मल्हार नरगुंदकर याजला राजारामानें सचिवपद दिलें. तें पूर्वी अण्णाजी दत्तो याजकडे होतें. पंडितरावाच्या कामावर रघुनाथ पंडित व त्याचा मुलगा मोरेश्वर हे पूर्वी होते. ते जिंजीस गेले नाहींत. सबब तें पद श्रीकराचार्य कालगांवकर यास दिलें. दत्तो त्रिमल मंत्री याचा काल झाला होता. म्हणून मंत्रिपद शामजीराव पिंडे ( रामचंद्र त्रिंबक पुंडे ग्रँ. ड. ) यास देण्यांत आलें. सुमंतपद महादाजी गदाधर याजला देण्यांत आलें. ग्रँट डफ म्हणतो, निराजी रावजी हा न्यायाधीश झाला. पण हा गृहस्थ म्ह० प्रल्हाद निराजीचा बाप पूर्वीच मरण पावला होता.

लोकोत्तेजन व जहागिरी.—येणेंप्रमाणें राजारामानें संपूर्ण राज्याधिकार स्वीकारिले, ही गोष्ट जाहीर करण्याकरितां महाराष्ट्रांतील सर्व मोठमोठ्या लोकांस बक्षिसें, पोशाख, पत्रें वगैरे पाठविण्यांत आलीं. तसेंच सर्व लोकांस उत्तेजन देण्यासाठीं इनामें, जहागिरी, बक्षिसें, वगैरे सढळ हातानें देण्याचा त्यानें परिपाठ घातला. अशा इनामांतील बराच मुलूख मोगलांच्या ताब्यांत होता, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. कारण, अशा प्रकारें सनद मिळालेली जहागीर आपल्या कबजांत घेण्याकरितां जो तो मोगलांचे मुलुखांत शिरूं लागला. ह्या कृत्यांच्या योगानें राजारामाची कीर्ति फार पसरली. त्याच्या कर्तृत्वाबद्दल लोकांस अभिमान वाटूं लागला. चहूंकडे लोक त्याचीं कामें उठविण्यास तत्पर झाले व जिंजीसही मोठा जमाव झाला. 'लोकांस तैनाता पूर्वील धारेप्रमाणें सरंजाम गांव लावून दिले; सर्व प्रधान, सरकारकून व सरदार लोक यांस भाग्यवान् केलें; जे जे गेले त्यांस त्यांचीं पूर्वील पदें ज्यांचीं त्यांजकडे स्थापून, ज्यांची जसी योग्यता त्यांस तसे वाढवून, पहिल्या महाराजां-

पेक्षांही अधिक कृपा करूं लागले. मातबर सरदार व सरकारकून प्रधान यांचे विचाराखेरीज व मसलतीखेरीज तिळमात्र कार्य करूं नये. दुर्व्यसन व नीचांचा सहवास न करितां, दुर्व्यसनी यांचा बहुत तिरस्कार; असें करून सर्वांस बहुत प्रियकर असें राज्य पूर्वमर्यादेप्रमाणें महाराजांनीं घारे घालून दिल्याप्रमाणें चालूं लागलें.' अष्टप्रधानांशिवाय आणखी कर्ती माणसें पुष्कळ निपजलीं, त्यांचाही राजारामानें योग्य सन्मान केला. 'परसोजी भोसले यास, बहुत कर्ते मर्द जाणून, सेनासाहेबसुभा असें पद व सेनापतीप्रमाणें सरंजाम देऊन; गोंडवण, वऱ्हाड वगैरे प्रांतांत अम्मल त्यांनीं बसविला तो प्रांत त्याजकडे सोपविला. परसोजी हा नागपुरकर भोसल्यांचा पूर्वज होय. राजाराम परत महाराष्ट्रांत आल्यावर परसोजी राजारामास येऊन मिळाला, तेव्हां वऱ्हाडांतील चौथाई व सरदेशमुखीचें काम राजारामानें त्याजकडेसच ठेविलें. सिधोजीराव निंबाळकर यांनीं गोदावरीच्या तीरीं अंमल वसविला, तो सुभा व 'सर लष्कर' हें पद त्यांजला दिलें.' हें पद पूर्वी धनाजी जाधव यास दिलेलें असावें, कारण खं. १५-४१ त धनाजीस 'सर लष्कर' म्हटलेलें आहे. जयसिंगराव ही दुसरी पदवी धनाजीस दिलेली आढळते. खंडेराव दाभाडे यांस सेनाधुरंधर हें पद देऊन, गुजराथ, बागलाण, वगैरे प्रांतांत ठेविलें. खंडो बल्लाळ याजकडे चिटणिसी कायम केली. निळो बल्लाळ यास स्वतःच्या नाटकशाळेच्या पुत्र कर्णराज याजकडील कारभार दिला. याशिवाय आणखी पुष्कळ सरदार प्रसिद्धीस आले, त्यांचीं नांवें यथास्थळीं देण्यांत येतील. हे किताब व सनदा यांचा त्या लोकांस तत्क्षणीं जरी फायदा झाला नाहीं, तरी त्या योगानें सर्व देशभर मराठ्यांचा अंमल बसविण्याचें काम जारीनें सुरू झालें. प्रत्येक महाराष्ट्रीयाच्या अंगीं विलक्षण आवेश उत्पन्न होऊन तो स्वदेशसंरक्षणार्थ प्राण देण्यासही तयार झाला.

राजाराम जिंजीस येण्यास निघाला, त्या वेळचें म्ह० सन १६९० एप्रिलचें एक पत्र राजारामाच्या हुकमावरून खंडो बल्लाळ चिटणीस यानें लिहिलेलें; खंड १५ ले ३४७ व २८२ येथें छापलें आहे. राजाराम आपल्या लोकांस कोणत्या प्रकारें उत्तेजन देत होता, याची कल्पना या पत्रावरून चांगली होणारी असल्यामुळें त्याचा उतारा येथें देतों.—

'रा. बाजी सर्जाराऊ' जेधे देशमुख, यांस राजाज्ञा. अभय दिल्हें ऐसीजे. तुम्ही मा। रत्नोजी शिंदे व शंकराजी ढगे याजबरोबरी किती एक-निष्ठपणाच्या गोष्टी सांगून पाठविल्या; सांगितल्याप्रमाणें विदित झाल्या. त्यास हें महाराष्ट्रराज्य आहे. तुम्ही या राज्याची पोटतिडीक धरितां; तरी ते प्रांतें तितकें राजकारणें आहेत. चाळणा करून आपण जमाव करून सावध राहोन, स्वामिकार्य दृष्टीस पडेल तें मनास आणून हस्तगत करून ठेवणें, हुजूर लेहून पाठविणें. तेणेंप्रमाणें हुजरून विन्हे केली जाईल. या प्रांतीं वर्तमान तर, राजश्री छत्रपति स्वामी स्वारी करून कर्नाटक प्रांतीं गेले. यावरी तिकडे जमात्र लष्कर चाळीस हजार व हशम एक लाख पंचवीस हजार जमाव जाहला आहे. पुढेंही आणखी जमाव होतच आहे. ते प्रांतीचे कुल पुंड पाळेगार तमाम येऊन भेटले आहेती. जमेती पोख्त जाली आहे. पुढें तूर्त राजश्री केसो त्रिमल या प्रांतीं रवाना केले आहेती. त्यांबरोबर संगीनस्वार पंधरा हजार व हशम पंचवीस हजार देऊन रवाना केले आहेत. तेही कोपल प्रांतीं तुंगभद्रेच्या तीरास आले आहेत. खजानाही एक लाख होन यांबरोबर आहे. त्यांस आणावयास राजश्री धनाजी जाधव, राजश्री संताजी घोरपडे, सेनापंचसाहस्री, पाठविले आहेत. तेही आठ पंधरा दिवशीं येतील. ते आलियावरी तो जमाव हुजूरचा जमाव ऐसें करून पाठवूं. तरी हें पत्र तुम्हास सादर केलें असे. तेणें प्रमाणें जमावानिशीं सावध असणें. त्या प्रांतें आलियावरी तुमचीही सरंजामी, रत्नोजी शिंदे, व शंकराजी ढगे यांहीं रदबदली केली त्याप्रॉ। चालवूं. * * * सदरहू प्रॉ।, हजार होन तैनाती व गांव इसाफती व मोकासे मिळून सहा गांव, कार्यभाग जालीया देऊं. तरी तुम्ही आपली खातरनिशा राखोन, स्वामीच्या पायांशीं एकनिष्ठता करून, स्वामिकार्य साध्य होय ते गोष्ट करणें. गानिमांचा हिसाब काय आहे? तुम्ही लोक जेव्हां मनावरी धरितां, तेव्हां गनीम तो काय आहे? गनीमसा तुम्हीं लोकीं केला आहे. ते तुम्हीच लोक या राज्याची पोटतिडीक धरितां, तेव्हां औरंगजेबाची हिसाब धरीत नाहीं. ऐसें बरें समजून लिहिल्याप्रमाणें वर्तणूक करणें. औरंगजेबानें महाराष्ट्र लोक आहेती त्यांस मुसलमान करावें, ऐसें केलें आहे. त्या प्रॉ। मुसलमान केले रा। नेतोजी व साबाजी घाटगे

व जानोजी राजे; व कित्येक ब्राह्मणही या प्रांतीचे बाटविले. दुसरे मतलब केले आहेत. तिकडून तमाम मराठे लोक होते ते आपल्या जमावनशीं आम्हांकडे येताती. हल्लीं राजश्री हणमंतराऊ निंबाळकर व सटवाजी निंबाळकर व माने व सरदार आले आहेती. दुसरेही कित्येक येताती. असें गनीमाचें लष्कर आटोन हुजूर जमाव होत आहे. ईश्वर करितो तरी फत्तेच आहे. लिहिल्याप्रमाणें हिंमती धरणें.' हें पत्र खंडो बल्लाळाच्या हातचें आहे. ह्यावरून त्या वेळचे प्रमुख लोक स्वराष्ट्राकरितां कसकशी खटपट करीत होते, याचें अनुमान करितां येतें.

८. राजारामाचें प्रोत्साहन व जहागिरींची पद्धत.—लोकांचे अपराध पोटांत घालून त्यांचीं उत्पन्नें चालविणें; पूर्वीं चाललेलीं लोकांचीं वतनें दुसऱ्यांनीं हस्तगत केलीं असल्यास, तीं ज्यांचीं त्यांस परत देवविणें; नवीन पराक्रम करणारांची योग्य बूज करणें; जमिनींची आबादानी करणें; लोकांस दिलदिलासा देऊन त्यांजकडून कामें घेणें, आणि त्यांच्या तक्रारींची लगेच दाद घेणें; ह्या गोष्टी राजाराम किती तत्परतेनें करी, तें रा. राजवाडे यांनीं प्रसिद्ध केलेल्या कागदपत्रांवरून चांगलें कळून येतें.

स. १६८९ जानेवारींचें खालील पत्र पाहण्यालायक आहे. मसूरचा देशमुख सुलतानजी जगदाळे औरंगजेबास जाऊन मिळाला, म्हणून साताऱ्याचे सुभेदारानें त्याचें वतन जप्त केलें. तें जगदाळ्यांस परत देण्याविषयीं राजाराम लिहितोः—

' याणें औरंगजेबास भेटोन त्याजकडून आपलें वतन मसूरच्या देशमुखीचें फर्मान करून घेतलें, म्हणून याजवरी दोष ठेवावा तरी, वतनाचा मामला म्हणून, जी कारकीर्द झाली त्या कारकिर्दीचे कागदपत्र करून ( लोक ) घेतात, ते रीतीनें याणेंही फर्मान घेतलें. एशियास हा स्वामीच्या पायापाशीं आला, या करितां, स्वामींनीं याजला, मोगलांस भेटला तो अन्याय क्षमा करून, वतन मुक्रर करून दिलें असे. तुम्ही याजवर कांहीं दोष न ठेवणें. आणि याचें चालवीत जाणें. याच्या हातें स्वामिसेवा घ्यावयाची ते घेत जाणें. याच्या वतनास इतक्याउपर खलेल न करणें. याचें पूर्वापार फार दिवसांचें चाललेलें आहे.' ( रा. १५–२२ ).

ओसाड पडलेला मुलूख आबाद करण्यासाठीं प्रयत्न करण्यांत आले. त्याचा एक नमुना. हें कानदखोऱ्यांतील हवालदारास सन १६९० च्या

ऑक्टोबरचें मावळच्या सुभेदाराचें पत्र आहे, (खं. १६-२८). 'माहादाजी सामराज सुभेदार व कारकून महालानिहाय प्रांत मावळ, नमस्कार. मोगलांचे धामधूम आपल्या राज्यांत आज तीस वरसें होत आहे. यामुळें मुलूक वैरान जाला. साल गुदस्ता मोगलांस रायगड कबज जाला. मुलकांत मोगलाईचा अमल चालिला. हालीं श्रीकृपेनें आपल्या राज्याचा मामला थाटत चालिला. ऐसियासी देशमुख व देशकुळकर्णी व मोकदमे त॥ म॥ सुभां एऊन अर्ज केला कीं, आपण वतनदार राजश्री साहेबांच्या पायांसीं एकानिष्ठ आहों. राजश्री कैलासवासी स्वामींचे वेळेस आपलीं वतनें अनामत करून हकाच्या मोईनी करून देत असत. सांप्रत गनीमाचे धामधुमेकरितां व दुकाळाकारितां रयती गेली, मेली. रुईरुई राहिली. त्यांस खावयास व वाहावयासी नाहीं. एजातीचा रयतीचा विचार जाला आहे. रयतीचा बहुत वजा दिलासा करून, कीर्दी मामुरी करऊन, साहेबांच्या किल्ययाकोटांची मदती करावी लागते. तरी साहेबीं आम्हा वतनदारांवरी कृपादृष्टीनें पाहोन, आमचीं वतनें, इनामती व इसाफती हकलाजिमे जे आहेत, ते आमचे दुमाला केली पाहिजे, म्हणून अर्ज केला. त्यावरून हकीकत मनास आणून पाहतां, वतनदारांचीं वतनें वतनदारांच्या दुमाला केल्याविरहीन पोटतिडीक लागोन मुलूक मामूर होत नाहीं, व मुलखाचा जफ्त रफ्त होत नाहीं, ऐसें कळों आलें. त्यावरून देशमुख व देशकुळकर्णी व मोकदम व बाजे मिरासदार यांचीं वतनें व इनामती व इसापती व हकलाजिमे, इनामतीची सेतें, सरिया याची याचे दुमाला केली असेती. तरी तुम्ही सदरहू लिहिल्याप्रमाणें वर्तणूक करणें. तालीक लेहून घेऊन असल परतोन याजपासीं देणें. जाणिजे. छ १३ मोहरम. मोर्तब सुद.'

सन १६९० त बाजी सर्जेराव जेधे देशमुख यास राजारामाची राजाज्ञा (रा. १५-३४९) 'ऐसी जे. नाईकजी जेधे यांनीं हुजूर येऊन विदित केलें कीं, 'आपल्या वतनाच्या हकाची मुकरता दिवाणांतून करून दिली तेणेंकरून आपली हैराणगी जाहली. अन्नवस्त्राची विपत्ति जाहली. औरंगजेबानें स्वामीच्या राज्यावरी चाल केली स्वामी कर्नाटकप्रांतीं गेले. आणि वतनदार लोक एकनिष्ठ सेवा करून दाखवावी म्हणून किल्ले विचित्रगड गनिमांपासून घेतला. देश सोडविला. पुढेंही जमाव करून गडकोट व

देश गनिमांपासून घेऊं. परंतु स्वामींनीं कृपालु होऊन पूर्वीचे हक्क चालविले पाहिजेत, म्हणून विदित केलें. त्यावरून हक व इनाम गांव तुम्हांस देवविले असत. तर्फ मजकूरचे गांव लावणी करून दस्त आकार होत जाईल त्याप्रमाणें हक्काची मोईन बसवून घेत जाणें. जाणिजे.'

सन १६९१ त रोहिडखोऱ्यांतील तमाम लोकांस खालील आज्ञा केली, (रा.१५–३४९). 'वतनदारांचीं वतनें पहिलेप्रमाणें चालविण्याची आज्ञा अभयपत्र दिलें पाहिजे, म्हणून विदित केलें. तरी तुम्ही स्वामीचे पायांशीं एकनिष्ठ आहां, यावरून स्वामी तुम्हांवर संतोषी आहेत. त्या प्रांतींच्या राज्याच्या कार्यभागास स्वामींनीं राजेश्री रामचंद्र पंडित अमात्य व शंकराजी पंडित सचिव ठेविले आहेत, त्यांवर मुक्त्यार आहे. त्यांहीं तुमचें वर्तमान मनास आणून वतनाचा निर्वाह करून सनदा दिघल्या असतील, त्या स्वामीच्याच आहेती. तेणेंप्रमाणें स्वामी चालवितील. आपलें समाधान असों देणें. पुढें स्वामी त्या प्रांतीं येतील तेव्हां तुमचें ऊर्जित करतील. अभय असे. जाणिजे.'

अशाच मासल्यांचीं अनेक पत्रें राजारामानें कर्नाटकांतून महाराष्ट्रांतील हरएक प्रकारच्या लोकांस लिहिलेलीं प्रसिद्ध आहेत. तीं अत्यंत रसभरित व राष्ट्रतेज उद्दीपित करणारीं आहेत. त्या सर्वांचे उतारे घेणें शक्य नाहीं. दूर राहून सुद्धां हरएक बाबतीची साह्यता राजाराम दक्षतेनें करीत होता. हरामखोरांस शासन करणें, लोकांची दाद घेणें, आणि स्वदेशाची कामागिरी करण्यास लोकांस धीर देणें, हीं कामें तो अव्याहत करीत होता. आपल्या अधिकाऱ्यांची अरेरावी तो बिलकुल चालूं देत नसे. वास्तविक हें राज्य शाहूचें ही भावना त्याच्या मनांत किती जागृत होती, हें वर एका पत्रांत आलेंच आहे. खालील पत्रावरून त्याची धूर्तता व्यक्त होते. हें पत्र सन १६९१त शंकराजी नारायण सचिव यास लिहिलेलें आहे. (खं॰ १६–३५). 'प्रयागजी दिनकर हतनोलीकर याचा कबिला (मुलें माणसें) तुम्हीं दस्त करून (पकडून) आणिला. त्याउपरी तोही कौल घेऊन तुम्हांकडे आला. त्यास तुम्ही चाळीस हजार रुपये दंड बांधला. कबिला अटकेमधें ठेविला. हें वर्तमान पहिलें विदित जाहलें. सांप्रत सर्जेराव देशमुख हुजुरां आले त्यांनीं त्याविशीं विनंति केली कीं 'मिरासदार आहे, त्याचे हातीं स्वामिकार्य विशेष होणार. तरी त्यास जामीन घेऊन मोकळें

करावें, आणि कार्यभाग सांगावा म्हणून. तरी दिनकरराव मिरासदार व कार्याचा आहे, त्यास जामीन मख्तसर ( वजनदार ) मराठे लोक व देशमुख घेऊन त्याचा कबिला आपले कबजांत हरएक जागीं ठेवून त्यास सोडणें, आणि त्याचे हातीं स्वामिकार्य घेत जाणें.'

सचिव शंकराजी नारायण यानें दादाजी नरस प्रभूचें वतन खालसा केलें तें परत देण्याबद्दल राजारामाचा सक्त हुकूम. ( रा. १५-२८६ ). ' तुम्ही प्रभूवर बलात्कार करून घरांतून कागद नेले, त्यास हल्लीं दादाजी प्रभु हुजूर किल्ले रांगण्याचे मुकामीं चंदीस येण्याबद्दल आले, तों स्वामी देशीं येतां भेट घेतली. सर्व कैफियत कळविली. त्यास तेच वेळीं तुम्हांस पत्र लिहिलें कीं, हें वतन ज्याच्याचें नाहीं. असा लेख जमादारास येथून पाठविला असतां तुम्ही गैरवाजवी केलें आहे. हें वतन तुम्ही जेधे व लोहकर मिळोन नाहक घेतलें. यांचे चिरंजीव कृष्णाजी प्रभु अशा अडचणीचे प्रसंगीं, स्वामींस संकटसमयीं, बादशहानीं चिरंजीव व कबिले नेले त्यांजपाशीं चाकरीवर हजर असतां, मागें त्याचें वतन दरोबस्त घेतां, हें तुम्हांस उचित एकंदर नाहीं. तरी याउपरी, यांचे वतनाचे कागद-पत्र नेले त्यासुद्धां परत देऊन, त्यांचें वतन त्यांजकडे चालत आल्याप्रमाणें चालवणें. आणि खासास्वारी तिकडे येतांच येऊन भेटणें. यांनीं कै. थोरले स्वामीपाशीं फार शर्थीची चाकरी हरवख्त हुजूर राहून धारेकऱ्यांत मर्दुमी मोठे धाडसें, जिवाची परवा न धरितां, केली. त्यांचें वतन तुम्हांस जेधे यांस देण्यास अधिकार नाहीं, व तुम्ही करून घेण्यास अधिकारच नाहीं. पेशजी व हल्लीं या जातीनें फार मर्दुम्या करून राज्य मिळविलें, स्वामीकारितां खराब झाले व मारले गेले. सबब हें वतन परत देणें. मावळ मजकुरीं स्वारी येण्याचे पूर्वीं वतन न दिलें हा बोभाटा आल्यास, तुमचे अबरूस व पदास धक्का येईल, असें स्वामीस भासत आहे; व पुढें नाना प्रकारच्या अडचणी तुम्हांस अशा करणीच्या येतील. कारण चिरंजीव ( शाहू ) कालें करून तरी श्री देशीं आणील, तेव्हां संकटीं जीं माणसें उपयोगी पडलीं, त्यांच्या तसनसी आम्हीं करविल्या; हे इकडे यावे, त्यांचे चित्तीं द्वेष यावा, व राज्यकर्त्यांस इनसाफ पाहणें जरूर, त्यास हें तरी अविचाराचें कलम. भलाई जाली ती सारी आमची एकीकडे जाऊन, अशी करणी तुम्हीं केली यांत

स्वामिद्रोहाचेंच करणें. ते ( शाहू ) मुख्य सर्व राज्यास अधिकारी. आम्ही करितों तरी त्यांचे सार्ठांच आहे. प्रसंगास सर्व लोकांस तिकडेस पाहणें येईल व वागतील, हें कारण ईश्वरींच नेमिलें आहे. उगीच भलते भरीं न भरणें. पुढें ऊर्जित होय तें करणें. हें न केल्यास केले कामाचीं फळें ज्याचे ते भरतील अशी श्रींची इच्छाच असली तरी, तुह्मी तरी कां समजाल ! तरी नीट चालीनें वागणें, म्हणजे पुढें सर्वोपरी ऊर्जितार्चेच कारण. जाणिजे.' शेवटचीं कांहीं वाक्यें विशेष स्मरणीय आहेत. याप्रमाणें प्रभूंनीं आपल्या वतनांबद्दल अनेक तक्रारी केल्या; परंतु त्यांचीं वतनें सचिवांकडून त्यांस मिळाल्याचें दिसत नाहीं. ' दादाजी प्रभु म्हातारपणीं तुह्मांजवळी आले आहेत, त्यांच्या सांभाळास अंतराय न करणें,' असें मानसिंग मोरे मताजी जेधे देशमुखास लिहितो, ( खं. १५–३२१ ). तसेंच ' तुमचेविशीं मताजी सर्जाराव यास लिहिलें आहे. कृष्णाजी प्रभु आम्हापाशीं आहेत. राजश्रीचें दर्शन जाहल्या उपरी तुमच्या साह्यतेचा, जो विचार असेल तो केला जाईल. समाधान असों देणें ' (३२२). असें दादाजीप्रभूस मानसिंग मोरे लिहितो. वरील दोनही उद्गार शाहूच्या वेळचे आहेत. दादाजी प्रभूच्या राजनिष्ठ कुटुंबानें स्वराष्ट्र-सेवेंत सर्वस्वाचा नाश करून घेतला, तसेंच त्या वेळचे कामगार आपमतलबाकडेच पाहत, दुसऱ्यांच्या कष्टांकडे पाहत नसत, असें या पत्रव्यवहारांत दिसून येतें.

जहागिरी न देण्याविषयीं शिवाजीचा एवढा कटाक्ष होता, तरी ती पद्धत मोडून लोकांस प्रोत्साहन देण्याकरितां राजारामाला ही पद्धत कां स्वीकारावी लागली, त्याचें मूळ वरील कागदांत आहे. शिवाय या पद्धतीस राजारामाच्या नेभळ्या स्वभावानें कशी पुष्टि मिळाली, त्याचें विवेचन पुढें योग्यतेच्या कलमांत केलें आहे. संभाजीस पकडल्याबरोबर बादशहाच्या फौजांचा संचार सर्व महाराष्ट्रांत होऊं लागला, तेव्हां मराठी राज्य असें कांहीं राहिलेंच नाहीं. अशा आपत्प्रसंगीं पाहिजे त्यानें मोगलांवर हल्ले करावे; त्यांत जो मुलूख हस्तगत होईल, तो पराक्रम करणारास जहागीर म्हणून दिला जाईल, असा पुकारा करण्यांत आला. बादशहाच्या बाजूस अनेक मराठे सरदार गेले होते; आणि त्यांस तिकडे बादशहानें वतनें करून दिलीं होतीं. अशा लोकांस परत आपणाकडे आणण्यासाठीं त्यांस कांहीं

तरी ज्यास्त लालूच दाखविणें, निदान बादशहाच्या इतकीं उत्पन्नें आपणांकडे देणें, जरूर पडलें. शिवाय बादशहा इकडची मंडळी फितवीत होता, त्यांस विशेष लालूच देणें अवश्य होतें. कांहीं तरी आशा असल्याशिवाय लोकांनीं तरी एवढी शिकस्त कां करावी! अशा विशिष्ट परिस्थितींत पुढील जहागिरींची पद्धत उत्पन्न झाली.

यावरून हें उघड आहे कीं, राष्ट्रीय भावना म्हणून लोकांच्या मनांत इकडे बहुधा कधींच नव्हती. जो तो स्वार्थाकरितां धडपडत होता. महाराष्ट्रीयांचा हा स्वभावच आहे. लालुची शिवाय ते हालत नाहींत. स्वदेश, स्वराज्य यांचें संरक्षण करणें आपलें कर्तव्य आहे, असें एकाच्याही मनांत येत नव्हतें. मोबदला घेतल्याशिवाय एवढी इसम हालत नव्हता. वरील प्रकारची भावना शिवाजीच्या वेळेस जी काय उत्पन्न झाली असेल, ती लवकरच मावळली. संभाजीच्या वधानेंही लोकांस फारसा द्रव आला नाहीं. राष्ट्रीय भावना त्या वेळीं जागृत होती असें म्हणणारांना, आमची जहागिरींची पद्धत हेंच उत्तर आहे. लोक कर्तव्य करते तर लालुचीची जरूर काय होती, आणि शिवाजीची एवढी विशिष्ट पद्धत मोडावी कां लागती! प्रत्यक्ष ताराबाईचेंच उदाहरण पुढें वरील विधानाच्या सत्यतेस उपयोगी पडेल. राज्यावर ज्यास्त हक्क कोणाचा होता, हा प्रश्न बाजूस ठेविला, तरी ताराबाई राज्यासाठीं, स्वार्थासाठीं, स्वतःच्या महत्त्वासाठीं धडपडत होती. नाहीं तर शाहू सुटून आल्यावरोबर, निदान ताराबाईचा मुलगा मरण पावल्यावर तरी, तिनें सर्व राज्य शाहूच्या हवालीं केलें पाहिजे होतें. कारण स्त्रीनें राज्य करण्याची परंपरा इकडे नव्हती आणि ती मराठमंडळास मान्यही झाली नसती. तूर्त, मराठा तेवढा निःसीम स्वार्थानें किती परिपूर्ण आहे, एवढेंच येथें सांगण्याचा मुद्दा आहे.

९. जिंजीचा वेढा व राजारामाची सुटका (स.१६९१-९८).—जिंजीचा किल्ला मद्रासचे नैर्ऋत्येस ८० मैलांवर आहे. तेथें राजाराम अष्टप्रधानांसह राहून राज्यकारभार पाहत होता. सन १६९१ च्या अखेरीस अगर ९२ चे आरंभीं बादशहानें झुल्फिकारखान नसतजंग यांजकडून किल्ल्यास वेढा घालविला, तो सन १६९८चे जानेवारीपर्यंत चालून, राजाराम किल्ल्यांतून निघून गेल्यावर, किल्ला झुल्फिकारखानाचे हातीं आला. सहा वर्षे मोगल फौज या किल्ल्यापुढें पडून होती. तत्कालीन युद्धकलेंत

निष्णात व शक्तिमान् बादशहा औरंगजेब व त्याच्याच तोडीचा त्याचा सरदार झुल्फिकारखान तो किल्ला काबीज करण्याविषयीं झटत होते. असें असतां सहा वर्षेपर्यंत मराठ्यांनीं त्यांस दाद दिली नाहीं. यावरून त्या किल्ल्याची मजबुदी, किल्ल्यांतील युद्धसामुग्रीची विपुलता, असलीं मान्याची जागा ताब्यांत ठेवण्यांत शिवाजीचें दूरदर्शित्व, व एकंदर मराठ्यांच्या अंगचें युद्धकौशल्य, इत्यादि प्रकार मनांत उभे राहतात. त्यामुळेंच जगांतील इतिहासप्रसिद्ध वेढ्यांत जिंजीच्या ह्या वेढ्याची गणना झाली पाहिजे. तत्संबंधीं कची हकीकत उपलब्ध होईल, तर मराठ्यांच्या इतिहासांत चांगली भर पडेल. हा किल्ला अनेक डोंगर साधून बांधिलेला आहे. ह्यांपैकीं दोन तर फार उंच आहेत. एक एक मोगल सरदारानें एक एक डोंगर वांटून घेतला. सुरुंग लावणें व तोफा चढविणें इत्यादि सर्व उपाय शत्रूंनीं करून पाहिले. आंतील लोक डोळ्यांत तेल घालून आपला बचाव करीत होते. वेढा घालणाऱ्यांस मुख्य अडचण ही होती कीं, आजूबाजूचे जमीनदार व बाहेर असलेले मराठे सरदार मोगल फौजेसभोंवती घिरट्या घालून त्यांस धान्य व सामग्री मिळूं देत नसत. ते अकस्मात् येऊन एकदम छापा घालीत, त्यायोगें वेढा घालणारांची हिंमत खचत असे.

आरंभींच झुल्फिकारखानाचे मदतीस बादशहानें बुंदेला सरदार दलपतराय यास पाठविलें, आणि पुढें सन १६९३ त झुल्फिकारखानास मदत करण्याकरितां बादशहानें आपला मुलगा कामबक्ष, व झुल्फिकारखानाचा बाप आसदखान वजीर, यांस जिंजीस पाठविलें. ते येऊन दाखल झाल्यावर तिघांनीं मिळून सन १६९४ त वेढ्याचें काम इतकें जोरानें चालविलें, कीं मराठ्यांस बरीच दहशत पडली. परंतु मोगल सरदारांतील वैमनस्यांमुळें मराठ्यांचा फायदा झाला. त्या प्रांतांतील सर्व मुलकी व लष्करी अधिकार आसदखानाकडे होते. तें कामबक्ष यास सहन होईना; आणि त्याच्या कांहीं दुर्वर्तनाबद्दल दोघां बापलेकांनीं त्या राजपुत्रास ठपका दिला. ह्यामुळें भांडणें विकोपास गेलीं. वेढा आपल्या नांवानें चालावा, अशी राजपुत्राची इच्छा होती. हे कलह मराठ्यांस समजून त्यांचा त्यांनीं फायदा करून घेतला. इतक्यांत बादशहा मरण पावल्याची भूमका उठली. तेव्हां राजपुत्राचे तोंडास पाणी सुटून तो

पुढील विचार करूं लागला. मराठ्यांनी त्याच्याशीं सलोख्याचे विचार चालविले. इतक्यांत संताजी घोरपडे पाठीवर आल्याची बातमी पोंचली. मग काय विचारितां? मोगल फौजेंत एकच गोंधळ उडाला. बादशहास जिंजीची व जिंजीस बादशहाची बातमी मुळींच पोंचेनाशी झाली. मराठे कामबक्षाला लालूच दाखवीतच होते. तेव्हां मराठ्यांचें बोलणें मान्य करून तो राजपुत्र पुढील आशेवर नजर देऊन, त्यांस जाऊन मिळण्याच्या बेतांत होता. बादशहाकडून कांहींच हुकूम येईना, तेव्हां दोघां खानांनीं प्रसंगावर नजर देऊन राजपुत्रास एकदम कैद केलें. इतक्यांत संताजी पाठीवर आल्यामुळें मोगल सरदार पळूं लागले, आणि कांहीं दिवस वेढा बंद पडला. कित्येकांचे मतें दोघां खानांनीं मराठ्यांचे लालुचीस भुलून वेढा उठविला.

राजपुत्र कैद झाल्यामुळें मोगल फौजेंत एकच गोंधळ उडून गेला. प्रत्यक्ष त्याची फौज लढाईवर जाईना. मराठे पाठीवर होतेच. त्यांनीं एकदम येऊन मोगलांस घेरलें. दलपत बुंदेल्याचे शिकस्तीनें या वेळेस झुल्फिकारखानास थोडेंसें तरी धान्य आणावयास सांपडलें; पण तें किती दिवस टिकणार? फिरून दुष्काळ आहे तो आहेच. तह न केल्यास, शिपाई व गारदी यांनीं सोडून जाण्याची धमकी दिली. दलपत बुंदेल्यानें त्यांची पुष्कळ विनवणी केली, पण ते ऐकेनात. तेव्हां आसदखाननें तहाचें बोलणें लाविलें. खान व संताजी यांजमध्यें तात्पुरता तह ठरून मोगलांनीं वांदिवाश येथें निघून जाण्याचें ठरविलें. संताजीस तहाचें बोलणें मान्य होऊन मोगल फौजेनें जिंजीहून कूच केलें. त्यांचीं जनावरें उपासमारीनें इतकीं निःसत्त्व झालीं होतीं, कीं त्यांच्यानें सगळें सामान नेववेना; तेव्हां पुष्कळ सामान त्यांनीं जाळलें, तोफा फोडून टाकिल्या; तथापि बरेंच सामान तेथेंच पडलें, तें मराठ्यांस सांपडलें. बारा कोसांची मजल मारण्यास बादशहाच्या शिपायांस व जनावरांस तीस दिवस लागले. [बुंदेला–स्कॉट वेरिंग, इ.]. आसदखान व संताजी यांजमध्यें तात्पुरता तह होऊन, मोगल फौज बादशहाचा जबाब येईपर्यंत वांदिवाश येथें जाऊन राहिली. ह्या सर्व गोष्टी बादशहास कळून तो रागानें वेडा झाला. त्यानें आसदखान व कामबक्ष यांस आपणाकडे बोलावून घेतलें, आणि झुल्फिकारखान यास जिंजी काबीज करण्याचें काम नेटानें चालविण्याचा

हुकूम केला. आसदखानावर बादशहाची बरीच इतराजी झाली, आणि कामबक्षास कैद केलेलें त्यास आवडलें नाहीं.

सन १६९६ त जिंजी सोडून झुल्फिकारखान दक्षिणेस तंजावरकडे गेला. त्यानें तिकडे मोगलांचे ताब्यांतून गेलेले बरेच किल्ले परत घेतले. ह्या वेळीं झुल्फिकारखानाचा खरा उद्देश काय होता, तें समजत नाहीं. तंजावरच्या शहाजीस जिंकून त्याजकडून त्यानें दंड घेऊन, बादशहाची ताबेदारी कबूल करविली; आणि जिंजीच्या मराठ्यांस मदत करणार नाहीं, असा त्याजकडून करार लिहून घेतला. शहाजीनें तो करार मनापासून लिहून दिला असें नाहीं, नाइलाजानें वरकांतीं लिहून दिला. हा करार 'इ. सं. तंजावरचें घराणें' यांत दिला आहे, (पृ. ५०). खान तंजावरकडे गेला, हें बादशहास आवडलें नाहीं. बादशहाचा हुकूम पोंचतांच तो परत जिंजीस आला खरा; पण मराठ्यांशीं त्याचें आंतून सूत होतें; व मागें पुढें दक्षिण हिंदुस्थानचा कारभार आपण बळकवावा, अशी त्याची महत्त्वाकांक्षा होती, असें डफ म्हणतो. तशांत बादशहाचा वृद्धापकाळ झाला असल्यामुळें, जो तो त्याच्या मरणाची वाट पाहत असून, पुढील उद्देश कसे साधून घ्यावे, या विचारांत होता.

ह्या वेळीं मराठ्यांची चांगली सरशी झालेली होती; असें असतां त्यांनीं मोगल फौजेचा समूळ नाश कां केला नाहीं, हें समजत नाहीं. मोगल अगदीं टेकीस आले असतां, राजारामानें तहाचें बोलणें कां लाविलें, हें गूढ स्कॉट वेरिंग यासही बरोबर समजलेलें नाहीं. तो म्हणतो, ह्या वेळीं मराठ्यांनीं तह मान्य न करितां नेटानें युद्ध चालविलें असतें, तर मोगलांचा साफ फडशा उडाला असता. परंतु ज्या अंतःकलहाग्नींत संताजी घोरपड्यासारख्या अप्रतिम वीराचा पुढें लवकरच घात झाला, त्याचा प्रादुर्भाव ह्या वेळींच झाला असला पाहिजे असें दिसतें. संताजी आंतून शत्रूंस सामील आहे असें राजारामास वाटलें असावें. सर्व मराठे सरदार एकजुटीनें वागते, तर मोगलांस नाहींसें करून टाकण्याची उत्तम संधि या वेळेस खचित आली होती. परंतु राजारामाच्या अंगीं तशी कर्तबगारी नव्हती. सर्व सरदारांस ताब्यांत ठेवून शिवाजीच्या शिस्तीनें उद्योग केला असता, तर बादशहास मराठ्यांनीं साफ जिंकिलें असतें. परंतु मराठे सर-

दारांचा भयंकर स्वार्थ व त्यांची फूट यांच्या योगानें ही एकच संधि फुकट गेली असें नाहीं, तर पुढें स. १७०५ त याही पेक्षां ज्यास्त चांगली संधि येऊन, त्या वेळीं त्यांस बहुतेक हिंदुस्थान जिंकतां आलें असतें. वरील दोन कारणांनीं तोही प्रसंग व्यर्थ गेला; आणि याच कारणांनीं राज्यस्थापनेचा त्यांचा जम कधींच बसला नाहीं. सर्व सरदारांस एका तंत्रानें कामास लावील असा एकच सामर्थ्यवान् पुरुष झाला, तो शिवाजी होय. पुनः तसा पुरुष झाला नाहीं. तयार झालेलें साहित्य वायां गेलें.

सन १६९७ त मराठ्यांत अपायकारक अशा कित्येक महत्त्वाच्या गोष्टी घडून आल्या. जिंजीस झालेला घोटाळा बादशहास कळला, आणि तो मोडून टाकण्याचे तात्कालिक उपाय त्यानें योजिले. जिंजी काबीज करण्याविषयीं त्यानें झुल्फिकारखानास सक्तीचा व दरडावणीचा हुकूम पाठविला. ' हें काम तावडतोब न झाल्यास तुमची मानखंडना होईल,' अशी धमकीही त्यास बादशहानें दिली. मराठ्यांचे बाजूचा अत्यंत धोरणी व शहाणा पुरुष प्रल्हाद निराजी हा वर्ष सहा महिन्यांपूर्वीच मरण पावला होता. प्रल्हादपंत व रामचंद्रपंत यांचा नेहमीं एक विचार असे. प्रल्हाद निराजी जिवंत असेपर्यंत महाराष्ट्र व कर्नाटक ह्या दोनही ठिकाणचे कारभार एकाच धोरणानें चालले होते. पण प्रल्हादपंताचे मृत्यूमुळें राजारामापाशीं तसा सल्लागार कोणी राहिला नाहीं. तेव्हां त्याचे हातून बऱ्याच चुका होऊं लागल्या. धनाजी व संताजी यांचें वांकडें पडलें, त्याचाच परिणाम संताजीचा वध होय. संताजीच्या वधाची हकीकत पुढें निराळी यावयाची आहे. सारांश, संताजीचे मृत्यूनें मराठ्यांचा मोठा आधार तुटला. मराठ्यांत असलेली दुफळी औरंगजेबास माहीत झाली, आणि त्याचा फायदा घेण्यास त्यानें कसूर केली नाहीं. संताजी गेल्यामुळें जिंजी आपल्या हातीं खास आली, असें त्यास वाटलें. रामचंद्रपंताचें व धनाजीचेंही वैर पडेल, असें कित्येकांस वाटलें होतें, पण तसा प्रकार झाला नाहीं. संताजीचा मुलगा राणोजी व पुतण्या सिधोजी हिंदुराव यांनीं स्वतंत्रपणें मोगलांची धूळधाणी आरंभिली. शेवटीं ' जिंजी तुम्ही न घ्याल, तर बादशहा तुमचें काय करील याचा नेम नाहीं, ' अशा-प्रकारचे निरोप झुल्फिकारखानास बादशहाचे दरबारांतील त्याचे स्नेह्यां-

करून येऊं लागले. तेव्हां खान विचारांत पडला. या पुढची त्याची वर्तणूक कशा धोरणावर होती हें सांगतां येणें सोपें नाहीं. ग्रँट डफ् म्हणतो, खानानें किल्ला घेण्याचा आपला निश्चय राजारामास कळविला, आणि त्यानें किल्ल्यांतून पळून जावें, व नंतर आपण किल्ला घ्यावा, अशी स्वतः होऊन खानानें योजना केली. निदान राजाराम पळून जात आहे, हें माहीत असतां त्यास त्यानें प्रतिकार केला नाहीं. पुराव्याच्या अभावीं ह्या आरोपाचा निकाल करितां येत नाहीं. पण मराठ्यांस सवलती देऊन त्यांजपासून खानास कांहीं प्राप्ति होण्याजोगी नव्हती. बादशहाचे पश्चात् दक्षिण हिंदुस्थानांत स्वातंत्र्य धारण करावयाचें त्याचें संधान असेल, तर मात्र मराठ्यांस समूळ नाहींसे करून बादशहाची सत्ता वाढविण्यास तो तयार नसावा. तरी पण मराठ्यांस आपल्या कह्यांत ठेवणें त्यास जरूर होतें. राजाराम पळून जात आहे, ही बातमीच खानास नसावी हें ज्यास्त संभवनीय दिसतें. झुल्फिकारखानाचा स्वभाव एकंदरींत खुनशी किंवा क्रूर नव्हता. येसूबाई व शिवाजी यांना दिलेलें आपलें वचन पाळण्यास त्यानें पुष्कळ खटपट केली होती. तेव्हां राजारामास पकडण्याची खटपट त्यानें जोरानें केली नसेल हें संभवतें. असो. कांहीं असलें तरी जिंजी सोडून महाराष्ट्रांत येण्याविषयीं रामचंद्रपंतानें राजारामास आग्रहपूर्वक लिहिलें, आणि त्याप्रमाणें लवकरच मराटमंडळ परत महाराष्ट्रांत आलें. त्याची गोष्ट अशी.

राजारामाच्या ह्या सुटकेचें बरेंच श्रेय स्वामिभक्त खंडो बल्लाळ चिटणीस यास दिलें पाहिजे. त्याजवर ह्या बेताची सर्व सिद्धता रामचंद्रपंतानें सोंपिली. जिंजी पडून राजाराम पकडला जाईल, तर पुनः मोठें अरिष्ट कोसळेल, असें जाणून रामचंद्रपंतानें जिंजीहून राजारामास आपणाकडे बोलाविलें. जिंजीस वेढा घालणाऱ्या मोगलफौजेंत गणोजी व रामोजी शिर्के हे दोन मराठे सरदार होते. शिर्क्यांची हकीकत मागें पृ. १२८ वर आली आहे. प्रस्तुत ज्यांचा उपयोग राजारामास झाला, त्यांचा मूळ पुरुष वाघोजी शिर्के. वाघोजीचे मुलगे दोन, तानाजी व पिलाजी. पिलाजी हा शृंगारपुरकर सूर्याजीराव सुर्वे याचा जांवई. ह्या पिलाजीची मुलगी जिऊबाई हीच संभाजीची बायको येसूबाई होय. पिलाजीचा मुलगा गणोजी यास-

**शिर्क्यांची वंशावळ.**




थोरल्या शिवाजीची मुलगी राजकुवरबाई दिली होती. हा गणोजी व त्याचा मुलगा पिलाजी हे इतिहासांत प्रसिद्ध आहेत. तानाजीचा मुलगा कान्होजी व कान्होजीचा रामोजी. संभाजीनें उच्छेद केल्यापासून हे शिर्के मोगलांचे ताबेदार बनले. जिंजीच्या वेढ्यांत गणोजी व रामोजी बादशहाच्या तर्फे लढत होते. जिंजीकिल्ल्याच्या नैर्ऋत्येस ह्या दोघांचे मोर्चे होते. त्यांस आपणाकडे वळविण्याच्या हेतूनें खंडो बल्लाळ एक दिवशीं जाऊन भेटला. शिर्के प्रथम त्याचें म्हणणें ऐकेनात. तेव्हां खंडो बल्लाळ म्हणाला, 'या समयास तुम्ही बोलतां हें योग्य नव्हे. तुमचें शिरकाण केलें, तसेंच आमचे तीन पुरुष हत्तीचे पायांखालीं मेले, ते ही गेले. परंतु हिंदूंच्या दौलतीकरितां आम्ही झटत आहों. आणि तुम्ही तों आप्त शरीक ( भागीदार ) आहां. या समयास आपले भाचे महाराज व कबिले काढून द्यावे. तुमची कीर्ति होईल.' या चिटणिसाच्या पोक्त भाषणानें शिर्क्यांचें हृदय द्रवलें आणि आपण मराठे असून, मराठशाहीचा मुख्य पुरुष व आपला आप्त, यास यथाशक्ति मदत करण्यास त्यांच्या चित्तानें ओढ घेतली. पण शिर्क्यांचें दाभोळचें वंशपरंपरागत वतन ह्या वेळीं चिटणिसाकडे चालत होतें, तें आपणास परत मिळावें, असा उद्गार शिर्क्यांनीं काढिला. ते समयीं खंडोबल्लाळानें दाखविलेला स्वार्थत्याग केवळ निरुपम होय. चिटणीस म्हणाला, 'स्वामिकार्याहून वतन व जीवित आम्हांस अधिक नाहीं. सर्व अर्थ आमचे स्वामीचे पाय आहेत. शिर्क्यांचा उपकार ठेवूं नये.' असें म्हणून दाभोळच्या वतनाचीं पत्रें राजश्रीच्या स्वाधीन केलीं. त्याचे बदल्यांत चौल प्रांतीं दुसरें वतन खंडोबास देण्यांत आलें. पुनः शिर्के म्हणाले, 'मोहितेही आप्त, या राजकारणांत त्यांसही घेतलें पाहिजे. यास्तव त्यांस रत्नागिरि तालुक्यांतील कुटरें गांव इनाम करून द्यावा; आणि आम्हांस भोर तालुक्यांत

तीन गांव व रत्नागिरि तालुक्यांत पांचगांव इनाम करून द्यावे.' हें सर्व कबूल करून शिर्के व मोहिते यांस गांवच्या व दाभोळ येथील देशमुखीच्या सनदा चिटणिसानें नेऊन पोंचविल्या. पुढें मोहिते व शिर्के यांनीं, आपल्या आप्तांच्या बायका असें बाह्यतः दाखवून, राजारामास कांहीं मंडळीसह आपल्या गोटांत आणिलें. दुसरे दिवशीं शिकारीच्या निमित्तानें ते बाहेर पडले, व कांहीं कोसांवर धनाजीची फौज होती, तिच्यांत त्यांनीं राजारामास सुरक्षित नेऊन पोंचविलें. वेलोर येथें मानाजी मोरे यास राजाराम जाऊन मिळाला, असें ग्रँटडफ् म्हणतो. येणेंप्रमाणें राजाराम जिंजींतून सुटून महाराष्ट्रांत येऊन दाखल झाला ( डिसेंबर १६९७ ).

राजाराम सुटून गेला, ह्यांत खानाचें कपट दिसत नाहीं. इतके दिवस जिंजी बादशहाच्या ताब्यांत न येण्याचें कारण झुल्फिकारखानाचें कपट, असें म्हणण्यास फारसा आधार नाहीं. मराठ्यांचा जमाव व तडफ अशी कांहीं विलक्षण होती, कीं त्यांपुढें मोगलांचें कांहीं चाललें नाहीं. महाराष्ट्रांत व कर्नाटकांत दोनही ठिकाणीं मराठ्यांचा बेत चांगलाच बसला होता. स्वतः बादशहा जिंजीकडे गेला असता, तर महाराष्ट्रांत पुनः त्याचा प्रवेश झाला नसता. कर्नाटकांतील बादशहाच्या फौजेस मदत होण्याजोगी नव्हती. धान्य, खजिना व फौज जितकें म्हणून बादशहा तिकडे पाठवी, तितकें रस्त्यांत मराठ्यांच्या हातांत पडे. जिंजीच्या किल्ल्यांत सामानाचा सांठा मोठा असल्यामुळें, आणि वेढा घालणाऱ्या फौजेस मराठे बाहेरूनही त्रास देत असल्यामुळें, झुल्फिकारखानाचा नाइलाज झाला. त्यांत कामबक्ष व झुल्फिकारखान यांच्या वैमनस्याची भर पडली. अशा स्थितींत खानानें कसूर केली असें दिसून येत नाहीं. मात्र चार पांच वर्षे लढल्यावर मराठ्यांची बाजूही बरीच खपली; आणि संताजी मरण पावल्यावर जिंजीकडे मोगलांचें प्रयाण निर्वेध झाल्यामुळें, राजारामानें महाराष्ट्रांत येणें जरूर पडलें. ह्या आकस्मिक बनावावरून झुल्फिकारखानावर फितुरीचा आरोप आला. मराठ्यांची सरशी झालेली पाहून त्या सरशीचें कारण मराठ्यांचें युद्धकौशल्य हें कबूल करण्याचें मनांत नसल्यामुळें, खानाची फितुरी हें एक कारण मुसलमान ग्रंथकार यांनीं पुढें आणिलें. दुसरेही असे अनेक प्रसंग आहेत.

सन १६९८ च्या जानेवारींत जिंजीचा किल्ला झुल्फिकारखानानें काबीज केला. तेव्हां राजारामाचा जनानखाना किल्ल्यांतच होता. खानानें त्यांस पकडून आपल्याकडील सरदार शिर्के यांच्या ताब्यांत दिलें. या प्रसंगीं शिर्क्यांनीं खानास सांगितलें, कीं आपल्या जातभाईच्या बायकांची बेअदबी होईल, तर ती आमचीच बेअदबी असें लोक समजतील. हें शिर्क्यांचें म्हणणें खानानें मान्य करून, राजारामाचा जनानखाना त्यांचे स्वाधीन केला. ह्यांत खानानें कपट केलें असें म्हणण्याचें कारण नाहीं. कारण राजाराम सुटून गेल्यावर, बायका पकडून ठेवण्यांत मोठासा मुद्दा नव्हता; आणि त्यामुळें आपणाकडील शिर्के व दुसऱ्या मराठे सरदारांस त्यानें विनाकारण दुखविलें असतें. शिर्क्यांनीं राजारामाच्या बायकांस, वेलोर अरणीच्या रस्त्यानें लवकरच सुरक्षितपणें महाराष्ट्रांत पाठवून दिलें. तथापि मराठ्यांकडील पुष्कळ लोकांस खानानें कैदेंत ठेविलें व कित्येकांस बंडखोर म्हणून ठार मारिलें. ह्या ठार मारिलेल्या मंडळींत, प्रल्हाद निराजींचा मुलगा नारो प्रल्हाद हा होता. जिंजीहून निघालेली सर्व मंडळी, हळूहळू विशाळगडावर येऊन जमली. तिमाजीपंत हणमंते हा शत्रूंच्या हातीं सांपडला होता, तोही सुटून विशाळगडीं दाखल झाला. हा किल्ला सन १६९२ त औरंगजेबानें काबीज केल्यावर, तो फिरून मराठ्यांनीं केव्हां घेतला त्याचा उल्लेख सांपडत नाहीं. राजाराम परत आल्यावर, मोगलांचा बंदोबस्त नसल्यामुळें, विशाळगडचा किल्ला घेण्यास मराठ्यांस प्रयास पडले नाहींत, असें दिसतें. ( भिडेकृत अष्ट. प्र. इ. ).

जिंजीचे वेढ्यासंबंधीं विल्क्सनें केलेलीं कित्येक विधानें येथें नमूद करण्यासारखीं आहेत. जिंजीच्या वेढ्याचें महत्त्व तत्कालीन युरोपियन लोकांस फारच वाटत होतें.. त्याला ग्रीस देशांतील ट्रॉयच्या वेढ्याची उपमा विल्क्सनें दिली आहे. तो म्हणतो, 'वेढा फार दिवस चालण्याचें कारण, झुल्फिकारखानाची लबाडी होय. त्याचे मनांत बादशहाचे मृत्यूनंतर कर्नाटकचें राज्य बळकावण्याचें असल्यामुळें, प्रस्तुतच्या वेढ्यांत त्यानें मराठ्यांशीं गुप्त संधान ठेविलें होतें. दोनही पक्षांनीं नाटकी थाटाचा अवलंब केला होता. मराठ्यांचा राजा राजाराम हा नेहमीं गांजा व अफू खाऊन धुंद असे. त्याच्या सरदारांनीं त्यास पदच्युत करण्याचा घाट घातला होता. परंतु झुल्फिकारखानानें मनापासून लढाई न केल्यामुळें

मराठ्यांस काळजी करण्याचें कारण नव्हतें. झुल्फिकारखानाचे हाताखालीं दाऊदखान (पन्नी?) हा दुय्यम असून तो काम करीत असे. परंतु हल्ल्याची सर्व व्यवस्था झुल्फिकारखानाचे मार्फत मराठ्यांस कळत असल्यामुळें, दाऊदखानाच्या फौजेचा मराठ्यांनीं अनेक वेळां नाश केला. शेवटीं बादशहा रागास आल्यामुळें झुल्फिकारखानानें राजारामास व त्याच्या बायकांस निघून जाण्यास संधि दिली; व दाऊदखानानें किल्ला काबीज केला, (जानेवारी १६९८). परंतु जिंजीची हवा मोगलांस कधींच मानवली नाहीं; म्हणून त्यांस तें ठाणें कायमचें सोडून द्यावें लागलें. तेथून ते अर्काट येथें गलें, त्यामुळें अर्काटचें ठाणें महत्त्वास चढलें (स. १७१७).

१०. संताजीचा खून व त्याची मीमांसा (१६९८).—संताजी घोरपड्याच्या पराक्रमाचें वर्णन वर ठिकठिकाणीं आलेंच आहे. थेट शिवाजीच्या वेळेपासून राजाराम जिंजीहून सुटेपर्यंत या पराक्रमी व स्वराष्ट्राभिमानी पुरुषानें जी देशसेवा केली, व ऐन आणिबाणीच्या अनेक प्रसंगीं जी बाजू संभाळिली, ती केवळ अप्रतिम होय. ह्या पुरुषाच्या एकंदर चरित्राची व विशेषेंकरून त्याच्या हृदयद्रावक मृत्यूची खरी हकीकत प्रसिद्ध होईल, तर अनेक महत्त्वाच्या प्रश्नांचा उलगडा होऊन, मराठ्यांच्या वीररसजनक इतिहासांत पुष्कळ भर पडणार आहे. संताजी हा शिवाजीची अप्रतिम शिस्त आपल्या फौजेंत अगदीं कडकपणानें पाळीत असे. फौजेंत लोकांनीं आपणाबरोबर बायकामुलें कधीं न घेण्याविषयीं त्याची सक्त ताकीद होती. तसेंच लूट करण्याचे वगैरे जे नियम शिवाजीनें ठरविले होते,ते तो सक्तीनें अंमलांत आणी.त्याच्या खास हुकमाशिवाय फौजेंत एक पान सुद्धां हालत नसे, आणि सुतळीचा एक तोडाही उचलण्याची कोणाची छाती होत नसे. अशा प्रकारची संताजीची शिस्त सेनानायकास अगदीं योग्य असून, प्रस्तुत प्रसंगीं तिचा चांगलाच उपयोग झाला. त्याचा त्या वेळचा जोडीदार धनाजी जाधव. तोही संताजीप्रमाणेंच शूर व पराक्रमी होता. परंतु धनाजीची शिस्त फार ढिली होती. संताजीप्रमाणें त्याच्या फौजेंत हुकमत व व्यवस्था नसे. त्याचे लोक स्वैरवर्तन करीत, त्याजवर धनाजीचा दाब नसे. असें असूनही समरांगणांत धनाजीची योग्यता कमी नव्हती. घोडा पाणी पिईनासा झाला तर, 'पाण्यांत धनाजी दिसतो

काय ? ' असा प्रश्न मोगल आपल्या घोड्यांस विचारीत. इतकी धनाजीची जरब शत्रूंस होती.

असें असूनही संताजी व धनाजी यांजमध्यें वर सांगितलेला मोठा फरक होता. त्यामुळें धनाजीचे लोक त्याजवर संतुष्ट असत, तसे संताजीचे नसत. या शिवाय ह्या दोघां प्रमुख सरदारांत बरेच दिवस खासगी चुरस लागलेली होती. प्रल्हाद निराजीनें त्यांचा कलह पुष्कळ दिवस विकोपास जाऊं दिला नाहीं. त्यानें राजारामाची समदृष्टि कायम राखून उभयतांकडून उत्तम प्रकारची कामगिरी करून घेतली. परंतु दुर्दैवानें प्रल्हादपंत मृत्यु पावला; आणि संताजी व धनाजी यांचा कलह फिरून वाढला. राजाराम जिंजीस असतांनाच ह्या भांडणाची परमावधि होत चालली होती. रामचंद्रपंताकडून संताजीचा पाठ पुरावा होत असे; पण राजारामानें पंताच्या म्हणण्याकडे दुर्लक्ष केलें. संताजी हा शत्रूस फितूर आहे अशी आफवा उठली असून, ती राजारामाचे कानावर गेली होती; आणि कांहीं कारणानें असो, राजारामाचें मन संताजीविषयीं बरेंच कलुषित झालें होतें. त्यामुळें संताजीची खरी योग्यता न समजून, राजारामाकडून त्याचा पदोपदीं अपमान होऊं लागला. तशांत औरंगजेबाची कपटविद्या चालू असल्यामुळें त्यानेंही नानायत्न करून, मराठ्यांमधील ही दुफळी वाढविण्यास कमी केलें नाहीं. असा प्रकार चालू असतां, धनाजीच्या काव्यानें संताजीची सर्व फौज त्याजवर बिथरून गेली. अशा स्थितींत एके दिवशीं विजापुरनजीक धनाजीनें संताजीच्या फौजेवर हल्ला केला. त्यांत संताजीची बहुतेक फौज फितूर होऊन धनाजीस मिळाली. (इचलकरंजी—इ०). संताजीच्या कडक शिस्तीमुळें त्याची फौज त्याजवर बिथरली असावी असें दिसतें. धनाजीच्या बाजूचा एक शिलेदार हणमंतराव म्हणून होता, त्यानें दहिगांवनजीक संताजीवर हल्ला केला, तेव्हां त्याची फौज सर्व पळून गेली. अशा स्थितींत जीव बचावण्यासाठीं संताजीस जिव्हाळयाच्या थोड्या लोकांनिशीं समरांगणांतून पळ काढावा लागला. त्याचे मागें धनाजीनें कांहीं फौज पाठलागास पाठविली; आणि आपण कांहीं फौजेनिशीं कर्नाटकांत झुल्फिकारखानाबरोबर लढण्यास गेला. संताजीनें रानोमाळ हिंडून बराच काळ पावेतों आपला पाठलाग करणाऱ्यांस दाद दिली नाहीं. ' संताजी घोरपड्याचे पाठीस फौज

लागून दहा बारा रावतानिशीं घोरपडे म्हसवडास आले. तेथें नागोजी माने याची स्त्री राधाबाई अमृतराव निंबाळकर याची कन्या; घोरपड्यांचें व अमृतरावाचें वांकडें; त्याच्या सुडाबद्दल तिनें कारखाळयाच्या रानांत दबा ठेवून मारामार केली, त्यांत घोरपडे मृत्यु पावले.' ( फलटणच्या निंबाळकरांची हकीकत. )

नागोजी माने म्हसवडकर याचें व संताजीचें खासगी वैर होतें. नागोजीची बायको राधाबाई हिच्या बापास, संताजीनें कांहीं गैरशिस्त वर्तनाबद्दल ठार मारिलें होतें; म्हणून त्यानें संताजीचा पाठलाग फारच कडकपणें चालविला. एके दिवशीं शत्रु दूर राहिले असें समजून, संताजी थकून गेल्यामुळें एकटाच एका ओढ्यावर स्नानासाठीं थांबला. इतक्यांत नागोजीनें त्यास एकाएकीं गांठून ठार मारिलें, व त्याचें डोकें बादशहाकडे आणिलें. त्या वेळीं बादशहाची छावणी जवळच होती. बादशहाला ह्याजबद्दल संतोष होऊन त्यानें नागोजीची वाखाणणी करून, त्याजला कांहीं मनसब दिली. सन १६९४त नागोजी माने बादशहास सोडून, जिंजी येथें राजारामास येऊन मिळाला होता. त्या वेळीं बारा महालांची देशमुखी मान्यांस राजारामानें इनाम करून दिली, त्याची सनद इ. संग्रहांत दिली आहे. संताजीच्या खुनाची हकीकतही त्याच पुस्तकांत दिलेली आहे, (जुन्या ऐ. गोष्टी ). संताजीच्या मृत्यूनें मराठी राष्ट्राची मोठी हानि झाली. त्यांतून वाखाणण्यासारखी गोष्ट एवढीच, कीं संताजीचे मुलगे राणोजी व पिराजी आणि पुतण्या सिधोजी, हे वरील कृत्यामुळें शत्रूस जाऊन मिळाले नाहींत. राष्ट्रसेवा यथाशक्ति बजाविण्याचा क्रम त्यांनीं चालूच ठेविला.

संताजीच्या मृत्यूविषयीं खाफीखानानें थोडी भिन्न हकीकत दिली आहे. 'गाजीउद्दीनखान फिरोजजंग हा विजापुरपासून, चार पांच मजलांवर संताजीचे पाळतीस राहिला होता. त्यास बातमी लागली, कीं संताजी आठ नऊ कोसांवर २५ हजार फौजेनिशीं उतरला आहे; तेव्हां फिरोजजंग विजापुरकडे परत येऊं लागला असतां, त्यास हेरांनीं अशी खबर आणिली कीं, संताजी व धनाजी यांजमध्यें तंटा लागला आहे. संताजी, लहानशा अपराधाबद्दल, लोकांस हत्तींचे पायाखालीं देत असे. अशा कडक वर्तनानें अनेक मराठे सरदार त्याजवर रुष्ट झाले होते. त्यांनीं

धनाजीशीं गुप्त संधान बांधून संताजीस मारण्याचा बेत चालविला. हणमंतराव म्हणून एक संताजीच्या हाताखालचा गृहस्थ होता, त्यानें फितूर होऊन धनाजीच्या फौजेनिशीं संताजीवर हल्ला केला. संताजीच्या इतर सरदारांसही धनाजीनें आपणाकडे वळविलें होतें. संताजीचे बहुतेक लोक धनाजीस मिळाले; कित्येक लढाईत पडले. तेव्हां तो नागोजी माने याचे ताब्यांतील डोंगरी मुलखांत पळून गेला. त्याचे पाठीवर धनाजी जाधव व बादशहाचा सरदार फिरोजजंग हे गेले. नागोजी माने नांवाचा एक सरदार पूर्वी बादशहाचे फौजेंत नोकर असून हल्लीं मराठ्यांकडे होता. कांहीं वर्षांपूर्वी संताजीनें नागोजीचे भावास हत्तीचे पायांखालीं दिलें होतें. तो दंश मनांत धरून व बायकोनें चिथविल्यामुळें चिडून, तो संताजीचे पाठलागास स्वत: गेला. त्यानेंच संताजीचें डोकें कापून बादशहाकडे पाठविलें. हा प्रकार मोठ्या शरमेचा आहे.'

रामचंद्रपंताचा व संताजीचा चांगला घरोबा होता; आणि राजारामाच्या मनांत सेनापतिपद धनाजी जाधवास द्यावयाचें असूनही रामचंद्रपंताच्या आग्रहावरून तें त्यानें संताजीस दिलें. संताजीविषयीं रामचंद्रपंताचें मन पुढें कां कलुषित झालें, त्याचें कारण समजत नाहीं. पण स्वत: जरी तो शूर, कडक व शिस्तवान् होता, तरी दुसऱ्याची हुकमत त्यास सहन होत नसे. आपलाच हेका चालवून मन मानेल तसें वर्तन करण्याचा त्याचा स्वभाव असून, अशा बाबतींत आग्रह सोडून वागण्याची मनमिळाऊ बुद्धि त्याच्यांत नव्हती, असें एकंदर कागदपत्रांवरून सामान्य मत होतें. घोरपड्यांचा हा स्वभाव यापूर्वी व यापुढें बरेच वेळां व्यक्त झालेला आहे. संताजीच्या मृत्यूनंतर हे घोरपडे बहुतेक स्वतंत्रच संचार करीत होते; आणि स्वत:च्याच बळावर जहागिरी व मुलूख संपादन करण्याचा त्यांचा यत्न सारखा चालू होता. पुढें प्रसिद्धीस आलेला मुरारराव घोरपडे (१७०४–१७७६) याचाही स्वभाव असाच दिसतो. वरचेवर संतापून निघून जाणें, वरिष्ठांचे हुकूम अमान्य करणें, अशा स्वभावामुळें, संताजी झुल्फिकारखानास सामील आहे, असा पुष्कळदां संशय येई. त्यामुळें राजारामाचें, रामचंद्रपंताचें व इतर मुत्सद्यांचें मन त्याजविषयीं साशंक होऊं लागलें. वास्तविक तो मोगलांस फितूर मुळींच नव्हता. फितुरी मनांत असती तर त्यास पुष्कळ प्रसंग होते. प्रत्यक्ष त्याच्या वधानंतर

त्याची बंधु वगैरे मंडळी बादशहास सामील झाली असती. पण चंद्रसेन जाधवानें पुढें केले तसे उपक्रम घोरपड्यांनी केले नाहींत. शिवाय हुकमत एकाच्या हातांत व कारभार करणारा दुसरा, असा प्रकार राज्यांत कधींच यशस्वी होत नाहीं. अधिकार राजारामाचे हातांत जिंजीस, आणि त्याचा उपयोग करणार रामचंद्रपंत महाराष्ट्रांत, हा विसंगत प्रकार त्या वेळीं बराच जाचक झाला. सरदार छत्रपतीस वचकत, तितके रामचंद्रपंतास काय म्हणून वचकतील ! पण राजाराम पडला दूर व अधिकार वापरण्यास असमर्थ. शाहूच्या वेळेस बाजीरावाची किंवा सवाई माधवरावाच्या वेळेस कांहीं अंशीं नानाफडणिसाची अशीच स्थिति झाली.

अशा कारणांनीं धनाजी व संताजी यांचा बेबनाव होत गेला. यत्किंचित् वतनांच्या किंवा नेमणुकीच्या बाबतींत सुद्धां हे दोघे विरुद्धपक्ष घेऊन भांडू लागले. राजारामानें एकासारखें केलें, कीं दुसरा रुसे आणि त्यांचे रुसवे काढतां काढतां त्यास पुरेवाट होई. पन्हाळ्यास कागलकर घाटग्यास संताजीनें वेळेवर कुमक पाठविली नाहीं, तो सोंडूरगुत्तीकडे मुलूख जिंकीत राहिला. अशा आणखी आगळिकी झालेल्या रामचंद्रपंताचे कानावर आल्या. तेणेंकरून राजारामानें सेनापतिपद बहुधा १६९५ त त्याजकडून काढून तें धनाजीस दिलें. संताजीनें रामचंद्रपंतास लिहिलेलें दिलसफाईचें एक पत्र ( खंड ८-४७ ) आहे, त्यावरून संताजीचा स्वभाव व्यक्त होतो. 'आम्ही ऐसे सेवक नव्हे, जे स्वामीचें स्मरण न करितां आधीं आपला बहुमान घेऊं. पूर्वीपासून आमचा अंगीकार स्वामींनीं केला, आणि बंधु म्हणविलें, तोच सिद्धी पाविला पाहिजे.' या शब्दांवरून संताजी मोगलांस सामील असावा असें वाटत नाहीं. संताजीची कडक शिस्तच त्याच्या नाशास कारण झाली असें दिसतें. शिवाजीच्या वेळची शिस्त मोडून फौजेंत व सरदारांत स्वैरवर्तन व अव्यवस्था माजत होती, तिला आळा घालणें सेनापतीचें काम होतें. या कामीं राजाराम, धनाजी वगैरेंनीं त्यास पाठबळ दिलें नाहीं; आणि हळू हळू वाढत गेलेला द्वेषाग्नि शेवटीं संताजीच्या नाशास कारण झाला. संताजीच्या खुनांत धनाजीचें अंग नव्हतें. पण संताजी सेनापति असतां त्याशीं वेळीं अवेळीं विरोध करून त्याचा होईल तितका पाडाव करण्याचा धनाजीनें क्रम चालविला होता, याबद्दल त्या वेळच्या कागदपत्रांवरून संशय राहत नाहीं. शिवाजीची राज्यपद्धति

बिघडूं नये, अशी खटपट करणारे फक्त दोनच पुरुष होते, एक रामचंद्रपंत व दुसरा संताजी. संताजीचा अंत झाल्यावर सर्वच प्रकार बिघडत गेला.

११. साताऱ्यास मराठशाहीची संस्थापना ( सन १६९८ ).—जिंजीहून निघाल्यावर रस्त्यानें मोगल फौजांशीं लढत राजाराम विशाळगडीं सुखरूप येऊन पोंचला. मागाहून बायामंडळीही कांहीं दिवसांनीं आली. आपातप्रसंगीं ज्यांनीं स्वतःचे जीव धोक्यांत घालून राज्याचें कल्याण केलें, त्या सर्वांची सर्फराजी पुनः एकवार करण्यांत आली. त्या वेळीं रामचंद्रपंत, परशुरामपंत व शंकराजी नारायण या त्रिवर्गांनीं विनंति केली कीं, 'आजपर्यंत कळलें तसें राज्यरक्षण केलें; आतां स्वामींनीं सांभाळावें.' हें ऐकून राजाराम संतुष्ट होऊन म्हणाला,—'आजवर तुम्हींच राज्य रक्षिलें; पुढेंही तुम्हीच रक्षणार.' इतउत्तर रामचंद्रपंताच्या विचाराशिवाय, राजाराम कांहीं एक करीनासा झाला. त्याचे मदतीस अंताजी मंगाजी वाकनीस व आबाजी निळो पारसनीस यांस दिलें. सातारा येथें नवीन केलेल्या राज्यव्यवस्थेंत या वेळीं बरेच फेरफार झाले. सेनापतिपद धनाजी जाधव याजकडे होतेंच. नीळकंठ मोरेश्वर पिंगळे पेशवेगिरीवर होता. अमात्यपद जिंजी येथें जनार्दनपंत हणमंते याजकडे दिलेलें होतें. पुढें जनार्दनपंत (१६९७ त) वारल्यामुळें तें आतां राजारामानें रामचंद्रपंत याजला दिलें. ह्या अमात्यपदाबद्दल हणमंते व रामचंद्रपंत यांजमध्यें बरेच दिवस चुरस होती. तें अखेरीस ज्याचें त्यास मिळून रामचंद्रपंताचे घराण्यास अमात्य हें आडनांव कायमचें प्राप्त झालें. हे पुढें बावड्यास राहूं लागल्यामुळें, त्यांस बावडेकर असेंही म्हणतात. रिकामें पडलेलें प्रतिनिधिपद तिमाजी रघुनाथ हणमंते यास देऊन, त्याचीही समजूत काढण्यांत आली. पुढें सन १७०१ त ताराबाईनें हें पद हणमंते याजकडून काढून, परशुराम त्रिंबक यास दिलें. राजारामाचे व ताराबाईचे कारकिर्दींत पंडितरावाचें काम श्रीकराचार्य कालगांवकर याजकडे होतें, व सचिवपद शंकराजी मल्हार याजकडे होतें. जिंजीस वेढा पडला असतां, शंकराजी सर्व संगपरित्याग करून दिल्लीस जाऊन राहिला. तेव्हां ती जागा राजारामानें शंकराजी नारायण गांडेकर यास दिली.* आरमाराचा मुख्य सिधोजी गुजर

---

* टीप.—ही व्यवस्था १६९८ त झाली. शंकराजी नारायण 'सचिव' असा उल्लेख स. १६८८च्या कागदांत आहे (सं. १७ ले. १८) तो खरा नाहीं.

मरण पावला, म्हणून ती जागा कान्होजी आंगरे यास राजारामानें दिली. कुलाबा व सुवर्णदुर्ग हीं आरमाराचीं मुख्य ठाणीं झालीं. खंडो बल्लाळ चिटणीस ह्यानें अत्यंत स्वार्थत्याग करून साह्य केल्याबद्दल त्यास चौलप्रांतीं वतन देऊन इनामपत्रें दिलीं. अंताजी मंगाजी वाकनीस व आवजी निळो पारसनीस यांचा बहुमान करून त्यांस रामचंद्रपंताचे निसबतीस देऊन ठेविलें. तसेंच परशुराम त्रिंबक, शंकराजी नारायण, व आटोळे, दाभाडे, बंडगर, पवार, पाटणकर इत्यादि सरदारांचे सन्मान करून, त्यांचे ठिकाणीं ज्यास्त पराक्रम करण्याचा हुरूप आणिला. ह्या प्रसंगीं सर्व सरदार पुढील विचार करण्यासाठीं पुन: एकत्र जमले. याचे-पूर्वीं युद्ध मुख्यत्वें कर्नाटकांत चालत होतें, तें आतां महाराष्ट्रांत आलें. धनाजी जाधव मात्र मराठी प्रदेशाच्या संरक्षणार्थ कर्नाटकांतच होता. सरदारांच्या संमतीनें किल्ले सातारा हें मराठ्यांच्या गादीचें मुख्य ठिकाण राजारामानें केलें. इतउत्तर मराठशाहीच्या अखेरपर्यंत सातारा हीच मराठ्यांची राजधानी होती. रायगडासारखाच सातारा हा त्या वेळीं फक्त किल्ला होता, खालीं शहर मुळींच नव्हतें. पुढें शाहूच्या वेळेस लहानसें गांव वसलें, त्यास शाहूनगर म्हणत. ह्या शहराची वाढ एकुणिसाव्या शतकांतील आहे. एकंदरींत त्या वेळच्या परिस्थितीच्या मानानें सातारा हेंच ठिकाण राज-धानीस लायक होतें असें दिसतें. रायगड कोंकणांत होता. मोगलांच्या युद्धाचा कटाक्ष आतां कोंकणांत फारसा नव्हता. शिवाय घांटमाथ्यावर राहून शत्रूस दाबांत ठेवून सर्व देशावर नजर ठेवण्याची आवश्यकता ह्या वेळेस ज्यास्त होती. शिवाजीच्या वेळेस थोडा भिन्न प्रकार होता. म्हणजे सर्व देशांतून मिळवून आणिलेली लूट वगैरे दूर डोंगरांत लपवून आपला अंदाज शत्रूस करतां येऊं नये, यासाठीं रायगड हें ठिकाण योग्य होतें. परंतु आतां राजारामाचे वेळेस एकसारखा युद्धप्रसंगच पडल्यामुळें सर्व देशावर देखरेख ठेवण्याची व शत्रु जाईल तिकडे आपण लढाईस तयार असण्याची, आवश्यकता विशेष होती. शिवाय परिस्थितीच्या मानानेंही सातारा राजधानी वावगी नव्हती. ती विशाळगड, पन्हाळगड, सिंहगड, इत्यादि मजबूद किल्ल्यांच्या मध्यभागीं असून, शिवाय तेथून कोंकण प्रांतावरही दाब ठेवतां येण्याजोगा होता. म्हणून साताऱ्यास राज्य-स्थापना करून राजाराम लगेच मोगलांशीं लढण्यासाठीं बाहेर पडला.

ह्यापूर्वी वरील युद्धाचें स्वरूप मराठ्यांचे संबंधानें केवळ बचावापुरतें होतें, त्यास आतां चढावाचें स्वरूप आलें. संताजी व धनाजी ह्यांनीं आजपर्यंत मोगलांस नानाप्रकारें सतविलें, ही गोष्ट खरी; तरी पण त्यांच्या धामधुमीचा हेतु कोणीकडून तरी मोगलांस त्रासांत गुंतवून, आपला बचाव करण्यापुरताच होता. पांच सहा वर्षांच्या अनुभवानें मराठ्यांनीं आपल्या शत्रूंचें पाणी चागलेंच जोखलें. एकापेक्षां एक पराक्रमी असे मराठे वीर मोगलांचा फन्ना उडविण्यास आतां पुढें आले. त्यांनीं आपली लढाईची शिस्त बदलली; आणि निर्धास्तपणें सर्व देशभर फिरण्याचा जो विलक्षण उपक्रम मराठ्यांनीं आतां चालू केला, व ज्याच्या दराऱ्यानें सर्व देश पुढें कांहीं वर्षेपर्यंत दणाणून गेला, त्याची सुरुवात सातारा येथील राज्यस्थापनेपासून झाली.

जिंजीचें ठिकाण हातीं आलें, तरी बादशहाचे उद्देश तडीस गेले नाहींत. मराठे आपणास दाद देत नाहींत, हें पाहून तो अत्यंत कष्टी झाला; व पुनः एकवार मराठ्यांशीं निकरानें लढण्याकरितां स्वतः निघाला. स. १६९८ त ब्रह्मपुरी सोडून, मराठ्यांवर चाल करण्याविषयीं त्यानें हुकूम सोडिले. ब्रह्मपुरीस आज चार वर्षे त्याचा मुक्काम असल्यामुळें, लोक घरेंदारें करून संसार करूं लागले होते; म्हणून असलें सुखवस्तु राहणें सोडून जाण्याचें त्यांचे जिवावर आलें. वजीर आसदखान ह्याचे हवालीं जनानखाना करून व ब्रह्मपुरीस त्यांचा सर्व प्रकारें चांगला बंदोबस्त करून, बादशहा बाहेर पडला. त्यानें आपल्या फौजेचे दोन भाग केले; एक भाग अजीमशहाचा मुलगा बेदरबख्त व झुल्फिकारखान यांचे हाताखालीं देऊन, त्यांस सतत मराठ्यांचे पाठीवर फिरत राहण्यासाठीं पाठविलें; आणि दुसरा भाग स्वतः घेऊन बादशहा मराठ्यांचे किल्ले काबीज करण्यास निघाला. प्रथमतः त्याची स्वारी मिरज वसंतगडाकडे निघाली हें पाहून, राजाराम सातारा सोडून बाहेर पडला; आणि सर्व फौज घेऊन उत्तरेकडील मुलखावर स्वारी करण्याचा त्यानें निश्चय केला.

१२. राजारामाची शेवटची स्वारी (१६९८–९९).—नेमाजी शिंदे व दुसरे सरदार हे आठ हजार फौजेनिशीं मोगलांच्या मुलखांत शिरून, नंदुरबार शहरावर आले. त्यांनीं पुष्कळ गांवें लुटून जाळलीं. इतक्यांत तापीच्या कांठीं शिरपुर तालुक्यांत तालनेर म्हणून गांव आहे, तेथून

मोगल सरदार हुसेनअलीखान, थोड्या फौजेनिशीं त्याचे पाठीवर आला. तालनेरपासून दोन कोसांवर उभय फौजांची गांठ पडली; लढाई मोठी निकराची झाली. मराठ्यांनीं हुसेनअलीखानास वेढून त्याचे तीनशें लोक मारिले. खानास तीन जबर जखमा लागून तो हत्तीवरून पडला. त्याचे अंगीं मुळींच त्राण राहिलें नव्हतें. अशा स्थितींत त्यास मराठ्यांनीं कैद केलें; आणि त्याचें सर्व सामानसुमान व लोक मराठ्यांचे हातांत पडले. त्याजपासून मराठ्यांनीं दोन लाख रुपये दंड मागितला; परंतु तालनेर येथें एवढ्या रकमेची भरती होईना, म्हणून नंदुरबारच्या सावकार लोकांस रकमेची भरती करण्याविषयीं हुसेनखानानें विनंती केली. नंदुरबारचे लोकांनीं मराठ्यांस चौथाईचा वसूलही दिला नव्हता, व ह्या प्रसंगीं त्यांनीं शहराचे दरवाजे बंद करून दांडगाई सुरू केली. ह्याजबद्दल हुसेनअलीसही फार राग आला; आणि त्यांची खोड मोडण्याविषयीं त्यानें मराठ्यांस सुचविलें. रयतेला त्रास देऊं नये, परंतु श्रीमान् गृहस्थ, व्यापारी, सराफ इत्यादिकांस त्रास देऊन दंडाची भरती करून घ्यावी, असा हुसेनअलीचा मराठ्यांशीं करार झाला. ह्याप्रमाणें मराठ्यांस लूट करण्याची आयतीच मोकळीक मिळाली, व त्यांनीं नंदुरबार शहरांतून पुष्कळ पैसा वसूल केला. त्यांतील कांहीं हिस्सा हुसेनअलीनेंही घेतला. स्वतःचे प्रजेस लुटण्याची हुसेनखानाची ही मसलत केवळ त्यासच शोभणारी आहे. बादशहास ही खबर समजल्यावर फार दुःख झालें. (खाफीखान, एल्यट, पु.७, पृ.३६२).

सन १६९९ चे सुमारास राजाराम सातारा सोडून उत्तरेकडे चौथाई वगैरे हक्क गोळा करीत चालला. प्रथमतः शाहूस सोडविण्याकरितां राजारामानें बादशहाच्या छावणीवर हल्ला केला; पण त्या वेळीं बादशहा व शाहू बेगमेच्या गोटांत असल्यामुळें ते निभावले, व राजारामाचा हेतु सिद्धीस गेला नाहीं. पुढें परसोजी भोसले, हैबतराव निंबाळकर, नेमाजी शिंदे, आटोळे समशेरबहादर हे सरदार त्यास येऊन मिळाले. एवढी मोठी मराठी फौज आजपर्यंत कधींही बाहेर पडली नव्हती. 'शिवाजीपेक्षां राजारामाची फौज भारी झाली. मग गंगथडीस शिरून चौथाई व सरदेशमुखीचें वतन स्वबलें घेऊं लागले. द्रव्यक आणि जे कोणी मानीनात ते मानूं लागले. त्या वेळेस वसुलाचा बंदोबस्त शिवाजीप्रमाणें ठेविला. जेथें वसूल करण्यास हरकत पडे, तेथील करारनामा करून घेत.'

(भा.व.-पंतप्रतिनिधीची बखर). ज्या लोकांनीं निमूटपणें मराठ्यांस कर दिले व जे मोगल सरदार त्यांचे आड आले नाहींत, त्यांस कोणत्याही प्रकारचा उपद्रव झाला नाहीं. विरुद्ध वागणारांस मात्र मराठ्यांनीं चांगलीच तरवार दाखविली. नियमितपणें आपले हक्क वसूल करण्याचा मराठ्यांचा प्रघात ह्याच वेळेस सुरू झाला. ज्यांना वसूल देण्याचें सामर्थ्य नसे, ते आपल्या देण्याबद्दल खतें लिहून देत. ह्याप्रमाणें गंगथडी, नांदेड, खानदेश व वऱ्हाड ह्या प्रांतांत राजाराम स्वतः फिरला. परत येतांना त्या दरएक प्रांतांत आपले निरनिराळे सरदार वसूल गोळा करण्यासाठीं ठेवून दिले. वऱ्हाडांत परसोजी भोसले, खानदेशांत नेमाजी शिंदे, बागलाणांत खंडेराव दाभाडे, व गंगथडीमध्यें हैबतराव निंबाळकर, अशा नेमणुका करण्यांत आल्या. भोसले यास सेनासाहेब सुभा, निंबाळकर यास सरलष्कर, असे किताब पूर्वीच देण्यांत आले होते. परत येतांना जालना शहर लुटीत असतां एकदम मोगल फौज राजारामावर आली. ह्या फौजेची वर्दी मराठ्यांस नव्हती हें एक, व तिची ह्या वेळची तयारी व त्वरा ह्यापूर्वी कधींही दिसून आली नव्हती, हें दुसरें, ह्यांमुळें मराठ्यांस व विशेषतः राजारामास पुष्कळ त्रास सोसावा लागला. पुढें घाईघाईनें परत येत असतां रस्त्यांत राजारामास नवज्वराचा आजार झाला. तो सिंहगडास येऊन पोंचला, तोंच छातींत विकार होऊन त्यास रक्ताच्या उलट्या होऊं लागल्या, व थोडे दिवस ताप येऊन सन १७०० च्या मार्च महिन्यांत, हा मराठ्यांचा तिसरा राजा एकाएकीं मरण पावला. 'माझे मरणानें श्रमांत अंतर करूं नका, शिवाजी सुटून येतील असें करा, सर्वजण रामचंद्रपंताचे आज्ञेंत वागा,' वगैरे निरवानिरवीच्या कांहीं गोष्टी जवळच्या सरदारांस सांगून, व शाहूस सोडवून आणण्याविषयीं आग्रह करून, त्यानें प्राण सोडिला. त्या प्रसंगीं रामचंद्रपंत अमात्य जवळ होता. शिवाजी व राजाराम ह्यांच्या मृत्यूंमध्यें बरेंच साम्य दिसून येतें. दोघेही त्रासाच्या स्वारीहून आल्यावर एकाएकीं मरण पावले, व दोघांचाही मृत्यु त्या वेळीं लोकांस आकस्मिक अपघातासारखा वाटला. स्वारीमध्यें फार श्रम झाले, म्हणून शिवाजी व राजाराम ह्या दोघांसही रक्तवमनाचा विकार झाल्याचें लिहिलेलें आहे. त्यावरून दोघांनाही छातीचा विकार असावा, असा संभव दिसतो, व तसा संभव असेल तरच अपघातिक मरण शक्य दिसतें.

राजारामास चार स्त्रिया होत्या. पहिली जानकीबाई, प्रतापराव गुजराची कन्या; दुसरी ताराबाई, हंबीरराव मोहिते याची कन्या, हिला शिवाजी म्हणून एक दहा वर्षांचा मुलगा होता. तिसरी राजसबाई, कागलकर घाटग्यांची कन्या, हिला संभाजी म्हणून तीन वर्षांचा मुलगा होता. या दोघी राजारामाचे मरणसमयीं पन्हाळा किल्ल्यावर होत्या. सोयराबाई ऊर्फ सावित्रीबाई म्हणून जानकीबाईपासून झालेली राजारामाची एक मुलगी फलटणचे निंबाळकर बजाजी नाईक दुसरे यास दिलेली होती. राजारामाची चवथी बायको अंबिकाबाई, ( पिलाजी शिर्क्यांची कन्या साकरूबाई ती हीच काय ? ) विशाळगडावर होती, ती राजारामाच्या मृत्यूचें वर्तमान ऐकून सती गेली. हिला अहल्याबाई असेंही नांव होतें. हिचें वृंदावन विशाळगड किल्ल्यावर होतें. त्या वेळीं सतीची तयारी होईपर्यंत सूर्यास्त झाला नाहीं, असा एक अद्भुत चमत्कार वर्णिलेला आहे. राजारामाची क्रिया जीवजी राजे भोसले वावीकर याजकडून करविण्यांत आली. रामचंद्रपंतानें दानधर्म बहुत केला. राजारामाची छत्री सिंहगडावर आहे.

शिवाजीचा नित्यपूजेचा बाण राजाराम जवळ ठेवून पूजित असे. त्याची स्थापना सिंहगडीं करून रामचंद्रपंतानें त्याच्या व छत्रीच्या पूजानैवेद्याचा व पुण्यतिथीचा खर्च चालण्यास गांव व सरंजाम नेमून दिला, त्याप्रमाणें वहिवाट चालत आहे.

**१३. राजारामाची योग्यता.**—राजारामाची योग्यता बऱ्याच अंशीं निषेधात्मक आहे. म्हणजे राज्यचालकाच्या अंगीं अवश्य असणारे गुण त्याजमध्यें प्राधान्येंकरून नव्हते, तरी राज्यास अपायकारक असे ठळक दुर्गुणही त्याजमध्यें नव्हते. गुण असणें व दुर्गुण नसणें ह्यांत भेद आहे. राजारामाचे अंगीं दुर्गुण नव्हते, ह्याचाच अर्थ त्याची योग्यता निषेधात्मक आहे. कदाचित् प्रस्तुतच्या आपातप्रसंगीं ह्या निषेधात्मक योग्यतेचाच राष्ट्रास उपयोग झाला. कारण शिवछत्रपतीप्रमाणें सर्वगुणसंपन्नता अंगांत असणें हें तर सर्वच प्रसंगीं उत्तम; पण तशा गुणसंपन्नतेच्या अभावीं दुर्गुणाभावाचीच मातब्बरी विशेष असते, हें संभाजीच्या चरित्रावरून व्यक्त होतें. एकंदरींत संभाजीनंतर राजारामासारखा निरुपद्यापी पुरुष मराठ्यांचे गादीवर आला, म्हणूनच त्या भयंकर प्रसंगांतून राष्ट्राचा बचाव झाला.

स्वत:च्या बुद्धीनें व हिंमतीनें कोणतेंही काम तडीस नेण्याची हिंमत राजारामाचे अंगीं नव्हती. चांगल्या सल्लेचा त्यानें जरी अव्हेर केला नाहीं, तरी अनेक लोक आपापल्या मतलबानें जें कांहीं त्यास सुचवीत तें सर्व त्यानें मुकाट्यानें केलें. त्यांतील बरें वाईट व प्रसंगयोग्य कोणतें, हें ठरविण्याची ताकद त्यास नव्हती. म्हणून हाताखालच्या लोकांवर त्याचा दाब चांगला बसला नाहीं. दरएक इसम मन मानेल तसें वर्तन करूं लागला. राज्यकर्त्यानें आपली स्वत:ची छाप गमावून उपयोगी नाहीं. उलट धाडसानें व अक्कलेनें सल्लागारांवर छाप बसविणें आणि सर्वांकडून मुख्य हेतूला पोषक अशी कामगिरी करून घेणें हेंच त्याचें मुख्य काम आहे. संभाजी व्यसनी होता, पण त्यानें स्वत:ची छाप कधीं गमावली नाहीं. राजाराम नेभळा व नि:सत्त्व दिसतो. स्वत:चें तेज म्हणून त्याच्यांत कधीं झळकलें नाहीं. विल्क्स म्हणतो,त्यास गांजा अफू सारखीं व्यसनें असल्याचा बोभाटा होता. ही गोष्ट खरी असणें संभवनीय दिसतें. संभाजीला व राजारामाला उत्तर हिंदुस्थानांतील व्यसनांचा संपर्क जडलेला असून, पुढें तो सातारकर छत्रपतींच्या ठिकाणीं थोडाबहुत चालूच असावा. एकंदरींत शिवाजी व त्याचे पूर्वज यांचें प्रखर तेज व करारी स्वभाव पुढील वंशांत उतरलेला दिसत नाहीं.

अशा स्वभावाचे चांगले व वाईट दोनही परिणाम झाले. ज्यांचा उद्देश पराक्रम करून राष्ट्राच्या उपयोगी पडावें असा होता, त्यांस पुढें येण्यास राजारामानें चांगली सवड दिली, त्यांस कोणतीही आडकाठी घातली नाहीं, हा चांगला परिणाम. त्यामुळें प्रत्येकाला पराक्रम गाजविण्यास हुरूप आला; परंतु त्याबरोबर जो उठला तो स्वार्थ साधण्याच्या नादास लागला. वतनें व उत्पन्नें मिळवावीं, सनदा हुकूम वाटेल तसे फिरवून घ्यावे, महाराजांस खरें खोटें समजावून, किंवा वेळीं धाकदपटशा दाखवून, आपलें काम करून घ्यावें, अशा प्रकारची अव्यवस्था राज्यांत माजली. त्यामुळें खरी योग्यता व भोंदूपणा यांजमधील भेद लुप्त झाला अंमलदारांत व सरदारांत पक्ष व तट पडून अंतर्वैमनस्यें वाढलीं.त्यांत राज्यकारभार विशाळगडावर व राजा जिंजीस, अशा स्थितींत आठ वर्षें गेल्यामुळें, राजारामाच्या स्वभावानें उत्पन्न केलेल्या गोंधळांत ज्यास्तच भर पडली. ही अडचण रामचंद्रपंतास पदोपदीं नडे. सरदार लोक आपसांत भांडूं लागले.

शंकराजी नारायण, सुंदर तुकदेव, संताजी घोरपडे, धनाजी जाधव वगैरे ज्यांच्या हातीं अधिकार असे, ते उत्पन्नांच्या व वतनांच्या बाबतींत मन मानेल तशी ढवळाढवळ करूं लागले. त्यांजवर कांहीं एक दाब राहिला नाहीं. एकाच वतनाबद्दल अनेकांस सनदा मिळूं लागल्या. मूळ राज्य थोडेंच, पण वतनें मात्र अतिशय वाढलीं. ह्यामुळें घोटाळा उत्पन्न होऊन रामचंद्रपंतास काय करावें हें सुचेना. 'चंदीच्या मुक्कामाहून धर्मादाय इनामती व इसाफती व नूतन वतनें कारकीर्द महाराज राजश्री छत्रपती साहेबांनीं दिलीं होतीं. त्यांचा विचार मनास आणितां, राज्याचा बंदोबस्त न होतां, ऐशा सनदा येऊन दाखल झाल्या. ते समयीं श्रीमन्मातुश्री ताराबाईसाहेब व सर्व राजमंडळ मिळोन निर्णय केला कीं, सनदेंत किंवा फर्मानांत असेल त्याचे निमे हिशानें उत्पन्न द्यावीं.' या व्यवस्थेचें तपशीलवार विवेचन खं. ८ ले. ५२ त स. १७०० सालीं केलेलें पाहवयास मिळतें, आणि त्यावरून या गोंधळाची कल्पना होते.

या गोंधळाच्या मुळाशीं राजाचा नाकर्तेपणा आहे. राजारामास उग्र स्वरूप धारण करतां येत नसे; किंवा त्यास लोकांची भीड तुटत नसे. व्यक्तीच्या अंगीं गुण व दोष दोनही असतात; गुणांचा उत्कर्ष व त्यांचा राष्ट्रकार्याकडे उपयोग करून, दोषांस दाबांत ठेवणें हेंच राजाचें मुख्य कर्तव्य असतें. हें काम फार कठीण आहे, म्हणूनच राज्य करणें सोपें नाहीं. माणसें वागविणें व अडचणी सोडविणें हें थोडेच करूं शकतात. विलायतेंत अशाच भिन्नगुणी व भिन्नस्वभावी माणसांचा स्वपक्षाच्या कारभारांत उपयोग करून, राज्यकारभार हांकण्याचें काम मुख्य प्रधानाला करावें लागतें. म्हणून यशस्वी मुख्य प्रधान थोडेच निपजतात. राजारामाच्या ढिलाईमुळें ही गोष्ट साध्य झाली नाहीं. यामुळें अनेक अनिष्ट प्रकार राज्यकारभारांत शिरले. व्यक्तींचें प्रस्थ वाढलें. सामवायिक कारभारास गौणत्व आलें. शिवाजीनें बांधिलेली शिस्त बिघडली. कामांची वांटणी नाहींशी होऊन प्रत्येक इसम पूर्ण स्वतंत्रतेनें वागूं लागला. मुलूख जिंकावा व जहागीर म्हणून तो आपणच घ्यावा, हा प्रघात सुरू झाला. शिवाजी कोणासही जमिनी तोडून देत नसे, त्याच्या उलट हा प्रकार होऊन, त्यावरून पुढें हिंदुस्थानांत ठिकठिकाणीं लहान लहान स्वतंत्र राज्यें निर्माण झालीं. लुटीचे नियम लयास गेले. असे अनेक अनाचार

उत्पन्न होऊन मराठशाहीचा बाह्य भपका वाढत असतां, तिची अंत:शक्ति हीन होऊं लागली. हे परिणाम उत्तरोत्तर व्यक्त होतीलच, पण त्यांचें मूळ राजारामाच्या वेळेस सुरू झालें, एवढेंच येथें सांगावयाचें आहे. संताजीचा खून, दादाजी प्रभूच्या कुटुंबाची दुर्दशा, सुंदर तुकदेव व शंकराजी नारायण यांची अरेरावी, इत्यादि प्रकार राजारामाच्या नेभळेपणाचे परिणाम होत. रा. राजवाड्यांच्या शिवकालीन खंडांत राजारामाच्या वेळचे पुष्कळ कागद छापलेले आहेत, त्यांवरून तत्कालीन अव्यवस्थेची बरीच कल्पना होते.

तथापि राजारामाचे अंगीं निषेधात्मक गुण कांहीं होते म्हणून निभावणूक झाली. पहिला गुण म्हणजे आपल्या सल्लागारांवर संपूर्णपणें विश्वास ठेवून त्यांच्या मसलतीप्रमाणें वागणें हा होय. दुसऱ्याची किंमत ओळखण्यापूर्वी स्वत:ची योग्यता पूर्णपणें जाणणें,हेंच लोकनायकास अत्यंत जरूर असतें. संभाजीप्रमाणें राजारामानें जवळच्या मंडळीची मसलत कधींही अव्हेरिली नाहीं, एवढेंच नव्हे, तर हरएक प्रसंगीं सल्लागारांच्या मसलतीसच त्यानें मान दिला. आपणावर प्रसंग कोणता आहे, आपलें बलाबल काय आहे, राष्ट्राचे खरे हितचिंतक कोण व आलेल्या प्रसंगांतून सुरक्षितपणें निभावून जाण्यास काय उपाय करावे, ह्या गोष्टींचा विचार फार शांतपणानें, मोठ्या धिमेपणानें व अत्यंत बारकाईनें करून, तदनुसार त्यानें आपलें वर्तन ठेविलें, हें काम कांहीं सामान्य नव्हे. प्रल्हाद निराजी, रामचंद्रपंत अमात्य, धनाजी जाधव, संताजी घोरपडे वगैरे गृहस्थांची योग्यता ओळखून त्यानें त्यांजकडून योग्य कामें करवून घेतलीं. राजारामाच्या या गुणाचा एकंदर राष्ट्रावर फारच महत्त्वाचा व फायद्याचा परिणाम झाला; आणि अंगीं पराक्रम असेल तर नांव गाजविण्यास पाहिजे त्यास उत्तम सवड मिळूं लागली.

अनुयायांच्या ठिकाणीं स्फुरण उत्पन्न करण्याची खुबी राजारामास साधली होती. राष्ट्रसेवेचें कोणीं कांहीं काम केलें, कीं त्यास बक्षीस, मानमरातब, जहागिरी वगैरे देऊन त्याची यथायोग्य संभावना राजाराम करीत असे. मराठे सरदारांचे जे भपकेदार किताब अद्यापिही ऐकण्यांत येतात, त्या बहुतेकांचा उगम राजारामाचे वेळेस झाला. अशा भपकेदार किताबांनीं मराठे सरदारांच्या अंगचे पराक्रम जगद्विख्यात झाले; आणि

त्यांवरून त्यांचीं नांवें इतिहासांत अजरामर झालीं. धन्याकडून नोकराच्या कर्तबगारीची पारख झाली, म्हणजे नोकरास एकप्रकारचें स्फुरण चढतें व तो ज्यास्त पराक्रम करूं लागतो. तद्वतच या वेळच्या मराठ्यांची स्थिति झाली. मराठ्यांचे अंगची हिंमत व दरारा जो पुढें इतका जगाचे निदर्शनास आला, त्याचा मूळ उगम राजारामाचे वेळेस झाला यास अंशतः कारण त्या वेळेची परिस्थिति हें तर खरेंच, तरी पण राजारामाचे गुणही त्यास पुष्कळ अंशी कारण झाले. वास्तविक पाहतां राजारामाची कारकीर्द म्हणजे कर्ती माणसें निपजविण्याची उत्तम खाण, स्वराष्ट्राभिमान शिकविण्याची उत्तम शाळा, आणि पराक्रम व कीर्ति गाजविण्याची उत्तम रंगभूमि, असें म्हटलें असतां वावगें होणार नाहीं. शिवाजीनें ज्या राष्ट्राचा पाया घातला, त्याची सांगता राजारामाचे वेळेस झाली. भयंकर आपत्तामुळें त्या सांगतेला एका प्रकारचें उदात्त स्वरूप आलें आहे. सारांश, इतिहासांत मराठ्यांचें नांव जें इतकें गाजत राहिलें आहे, त्याचा मूळ उगम राजारामाच्या ह्या दहा वर्षांच्या कारकिर्दींत आहे.

स्वार्थत्याग हा दुसरा एक उत्तम गुण राजारामाचे अंगीं प्राधान्येंकरून वसत होता. त्यानें क्षुद्र फायद्याकडे नजर न देतां, ज्यांत एकंदर राष्ट्राचें हित असेंच वर्तन निरंतर ठेविलें. येसूबाईच्या मुलावर त्याचा लोभ पोटच्या पुत्राप्रमाणें होता. शाहूचा परामर्ष घेण्यांत तो नेहमीं तत्पर असे. राज्याचा खरा हक्कदार शाहू आहे, हें तो कधीं विसरला नाहीं. ह्या गोष्टी ध्यानांत घेतल्या, म्हणजे राजारामाची योग्यता खरोखरच मोठी होती, असें वाटल्यावांचून राहणार नाहीं.

राजारामानें संताजी घोरपड्याचा वध होऊं दिला, हा त्याचे नांवावर एक अक्षम्य डाग आहे, असें कित्येक लोक म्हणतात. परंतु त्याजविषयीं खात्रीलायक पुरावा बाहेर आलेला नाहीं. त्यांत राजारामाचें अंग किती होतें हें समजत नाहीं. संताजीपेक्षां धनाजीकडे राजारामाचा ओढा विशेष होता, हें खरें; परंतु तेवढ्यावरून म्हणजे संताजीचा खून त्यानें करविला, अगर खून होत असतां तो बंद केला नाहीं, असें होत नाहीं. संताजी मरावा, अशी राजारामाची इच्छा कां व्हावी, ह्यास कांहीं कारण नाहीं.

राजारामाचे कारकिर्दींत जें यश मराठ्यांस प्राप्त झालें, त्याचा कांहीं भाग त्याचे सल्लागार प्रल्हादपंत व रामचंद्रपंत यांस दिला पाहिजे. ह्या

दोघांनीं राष्ट्राची सेवा अत्यंत निरपेक्ष बुद्धीनें बजाविली व राजारामानेंही त्यांस त्याचे योग्यतेनुरूप वागविलें. या दोघांची मसलत, व संताजी व धनाजी, आणि परशुराम त्रिंबक व शंकराजी नारायण, या दोन जोडींचे पराक्रम, ह्यांच्याच योगानें प्रस्तुतच्या आपातांचें निवारण होत गेलें, यांत संशय नाहीं.

तत्कालीन इतर राजांशीं राजारामाची तुलना करतां येण्यासारखी नाहीं. इंग्लंडांत ह्या वेळेस राज्यक्रांतीच्या नंतर तिसरा वुइल्यम राजा राज्य करीत होता. इंग्रज राष्ट्र एका मोठ्या आपातांतून निघून ह्या वेळेस सुस्थितींत येत चाललें होतें; व आमच्या मराठी राज्याची तर केवळ प्राणप्रतिष्ठाच चालली होती. त्यांतून आपन्निवारणापलीकडे राजारामास राज्यकारभारांत लक्ष घालण्यास सवड मिळाली नाहीं, म्हणून राज्यकर्ता या नात्यानें त्याची योग्यता ठरविता येत नाहीं, आणि कोणाशीं तुलनाही करितां येत नाहीं. राजाराम अल्पायुषी झाला नसता, तर त्याच्या अंगचे कांहीं अधिक गुण दृष्टीस पडले असते.

---

## प्रकरण चौदावें.

## छत्रपति धाकटा शिवाजी.

| | |
|---|---|
| १. बादशहाची हालहवाल. | २. धाकट्या शिवाजीचा राज्याभिषेक. |
| ३. महार प्रांतील किल्ल्यांचा पाडाव. | ४. मराठ्यांचा कावा, बादशहाची दुर्दशा. |
| ५. पम्या नायकाचा दंगा. | ६. शाहूची कैद, व सुटकेचे प्रयत्न. |
| ७. औरंगजेबाचा शोचनीय अंतकाळ. | ८. मराठ्यांच्या प्रमादांची मीमांसा. |
| ९. भिन्न दृष्टींनीं युद्धाचा विचार. | १०. शाहूची सुटका. |
| ११. शाहूशिवाजींचे हक्कांचा विचार. | १२. शाहूला राज्यपदप्राप्ति. |

१. बादशहाची हालहवाल.—संभाजीचा पाठलाग करून ता. ११ मार्च १६८९ रोजीं त्याचा बादशहानें शिरच्छेद केला. १९ ऑक्टोबर १६८९ रोजीं रायगड पडला; आणि भोसल्यांचें कुटुंब बादशहाचे कबज्यांत आलें. आपले सर्व हेतू तडीस गेले, असें क्षणभर बादशहास वाटलें.

परंतु त्याच्या आयुष्यांतील अत्यंत दुःखाचा भाग त्याच वेळेस सुरू झाला. एका ठिकाणीं बसून अफाट देशावर राज्य करणें त्यास अशक्य झालें होतें. नवीन जिंकिलेला मुलूख ताब्यांत घेणें व मराठयांना जिंकणें हीं दोन कामें करणें बादशहाला अशक्य झालें; आणि त्याची सर्व मेहनत फुकट गेली. उत्तर हिंदुस्थानांत जिकडे तिकडे बंडाळी सुरू झाली. त्याचे हुकूम कोणी पाळीनात व कारभार चालेना. त्याचे कामगार लांच खाऊं लागले. जमीनदार लोक बंडें करून उठले. प्रत्यक्ष राजधानीचा प्रांत आग्रा तेथील ही स्थिति, मग इतर ठिकाणची गोष्ट काय विचारावी ! विद्याकलांचा ऱ्हास झाला. औरंगजेबाच्या कारकिर्दीतील एकही सुंदर इमारत, एकही सुंदर हस्तलिखित पुस्तक, एकही सुंदर चित्र दृष्टीस पडत नाहीं. (Mod. Rev.). दक्षिणच्या युद्धानें सर्व पैसे खाऊन टाकिले. शिपायांना पगार वेळेवर पोंचेना. पोटासाठीं ते बंडें करूं लागले. बिचारा मुर्शीदकुलीखान बंगालचा वसूल नियमानें पाठवी, म्हणून बादशहाला खायला तरी मिळे. दख्खननें औरंगजेबास गिळून टाकिलें. सन. १६८८ च्या नोव्हेंबरांत विजापुरांत ब्यूबॉनिक प्लेग सुरू झाला. गरिबांपासून श्रीमंतांपर्यंत असंख्य लोक प्राणांस मुकले. प्रत्यक्ष बादशहाची बायको औरंगाबादीमहल प्लेगनें मेली. त्यामुळें बादशहास मुक्काम हालवावा लागला. चार पांच वर्षें तो इकडून तिकडे फिरत होता. नंतर पंढरपुरच्या पूर्वेस भिमेच्या कांठीं ब्रह्मपुरी येथें त्यानें ता. २० मे स. १६९५ रोजीं कायमची छावणी दिली. तेणेंकरून त्या ठिकाणीं तटबंदीचें शहर निर्माण होऊन, त्यास इसलामपुरी (बेगमपुर?) असें नांव मिळालें. तेथें चार वर्षें बादशहानें मुक्काम केला. इकडे जिंजी काबीज करूनही राजाराम त्याचे हातीं आला नाहीं, उलट मराठयांची शक्ति वाढतच चालली. हाताखालचे सेनापती मनापासून कामें करीत नाहींत अशी खातरी होऊन, बादशहा ८१ वर्षांचा म्हातारा, स्वतः कंबर बांधून मराठ्यांचे किल्ले जिंकण्यास निघाला. मग त्याच्या फौजेची दैना काय विचारावी ! नदीपुरांतून बादशहाच्या फौजा धांवताहेत, रस्ते चिखलानें भरून गेले आहेत, ओझींवाले पळून गेलेले, जनावरें भुकेनें व श्रमानें थकून पटापट मरत आहेत, दुष्काळ तर रोजचीच बाब, अधिकारी सर्व कावून गेलेले; पण म्हाताऱ्यापुढें एक शब्द उलट बोलण्याची सोय नाहीं. नसतजंग, फिरोजजंग, सुजायतखान, महंमद मुराद-

खान, तर्बियतखान आणि फत्तुल्लाखान ह्या मोठमोठ्या कामगारांच्या भांडणांत, बिचाऱ्या बादशहाचें सर्वस्व गेलें. कोणीच कांहीं ऐकेना, कांहीं काम करावयाचें तर स्वतः करावें, नाहीं तर त्यास कोणींच हात लावूं नये, असा प्रकार झाला. अशा स्थितींत बादशहानें मराठ्यांचे किल्ले काबीज करण्याचा जो शेवटचा उद्योग केला, त्याचा कालक्रम खालीं लिहिल्याप्रमाणें ध्यानांत ठेवणें सोयीचें होईल.

ता. ९ ऑक्टोबर १६९९ ब्रह्मपुरी सोडून कऱ्हाडच्या रस्त्यानें येऊन, ता. २५ नोव्हेंबर रोजीं कऱ्हाडजवळचा वसंतगड किल्ला काबीज. नंतर पन्हाळ्यावर जाण्याची हूल दाखवून साताऱ्यावर स्वारी.

ता. ८ डिसेंबर १६९९ पासून २१एप्रिल१७००, सातारा वेढा व काबीज.

ता. ३ एप्रिल १७०० पासून ९ जून १७००, परळीगड वेढा व काबीज.

सन १७०० चा पावसाळा खवासपुर येथें, (ता० सांगोलें, जि. सोलापुर.)

ता. ९ मार्च १७०१पासून २८ मे१७०१,पन्हाळा वेढा, पवनगड काबीज.

सन १७०१चा पावसाळा ( २९ मे पासून ७ नोव्हेंबर ), खतनून येथें. ( कटगूण, ता. कोरेगांव ? ).

ता. १६ जून १७०१ वर्धनगड काबीज ( कोरेगांवच्या पूर्वेस ).

६ ऑक्टो. १७०१, नांदागिरि व चंदनवंदन फत्तुल्लाखानाकडून काबीज.

ता. २६ डिसेंबर १७०१पासून४ जून१७०२खेळणा ऊ० विशाळगड वेढा. विशाळगडाहून अत्यंत त्रासदायक प्रवास. १७०२ चा पावसाळा बहादुरगड ( पेडगांव ) येथें, १० जूनपासून ऑक्टोबरपर्यंत.

ता. २७ डिसेंबर १७०२ पासून ८ एप्रिल सन १७०३, सिंहगड वेढा.

सन १७०३ चा पावसाळा पुणें येथें, १ मे पासून १० नोव्हेंबर पावेतों.

ता. २ डिसेंबर १७०३ पासून १६ फेब्रुवारी १७०४, राजगड वेढा.

ता. २३ फेब्रुवारी १७०४ पासून १० मार्च १७०४, तोरणा वेढा.

सन १७०४ चा पावसाळा, ता. १७ एप्रिल ते २२ आक्टोबर, पुण्याचे उत्तरेस खेड येथें.

ता. ८ फेब्रुवारी–२७ एप्रिल १७०५ वाकिनखेडें. तेथून सहा मैलांवर देवापुर येथें १७०५ चा पावसाळा, मे ते २३ ऑक्टोबर.

देवापुर येथें बादशहास शेवटचा आजार झाला. त्यांतच काम केल्यानें तो वाढत गेला. सर्व लोकांत गोंधळ व चिंता उत्पन्न झाली. बादशहा मरण पावल्यावर आपली वाट काय होणार, याची सर्वांस धास्ती पडली. शेवटीं सर्वांच्या विनंतीस मान देऊन ता. ३ नोव्हेंबर १७०५ रोजीं देवापुर सोडून बादशहा परत फिरला, तो ५ डिसेंबर रोजीं बहादुरगड (पेडगांव) येथें आला, आणि तेथून ता. २० जानेवारी स. १७०६ रोजीं अहंमदनगरास दाखल झाला. तेथें त्यानें एक वर्ष दुःखानें कंठून स्वर्गवास केला.

शत्रुपक्षास कपटप्रयोगानें हस्तगत करण्यांत औरंगजेब पूर्ण निपुण होता. मराठ्यांशींही त्यानें अनेक डावपेंच केले. कपटविद्येच्या बळावर कशाही अडचणींतून पार पडण्याचें कौशल्य औरंगजेबाइतकें सहसा कोणास साधावयाचें नाहीं. या प्रसंगीं रामचंद्रपंत अमात्य व परशुरामपंत प्रतिनिधि यांस त्यानें लबाडीचीं पत्रें लिहिलीं, आणि एकाचें पत्र दुसऱ्याच्या अगर ताराबाईच्या हातीं पडावें अशी युक्ति केली. रामचंद्रपंत शत्रूस फितुर आहे, अशी शंका ताराबाईस आली ती ह्या पत्रांनीं होय. परशुराम त्रिंबक प्रतिनिधीस औरंगजेबाचें पत्र. (Mod. Rev., 1908). ता. ३१ ऑक्टोबर सन १६९९.

'पन्हाळ्याचा किल्लेदार त्रिंबक यानें जाणावें कीं, दुष्ट रामराजाचे किल्ले काबिज करून त्यास ठार मारण्याकरितां आमची फौज चालून जात आहे. थोड्याच दिवसांत आमचा मुक्काम मुर्तुजाबाद (मिरज) येथें होईल; परमेश्वरकृपेनें त्या दुष्टाचे सर्व किल्ले व जागा आमच्या कबजांत येतील; आणि त्या दुर्दैवी रामराजाची दशा त्याच्या दुष्ट भावासारखीच होईल. मराठ्यांचे कांहीं किल्लेदार आमच्या पक्षास येऊं इच्छीत आहेत; आणि तुम्हीही आमच्या पूर्वीच्या पत्राप्रमाणें सुदैवास वश होऊन किल्ला आमचे हवालीं कराल तर तुमच्यावर आमची मोठी मेहरबानी होऊन तुम्हांस मोठी मनसब मिळेल. ईश्वरानें तुम्हांस ही सुबुद्धि न दिल्यास, किल्ला हा आम्ही काबीज करूंच, आणि मग तुम्हांस काय दिसायचें तें दिसेल. तुम्हांस व तुमचे कुटुंबांतील लहान थोर बायकामुलें सारून सर्व्यांस पकडून ठार मारण्यांत येईल. कळावें.' असेंच दुसरें पत्र:—

ता. ३१ ऑक्टोबर स. १६९९. ' रामचंद्र यानें जाणावें कीं, सुदैवानें दूरवर विचार करून तुम्हीं शुभ मुहूर्तावर तर्बियतखानास पत्र लिहिलें, तें आम्हीं वाचलें. त्यांतील सर्व प्रकार आम्हांस कबूल आहेत. त्यावरून आम्ही असें फर्मावितों कीं, भरंवशाचा व निष्ठेचा जो सन्मार्ग तुम्हीं धरिला आहे, तो कायम ठेवा, लिहिल्याप्रमाणें सर्व गोष्टी त्वरेनें करून दाखवा, आणि त्या दुष्टाचा ( राजारामाचा ) आश्रय सोडून द्या. त्या दुष्टाच्या नश्वर आयुष्याचे जर अजून कांहीं क्षण बाकी असून, आमच्या फौजेस भिऊन पळून जाण्याची त्यास इच्छा होईल, तर तुम्हींच सर्व किल्ले आमच्या हवाली करावे हें योग्य आहे. परमेश्वरानें तुम्हांस बुद्धि देऊन दोनही गोष्टी केल्यात म्हणजे तुमचा उत्कृष्ट सन्मान करून, तुम्हांस उत्तमोत्तम बक्षिसें व मनसब देऊं; परंतु दुर्दैवानें आपलें नफा नुकसान काय हें जर तुम्हांस कळलें नाहीं, आणि तुमचे पत्रांतील शब्द सर्व फोल असतील, तर मग तुम्ही व तुमचा राजा ह्यांस काय दिसायचें तें दिसेल. मुलामाणसांसुद्धां तुमचीं सर्वांचीं डोकीं कापलीं जातील. कळावें.' ( तर्बियतखान हा औरंगजेबाच्या तोफखान्यावर होता. ) साताऱ्याचा वेढा चालू असतां रामचंद्रपंतास बादशहानें लिहिलेलें पत्र परशुरामपंताचे हातांत पडलें असें ग्रँट् डफ् म्हणतो, तें पत्र हेंच असावें. औरंगजेबाचें परशुरामपंतास पत्र, ता. २७ मे स. १७०२.चें 'मुसलमानी धर्मावर निष्ठा ठेवून परशुराम यानें जाणावें कीं, तुमचे गुन्हे माफ करावयाजोगे नाहींत. तत्राप शहाजादा बेदरबख्तानें तुमच्याबद्दल मोटी शिफारस करून लिहिलें आहे कीं, तुम्ही खेळणा किल्ला आमच्या स्वाधीन करण्यास तयार आहां, मात्र ( १) हा किल्ला घेतल्यावर दुसरे आणखी किल्ले न घेतां बादशहानें परत आपल्या मुलखांत जावें, (२) आमच्यापैकीं कोणाच्याही जिवास अपाय करणार नाहीं, असें लेखी वचन द्यावें, आणि ( ३ ) ही विनंती कबूल असल्याबद्दल शहाजाद्यास लिहून यावें. त्यावरून कळविण्याचें कीं, तुम्ही किल्ला खाली करून बादशहास शरण यावें; म्हणजे तुमच्या जिवास धक्का न लावतां आमची फौज परत जाईल. या आमच्या वचनांवर भरंसा ठेवून, किल्ला स्वाधीन करावा, विलंब लावूं नये. कळावें.' ता. ७ जून १७०२ रोजीं किल्ला मोगलांचे कबजांत आला. अशी औरंगजेबाची कपटविद्या सारखी चालू होती.

२. धाकट्या शिवाजीचा राज्याभिषेक.—राजारामाचे मृत्यूचें वर्तमान ऐकून बादशहा व त्याचे मुसलमान अनुयायी यास आनंदी आनंद झाला. त्यांच्या फौजेंत जिकडे तिकडे जयघोष करण्यांत आला. आतां मराठे आपले डोकें वर कसचें काढितात; राजारामाच्या बायका व दोन अल्पवयी मुलगे यांस जिंकण्यास मुळींच प्रयास पडणार नाहींत, असें बादशहास वाटलें. परंतु मराठ्यांची संघशक्ति व त्यांचे अंगचा जोम हीं दिवसेंदिवस वाढतच होतीं, हें बादशहाचे ध्यानांत आलें नाहीं. राजारामाच्या कारकिर्दीत लोकांचे अंगीं एकप्रकारचा विलक्षण हुरूप उत्पन्न झाला होता. त्यांत रामचंद्रपंतानें आणखी भर घातली. राजारामाच्या मृत्यूचें वर्तमान सरदार लोकांस कळवितांना, त्यानें चहूंकडे मोठीं आवेशयुक्त पत्रें पाठविलीं. 'आतां राज्य रक्षण करणें तुम्हांकडेच आहे, सर्व लज्जा तुमची आहे,' इत्यादि शब्द वाचून सरदारांस विलक्षण स्फुरण चढलें, व ते रामचंद्रपंतास राजारामाच्या ठिकाणीं समजून, त्याचे हुकूम मोठ्या तत्परतेनें बजावूं लागले. त्यानें सिंहगडावर सरदारांस बोलावून दरबार भरविला; आणि पुढील कर्तव्याची ओळख त्यांस देऊन सर्वांनीं मनापासून साह्य करण्याची विनंति केली. सरदारांनींही रामचंद्रपंतास आश्वासन देऊन त्याची खातरजमा केली. शाहूकडून निरोप घेऊन भक्ताजी हुजरे व बंकी गायकवाड आले. रामचंद्रपंताची नांवाजणी करून, 'नेटानें राज्य रक्षण करावें व आम्हांस सोडवून न्यावें' असा शाहूनें निरोप पाठविला. दरबारांत शाहूविषयीं प्रेम व आदर उत्पन्न झाला. रामचंद्रपंताच्या दक्षतेचें एक पत्र उपलब्ध आहे तें येणेंप्रमाणें:—

'कान्होजी झुंजारराव मरळ देशमुख यास. कोंकणांत हबशानें बहुत वळवळ मांडल्या कारणानें त्यास बरा नतीजा पाववावयाबद्दल रा. मल्हारराव यास सात हजार फौजेनिशीं आज कुंभारली घांटें उतरोन चिपळुणास आले. त्यास सामील व्हावयाबद्दल आम्ही हशम घेऊन स्वार होऊन गेलों. ऐशास हें पत्र तुम्हांस पावेल ते क्षणीं, आपला अवघा जमाव, एक माणूस टाकूं न देतां, सारा जमाव घेऊन, बहुत शिताबीनें येऊन सामील होणें. एके घटकेचा उजूर न करणें. आजचे प्रसंगीं जो मसलत चुकवील, तो म्हणजे गनीमादाखल, असें समजोन बहुत शिताबीनें येणें.

उजूर केलिया साऱ्या मसलतेची बदनामी तुम्हांवरी येईल. हें समजोन लिहिल्याप्रमाणें वर्तणूक करणें. नोव्हेंबर स. १७००.' (खं. १६-३५).

पुढें धनाजी जाधव वगैरे सरदारांस शत्रूच्या बंदोबस्तास ठिकठिकाणीं ठेवून, रामचंद्रपंत सिंहगड सोडून निघाला तो प्रतापगडावर श्रीचें दर्शन घेऊन परळी वसंतगडावरून पन्हाळ्यास बायांचे भेटीस आला. भेट झाल्यावर सर्वजण महाराजांसाठीं श्रमी झाले. मग पुढील व्यवस्थेचा प्रश्न निघाला. आपला मुलगा शिवाजी याची मुंज करून त्यास राज्याभिषेक करावा, असा ताराबाईनें रामचंद्रपंतास आग्रह केला. याचे पूर्वींच मातापूर्याचा किल्ला बादशहानें काबीज केला असून, रामचंद्रपंत आंतून बादशहास सामील आहे, असा ताराबाईस संशय आला होता. प्रतिनिधिपद आपणास मिळण्याविषयीं परशुराम त्रिंबकची खटपट होती. राजारामानें तें हणमंते यास दिल्यापासून, परशुरामपंताचे मनांत रामचंद्रपंताविषयीं वैमनस्य उत्पन्न होऊन, तें बरेंच वृद्धिंगत होत चाललें होतें. ताराबाईनें आपले मुलास गादीवर बसविण्याचा उपक्रम चालविला, हें रामचंद्रपंतास बिलकुल आवडलें नाहीं. शाहूची सुटका झाल्यावर दोघांच्या मुंजी एकदम कराव्या, असा रामचंद्रपंताचा सल्ला होता. पण परशुरामपंत व शंकराजी नारायण यांचा ओढा ताराबाईकडे असल्यामुळें, ताराबाईचें म्हणणें कबूल करावें, असा त्यांनीं रामचंद्रपंतास आग्रह केला. रामचंद्रपंतानेंही प्रसंग पाहून कलह मिटविण्याकरितां माघार घेतली, आणि कल्याणप्रद असेल तें करण्यास सांगितलें. नंतर मुंजीचा निश्चय करून समारंभ आटपल्यावर, पन्हाळे मुक्कामीं राज्याभिषेक झाला (सन १७०१). त्या वेळीं पूर्वींचेच अष्टप्रधान कायम करण्यांत आले. मात्र प्रतिनिधिपद हणमंते याजकडून काढून परशुराम त्रिंबक यास देण्यांत आलें, आणि त्याजबद्दल पोषाख व सरंजाम नेमून दिला. बुवाकर घाडगे यांची कन्या भवानीबाई इच्याशीं शिवाजीचें लग्न करण्यांत आलें. ह्या वेळीं त्याचें वय दहा वर्षांचें होतें. राजसबाई व तिचा तीन वर्षांचा मुलगा संभाजी यांस ताराबाईनें कैदेंत ठेविलें.

ह्या नवीन व्यवस्थेनें मराठशाहींत एकदोन अनिष्ट प्रकारांचा उद्भव झाला. पुढें फाटाफूट होण्यास हेच प्रकार बरेच अंशीं कारण झाले. तेव्हांपासून सरदारांमध्यें आपआपसांत हळूहळू वैमनस्यें उत्पन्न होत

चालली, त्यांमुळें पुढील साठ वर्षांत एकंदर मराठ्यांचे राज्यांत अनेक भानगडी उपस्थित झाल्या. ताराबाईनें मराठशाहींत दुहीचें बीज पेरिलें. ही बाई विलक्षण महत्त्वाकांक्षी, दीर्घसूत्री, स्वार्थसाधु, व हिंमतवान होती. ह्या स्वभावानुरूप तिला आयुष्यही उदंड होतें. राजारामाचे मृत्यूपर्यंत तिला ढवळाढवळ करण्यास अवसर मिळाला नाहीं. परंतु तो मरण-पावतांच तिनें दुहीचें बीज पेरिलें, तें मराठशाहीला बरेंच बाधक झालें. राज्याचा खरा वारस शाहू हें राजारामानें अनेक वार नुसतें कबूल केलें होतें, इतकेंच नव्हे, तर त्यास सोडवून आणण्याकरितां त्यानें प्रयत्नही केले होते. स्वत: शाहूच्या नांवानें तो राज्य चालवीत होता. सर्व लहान थोर सरदारांचा समज असाच होता. राजारामाच्या कागदपत्रांत त्याचे अनेक उल्लेख आहेत. येसूबाईनें सर्व भरंवसा राजारामावर टाकिला होता, व राजारामही तीस विसरला नाहीं. राजारामाचे मृत्यूसमयीं शत्रु दाराशीं आ करून बसलेला व शाहु कैदेंत. अशा प्रसगीं दूरदर्शीपणानें पुढचा विचार करण्याचें सोडून, ताराबाई स्वार्थाचे पाठीस लागली. रामचंद्रपंतासारख्या वाकबगार मुत्सद्याच्या सल्ल्याचा अव्हेर करून, तिनें शिवाजीस राज्याभिषेक करविला. परशुरामपंतास आपले हाताखालीं घेऊन तिनें रामचंद्रपंताचें मन दुखाविलें. रामचंद्रपंतानें मात्र तीस कधीं दगा दिला नाहीं. भांडण करण्यापेक्षां तिच्याच अनुरोधानें चालणें बरें, असें समजून तो तिचा कारभार हांकीत होता. सारांश, थोरल्या शिवाजीमहाराजांनीं सर्व गोष्टी राष्ट्राकरितां करावयाच्या, असा जो उदात्त कित्ता घालून दिला होता, तो इत:पर एकीकडे राहून, राज्यामध्यें दुही माजत चालली. तेणेंकरून राष्ट्राचें मोठें नुकसान झालें.

दुसरा प्रकार ह्याहीपेक्षां विघातक होता. राज्यव्यवस्था, लष्कर, लढाई, व लूट वगैरे संबंधाची शिवाजीनें घालून दिलेली पद्धति ह्या वेळेपासून बहुतेक नाहींशी झाली. सतत पंचवीस वर्षें शत्रु दाराशीं येऊन बसल्यामुळें राष्ट्रांतील सर्व लोकांस लढण्याचें प्रयोजन पडलें, आणि सर्वांचे ठिकाणीं युद्धाचा आवेश उत्पन्न करण्याची आवश्यकता उत्पन्न झाली. यासाठीं अर्थातच त्यांस कांहीं तरी लालूच दाखविणें जरूर होतें. म्हणून पूर्वीचे सक्त नियम रद्द होऊन, मिळविलेल्या लुटीचा जो तो आपणच मालक होऊं लागला. तसेंच मोगलांच्या ताब्यांतला प्रदेश जो सरदार जिंकील

त्याजकडेच त्याची व्यवस्था सोंपणें ही गोष्ट अपरिहार्य झाली. ह्या व्यवस्थेचा उपयोग त्या आपत्प्रसंगीं कितीही झाला असला, तरी त्यानें मराठी राज्याची फाटाफूट होण्यास सुरुवात झाली. जहागिरी वगैरे पृथक्‌ रणें सरदारांस तोडून मिळूं लागल्यामुळें राज्याचे तुकडे झाले. एकवार जो प्रघात पडला, तोच पुढें अवश्य चालू राहिला. शिवाजीच्या प्रधान हेतूचा अशाप्रकारें विलक्षण विपर्यास झाला. प्रस्तुत प्रसंगीं मात्र ह्या तजविजीनें राष्ट्राचा बचाव झाला. ताराबाईच्या वेळेपासून बरीच बेबंदशाई व दुफळी होऊं लागल्यामुळें वरील प्रकार वाढत गेला. मराठी राज्यावर शूर, बुद्धिमान् व साहसी सरदारांचा समाईक हक्क आहे, आणि जो जितकें जिंकून येईल, तें तितकें त्याचेंच आहे, असा भरंवसा वाटूं लागल्यामुळें, त्यांस मोठमोठे पराक्रम करण्याची हुरूप उत्पन्न झाली, आणि राज्यावर आलेल्या भयंकर आघाताचें तात्पुरतें निवारण झालें. तथापि एकवार सुरू झालेली पद्धत पुढें बंद करणें अशक्य झालें. महाराष्ट्रांत म्हणजे मराठ्यांचा जमाव फार वाढला. वाटेल त्यानें एक चपळ घोडा, बंदुक, तलवार व भाला मिळवावा, आणि शिपाई बनावें. अशा कांहीं लोकांची टोळी बने, आणि कोणा तरी सरदाराच्या 'निशाणाखालीं राहून मुलखांत शिरे. त्यांस वतनाची काळजी बेताचीच असे. बहुधा लुटीवर खर्च भागवीत दसऱ्यास बाहेर पडत, ते मृगसालास मुक्कामीं येत. अशा टोळ्यांनीं देश व्यापून गेला.

ताराबाई जबरदस्त उद्योगी होती. निरनिराळ्या किल्ल्यांवर फिरती राहून, तिनें ठिकठिकाणचा बंदोबस्त केला. धनाजी जाधवानें मैदानांत शत्रूशीं सामना करण्याचा क्रम चालवून, मोगलांस पुरेपुरे केलें. त्याचप्रमाणें इतर सरदारांनींही जिकडे तिकडे उच्छेद मांडिला.

३. महाराष्ट्रांतील किल्ल्यांचा पाडाव (सन १६९९-१७०५).— सन १६९९त ब्रह्मपुरी सोडून औरंगजेब मराठ्यांचे किल्ले काबीज करण्यास जातीनिशीं निघाला. वीस दिवसांनीं तो वसंतगड किल्ल्याखालीं आला. वसंतगड कऱ्हाडाजवळ कृष्णा आणि कोयना यांचेमध्यें आहे. तो किल्ला बादशहानें तीन दिवसांत घेतला; आणि स्वारी मुर्तुजाबाद ऊर्फ मिरज येथें आली. त्या ठिकाणीं शहाजादा अजीमशहाही त्यास येऊन मिळाला. ह्याच वेळेस राजाराम उत्तरेकडच्या स्वारीस गेला होता. पन्हाळा किल्ला

नजीक असल्यामुळें, मिरजेहून बादशहाची स्वारी तिकडे जाईल, अशा अदमासानें रामचंद्रपंतानें त्या किल्ल्याचा बंदोबस्त उत्तम ठेविला होता, परंतु बादशहाची स्वारी एकदम साताऱ्याकडे वळली.

सातारचा किल्ला व प्रयागजी अनंत (८ डिसेंबर–२१ एप्रिल ).– साताऱ्याचा बंदोबस्त चांगला नव्हता. धान्य व सामुग्री फार दिवस पुरण्याजोगी नव्हती. बादशहाचे छावणीचा तळ उत्तरेस करंजे गांवाजवळ व अजीमशहाचा पश्चिमेस होता, त्यास पुढें शहापुर नांव पडलें. दुसऱ्या दोन बाजूंस तर्बियतखान व सर्जाखान हे मोर्चे लावून बसले होते. ह्याप्रमाणें मोठ्या बंदोबस्तानें किल्ल्याची नाकेबंदी करण्यांत आली. प्रयागजी प्रभु नांवाचा मराठ्यांचा हवालदार किल्ल्यावर होता. हा शिवाजीचे वेळेपासून नांवाजलेला असून, प्रस्तुत प्रसंगीं किल्ल्याच्या संरक्षणाचें काम त्यानें फारच चतुराईनें चालविलें. किल्ल्यावरून खालीं शत्रूंच्या अंगावर मोठमोठे दगड लोटून व गोळ्यांचा वर्षाव करून, त्यानें त्यांस जेरीस आणिलें. बादशहाच्या छावणींत धान्याचा पुरवठा होईना. किल्ल्याचे सभोंवार वीस कोसपर्यंत सर्व प्रदेश मराठ्यांनीं जाळून उद्ध्वस्त केला. त्यांतूनही जी सामग्री छावणीत येई, ती मराठे केव्हांच लुटून नाहींशी करीत. तसेंच परशुराम त्रिंबक चतुराईनें परळीचे किल्ल्यावरून, सातारचे किल्ल्यांतील लोकांस बाहेरून धान्याचा थोडा बहुत पुरवठा करूं लागला. असे तीन चार महिने गेले; बादशहा विचारांत पडला. पुढें तर्बियतखानानें ईशान्येच्या मंगळाईचे बुरुजाखालीं दोन मोठे सुरुंग तयार केले. ही बातमी किल्ल्यावरील लोकांस नव्हती; सुरुंग उडतात कसे, हें पाहण्याकरितां बादशहाची स्वारी मोठ्या थाटानें बाहेर आली होती; आणि ती स्वारी पाहण्याकरितां बुरुजावर किल्ल्यांतील पुष्कळ लोक एके ठिकाणीं जमले होते. सुरुंगास बत्ती दिल्याबरोबर भयंकर कल्लोळ होऊन, डोंगराचा एक मोठा खडपा वरील बुरुजासह एकदम जोरानें वर आकाशांत उसळून किल्ल्यांत पडला; त्याबरोबर मराठ्यांचे शेंकडों लोक प्राणास मुकले. हें पाहून मुसलमान फौज किल्ल्यांत जाण्याकरितां जोरानें पुढें घुसली. दुसरा सुरुंग पहिल्याप्रमाणेंच आंत उडेल असा त्यांचा अदमास होता; परंतु मोगल फौज नजीक येण्याबरोबर तो सुरुंग पहिल्याप्रमाणेंच महावेगानें उडाला, त्याचा कल्लोळ मुसलमानांच्या

डोक्यावरच खालीं येऊन पडला; त्या योगानें त्यांचे दोन हजार लोक मरण पावले. बादशहास तर फारच दुःख झालें. किल्ल्याचा हवालदार प्रयागजी प्रभु हा मातीच्या व दगडांच्या ढिगांत सांपडला; परंतु तेथें त्यास कांहीं इजा न होतां तो मोठ्या नशीबानें वांचला. ह्या योगानें लोकांस पुनरपि हुरूप येऊन, बुरूज वगैरे दुरुस्त करून ते पुनः वीरश्रीनें लढूं लागले. मुसलमानांचें धैर्य अगदींच खचून गेलें. तेव्हां बादशहानें स्वतः सर्व फौजेच्या पुढें होऊन, त्यांस धीराच्या चार गोष्टी सांगितल्या व पुनः लढण्यास उद्युक्त केलें. आतां मात्र मराठ्यांचा निभाव फार दिवस लागण्याजोगा नव्हता. सामग्री संपली, पुष्कळ लोक जाया झाले, इकडे राजाराम मरण पावला, किल्लेदार प्रयागजी अनंतही अगदीं जेरीस आला, किल्ल्याचा एक तट पडून त्याचे बहुतेक लोक मेले. अशी स्थिति प्राप्त झाल्यामुळें, परशुराम त्रिंबकनें आपण होऊन किल्ला स्वाधीन करून देतों, असें अजीमशहामार्फत बादशहापाशीं बोलणें लाविलें. त्यानें तें तत्काळ मान्य केलें. तेव्हां प्रयागजी अनंतनें साताराचा किल्ला खालीं करून, किल्ल्या बादशहाकडे पाठवून दिल्या. अजीमशहाचे मार्फत किल्ला हस्तगत झाल्यामुळें, त्यास अजीमतारा हें नांव बादशहानें दिलें.

प्रभुरत्नमालेंत प्रयागजी प्रभूची हकीकत दिलेली आहे, तींत कांहीं प्रमाद आहेत, ते दाखविण्याचें स्थळ हें नसल्यामुळें, प्रयागजीची थोडी हकीकत मात्र येथें देतों. प्रयागजी अनंत फणसे पनवेलकर हा प्रभु गृहस्थ सन १६४९ पासून शिवाजीपाशीं होता, आणि तेव्हांपासून सातारा व परळी ह्या दोन परगण्यांची सुभेदारी त्याजकडे होती. साताऱ्याचे किल्ल्यांत युवतेश्वर महादेव म्हणून सोमेश्वराची मूर्ति आहे, तिची स्थापना प्रथमतः प्रयागजीनें केली. युवत म्हणजे कळकीचें झाड; प्रयागजीस दृष्टान्त होऊन युवताच्या झाडींत सोमेश्वर प्रगट झाला, म्हणून युवतेश्वर असें नांव पडलें. मराठी राज्यांत इतरत्र पुष्कळ उलाढाली घडून आल्या, तरी प्रयागजीचा अधिकार पहिल्यापासून कायम होता. साताऱ्यावर राजधानी झाल्यापासून, प्रयागजीचें महत्त्व विशेष वाढलें; आणि त्याच्या अंगचे गुण निदर्शनास आले. तथापि इतिहासांत त्याचें नांव स्मरणीय होण्यास वरील वेढ्यांतील त्याचा पराक्रम कारण होय. असें सांगतात, कीं प्रयागजीचे लोक किल्ल्यावरून खालीं मोगल फौजेवर नाना वस्तूंचा

वर्षाव करीत. शत्रुसैन्यांत धांवपळ होतांच, तोफांत खाजकुइरी भरून तोफा उडविण्याचाही क्रम होता. शेवटीं किल्ला खालीं झाला, ह्यांत प्रयागजीची कसूर नाहीं. पुनः किल्ला मराठ्यांचे ताब्यांत आल्यावर त्याचीच तेथें नेमणूक झाली. शाहू छत्रपति इकडे आल्यावर प्रयागजी त्यास जाऊन मिळाला, आणि पुढें लवकरच मरण पावला. प्रयागजीचा पुत्र जोतिबा ऊर्फ अप्पाजी याचे दोन मुलगे रावजी व बाबाजी हे बडोदे राज्यांत प्रसिद्धीस आले. हल्लीं रावजी अप्पाजी व बाबाजी अप्पाजी यांचीं घराणीं बडोद्यांत आहेत.

परळी ( स. १७००, एप्रिल ३ ते ९ जून).–साताऱ्याचा किल्ला काबीज झाल्याबरोबर बादशहानें परळी ऊर्फ सज्जनगड या किल्ल्यास वेढा घातला. येथेंही त्याच्या फौजेची पुष्कळ खराबी झाली, तरी शेवटीं जेरीस येऊन दोन महिन्यांनीं हाही किल्ला मराठ्यांनीं खालीं करून दिला. ह्या प्रसंगीं फत्तुल्लाखान हा बादशहाकडील प्रमुख सरदार होता. बादशहानें त्यास नवरसतारा असें नांव दिलें.

परळी व सातारा हे किल्ले काबीज झाले, त्याविषयीं एक हकीकत खाफीखानानें दिली आहे. राजाराम मरण पावला त्या वेळेस परशुराम त्रिंबक परळीच्या किल्ल्यावर राहून कारभार पाहत होता. राजारामाच्या मृत्यूची वार्ता ऐकून, परळीच्या किल्लेदारास न विचारतां, परशुराम त्रिंबक बादशहास शरण गेला, त्यामुळें किल्लेदारही घाबरून जाऊन, कांहीं शर्तींवर किल्ला बादशहाचे स्वाधीन करण्यास तयार झाला त्या वेळीं बादशहा साताऱ्यास वेढा घालून बसला होता. सुभानजी लांबघरे म्हणून साताऱ्याचा किल्लेदार होता. त्याचें व परळीच्या किल्लेदाराचें वांकडें होतें, म्हणून 'परळीच्या किल्लेदाराचें बोलणें नाकबूल केल्यास मी होऊनच सातारा व परळी हे दोनही किल्ले आपल्या स्वाधीन करून देतों,' असें सुभानजीनें बादशहाकडे बोलणें लाविलें. बादशहानें ती गोष्ट मान्य करून, सातारा किल्ला ताब्यांत घेतला, आणि सुभानजी यास पाच हजारांची मनसब व परळीच्या देशमुखीची सनद दिली. शाहू परत आल्यावर त्यानें सुभानजीच्या फितुरीस्तव त्याचें निमें वतन खंडोजी गुजर यास दिलें. ( इ. सं. ) परशुराम त्रिंबक बादशहास फितुर नव्हता. बादशहाच्या कपटपत्रानें लोकांचा भलताच समज झाला. उलट पक्षीं मराठ्यांनींही

बादशहास कपटविद्येनें फतावेण्यास कमी केलें नाहीं. अबूहसन कुत्बशहा दौलताबादच्या किल्ल्यावर कैदेंत होता. तो मराठ्यांनीं पळवून नेला, आणि लवकरच गोवळकोंड्याचें राज्य तो पुनः हस्तगत करणार, अशीं पत्रें मराठ्यांनीं चहूंकडे पाठविलीं. अनेक मोगल सरदारांसही तें खरें वाटलें आणि ते मराठ्यांच्या पक्षांत आले. तेव्हां बादशहा मोठ्या फिकिरींत पडला. त्यानें सन १७०० च्या सुमारास अबूहसन यास दौलताबादेहून काढून ग्वाल्हेरच्या किल्ल्यांत नेऊन ठेविलें बहादूरखान नांवाचा एक हुशार पठाण सरदार दाऊदखानाच्या हाताखालीं कर्नाटकांत होता. तो मराठ्यांस सामील आहे, अशा संशयावरून त्यास बादशहानें पकडून कैदेंत ठेविलें. मराठ्यांनीं त्यास कैदेंतून सोडवून आपल्या बाजूस आणिलें, (स. १७०१). त्याने मराठ्यांच्या बाजूस चांगले पराक्रम केले ( मनूची ).

परळीचा किल्ला जून महिन्यांत बादशहाच्या ताब्यांत गेला. अगोदरच बादशहाची पुष्कळ फौज खराब झाली होती, तशांत घाटांतील जोराचा पावसाळा सुरू झाला, त्यामुळें बादशहाच्या फौजेचे विलक्षण हाल झाले. परत जाण्यास मार्ग नव्हता. ओझ्याचीं जनावरें मरून गेलीं. सामान-सुमान वाहून गेलें. परत येतांना कृष्णेला उतार नव्हता. कित्येकांनीं पोहून जाण्याचा प्रयत्न केला, त्यांपैकीं नऊदशांश लोक मेले ! शेवटीं मोठ्या कष्टानें बादशहाची स्वारी माणनदीचे कांठीं खवासपुर येथे मुक्काम आली. ह्या ठिकाणीं बादशहानें आपल्या फौजेची पुनः एकवार चांगली व्यवस्था केली. त्यानें उत्तरहिंदुस्थानांतून मुबलक पैसा आणिला. बऱ्हाणपुर विजापुर, हैदराबाद, अहंमदाबाद येथील सुभ्यांस पत्रें पाठवून त्यानें नवीन फौज तयार करविली.

पावसाळा संपल्यावर, झुल्फिकारखान, तर्बियतखान, व बेदरबख्त यांनीं ५० हजार पायदळ व ३० हजार स्वार घेऊन पन्हाळ्याच्या किल्ल्यास वेढा घातला. हा वेढा दोन महिने चालला. ह्या कामावर देखरेख ठेवण्याकरितां स्वतः बादशहा मिरजेस आला. ह्या वेळीं वेढा उठविण्याची धनाजीनें शिकस्त केली; बादशाही छावणीच्या पंचक्रोशींतला मुलूख व छावणींत येणारें धान्य लुटलें, त्या वेळीं झुल्फिकारखान व दलपत बुंदेले ह्यांनीं धनाजीस मागें हटविलें. पुढें बादशहा स्वतः आणखी फौज घेऊन मदतीस आला, तेव्हां आंतील लोक जेरीस येऊन, त्यांनीं पन्हाळा

व नजीकचा पवनगड मोगलांचे स्वाधीन केले ( सन १७०१ ). त्यानंतर नंदागिरी व चंदनवंदन हे किल्ले फत्तुल्लाखानानें काबीज केले. नंदागिरि हल्लींच्या सातारारोड स्टेशनानजीक आहे.

स. १७०१ चा पावसाळा खतगुण ( खटाव नजीक येरळा नदीच्या कांठीं ? ) येथें काढून ता. १३ नोव्हेंबर रोजीं बादशहा खेळण्यापाशीं आला, आणि फौजेचे तीन भाग करून किल्ल्यास वेढा घातला. ह्या ठिकाणींही बादशहाचे फौजेस पुष्कळ कष्ट सोसावे लागले. फत्तुल्लाखानानें अतोनात श्रम करून वेढ्याचें काम जारीनें चालविलें. हा वेढा सहा महिने चालला. स्वतः परशुरामपंत ह्या किल्ल्यावर होता. अवघड जागीं मोगल फौजांस लुटून त्यानें पुष्कळ सामग्री किल्ल्यांत नेली. शेवटीं निरुपाय होऊन परशुरामपंत किल्ला सोडून गेला. बादशहा हट्ट सोडीना आणि मोगल फौज रडकुंडीस आली, तेव्हां परशुरामपंतानें निघून जावें आणि त्याच्याच लोकांनीं बादशहाचें निशाण किल्ल्यावर चढवावें, असें बोलणें होऊन, किल्ला ताब्यांत आला, अशी बादशहाची समजूत करण्यांत आली. ( जून ता. ४, १७०२ ). बादशहा कुराण पढत असतां ही बातमी आली त्या वेळीं ' सकरलाना ' असे शब्द त्याच्या तोंडांत होते. तोच शुभशकुन समजून 'सकरलाना ' हें नांव बादशहानें किल्ल्यास दिलें.

स. १७०२ च्या पावसाळ्यांत बादशहानें बहादुरगडास मुकाम केला. तेथें येण्यास त्यास एक महिना लागून पावसांतून अत्यंत हाल झाले. पावसाळा संपल्यावर बादशहानें कोंडाणा ऊर्फ सिंहगड किल्ल्यास वेढा घातला. हा वेढा सुमारें साडेतीन महिने टिकला. पुढें किल्लेदारास पुष्कळ पैसे भरून किल्ला बादशहानें घेतला. तेथून पुण्यास स. १७०३ चा पावसाळा काढून बादशहाची फौज राजगडावर आली. हैनाजी ( ? ) नांवाचा किल्ल्यावर किल्लेदार होता. त्याजकडून बादशहानें तोरणा किल्ला काबीज केला ( मार्च १७०४ ). तसेंच पुरंदर, पांडवगड वगैरे किल्ले बादशहाच्या दुसऱ्या टोळ्यांनीं काबीज केले. ह्याप्रमाणें बरेच किल्ले स्वाधीन झाल्यावर, बादशहानें स.१७०४चा पावसाळा खेड येथें काढिला.

**४. मराठ्यांचा कावा, व बादशहाची दुर्दशा.**—बादशहा वर सांगितल्याप्रमाणें मराठ्यांचे किल्ले भराभर काबीज करीत चालला होता, यावरून मराठे उत्तरोत्तर दुर्बल होत चालले होते, अगर बादशहाचा

अंमल महाराष्ट्रावर चांगला बसत चालला होता, असें मुळींच नाहीं. बादशहाचा फार दिवसांचा उद्देश अद्यापिही सिद्धीस जाण्याची आशा नव्हती. उलट पक्षीं खरी स्थिति पाहिली तर मराठ्यांचीच सत्ता दिवसें-दिवस वाढत होती. मराठ्यांचे हे डोंगरी किल्ले काबीज करण्यांत मराठ्यांपेक्षां बादशहाचेंच नुकसान ज्यास्त होत चाललें होतें. एकामागून एक आपले किल्ले मराठ्यांनीं बादशहाचे स्वाधीन केले, यांत त्यांनीं स्वतःचा फायदाच पाहिला. विशेष त्रास पडल्याशिवाय जितका वेळ किल्ला लढवेल तितका लढवायचा, तेवढ्या वेळांत होईल तितका शत्रूंचा नाश करावयाचा, स्वतःचे लोकांची हानि फारशी होऊं द्यावयाची नाहीं, व अगदींच हातघाईवर काम आल्यास, आपण होऊन किल्ला खालीं करून देऊन निघून जावयाचें, अशी युक्ति मुद्दामच योजण्यांत आली. इकडे किल्ल्याबाहेरच्या मराठी फौजेनें बादशहाचे छावणीसभोंवार घिरट्या घालून, त्याचें सामानसुमान लुटावें, बाहेरून येणारी रसद व खजिना मारून न्यावा; त्यांतूनही पावसाची वेळ व किल्ला खालीं करून देण्याची वेळ एक आणावी, असाच प्रकार मराठ्यांनीं मुद्दाम घडवून आणिला. अशा अनेक युक्त्या त्यांनीं केल्या. जो किल्ला ताब्यांत येई, त्यांत अगर त्याचे आजूबाजूस मोगल फौजेस अन्न सुद्धां मिळावयाचें नाहीं. डोकीवर एकसारखा पाऊस; नदीनाले असे तुडुंब भरून गेलेले, कीं बादशहाच्या मिजासी फौजेचें त्यांजपुढें कांहींच चालूं नये. येणेंकरून किल्ले घेण्याच्या कामीं बादशहास कांहींच लाभ न होतां, उलट नुकसान मात्र होत होतें. आपण आहों कोठें, व करतों काय, हें समजण्याइतकी सुद्धां त्याची बुद्धि आतां तीव्र नव्हती. मराठ्यांनीं मात्र धूर्तपणा केला. किल्ले कांहीं दिवस शत्रूंच्या हातीं गेले तर जाऊं देत, थोडी बेअब्रू झाली तरी पत्करलें, पण त्यापायीं विनाकारण नुकसान व्हावयाला नको. वस्तुतः या पद्धतीनें त्यांचें म्हणण्यासारखें नुकसान कांहींच झालें नाहीं. किल्ले कायमचे ताब्यांत ठेवण्यास ज्या तजविजी कराव्या लागतात, त्या बादशहाकडून कधीं झाल्या नाहींत, व होण्याजोग्याही नव्हत्या. त्यामुळें इकडून किल्ले काबीज करीत जसजसा बादशहा पुढें जाई, तसतसे मराठे मागून येऊन तेच किल्ले अल्पायासानें पुनः परत घेत. यामुळें मराठ्यांचें नुकसान न होतां बादशहाची खराबी झाली.

मनूचीनें या वेळच्या स्थितीचें वर्णन चांगलें दिलें आहे. 'स. १७०४त दाऊदखान पन्नी अडोनीच्या सुभ्यावर जात असतां, मराठ्यांनीं त्याच्यावर छापा घातला. तेव्हां त्यानें मराठ्यांस सात लक्ष रुपये भरून आपला बचाव केला. बादशहाच्या फौजेंत इतकी अव्यवस्था होती कीं, बंडखोर पठाण समशेरखान पकडण्यासाठीं बारा हजारांचा रिसाला त्यानें रवाना केला, त्यापैकीं सातशें बावन पडले, तेव्हां समशेरखानाचें डोकें हातीं आलें. इतकें वर्षे औरंगजेब मराठ्यांना जिंकण्याचा उद्योग करीत आहे, त्याच्या बाजूस दरसाल एक लाख माणसें, आणि हत्ती, घोडे, बैल, उंट वगैरे जनावरें दरसाल तीन लाख मरण पावलीं. एवढ्या अफाट राज्यांत आज स्थिति अशी आहे कीं, मोठमोठ्या सरदारांस सुद्धां उपास काढण्याची पाळी येते. त्यांची बायकामुलें पुष्कळदां रस्त्यांतून पोटासाठीं भिक्षा मागतात. मोटमोठ्या सरदारांच्या बायकांच्या अंगावर एक लांब चादरीपेक्षां दुसरें कांहीं एक नसतें.

'दक्षिणेंत स. १७०२ पासून ०४ पर्यंत पाऊस पडला नाहीं; आणि प्लेग सुरू होता ह्या कारणांनीं या दोन वर्षांत वीस लाखांवर लोक मेले. आईबापांना पोटासाठीं मुलें विकण्याची पाळी आली. दरमुलास आठ किंवा चार आणे देऊन सुद्धां त्यांस विकत घेण्यास कोणी मिळत नसे. कोंकणासारख्या अवघड ठिकाणीं बादशहाच्या फौजा जाऊं लागल्या, म्हणजे केव्हां केव्हां लष्करी अधिकाऱ्यांवर असा प्रसंग येई, कीं स्वतः पीठ घेऊन कोणाच्या तरी घरीं जावें, आणि दोन रुपये मजुरी देऊन तेवढ्याची भाकरी भाजून घ्यावी. नोकरचाकरांना तर झाडाचा पाला मिळाला म्हणजे भाग्य. गेल्या पंचवीस वर्षांत बादशहाला किती खर्च लागला, आणि त्याचीं किती माणसें मेलीं, याची गणितच नाहीं. पण यामुळें बादशहाच्या अंतःकरणांस यत्किंचित् द्रव आला नाहीं. एखादे वेळीं पुष्कळ माणसें मरून नुकसान झाल्याची बातमी आली, म्हणजे तो जवळच्या मंडळींस म्हणे, "असा संहार होतो तेव्हांच तयमूरलंगासारखी कीर्ति मिळते."

'खेळण्याचा वेढा चालू असतां मराठ्यांनीं बऱ्हाणपुरावर हल्ला करून तेथील मोगल अधिकाऱ्यास पकडिलें आणि शहर सर्व लुटलें. त्या अधिकाऱ्यानें दंड भरून आपली सुटका केली. त्याचप्रमाणें लगेच गोवळकों-

ऱ्यावर स्वारी करून तेथूनही पुष्कळ लूट त्यांनीं आणिली. मराठयांचे किल्ले काबीज केल्याची फुशारकी व बक्षिसें बादशहाकडून मिळवावीं, म्हणून कित्येक मोगल अधिकाऱ्यांनीं मराठयांस पैसे भरून थोडा वेळ पावेतों कांहीं किल्ले काबीज केले. स. १७०४ च्या जानेवारींत मराठे सरदारांनीं विजापुरच्या हद्दींत शिरून यथेच्छ लूट केली; आणि सर्व भागांतून चौथाइचा वसूल चोपून घेतला. लगेच त्यांनीं त्या स्वारींत पूर्व किनाऱ्यापावेतोंच्या प्रदेशांत शिरून चौथाई वसूल केली.

'मराठ्यांच्या स्वाऱ्या त्यांजला अतिशयच फायदेशीर होऊं लागल्या. मोगलांच्या हद्दींत त्यांनीं पाय टेविल्याबरोबर बादशहाचे अधिकारी त्यांजकडे माणसें पाठवून काय रक्कम पाहिजे ती ठरवितात. मागितल्याप्रमाणें रक्कम मिळाली तर बरें, नाहीं तर, लगेच सर्वत्र जाळपोळ सुरू होते. हल्लीं मराठ्यांचा राजा सर्वशक्तिमान् आहे. त्याजवळ एक लाख स्वार जय्यत तयार आहेत. अशा फौजेनिशीं तो मोगल बादशहाशीं झगडण्यास मुळींच कचरत नाहीं. पूर्वी जसा औरंगजेब इतर राजांस धाक दाखवी, तसा धाक हल्लीं मराठ्यांचा राजा सर्वांस दाखवीत आहे.' ( मनूची पु. ४ ).

मनूचीच्या ह्या लिहिण्यांत पुष्कळ अर्थ आहे. मराठ्यांच्या कारभारांत दुहीनें प्रवेश केला नसता तर, दहावीस वर्षांत सर्व हिंदुस्थानचें राज्य काबीज करण्याची ताकद इतक्या वर्षांच्या मेहनतीनें व शिक्षणानें मराठ्यांच्या अंगीं आली होती. शौर्य व पराक्रमी माणसें व साहित्य सर्व भरपूर होतें; पण कायदा व शिस्त लावणारा नेता त्यांस नव्हता. अव्यवस्थितपणा हा मराठ्यांचा स्वभावें आहे. चालुक्यांचे वेळेपासून अद्याप पावेतों त्यांच्या ह्या स्वभावाचें प्रदर्शन इतिहासांत पदोपदीं आढळतें.

मराठे लोक स्वार्थानें कसे प्रवृत्त होत, याचीं उदाहरणें पुष्कळ आहेत. मावळांतल्या मुरुमखोऱ्यांतले सिलीमकर देशमुख शिवाजीच्या वेळेपासून राष्ट्रीय कामगिरींत होते. त्यांचे कागद १७ व्या खंडांत छापलेले असून, त्यांवरून त्या घराण्याचे उद्योग थोडेबहुत कळतात. या घराण्यास 'हैबतराव'

सिलीमकर देशमुख.




असा किताब होता. विठोजीची मुलगी खंडेराव पानसंबळ यास दिलेली होती.(पृ.५१७). बादशहाशीं झगडण्यांत प्रतापजीनें चांगलाच पराक्रम केला. ' संताजी हैबतराव किल्ले राजगडीं ठेविले होते. त्यास सालमजकुरीं औरंगजेबानें परीघ घातला. गनिमानें लगट केली, ते समयीं मशारनिल्हे यांनीं तरवारेची शर्थ केली. गनिमाचा गोळा लागोन स्वामीकार्यावर ठार झाले. त्यावर तुम्ही हुजूर येऊन विनंती केली, कीं आपल्यास कदीम हक आहे, त्याखेरीज ज्यास्ती नूतन हक करून दिल्हा, तरी योगक्षेम चालेल. आपले बाप स्वामिकार्यावरी पडले आहेत, आपणही एकनिष्ठ आहों. ऐशास तुम्हास नूतन हक दरगांवास मोईन करून दिली असे.' ( जानेवारी १७०४ ). अशाच मासल्याचीं पुष्कळ पत्रें आहेत. राष्ट्रीय भावनेपेक्षां वेतनांच्या स्वार्थी आशेनें मराठे लढण्यास उद्युक्त होत होते, हें विधान अशा पत्रांतून पदोपदीं व्यक्त होतें.

बादशहा किल्ले काबीज करीत असतां मराठे सरदारांस एकसारखें प्रोत्साहन मिळत होतें. प्रतापराव मोरे यास धाकटे शिवाजी छत्रपति यानें लिहिलेलें एक पत्र येणेंप्रमाणें:-' तुम्ही व राजश्री संताजी पांढरे फौजेनिशीं मलकापुरानजीक औरंगजेबाची चौकी होती ते मारिली, हें वर्तमान कळल्यावरी स्वामींनीं तुम्हांस आज्ञापत्रें पाठविलीं आहेत. तीं पावून वर्तमान कळलेंच असेल. औरंगजेब विशाळगडास बिलगला, याजकरितां त्याचे कबिलाबाड मारून हमेशां गोटावर हल्ले करावे, तरीच तो बलकुबल राहतो. याजकरितां तुम्ही व जे सरदार फौज घेऊन मुकाबला लोक आपले अवघे एकदील होऊन औरंगजेबास जडून राहणें. तुम्ही

स्वामींचे एकनिष्ठ सेवक, मायेचे विश्वासू आहां, तरी या प्रसंगीं साहस करून मुख्य शत्रूच्या मुकाबल्यास आलेत, ये गोष्टीनें औरंगजेब दिक होऊन थोरच कार्य होऊं आलें. प्रस्तुत स्वामीचा मुक्काम किल्ले प्रतापगडीं झाला आहे. बलकुबलीच्या प्रसंगास स्वामीची तोलदार फौज असली पाहिजे. औरंगजेब गनीम दगेखोर आहे. कोणे समयीं काय विचार करील, तो कांहीं कळत नाहीं. त्यास तुम्ही बळकट फौजेनिशीं या तोंडें राहिलेत, तरी त्याचे वस्तु चळवळ करवत नाहीं. आजिचे प्रसंगीं भरंवसा तुम्हा लोकांचा आहे, व स्वामीचे मायेचे आहां; याकरितां ये गोष्टीचें अगत्य धरून फौजेनिशीं या तोंडें राहून औरंगजेबाचे कबिला गड मारून हैराण करणें. तो विशाळगडचा ख्याल सोडी, तुम्हा लोकांच्या कीर्ति होऊन स्वामी समाधान पावत, ऐसी गोष्टी करणें. दूर प्रांतें स्वारीस जाल तर हें तोंड सहजच मोकळें होईल, म्हणजे औरंगजेब एखादी फौज त्या तोंडें पाठवावयास उशीर लावणार नाहीं. समयीं स्वामीसमीप तुम्हास यावया गांठ पडणार नाहीं. याकरितां औरंगजेबास सोडून दुसरे [ कडे ] सर्वथा न जाणें; समीपच राहोन स्वामी खुशाल या जागीं राहत, अशी गोष्टी करणें; राज्य रक्षणें. " ( भारत वर्ष ).

बाकी किल्ले घेण्याच्या नादीं बादशहा लागला, यांत त्याचा तरी सर्व प्रकारें दोषच होता असें म्हणतां येत नाहीं. मराठी राज्याचा सारा प्राण काय तो त्यांचे किल्ले, जोंपर्यंत प्राणावर आघात झाला नाहीं, तोंपर्यंत नुसते हातपाय तोडल्यानें फार तर तें राज्य लंगडें होईल, इतकेंच; पण त्याचा जीव जावयाचा नाहीं. शिवाजीची सारी भिस्त किल्ल्यांवर. मराठी फौजेस किल्ल्यांचा आश्रय असल्यामुळेंच, इतके दिवस बादशहाचे हातून त्यांचा पाडाव होईना. ह्या सर्व गोष्टी बादशहास ठाऊक असल्यामुळें, व इतक्या दिवसांचे सर्व प्रयत्न व्यर्थ झाल्यामुळें, केवळ शेवटचा उपाय म्हणून तो किल्ले घेण्याच्या नादास लागला. किल्ले घेतल्याशिवाय मराठी राज्य काबीज करतां येत नाहीं हें खरें; पण ते आपणाला घेतां येतील कीं नाहींत, व घेतां आले तरी ते सांभाळतां येतील कीं नाहींत, याचा त्यानें विचार केला नाहीं. किल्ले घेण्यास व सांभाळण्यास काय काय तजविजी पाहिजेत, आपली शक्ति पुष्कळ असली तरी ती कोणत्या प्रकारची आहे, विजेप्रमाणें नाचणाऱ्या मराठी भूतांपुढें आपले बलवान् पण मिजासी

राक्षस कितीसा टिकाव धरितील, याचा त्यास अंदाज झाला नाहीं. औरंगजेब स्वभावत:च दुराग्रही होता. हातीं धरलेल्या कामीं प्राण गेला तरी बेहत्तर; पण माघार म्हणून घ्यावयाची नाहीं, अशा दुराग्रहानें त्याची दृष्टि अंध झाली होती. या बाबतींत औरंगजेब व त्याचा पराक्रमी पणजा अकबर, ह्या दोघांच्या पद्धतींतील विरोध पाहून चमत्कार वाटतो. अकबरानें पुष्कळ देश जिंकिले, पण दक्षिणेंत अहंमदनगरावरील स्वारींत त्यास जावें, तसें यश आलें नाहीं, तेव्हां कसाबसा तंटा मिटवून व आपला बोज कायम राखून, तो परत दिल्लीस गेला. शहाजहाननें थोडें बहुत तेंच धोरण ठेविलें. औरंगजेबासही तसें करितां आलें असतें. संभाजीस पकडल्यावर बादशहा त्यास मिरवीत दिल्लीस घेऊन जाता, तरी भागलें असतें; कदाचित् त्या योगानें दिल्लीकडील कारभारास मजबुदी येऊन मोगल बादशाहीचें आयुष्य वाढलें असतें; आणि मोगल बादशहास मराठ्यांचा समाचार मागें पुढें घेतां आला असता. वास्तविक मोगलांचे हातून महाराष्ट्र देश जिंकण्याचें काम तडीस जाण्याजोगें नव्हतें. बादशहाचा आपल्या सरदारांवरील बेभरंवसा, हिंदु धर्म बुडविण्याचें त्याचें वेड, विजापुर व गोवळकोंडा यांच्या फौजेतील रिकाम्या लोकांचा सुळसुळाट, दक्षिणच्या मोगली अंमलांतील अव्यवस्था, वसूल गोळा होण्याची मारामार, लोकांच्या मनाची एकंदर अस्वस्थता, बादशहाबद्दल त्यांच्या मनांत अपूज्यबुद्धि, व मुख्यत्वेंकरून महाराष्ट्रासारख्या पहाडी प्रदेशांत काम करण्याची मोगल फौजेची असमर्थता, इत्यादि अनेक कारणांनीं बादशहाचे हेतु विफल झाले.

सन १६८९त भयंकर आपात सुरू झाला, त्याचें आतां बहुतेक निरसन होत आलें होतें. सन १६८३ त औरंगजेबानें महाराष्ट्रांत पाऊल ठेवल्यापासून आजपर्यंत मराठे लोकांचे प्रयत्न केवळ स्वसंरक्षणापुरतेच होते. शत्रूवर चाल करण्याचा प्रसंग आलाच, तर तो केवळ स्वत:चा बचाव करण्यापुरताच असे. बादशहा मराठ्यांचे वाटेस न जाता, तर तेही त्याचे वाटेस फारसे गेले नसते. पण हा प्रकार राजारामाचे मृत्यूनंतर बदलला. राज्याचा धनी अल्पवयस्क, राज्यकारभार बाईच्या हातांत, अशी स्थिति असल्यामुळें सर्वांनीं भगीरथप्रयत्न करून, बादशहाची तिरपिट उडवून द्यावी, असा मराठ्यांनीं निश्चय केला. वाटेल तसें वर्तन कर-

ण्यास ताराबाईकडून सर्वांस पूर्ण मुभा मिळाल्यामुळें, जो तो ह्या राष्ट्रीय कामांत मी मी म्हणत पुढें झाला. एकदां तलवार गाजवून आपलें व आपल्या घराण्याचें चिरंतन कल्याण करून घेण्याची संधि हीच आहे, असें प्रत्येकास वाटूं लागलें. तेव्हां केवळ स्वतःच्या बचावाचे प्रयत्न सोडून त्यांनीं शत्रूचा निःपात करण्यास सुरवात केली; आणि शिवाजीच्या मृत्यूनंतर वीस वर्षांनीं मराठ्यांनीं बचावाचें युद्ध सोडून चढावाचें युद्ध हातीं घेतलें, त्याचें वर्णन ग्रँटडफनें येणेंप्रमाणें केलें आहे. ' मराठ्यांचें सामान म्हटलें म्हणजे, थोडीशी कादाभाकरी व एक घोंगडी एवढें काय तें असे. रात्रीं कोठें उतरले, तर ते घोड्यांचे लगाम हातांत धरूनच घोंगडी पसरून त्यावर कांहीं वेळ अंग टाकून राहत. त्याचप्रमाणें दिवसा दोन प्रहरीं कांहीं खाण्याकरितां किंवा ऊन टाळण्याकरितां ते उतरले, म्हणजे पांचपाच सहासहा जण एखादें झाडझूड असलें तर त्याचे छायेखालीं उतरत. परंतु उघडें मैदानच असलें तर ते जमिनींत भाले रोंवून त्यांस ते आपले घोडे बांधून, भाल्यांचे टोकांवरून एखादी घोंगडी आडवी पसरून देत; व तिच्या लहानशा छायेंत फक्त डोकीं ठेवून बाकी सर्व अंगास दुपारचें जबर ऊन लागत असतांही जमिनीवर घोरत पडलेले आढळत. आपल्या तरवारीस मात्र ते कधीं विसंबत नसत. त्या ते कुशीशीं ठेवीत. त्यांजवळ उंट, बैल वगैरे कांहीं नसून फक्त लहान, खुरी, चपळ व कंटक अशी तट्टें असत. मिळालेली लूट त्यांवर लादून, ती ते फार जलदीनें लांबवीत. येणेंप्रमाणें मराठ्यांची फौज अगदीं सुटसुटीत असल्यामुळें, मिजासी व कांहीं अंशीं बेकैद अशा बादशहाच्या फौजेस तिचा पाठलाग करणें कठीणच पडे. त्यांतूनही ती कधीं गांठली जाऊन तिचा पराभव झालाच, तर तिचें नुकसान तें काय होणार? व तिचें सामानसुमान मोगलांचे हातीं तें काय लागणार? उलट पक्षीं मोगलांचे फौजेचा पराभव झाला, म्हणजे लुटीनें मराठ्यांची चंगळ उडून मोगलांचे हाल होत.' (भाग १ पृ. ३३८). अशा ह्या कष्टाच्या मेहनतीचें फळ मराठ्यांस मिळालें, ह्यांत नवल तें कोणतें?

झुल्फिकारखान व बेदरबख्त यांचे हाताखालीं बादशहानें उत्तरसरहद्दीकडे फौज पाठविली होती, ती पांच सहा वर्षेंपर्यंत मराठ्यांचे पाठीवर होती. राजारामास तिनेंच परत फिरविलें. जाधव, भोसले, निंबाळकर, दाभाडे वगैरे सरदारांचे मागें लागून त्यांचा कित्येक वेळां तिनें पराभवही केला. परंतु

मराठी फौजेचा पराभव म्हणजे कांहींच नाहीं; उलट कित्येक वेळां ते मोगल फौजेचाच पराभव करून स्वत:चा पाहिजे तसा फायदा करून घेत. येणेंकरून मराठ्यांच्या टोळ्या जिकडे तिकडे बळावत चालल्या. बादशहा उत्तरोत्तर हिंदुस्थानांतून ज्यास्त खजिना मागवूं लागला; पाळत राखून तो खजिना मराठे एकदम पळवून नेत, मोगल टोळ्यांची बातमीही एकमेकींस पोंचूं देत नसत.

सन १७०२ पासून मराठ्यांनीं ह्या युद्धांत चढाई सुरू केली. मनूची म्हणतो, स. १७०५ त मराठ्यांचे चाळीस हजार स्वार मोठी दौड करून झपाट्यानें सुरतेवर आले; आणि तेथून भडोचपर्यंत सर्व मुलूख त्यांनीं लुटला. त्यांजवर नजरअलीखान व ख्वाजा हमीद हे दोन मुसलमान सरदार सहा हजार फौजेनिशीं चालून आले. त्यांच्या फौजेचा मराठ्यांनीं फन्ना उडविला; त्या दोघांस कैद केलें; आणि आठ लाख रुपये दंड घेऊन त्यांस सोडिलें. मनूची म्हणतो; ही स्वारी स १७०३–०४ सालीं झाली. ( पु. ४–४६). त्या वर्षीं त्यांनीं सुरत व बऱ्हाणपुर हीं शहरें लुटलीं, आणि खंडण्या वसूल केल्या. हीं शहरें म्हणजे मोगल बादशाहीच्या दक्षिणेंतील राजधान्याच होत. यानंतर त्यांचें पाऊल पुढेंपुढेंच पडत चाललें. धनाजी जाधव, हिंदुराव व राणोजी घोरपडे ह्यांनीं दक्षिणेकडील सर्व मुलूख कबजांत आणिला ( स्कॉट वेरिंग ). सन १७०५ सालीं ते प्रथमतः नर्मदा नदी उतरून माळव्यांत शिरले. इकडे वऱ्हाड, खानदेश, गुजराथ हे प्रांत तर त्यांनीं अगदीं आपलेसेच करून टाकिले. ह्या भयंकर खबरा बादशहास पोंचून त्यानें झुल्फिकारखान, गाजीउद्दीन व अजीमशहा यांस अनुक्रमें माळवा, वऱ्हाड व गुजराथ ह्या प्रांतांत रवाना केलें. परंतु त्यानें फारसा उपयोग झाला नाहीं. मुसलमानी फौजेच्या अंगीं आतां लढण्याचें त्राण राहिलें नव्हतें. फार दिवस कष्ट सोसल्यानें त्यांस युद्धाचा तिटकारा आला होता. शिवाय बादशहा आतां थोड्याच दिवसांचा सोबती आहे, असें सर्वांस वाटूं लागल्यामुळें, पुढें काय भानगडी होतात, तें पाहण्याकडे पुष्कळांची नजर लागली होती. तेव्हां बादशहाची अगदींच नाउमेद झाली. मराठ्यांची लुटालूट त्यांस मुळींच बंद करितां येईना. बरें, मराठे तरी नुसती लूट करून स्वस्थ बसत नसत. 'त्यांनीं जिकडे तिकडे आपला कायमचा अंमल बसविण्यास सुरवात केली. जो जो मुलूख

त्यांचे हातीं लागे, त्यांत बादशाही अंमलाप्रमाणें आपला अंमल सुरू करून सुभेदार, कमाविसदार, राहदार वगैरे अधिकारी त्यांनीं नेमिले. सुभेदार म्हणजे प्रांताचा मुख्य. त्याच्या ताब्यांत सर्व फौज असावयाची. एखादें लंमाण बादशहाकडे येत आहे, अशी बातमी लागतांच, तो सुभेदार सहा सात हजार लोक घेऊन तें लंमाण लुटून आणीत असे. तो आपले कमाविसदार चौथाई वगैरे गोळा करण्याकरितां पाठवी; आणि जमीनदार व फौजदार लोक चौथाई देण्यास हरकत करीत, त्या ठिकाणीं सुभेदार स्वतः जाऊन शहरें व गांव जमीनदोस्त करून, कमाविसदारांचा पाठपुरावा करी. राहदाराकडे दस्तुरीच्या नाक्यांवर बसून, गाड्या व जनावरें यांजपासून कर घेण्याचें काम होतें. याप्रमाणें दक्षिणेंतून गुजराथेंत अहंमदाबादपर्यंत, आणि माळव्यांत उज्जनीपर्यंत मराठ्यांनीं आपला दरारा बसविला. (एल्यट, खाफीखान, भा. ७, पृ. ३७४–३७७). मराठ्यांनीं गुजराथच्या फौजेची तिरपिट उडवून दिली, त्याचें खाफीखानानें दिलेलें वर्णन वाचण्यालायक आहे.

५. वाकिनखेडें, पऱ्या नाइकाचा दंगा.*–(फेब्रुवारी ८–एप्रिल २७, १७०५).—प्रस्तुत प्रसंगीं बादशहाची दुर्दशा कशी होत चालली होती, हें दाखविण्यास ह्या दंग्याची हकीकत फार उपयोगी आहे. खाफीखानानें ह्याजबद्दलचा वृत्तान्त सविस्तर दिला आहे. रायचूरच्या वायव्येस कृष्णा व भीमा या नद्यांचे मध्यें सागर व वाकिनखेडें असे दोन लहानसे किल्ले आहेत. हे दोन किल्ले पेम नाईक नांवाच्या बेड जातीच्या एका शूर पाळेगाराच्या ताब्यांत होते. ह्या पाळेगारानें गोवळकोंड्याच्या युद्धांत कुत्बशहास मदत केली होती. म्हणून बादशहानें त्याजवर फौज पाठवून त्याचा सागर किल्ला काबीज केला होता. पऱ्या नाईक नांवाचा पेम नाइकाचा एक पुतण्या होता; त्यानें रायचूर काबीज करण्यांत बादशहास चांगली मदत केल्यामुळें, त्यास मनसब मिळालेली होती. वाकिनखेड्याचे बर्कंदाज, फार कुशल म्हणून प्रसिद्ध होते. पेम नाइकाकडून सागरचा किल्ला काबीज केल्यावर, तो बादशहानें पऱ्या नाइकास दिला; तेव्हांपासून पऱ्या नाइकानें आपली सत्ता व शक्ति पुष्कळ वाढविली,

* ह्याचीं निरनिराळीं नांवें आढळतात. पेम नाईक–डफ, पुणाप्पा–वि. ज्ञा. वि., पुनापा–पारसनीस. मुळांत खाफीखानाचें नांव घेतलें आहे.

आणि लांच भरून नम्रतेचीं पत्रें लिहून व अनेक युक्त्या योजून, त्यानें आपला पुंडपणा बादशहाचे नजरेस येऊं दिला नाहीं. असें करून दारूगोळा, किल्ले, फौज, हत्यारें इत्यादि गोष्टी तो एकसारखा वाढवीत होता. असें होतां होतां वाकिनखेड्याची गणना मजबूद किल्ल्यांत होऊं लागली; आणि पऱ्या नाइक उघडपणें मराठ्यास मिळाला. इकडे पेम नाइकाचा मुलगा जगनाईक, यास बादशहानें पेम नाइकाचा वारस म्हणून वाकिनखेड्याचा अधिकार दिला; पण पऱ्यानें जगनाइकास मुळींच दाद दिली नाहीं. म्हणून बादशहानें अजीमशहास त्याजवर पाठविलें. इकडे पऱ्यानें अजीमशहास भला मोठा लांच भरून वाटेस लाविलें, आणि पुन: तो पहिल्याप्रमाणेंच दांडगाई करूं लागला. तेव्हां गाजीउद्दीनखान फिरोजंगास बादशहानें त्याजवर पाठविलें असतां, तोही लांच घेऊन परत आला. पुन: पऱ्या नाइकाचा त्रास दु:सह होऊं लागला, तेव्हां सन १७०५ च्या आरंभीं बादशहानें पुण्याकडील मुक्काम हालवून स्वतः वाकिनखेड्यावर स्वारी केली. त्या वेळीं पऱ्या नाइकानें आपला बंदोबस्त चांगलाच केला होता. ताराबाईकडून त्यास मदत आली होती. धनाजी जाधवाचें व त्याचें चांगलें सख्य असून जाधवाचीं मुलें माणसें वाकिनखेड्यासच होतीं. ह्या प्रसंगीं पऱ्या नाइकानें बादशहाशीं मोठ्या जोराचा झगडा केला. किल्ल्यांतून बादशहाचे फौजवर असा कांहीं मारा चालविला, कीं बादशहाचे असंख्य लोक प्राणास मुकले पुढें किल्ला काबीज होण्याची वेळ आली. इतक्यांत धनाजी जाधव, हिंदुराव घोरपडे व दुसरे सरदार पऱ्या नाइकाचे मदतीस येत आहेत, अशी बातमी आली. तेव्हां बादशहाचे फौजेंत गोंधळ उडून गेला. मराठ्यांनीं येऊन त्यांस गांठिलें आणि बादशहाचे पुष्कळ लोक ठार मारिले. तथापि वेढा चालूच होता. पऱ्या नाइकाचा भाऊ सोमशंकर यानें बादशहास शरण जाऊन आपल्या भावाबद्दल माफी मागून, किल्ला स्वाधीन करण्याचें कबूल केलें. त्याप्रमाणें बादशहाचे सरदार किल्ल्यावर गेले, त्यांजबरोबर पऱ्या नाइकानें बादशहाकडे यावें असें ठरलें होतें. परंतु आजाराचा ढोंग करून दोन दिवस पऱ्या नाईक कोणास भेटलाच नाहीं. तिसरे दिवशीं असें समजलें, कीं पऱ्या नाईक किल्ल्यांत नाहीं. पुढें किल्ला ताब्यांत देण्याच्या निमित्तानें सोमशंकर वर आला व त्यानें किल्ल्यात आलेल्या मुसलमान

सरदारांस अटकेंत ठेवून, पुनरपि युद्धाची तयारी केली. शेवटीं झुल्फिकारखान बादशहाचे मदतीस आला, आणि मोठी शिकस्त करून त्यानें किल्ला काबीज केला; पण त्यापूर्वीं किल्ल्यांतील लोक सर्व चीजवस्त घेऊन व घरांस आग लावून चोरवाटेनें बाहेर पडून मराठ्यांस मिळाले होते. याप्रमाणें किल्ला ताब्यांत आला, पण त्यापासून बादशहास कांहींच लाभ झाला नाहीं. बादशहानें वाकिनखेड्याचें नांव रहमानबक्ष असें ठेविलें. तेथून बादशहाची फौज तीन कोसांवर कृष्णेच्या कांठीं देवापुर येथें मुक्कामास गेली. तेथें सिंहगड किल्ला मराठ्यांनीं परत घेतल्याची बातमी बादशहास पोंचली. ह्या वाकिनखेड्याच्या हल्ल्यांत चिंकिलीजखान ऊर्फ प्रसिद्ध निजामुल्मुल्क् हा बादशहाचे बाजूस लढत होता.

६. शाहूची कैद व सुटकेचे प्रयत्न.—येसूबाई व शाहूही हा काळपावेतों बादशहाच्या स्वारीबरोबर हिंडत होतीं. सन १७०२ सालीं त्यांची पुरस्कर्ती बेगमसाहेब मरण पावली, तरी शाहूच्या व्यवस्थेंत कांहीं कमी पडलें नाहीं. हातीं घेतलेल्या युद्धाचा निकाल लागेपर्यंत, शाहूची कांहीं कायमची व्यवस्था करण्याचा विचार बादशहानें केला नाहीं. उलट शाहू ताब्यांत असल्यानें त्याचा मराठ्यांवर एक प्रकारचा दाब होता; पण ह्यापासून बादशहास कांहींच फायदा झाला नाहीं. जोत्याजी केसरकर नेहमीं शाहूजवळ असे. (पृ. ६०५). शाहूचें बाळपणचें शिक्षण जोत्याजीचेच देखरेखीखालीं त्या वेळच्या मानानें झालें. हा जोत्याजी मौजे पुनाळ, प्रांत पन्हाळा, येथील पाटील होता. (भारतवर्ष). बादशहाच्या स्वारींत ज्या विपत्ती इतरांस भोगाव्या लागत, त्या शाहूसही भोगाव्या लागत. परळीचा किल्ला काबीज झाल्यावर बादशहाची छावणी पावसानें इतकी भिजून चिंब झाली, कीं जोत्याजी केसरकर यानें तेलांत कांकडे भिजवून शाहूस भात करून घातला. याप्रमाणें नेहमीं छावणींत असूनही शाहूस कधीं तलवार गाजविण्याचा प्रसंग बादशहानें येऊं दिला नाहीं. त्याचे सर्व दिवस कारागृहवासांत असल्याप्रमाणें गेले. त्याच्या खाण्यापिण्याचे हाल झाले नाहींत हें खरें; पण सुखोपभोगामुळें त्याचा स्वभाव शांत, स्वस्थ व थोडासा निर्वीर्य बनला. नाहीं तर शिवाजीचा नातू व संभाजीचा पुत्र असून दोघांचींही चरित्रें डोळ्यांपुढें असतां तो इतका स्वास्थ्यप्रिय बनला नसता. त्यानें पुढें सर्व स्वाऱ्या आपल्या सरदारांवर सोंपवून

पेशवे, दाभाडे, गायकवाड, शिंदे, होळकर इत्यादिकांस पुढें येण्यास अवसर दिला. तो साहसप्रिय असता तर त्या स्वाऱ्या त्यानें स्वतःच केल्या असत्या, आणि मराठे सरदारांत फाटाफूट व वैमनस्यें उत्पन्न होण्यास अवकाश न देतां, आणि कोणासही स्वतंत्र वागूं न देतां, त्यांजकडून राज्याचीं कामें घेऊन, मराठशाहीच्या संस्थापकाचे स्तुत्य हेतु तडीस नेले असते. या दृष्टीनें पाहिलें, तर शाहूच्या या सुखाच्या कैदेनें त्याचें स्वतःचें, त्याच्या घराण्याचें, व एकंदर राष्ट्राचें मोठें नुकसान झालें. संभाजीच्या क्रूर वधानें राष्ट्राचें नुकसान झालें नाहीं, इतकें शाहूच्या कैदेनें नुकसान झालें. बाकी शाहूस कैदेंत ठेवल्यापासून बादशहाला लाभ झाला नाहीं. संभाजीचा वध न करतां, त्यास तो कैदेंत ठेवता, तर बादशाहास थोडा बहुत फायदा झाला असता. शाहू अकलेनें कमी नव्हता. मराठशाहींतील घडामोडींचें तो लक्षपूर्वक अवलोकन करीत होता. त्याचे राजारामाशीं अंतस्थ व्यवहार चालू होते. भक्ताजी हुजरे व बंकी गायकवाड हे नेहमीं ह्या दोघांचे निरोप आणि बातम्या एकमेकांस कळवीत असत. सन १६९६ त बादशाहाचे छावणीवर छापा घालून, राजारामानें शाहूस सोडविण्याचा प्रयत्न केला, पण तो साधला नाहीं. त्या छाप्यानें बादशहा एकदम सावध झाला. मराठ्यांशीं लढण्याची नवीन व्यवस्था करून, त्यानें स्वतः कंबर बांधिली. तरी शाहू परत येण्याची योग्य संधि पाहतच होता. त्यानें आपल्या पोटांतील गोष्ट कधींही बादशहास कळूं दिली नाहीं. राजाराम आपला शत्रु आहे, असेंच त्यानें बादशहास भासविलें; आणि नेहमीं बादशहाची मर्जी सुप्रसन्न ठेवून, आंतून सुटकेचे इलाज चालू ठेविले. एकदां शाहूस आपले स्वाधीन करण्याविषयीं राजारामानें बादशहाकडे मागणी केली असतां, बादशहा शाहूस थट्टेनें म्हणाला,—'मी तुम्हांस तुमचे काकांकडे पाठवितों, जातां काय?' त्यावर शाहूनें उत्तर दिलें, 'आमचे काकांचा पूर्वीपासून स्वतः राज्य करण्याचा इरादा आहे. आमचे वडिलांस कैदेंत ठेवून, स्वतः राज्य घेण्याचे प्रयत्न त्यांनीं केले; रायगडावर आपलें धरणें आलें, तेव्हां आम्हांस एकटे सोडून जिंजीकडे गेले; आणि आतां पुनरपि आम्हांस आपले ताब्यांत घेऊन कैदेंत मात्र ठेवितील; तर आपण त्यांचें पारिपत्य करून, आम्हांस राज्यावर बसवाल तेव्हांच राज्य करूं.' पुढें राजारामाचे मृत्यूची बातमी शाहूस कळली, तेव्हां त्यास

अतोनात दुःख होऊन तांप आला; पण बादशहा त्याच्या समाचारास गेला असतां, हें दुःख काकाबद्दल आहे, असें त्यानें बादशहास [illegible]विलें नाहीं.

सन १६९९ च्या सुमारास बादशहानें शाहूचें लग्न केलें, त्या वेळेस तो १९ वर्षांचा होता. हें लग्न बहुशः ब्रह्मपुरीसच झालें असावें. त्या वेळीं बेगम जिवंत होती, तिनेंच तें लग्न जुळवून आणिलें. जोत्याजी केसरकर व मोरोपंत सबनीस, यांनीं बादशहाच्या तःब्यांतील सरदारांच्या दोन मुली पसंत केल्या. एक रुस्तुमराव जाधव यांची कन्या अंबिकाबाई (पृ.६२३), व दुसरी कण्हेरखेडचे शिंदे यांची कन्या सावित्रीबाई. बादशहानें पुष्कळ खर्च करून, समारंभ मोठ्या थाटाचा केला. या प्रसंगीं बादशहानें वधूस पाहण्याची इच्छा दर्शविली असतां, विरूबाई म्हणून एक सुरेखशी दासी त्याजकडे पाठवून हीच शाहूची बायको, असें त्यास समजाविलें, आणि आपल्या पडदपोशीचा मान येसूबाईनें राखिला, अशी गोष्ट प्रचलित आहे. बादशहानें शाहूस ममतेनें वागविलें होतें, आणि शाहूही घरच्या माणसांपैकींच गणला जात होता. लग्नप्रसंगीं बादशहानें शाहूस अक्कलकोट, इंदापुर, सुपें, बारामती व नेवासें ह्या पांच परगण्यांची जहागीर करून दिली, आणि एक सोन्याची तलवार, रायगडाचा पाडाव करून आणिलेली शिवाजीची भवानी तलवार, आणि अफझलखानाची तलवार अशा तीन तलवारी बक्षीस दिल्या. येणेंप्रमाणें शाहू व येसूबाई खूष झाल्यानें पुढें मागें त्यांनीं आपणांस दगा देऊं नये, असा बादशहाचा मनोदय होता. बादशहानें विरूबाईसहवर्तमान शाहूस आशीर्वाद दिल्यावरून, तिलाही शाहूनें विशेष कृपा दाखवून खासगींत ठेविलें. मरेपर्यंत शाहूचा तिजवर लोभ होता.

अमात्य बावडेकर (पृ. ३७०).

नारोपंत ( मालोजीजवळ ).
|
सोनोपंत ( शहाजीजवळ ).
|
निळोपंत. (१६४७–१६७२). — आबाजी
|
नारोपंत — रामचंद्रपंत.(१६७२–१७२०)

राजारामाचे पश्चात् मराठ्यांच्या सर्व कारभाराचें ओझें, रामचंद्रपंतावर होतें. तो आपली कामगिरी फारच नेकीनें बजावीत होता. राजारामाचें स्मरण त्यानें कोणास होऊं दिलें नाहीं. शाहूनेंही ताराबाई व राजसबाई यांस प्रणाम व शिवाजी[illegible]

आशीर्वाद कळवून, शिवाय पंतास असें लिहिलें, कीं 'काकांचे ठिकाणीं तुम्ही आहां. आम्हास नेण्याचा उद्योग करीतच आहां, काकासाहेबांनीं राज्य रक्षण केलें, तें आपण रक्षावें, श्रीकृपें सुदिन प्राप्त होईल.' ह्या पत्रानें पंताचे मनांत शाहूविषयीं अनुकूल ग्रह उत्पन्न झाला. त्यानें शाहूच्या सुटकेबद्दल प्रयत्न केले, पण ते सफल झाले नाहींत.

सन १७०५ त बादशहाकडूनच शाहूच्या सुटकेचा एक प्रयत्न झाला. त्या वेळीं त्याचा मुक्काम विजापुरास असून त्याची अगदीं नाउमेद झाली होती. दिवसेंदिवस त्याच्या अडचणी वाढत होत्या; आणि फौजेचा पगार तुंबल्यामुळें लोकांनीं त्यास भंडावून सोडिलें होतें. सर्वांचें डोळे पुढील व्यवस्थेकडे लागले होते. विशेषत: त्याच्या पुत्रांत अंतस्थ कलह सुरू होते. बादशहाची मर्जी कामबक्षावर होती. कामबक्षाचे मनांत विजापुराकडे स्वतंत्र राज्य स्थापावें, असे विचार घोळत होते. हा उद्देश तडीस जाण्यास मराठ्यांची अनुकूलता त्यास पाहिजे होती. ह्यावरून त्यानें व इतर सरदारांनीं बादशहास सुचविलें, कीं शाहूची सुटका करून त्यास आपला मांडलिक म्हणून मराठ्यांचे गादीवर बसविल्यास, त्या लोकांची समजूत होऊन, युद्ध बंद होईल; व बादशहास आराम मिळेल. मराठे पादाक्रान्त तर होत नाहींत, तेव्हां ते आपली ताबेदारी पत्करितील तरी पुष्कळ, असें बादशहास वाटून त्यानें कामबक्षास मराठ्यांशीं बोलणें करण्यास हुकूम दिला; आणि शाहूस त्याचे हवालीं केलें. राजपुत्रानें धनाजी जाधव याजकडे वकील पाठवून शाहूचे सुटकेबद्दल बोलणें सुरू केलें. बरीच वाटाघाट होऊन ठरलें, कीं दक्षिणेंतील सहा सुभ्यांवर बादशहानें मराठ्यांस सरदेशमुखीचा हक्क देऊन त्यांनीं सर्व मुलखाचा बंदोबस्त राखावा; आणि हें ठरविण्यासाठीं ताराबाईच्या मुख्य सरदारांस पत्रें पाठवून बोलावून आणावें. त्यांनीं बादशहाची ताबेदारी कबूल करून शाहूस आपल्या ताब्यांत घ्यावें. ह्याप्रमाणें पत्र लिहिल्यावर व ह्या वाटाघाटीची बातमी इतर सरदारांस लागल्यावर, ते धनाजीच्या लष्करांत गोळा होऊं लागले, आणि आपणासही कांहीं हक्क मिळावे, अशी त्यांस इच्छा उत्पन्न झाली. नंतर सर्व सरदारांनी मिळून बादशहास अशी आणखी एक अट सांगितली, कीं सत्तर मराठे सरदारांस बादशहाकडून सन्मानाचे पोषाख मिळावे. बाद-

शहानें मोठ्या नाखुषीनें ही व्यवस्था कबूल केली. परंतु ती अमलांत येण्याच्या पूर्वी बादशहाचे छावणीनजीक मराठे सरदारांचा जमाव वाढत चालला; आणि त्यांच्या मागण्या उत्तरोत्तर जास्त तोऱ्याच्या होऊं लागल्या. वास्तविक ठराव असा होता, कीं कामबक्षानें शाहूस बरोबर घेऊन, आपल्या छावणीपासून चार पांच कोसांवर मराठे सरदारांस जाऊन भेटावें. तेथें शाहूचीं व सरदारांचीं बोलणीं व्हावीं. नंतर सरदारांनीं कामबक्षास प्रणाम करून त्याच्या स्वाधीन व्हावें; आणि त्याजबरोबर बादशहाचे छावणींत येऊन त्यांनीं पोषाख घ्यावे, व नंतर तेथून शाहूस घेऊन निघून जावें. परंतु हा ठराव अमलांत आला नाहीं. मराठ्यांचा जमाव बलवान् होऊन ते परस्पर शाहूस घेऊन जातील, आणि आपल्या हातचा डाव जाईल असें बादशहास वाटून, त्यानें हा तह मोडून टाकिला. इकडे मराठेही बादशहाची शक्ति ओळखून असल्यामुळें, त्याची ताबेदारी पत्करण्यास तयार नव्हते.

मनूची म्हणतो, असाच प्रयत्न पुढें एकदां झाला. त्याची हकीकत अशी. सगळे उपाय हरल्यावर शेवटचा उपाय म्हणून औरंगजेबानें शाहूस इतके दिवस मोठ्या बंदोबस्तानें जवळ बाळगिलें होतें. विजापुर कर्नाटक वगैरे प्रांतांचें राज्य मुलगा कामबक्षाचे हवाली करून, आपण निघून दिल्लीस जाणार, असें त्यानें जाहीर केलें. शाहूस त्यानें मोकळा केलें; त्यास पोषाख व सप्तहजारी मनसब दिली, आणि कामबक्षाचे आज्ञेत वागून दक्षिणचें राज्य करीत जा, असा त्यास हुकूम केला. त्यासाठीं कांहीं प्रांत त्यास तोडून दिले, आणि कांहीं प्रांतांवर चौथाई वसूल करण्याचा हक्क त्यास दिला. ( याचीं फर्मानें ग्रँटडफनें दिलीं आहेत ). शाहूचे तंबू बादशहाचे आवारांत असत. ता. ६ फेब्रुवारी स. १७०६ रोजीं झुल्फिकारखानाच्या छावणी शेजारीं शाहूस स्वतंत्र मुक्काम देऊन तेथें त्यास राहण्यास पाठविलें; आणि मराठे सरदारांनीं येऊन शाहूस मिळावें, असा पुकारा केला. पण या युक्तीनें कोणीच फसले नाहींत; आणि शाहूकडे कोणी आलेही नाहींत. शाहू मोकळा झाला होता, परंतु त्याजवर नजर ठेवण्यास झुल्फिकारखानास आंतून ताकीद होती. (मनूची ३,४१८;४-२४५).

**७. औरंगजेबाचा शोचनीय अंतकाळ, ( शुक्रवार, फेब्रुवारी २०, १७०७ ).**—किल्ले काबीज करण्याचे बाबतींत औरंगजेबास कसें अप-

यश येत गेलें, हें मागें सांगितलेंच आहे. जसजसा किल्ले काबीज करीत तो पुढें गेला, तसतसे मराठे मागून तेच किल्ले परत घेत चालले. मोगल पुढें व मराठे मागें अशी शिकार सुरू झाली. रामचंद्र नीलकंठानें पन्हाळा व पवनगड हे दोनही किल्ले घेतले; आणि ताराबाईनें आपला कायमचा मुक्काम पन्हाळ्यावर केला. सातारा व वसंतगड हे किल्ले परशुराम त्रिंबकनें मोठ्या युक्तीनें घेतले. सातारा घेण्यांत अण्णाजीपंत नांवाच्या कारकुनानें वैराग्याचे वेषानें मोगलांचे शिबंदींत शिरून चांगली मदत केली. सिंहगड, रायगड व राजगड हे शंकराजी नारायणानें परत घेतले. सारांश, बादशहानें शेवटची म्हणून जी मोहीम मोठ्या भरंवशानें सुरू केली, ती याप्रमाणें अगदींच निरुपयोगी झाली. तशांत पन्हाळा व सिंहगड हे किल्ले मराठ्यांनीं परत घेतल्याचें वर्तमान ऐकून बादशहास अतोनात दुःख झालें. त्यानें त्याचें दुखणें वाढलें. वाकिनखेडें जिंकून बादशहा विजापुराकडे परत येत होता. शत्रूंच्या मुलखांत आजारी पडल्यानें त्यास मोठी धास्ती पडली. कांहीं दिवस त्याचें दुखणें जोरांतच होतें. तथापि लोकांनीं घाबरूं नये व गवगवा करूं नये, म्हणून तो कधीं कधीं दुखणेंकरी असतां तसाच दरबारांत येई. या वेळीं बादशहा मरण पावला असता, तर त्याच्या लोकांपैकीं एकही इसम मराठ्यांचे तावडींतून वांचता ना ( एल्यट, खाफीखान, ७, पृ. ३८३ ). परंतु तो ह्या दुखण्यांतून बरा झाला, व पुनः बहादूरगडास आला, त्या वेळीं विजापुरकडील प्रांताचा कारभार त्यानें चिंकिलिजखान यास सांगितला. आजारी पडण्यापूर्वींच सिंहगड परत घेण्याकरितां त्यानें हमीदुल्लाखान ( तर्बियतखान, वि. ज्ञा. वि., ) यास पाठविलें आणि त्याचें साह्य करण्यास झुल्फिकारखान यास जाण्याविषयीं आज्ञा केली. ह्याप्रमाणें किल्ल्यांचें काम चालू होतें.

मराठमंडळांत दुफळी करण्याचे बादशहाचे प्रयत्न चालले होते. त्यासाठीं शाहूचें मोहरें त्यानें आपल्या हातांत कायम ठेविलें होतें. झुल्फिकारखान सिंहगड घेण्यास गेला, त्या वेळीं त्यानें शाहूस त्याचेबरोबर दिलें. शाहूस एकदम सोडून देऊन युद्ध मिटविण्याचाही विचार त्याच्या मनांत आला, पण तसें करण्यास त्यास धीर होईना. त्यानें शाहूकडून तूर्त मुख्य मुख्य मराठे सरदारांस पत्र लिहवून शरण येण्यास सांगितलें. परंतु शाहू अगदींच परतंत्र असल्यामुळें, ह्या पत्रांत कांहीं तरी कपटभाव असावा,

असें मराठे सरदारांनीं ताडिलें, त्या खोट्या पत्रांस कांहींच मान दिला नाहीं, आणि लुटालूट करण्याचा आपला क्रम चालूच ठेविला. याप्रमाणें सर्व युक्त्या फसल्या. तेव्हांच युद्धाचा नाद सोडून बादशहा अहंमदनगराकडे वळला. तेथें तरी सुरक्षित कसे पोंचतों, याची त्यास धास्तीच होती. या वेळीं तर मराठ्यांनीं अगदीं कमाल करून सोडिली. मार्गांत त्यांनीं त्याजवर हल्ला केला. तेव्हां त्यांचा बंदोबस्त करण्यासाठीं बादशहानें हमीदुद्दीन यास पाठविलें. पण हमीदुद्दीन यासच मराठ्यांनीं पकडून नेलें; आणि बादशहाच्या सरंजामानावर हल्ला करून लूटही पुष्कळ घेतली. तेव्हां थोडक्यांत चुकलें. पाठीमागून स्वत: बादशहा येत आहे, ही खबर मराठ्यांस नव्हती. नाहीं तर, त्यांनीं त्यासच कैद केलें असतें. त्याच्या फौजेंतील सर्व लोकांस मराठ्यांचा मोठाच धाक वाटे. अवजड सामान वाहून नेण्यास जनावरेंही पुरेशीं नव्हतीं. खजिना खलास झालेला. तशांत त्याचे पदरीं बेइमानी लोक फार. ते असें म्हणत, कीं 'आमच्या ह्या अन्नदात्या बादशहास खुदा असाच पुष्कळ वर्षें वांचवून युद्ध असेंच चालू ठेवो; आणि आमची पोळी चांगली पिको.' वीस वर्षांमागें विजयध्वज फडकवीत दक्षिणदिग्विजय करण्यास बादशहाचें लष्कर निघालें, त्याची ही आज हीन दशा! खान-इ-आलम (संभाजीस पकडणारा इख्लासखान) यानें मराठ्यांशीं निकरानें लढून, बादशहास कसेंबसें सुखरूप अहंमदनगरास आणिलें. तथापि मराठ्यांनीं नेट धरला असता, तर बादशहा त्यांचे हातांत सांपडला असता. अहंमदनगरास त्यास खबर आली, कीं झुल्फिकारखानानें सिंहगड काबीज केला. खानास त्यानें आपल्या भेटीस बोलाविलें. इतक्यांत मराठे बादशाही छावणीच्या आसपास घिरट्या घालूं लागले. त्यांच्या बंदोबस्ताचें काम बादशहानें झुल्फिकारखानास सांगितलें. तेव्हां मराठे भीमा उतरून आपल्या मुलखांत गेले. इतक्यांत वाकिनखेड्यास पऱ्या नाईक पुन: बळावल्याची बातमी आली. संताजीचा भाऊ बहिरजी घोरपडे त्या नाइकास मिळाला. संताजीचे मुलगे व पुतण्ये हे बरेच दिवसांपासून विजापुर, बेदर, कलबुर्गा वगैरे प्रांतांत स्वतंत्रपणें लुटालूट करीत होते. ते ताराबाईस मिळून नव्हते, म्हणून धनाजी त्यांजवर चालून गेला. ह्या प्रसंगीं घोरपड्यांशीं मसलत करून मराठ्यांमधील दुफळी वाढविण्याची बरीच खटपट झुल्फिकारखानानें केली; पण बादशहा आजारी आहे असें ऐकून, खान एकदम नगराकडे निघून आला.

ह्या वेळीं बादशहा विलक्षण पेंचांत सांपडलेला होता. त्याच्या फौजेची अगदींच दुर्दशा झाली होती. पगाराबद्दल त्यांनीं त्याच्या मागें एकसारखा तगादा लाविला होता. त्यांस खावयास पोटभर अन्नही मिळेना. मराठ्यांचे तावडींतून थोडेंबहुत सुटे, तेवढ्यावरच त्याचे लोकांस निर्वाह करावा लागे. इकडे सुरत, बऱ्हाणपुर, वऱ्हाड, माळवा इत्यादि बादशाही मुलखांतून मराठे मोठमोठ्या रकमा वसूल करून आणीत. त्यांच्या बंदोबस्ताकारितां निरनिराळे सरदार बादशहानें रवाना केले. अजीमशहा यास गुजराथेंत अहंमदाबादेस पाठविलें. तसेंच गाजीउद्दीन यास वऱ्हाडांत कामागिरी दिली. बादशहाचें दुखणें ऐकून, अजीमशहानें समीप येण्याची परवानगी मागितली. त्या वेळीं आपण आपल्या बापाची काय अवस्था केली, ती त्याच्या डोळ्यांपुढें मूर्तिमंत उभी राहिली. कामागिरी सोडून निघून येऊं नये, असें त्यानें अजीमशहास वारंवार लिहिलें. तथापि तो एकवार भेटीस आलाच. अहंमदाबाद येथें त्यानें पैशाची व फौजेची चांगली तजवीज करून ठेविली होती. अजीमशहा इकडे आल्यामुळें अहंमदाबादच्या सुभ्यावर महंमद इब्राहीमखान याची नेमणूक झाली. त्याचप्रमाणें शहाजादा कामबक्ष याची नेमणूक विजापुरच्या सुभ्यावर अगोदरच झालेली होती. वडील मुलगा मुअज्जम हा पुष्कळ दिवसांपासून काबूलच्या सुभ्यावर होता. सारांश, अंतकाळीं आपणाजवळ आपला एकही मुलगा असूं नये, अशी बादशहाची इच्छा होती.

बादशहाच्या शेवटच्या दिवसांची मनूचीनें दिलेली माहिती चित्तवेधक आहे. ‘ बादशहा अहंमदनगरास येत असतां त्याची मुलगी व बेगमा यांनीं विनंती केली, “ कीं राजधानी सोडून आज तीस वर्षे आपण रानावनांत हिंडत आहों, नाना संकटें सोसलीं, आम्ही लहानाच्या म्हाताऱ्या झालों, तर मेहरबानी करून आम्हांस आग्र्यास जाऊं द्या; म्हणजे तेथें आम्हास कोणी पकडूं शकणार नाहीं; आम्ही सुखानें व अब्रूनें मरूं.” बादशहानें उत्तर दिलें ‘तुम्ही कांहीं एक फिकीर करूं नका. तुमच्या संरक्षणाची सर्व तजवीज दोन वर्षांपूर्वींच मीं करून ठेविली आहे.’

‘ देवापुरास असतां अहमंदनगरास परत येण्याचें बादशहाच्या मनांत नव्हतें. म्हैसुरावर स्वारी करण्याचा त्याचा विचार होता. म्हैसुरावर

जाण्यांत नद्यांतून पाणी वगैरे किती आहे, त्याचें माप त्यानें आणविलें. इतक्यांत बातमी आली, कीं अफगाणिस्तानांत बंड होऊन शहाआलमची फौज कापली गेली; औरंगजेब मरण पावला असें समजून, शहाजादा अजीमतारा गुजराथच्या सुभ्यावर होता, तो निघून भावाशीं लढण्यासाठीं आग्र्यावर जात आहे; आणि दुर्गादास अजीमवर चालून आला आहे. या बातम्यांनीं गोंधळून जाऊन व वजिरांच्या वगैरे विनंतीस मान देऊन बादशहा देवापुराहून परत फिरला; आणि त्यानें अजीमतारा यास परत बोलाविलें. या गोंधळानें फौजेंत व लोकांत बादशहाची फजिती उडाली; आणि जो तो त्याची टर उडवूं लागला. त्यावरून बादशहानें ज्यास्तच चिडून असा हुकूम काढिला कीं, आपल्या कृत्यांबद्दल जो कोणी चकार शब्द काढील त्यास देहान्त शिक्षा मिळेल. या हुकुमानें लोकांचीं तोंडें इतकीं बंद झालीं कीं, अहंमदनगरास एवढी मोठी फौज मुक्यासारखी चालत आली. रणवाद्यें सुद्धां बंद होतीं. अशा वेळीं मराठे बादशहावर चालून आले; बादशहाच्या तंबूजवळच एक हजार फौज त्यांनीं कापून काढिली; आणि सेनापतीस पकडून त्याजपासून पांच लाख दंड घेऊन सोडून दिलें. ह्या प्रसंगीं प्रत्यक्ष बादशहा त्यांचे हातीं सहज सांपडला असता. पण मराठे लोक म्हणाले, 'बादशहास मारल्यापासून आमचा फायदा नाहीं. तो जिवंत राहिल्यानेंच आमचा धंदा चांगला चालतो.'

'पन्हाळ्याचा वेढा चालू असतां स. १७०१ त बादशहा पाय घसरून पडला, आणि त्याचा गुडघा दुखून त्यास कायमचा लंगडेपणा आला. तेव्हांपासून दरबारांत येऊन बसते वेळीं गादीच्या पुढें त्यानें एक पडदा करविला; आणि आपला लंगडेपणा लोकांस दिसूं नये, म्हणून तो गादीवर येऊन बसल्यावर मग पडदा दूर करी. अशा स्थितींतही त्याचा राज्यलोभ व अधिकारलालसा कमी झाली नाहीं. तो नेहमीं म्हणे, राजेलोकांस दृष्टि व वाणी या दोन गोष्टी असल्या म्हणजे पुरे. तेवढ्यानें त्यांस राज्य करतां येतें. ज्यास्त कांहीं जरूर नाहीं. त्याच सुमारास शहाजादा कामबक्ष यास मुलगा झाला, ती बातमी कामबक्षानें बापास कळविली आणि म्हणाला, 'या मुलाचें नांव व किताब काय ते ठरवा.' बादशहानें सांगितलें, 'तूंच या मुलाचें नांव ठेव. या मुलाला जो पुढें मुलगा होईल, त्याचें नांव मी

ठेवणार आहे. ' बादशहा आणखी पुष्कळ वर्षे जगणार आहे, अशी त्या वेळेस चहूंकडे समजूत होती. तो स्वतः तसें भासवीत होता.

' एकदां बादशहानें झुल्फिकारखानास मराठ्यांवर पाठवितांना कानमंत्र सांगितला. तो म्हणाला, ' हें पहा. शत्रूंशीं प्रसंग पडला असतां, कपट, खोटें बोलणें, धरसोड, खोट्या शपथा इत्यादि वाटेल तो प्रकार प्रसंगानुसार उपयोगांत आणण्यास कमी करूं नको. नाहीं नाहीं त्या युक्त्या व लबाड्या योजीत जा. पण हातांत घेतलेल्या कामांत यश मिळविल्याशिवाय राहूं नको. ' ( मनूची, ३–२५७ ).

'एकसारखा लढाईचा विषय बादशहाचे मनांत घोळत असतो. पालखींत बसून कूच करीत असतां, तलवार म्यानांतून काढून वरचेवर पुसतो, उगाच थोडीशी इकडे तिकडे परजतो, पुनः परत ठेवितो. धनुष्यबाणांचेंही असेंच करितो. येणेंकरून तो लोकांस दाखवितो कीं, मी अजून वाटेल तशी लढाई करण्यास तयार आहें. वृद्धावस्थेनें त्याचें शरीर साफ दुणून गेलेलें आहे. डोकें अगदीं छातीवर पडलेलें दिसतें, आणि त्याची ती पांढरी स्वच्छ दाढी छाती फोडून बाहेर येत आहे, असें वाटते. कोणी कांहीं अर्ज करण्यास आला, कीं सावकाश वर मान करून तो ऐकण्यास त्यास किती तरी वेळ लागतो; नंतर असा जबाब देतो कीं, पुनः ज्यास्त प्रश्न करण्याचें कारणच राहूं नये. जवळ असतांना त्याचे अंमलदार त्याचे हुकूम ऐकल्यासारखें करितात; जरा दूर गेले कीं, बयादा सांगूं लागतात, अडचणी दाखवितात, बादशहाजवळच्या मंडळीस लांच भरितात, आणि मन मानेल तसें वागतात. लोक आपले हुकूम मानीत नाहींत, हें बादशहास ठाऊक, म्हणून स्वतःच लढाईवर जाण्याचा त्यानें निश्चय केला. सदासर्वकाळ ईशचिंतनांत निमग्न आहों, असें दाखवितो. रमजानच्या उपवासांत जमिनीवर डोकें टेंकून सारखें चोवीस चोवीस तास भजन म्हणत असतो. मग राणी उदेपुरी जवळ जाऊन त्यास उठविते, तेव्हां राग आल्यासारखें दाखवून म्हणतो, ' मला माझ्या परमानंदांत तुम्ही व्यत्यय कां आणितां ? मला आतां इहलोकचें सुख पुरें झालें. ' अशा वर्तनानें भोळ्या भाबड्यांच्या चित्तास वाटूं लागतें, कीं बादशहा खरोखरच मोठा सत्पुरुष आहे.

'परंतु त्याच्या छावणी इतकी घाणेरडी जागा पृथ्वीवर दुसरी नसेल. दररोज असंख्य माणसें व जनावरें मरून एकच घाण सुटलेली असते. जनावरांप्रमाणेंच मेलेल्या माणसांना दोरी बांधून ओढून नेतात, आणि अंगावर असेल नसेल तें सर्व बुचाडून जवळ कोठें खाडा दिसेल, त्यांत टाकून देतात. कोल्ह्याकुत्र्यांची मात्र चैन असते. 'किती वेळां तरी मला बादशहाच्या छावणीजवळ नाक धरतां धरतां पुरेवाट झाली, आणि कितीकदां मला उलट्या झाल्या. माशा तर इतक्या असतात कीं, कांहीं खाण्याची म्हणून सोय नाहीं.' प्रवासी लोकांस पहिला मोठा धाक मराठ्यांचा. पण मराठ्यांच्या हातून सुटावें, तों बादशहाचे जकात अधिकारी ज्यास्तच लुबाडणारे आहेत. कोणाजवळ कांहीं द्रव्य आहे, असा सुगावा लागला म्हणजे पुरे, खुशाल ते सर्वस्व हरण करून, प्रवाशांना मारून पुरून टाकितात. अशी ही ह्या साधुबादशहाची राज्यव्यवस्था आहे.

'अहंमदनगरास आल्यावर बादशहास अतिपस्तावा झाला. आपण कशाला ह्या मराठ्यांच्या युद्धांत पडलों, असें त्यास होऊन गेलें. दिल्लीस निघून जावें तर दक्षिणचा सर्वच प्रदेश हातचा जाणार; आणि इतक्या वर्षांचे श्रम व खर्च सर्व पदरांत. म्हणून त्यास दक्षिण देश सोडतां येईना. मुलें नातू पणतू मिळून निदान सतरा असामी वीस पंचवीस वर्षांच्या वरचे त्याच्या कुटुंबांत आहेत. नातवांच्या दाढ्या पिकूं लागल्या आहेत. बादशहा मरतो केव्हां आणि आपण राज्य बळकावतों केव्हां, अशी प्रत्येकास विवंचना लागलेली आहे, पण या मराठे लोकांस जिंकून बादशहाच्या मनास समाधान देण्याचें सामर्थ्य एकांत नाहीं. मराठे तर बेसुमार दाडगाई करूं लागले आहेत. एक टोळी दिल्लीवर, तर दुसरी बंगाल्यांत ओरिसा, डाक्का, राजमहालकडे; तिसरी कर्नाटकावर, तर चवथी सुरतेवर, असा सारखा धुमाकूळ चालला आहे. स १७०६ त त्यांनीं सुरत, भडोच व गणदेवी लुटली. कोणत्या म्हणजे मुलखांत ते नाहींत, अशी जागा नाहीं. अजीम व कामबक्ष हे दोन मुलगे बादशहाच्या मरणाची वाट पाहत टपून जवळ बसले आहेत. त्यांची धास्ती बादशहास अहोरात्र लागलेली आहे. आपली फौज ह्यांस मिळेल, म्हणून बादशहा फौजेस नेहमीं लांबलांबच्या प्रांतांत पाठवून आपण बहुतेक सडाच राहतो. अहंमदनगरास तो एकदां सडकून आजारी पडला, तेव्हां तो मेल्याची गप्प उठली; आणि मग जो

काय गोंधळ सर्व राज्यांत उडाला, तो कांहीं विचारूं नये. खरोखरी मेल्यावर पुढें काय होणार हें त्यास जिवंतपणीं डोळ्यासमोर दिसून आलें. लोकांस शांत करण्याकरितां, उठवत नव्हतें तरी, गाद्या तक्ये वगैरे लावून पुष्कळ असामींनीं सर्व बाजूंनीं धरून त्यास दरबारांत आणिलें, आणि मंगल वाद्यें सुरू केलीं, तेव्हां तो जिवंत आहे, इतकी तरी लोकांची खात्री झाली. ह्या प्रसंगीं डोळ्यांत आंसवें आणून, त्यानें भावी विपत्तींबद्दल अत्यंत दुःख दाखविलें, आणि परमेश्वर माझे डोळे कां मिटीत नाहीं, असें म्हणून आक्रोश करून म्हणाला, 'काल रात्रीं पैगंबरानें मला दर्शन देऊन सांगितलें, ' बाबा तुझें मरण इतक्यांत नाहीं. अजून तीस वर्षें तुला जगायचें आहे ' ! कोण ही माझी दुर्दशा. मरणासुद्धां मी महाग झालों काय !' हें भाषण ऐकून लोकांची खात्री झाली कीं, बादशहा अजून पुष्कळ वर्षें वांचणार आहे. पुनः आपल्या मरणाची गडबड उडूं नये, म्हणून हा सगळा खटाटोप. ढोंगाची हुबेहुब बतावणी त्याच्या इतकी कोणास साधली नव्हती!

'अहंमदनगरास पोंचल्यावर, आपलें इतिवृत्त संपलें, असें बादशहास वाटूं लागलें. आपला कायमचा मुक्काम येथेंच होणार, अशी त्याची खात्री झाली. अजीमशहा त्याचे जवळ होता. राज्याच्या पुढील व्यवस्थेविषयीं बादशहाचे मनांत विचार चालू होते. पाटणा येथें अजीमशहाचा मुलगा अजीम–उश्शान, हा बादशहाचे प्रीतींतला होता; तसेंच कामबक्षावरही त्याचें मन विशेष होतें. अजीमशहास छावणींतले बहुतेक सरदार अनुकूळ असून, तो कामबक्षाची नालस्ती करण्यांत दंग होता. बादशहा हा प्रकार जाणून होता, व कामबक्षाचा संभाळ करण्याविषयीं त्यानें सुलतान हुसेन ऊर्फ मीर मलंग यास आज्ञा केली. कामबक्षही थोड्या काळानें बादशहाचे छावणींत आला. अजीमशहानें त्याचें कांहीं नुकसान करूं नये, म्हणून बादशहानें कामबक्षास मोठ्या इतमामासह विजापुरास पाठविलें; आणि अजीमशहासही माळव्यांत घालवून दिलें. आपण आतां थोड्या वेळानें मरणार, अशी खात्री होतांच, बादशहानें वजीर आसदखानास जवळ बोलाविलें; आणि त्याजकडून खजिना खोलवून फौजेचा चढलेला सर्व पगार आपल्या समक्ष देऊन टाकिला. मरणसमयीं तो बोलला, ' मी आतां सुखानें मरणार; कारण मुसलमानी धर्माच्या शत्रूंचा नाश करण्यांत मीं कसूर केली नाहीं, एवढें तरी लोक माझ्याविषयीं

खात्रीनें म्हणतील.' वडील मुलगा शहाआलम यानें आपल्या पश्चात् राज्यावर यावें, अशी व्यवस्था करण्याविषयीं जवळच्यांनीं त्यास आग्रह केला असतां, तो म्हणाला, 'मी कोण त्यास नेमणार; परमेश्वराच्या हातची ही गोष्ट आहे.' दोनप्रहरानंतर दोन तासांनीं बादशहाचें प्राणोत्क्रमण झालें.' (मनूची). एवंच शुक्रवार ता. २० फेब्रुवारी, सन १७०७ रोजीं बादशहाचा व त्याजबरोबर मराठयांशीं चाललेल्या ह्या प्रचंड त्रिशद्वार्षिक युद्धाचा शेवट झाला. एवढ्या पराक्रमी व महान् बादशहाचा शेवट असा दुःखकारक व्हावा, ही केवढी भवितव्यता !

स. १६३६ पासून १७०७ पर्यंत सुमारें पाऊणशें वर्षे हिंदुस्थानच्या रंगभूमीवर शिवाजी व औरंगजेब ह्या दोन प्रसिद्ध व्यक्तींचा खेळ चालून त्यांनीं या देशाचा इतिहास सर्वस्वी नवीन तयार केला, असें आरंभीं सांगितलें. ( पृ. २११ ). त्यांपैकीं शिवाजीनें आपला ऐहिक कार्यभाग संपवून पूर्वींच परलोकवास केला. दुसऱ्या व्यक्तीचा खेळ पुढें पुष्कळ वर्षे चालून त्यांत काय काय प्रकार झाले, ते येथपावेतों सांगितले. औरंगजेबाच्या कारभारावर विशेष टीका करण्याचें कारण नाही. परंतु प्रत्यक्ष त्याच्या मुलानें एका पत्रांत केलेली टीका आहे, त्यांतील कांहीं उतारे येथें देणें प्रस्तुत वाटतें. हें पत्र मनूचीनें समग्र दिलेलें आहे. (मनूची ४, १७१–१७७).

शहाजादा अकबर इराणांत होता. त्यास कोणत्या तरी युक्तीनें परत आणावा, नाहीं तर इराणच्या शहाची मदत घेऊन तो केव्हां हिंदुस्थानांत येईल याचा नेम नाहीं, अशी औरंगजेबाची खटपट सारखी चालू होती. त्यानें आपल्या मुलास अनेक पत्रें लिहिलीं. एकदां एक असेंच त्यानें अत्यंत आर्जवानें व प्रेमभावानें आपल्या मुलास पत्र लिहिलें, त्याचा खालील जबाब अकबराकडून आला. 'बाबा, तुमचेंच उदाहरण मीं नेहमीं डोळ्यांपुढें ठेविलें आहे. इतकें चांगलें उदाहरण दुसऱ्या कोणाचें सांपडणार ? ज्या रजपुतांनीं अकबर, जहांगीर व शहाजहान यांस मनापासून साह्य केलें, त्यांचा आश्रय मी केला, यांत वाईट तें काय केलें ! जसवंतसिंग तुमच्या भुलथापांस भुलला नसता तर तुम्ही आज हिंदुस्थानचे बादशहा नसतां, असे हे रजपूत लोक आपल्या राज्याचे खांब होते. पूर्वी फौजेंत रजपूत पाहिजे असले म्हणजे एकाचे ठिकाणीं शंभर उमेदवार येत. हल्लीं तुम्ही तीन तीन वर्षे डांगोरा पिटून सुद्धां

दहा पांच माणसें जमा होत नाहींत. हा प्रभाव कशाचा ? आज इतके तुमचे अंमलदार आहेत, पण एकाची तरी तुमच्यावर खरी भक्ति आहे काय ? फौजेंतील सर्व लोक दरिद्री झाले आहेत, कोणापाशीं हत्यार नाहीं. एक कवि किंवा ग्रंथकार निपजत नाहीं. व्यापाऱ्यांची व धनिकांची लूट होते व खून होतात. रयत धुळीस मिळाली. दक्षिणचा प्रदेश जो पूर्वी केवळ स्वर्गतुल्य वाटत होता ( पहा पृ. २२१ ) तो हल्लीं ओसाड, निर्जन व निर्धन झाला आहे ! विजापुर, औरंगाबाद हीं केवढीं मोठीं व सुंदर शहरें, पण हल्लीं मातीशिवाय तेथें ज्यास्त काय आहे, तुम्हीच सांगा. ह्या सर्वांचें कारण काय तर तुमचा परधर्मद्वेष. तुम्हीं हिंदूंवर जिझिया बसविला, त्यानें लोक सर्व तुमच्यावर उठले, जाळपोळ व लूट करूं लागले, त्यानेंच देश धुळीस मिळाला.

'तुमच्या राज्यांत एक तरी प्रकार असा आहे काय कीं ज्याची मला तारीफ करितां येईल ? थोर थोर पुरातन घराणीं सर्व धुळीस मिळालीं. सर्वत्र लुच्चांचा बाजार भरला आहे. राज्यकारभार सर्व हलकट लोकांच्या हातांत आहे. हातांत जपमाळ, काखेंत कुराण, आणि डोक्यास मोठेंसें पागोटें असलें म्हणजे तुमचा त्यावर पूर्ण भरंवसा. अशी मंडळी तुमच्या राज्याचे आधारस्तंभ !

'असा सर्व राज्याचा नाश झालेला मला पाहवेना, तेव्हां अत्यंत कष्टानें मी देशत्याग करून इकडे आलों. आतां मी शांत आहें. परमेश्वर तुम्हाला दीर्घायुष्य देवो. मीच परत येऊन राज्य करावें म्हणतां, त्यास तुम्ही राज्य सोडून मक्केस चालते व्हा, म्हणजे मी येऊन दाखवितों कसें राज्य करावयाचें तें. आजपर्यंत काय करामत होती, ती तुम्हीं करून दाखविलीत. आतां वृद्धापकाळीं परमार्थसाधनच तुम्हांस योग्य आहे. ज्यास्त लिहून तुम्हांस त्रास होईल म्हणून पत्र पुरें करितों.'

विधात्याची योजना अकल्प्य आहे. सर्व मोगल बादशाहीची प्रचंड शक्ति मराठ्यांवर सोडणाऱ्या पराक्रमी व धूर्त औरंगजेबानें वृथाभिमानास पेटून आपला व एकंदर मोगल बादशाहीचा एकदमच अंत करून घेतला. हीं पंचवीस वर्षें जर त्यानें राजधानींत राहून, राज्याचा कारभार पाहण्यांत घालविलीं असतीं, तर त्याचे राज्याचें आयुष्य इतक्या लवकर संपलें नसतें. परंतु मराठशाहीचा उदय व्हावयाचा होता, मराठ्यांच्या अंगचे

कित्येक गुण जगाच्या निदर्शनास यावयाचे होते, आणि त्यांचें नांव इतिहासांत अजरामर व्हावयाचें होतें, म्हणूनच त्याला विपरीत बुद्धि झाली. नाहीं तर, आपलें कल्याण न समजण्याइतका मंदबुद्धि औरंगजेब खचित नव्हता. पण 'बुद्धिः कर्मानुसारिणी', ह्या म्हणीप्रमाणें औरंगजेबाला आपल्या अत्यंत घोर पातकांचें प्रायश्चित्त भोगावयाचें होतें. राज्याचा नाश होऊनच त्या पापाचें क्षालन व्हावयाचें होतें. म्हणून बादशहाला अशी बुद्धि झाली.*

८. मराठ्यांच्या प्रमादांची मीमांसा.—औरंगजेबाशीं झगडण्यांत मराठ्यांनीं शौर्य व चिकाटी हे गुण प्रगट केले, त्याजबद्दल त्यांची पुष्कळशी स्तुति करण्यांत येते. मराठ्यांच्या इतिहासांत या युद्धास 'स्वातंत्र्यार्थ युद्ध' असें भपकेदार नांव देण्यांत येतें. मनुष्य स्तुतिप्रिय असतो, आणि वरील प्रकारची स्तुति मराठ्यांस आवडली तर नवल नाहीं. परंतु ह्या स्तुतीच्या मुळाशीं खरा प्रकार काय आहे, याचा प्रत्येकानें शांत विचार केला पाहिजे. या बाबतींत अनेक महत्त्वाचे वाद व मुद्दे आहेत, त्यांचें थोडेसें विवेचन अनभ्यस्त वाचकांकरितां येथें करावयाचें आहे. युद्धांत समोर मृत्यु हटकून दिसत असतां, आणि जिवंत परत येण्याची आशा नसतां, जेव्हां राष्ट्रांतले पुष्कळसे लोक राष्ट्राचा बचाव करण्यास झटून पुढें येतात, तेव्हां त्या राष्ट्रास जिवंत राष्ट्र आणि त्या लोकांस स्वातंत्र्यप्रिय म्हणतां येईल; अशी निःस्वार्थ कामगिरी त्या वेळीं सुद्धां फारच थोड्या मराठ्यांनीं बजाविली. संभाजीच्या मरणानंतर मोगलांशीं लढणें हा मराठ्यांना एक चांगला किफायतशीर धंदाच झाला होता. या

---

* टीप: —औरंगजेबाच्या कारकिर्दीचे अनेक फारशी इतिहास आहेत, त्यांत हिंदूंनीं लिहिलेले दोन अत्यंत मोलवान् आहेत. एक भीमसेनाचा दिलकाश व दुसरा पट्टणच्या ईश्वरदास नागराचा फतूहती–आलमगिरी. ह्या दुसऱ्याची फक्त एकच प्रत ब्रिटिश म्यूझियममध्यें आहे. हे दोघेही हिंदु गृहस्थ औरंगजेबाच्या कारभाराचें योग्य अवलोकन करणारे होते, आणि ते त्याच्या नोकरींत नसल्यामुळें त्याचे स्तुतिपाठक नव्हते. गुजराथचा सुभेदार सुजायतखान याजपाशीं ईश्वरदास नोकर होता. त्याचा इतिहास १७३१ त पूर्ण झाला. त्या वेळीं तो सत्तर वर्षांचा होता. ईश्वरदासाची हकीकत ऑगस्ट १९१५ च्या मॉडर्न रिव्ह्यूमध्यें दिलेली आहे.

धंद्यांत जोखीम फारच थोडें होतें. अवघड व अडचणीच्या जागेंत स्वतःचा बचाव करून मोगलांच्या मुलखावर, सामानावर व पैशावर मराठ्यांना चांगलाच ताव मारतां येत असे. लढाईंत मराठ्यांचे किती लोक पडले याचा अंदाज बिनचूक होणें शक्य नाहीं. पण एकंदर प्रकार ध्यानांत घेतांना या युद्धांत त्यांचे अत्यंत थोडे लोक मेले असावे असें दिसतें; आणि जे मेले ते तरी बाहेर पडतांना आपण खास मरणार अशा भावनेनें लढाईवर गेले नाहींत, तर यश संपादून खास परत येणार, अशाच उमेदीनें ते लढण्यास जात. हल्लींच्या युरोपियन युद्धांत हरहंमेश इतके प्रसंग उद्भवतात कीं, त्यांत खात्रीचा मृत्यु समोर दिसत असतां, केवळ ती कामगिरी करण्याकरितां शेंकडों लोक आनंदानें पुढें येतात. पाश्चात्यांचें हें राष्ट्रप्रेम पाहून मन थक्क होतें. अशा प्रकारची कर्तव्यनिष्ठा मराठ्यांच्या अंगीं बहुधा नव्हतीच, असें कष्टानें म्हणावें लागतें. सर्व देश औरंगजेबानें व्यापून टाकिला असतां, वतनाचें, लुटीचें किंवा अन्य कांहीं योग्य आमिष पुढें दिसल्याशिवाय, फारच थोडे इसम बाहेर पडत. शत्रूंनीं ज्यास्त आमिष दाखविलें, कीं राष्ट्रघात करण्यास त्यांस यत्किंचित् वाईट वाटत नसे. शिवाजीच्या वेळची लष्करची शिस्त व लुटीचे नियम पार नाहींसे झाले. इतकेंही करून किल्ला वगैरे कावीज करण्याची कामगिरी करण्यांत कोणी इसम कामास आले, तर त्याचे नातलग बक्षिसासाठीं व वतनासाठीं अधिकाऱ्यांस अगदीं भंडावून सोडीत. आनंदानें मृत्यु पत्करणाऱ्या पाश्चात्य वीरांशीं या मराठे वीरांची तुलना यत्किंचित् शोभणार नाहीं. परंतु यास उलट बाजू आहे. हा प्रभाव नुसत्या स्वदेशप्रेमाचा नाहीं. पाश्चात्यांची राज्यव्यवस्था पुष्कळ दिवसांच्या अनुभवानें पूर्णत्वास येऊन राष्ट्राचीं कर्तव्यें ठरून चुकलीं. आणि तीं आनुवंशिक पद्धतीनें लोकांच्या अंगीं पूर्णपणें मुरलीं. कायदे, राज्यपद्धति, टापटीप, हुकमत इत्यादि प्रकार ठरले जाऊन एक प्रकारची शिस्त उत्पन्न झाली, त्या शिस्तीचाही राष्ट्रसंरक्षणास चांगला उपयोग होतो. कायद्यांच्या व शिस्तीच्या योगानें लाखों लोकांचें लष्करी यंत्र तयार होतें, आणि या मानवी यंत्राचा उपयोग सरकारास वाटेल तसा करितां येतो. राष्ट्रप्रेम आणि ही लष्करी शिस्त यांचा परिणाम अन्योन्यपोषक असतो. राष्ट्रप्रेमामुळें विशिष्ट प्रकारचा कायदा किंवा

शिस्त लोक मान्य करितात, आणि एकदां ही शिस्त मान्य झाली, म्हणजे राष्ट्रकाज करण्याचें वळण लोकांस लागून ते त्याकरितां प्राण देण्यास तयार होतात. ही शिस्त तयार करण्याचें काम राष्ट्रीय कारभाऱ्याचें असतें; आणि त्या कामीं पुष्कळदां लष्करी सत्ता व दिवाणी सत्ता यांचा विरोध उत्पन्न होतो. परंतु लष्करी सत्ता वरचढ होऊं नये; ती दिवाणी सत्तेच्या ताब्यांत राहवी, अशी राजनीति आहे. ( पृ. ४५९ पहा ).

ही राज्यव्यवस्था व शिस्त ठरविण्याचें काम बिनलष्करी मुत्सद्यांचेंच असतें. त्यांच्या अंगीं लष्करी पराक्रम असला तर त्यांची योग्यता वाढते; पण मुळांत त्यांस लष्करीपेक्षां मुत्सद्दी धोरण असावें लागते. याच धोरणाच्या जोरावर रामचंद्रपंत अमात्य, परशुरामपंत प्रतिनिधि, शंकराजी नारायण सचिव वगैरे गृहस्थ प्रसिद्धीस आले; आणि संताजी घोरपडे, धनाजी जाधव वगैरे सेनापति ज्यास्त पराक्रमी असूनही मुत्सद्दी प्रधानांच्या हुकमतींत राहिले. लष्करी शौर्य जसें प्रसंग पडल्यानें निदर्शनास येतें, तसेंच मुत्सद्दी शहाणपणही प्रसंगानेंच उत्पन्न होतें. संभाजीच्या वधापूर्वी रामचंद्रपंत, शंकराजी नारायण किंवा परशुरामपंत हे थोडीं बहुत कामें करीतच होते; परंतु पुढें योग्य प्रसंग प्राप्त होतांच, त्यांची मुत्सद्देगिरी प्रगट झाली; आणि पिंगळे वगैरे दुसरे कित्येक इसम संधि मिळूनही, मुत्सद्दी शहाणपण अंगीं नसल्यामुळें, प्रसिद्धीस आले नाहींत. याच कारणास्तव पुढें बाळाजी विश्वनाथ पेशवे मराठी राज्यांत प्रमुख झाला. प्रसंग व परिस्थिति अनुकूल असून अंगीं योग्यता असलेले इसम पुढें आले; नसलेले नाहींसे झाले.

राष्ट्रप्रेम व राष्ट्रशिस्त हे दोनही गुण आमच्याकडे पूर्वापार अज्ञात होते. शिवाजीनें ते बऱ्याच अंशीं उत्पन्न व प्रदीप्त केले. त्यानें निर्जीव राष्ट्र सजीव केलें. शिवकालीन समाज जिवंत होता, कर्तव्याची त्यास जाणीव होती; म्हणून संकटें आलीं तरी राष्ट्राचा बचाव झाला. राष्ट्राला कर्तव्याचें हें वळण लागून तें अंगीं मुरण्यास बराच कालावधि लागतो. शिवाजीनें आपल्या हयातींत निरपेक्ष कर्तव्याचीं अशीं अनेक माणसें तयार केलीं. पण तीं सर्व संभाजीच्या कारकिर्दींत कांहींना कांहीं कारणानें नष्ट झालीं. शिवाजीच्या शिस्तींत मुरलेला एक रामचंद्रपंत उरला होता, त्याचा राष्ट्रास उपयोग झालाच. त्यांतल्या त्यांत मावळ प्रांतांतला देशाभिमान इतर भागांपेक्षां जास्त होता. म्हणून मावळांत बादशहाचें पाऊल मुळींच टिकलें नाहीं.

मावळांतील एखादा किल्ला शिकस्तीनें त्यानें घ्यावा, तों लगेच मावळ्यांनीं त्याचें उच्चाटण करावें. ह्या मांवळांतील लोकांचा पुढारी शंकराजी नारायण होय.

तथापि शिवाजीची शिस्त पुढें चालविणारा व सर्व लोकांवर आपली छाप बसविणारा दुसरा इसम पुढें निपजला नाहीं. रामचंद्रपंताच्या अंगीं युद्धकौशल्य नव्हतें. आणि दोनही गुण अंगीं असल्याशिवाय सर्व लोकांवर छाप बसविणें त्या वेळीं शक्य नव्हतें. अशा स्थितींत मराठ्यांचा नेहमींचा फाटाफुटीचा स्वभाव पुनः जोरांत आला. वाटेल त्यानें वाटेल तें करावें आणि स्वार्थामार्गें पळत सुटावें, असा प्रकार होऊन मराठ्यांच्या राज्यांत अव्यवस्था व गोंधळ माजला. औरंगजेबाचा त्यांनीं पाडाव केला खरा,परंतु त्यांना हाताशीं धरणारा अधिक योग्यतेचा पुरुष लाभता, तर त्याहून किती तरी जास्त काम तेवढ्याच साहित्यानें होऊं शकलें असतें. दहा पांच वर्षांत सर्व मोगल बादशाही त्यांनीं हस्तगत केली असती. इतकी अव्यवस्था औरंगजेबाच्या दुर्नीतीनें उत्पन्न झाली होती. 'बादशहास आहे असाच ठेवण्यांत आमचा फायदा आहे, त्यास पकडण्यांत किंवा मारण्यांत नाहीं,' असें मराठे वारंवार म्हणत. म्हणजे ज्या पुरुषानें पाउणशें वर्षें सर्व मराठी राष्ट्राचा अत्यंत उच्छेद केला, तो कबजांत येत असतांही, मराठयांचें लक्ष स्वतःच्या फायद्याकडे होतें, राष्ट्र काजाकडे नव्हतें. तात्पर्य या त्रिंशद्वार्षिक युद्धांत तारीफच करावयाची असेल तर ती औरंगजेबाच्या प्रमादांची व अदूरदृष्टीची करितां येते. मराठयांच्या राष्ट्रप्रेमाची किंवा कर्तव्यासक्तीची करितां येत नाहीं. राष्ट्रप्रेम मराठ्यांच्या अंगीं फारसें नव्हतें, असें मागें सांगितलेंच आहे, त्याचेंच हें वरील युद्ध एक उदाहरण होय.

प्रत्यक्ष राजारामाला ही अडचण दिसून आली. मराठ्यांना वतनांची आसक्ति अतोनात आहे हें जाणून, त्यानें त्या गुणाचा फायदा करून घेतला. भराभर वतनांच्या सनदा देऊन त्यानें बादशहाशीं लढण्यास फौज तयार केली. त्याचा त्या वेळीं परिणाम झाला, परंतु वतनासंबंधानें अतिशय गोंधळ उत्पन्न झाले. सबब महाराष्ट्रांत आल्यावर ता. १९ फेब्रुवारी स. १६९९ त त्यानें असा एकसहा हुकूम काढिला, कीं शिवाजीच्या वेळीं जीं वतनें चालू होतीं तेवढींच पुढें चालवावीं. नवीन मिळालेलीं सर्व

रद्द समजावीं. आणि या अलीकडील सनदांचा तपास न्यायाधीश कोन्हेर त्रिंबक यानें करून, जरूरीप्रमाणें नवीन सनदा द्याव्या. ( खं. ३–१४४ ).

लोकांनीं सर्वस्वाचा त्याग करून राष्ट्राच्या बचावासाठीं धावून येणें ही भावना युरोपांत सुद्धां अगदीं अलीकडे एकुणिसाव्या शतकांत उत्पन्न झाली आहे. फ्रेंच राज्यक्रान्तीनंतर राष्ट्रीय चळवळी ठिकठिकाणीं सुरू होऊन, प्रजासत्ताक राज्यें कांहीं देशांत निर्माण झालीं. राष्ट्रीय भावनेनुसार प्रजासत्ताक राज्यपद्धती निर्माण होण्यापूर्वी, अनियंत्रित राजसत्तेचाच प्रभाव चहूंकडे होता. अनियंत्रित राजसत्ता, ज्यास absolute monarchy असें म्हणतात, ती स्थापन होण्याच्या पूर्वी, फ्यूडल सिस्टिम म्ह० जमीनदारी पद्धत युरोपांत प्रचलित होती. महाराष्ट्रांतील तत्कालीन स्थितीशीं युरोपांत साम्य पाहवयाचें असल्यास,या जमीनदारी पद्धतीपर्यंत मागें जावें लागतें. या पद्धतींत वतनांचें माहात्म्य फार होतें. देशांतील बहुतेक जमिनी वतनदारांनीं कबजांत घेतलेल्या होत्या; आणि युद्धप्रसंगीं प्रत्येकानें अमुक एक फौजेची मदत घेऊन यावें असा करार होता. इतर बाबतींसंबंधानें हे जमीनदार आपापल्या टापूंत संपूर्ण मुखत्यार असत. ते पुष्कळदां डोई-जोड होत, बंडें करीत, आपसांत लढत किंवा देशाचे शत्रूंस जाऊन मिळत. तसाच कांहींसा प्रकार महाराष्ट्रांतील जहागीरदार देशमुख वगैरेंचा होता. पंधराव्या शतकांत या जमीनदारी पद्धतीचा युरोपांत लय होत गेला, आणि अनियंत्रित राजसत्ता चालू झाली. अनियंत्रित राजसत्ता लोकांना सुखकर किंवा दुःखकर होणें, हें राजा असलेल्या व्यक्तीवर अवलंबून असतें. एलिझाबेथ व पहिला चार्लस, किंवा अकबर व औरंगजेब यांचींच उदाहरणें मनांत आणिलीं, म्हणजे अनियंत्रित राजसत्तेचें स्वरूप लक्षांत येईल. सारांश, जमीनदार नाहींसे करण्यास, प्रथम एकराजसत्ता चालू व्हावी लागते. ही एकराजसत्ता जेव्हां लोकांस परमावधीनें जाचक होते, तेव्हां सर्व लोक एक होऊन ते त्याचा निषेध करूं लागतात. इंग्लंडांतील व फ्रान्सांतील राजक्रांन्ति याचें उदाहरण आहे. असा शेंकडों वर्षें झगडा होऊन निरनिराळ्या अवस्थान्तरांतून लोक जातात, तेव्हां राष्ट्रीय स्वातंत्र्य किंवा राष्ट्रप्रेम हे गुण लोकांच्या अंगीं उत्पन्न होतात; आणि मग ते संघशक्तीनें राष्ट्रकाम करितात. असा सामान्य सिद्धान्त युरोपीय शास्त्रकारांनीं ठरविला आहे. यांत आणखी पुष्कळ प्रकार व मतभेद आहेत,

ते सांगण्याचें हें स्थळ नाहीं. परंतु मतलब इतकाच कीं, राजारामाच्या आपत्प्रसंगीं राष्ट्रीय भावनेची अपेक्षा करणेंच गैर होय. अर्थात् राष्ट्रीय भावनेच्या जोरावर औरंगजेबाचा पाडाव झाला, हें म्हणणें यथार्थ नाहीं. शिवाजीनें वतनदारांस कबजांत आणून अनियंत्रित राजसत्तेचा उपक्रम केला; आणि वतनांचें बंड मोडून काडिलें. संभाजीच्या कारकिर्दीत त्यास थोडीशी पुष्टि मिळाली. परंतु ती सत्ता चांगली भक्कम व स्थायिक होण्यापूर्वींच बादशहा मराठ्यांवर चालून आला. तेणेंकरून सर्व राज्य विसकळित झालें; आणि पूर्वींची वतनदारी जोरांत आली.

हिंदी लोकांची व विशेषतः मराठ्यांची आपल्या वतनांवर म्ह. जमिनीच्या तुकड्यावर अतोनात आसक्ति आहे. या आसक्तीची परक्या लोकांस कल्पना होणें शक्य नाहीं. मराठे लोक दुसऱ्या वाटेल त्या गोष्टीचा त्याग करतील, परंतु वडिलोपार्जित मालकीच्या जमिनीचा ते प्राण गेला तरी त्याग करणार नाहींत. या स्वभावगुणाचा राज्यकर्त्यांस प्रथम विचार करावा लागतो. त्यांतून औरंगजेब जेव्हां मराठ्यांच्या या गुणाचा फायदा घेऊन लोकांस भराभर नवीन वतनें देऊं लागला, तेव्हां राजारामास व त्याच्या कारभाऱ्यांसही तोच मार्ग स्वीकारावा लागला. नाहीं तर बादशहाशीं लढण्यास कोणीच पुढें आला नसता. मुख्य अडचण म्हणजे फौज पाहिजे होती. पुरेशी फौज कशी निर्माण व्हावी, हा मोठा प्रश्न होता. हल्लीं जशा कायद्यानें व शिस्तीनें युरोपांत फौजा निर्माण होतात, तसा प्रकार तेव्हां नव्हता. शिवाजीनें शिस्त सुरू केली, ती बहुतेक बंद पडली; म्हणून वतनांची लालूच दाखविल्याशिवाय मार्ग नव्हता. हा जो प्रघात एकदां पडला, तो नाहींसा करतां आला नाहीं. पेशव्यांना सुद्धां वतनदारीची ही पद्धत चालवावी लागली. प्रत्येक वतनदारानें अमुक एक फौज घेऊन लढाईला यावें, असा करार असे; मात्र या व्यवस्थेंत एक मोठा दोष असा होता कीं, चौमासाकरितां सर्व लोक आपलीं शेतें-भातें पाहण्यासाठीं घरीं जात; आणि त्या वेळीं सरकाराजवळ लढण्यास फौज राहत नसे. एखादी मोहीम चालू असतां, पावसाळा सुरू झाल्याबरोबर ती मोहीम तशीच टाकून लोक घरोघर निघून गेल्यानें राज्याचें काम बिघडलें, असे अनेक प्रसंग पुढें मराठशाहींत आले. जमिनीवरील आसक्ति लोकांच्या मनांत किती होती, हें यावरून दिसतें; आणि आजही

ती आहेच. युरोपांत हल्लीं औद्योगिक मनु असल्यामुळें, लोकांस राहण्याचें स्थायिक ठिकाण नसतें. प्रत्येक जण उद्योगाच्या पाठीस लागत, जगभर वाटेल तिकडे भटकतो; त्याला घर म्हणून नसतें. हिंदुस्थानांत तसा प्रकार अद्यापि झालेला नाहीं; म्हणून जमिनीच्या वतनांस एवढें महत्त्व आहे.

सारांश, देशभक्तीच्या ह्या प्रश्नांत अनेक भानगडींचे मुद्दे अंतर्भूत आहेत. ग्रीस देशांत लहानशा शहरापलीकडे ही देशभक्ति जात नसे. संघशक्तीनें कामें करण्याची प्रेरणा (Voluntary association) हल्लींच्या युरोपियन पद्धतींत उत्पन्न होत आहे. म्हणून महाराष्ट्रांत या गुणाचा त्या वेळीं अभाव असला तर नवल नाहीं. सारांश, औरंगजेबाशीं लढण्यांत मराठ्यांच्या अंगीं राष्ट्रीय भावना किंवा संघशक्ति चांगली उत्पन्न झाली होती, असें म्हणणें वस्तुस्थितीच्या विरुद्ध होईल.

९. **भिन्न दृष्टींनीं युद्धाचा विचार.**—बहुतेकांचें म्हणणें असें आहे, कीं मराठ्यांस ह्या युद्धांत जय मिळण्याचें मुख्य कारण बादशहाचे प्रमाद होत. त्यांच्या अंगीं पराक्रम होताच; परंतु बादशहाच्या हातून प्रमाद घडले नसते, किंवा त्यांपासून आपला फायदा करून घेण्याची शक्ति मराठ्यांचे अंगीं नसती, तर बादशहानें हा देश तेव्हांच जिंकिला असता; आणि मराठ्यांचें नांव इतिहासांत प्रसिद्ध झालें नसतें. बादशहाच्या ह्या प्रमादांचें विवेचन ठिकठिकाणीं आलेंच आहे. ' इंडिया ऑन् धि ईव्ह् आफ् धि ब्रिटिश कॉन्केस्ट, नांवाचें सिड्ने ओवेनचें एक पुस्तक आहे. त्यांत बादशहाच्या प्रमादांचें पृथक्करण फार खुबीनें केलें आहे; आणि त्यांत मराठ्यांच्या योग्यतेचाही अंदाज केलेला आहे, त्यांतील थोडा गोषवारा येथें देणें अवश्य वाटतें. औरंगजेबाचा गर्विष्ठ व हट्टी स्वभाव, त्याच्या लष्करांतील डामडौल व सर्वांशीं त्याच्या बेइमानीपणा, यांचा फायदा नेहमीं त्याच्या शत्रूंस मिळत गेला. गर्वामुळें त्यास आपल्या शत्रूंची खरी योग्यता कळली नाहीं. हट्टानें त्यानें जिझिया कर सर्व दक्षिण हिंदुस्थानांत चालू करून लोकांचीं मनें संतप्त केलीं. त्याच्या लष्कराच्या भपक्यास भिऊन, विजापुर व गोवळकोंडा येथील भागूबाईसारखे मुत्सद्दी धन्याचा विश्वासघात करण्यास प्रवृत्त झाले, ही गोष्ट खरी; पण त्या निरर्थक भपक्यानें पैशाचा मात्र चुराडा होऊन, तरवारीशीं गांठ घालणाऱ्या मराठ्यांची धनतृष्णा व लूट करण्याचें अनुपमेय कौशल्य, हीं मात्र वाढत गेलीं. म्हणजे, जरी समरांगणावर नेण्यास त्यांजला

कोणी नायक नव्हता; अनेक घोर संग्रामांत त्यांचा पराभव झाला; त्यांचे मुख्य मुख्य किल्ले पाडाव झाले; इतकें झालें, तरी त्यांस जिंकण्यास बादशहा समर्थ झाला नाहीं; इतकेंच नाहीं, तर बादशहाचें सामान व धन लुटून ते गबर झाले, व 'परमेश्वर बादशहास अशीच बुद्धि देवो,' असें म्हणून बादशहाची टर उडवूं लागले. पण ह्या सर्वांत बादशहाची मोठी चुकी म्हणजे त्याचा बेईमानी स्वभाव होय. शत्रूंशीं विश्वासघात केलेला एक वेळ खपेल; किंबहुना, शिवाजीप्रमाणें स्वकीयांवर प्रीति करणारानें शत्रूंशीं कपट लढविलें, तर तोही गुणच समजला जाईल; पण औरंगजेबानें सर्वांशींच कपट लढविल्यामुळें, तो स्वकीयांसही अप्रिय झाला, त्याचे पदरचे सर्व लोक नीतिभ्रष्ट होऊन आपलाच फायदा पाहूं लागले, व शत्रूंस सामील झाले. येणेंकरून बादशहाचा सर्वस्वी घात झाला. असें ओवेनचें म्हणणें आहे.

ह्या प्रचंड राष्ट्रीय युद्धाचा विचार अनेकांनीं निरानेराळ्या दृष्टींनीं करून जें प्रतिपादन केलें आहे, त्यांतील सार येथें देणें इष्ट दिसतें. परिणामांवरून पाहिलें, तर हें त्रिंशद्वार्षिक युद्ध मराठ्यांचे इतिहासांत सोनेरी अक्षरांनीं लिहून ठेवण्यास योग्य आहे. स्वाभिमान, स्वराष्ट्रप्रीति व स्वातंत्र्यप्रेम इत्यादि उच्चतर गुणांनीं ह्या युद्धाचा भाग बराच भरलेला आहे. अनेक संस्मरणीय प्रसंगीं मराठ्यांच्या अंगचे हे विशिष्ट गुण निदर्शनास आले. कितीही संकटें ओढवलीं, तरी मराठे अपमान सहन करणारे नाहींत, हें त्यांनीं आपल्या कृतीनें लोकांचे अनुभवास आणून दिलें. तसेंच काव्यनाटकादिकांस योग्य असे पुष्कळ प्रसंग ह्या युद्धांत भरलेले आहेत. संभाजीचा वध, जिंजीचा वेढा, संताजीचा खून, धनाजीचे मोगलांवर हल्ले, साताराचा वेढा, वाकिनखेड्याच्या अतिशूद्र नाइकानें केलेले पराक्रम, शाहूची कैद, व शेवटीं प्रत्यक्ष बादशहाचा अत्यंत हृदयद्रावक शेवट, इत्यादि शेंकडों प्रसंगाचीं सरस व हृदयद्रावक वर्णनें करण्यास इतिहासकार, कवि व नाटककार यांची आज उणीव आहे. नाहीं तर महाराष्ट्रेतिहासांतील ह्या एका भागाची तुलना पेलॉपोनिशियन युद्ध, अगर ट्रोजन युद्ध किंवा जगाच्या इतिहासांतील दुसरे बहारीचे प्रसंग, यांशीं करितां आली असती. प्रत्यक्ष शिवाजीनेंही मोगलांच्या असल्या प्रचंड सेनेशीं टक्कर दिली नाहीं; उलट जयसिंगासार-

त्याशीं लढण्याचा प्रसंग आला, तेव्हां बादशहास शरण जाऊन, त्यानें वेळ मारून नेली. विजापुर व गोवळकोंडा येथील राज्यें हयात असल्यामुळें मोगल बादशहाचा त्यांशीं कलह लावून देण्याची सवड शिवाजीस होती. शिवाय तो आपले किल्ले सोडून बाहेर मैदानांत फारसा कधींच आला नाहीं. परंतु बादशहाशीं टक्कर देणाऱ्या हल्लींच्या मराठे लोकांस कांहींच अनुकूल नव्हतें. शिवाजीप्रमाणें त्यांस समरांगणावर नेण्यास लोकांचीं मनें आकर्षून घेणारा नायक नव्हता. प्रत्यक्ष मोगल बादशहाच्या सर्व प्रचंड फौजेशीं त्यांस सामना करावा लागला. संभाजीच्या गैरव्यवस्थेंत मोठमोठे सरदार धुळीस मिळाले असून, किल्ल्यांची तजवीज बरोबर नव्हती. त्यांचा राजा बादशहाचा कैदी होऊन, ते स्वसंरक्षणार्थ देशोधडीस लागले होते. पैशाचा वसूल नाहीं, फौज व्यवस्थेशीर नाहीं, किल्ले नीट नाहींत, कोणाचा आधार नाहीं, अशांत त्यांनीं आपला गेलेला मुलूख परत मिळविला; आणि परदेशांत चौथाई व सरदेशमुखी हे हक्क स्थापित केले. अर्थात् शिवाजीच्या वेळीं जी प्रेरणा केवळ वरच्या वरच्या मंडळींत होती, ती ह्या वेळेस सामान्य वर्गांत पसरली; व पुष्कळ इसम सेनानायक बनले. राजाराम, प्रल्हाद निराजी, संताजी घोरपडे, व दुसरे अनेक थोर पुरुष परलोकवासी झाल्यावरही, दुसरे गृहस्थ आपलें धैर्य खचूं न देतां पुढाकार घेण्यास सरसावले. याप्रमाणें मराठ्यांच्या अंगचें खरें राष्ट्रतेज ह्या घोर संग्रामांत उत्तम प्रकारें कसास लागलें. ह्या सर्व परिणामाचें श्रेय खरोखर औरंगजेब बादशहास दिलें पाहिजे. तो जर जातीनिशीं मराठ्यांशीं लढण्याकरितां दक्षिणेंत आला नसता, तर मराठ्यांचें क्षात्रतेज असें झळकलें नसतें, आणि त्यांच्या इतिहासाची थोरवीही वाढली नसती. एखाद्या पुरुषाचा नांवलौकिक होण्यास योग्य परिस्थितीची जरूर असते, त्यांतलाच प्रकार राष्ट्राचाही आहे.

या युद्धाचा दुसरा एक महत्त्वाचा परिणाम झाला, त्याचा उल्लेख ठिकठिकाणीं करण्यांत आलाच आहे. शिवाजीनें जरी मराठ्यांचें स्वतंत्र राज्य स्थापिलें, तरी त्या राज्याचा विस्तार, व शक्ति हीं वाढण्यास वरील युद्धच पुष्कळ अंशीं कारण झालें. सर्वांवर सारखा प्रसंग गुदरल्यामुळें राष्ट्रीयत्वाचीं बंधनें थोडींबहुत दृढ झालीं, आणि लोकांस जुटीनें काम करण्याची संवय लागली. मनांत आणल्यास आपण महत्कृत्यें करूं शकूं,

अशी धमक व भरंवसा त्यांजमध्यें उत्पन्न झाला. आपल्या ठिकाणीं असा आत्मप्रत्यय असल्यावांचून पौरुषत्वाचीं कामें हातून होत नाहींत. या शक्तीच्या जोरावर मराठ्यांनीं पुढें शंभर वर्षेंपर्यंत हिंदुस्थानच्या चारही टोंकांस आपला विजयध्वज फडकावीत नेला.

मराठे म्हणजे केवळ लुटारू लोकांच्या टोळधाडी, त्यांच्यांत जोम नव्हता, व एकाद्या वावटळीप्रमाणें त्यांचा प्रभाव केवळ क्षणिक असून, राष्ट्र म्हणविलें जाण्यास लागणारीं चिरस्थायी बंधनें त्यांच्यांत नव्हतीं, असा आक्षेप मराठी राष्ट्रावर नेहमीं आणण्यांत येतो. ह्या आक्षेपाचें निरसन येथवरच्या विवेचनावरून झालेंच आहे; व प्रस्तुतचें युद्ध हेंच त्या आक्षेपावर योग्य उत्तर होय. केवळ लुटारू लोकांच्या टोळधाडीस पंचवीस वर्षेंपर्यंत एवढ्या मोठ्या बादशहाशीं कधींही टिकाव धरितां आला नसता. शौर्य, साहस, कंटकपणा, राज्यकरणकुशलता, संकटवृद्धीबरोबर वाढत जाणारी हिम्मत, कधीं न आटणारा उत्साह, स्वार्थत्याग, समान विपत्तींत दिसून येणारी बंधुप्रीति, राष्ट्रहिताकरितां सर्वस्व खर्ची घालण्याची प्रवृत्ति, स्वधर्मसंरक्षणाची आवड, इत्यादि गुण लुटारू लोकांच्या टोळ्यांत दृष्टीस पडत नाहींत. मुसलमानांस हार न गेलेलें असें दुसरें एकही राष्ट्र नाहीं. मी मी म्हणणारे असे रजपूतही पादाक्रांत झाले, पण मुसलमानांच्या एकछत्री राज्यास अडथळा एकट्या मराठ्यांनीं आणिला. या लोकांकडून अशींच स्मरणीय कृत्यें पूर्वापार घडलीं आहेत. शिवाजीचे पूर्वींही मराठ्यांचा व त्यांच्या भाषेचा मोठा स्मरणीय असा उत्कर्षकाल येऊन गेला होता. आईकडून जाधवांच्या कुलांत शिवाजीचा जन्म झाला असल्यामुळें, प्राचीन मराठ्यांचे उद्धारक जे देवगिरीचे यादव त्यांचेंच संतान शिवाजी व हें शिवाजीचें राज्य होय. मध्यंतरीं मुसलमानशाहीनें राज्यव्यवस्थेंत खळ पडला, पण देशाच्या अंतर्व्यवस्थेंत कांहीं फेर पडला नाहीं. आतां युद्धसंग्राम चालू असतां, शत्रूंचा मुलूख लुटणें व त्यांजवर दरोडे घालणें, ही एक संग्रामपद्धति आहे.

राजारामाचे मृत्यूनंतर युद्धाची सर्व भिस्त धनाजी जाधव, परशुरामपंत प्रतिनिधि व शंकराजी नारायण या तिघांवर होती. परंतु ज्या संग्रामांचीं नांवें वर दिलीं आहेत, त्यांत मुसलमान सरदारांप्रमाणें मराठे सरदारांचीं नांवें स्पष्टतेनें दिलेलीं नाहींत; तथापि युद्धांत मिळालेल्या जयाचें बहुतेक

श्रेय ह्या तिघांस व विशेषेंकरून धनाजीस दिलें पाहिजे. ह्या दहा पांच वर्षांत धनाजी हा विजेप्रमाणें सर्वत्र सारखा चमकत होता. त्याच्या लष्करांत जरी फारशी शिस्त नव्हती, तरी शत्रूंवर एकदम जोरानें घाला घालण्यांत त्याची बरोबरी करणारा त्या वेळेस कोणी नव्हता. मोगल फौजेस 'दे माय धरणी ठाय' करण्यास लावणाऱ्या ह्या धनाजीचें नुसतें नांव ऐकतांच मुसलमानांस विलक्षण कांपरें भरे. धनाजीच्या ह्या आवेशयुक्त हल्ल्यांमुळेंच, घोडा पाणी पीत नसला म्हणजे, 'पाणी कां पीत नाहींस? तुला पाण्यांत धनाजी दिसतो कीं काय?' हे मोगलांच्या तोंडचे घोड्यास उद्देशून म्हटलेले शब्द सर्वतोमुखीं झालेले आहेत. तेव्हां बादशहाचा शेवटीं पाडाव झाला, याचें बहुतेक श्रेय धनाजीसच दिलें पाहिजे. एकंदरींत ह्या युद्धाच्या संबंधानें प्रल्हाद निराजी, रामचंद्र नीलकंठ, संताजी घोरपडे, धनाजी जाधव, परशुराम त्रिंबक, शंकराजी मल्हार, शंकराजी नारायण व खंडो बल्लाळ चिटणीस हीं प्रमुख नांवें ध्यानांत ठेवण्याजोगीं आहेत. यांशिवाय आणखी पुष्कळ नांवें असतील, परंतु मराठ्यांच्या इतिहासाची सामग्री अद्यापि साकल्यतेनें बाहेर आली नसल्यामुळें, तीं उपलब्ध नाहींत.

या युद्धापासून औरंगजेब व अकबर यांच्या राज्यपद्धतींत एक मोठा विरोध दृष्टीस पडतो. राजा मोठा बलाढ्य असून त्याची फौज कितीही मोठी असली, तरी शत्रु निःसत्व दिसला, म्हणून त्यानें त्यास कधींही तुच्छ मानतां नये. युद्ध करितांना सुद्धां दूरवर विचार करून होतां होईल तों युद्धाचा प्रसंग टाळणें, आणि युक्तीनें व सामोपचारानें शत्रूस आपल्या कबजांत आणणें, हेंच बलाढ्य सत्ताधीशास सुद्धां अवश्य आहे. सामोपचारांनीं औरंगजेब मराठ्यांस आपणाकडे वळविता, तर त्यास थोडें बहुत यश आलें असतें; आणि त्यांस संतुष्ट ठेवण्याचा प्रयत्न करता तर ते सामोपचारानें त्यास वश झाले असते. लोकांचें समाधान हाच स्वसंरक्षणाचा उत्तम उपाय, असें समजणारे थोर राज्यकर्ते इंग्रजच होत. औरंगजेब ही दिशाच चुकला. वास्तविक म्हटलें, तर एका राष्ट्रानें दुसऱ्यास जिंकल्याची एक खूण अगदीं स्पष्ट आहे. जिंकलेल्या राष्ट्राचें मन आणि शरीर या दोहोंपैकीं मन जिंकलें गेलें आहे कीं नाहीं, याचा जिंकणारानें विचार करावा. शरीर जिंकणें सोपें; परंतु मन जिंकणें कठीण आहे. मन इतकें सूक्ष्म व चंचल आहे, कीं त्याचें अस्तित्व व परिस्थिति एकदम

दिसून येत नाहींत; शरीर जिंकलें म्हणजे आपलें काम झालें, असें जो तो समजतो; पण ही मोठी चूक आहे. राष्ट्राच्या घडामोडी होतांना हें तत्त्व विशेष ध्यानांत ठेवण्याजोगें आहे. शरीर बाह्योपायांनीं सहज जिंकलें जातें, पण मन जिंकण्यास केवळ बाह्य शस्त्रें पुरेशीं नाहींत. त्यास अंत:-शस्त्रेंच पाहिजेत. तसेंच शरीराच्या जखमा बऱ्या होतात, पण मनावरचे आघात लवकर बरे होत नाहींत. म्हणूनच साधुवर्गांनीं सुद्धां मनोजय फार कठीण, असें म्हटलें आहे. अकबरानें रजपूत राष्ट्रांचें शरीर जिंकण्याचा फारसा प्रयत्न केला नाहीं, परंतु त्यांचें मन जिंकण्यांतच फार परिश्रम केले. अकबराचे उलट औरंगजेबाची कृति. त्यानें रजपूत, मराठे इत्यादिकांच्या मनावर भयंकर आघात केले; त्यांचें शरीर जिंकलें; पण त्यांच्या मनाच्या जखमा कधीं भरून आल्या नाहींत. त्या जखमांच्या वेदना पुढें शंभर वर्षेंपर्यंत ताज्या होत्या. म्हणूनच रजपूत, मराठे, शीख इत्यादिकांनीं मोगलबादशाहीचा विध्वंस केला. ही खूण जिंकलेल्या राष्ट्रानेंही ध्यानांत ठेवण्याजोगी आहे. जोंपर्यंत त्यांचें मन हयात आहे, जोंपर्यंत त्यांच्या मनावरचे व्रण भरून आले नाहींत, सारांश, जोंपर्यंत ते आपला अपमान विसरले नाहींत, तोंपर्यंत त्यांनीं स्वत्वसंरक्षणाच्या कामीं निराश होण्याचें कारण नाहीं. हे व्रण शेंकडों, किंबहुना, हजारों वर्षें जसेच्या तसेच ताजे राहतात. हा प्रकार ग्रीस व इटली या देशांच्या इतिहासावरूनही चांगला व्यक्त होतो. म्हणून वरील युद्धाचा हा एक बोध राजा व प्रजा या दोघांनीं नेहमीं लक्षांत ठेवण्याजोगा आहे.

आणखी एका दृष्टीनें या युद्धाचा विचार केलेला आहे. हिंदुपदपादशाहीची कल्पना शिवाजीचे मनांत होती, व तदनुसार त्यानें राज्यव्यवस्थेची सर्व तजवीज करून ठेविली होती, हें मागें प्र. ९ क. ६ यांत सांगितलें आहे. ही कल्पना तडीस नेण्यास मुख्य अडथळा मोगल बादशाहीचा. तो अडथळा दूर करण्यास औरंगजेबाच्या मृत्यूपर्यंत कसकसे प्रयत्न झाले, ते नमूद करण्यांत आलेच आहेत. औरंगजेबानें मराठ्यांचा हा उद्देश ओळखून त्यांस जिंकण्याचे भगीरथ प्रयत्न केले. त्याजबरोबर झगडून मराठ्यांनीं मोठ्या कष्टानें आपलें स्वत्व कायम राखिलें. इतकेंच नाहीं, तर शिवाजीपासून आनुवंशीयत्वानें स्वीकारिलेली सार्वभौमत्वाची कल्पनाही थोडी बहुत अमलांत आणून; गुजराथ, माळवा, वगैरे ठिकाणीं आपला पाय ठेविला;

आणि हळू हळू ते पाय पुढें पुढें ठेवीत चालले. मनांत धरलेली कल्पना तडीस नेण्यास प्रचंड अडथळे आले. मुसलमानांची बादशाही कांहीं दिवस सुरळीत चालून तिचे तुकडे व्हावयाचे, हा क्रम अनेक वेळां घडून आला आहे. [मु. रि. पृ. ३६९]. त्यास अनुसरून औरंगजेब मरण पावल्यावर मोगल शाहीचे तुकडे झाले, व त्या शाखांनीं मराठ्यांस जिंकण्याची, निदान त्यांस आळा घालण्याची शिकस्त केली. मराठ्यांच्या उद्देशास आळा घालणारे अनेक वीर व मुत्सद्दी औरंगजेबाच्या तालमेंत तयार झालेले हयात होते. दक्षिणचा सुभेदार निजामउल्मुल्क, अयोध्येचा वजीर, अहंमदबादचे, माळव्याचे, बंगाल बहार प्रांताचे सुभेदार थोड्याबहुत अंशानें आपापले कारभार पुढें स्वतंत्रतेनें पाहूं लागल्यामुळें, मोगल बादशाहीचें आदिस्थान मोडकळीस आलें, तरी ह्या त्याच्या शाखा बऱ्याच जोरांत होत्या. त्या शाखांनीं मराठ्यांच्या वाढत्या जोरास अडविण्याचें काम अत्यंत नेटानें मनावर घेतलें. दक्षिण देश पूर्णपणें जिंकण्याचा मोगलांचा आनुवंशिक संकल्प अशक्य म्हणून पुढें तो कोणीं हातींच घेतला नाहीं. स्वसंरक्षणापलीकडे अन्य उद्देश असणें इतउत्तर मुसलमानांस शक्यच नव्हतें. स्वसंरक्षणाकरितां शेंपन्नास वर्षेपर्यंत मुसलमान व मराठे यांजमध्यें विलक्षण जोराचा झगडा सतत चालू राहून, सर्व हिंदुस्थान देश अठराव्या शतकांत ह्या प्रचंड झगड्याची रणभूमि झाला. ह्या झगड्यामुळें उभय पक्षांतून कोणासच स्वास्थ्य मिळालें नाहीं. मुसलमानांनीं आणिलेले अंतराय निवारून, शिवाजीचा सार्वभौम हिंदुपदपादशाहीचा मनोदय तडीस नेण्याकरितांच भिन्न भिन्न मराठे सरदार, आज कर्नाटकांत तर उद्यां माळव्यांत, आज गुजराथेंत तर उद्यां बंगाल्यांत, आज म्हैसुरावर तर उद्यां पंजाबांत, याप्रमाणें अव्याहत झगडत राहून, आपल्या नांवाचा दरारा बसवीत चालले. मोगल बादशाहीच्या ह्या प्रचंड शाखांत निजामाचें राज्य पहिल्या प्रतीचें होय. सन १७२० तील बाळापुरच्या लढाईपासून तों तहत सन १७९५ तील खर्ड्यांच्या लढाईपर्यंत एक प्रकारचा भयंकर संग्राम मराठे व निजाम यांजमध्यें माजलेला दृष्टीस पडतो. असा सतत शेंपन्नास वर्षें एवढा दीर्घोद्योग करून, निजामास पुष्कळदां चांगलाच हात मराठ्यांनीं दाखविला. हा प्रकार अगदींच यदृच्छेनें घडला, कीं त्यांत उभयपक्षांकडे कांहीं हेतु म्हणून होता, हें इतिहासाचा अभ्यास करितांना पाहिलें पाहिजे. घडलेल्या

हकीकतींचा संदर्भ जुळवून त्यांजमधील कार्यकारणभाव स्पष्ट करून सांगणें हेंच इतिहासाचें प्रयोजन. मराठयांच्या इतिहाससंबंधानें अशाप्रकारें सर्व घडामोडी एका दृष्टिसंपातांत घेऊन, साकल्यानें व अपृथक्पणें त्यांचा विचार करून, त्यांची संगति जुळवून देणें, हें काम आजपर्यंत कोणीं केलेलें नाहीं. मुसलमान व मराठे ह्यांच्या युद्धाचें व मराठशाहीच्या पुढील व्यवस्थेचें खरें स्वरूप आरंभापासून ध्यानांत घेतलें पाहिजे. मराठशाहीची स्थापना म्हणजे मुसलमान व मराठे यांजमधील अनेक जबरदस्त झगड्यांची एक सांखळी होय. इतिहासाचें अध्ययन करणारांस त्या साखळींतील निरनिराळे दुवे ओळखतां आले पाहिजेत. येथवर दोन दुव्यांचें स्पष्टीकरण करण्यांत आलें. पुढें आणखी पुष्कळ दुवे दाखवावयाचे आहेत. निजामाशीं युद्ध, गुजराथेंतील युद्ध, रोहिल्यांशीं युद्ध, हैदराशीं युद्ध, इत्यादि अनेक युद्धें मराठयांनीं पुढें केलीं; त्यांची संगति यथास्थळीं स्पष्ट होईल.

१०. शाहूची सुटका ( एप्रिल, सन १७०७ ).—औरंगजेबाचे मरणसमयीं शाहू त्याचेच छावणींत होता. त्यानें आपल्या सुटकेविषयीं अनुचित उतावीळपणा दाखविला नाहीं. तसेंच बादशहाकडून त्यास सोडण्याच्या सूचना होत असतांही, एखादी अपमानकारक अट कबूल करून, त्यानें आपली सुटका करून घेतली नाहीं. प्रस्तुतचें युद्ध चांगलें चाललें आहे, आणि शेवटीं मराठयांसच त्यांत यश येणार, अशी त्याची पक्की खात्री असावीसें दिसतें. आपले मुलगे आपापसांत लढून राज्याचा विध्वंस करणार; व त्यांतच मराठयांचें चांगलें फावणार, हा विचार मनांत येऊन, अंतकाळीं बादशहास पराकाष्ठेच्या यातना झाल्या. आपला सर्व जन्म ह्याप्रमाणें निष्फळ झाला, आणि झालेली चूक दुरुस्त करण्यास मार्ग राहिला नाहीं, ह्यामुळें त्यास आतां अनिवार्य पश्चात्ताप झाला. पूर्वक्रमानुसार औरंगजेबाचे पश्चात् त्याच्या मुलांमध्यें तंटे सुरू झाले. त्या तंट्यांमध्यें अजीमशहा व कामबक्ष यांचे जीव बळी पडून, शेवटीं बादशहाचा वडील व बराच नावडता मुलगा मुअजम हा 'बहादूरशहा' हें नांव धारण करून दिल्लीचे तख्तावर बसला. तत्पूर्वींच शाहूची सुटका झाली होती. कारण औरंगजेब जिवंत असतांच अजीमशहा माळव्याचे सुभ्यावर निघून गेला. परंतु तो सुमारें वीस कोस गेला असेल नसेल, तोंच बादशहा मरण पावल्याची त्यास बातमी समजली. त्याबरोबर

तो परत आला. त्याचा मुलगा बेदरबख्त हाही अहंमदाबादेहून अहंमदनगरास आला. अहंमदाबादचा दुय्यम अंमलदार इब्राहीमखान ह्यास माळव्यांत जाऊन थांबण्याचा हुकूम अजीमशहानें पाठविला, त्याप्रमाणें तो तिकडे गेला. त्या वेळीं मुसलमान इतिहासकार खाफीखान हाही अहंमदाबादेस होता. बापाचे अंत्यविधि उरकल्यावर अजीमशहा अहंमदनगर येथें विधिपूर्वक तख्तनशीन झाला. त्यानें आपल्या नांवानें खुत्बा वाचविला व नाणींही पाडिलीं. इतक्यांत वडील भाऊ उत्तरेंत राज्य आक्रमण करीत आहे, अशी बातमी आल्यामुळें, त्याजबरोबर लढण्यासाठीं म्हणून अजीमशहा उत्तरेकडे निघाला. बरोबर वजीर आसदखान व त्याचा पराक्रमी पुत्र झुल्फिकारखान हे असून त्यांचा त्यास चांगला पाठपुरावा होता. शाहूही त्याजबरोबर होता. महंमद अमीनखान व चिंकिलीजखान हे दोन सरदार बऱ्हाणपुर येथें त्यास पोंचवून परत औरंगाबादेस आले. पुढें अजीमशहा हांड्याजवळ नर्मदा उतरून माळव्यांत शिरला. तेव्हां त्यास अशी बातमी लागली, कीं ताराबाईनें महाराष्ट्रांतील बहुतेक किल्ले परत घेतले. त्या वेळेस पुण्याचा फौजदार लोदीखान म्हणून होता, त्याचा पराभव करून धनाजीनें पुणें व चाकण हे परगणे घेतले. शाहू सर्व कुटुंबसह अजीमशहाच्या छावणींत होता. झुल्फिकारखान व शाहू यांचा चांगला स्नेह होता, इतकेंच नव्हे, तर मूळपासूनच झुल्फिकारखानाचें मन मराठ्यांविषयीं कडक नव्हतें. त्यानें अजीमशहास अशी सल्ला दिली, कीं शाहूस मराठ्यांचा राजा असें कबूल करून परत पाठविलें असतां, मराठे अगदींच स्वतंत्र न होतां, त्यांचा थोडाबहुत बंदोबस्त होईल; आपसांत तंटे लागून त्यांची शक्ति कमी होईल, आणि मग मोगलांच्या मुलखास त्रास देण्यास त्यांस सवड मिळणार नाहीं. अजीमशहास ती मसलत पसंत पडली; व शाहूस पन्नास साठ लोकांनिशीं अजीमशहानें मोकळा करून, परत दक्षिणेंत पाठविलें. त्या वेळीं खालीं लिहिल्याप्रमाणें अजीमशहानें शाहूशीं ठराव केला. 'तुम्हीं आपणास दिल्लीच्या बादशहाचे अंकित समजून राज्य करावें; तुमची आई, भाऊ मदनसिंग संभाजीचा दासीपुत्र, व बायका यांस आम्हापाशीं ठेवावें; तसेंच तुम्हीं आपल्या राज्यांत जाऊन बंदोबस्त करावा, बखेडा करणारे लोकांचें पारिपत्य करावें; आणि बादशाही लक्षांत वागून इकडील मुलखास उपद्रव देऊं नये. तुम्ही याप्रमाणें वागतां

अशी हुजूर खातरजमा झाली, म्हणजे आम्ही दिल्लीस गेल्यावर व तेथें सिंहासनारूढ झाल्यावर, ुमर्ची माणसें तुम्हांकडे लावून देऊं; आणि तुम्हांस सरदेशमुखीचें उत्पन्न सहा सुभ्यांत चालतें, त्याची सनद, त्याच-प्रमाणें सहा सुभ्यांच्या चौथाईची सनद देऊं; तसेंच बालेघाटावरील महाल, विजापुर व दौलताबादचे पादशाहींतील महाल, भीमा व गोदावरी यांचे मधील निम्मा मुलूख ह्यांतील बादशाही ठाणीं, किल्लेकोट सुद्धां, दरोबस्त तुम्हांस बक्षीस करून देऊं. तूर्त ' यांचें राज्य हे बंदोबस्तानें करितील,' अशीं पत्रें आमचे सुभ्यांस देण्याकरितां तुम्हांपाशीं देतों. कर्नाटक, गोंडवण, गुजराथ, तंजावरचें राज्य ह्यांचा अंमल तुमचेकडे चालत आहे, तो तुम्हीं तसाच चालवावा; आणि नेहमीं बादशहाचे हुकूमांत वागून प्रसंग पडेल तेव्हां आपल्या फौजेनिशीं आम्हांस मदत करावी.' याप्रमाणें करार करून, वस्त्रें, जवाहीर, हत्ती, घोडे व दोनशें रांगडे स्वार त्याजबरोबर अजीम-शहानें दिले, आणि पुढें जातां फौज जमा करीत जावें, म्हणून सांगितलें. त्याप्रमाणें, पडत्या फळाची आज्ञा, म्हणून सर्व कांहीं कबूल करून शाहू एकदम दक्षिणेंत येण्यास निघाला. छावणीमध्यें शाहूचे हितचिंतक जितके म्हणून लोक होते, त्या सर्वांनीं व मुख्यत: झुल्फिकारखानानें शाहूस, विशेष तकरार न करितां, एकदम निघून जाण्याची इशारत दिली. त्याचा अर्थ इतकाच, कीं औरंगजेब सिंहासनारूढ झाला त्या वेळीं सर्व बंधूंमध्यें जसें घोर रणकंदन माजलें, तसेंच रणकंदन आतां लवकरच माजेल; त्या रणकंदनांत कोणाकोणाची आहुती पडेल याचा नेम नाहीं. सबब शाहूनें विलंब न करितां एकदम निघून जावें. एकदां स्वदेशीं जाऊन स्थिरस्थावर झाली, म्हणजे त्याचे वाटेस कोणी जाणार नाहीं. ही सल्ला यथायोग्य होती; आणि शाहूनें ह्या वेळेस आपला मार्ग सुधारला म्हणून तो निभावला. नाहीं तर, पुढें काय प्रसंग त्याजवर आले असते, हें सांगणें कठीण आहे. बिचाऱ्या येसूबाईस मात्र दिल्लीस जावें लागलें. तिची सुटका पुढें झाली कीं नाहीं तें कळत नाहीं. शाहूची एक बायको वारली होती. दुसरी बायको व दासी विरूबाइ ह्या शाहूबरोबर आल्या. शाहू इतक्या त्वरेनें मोगल छावणी सोडून निघाला, कीं सनदापत्रें वगैरे तयार होईपर्यंत सुद्धां तो थांबला नाहीं. तीं आणण्यासाठीं जोत्याजी केसरकर यास त्यानें मागें ठेविलें. तथापि इतक्या घाईत सुद्धां आपल्या हक्कांविषयीं शाहू दक्ष

होता. शिवाजीनें स्वराज्य म्हणून ठरविलेला सर्व मुलूख व आणखीही ज्यास्त प्रदेश त्यानें मिळविला. गुजराथ, कर्नाटक, गोंडवण, गंगथडी वगैरे मुलख अजीमशहानें शाहूस देऊं केला, तो त्यानें तशी मागणी केली म्हणून. थोरल्या शिवाजीच्या वेळेपासून आतांपर्यंत आपल्या मुलखाची व्यवस्था कसकशी होत आली आहे, हें शाहू चांगलें समजत असावा. शिवाय आपले मराठे सरदार कोठें काय खटपटी करीत आहेत, त्याची खडानखडा माहिती शाहूस असलेली दिसते. बादशहाच्या प्रतिबंधांत असतांना शाहूस एकच उद्योग होता. दररोज कोठें काय संग्राम झाले, त्यांचा परिणाम काय झाला, त्यांविषयीं आपले लोकांचें मत काय, व बादशहाच्या लोकांचें मत काय, इत्यादि माहिती काढून आपलें मनोरंजन व कालक्रमणा करावी. त्यांतच क्षणभर सुख तर क्षणभर दुःख मानावें; मराठ्यांस जयप्राप्ति झालेली ऐकून आंतून समाधान पावावें, व बाह्यतः दुःख प्रदर्शित करून बादशहाचे लोकांकडून शाबासकी मिळवावी. हा प्रकार राजकीय कैदी असलेल्या मंडळीस अपरिहार्य आहे. गुजराथ, कर्नाटक, आदिलशाही, व कुतुबशाही ह्यांपैकीं मुलूख आपणास मिळालाच पाहिजे, असा ह्या वेळीं शाहूनें आग्रह धरलेला दिसतो. नाहीं तर हा मुलूख आपण होऊन शाहूस देण्याचें अजीमशहा अगर झुल्फिकारखान यांस प्रयोजन नव्हतें. झुल्फिकारखान शाहूस अनुकूळ होता म्हणून, व झुल्फिकारखानावांचून अजीमशहाचें कांहींच चाललें नसतें म्हणून, शाहूच्या मागण्या अनायासें कबूल करण्यांत आल्या. तथापि तूर्त ह्या मागण्यांचा विशेष उपयोग होण्यासारखा नव्हता; कारण 'तुमचें वर्तन परत गेल्यावर कसें काय राहतें तें पाहून, तदनुसार तुमचें मागणें सर्व कांहीं कबूल करण्यांत येईल,' अशा प्रकारचा ह्या वेळचा ठराव मुळमुळीत होता; ह्यापेक्षां ज्यास्त निश्चयात्मक ठराव करणें त्या वेळेस शक्य नव्हतें. अजीमशहा अजून दिल्लीस तख्तनशीन झाला नव्हता; राज्यसूत्रें हातीं आल्यावर वडिलांनीं चालविलेलें मराठ्यांचें वैर आपणही पुढें चालवावें की नाहीं, याचा विचार त्यानें पुढें केला असता. तूर्त दक्षिणेंतील युद्धाची समाप्ति करण्याकरितां व झुल्फिकारखानाच्या पोक्त सल्ल्याचा अव्हेर न व्हावा म्हणून, अजीमशहानें शाहूची सुटका केली.

शाहूला सोडून देण्यांत झुल्फिकारखानाचा उद्देश काय असावा, याजबद्दल निरनिराळे तर्क आहेत. खानाचा बाप आसदखान हा फार दिवस वजिरीचें काम करीत होता; आणि सैन्याचें सर्व आधिपत्य महाराष्ट्रांत तरी झुल्फिकारखानाचेच हातीं होतें. औरंगजेबाच्या ह्या प्रचंड स्वारींत त्याची अब्रू बचावण्यास मुख्य कारण हा एकच सरदार होता. संभाजीचें कुटुंब व रायगड काबीज करणें, जिंजी घेणें, इत्यादि महत्त्वाचीं कामें त्यानेंच केलीं होतीं. अनेक मुसलमान सरदार मराठ्यांचे हातून मार खाऊन बादशहाकडे धांव घेत असतां, एकदांही समोर पराभव झाला नाहीं, असा हा एकच झुल्फिकारखान होय. तेव्हां त्याच्या कर्तृत्वाबद्दल बादशहासही कांहीं संशय नव्हता. परंतु औरंगजेबाचा स्वभावच असा होता, कीं मीरजुम्लाप्रमाणें ज्यांनीं त्याचें मन:पूर्वक साह्य केलें, त्यांचा त्यानें विश्वासघात केला. अनेक रजपूत मुसलमान सरदारांचीही उदाहरणें अशींच आहेत. तेव्हां आपला विशेष पराक्रमच अंतीं बादशहाच्या हस्तें आपल्या नाशास कारण होईल, हा झुल्फिकारखानाचा तर्क कांहीं वावगा नव्हता. त्यामुळें त्याचें वर्तन नेहमीं दुटप्पी असे. मराठ्यांशीं लढत असतांही सलोख्यानें वागून त्यांचा लोभ त्यानें संपादिला होता. यावरून औरंगजेबाचे पश्चात् दक्षिणेंतील राज्यावर हात मारण्यास सांपडेल तर पाहवें, असा त्याचा उद्देश असणें साहजिक आहे. बादशहाचे मृत्यूनंतरचें त्याचें वर्तन तर उघड उघड वरपांगी होतें. प्रथम त्यानें अजीमशहाचा पक्ष स्वीकारिला, अजीमशहाचा पाडाव होतांच, तो विजयी झालेल्या बहादूरशहास जाऊन मिळाला. अशा वर्तनानेंच जहांदरशहाची मर्जी त्यानें संपादिली. कोणत्याही गोष्टीस शेवट हा असावयाचाच. ह्या नियमास अनुसरून फर्रुखसेयर बादशहानें त्याच्या ह्या दुटप्पी वर्तनाबद्दल त्यास देहान्त प्रायश्चित्त दिलें. तें दिलें नसतें, तर सय्यदबंधूंची कारकीर्द पुढें प्रसिद्ध झाली, ती न होतां हा झुल्फिकारखानच महत्त्वास चढला असता.

दक्षिणच्या संबंधानें पाहिलें तर, झुल्फिकारखान व निजामुल्मुल्क् हे दोनच पुरुष इकडील राजकारणांत लायक होते. त्या दोघांतही झुल्फिकारखान वरच्या प्रतीचा होता. झुल्फिकारखान जिवंत राहता, तर निजामुल्मुल्क् प्रसिद्धीस आला नसतां त्यानेंच स्वत: दक्षिणेंत स्वतंत्र राज्य

स्थापन केलें असतें. मराठ्यांशीं लढण्याचें पूर्ण रहस्य झुल्फिकारखानासच माहीत होतें. कदाचित् औरंगजेबानें त्याजवर पूर्ण भरंवसा टाकिला असता तर मराठ्यांचा समूळ उच्छेद करण्याचें कामही त्यानें तडीस नेलें असतें. निजामाचे मराठ्यांशीं पुढें अनेक युद्धप्रसंग झाले, त्यांत त्यास फारसें यश कधींही आलें नाहीं. वेडींवांकडीं कारस्थानें करून, त्यानें राज्यस्थापनेचा उद्देश तडीस नेला हें खरें; परंतु त्याच्या ठिकाणीं झुल्फिकारखान असता, तर मराठे कदाचित् वर डोकें काढूं शकले नसते. समरांगणांत लढतांना मराठ्यांचे हातून झुल्फिकारखान कधींच पराभव पावला नाहीं. तेव्हां शाहूची सुटका करितांना, मागें पुढें आपणच दक्षिणचें राज्य बळकावून शाहूस आपला अंकित करूं, असा उद्देश झुल्फिकारखानाच्या मनांत असण्याचा संभव आहे. प्रस्तुत खानाचा हा उद्देश शाहूच्या पथ्यावर पडला.

एकंदरींत बादशहाचे प्रतिबंधांत असतां, शाहूनें प्रत्यक्ष बादशहाची व जवळच्या बहुतेक मंडळीची मर्जी चांगली संपादन केली होती. म्हणूनच इतके दिवस त्याचा बचाव झाला. प्रत्येक इसम त्यास मदत करण्यास तयार होता. तो परत यावयास निघाला, त्या वेळीं मोठमोठ्या सरदारांनीं त्यास मेजवान्या वगैरे करून निरोप दिला. त्यास चौतीस दिवसपर्यंत एकसारख्या मेजवान्या होत होत्या. ( का. सं., थो. शा. म. चरित्र, टीप, पृ. ९ ). परंतु परत येण्याचें ठरल्यावर त्यास इतका अवधि मिळाला असेल हें संभवत नाहीं. तसेंच तो इतर राजे रजवाड्यांकडेही गेला नसावा. बादशहाच्या छावणींत अनेक रजपूत राजे वगैरे होते. त्यांनीं व मुसलमान सरदारांनींही त्याचा सत्कार चांगला केला असेल. ह्यावरून, व शाहू परत येत असतां मार्गांत ठिकठिकाणीं त्याचें अभिनंदन होत गेलें यावरून, थोरल्या शिवाजीबद्दल, मराठ्यांच्या एकंदर कर्तृत्वाबद्दल, व शाहूच्या नेकीबद्दल, महाराष्ट्रांतच नव्हे, तर एकंदर हिंदुस्थानांत धन्यवाद ऐकूं येत होते. बादशहाच्या कैदेंत इतके दिवस त्यानें काढिले, हा प्रकार फारच करुणास्पद होता. शिवाजी व त्यानें स्थापिलेलें राज्य यांजबद्दल बहुतेकांचे मनांत पूज्यबुद्धि उत्पन्न झाली होती. स्वातंत्र्यप्रेमाबद्दल अखिल हिंदुस्थान मराठ्यांचें अभिनंदन करूं लागलें होतें. व परमेश्वरा, यांजवर एकदां कृपा कर, असे आनंदोद्गार सर्वतोमुखीं निघत होते. औरंगजेबसारख्या बलवान् व पराक्रमी बादशहाच्या अतुल शक्तीशीं ज्यांनीं पंचवीस वर्षें सतत झगडा

केला, आणि अंतीं आपलें स्वातंत्र्य कायम राखिलें, त्यांजविषयीं असा धन्यवाद उत्पन्न होण्यास एवढी एकच गोष्ट पुरे होती; आणि त्याप्रमाणेंच परिणाम झाला. ज्याच्या बापाचा अत्यंत क्रूरतेनें वध झाला, ज्यास बाळपणापासून परकीय परधर्मीयांचे ताब्यांत कारागृहवास भोगावा लागला, आणि जो पराक्रमी शिवाजीचा प्रत्यक्ष नातू, त्याजबद्दल सर्वांचे अंत:करणांत सहानुभूति, प्रेम, व करुणा उत्पन्न झाली ह्यांत नवल नाहीं. मराठे आपल्या अनुचित वर्तनानें अखिल हिंदुस्थानचे शापास पात्र झाले, असें विधान अनेक ठिकाणीं केलेलें आढळतें, त्याची सत्यासत्यता पुढें पाहण्यांत येईलच; तथापि तें विधान, व प्रस्तुत शाहूच्या सुटकेनें उत्पन्न झालेला धन्यवाद यांजमधील विरोध एकदम दृग्गोचर झाल्याशिवाय राहत नाहीं. सारांश, शाहूचा या प्रसंगीं गौरव झाला; आणि त्या गौरवास तो पूर्णपणें योग्य होता. नाहीं तर, झुल्फिकारखान व इतर सरदार व प्रत्यक्ष औरंगजेबाच्या कुटुंबांतील माणसें व परस्थ राजेरजवाडे यांनीं शाहूचें एवढें अभिनंदन केलें नसतें.

११. शाहूशिवाजींचे हक्कांचा विचार.—शाहूची सुटका झाली. पण ह्या सुटकेचा आनंद मावळून याला लवकरच कष्टप्रद वेळ आली. ताराबाईनें आपल्या मुलाची मुंज करून, त्यास सिंहासनारूढ करण्याची घाई केली, या कृत्यास कित्येकांचें साह्य होतें, कित्येक विरुद्ध होते. शिवाजी व शाहू ह्यांच्या हक्कांची चर्चा पुष्कळांनीं केली आहे. कित्येक शिवाजीच्या हक्काचें समर्थन करितात तर कित्येकांनीं शाहूचा हक्क खरा धरिला आहे. ह्या बाबतींत विविधज्ञानविस्तारांतील मऱ्हाठेशाहींत शिवाजचिाच हक्क खरा, असें आग्रहाचें प्रतिपादन असून त्याचा अनुवाद अनेक लेखकांनीं केला आहे. शिवाय, ऐतिहासिक सत्यासत्य न पाहतां, आपापल्या पूर्वग्रहांचें समर्थन करण्याच्या भरांत, पुष्कळ लेखक या प्रश्नाचा विचार विकारवश होऊन करितात. पेशव्यांनीं राज्यापहार केला, हें सिद्ध करण्याकरितां कित्येक लेखक शाहूचा राज्यावर हक्क नव्हता असें प्रतिपादन करितात; तर ताराबाईनें दुर्बुद्धि धारण करून राज्याचें नुकसान केलें, असें समजणारे ताराबाईच्या मुलाचा हक्क शाबीद धरीत नाहींत. सबब ह्या प्रश्नाचा विचार तत्कालीन पुराव्याच्या धोरणानें व युक्तायुक्ततेनें करणें जरूर आहे.

राजारामाच्या अकालिक मृत्यूनें मुत्सद्दी मंडळीची तारांबळ उडाली. आजपर्यंत नेटानें चालविलेलें काम बहुतेक फत्ते होण्याची वेळ आली असतां, आतां तें थोडक्यांत फसतें कीं काय, अशी सर्वांस धास्ती वाटूं लागली. पण रामचंद्रपंतानें इतर मंडळीस धीर देऊन, त्यांच्या साह्यानें हातांतील काम जोरानें चालविण्याचा निश्चय केला. ह्या कामीं ताराबाईची निरपेक्ष संमति मिळेल, अशी त्यास पूर्ण आशा होती. याहून भयंकर प्रसंगीं येसूबाईचें निरपेक्ष वर्तन त्याच्या डोळ्यांसमोर होतें. म्हणून किल्ल्या-किल्ल्यांचा बंदोबस्त करीत तो पन्हाळ्यास येऊन, ताराबाईस भेटला. तेव्हां ताराबाई व येसूबाई यांजमधील स्वभावविरोध त्यास स्पष्ट दिसला. स्वतः ताराबाई बुद्धीनें येसूबाईपेक्षां वस्ताद होती. जे क्षुद्र स्वार्थाचे उद्देश मराठमंडळांत पूर्वी कधींही व्यक्त झाले नव्हते, ते ताराबाईनें प्रथम प्रगट केले. शिवाजीची मुंज करून त्यास राज्यासनीं स्थापण्याचा तिनें आग्रह धरिला. 'आजच घाई काय आहे, शाहू व शिवाजी यांच्या मुंजी एकदम करूं,' इत्यादि प्रकारें रामचंद्रपंतानें तिची पुष्कळ समजूत केली; पण ताराबाईचा स्वभाव आग्रही फार; एकदां एक गोष्ट मनानें घेतली, म्हणजे आपलाच हेका चालविल्याशिवाय ती कधीं राहिली नाहीं. परशुराम त्रिंबक व शंकराजी नारायण यांचें मत प्रथम रामचंद्रपंतासारखेंच होतें; पण तें तिनें युक्तीनें फिरविलें. परशुराम त्रिंबकास प्रतिनिधि पदाची लालूच होती. रामचंद्रपंत नेकीनें वागणारा असून, तो कधींच लोभास बळी पडणारा नव्हता. अनेक आणीबाणीच्या प्रसंगीं शांत व निरपेक्ष वर्तनानें त्यानें सर्व मराठमंडळावर आपली छाप बसविली होती. म्हणून त्याचें म्हणणें विशेष योग्य होतें. पण ताराबाई आग्रह सोडीना, व कलहाच्या योगानें सर्वस्वी नुकसान व्हावयाचें असें समजून, पंतानें पडतें घेतलें. ताराबाईचा हेतु शाहूस दूर सारून आपल्या मुलाकडे राज्य चालविण्याचा होता. राज्य हें लोकांच्या सुखाकरितां आहे, आपल्या उपभोगाकरितां नव्हे, ही शिवाजी-च्या वेळची उदात्त कल्पना लुप्त झाली. हें राज्य धर्माचें आहे, लोकांचें आहे, हा रामदासीय बाणा सुटत चालला.

आजपर्यंत महाराष्ट्रांतील राज्यव्यवस्थेंत जे प्रकार घडले, त्यांत राज्याचें हित पाहवयाचें, कोणा एका व्यक्तीचें पाहवयाचें नाहीं, हा प्रधान उद्देश असे. राजारामानें हाच उद्देश तडीस नेला. त्यानें मंचकारोहण केलें,

विधिपूर्वक राज्याभिषेक करून घेतला नाहीं. त्याचें चित्त शाहूकडे होतें. मरणसमयीं सुद्धां शाहूस आणून गादीवर स्थापण्याविषयीं त्यानें आज्ञा केली होती. त्यानें राज्यपद स्वत: स्वीकारिलें यांत, राज्यास धनी नाहीं, असे शत्रूनें समजूं नये इतकाच त्याचा हेतु होता. ' संभाजी व शाहू या व्यक्तींची वाट तुम्हीं लाविली, तरी मराठ्यांचें राज्य बुडत नाहीं,' हें बादशहास समजविण्याचा तत्कालीन मुत्सद्यांचा हेतु होता. असें नसतें, तर ताराबाईप्रमाणेंच रायगड पडण्यापूर्वी येसूबाई आग्रह धरून मुलासह राजारामाबरोबर बाहेर पडली असती. पण राज्याचे रक्षणार्थ पाहिजे तें नुकसान सोसण्यास येसूबाई तयार होती. प्रत्यक्ष जिवावर बेतली असतांही चार मंडळींच्या सल्ल्याचा तिनें अव्हेर केला नाहीं, हें औदार्य कोणीकडे ! व ताराबाईची क्षुद्र दृष्टि कोणीकडे ! तिनें संधि येतांच घाईघाईनें मुलाची मुंज करून त्यास सिंहासनस्थ करून घेतलें. येणेंप्रमाणें ताराबाईनें तूर्त आपल्या मुलाचा हक्क राज्यावर स्थापन केला.

हाच हक्क ज्यास्त जोरदार होता, असें 'मऱ्हाठेशाही'त प्रतिपादन केलें आहे. 'शास्त्रीय हक्क शाहूचा असला, तरी साक्षात् हक्क शाहूचा नव्हता. राजारामानें अतीव कष्ट सोसून मऱ्हाठेशाहीचें संरक्षण केल्यामुळें त्यास साक्षात् हक्क प्राप्त झाला, व तो हक्क त्याचे कुटुंबांत वंशपरंपरागत चालणें हेंच राजारामाच्या श्रमाचें उत्तम बक्षीस होय. शाहूचे बापानें मऱ्हाठेशाही बुडविली. प्रत्यक्ष शाहू स्वपराक्रमानें सुटून आला नाहीं, व शेवटीं आला तो तरी मोगलांचें दास्य पत्करून व मोगलांनीं दिलेलें शाहू हें अपूर्व अभिधान धारण करून आला. ताराबाईनें राजारामाचे पश्चात् सात वर्षें युद्धाचें काम नेटानें चालविल्यामुळें, तिला शास्त्रीय हक्क मिळाल्यासारखाच झाला.'

स्वमतसमर्थनासाठीं 'मऱ्हाठेशाही' कारास चिटणिसावर स्वामिद्रोहाचा व खोडसाळपणाचा आरोप आणावा लागला आहे. प्रथम आग्रहानें मनाचा एखादा ग्रह ठरवून, याचें समर्थन करूं लागलें, म्हणजे भलत्याच मार्गाकडे कसें जावें लागतें, त्याचें हें एक उत्तम उदाहरण आहे. शाहूचा हक्क नाशाबूद करण्याकरितां वरील ग्रंथकारास विलक्षण खटाटोप करावा लागला आहे. खंडो बल्लाळ चिटणीस शाहूस जाऊन मिळाला ह्या कृत्याच्या समर्थनार्थ, शाहू व राजाराम यांजमध्यें चालू असलेला पत्रव्यवहार व बोला-

चाली खोटी होय, व ती चिटणिसांनीं आपल्या हकीकतींत स्वपक्षपुष्ट्यर्थ घुसडून दिली, असें मऱ्हाठेशाहीकार सांगतात. एक तर अशा प्रकारें चिटणिसांचे लेख खोडसाळ समजूं लागल्यास त्यास निर्बंध राहणार नाहीं. आज भरंवसेलायक असा स्वदेशीय व स्वभाषेंत लिहिलेला इतिहास एक चिटणिसांचा मात्र आहे. तेव्हां अन्य तऱ्हेची माहिती मिळवून, तिच्या पडताळ्यानें चिटणिसांची माहिती खोटी ठरेपर्यंत ती खरी समजल्याशिवाय गत्यंतर नाहीं. राजाराम आणि शाहू यांचें वैमनस्य असल्याबद्दल मुळींच पुरावा नाहीं. राजारामाचा व येसूबाईचा स्वभाव, संभाजीच्या लोकोत्तर वधानें त्याजबद्दल सर्व महाराष्ट्रीयांचे ठिकाणीं उत्पन्न झालेली कींव व सूड घेण्याची इच्छा, संताजी व धनाजी यांचे बादशहाच्या छावणीवरील हल्ले, इत्यादि कारणांवरून राजारामानें शाहूचा परामर्ष घेतला नसेल, हें बिलकुल संभवत नाहीं. बादशहाचे छावणींतील अव्यवस्था, बेगमेचें साह्य व त्याच्या निरनिराळ्या सरदारांमधील चुरस, ह्यांच्या योगानें राजारामाचीं पत्रें व निरोप खुशाल शाहूकडे जात येत होते, हें निर्विवाद आहे. प्रत्यक्ष राजारामाचे उद्गार कशा प्रकारचे होते, हें मागें सांगितलेंच आहे. ( पृ. ६५५ ). सारांश, शाहूविषयीं सर्वांचे मनांत पुज्यबुद्धि वसत होती; व तो दक्षिणेत आला, तेव्हां त्यास जाऊन मिळण्याची पुष्कळांस प्रवृत्ति झाली, यांत त्यांनीं विश्वासघात केला, असें म्हणतां येत नाहीं.

बरें, शाहूला साक्षात् हक्क नव्हता हें म्हणणें तरी खरें कशावरून ? पराक्रम करण्याची त्याला संधिच आली नाहीं. आली असती तर तो त्याचा चुलत भाऊ शिवाजी किंवा ताराबाई यांपेक्षां कमी योग्यतेचा नव्हता. बरें राजारामानें तरी काबाडकष्ट केले, ते सर्व राष्ट्राकरितां केले. मुलास राज्य मिळालें म्हणजे आपल्या श्रमांचें सार्थक झालें, असें निदान राजारामानें तरी मानलें नसतें. संभाजीनें गमावलेलें राज्य त्याचें स्वतःचें नव्हतें; तें सर्व महाराष्ट्रीयांचें होतें. तेव्हां राज्य गमावलें, म्हणून आपल्या वंशाचा हक्कही गमावला असें होत नाहीं. राजे हे राज्यसंरक्षक होत. राज्याचे व्यवस्थेसाठीं अमुक एका वंशानें त्याचें संरक्षण करावें, असा निर्बंध ठरविलेला असतो. तो निर्बंध बदलणें राजाचे मर्जीचें नाहीं. शाहू मोगलांचें दास्य पत्करून आला, या म्हणण्यांत अर्थ नाहीं. अडचणीच्या प्रसंगीं वेळ पडेल तसें वागून, पुढें आपले उद्योग व्यवस्थित करणें, हा

नीतीचा व धर्माचा मार्ग आहे. शाहूनें मोगलांचें दास्य पुढें आपल्या मनांत यत्किंचित् बाळगिलें नाहीं. प्रत्यक्ष थोरला शिवाजीही अडचणीच्या प्रसंगीं मोगलांचें दास्य पत्करून दिल्लीस गेला होता. शाहू हें नांव धारण करणें न करणें शाहूच्या मर्जीचें नव्हतें. बादशहाच्या छावणींत लोक त्यास शाहू म्हणूं लागले. तरी त्याचीं दोनही नांवें चालू होतीं.

परंतु हें सर्व विवेचन अनावश्यक आहे. शाहूचा गादीवर हक्क ठरविणें हें आज आमच्या हातांत नाहीं. त्या वेळच्या महाराष्ट्रमंडळानें शाहूस पत्करिलें कीं नाहीं, हा मुख्य मुद्दा आहे. बहुतेक महाराष्ट्रमंडळानें शाहूचें अभिनंदन केलें. ताराबाईचा मुलगा लहान होता. प्रत्यक्ष तिच्याबद्दल मराठमंडळाची फारशी पूज्यबुद्धि नव्हती. तिच्या आग्रही व रागीट स्वभावास भिऊन लोक होस हो म्हणत, इतकेंच. शाहूला आणून राज्यावर बसविणें हेंच मराठमंडळानें पुष्कळ वर्षें आपलें इतिकर्तव्य मानिलें होतें, आणि याच गोष्टीनें, संभाजीच्या वधाचा सूड घेतला, हें सिद्ध होणार होतें. शाहूविषयीं लोकांची पुज्यबुद्धि होती. त्या वेळच्या लोकांनीं त्याचा हक्क कबूल केला, इतकेंच नाहीं, तर आतां आपल्या सर्व आपत्ति संपल्या व थोरल्या महाराजांचे दिवस पुनः आले, असें शाहूच्या आगमनानें लोकांस वाटूं लागलें. त्या वेळचे लेख हाच भाव बोलतात.

बायकांनीं बाहेरच्या व्यवहारांत पडूं नये, त्यांतून राज्यकारभारांत तर त्यांचें अंग असूं नये, अशी सामान्य पौर्वात्य समजूत आहे. आपल्याकडे बायकांनीं राज्यकारभार केल्याचें एकच उदाहरण अहल्याबाईचें आहे. पण केवळ स्त्री असल्यामुळें तिला राज्यकारभारांत इतक्या अडचणी आल्या कीं, तिच्या इतक्या कौशल्यानें दुसरा एखादा पुरुष फारच पराक्रम दाखवूं शकला असता. ताराबाई हट्टी व दुराग्रही होती. रामचंद्रपंतासारख्याशीं सुद्धां तिचें पुढें पटलें नाहीं, तेव्हां मराठमंडळ तिच्या हाताखालीं वागण्यास फारसें उत्सुक नव्हतें, असें धनाजी व खंडो बल्लाळ शाहूस मिळाले, यावरून दिसतें. शाहू राज्य करण्यास येत आहे, हें ऐकून पुष्कळांस मनांत समाधान झालें; आणि ताराबाईनें तंटा न वाढवितां, आनंदानें शाहूच्या स्वाधीन राज्य करावें, असेंच लोकमत होतें. ताराबाईनें विरुद्ध भाग दाखविल्यावर, उघडपणें शाहूचा पक्ष स्वीकारण्यास तिच्या तोंडावर कोणी तयार झाले नाहींत. कदाचित् शाहू दाखल

झाल्यावर सर्व प्रकार सुरळीत चालतील आणि भांडणें विकोपास जाणार नाहींत, असा लोकांस भरंवसा होता; आणि त्या समजुतीनें ते वेळ मारून नेत होते. पण हकानें व कर्तबगारीनें त्या वेळच्या लोकांस शाहूच पसंत वाटला, हें निर्विवाद आहे.

राज्याच्या हकाचा विचार जहागिरीच्या वगैरे सामान्य कायद्यानें करायाचा नसतो. तेथें पहिला प्रश्न योग्यतेचा असतो; आणि जो ज्यास्त योग्य त्याजकडेच लोकमत वळतें. घरीं बसून वतनाचा उपयोग घेतां येतो, तसें राज्य हें उपभोगासाठीं नव्हे; तें सामर्थ्यानें चालविण्यासाठीं आहे. स्त्रीला आपल्याकडे सामर्थ्यवान् समजत नसत. पुरुषानेंच राज्य करावें, असा परिपाठ होता. राज्य म्हणजे खासगी मालमत्ता, अशा दृष्टीनें ताराबाईशाहूच्या हकांचा अनेक लेखकांनीं विचार केल्यामुळें नाना प्रकारचे भ्रम उपस्थित झाले आहेत.

१२. शाहूला राजपदप्राप्ति.—सन १७०७ च्या एप्रिल महिन्यांत औरंगजेबाचा पुत्र अजीमशहा दिल्ली काबीज करण्याच्या इराद्यानें नर्मदा पार होऊन माळव्यांत शिरला. 'मराठ्यांचें निर्मूलन करण्यास गुंतल्यानें आपलें घर राहत नाहीं. कैक वर्षें दक्षिणेंत येऊन झालीं. सर्व प्रकारें लोक बुडाले. दुराग्रहास पडून फळ नाहीं. शाहूराजा सरकारांत बहुत दिवस कैदेंत आहे. पळून गेला नाहीं. निष्ठा धरून राहिला. बादशाहीबंधांत दाखल झाला आहे. त्यास सोडून द्यावें. राणी ताराबाईचें पारिपत्य करील, किल्ले घेईल, चाकर म्हणवील.' असें झुल्फिकारखानानें अजीमशहास समजाविलें. त्यावरून माळव्यांतून त्यानें शाहूस सोडून परत दक्षिणेंत पाठविलें. शाहूची सुटका कोणत्या ठिकाणीं झाली, तें बरोबर कळत नाहीं. हंड्यास नर्मदा उतरून दोन्हा येथें अजीमशहानें शाहूच्या सुटकेचें बोलणें केलें, असें खाफिखान म्हणतो. दोन्हा हें ठिकाण नेमाडांत भोपाळचे आसपास असावें. भरतपूर, दीग, जोधपुर, जयपुर, उदेपुर, उज्जनी इत्यादि ठिकाणीं जाऊन शाहू दक्षिणेंत आला, असें बखरकार चिटणीस म्हणतो, तें खरें नाहीं. भरतपुर आग्र्यानजीक चंबळ नदीच्या पलीकडे आहे, ग्वाल्हेर त्या नदीच्या अलीकडे आहे. ग्वाल्हेरीस अजीमशहाचा तळ पडला, तेव्हांपासून त्याची वडील भावाशीं झटापट सुरू झाली. त्यापूर्वींच शाहूची सुटका झाली होती. तसेंच हंड्याहून ग्वाल्हेरीस जाण्यास उज्जनी लागत नाहीं; मग जय-

पुर, जोधपुर, उदेपुर यांचें तर नांवच नको. सारांश, शाहू फार तर भोपाळपर्यंत गेला असेल; तसेंच अजीमशहाच्या छावणींत असलेल्या जयपुर, जोधपुर, वगैरे ठिकाणच्या सरदारांनीं आपला आनंद प्रदर्शित करून, शाहूस मेजवान्या वगैरे करून निरोप दिला असेल, हा काव्येतिहाससंग्रहकारांचा तर्क योग्य दिसतो.

शाहू नर्मदा उतरून सातपुड्याच्या घांटांतून बऱ्हाणपुरास आला. त्या ठिकाणीं जोत्याजी केसरकर, कागदपत्र आणण्यास मागें ठेविलेला होता, तो येऊन शाहूस मिळाला. मोरोपंत सबनीस, कृष्णाजी जोशी कोंकणस्थ व गदाधरभट्ट नाशीककर हे त्या वेळीं शाहूबरोबर होते. खाफीखान म्हणतो, शाहू पन्नास साठ लोकांनिशीं अजीमशहाची रजा घेऊन निघाला, तो प्रथम बीजागड, सुलतानपुर, नंदुरबार ह्या ठिकाणच्या डोंगराळ मुलखांत सुजनसिंग नांवाचा एक जमीनदार राहत होता, त्याजकडे गेला. हा सुजनसिंग धुळ्यापासून ७।८ कोसांवर लांबकानीच्या गढींत राहत असे. तेथें शाहूस ताराबाईकडील वृत्त कळलें, आणि तिच्याशीं लढल्याशिवाय राज्य हस्तगत होत नाहीं, अशी त्याची खात्री झाली. परंतु आपणाजवळ फौज नाहीं, सरदारांची ओळख नाहीं, तेव्हां आपला निभाव कसा लागतो, याची शाहूस मोठी विवंचना पडली. सुजनसिंग रावळानें त्यास थोडी मदत कबूल केली. तेव्हांपासून आजूबाजूच्या मराठे सरदारांकडे विश्वासू माणसें पाठवून त्यांचीं मनें आपणाकडे वळविण्याचा उद्योग शाहूनें सुरू केला. बापूजी सोनाजी दिघे मुठेखोरेकर हा एक हुशार गृहस्थ पूर्वी शंकराजी नारायण सचिवाजवळ असून, त्याजपासून परसोजी भोसल्यानें त्यास मागून घेतलें होतें. हा बापूजी सोनाजी धन्याच्या परवानगीनें लांबकानी येथें येऊन शाहूस भेटला. त्याच्या मार्फत शाहूनें परसोजी भोसल्याचें मन आपल्या पक्षास वळविलें. परसोजी व बापूजी हे सर्व फौजेसह शाहूस मिळाल्याबरोबर एकंदर उपक्रमाचा आरंभ तर बरा झाला. ह्या मदतीबद्दल बापूजी सोनाजी यास शाहूनें स. १७०८ त मावळांत दोन गांव इनाम दिले. ते अद्यापि त्याच्या वंशजांकडे चालत आहेत. ( इ. सं,-जु.-ऐ. गोष्टी ). बापूजी सोनाजीचा उल्लेख शाहूच्या रोजनिशींत स. १७२९ पर्यंत सांपडतो. तदनंतर तापी नदीवरील कोकरमंडा किल्ल्याचा अधिकारी अंबू पांडे, ( अमृतराव कदम बांडे, राजवाडे, ) हा

मराठा सरदार सुरतपासून बऱ्हाणपुरपर्यंतचे मुलखांत बंडाळी करीत होता, त्याला शाहू जाऊन भेटला, तेव्हां पांडे यानेंही शाहूस बरीच मदत केली. कोकरमंडा नंदुरबारचे उत्तरेस आहे.

त्या वेळीं खानदेशांत पेशवे पिंगळे यांचे तर्फेचा गृहस्थ चिमणाजी दामोदर, आडनांव मोघे, हा जमावानिशीं राहत होता. याचे वंशज पारोळ्याचे जहागीरदार, पंडित म्हणून प्रसिद्ध आहेत. त्याजकडे मनुष्य पाठवून, त्यास शाहूनें आपणाकडे वळवून घेतलें. चिमणाजी दामोदरचें घराणें, पुढें मराठशाहींत चांगलें प्रसिद्ध होतें. या घराण्याचा व बाळाजी विश्वनाथाच्या घराण्याचा विशेष घरोबा असून, ते एकमेकांस ‘चिरंजीव’ ‘तीर्थस्वरूप’ अशा प्रकारें लिहीत. चिमणाजी प्रथम शाहूस मिळाला; पण पुढें कांहीं दिवसांनीं शाहूशीं बेबनाव होऊन, तो कोल्हापुरच्या संभाजीकडे गेला; तेथें त्यानें कांहीं काळ प्रधानकीचें काम केलें. त्याचा मृत्यु स. १७३१ व ३४ च्या दरम्यान झाला, असें अनुमान आहे.




नंतर शाहू औरंगाबादेस गेला. तेथून रोजास औरंगजेबाच्या कबरेची पूजा करून, त्यानें आपल्या पुढील उद्योगास मुसलमानांची सहानुभूति संपादन केली. पुढें कायगांवटोकें येथें गोदावरी नदी उतरून अलीकडे आला. ह्याप्रमाणें शाहू दिल्लीपतीचे ताब्यांतून सुटून परत स्वदेशीं येत आहे, व आतां आपला राजा पुनः आपणास मिळणार, हें पाहून सर्व मराठमंडळास पराकाष्ठेचा आनंद झाला. परसोजी भोसल्याचें उदाहरण पाहून, हैबतराव निंबाळकर व नेमाजी शिंदे हे बागलाणांतील सरदार शाहूस मिळाले, तेव्हांपासून शाहूचा जमाव बराच वाढत चालला. मराठे

लोक भराभर येऊन त्यास मिळूं लागले; त्यांस किताब, नेमणुका वगैरे देऊन तो आपला राज्याधिकार स्थापणाच्या उद्योगास लागला. गोदावरी उतरून अलीकडे आल्यावर शाहूनें ताराबाईस पत्र पाठविलें, कीं 'आम्ही बादशहापासून निघोन मुक्कामास येऊन पावलों, लवकरच येतों.'

हें वर्तमान ऐकून ताराबाईस फार वाईट वाटलें. तिच्या मनांतून शाहूला राज्य देऊं नये असें होतें. तिनें लोकांत अशी कंडी उठविली, कीं हा कांहीं खरा शाहू नव्हे, कोणी तरी तोतया आहे. त्यास धरून मारावें. असा हेतु धरून तिनें आपलें मुत्सद्दीमंडळ एकत्र जमवून त्यांस आपला मनोदय सांगितला. त्या मंडळींत रामचंद्रपंत अमात्य, परशुराम त्रिंबक प्रतिनिधि, शंकराजी नारायण सचिव, निळकंठ मोरेश्वर प्रधान, तिमाजी रघुनाथ हणमंते, धनाजी जाधव सेनापति व खंडो बल्लाळ चिटणीस हे प्रमुख होते. ह्यांनीं आपला पक्ष सोडूं नये, अशाविषयीं तिनें त्यांची नानाप्रकारें समजूत केली. 'संभाजीनें निरपराधी सरदारांस मारिलें, दौलत खजीना गमावले. राजाराम साहेबांनीं सर्वांस वाढवून श्रम करून राज्य सोडविलें. यास्तव शाहूराजे खरे किंवा खोटे असोत, त्यांशीं लढावें, धरावें,' अशी खटपट तिनें चालविली. दूधभाताचें ताट आणिलें. त्यावर हात ठेवून शंकराजी नारायण, रामचंद्रपंत व परशुरामपंत यांनीं तर शपथक्रियाही केली. तसेंच सुभे व किल्ले यांस ताराबाईनें पत्रें पाठविलीं, कीं 'किल्ले देऊं नयेत, कोणीं जाऊन भेटूं नये, खर्चास मुलखांतील वसूल देऊं नये.' कान्होजी आंगरे यास आणून त्याचेंही इमान घेतलें. सेनापति व प्रतिनिधि यांनीं पुढें जाऊन शाहूशीं लढाई करावी, व इतरांनीं जागोजागीं राहून व्यवस्था ठेवावी, असें ठरलें. प्रतिनिधि व सेनापति सुमुहूर्तें बाहेर पडले. त्यांजबरोबर खंडो बल्लाळ चिटणीस होता.

ही सर्व हालचाल लवकरच शाहूस समजली. मराठशाहींतील ही प्रथमचीच दुफळी पाहून त्यास फार खेद वाटला; पण आतां माघार घेण्याचा इलाज नव्हता. कायगांवटोक्याहून अहंमदनगराच्या वाटेनें तो पारद येथें आला. औरंगाबादेपासून दौंडपर्यंतच्या प्रदेशांत भोसल्यांच्या कुळांतील निरनिराळ्या शाखा पसरलेल्या होत्या, त्यांचीही जानपछान शाहूच्या बहुत उपयोगी पडली असावी. पारद येथें एक लहानशी चकमक उडाली. ह्या चकमकींत अक्कलकोटच्या गादीचें मूळ आहे. तें असें.

गोदावरी उतरल्यावर, शाहू अहंमदनगरावरून पारद, परगणे शिवर्णे, येथें आला. ह्या गांवास एक लहानशी गढी होती. 'तिचा आश्रय करून गांवचे पाटलांनीं सुरळीतपणें रुजू न होतां मोगलाई तर्फेनें गांव भांडविला. स्वार व रोखा गेला, त्याजवर गोळी बजावली त्यावरून शाहूनें हल्ला करून गांव मारून फन्ना केला. पाटलाचे भाऊ शहाजी लोखंडे पडले; बाबाजी पाटील याचे बाप खर्च जाहले. गांवचा सत्यानाश जाहला. त्या समयीं पाटलाची स्त्री इणें मूल घेऊन महाराजांचे पालखींत टाकिलें, व बोलली ' यास वांचवावें. अन्यायी होते ते मारले गेले. हें मूल आपणास वाहिलें आहे.' त्यावरून समाधान पावून शाहूनें त्या मुलाचा प्रतिपाळ केला. ठाणें फत्ते झालें. ते समयीं त्या मुलाचें नांव फत्तेसिंग भोसले असें ठेविलें. त्याचे आईस आश्वासन देऊन, मारणें व लूट बंद करून मुक्कामास आले.' पुढें कांहीं दिवसांनीं शाहूनें ह्या फत्तेसिंगास अक्कलकोटची जहागीर दिली ती अद्यापि चालत आहे. पारद गांवचे लोखंडे पाटील मारले गेले. त्यांच्या वंशाच्या निर्वाहासाठीं शाहूनें फत्तेसिंगाचे मध्यस्थीवरून पारद गांव सन १७१५ त इनाम करून दिला. पारद गांवचे पाटील ताराबाईचे तर्फेनें लढले, म्हणून ग्रँटडफ् म्हणतो, तें खरें नव्हें. ते मोगलांचे तर्फेनें लढले, असा शाहूनें दिलेल्या पारद गांवच्या इनामपत्रांत स्पष्ट उल्लेख आहे. 'तुमचे बाप व भाऊ मोगलाईतर्फेनें कसा करून चीज जाहले. तुम्हावर कसीला पडला; याबद्दल स्वामी कृपाळू होऊन तुम्हास मौजे मजकूर हा गांव इनाम करून दिला असे.' 'याप्रमाणें स्वामींनीं तुम्हांस कुलांत घेऊन राजपुत्र केलें. महाल गांव सरंजाम दिले. तर परगणे अक्कलकोट इनाम खानें. राज्यपदारूढ होतील ते तुम्हाकडे अकसई चालवितील. तुम्ही त्यांजपाशीं राहून राज्यसाधन सेवा करणें. आशीर्वाद.' असें आणखी एक पत्र शाहूनें मरणापूर्वी फत्तेसिंग भोसले यास लिहिलेलें आहे. शाहूच्या कारकिर्दीत राजपुत्र शब्द येईल, तेथें तो या फत्तेसिंगाचा वाचक समजावा. ( इ. सं. )

पारदहून शाहू खेडकडूस येथें भीमा नदीवर आला. तों इकडून ताराबाईचे तर्फेनें प्रतिनिधि व सेनापति त्यास आडवे आले. धनाजीच्या मनांत शाहूशीं लढावें असें नव्हतें. शाहू हा राज्याचा अधिकारी खरा अशी त्याची खात्री असल्यामुळें, ताराबाईनें वाढविलेलें वैर त्यास पसंत नव्हतें.

प्रतिनिधीचें मन मात्र पूर्णपणें ताराबाईकडे होतें. सबब धनाजीनें प्रथम खंडो बल्लाळ यास शाहूची माहिती आणण्यासाठीं गुप्तरीतीनें त्याजकडे पाठविलें. खंडोबानें शाहूची सर्व हकीकत समजून घेऊन इकडील त्यास कळविली. हा शाहूच खरा, अशी त्याची खात्री झाली. खंडोबाचे बरोबर निरोप पाठवून शाहूनें सेनापतीचें मन आपणाकडे वळविलें. 'पुढें सेनापतीनें प्रतिनिधीस समजूं न देतां फौजेंत भेद केला; व कपटयुद्ध केलें. प्रतिनिधि व ताराबाईच्या पक्षाचे सरदार बहुत लढले, पण पराभव पावून पळूं लागले. शाहूचा हत्ती आपल्या घोड्याजवळ येईपर्यंत धनाजी लढाई न करितां उभा राहिला. हत्ती जवळ येतांच आपले विचारांतील सर्व सरदारांसह घोड्यावरून उतरून मुजरे नजर करून भेटले.' ही खेडची लढाई सन १७०७ च्या मे महिन्यांत झाली. पुढें शाहूचे फौजेचा तळ खेडचे मैदानांत होऊन, सेनापति तीन कोशांचे अंतरें भीमातीरीं राहिले. दुसरे दिवशीं खंडो बल्लाळचे मध्यस्थीनें सर्व सरदारांच्या शाहूनें भेटी घेतल्या, आणि सर्वांचा सन्मान केला. जाधवांस सेनापतिपदाचीं, खंडो बल्लाळास चिटणिशीचीं व नारोराम रंगराव यास मंत्रिपदाचीं वस्त्रें दिलीं. इकडे प्रतिनिधि पळ काढून परत येऊन साताऱ्याच्या किल्ल्यांत बंदोबस्तानें राहिला. त्यानें सर्व वर्तमान ताराबाईस कळविलें. इ. संग्रहांतील खंडो बल्लाळाच्या चरित्रांत खालील मजकूर आहे.—' शाहूराजे चालून जुन्नर प्रांतांत आले. ते समयीं निळो बल्लाळास विशाळगडची.... होती. खंडेराव दाभाडे ताराऊच्या फौजेंत प्रमुख होते. खंडोबांनीं आपलें कुटुंब विशाळगडास पाठवून सडेच जवळ होते. दाभाडे यांची रवानगी झाली. राजश्रींचा पुण्यप्रताप मोठा. जे जे ताराबाईनें नेमले, त्यांजवर छाया पडली. परशुरामपंत व कान्होजी आंगरे मात्र ताराबाईचा पक्ष बळावून होते. भीमातीरींच गांठ पडली. फौजेसमागमें सरदार दाभाडे. यांचीं सर्वांचीं मनें शाहूराजाकडे ओढलींच होतीं. आईसाहेबांनीं खातरजमा करून जावेंच म्हटल्यावर खंडोबा बोलले, ' तुमच्या फौजांस यश आल्यास चाकर तुमचे, नाहीं तर जे सरदारांची वाट तेच आमची. हें ध्यानांत असावें.' असें म्हणोन फौजेबराबर गेले. लढाई झाली. फौज मोडली. राजश्रींचा जय झाला. दाभाडे खंडोबा आदीकरून सर्वांनीं राजकारण करून राजश्रींच्या भेटी घेतल्या. खंडोबास चिट-

णिशीचीं वस्त्रें तेव्हांच दिलीं. निळोबा विशाळगड सोडून याच संधींत शाहू महाराजाकडे आले. सातारा घेतला. त्या किल्ल्याचा बंदोबस्त चौकीपहाऱ्याची खबरदारी खंडोबाच करीत होते.'

शाहू आपली जमवाजमव कशी करीत होता, तें खालील पत्रावरून दिसतें. 'स्वस्ति श्री महाराज राजेश्री शाहुजी राजेसाहेब यांणीं राजश्री मताजी राऊ जेधे देशमुख, ता। रोहिडखोरे, यासी आज्ञा केली ऐसीजे. स्वामीचा भाग्योदय प्रसंग होऊन दक्षणप्रांतें येणें जालें. सांप्रत स्वामीचा मुकाम मौजे चोरवड प्रा। उतराण, प्रा। खानदेश येथें जाला. पुढें कुच दरकुच येईतच आहे. ऐसियास तुम्ही पुरातन स्वामीचे सेवक एकनिष्ठ अहां. या प्रसंगीं स्वामीच्या दर्शनास येऊन आपले सेवेचा मजुरा करून घ्यावा ऐसें आहे. तर स्वामीचे येणें समीप होतांच आपले जमावानसीं येऊन भेटी घेणें. भेटीनंतर स्वामी तुमचें ऊर्जित विशेषाकारें करतील + + खातीर जमा राखोन लिहिलेप्रमाणें वर्तणूक करणें जाणिजे. [ जुलै स. १७०७,-खं. १५-३५८]. जेधे देशमुखांची वंशावळ पृष्ठ १७३ वर आहे.

खेडाहून चाकण, पुणें, जेजुरी, वीरवाल्हें, दहिगांव या रोखानें शाहू चंदनवनाखालीं येऊन राहिला. जेजुरी येथें खंडोबाचें दर्शन घेऊन त्यानें बहुत दानधर्म केला. चंदवंदननजीक शाहूनें सन १७०७ चा पावसाळा काढिला. चंदनवंनाचे हवालदार व सुभेदार त्यास सामील झाले.

शाहूचा जमाव हळूहळू वाढत गेला. हालअपेष्टेंत वाढलेल्या शिवाजीच्या या नातवावर शस्त्र उचलण्याची कोणास छाती होत नसे. मराठ्यांच्या गादीबद्दल व शिवाजीच्या वंशाबद्दल एवढा पूज्य भाव मराठमंडळींत होता. बंडखोर संभाजीवर गोळा टाकण्याची छाती फिरंगोजी नरसाळ्यास झाली नाहीं, हें सुप्रसिद्ध आहे. राजानें नीति सोडली तरी त्याजवर उठणें येथील लोकांचें शील नाहीं. म्हणून ताराबाईवर उठणाऱ्या लोकांस राजद्रोही म्हणण्याचें कारण नाहीं. शाहूनें समक्ष भेटून लोकांची मदत मागितल्यावर, त्याच्या तोंडावर ती नाहीं म्हणण्याचें धाडस कोणास होणार ! शाहूही यजमान व ताराबाईही यजमान. त्यांचा तंटा त्यांनीं आपसांत पाहून घ्यावा, अशी लोकांची भावना होती. जसजसा शाहू साताऱ्याकडे येत चालला तसतशी लोकांची खातरी होऊन त्याचा पक्ष जोरांत येऊं लागला. प्रतिनिधीच्या पराभवानें ताराबाईचें धैर्य खचलें

नाहीं. तिनें निश्चयानें लढण्याचाच बेत केला. शंकराजी नारायण सचिवाचे ताब्यांत सर्व मावळ प्रांत होता. त्यास शाहूनें भेटीस बोलाविलें, पण तो आला नाहीं. ताराबाईशीं शपथक्रिया केल्यानें त्याचें मन द्विधा झालें. तो अत्यंत फिकिरींत पडला. पुढें शाहूचा पक्ष बळावलेला पाहून, आपसांतील कलहांत सामील होण्यापेक्षां मरण बरें असें वाटून, त्यानें आंबवडें मुकामीं देहत्याग केला. ( स. १७०७, पद्य खं. १५ ले. ३६०).

साताऱ्यावर प्रतिनिधि व शेखमिरा होते. त्यांस येऊन मिळण्याविषयीं शाहूनें पत्रें पाठविलीं. शेखमिऱ्याचें वतन वाईजवळ होतें. तेथून त्याचीं मुलें माणसें शाहूनें पकडून आणिलीं, तेव्हां त्यानें प्रतिनिधीस बोध केला कीं, किल्ला शाहूच्या स्वाधीन करावा. तथापि प्रतिनिधीनें तें जुमानलें नाहीं. तेव्हां प्रतिनिधीस कैद करून किल्ला स्वाधीन करून देण्याची मसलत शेखमिऱ्यानें शाहूबरोबर गुप्तपणें केली. ती तडीस जाऊन सन १७०७ च्या सेप्टेंबरांत सातारचा किल्ला शाहूच्या हस्तगत झाला; व तेणेंकरून मराठशाहीच्या राजधानीस शाहूचा शह लागला; आणि लवकरच परळी, वर्धनगड, महिमानगड वगैरे किल्ले त्याच्या ताब्यांत आले. प्रतिनिधीस कडक शिक्षा करण्याचा शाहूचा उद्देश होता, पण धनाजीच्या सांगण्यावरून शाहूनें तो उद्देश रहित केला असा उल्लेख आहे. त्यास साताऱ्यावरच कैदेंत ठेवून खर्चाचा वगैरे बंदोबस्त नीट करून दिला.

येणेंप्रमाणें शाहूचा अंमल बराच बसला. तेव्हां सन १७०८ च्या जानेवारींत त्यानें साताऱ्यास येऊन, ' उत्तम मुहूर्त पाहून, व्रतबंधपूर्वक यथाविधि आपणास मोठ्या समारंभानें राज्याभिषेक करविला. जे जे अष्टप्रधान त्यास सामील झाले, त्यांस त्यांच्या पदांचीं वस्त्रें यथापद्धति देऊन कार्यें सांगितलीं. पूर्व मर्यादेप्रमाणें स्वस्तिश्रीचीं पत्रें लिहिण्यास प्रारंभ करून, आपले नांवचे शिक्के करून राज्य चालवूं लागले.' बहिरोपंत पिंगळे यास पेशवाईचा अधिकार दिला,—कारण पूर्वीचा पेशवा निळो मोरेश्वर पिंगळे ताराबाईस मिळून होता, व पुढें लवकरच तो रांगणा येथें वारला, ( स. १७०९,—भा. इ. सं. मं. अ. १८३४, पृ. २१५ ).

**पिंगळे पेशव्यांचा वंश.**

मोरो त्रिमल ( पृ ३६९ ).
१६ १६८१

| नीलकंठ | मुलगी | बहिरव |
|---|---|---|
| १६८१-१७०८ | ल. रामचंद्रपंत अमात्य. | १७०८-१३. |

प्रतिनिधिपद परशुरामपंताकडे होतें. तो ताराबाईच्या पक्षाकडे राहिला, म्हणून गदाधर प्रल्हाद नाशिककर याजला तें देण्यांत आलें. हा गृहस्थ रस्त्यांत शाहूच्या उपयोगी पडला होता. परशुराम त्रिंबकाचे पूर्वी या पदावर तिमाजी रघुनाथ हणमंते याची नेमणूक होती. हा तिमाजी पुढें शाहूचा पक्ष सोडून कोल्हापुरच्या संभाजीचा प्रधान झाला. परंतु हणमंत्यांच्या घरांत पुढें शाहूनें अमात्यपद चालविलें, कारण रामचंद्रपंत अमात्य कायमचाच कोल्हापुरकरांकडे राहिला. मागें पृ. ४१५ वर हणमंते यांची वंशावळ दिली आहे, त्याचे भरतीस खालील वंशावळ ध्यानांत ठेवल्यानें पुढील संदर्भ व व्यक्ती स्पष्ट होतील.




घाईघाईनें अष्टप्रधानांची व्यवस्था लावून शाहू राज्यकारभाराचें काम व्यवस्थितपणें करूं लागला. परळी येथें रामदासस्वामीच्या वडील भावाचा नातू गंगाधरस्वामी यास बसवून, संस्थानाची नेमणूक व्यवस्था वगैरे थोरले महाराजांच्या वेळेप्रमाणें चालविण्याविषयीं हुकूम दिले. शाहूनें रामदासस्वामीच्या संस्थानाची नेमणूक इतक्या लवकर बांधून दिली, यावरून अष्टप्रधानांप्रमाणेंच रामदासस्वामीचा उपयोग मराठशाहीस होत असावा, ही तत्कालीन कल्पना व्यक्त होते. असो; याप्रमाणें सन १७०८ हें वर्ष शाहूनें आपली स्थीरस्थावर करण्यांत घालविलें, आणि त्या सालच्या पावसाळ्यानंतर त्यानें ताराबाईचा पक्ष मोडून काढण्याचें काम हातीं घेतलें.

जानेवारी स. १७०८त किंवा त्याच्या पूर्वींच शाहूस राज्याभिषेक झाला. बहिरोपंत पिंगळ्यास त्यानें आपला प्रधान केव्हां नेमिलें, आणि शंकराजी नारायण सचिव कधीं मरण पावला यासंबंधानें संशय होता. तो संशय दूर करण्यास शके १६२९ पौष शु. १३ चें खालील पत्र उपयोगी आहे. (खं. १५–३६०). मशहुरल अनाम मताजी जेधे देशमुख, ता। रोहिडखोरें, यांसी बहिरो मोरेश्वर प्रधान, आशीर्वाद, सुा सन समान मया अलफ, तुम्ही दोन पत्रें पाठविलीं तीं पावलीं, राजश्री स्वामीचें दर्शन जालिया-उपरी आपणास काय आज्ञा म्हणून लिहिलें, तरी तुम्ही म्हणजे वतनदार लोक. राजश्री स्वामी ए प्रांतें आलेवरी हे प्रसंगीं तुम्ही सर्व प्रकारें इनामें इतबारें वर्तोन स्वामीचे सेवेसीं रुजू असावें हें विहित असे. आम्ही हुजूर आहों. तुम्हास समाधान पत्रें लेहोन पाठविलीं आहेत. आणि हुजूर दर्शनास बोलाविलें असे. त्यासी सांप्रत राजश्री शंकराजी पंतास देवाज्ञा जाली म्हणून तुम्ही हुजूर यावयाविशीं अनमान कराल तरी + + + सा न करणें. पत्र पावतींच हुजूर एणें. तुमचे चित्तानुरूप सर्वही तुमचे अनुकूल करून चालऊन. एविशीं समाधान असों देणें जाणिजे.'




शाहू राज्यावर आल्यापासून मराठ्यांच्या कारभारास निराळें वळण लागलें; आणि त्यांच्या कर्तव्याची दिशा बदलत गेली. तेव्हां याच ठिकाणीं मराठ्यांच्या इतिहासाचा प्रथमार्ध संपतो. एका पुस्तकाची पृष्ठ मर्यादाही संपून गेली आहे, सबब येथेंच तूर्त वाचकांची रजा घेणें प्राप्त आहे.

---

# भोसले घराण्याची वंशावळ.



## २३ मालोजीराजे भोसले, ल. दीपाबाई निंबाळकर.

**२५ शहाजीराजे**

बायका दोन,—एक जिजाबाई, तिला संभाजी व शिवाजी असे दोन पुत्र. दुसरी बाजी मोहिते पागुरवाडीकर याची कन्या तुकाबाई, तिला पुत्र व्यंकोजी.

**२६ शरीफजीराजे भोसले.**

३८ त्रिंबकजीराजे भोसले.

५३ व्यंकोजीराजे भोसले.

[यांची वंशावळ पान ७ वर पहा.]

**३५ संभाजी.**

बायको मकाऊ.—पुत्र नव्हता म्हणून परसोजी भोसले भांबुरीकराचा मुलगा 'उमाजी' असें नांव ठेवून दत्तक घेतला. वंशज हल्लीं भीमातीरीं जिंती येथें आहेत.

( वंशावळ पृ. ४ वर पहा. )

**३६ शिवाजी महाराज भोसले.**

१ सईबाई.-निंबाळकरांची कन्या, इचा पुत्र संभाजी.
२ सोयराबाई. शिर्क्यांची कन्या, इचा पुत्र राजाराम.
३ पुतळाबाई.—

कन्या तीन:—

१ सखूबाई.—लग्न बजाजी निंबाळकराचा मुलगा महादजी याजबरोबर.
२ राजकुंवरबाई.—लग्न गणोजीराजे शिर्के याजबरोबर.
३ अंबिकाबाई.-लग्न हरजीराजे महाडिक, जो चंदीचे वेढ्यांत मरण पावला.

**३७ व्यंकोजीराजे.**

तंजावरकर

[वंशावळ पान ६ पहा].

**५१ संभाजी महाराज.**

बायको येसूबाई,—मलेकर पिलाजीराजे शिर्के यांची कन्या.

[ पान ३ वर अं. ५८ चालू. ]

**५२ राजाराम महाराज, यांस बायका:—**

१ जानकीबाई प्रतापराव गुजरची कन्या-मुलगी सावित्रीबाई.
२ ताराबाई हंबीराव मोहिते याची कन्या, इचा पुत्र शिवाजी.
३ राजसबाई.—मलवडीकर घाटग्यांची कन्या, इचा मुलगा संभाजी.

६८ शाहू महाराज, यांना बायका चार.—

१ कण्हेरकर शिर्यांची सावित्री बा.

२ राजसबाई.—सिंधखेडच्या रुस्तुमराव जाधवांची कन्या.

३ सकवारबाई.—राणोजी शिर्क्यांची कन्या, सती गेली.

४ सगुणाबाई.—नेवासकर मोहित्यांची कन्या, नवऱ्या आधींच मेली.

[शाहूमहाराजांचा औरस मुलगा ' भाऊ ' नांवाचा १६ वर्षांचा असतां बापाचे आधींच वारला].

६९ धाकटा शिवाजी, बायको भवानीबाई.

७१ रामराजे [शाहूमहाराजांचे मागें सातारचे गादीवर बसला.]

६० संभाजी. कोल्हापुरराज्याचा संस्थापक. [वंशावळ पान ८ पहा.]

७० रामराजे [नंबर ७१ पहा].

८० शाहूमहाराज धाकटे ऊर्फ आबासाहेब [हे वावीकर त्रिंबकजी भोसल्याचे चिरंजीव विठोजी होत. मूळ नं. ७७].

९१ प्रतापसिंह. [काशीस प्रतिबंधांत होते, मृ.स.१८४७].

१०६ शाहू, १८४५ त दत्तक. [जंगली-महाराज. नंबर ९० चा बळवंतराव भोसले सेनापती याचा हा मुलगा. काशीस जात असतां जंगलांत झाला म्हणून हें नांव].

९२ राजाराम ऊर्फ भाऊसाहेब. [मृ. स.१८२१].

९३ शहाजी ऊर्फ अप्पासाहेब.* बायको सगुणाबाई

१०७ व्यंकोजी [मूळ नं.१३१] [यास प्रथम बुचर बेटांत व मग नगर येथें कैदेंत ठेविलें होतें; तेथेंच १८६४ त मेला.]

१०८ राजाराम ऊ. आबासाहेब मूळ नं. १३० दत्तक. [मृ. १८६५].

११८ शिवाजी ऊर्फ अण्णासाहेब मृ. १९१४.

प्रतापसिंह ऊर्फ भाऊसाहेब [हयात, १९१५त].

---

* शहाजीची राणी सगुणाबाई. इनें बादशहाकडे केलेला अर्ज मुंबई-सरकारास पोंचतो तोंच ती १८७४ त मेली.

३५ **संभाजी** [ जिंती वंश, पृ. २ वरून ] ही जिंती घराण्याची वंशावळ इनाम कमिशनपुढें माह्य ठरलेली ग्वाल्हेरहून मिळाली.



## २४ विठोजीराजे भोसले ( पृ. १ वरून ).

- २७ संभाजी
- २८ खेलोजी. यांचे वंशज कळस, निरगुडी व शंभुमहादेव येथें आहेत.
- २९ मालोजी.
  - ३९ विठोजी
  - ४० माणकोजी
    - ५४ भवानजी
    - ५५ राजेश्वर
    - ५६ शहाजी
    - [या तिघांचे वंशज गोदातीरीं मुंगीपैठणला आहेत ]
- ३० मंबाजी.
  - ४१ राजुजी
  - ४२ गंगाधर
    - कृष्णाजी
    - कृष्णाजी गंगाधराचा उल्लेख राजवाडे यांच्या खंड १५ त आहे.
  - ४३ सुलतानजी
  - [४१, ४२, ४३ यांचे वंशज तंजावरला आहेत ]
- ३१ नागोजी.
  - ४५ सतुजी [सटवाजी]
  - ४६ खेलोजी
  - ४७ सुभानजी
  - ४८ सुखाजी
  - ४९ महादजी
  - ५० रावजी
    - रावजी ऊर्फ काकाजी वावीचा वंश.
    - ५७ लखमोजी
      - ६७ एखाजीराजे
      - ६८ सुंदरजी
      - ६९ त्रिंबकजी
        - ७७ विठोजी यास रामराजानें दत्तक घेऊन त्याचें नांव शाहू ऊर्फ आबासाहेब ठेविलें.
        - ७८ परशुराम
        - ७९ चतुरसिंग
          - ९० बळवंतराव भोसले, सेनापति.
            - शाहू ऊ. जंगलीमहाराज, प्रतापसिंहास दत्तक, नं. १०६
- ३२ परसोजी.
  - ४४ उमाजी हा जिंतीवंशांत दत्तक घेतला होता. याचे दुसरे नातलग, अहंमदनगर जिल्ह्यांत भांबोरीला आहेत.
- ३३ त्रिंबकजी. याचे वंशज अद्याप तंजावरास आहेत.
  - गंगाजी
    - उवाजी
      - गंगाजी
        - सुभानजी
          - उवाजी
          - शहाजी
            - शरफोजी तंजावरवंशांत दत्तक गेला.
    - ताबोजी
- ३४ मकाजी याला संतान नाहीं.

## तंजावर घराणें.

३७ ( १ ) **व्यंकोजी**, सन १६७५–१६८२, (पृ. २ वरून).

( पहिली बायको इंगळे यांची कन्या दीपाबाई; दुसरी अनुबाई ).

( २ ) शहाजी ( मृत्यु स. १७११ ). ( ३ ) शरफोजी ( मृ. स १७२७ ). ( ४ तुकोजी ( मृ. स. १७३५ ).

( ६ ) प्रतापसिंह.
( स. १७४० त सिंहासनारोहण; मृ. स. १७६३ )

( ५ ) एकोजी ऊर्फ व्यंकोजी बाबासाहेब.
( मृ. स. १७३६; पत्नी सुजनबाई )

( ७ ) तुळजाजी ( मृ स. १७८६ ).

( ८ ) अमरसिंह–दासीपुत्र
( स. १७८७ त सिंहासनारोहण,
स. १७९८ त हद्दपार )

( ९ ) सरफोजी, दत्तक ( मृ सन १७९८–१८३२ )

प्रतापसिंह ( निपुत्रिक ).

( १० ) शिवाजी ( मृ. स. १८५५ ).

## ५३ व्यंकोजी राजे भोसले, (पृ. २ वरून).

६१ संभाजी. ६२ माणकोजी. (खानवट वंश पृ ९वर पहा) ६३ शहाजी. (चिलवडी वंश. यांचे वंशज भीमातीरीं चिलवडी येथें आहेत). ६४ शरीफजी. ६५ तुकोजी. (दुधवाडी वंश. याचे वंशज नगर जिल्ह्यांत दुधवाडीस आहेत.) ६६ बाबाजी राजे भोसले. (शिडगांव वंश).

७५ सुभानजी. ८७ व्यंकोजी. (हे नागपुरास आहेत.)

७६ राणोजी.

८८ एसाजी. ८९ बाबाजी.

१०२ व्यंकोजी. १०३ भागोजी. १०४ रामजी.

११२ जानराव. ११३ खंडेराव. ११४ भवानजी ११५ खंडेराव. ११६ आनंदराव. ११७ हणमंतराव. ११८ यशवंतराव.

१२७ संताजी. १३२ जानराव.

१२४ माधवराव. १२५ चिमणाजी. १२६ हरिश्चंद्र.

१२८ बळवंतराव. १२९ अंबाजी.

१३० माधवराव. १३१ व्यंकोजी (छत्रपति शहाजी अप्पासाहेबांनीं दत्तक घेतला. मृत्यु सन १८६४)..

(यास सातारची राणी सगुणाबाई इनें दत्तक घेतला.)

**६० संभाजी, कोल्हापुरशाखेचा मूळपुरुष (पृ. ३ वरून).**

राजाराम महाराजांचा पुत्र, मृत्यु स. १७५९. पत्नी जिजाबाई, तोरगलकर शिंदे यांची कन्या, तिनें आपली बहीण दुर्गाबाई हिला आपली सवत करून घेतली होती.

|

७२ शिवाजी [ दत्तक ]

|

- ८१ संभाजी
  वयाचे २३ वे वर्षी स. १८२१ त राजवाड्यांत झुमानजी वाजी तळबीडकर मोहित्यानें याचा खून केला. त्याला मूल नव्हतें. त्याची बायको दिवाणसाहेब नांवाची, जिवाजी शिर्के तळसरकर याची मुलगी.
- ८२ शहाजी ऊर्फ बाबासाहेब
  [ मृत्यु स. १८३८, पंढरपुराजवळ यवती येथें ].
  - ९४ शिवाजी ऊर्फ बाबासाहेब
    मृ स.१८६६, पत्नी बडोद्याचे गणपतराव गायकवाड यांची कन्या साशीबाईसाहेब.
    - ९४ राजाराम दत्तक
      [ मृ. स.१८७० फ्लॉरेन्स येथें ].
      - ९४ शिवाजी [दत्तक सानबटकर].
        - शाहूमहाराज [ हल्लींचे ].
  - ९५ शाहू ऊर्फ चिमाजी
    [कराचीस हद्दपार होता].


६२ माणकोजी, खानवटकरांचा मूळपुरुष (पृ. ७ वरून).
७३ शहाजी राजे.
७२ शिवाजी, दत्तक–कोल्हापुर.
७४ शरीफजी.
याचे वंशज इंदापुर तालुक्यांत खानवट येथें असतात.
८३ माणकोजी
कोल्हापुरास दत्तक.
८४ संभाजी.
८५ मालोजी.
८६ शरीफजी.
९६ रामचंद्रजी राजे.
९७ शहाजी.
९८ व्यंकाजी.
१०९ नारायणजी.
११० मालोजी.
१११ भाऊराजे.
११९ रामचंद्रजी.
९९ माणकोजी राजे.
१०० त्रिंबकजी राजे.
१०१ महादाजी राजे.
१२० रघुनाथराव राजे.
१२१ शिवाजीराजे.
१२२ बुकीरजी राजे.
१२३ मेघश्याम राजे.

# सावंतवाडीकर भोसले, सावंत.

[ पिंगुळकरकृत इतिहासावरून ].

फोंड सावंत

१ खेम सावंत [१६२७–१६४०]

२ सोम सावंत [१६४०-१६४१]

३ फोंड सावंत [१६४१–१६५१]

४ लखम सावंत [१६५१–१६७५

५ खेम सावंत, दुसरा [१६७५–१७०९]

नार सावंत

६ फोंड सावंत, दुसरा [१७०९–१७३८]

नारसावंत

जयराम सावंत [१७३८–१७५३]

सोम सावंत

कृष्ण सावंत

७ रामचंद्र सावंत, पहिला [१७३८–१७५५]

१० फोंड सावंत तिसरा [१८०८–१८१२]

श्रीराम सावंत

रामचंद्र सावंत. [खेम सावंताचे विधवेस दत्तक मृ. १८९८].

८ खेम सावंत, तिसरा [१७५५–१८०३]

११ खेम सावंत, चवथा [१८१२ १८६७]

९ रामचंद्र सावंत, दुसरा, दत्तक [१८०३–१८०८]

१२ फोंड सावंत, चवथा [१८६७–१८६९]

सोमसावंत

१३ रघुनाथ सावंत [१८६९–१८९९]

[श्री. खंडेराव गायकवाड यांचे जांवई].

१४ श्रीराम सावंत [ १८९९–प्रस्तुत ].

खेम सावंत बापूसाहेब, युवराज.

## ४. जंजिऱ्याचे सीदी सरदार.

१ सीदी याकुतखान [स.१६२०–१६२१].
२ सीदी अंबर हबशी सानक [स.१६२१–१६४२].
३ सीदी युसफखान [स.१६४२–१६५५].
[मुलाकडून पदच्युत स.१६४८].
|
४ सीदी फत्तेखान [स.१६४८–१६६७].
५ सीदी खैर्यतखान, फत्तेखानाचा सरदार [स.१६६७–१६९६].
६ सीदी कासम, खैर्यतचा भाऊ [स १६९६–१७०६].
[ह्यानेंच बाळाजी विश्वनाथाच्या भावास ठार मारिलें].
७ सीदी सुरूलखान [स.१७०६–१७३४].
८ सीदी अब्दुल रहमान व सीदी हसनखान [स.१७३४].
९ सीदी संबूलखान [स.१७३४–१७३६].
१० सीदी अब्दुल रहमान पुनः [१७३७–१७४०].
११ सीदी हसन पुनः [स.१७४०–१७४६] पदच्युत.
१२ सीदी इब्राहीमखान, सुरूलखानाचा तिसरा मुलगा.
[स.१७४६–१७५८, व पुनः स.१७५९–१७६१].
१३ सीदी महंमद [स.१७५८].
१४ सीदी याकुतखान [स.१७६१–१७७२].
१५ सीदी अब्दुल रहीम [स.१७७२–१७८४].
१६ सीदी जोहर [स.१७८४ १७८९].
१७ सीदी इब्राहीम [स.१७८९–१७९४].
पुनः [स १८०४ १८२५].
१८ सीदी जमरूडखान [स.१७९४–१८०४].
१९ सीदी महंमदखान, इब्राहीमचा मुलगा [स.१८२६–४८].
|
२० सीदी इब्राहीम [स.१८४८–१८७८].
|
२१ सीदी अहंमदखान [स १८७८......प्रस्तुत].



## २. फलटणचे निंबाळकर.

( अद्याप हयात असलेलें महाराष्ट्रांतील पुराण घराणें ).

जगदेवराव ऊ० निंबराज पवार,
संस्थापक निंबळक.
|
पोदखला ऊर्फ धारापतराव

{ स. १२४४ १३२७. }

|
निंबराज फलटण संस्थापक दुसरा ( स. १३२७–१३४९ )
|
वणंगभूपाळ ( स. १३४९–१३७४ )
|
वणंगपाळ ( स. १३७४–१४०० )
|
वणगोजीराव पहिला ( स. १४००–१४३० )
|
मालोजीराव पहिला ( स. १४३०–१४३५ )
|
बाजीसाहेब ( स. १४३५–१४६५ )
|
पोवारराव नाईक ( स. १४६५–१४८० )
|
बाजी नाईक ( स. १४८०–१५१२ )
|
मुधोजी नाईक पहिला ( स. १५१२–१५२७ )
|
बाजी धारराव ( स. १५२७–१५६० )
|
मालोजी नाईक दुसरा ( स. १५६०–१५७० )
|

दीपाबाई
ल. मालोजी भोसले.

जगपाळराव नाईक, दुसरा
स. (१५७०–१६३०)
|


मुधोजी नाईक दुसरा [स.१६३०-१६४८] [विजापूरचे शहाने ठार मारिला].
साबाजीराव [दहिगांवकर].
जगदेवराव [भाळवणीकर].
सईबाई ल. शिवाजी छत्रपति.
बजाजीराव [स.१६४४-१६७६] [स.१६५१ पर्यंत विजापुरास कैद]. ल. सावित्रीबाई.
मुधोजी
तुकाराम
अमृतराव*
शहाजी*
पिराजी*
वणगोजी.
* या तिघां मुलांस सावित्रीबाई राजाराम-छत्रपतीची मुलगी, हिनें पाळिलें.
महादाजीराव. ल.सखूबाई [शिवाजीची मुलगी].
बजाजी [स.१७६५-१७७४]
मुधोजीराव.
बजाजी नाईक [लग्न सोयराबाई ऊर्फ सावित्रीबाई राजाराम छत्रपतीची मुलगी].
वणगोजीराव तिसरा. स. [१६७६-१६९३].
जानोजीराव [स १६९३-१७४८].
मुधोजीराव तिसरा, १७४८-६५
ल.सगुणाबाई १७७७-१७९१
मालोजीराव तिसरा [स.१७७४ १७७७]
जानराव [१७९१-१८२५].
ल.साहेबजीबाई १८२५ १८५३
मुधोजीराव बापूसाहेब दत्तक [स.१८५३-प्रस्तुत].
व्यंकटराव [मृ. स.१८८७].
मालोजीराव नानासाहेब दत्तक.

# सूची.

भूगोलिक स्थळें व व्यक्ती अशी दोन प्रकारची सूची केली आहे. कोणताही विषय पाहणें झाल्यास तो बहुधा तत्संबद्ध व्यक्तीखालीं सांपडेल. तथापि कित्येक सामान्य विषयही व्यक्तींच्या सूचींतच स्वतंत्र दिले आहेत. व्यक्तींचीं नांवें पाहतांना मूळ नांव पहावें. कित्येक महत्त्वाचे विषय अनुक्रमणिकेवरूनच कळून येतील.

## सूची—व्यक्तिविषयक.

### अ.

## च.



## छ.



## ज.

## श.

# सूची—भुगोलिक स्थलांची.

## ख



## ग

## श



## स

# चुकांची दुरुस्ती,—सूचना.

एवढ्या मोठ्या पुस्तकांत मुद्रणाचीं वगैरे बरींच अशुद्धें राहणें साहजिक आहे. बहुधा तीं सर्व वाचकांस दुरुस्त करतां येण्यासारखीं आहेत; एक दोन ठिकाणीं थोडा अर्थविपर्यास होण्याचा संभव आहे.

पृष्ठ ११५ खालून ओळ ८, 'शिवाजीचे' या शब्दाबद्दल 'रामदासाचे' असें पाहिजे

पृष्ठ ४११ चे शेवटीं 'बाळाजी विश्वनाथ हा पेशव्याचें पदरीं होता, याबद्दल 'हा बाळाजी विश्वनाथ पेशव्याचे पदरीं होता,' असें पाहिजे.